# मराठी शब्दकोश

## तिसरा खंड

( च - ते - ञ आणि ट - ते - ण )




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.

# मराठी शब्दकोश

## तिसरा खंड

### (च ते ञ आणि ट ते ण)

**प्रथम संपादन**

**य. शं. कानिटकर**

*एम. एम.*

•

**पुन:संपादन**

**प्राचार्य रामदास डांगे**

•

**संपादन सहयोगी**

- **पूर्णिमा लिखिते** *एम. ए.*
- **अरुण प्रभुणे ( पुणे )** *एम. ए. बी. एड. पीएच. डी.*
- **सुप्रिया महाजन** *एम.ए. (संस्कृत)*
- **रूपाली अवचरे** *एम.ए., एम. फिल.*




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ -मुंबई

◆ 'मराठी शब्दकोश'(तिसरा खंड)

❧

◆ प्रथम आवृत्ती
मार्च २०११

❧

◆ प्रकाशक
सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
रवीन्द्र नाट्य मंदिर, दुसरा मजला,
पु. ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी आवार,
सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई – ४०००२५.

❧



❧

◆ अक्षर जुळणी
सौ. चेतना विकास वडके
शब्दमाधुरी, पुणे.
भ्रमणभाष : ९८९०९८४९२७

❧

◆ मुद्रक
व्यवस्थापक,
शासकीय फोटोझिंको मुद्रणालय
पुणे ४११००१.

❧

◆ किंमत : रुपये १९१ फक्त



# निवेदन

मराठी शब्दकोशाचा पहिला खंड (अ ते औ) मार्च २००९ मध्ये प्रकाशित झाला. प्रस्तुत खंडाच्या प्रास्ताविकात संकल्पित मराठी शब्दकोशासंबंधी सविस्तर माहिती दिली आहे. तेथेच 'दुसऱ्या आणि तिसऱ्या खंडांचे काम लवकरच पूर्ण करण्याचा आमचा प्रयत्न आहे,' असे निवेदन केले होते. दुसरा खंड (क वर्ग ) मार्च २०१० मध्ये पूर्ण झाला. प्रस्तुत खंडाचे प्रकाशन दि. ५.१०.२०१० ला महाराष्ट्र राज्याचे तत्कालीन मुख्यमंत्री मा. श्री. अशोकराव चव्हाण यांच्या हस्ते झाले. त्या प्रसंगी त्यांनी काढलेले गौरवोद्गार पुढील कामास प्रोत्साहन देणारे होते आणि आता हा तिसरा खंड (च वर्ग आणि ट वर्ग) वाचकांना, अभ्यासकांना उपलब्ध होत आहे.

या तिसऱ्या खंडात, शब्दसंख्या लक्षात घेऊन, 'च' आणि 'ट' या वर्गांतील वर्णांचा समावेश केला आहे. दुसऱ्या खंडाच्या शेवटी उपयोगात आणलेल्या कोशग्रंथांची यादी दिली आहे. त्या यादीत आणखी काही कोशांची भर पडली आहे. त्यांचाही निर्देश शेवटच्या खंडात करण्याचे ठरविले आहे. अर्थाच्या संदर्भासाठी घेतलेल्या 'अवतरणां'ची ग्रंथनिर्देशसूची तेथे किंवा पुरवणी खंडात देण्यात येईल.

'त' वर्गातील वर्णांच्या चौथ्या खंडाचेही काम पूर्ण झाले आहे. तसेच 'प' वर्गाचे कामही लवकर हातावेगळे करण्याचा आम्ही प्रयत्न करणार आहोत.

शब्दकोशाच्या या अवघड कार्यात, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे अध्यक्ष पद्मश्री मधू मंगेश कर्णिक यांच्या प्रेरक पाठराखणीमुळेच आम्हास अपेक्षित गती प्राप्त झाली आहे. त्यात भर पडली आहे, मंडळाचे सचिव श्री. सुरेश वांदिले यांच्या कार्यतत्परतेची.

– संपादक



**च** मराठी वर्णमालेतील एकविसावे अक्षर व सहावे व्यंजन. याचा उच्चार मराठीत दोन प्रकारे होतो. १. तालव्य. २. दंतमूलीय. तालव्य :- चहा, चमत्कार इ., दंतमूलीय :- चमचा, चवरी, चव इ.

**च** शअ १. निश्चय, खात्री, स्पष्टपणा, वैशिष्ट्य दाखवणारे शब्दयोगी अव्यय. उदा. तुम्हीच या = इतरांस न पाठवता तुम्ही स्वत: या; तुम्ही याच = कसेही करून, न चुकता या; तो चोरच आहे = तो चोरीचाच धंदा करणारा आहे; तोच चोर आहे = इतर कोणी नाही तो स्वत: चोर आहे; मी जेवताच उठलो = जेवण होताक्षणी उठलो; मी येईनच = येईनच येईन (खात्रीने, नि:संशय मी येईन). २. या अव्ययाला कधी गुणदर्शक अर्थ असतो. उदा. एवढाच. ३. सदृश; सारखा. उदा. असाच. [सं.]

**चइणे** अक्रि. जागा होणे : 'चइला तव लटकें।' – चसिसू ५३.[सं. चित्]

**चइत्य, चैत्य** न. चिंतनीय विषय : 'तैं चित्त चैत्यत्यागें। मातें चि भजें।' – राज्ञा १८.१२६१; 'ऐसें चइत्य जातें सांडिले।' – राज्ञा १८.१२६२.

**(चइ–ई ने प्रारंभ होणारे शब्द येथे न आढळल्यास 'चै', 'चाय' खाली पहावेत.)**

**चई** स्त्री. १. केस किंवा लोकर ज्यात झडते असा रोग; कातर; उंदरी. पहा : **चाई** (क्रि. लागणे.) २. गुरांचा एक रोग.

**(चउ–ऊ ने प्रारंभ होणारे शब्द येथे न आढळल्यास 'चौ', 'चव' खाली पाहावेत.)**

**चउक** पु. चौथरा : 'त्याणें उत्तनास चउक बांधिला।।' – मब ३६.

**चउत्रा** पु. चौथा भाग; चौथ; चतुर्थांश. [सं. चतुर्थ]

**चउदशी** स्त्री. शुक्ल किंवा कृष्ण पक्षातील चौदावा दिवस; चतुर्दशी.

**चउर** वि. चतुर; जाणता : 'नेणा आणि चउरा।' – राज्ञा १५.३८७.

**चउरा** पु. चौक; चव्हाटा; चौकी : 'येतें समयी बऱ्हाणपुरास गेलो. तेथे चउऱ्यावर कागदाची चौकसी केली.' – पेद ४.२२. [हिं. चौराह]

**चक** पु. १. हद्द किंवा हद्दींचा नकाशा : 'मेढीयातून काम पाच हात उंच आहे त्याचा चकहि काढून पाठविला असे.' – ऐको ३६०. २. हक्काची रक्कम; दस्तुरी; कर; फी. ३. मालकीची, वाट्याला आलेली जमीन; नंबर; क्षेत्र. ४. लागवड करावयास घेतलेली सलग, मोठी, जमीन; जमिनीचे मोठे क्षेत्र. यावरून एखाद्या गावास मिळालेले नाव. ५. विभागलेल्या जमिनीचा एक भाग; तुकडा; जुन्या जमाबंदी दप्तरातून याचा अर्थ गावकऱ्यांकडून घेऊन तिऱ्हाइतास लागवडीकरता दिलेली जमीन असा आहे. जमीन मोजणीत याचा अर्थ एका नंबरातील दुसरे शेत असा आहे. [फा.]

**चक** पु. हुकूमनामा; (काजीने दिलेला) फतवा.

**चक** पु. १. वचक; धाक; जरब; वजन; दरारा; पगडा (सत्ता, अधिकार यांचा); अप्रत्यक्ष अधिकारमान्यता. २. कायदा; नियम; कानू; शासन; ठरलेली पद्धत. ३. जुनी, नेहमीची पद्धत; रीत; वहिवाट. ४. (सरकारी नोकरांत रूढ) ताकीद; ठपका; कानउघाडणी. (क्रि. येणे, ठेवणे, घालणे.)[इं. चेक] (वा.) ० **पुरवणे** – चारी बाजूंकडून त्रास होणे. ० **बसणे** – खंबीर पायावर उभारणी होणे; मजबुती होणे; पक्की व्यवस्था येणे; दरारा; दहशत बसणे : 'त्या दिवसापासून दारू व मांस शहरात विकू नये असा चक बसला.' – शिप्रब ६९.

**चक** क्रिवि. १. चकचकीत; स्वच्छ : 'घरामधी चार दोनच भांडी पन कसी... चक' – लोसाको. 'दिले जरी पोषाख स्वामीला चक दौलतरायाने।' – सला ५२. २. पहा : **चक्क**

**चक** पु. तंबाखूच्या पानांच्या राशीवरचे झाकण.

**चक** १. दर्शनी हुंडी. २. ठक. (प्रा.)

**चकचक** क्रिवि. १. चकचकीतपणाने; डोळे दिपून जाण्यासारखे; झकक्न्; लखलख : 'चकचक चुकावेना। चाट चावट चळावेना।' – दास १४.४.६. २. स्पष्टपणे. पहा : **चक्क**

वि. पहा : **चकचकीत**

पु. न. चकचकीत पदार्थ, गोष्ट; चकचकाट. [सं.चक्]

**चकचक, चकाचका** क्रिवि. कुत्रे पाणी पीत असताना, चाटताना, पिताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे : 'कृष्णाने ओंजळीत पाणी घेतले व तो चकाचका करीत प्यायला.' – वाघसिंह ४६. [ध्व.]

**चकचकणे** अक्रि. १. चकचक, चुकचुक आवाज काढणे; चुकचुकणे (पाल, साप इत्यादींनी). २. (ल.) खेद करणे; दु:ख करणे; चक असा ध्वनी काढणे (हळहळण्याच्या वेळी तोंडातून चक असा ध्वनी निघतो त्यावरून) : 'येक झडा घालूं जातीं। लंडी चकचकून पळती।' – दावि ४०३. [ध्व.][सं. चक्]

**चकचकणे** अक्रि. प्रकाशणे; लकाकणे; चमकणे; झळकणे.[सं. चक्]

**चकचकाट** पु. १. लखलखाट; झगमगाट; तेज : 'अपूर्वाईच्या चकचकाटाने ते दिपून गेलेले नाहीत.' – सामा १८८. २. स्वच्छता.

**चकचकावणे** अक्रि. (माकड, पक्षी इत्यादींनी) चकचक असा आवाज करणे. [ध्व.]

**चकचकाविणे** अक्रि. कानशिलावर चपराक मारणे; थोबाडीत लगावणे.

**चकचकी** स्त्री. १. तेज; प्रभा. २. लकाकी; उजाळा. [सं.चक्]

**चकचकीत** वि. १. सतेज; झळझळीत; लकलकीत; प्रकाशमान; चमकणारे. २.(ल.) झकपक; चापचोप; नीटनेटका; स्वच्छ; व्यवस्थित; ठाकठीक; नीटस; सुरेख (माणसे, वस्तू, स्थळे इ.). [सं. चक्]

**चकचूर, चकचुरी** पहा : **चकाचूर** : 'चकचूर करिति कर ऊर चरण शिर सूरकुलज रणशूर तदा।' – आय २९; 'कपि बैसता जरी वरी। तैं होता चकचुरी निर्नामि।' – भारा किष्किंधा १७.१२४.

**चकडबंद** वि. बंदिस्त; बद्ध : 'बायबलावर हात ठेवून शपथ घेणाऱ्या हातांनीं नानास चकडबंद केलें.' – दुमो.

**चकडमकड** स्त्री. सोंगढोंग; चालढील; चालढकल. (व.)

**चकडी** स्त्री. आठांचा (आठ वस्त्रांचा) समूह, समुदाय. [क.चेक्कु]

**चकण** स्त्री. धुराड्यांच्या मधून जोखडाच्या खाली घातलेली लाकडी पट्टी. (को. ठाणे)

**चकणा** वि. तिरळे पाहणारा; तिरळा; काणा. [सं. चक्षुष्काण]

**चकणाचूर** पु. चक्काचूर; नाश : 'चार कपांचा पार चकणापूर झाला.' – कोउ १६८.

**चकणी** स्त्री. पैसे, कवड्या इत्यादिकांच्या खेळात जी चकण्याची पाळी

येते ती; चकणे. [सं. चक्कलन]

**चकणे** अक्रि. १. आश्चर्यात किंवा कौतुकात निमग्न असणे; गोंधळणे; भांबावणे; भूल पडणे : 'मदनें मति त्याचीही क्रीडा चकली।'– रापं ९. २. (ल.) फसणे : 'लॉर्ड कर्झन साहेबांच्या राजकीय धोरणासंबंधाने हे चकतील...'– टिकेले २.५१४. ३. भय पावणे; दचकणे : 'देखुनी उभयतां चकती ते। भासती जिवन वेंचकती ते।'– आनच. [सं. चकित]

**चकणे** पहा : **चुकणे**

**चकणे** अक्रि. १. खेळाच्या प्रारंभी गोल करून उभे राहून डाव्या हातावर उजवा हात पालथा, उताणा मारणे व त्यावरून डाव कोणावर ते ठरविणे; गडी उजवणे. २. गोट्या किंवा कवड्या यांच्या खेळात प्रारंभी खळीत पैसा टाकणे. [सं. चक्कलन]

**चकतळी** स्त्री. पहा : **चकदळ :** 'एव्हडालया चकतळीया नीगति ': २९ : कानवाथराचा दृष्टांत– दृपा १४.

**चकती** स्त्री. १. वाटोळी, सपाट, पातळ अशी कोणतीही वस्तू किंवा पदार्थ; (केळे, काकडी, ऊस इत्यादिकांची) खाप, फोड; चांदकी; चांदुकली; थापटी; पातळ वडी; वाटोळा तुकडा. २. चिठ्ठी; पत्र; हुकुमाचा कागद; तिकीट; कार्ड. ३. सनद; पास; दस्तक; परवाना. ४. शिपायाचा बिल्ला : 'एक चपराशी चकती पाहून रयत थरथरी बकरी जशी।'– पला ६५. ५. मांसाचा पातळ तुकडा. पहा : **परसुंदा** ६. (ग्रंथ.) ग्रंथावर लावण्यात येणारी क्रमांकदर्शक चिठ्ठी. [सं. चक्रवत्]

**चकती** स्त्री. यादी.

**चकदळ, चकदा** न. पु. १. (फळांची) लहान चकती; काप; वाटोळा कातळा. २. वाटोळा डाग, तुकडा, स्थळ. ३. पापुद्रा; खवला. ४. चट्टा. (व.) [सं. चक्र+दल]

**चकदळी** स्त्री. १. लहान भाकरी, पोळी; थापटी; वडी. २. कोणत्याही नळकांड्याच्या आकाराच्या पदार्थांची पातळ चकती. [सं. चक्र+दल]

**चकदांड्या** वि. खडबडीत. (झाडी)

**चकन(ना)चूर** पु. १. बुकणा; पूड; भुगा; तुकडेतुकडे; खंड; समुदाय (फुटलेल्या, मोडलेल्या पदार्थांचा); छिन्नभिन्न झालेला गोळा. २. मोडले गेल्याची, भंग झाल्याची कल्पना, समज. ३. (ल.) सत्यानाश; नायनाट : 'त्या एका चुकीने बेरीदशाहीचा चकनाचूर होऊ दिला...'– रालेसं २१३. वि. छिन्नविच्छिन्न; भग्न; तुकडे तुकडे झालेला (पदार्थ). [हिं.]

**चकन(ना)चूर** वि. १. अतिश्रमाने आलेला (थकवा). २. थकलेला; भागलेला; दमलेला; मरगळीस आलेला; आपल्याला नष्टप्राय समजणारा (मनुष्य, शरीर).

**चकनळचे** अक्रि. १. पोटात ढवळणे. २. पातळ पदार्थ हिसळणे; हलणे (बाटली, भांडे इत्यादिकांत).

**चकना** क्रि. फसणे; गोळी खेळणे. (झाडी) [सं.]

**चकनामा** पु. १. गावच्या जमिनी, तनखे, गायराने, इनामे यांची माहिती; हिशेब, यादी. २. वतनाच्या, शेताच्या मर्यादा, सीमा ज्यात नमूद केल्या आहेत असा कागद; चतु:सीमापत्र. ३. करारनामा; दस्तैवज. ४. हुकूमनामा; फतवा. ५. नियमांचा तक्ता; नियमसंग्रह; नियमावली : 'शास्त्री व गुरु पाठशालेत विद्यार्थी यांचे वहिवाटीकरिता चकनामे करितील त्याप्रमाणे गुरूनी व विद्यार्थी यांणी वागत असावे.'– पेद ८२.६.

**चकपक** स्त्री. १. चपळाई; चापल्य; तरतरीतपणा. २. नीटनेटकेपणा; ठाकठिकपणा (माणसांचा). ३. स्वच्छता; तजेला.
वि. नीटनेटका; व्यवस्थित; सुटसुटीत; झुळझुळीत; निर्मळ व स्वच्छ; झकपक (मनुष्य, स्थळ, वस्तूंची मांडणी); 'हंड्या-झुंबरं चकपक करून कवाच ठिवल्यात.'– मिरास १८१. [चक द्वि.]

**चकबंदी** स्त्री. १. जमीन, शेत, वतन यांच्या चतु:सीमा ठरविणे, मर्यादा घालून देणे. २. जमिनीची आकारणी, सारा ठरविणे; साऱ्याचा दर निश्चित करणे; आणेवारी काढणे; गाव वसाहतीस आणण्याच्या कामाची अंगे मुख्यत: तीन १) नापीक जमीन पिकाऊ करणे. २) पिकांचे व गावकरी आणि शेतकरी ह्यांचे रक्षण करणे आणि ३) राज्यातील सर्व जमिनीचे मोजमाप करून सारा-आकारणी करणे. ह्या तिन्ही गोष्टींस त्या वेळी लावणी, संचणी व उगवणी आणि चकबंदी, टकबंदी आणि जमाबंदी ही नावे होती.– अमराअ १.१४६. ३. पोलिस किंवा महसूल अधिकार क्षेत्राची मर्यादा. २. पोलिस किंवा महसूल अधिकार क्षेत्राची मर्यादा.

**चकभूल** स्त्री. आश्चर्य; विस्मय; भ्रांती; संभ्रम; संमोहावस्था; अचंबा : 'हें पाहून विद्याधरानें पुत्राची चकभूल जावी म्हणून तेथें एक बंगला होता त्याठिकाणीं त्यास नेऊन भोजन घातलें.'– बाळमित्र २.११७.
वि. आश्चर्यचकित; विस्मित; विमोहित; दिङ्मूढ.

**चकमक** स्त्री. १. अग्नीची ठिणगी पाडणारी गारगोटी व पोलादी पट्टी (यांच्या घर्षणाने ठिणगी पडते.); विस्तवाचे साधन : 'त्याजवळ विंस्तव पाडण्यास चकमक नव्हती.'– पाआव्ह २६. २. पोलादी पट्टी; पोलाद. ३. (ल.) बोलाचाली; भांडण; झटापट; बाचाबाच; परस्पर आघात. ४. कलह; युद्ध; मारामारी वगैरे. (क्रि. झडणे, उडणे, होणे.) : 'पहिल्या चकमकींत माझाच जय झाला.'– नाक ३.४ [का. चक्माक][सं.]

**चकमक** वि. नीटनेटका; स्वच्छ.

**चकमकणे** अक्रि. चकचकणे; प्रकाशणे; लखलखणे; झळकणे. [सं.]

**चकमकी** स्त्री. बंदुकीचा एक प्रकार.

**चकमकीत** वि. तुळतुळीत : 'त्याचा चकमकीत गोटा केला.'– बाब ८८.

**चकमा** पु. १. चाट; झुकांडी; भुलावन. २. फसवणूक. (झाडी) [हिं.]

**चकया** पु. वाजविण्याचा टाळ. (कु.) [सं. चक्र]

**चकर** वि. चक्रांची आकृती असलेला : 'बसाया बसकूर जान टाकते चकराचं लेक माझ्या सावकाराचं.'–लोसाको. [सं. चक्र]

**चकरका** पु. तुकडा; कपटा : 'असे म्हणत टेबलावर लिहून अस्ताव्यस्त टाकलेले चकरके तिने गोळा करायला सुरुवात केली.'– आसा २१४. [चवरकाबद्दल चुकीने]

**चकरचुवा** पु. मुलांचा एक खेळ.

**चकरणे** उक्रि. किंचित फिरविणे, वळविणे (बहाल, चिरा इ.). (को.)

**चकरणे** अक्रि. चुकणे; प्रमाद करणे; चूक करणे.

**चकरदंड** पु. एक प्रकारचा व्यायाम; कसरत; चक्रदंड. [सं. चक्र+दंड]

**चकरदांतां** पु. चकल्या करण्याचे यंत्र; सोऱ्या. (गो.) [सं. चक्रदंत]

**चकरमकर** स्त्री. १. युक्त्या; डावपेच; हिकमती; धावडाव; चेष्टा; लपंडाव.

२. सबबी; बहाणा; खोटी कारणे सांगणे. ३. गमजा. (खा.)

**चकरमकर** स्त्री. भीती; भय; धडकी; त्रेधा. (क्रि. भुलणे, भुलवणे, कर्त्याची किंवा कर्माची षष्ठी.) ३. जादू.

**चकराची** वि. भ्रमात टाकणारी. (वै.को.)

**चकरावणे** अक्रि. चकित होणे; स्तंभित होणे; गोंधळून जाणे; दिङ्मूढ होणे; आश्चर्यचकित होणे : 'या सगळ्या प्रकाराने मी चकरावून गेलो.' – सीपो ९.

**चकरी** स्त्री. (चर्मकार) डेरा व मोट एकत्र शिवण्यासाठी डेऱ्याचा मधला भाग कापून काढलेला गोल भाग; ठिगळ. [सं. चक्र]

**चकरी** स्त्री. गोल गंगाफळ; भाजीचे एक फळ. (कात.)

**चकरी** स्त्री. घेरी. (राजा.) [सं. चक्र]

**चकर्डे** न. केसाचे चक्र : 'चकर्ड्यांतल्या त्या तुझ्या रुस्तुमी...' – सामा १६८.

**चकला** पु. अनेक परगणे मिळून बनलेला देशाचा विभाग. [सं. चक्र]

**चकला** पु. १. शहराचा भाग; पेठ; मोहल्ला. २. शहराच्या, महालाच्या विशिष्ट भागातील खटले चालविण्याची जागा, कोर्ट, कचेरी; पेठेची, वार्डाची, न्यायाधीशाची कचेरी; कोतवाली. ३. सराफ कट्टा. ४. अड्डा; तळ (मजूर, गाड्या, जनावरे यांचा); खुंट. ५. (भिक्षेकऱ्यांत) अगदी सकाळी भिक्षा मागण्याकरिता ठरावीक ठिकाणी उभे राहण्याची पद्धत, वहिवाट. ६. अशा ठिकाणी मागितलेली, दिलेली भिक्षा. ७. वेश्यांची वस्ती, आळी : 'रम्याने चंपाला चकल्यातून आणून गरतीच्या पंक्तीला बसवले होते.' – चंदन ७. [सं. चक्र]

**चकला** पु. एक हलक्या प्रकारचे गर्भसुती वस्त्र. (राजा.)

**चकला** पु. अनेक प्रकारची फुले वगैरे कोरलेली पट्टी; दागिन्यावर टीक अगर फुले उठविण्याचा सोनाराचा ठसा. (को. राजा.)

**चकला, चाका** पु. (सोनारी) जरीतून काढलेली चांदी.

**चकली** स्त्री. १. धातूची किंवा धातूच्या पत्र्याची चकती; गोल लहान तुकडा : 'पिशवीत साव्हरीन एवढ्या शिशाच्या चकल्या घालतात.' – गुजा ३४. २. जिलबीच्या आकाराचा, काटे असलेला, तेलात तळलेला तिखटमिठाचा, भाजणीचा खाद्यपदार्थ. [क. चक्क(क्कु)लि.][सं. चक्र]

**चकलीपात्र** न. पु. चकल्या तयार करण्याचा साचा, सोऱ्या.

**चकल्या** पु. (दे.) चकल्यावर, शहराच्या विशिष्ट भागावर, चवाठ्यावर असणारा चौकीदार; कोतवाल. पहा : **चकला**

**चकव(वि)णी** स्त्री. १. दिशाभूल; भुरळ. २. टाळाटाळ; थापा; हुलकावणी; फसवणूक : 'ज्यांचे देणें झालें त्यांनीं खेटे घालीत बसावें आणि ज्यांनीं देणें आहे, त्यांनी...एकसारख्या चकविण्या दाखवीत असावें.' – आगर.

**चकवणूक** स्त्री. टाळणे; चुकवणे.

**चकवा** पु. कोळ्यांच्या, नावाड्यांच्या गाण्यांतील एक प्रकार; नाव वल्हविताना नावाडी म्हणतात ते गाणे; नौकागीत.

**चकवा** पु. हंसाच्या जातीचा एक पक्षी; चक्रवाक. [सं.चक्रवाक]

**चकवा** पु. १. दिशाभूल होऊन मनुष्य भलतीकडे जातो, त्यास म्हणतात. (क्रि. पडणे, भेटणे, होणे.) : 'रानात प्रवास करताना पडलेले चकवे...' –व्यंमाक ६२. २. भूल पाडणारे भूत. (व.)

**चकवाचकवी** स्त्री. हूल; फसवणूक; खोटेपणा; लपंडाव : 'विष्णू बाळा प्रकरणी त्यांनी केलेली निर्दय चकवाचकवी...' –आप्रदि २२३.

**चकवी** स्त्री. चकवा पक्ष्याची मादी; चकई.

**चकसणे** अक्रि. एखाद्या पदार्थाची गोडी, चटक लागल्यामुळे तो मिळविण्यासाठी उत्कंठित होणे, आतुर असणे; पुनःपुनः झटणे. (को.)

**चकळ** न. तुकडा; भाग; कांड. [सं. शकल]

**चकळी** स्त्री. चिळकांडी; धार (दूध, रक्त, रस इत्यादींची).

**चकंदळ–ळा** न. पु. फन्ना; फडशा; (खाद्यपदार्थांचा) स्वच्छपणा. [सं.]

**चकंदळ** न. पु. लोकांचे कडे; समुदाय; मंडळ. [सं.]

**चकंदळ** न. पु. १. वर्तुळाकार तुकडा, जागा. २. नायटा किंवा गजकर्ण किंवा इतर रोगाचा वाटोळा चकदा; खवला; स्फोट. ३. भिंतीवर किंवा गिलावा पडल्यामुळे पडलेला डाग. ४. धान्य पेरलेल्या किंवा उभ्या पिकात असलेली उघडी जागा. पीक न उगवलेली जागा. ५. कोणतीही वाटोळी उघडी जागा. ६. (ल.) हिशेबात फट, भगदाड, अफरातफर. हिशेबात मोकळी जागा सोडणे किंवा लबाडी, गफलत करणे. [सं.]

**चकाकणे, चकमकणे** अक्रि. झळकणे; चमकणे; लखलखणे; झळझळणे; प्रकाशमान होणे : 'पावलांतली चांदीची जोडवीं माशाच्या डोळ्यांसारखी क्षणभर चकाकली.' – राकाधाका २५४.[सं. चकास्]

**चकाकी** स्त्री. १. चकचकीतपणा; लकाकणे; सतेजता; उजाळा; चकचकाट; चमक. २. एकसारखा पडणारा मोठा प्रखर प्रकाश; तेज, प्रभा : 'खनिज पदार्थांच्या अंगी चकाकी असते.' – पव १.५. ३. (मानस.)वस्तुरंगाबाबत येणाऱ्या तेजस्वितेच्या (ब्राइटनेस) सूक्ष्म रचनेचा अनुभव. काही वस्तूंवर रंग तर दिसतातच; परंतु त्याबरोबर त्यांना एक प्रकारची चकाकीही असते. ही चकाकी काही वेळा सतत दिसते तर काही वेळा विशिष्ट कोनातून झळकताना दिसते. रेशमी कापड, पाण्याचा पृष्ठभाग, धातू या गोष्टींकडे पाहताना ही चकाकी अनुभवास येते. [सं. चकास्]

**चकाचकी** स्त्री. १. तळपणे; चकचक; खणखणाट (तरवारींचा). २. हमरीतुमरी; भांडण; झटापट; झकापकी. (क्रि. झडणे, उडणे.)

**चकाचूर** पहा : **चकन(ना)चूर**

**चकाट** पहा : **चट, चटक**

**चकाट** न. पु. चेष्टा; गप्पा; चकाट्या (क्रि. करणे.) : 'येकमेका करिती चकाट' – क्रिपु १.१.१३८.

**चकाटणे** पहा : **चाकाटणे** [सं. चकित]

**चकाटपिटी** स्त्री. रिकाम्या गप्पा; चेष्टा; चकाट्या : 'आम्ही तिकडे कामाच्या जुंपणीला लागलो की चालू द्या तुमची चकाटपिटी.' – कर्मयोग १२.

**चकाटी–ट्या** स्त्री. (नेहमी अनेकवचनी प्रयोग) रिकाम्या गप्पा; गमतीच्या गोष्टी; बाता; चेष्टा; गप्पासप्पा; वायफळ गोष्टी. (क्रि. पिटणे, मारणे.) : 'भोजनाचे पदार्थ शिजत लावल्यावर चकाट्या पिटीत बसू नये.' – गृशि २.४. [सं. चक्र+अट्]

**चकाभूल** स्त्री. तिरपीट; गाळण; घाबरगुंडी. (क्रि. करणे, होणे.)

**चकार** पु. वर्णमालेतील च हे अक्षर. [सं. च+कार]

**चकार** वि. चलाख : 'धुता घंगाळांत अंग फिरे चकार नजर। पुसे ''कुठं मैना नार'' झालं पाणी थंडगार'- लोसाको.(व.)

**चकार-रा-री** पु. स्त्री. (सांकेतिक) चवली; दोन आण्याचे नाणे; पावलीबद्दल पकार-पकारी असाही संकेत आहे : 'ही दक्षिणा काही चकारी पकारीवर भागावयाची नाहीं. किमानपक्षी बाण (५) संख्या तर खरी.'- मस १.५४.

**चकारविल्हा, चकारविल्ह्यातला** वि. (उप.) चहाडखोर; चुगलखोर.

**चकारशब्द** पु. किंचितही भाषण; एक अक्षरसुद्धा; अवाक्षर. (निषेधार्थी प्रयोग) : 'जेवण झाल्यावर कुणाशी चकार शब्द न बोलता विजय अंथरुणावर पडला.'- अक्षर ५६.

**चकारी** स्त्री. १. गाडीच्या चाकाची खूण; चाकोरे; गराडी. २. गाडीचे वळणे, फिरणे. (क्रि. घेणे.) ३. गाड्या फिरविण्याकरिता रस्त्यापासून काही अंतरावर एका बाजूला जी जागा केलेली असते ती. ४. काठीने मारून किंवा दांड्यात बसवून फिरवीत न्यायचे लहान मुलांचे चाक; गजाळी : 'मुलांच्या गोल चकाऱ्या फिरवणे चालू आहे.'- गावर ११०. [सं. चक्र+आकार]

**चकारी** स्त्री. (संकेत) चहाडी.

**चकाळणे** चरफडणे; चिडणे; भडकणे : 'घरात बसून मी मनात चकाळत असे.'- एस्पृडा ४९.

**चकांदळ-ळा** न. पु. त्वचेचा गोलाकार भाग, तुकडा : 'कपड्यांत शिरलेल्या भयानक मुंग्या कारबेटच्या कातडीचे चकांदळे खाऊन टाकत.'- वामा १२०.

**चकांव चकांव** क्रिवि. १. वानराच्या टोळीतील म्होरक्याच्या आवाजाप्रमाणे आवाज करून; चकचक. २. खाताना जो चकचक आवाज होतो त्यासारखे; मचामचा. [ध्व.]

**चकित** वि. १. डोळे दिपलेला, विस्मित; आश्चर्ययुक्त : 'परि ऋणि होऊनि चकित। म्हणे राया आपुलें आर्त। दात्याची सामुग्री पाहोनि तेथ। मागावें काई।'- कक ६.१९.१५३. २. गोंधळलेला; भांबावलेला; भयभीत; दचकलेला. (क्रि. होणे.) : 'नेली सभेंत साध्वी व्हावें शिवतां जिला चकित वातें।'- मोगदा २.३. [सं.चक्]

**चकी** हलक्या दर्जाचा गूळ; काकवी.

**चकीर** न. दोरा घालून फिरविण्याचे लाकडी चाक. पहा : **चक्री** [सं. चक्र]

**चकै** स्त्री. चूकभूल; भ्रांती; गोंधळ; भुरळ : 'आपण आंतोनि ठिकरिया। बहु चके ज्ञातया। आणिली जेणें।'- ज्ञा १८.५३९. [सं. चकित]

**चकोट** वि. चोखट; उत्तम; चांगले : 'चकोट पांग फेडलास मैतरपनाचा.'- बारी ६२. (कर.)

**चकोटी** स्त्री. तुळतुळीत गोटा : 'चकोटी व शेंडीचा अंबाडा अशा स्वरूपात...मी फिरलो आहे.' - माचू ४०४.

**चकोत-ता-तरा** न. पु. एक फळ; पपनस; पपनसाची एक पोटजात : 'चकोता म्हणून पपनसात एक पोटजात आहे.'- वसू ६९६. [क. चक्कात-त्र][हिं.]

**चकोत्री** स्त्री. रानकोंबडी. (झाडी)

**चकोर** पु. एक पक्षी. हा चंद्रकिरणांवर जगतो असा कविसंकेत आहे : 'जैसे शारदीयेचे चंद्रकळे-। माजीं अमृतकण कोवळे। ते वेंचिती मनें मवाळें। चकोरतलगें।'- ज्ञा १.५६.[सं.] (वा.) **चंद्रचकोरन्याय** - एखाद्यावर आपले जीवित अवलंबून असणे किंवा एखाद्याची उत्कंठेने वाट पाहणे : 'माझा नंदपिता यशोदा जननी। दोघे कंठीं प्राण ठेवूनी। वाट पाहती दिनरजनीं। चंद्रचकोरन्यायेसीं।'- हरिवि २१.७२.

**चकोरी** स्त्री. सखी; दासी : 'दोही हातीं तारिती चकोरी : गजंबु दाखियांचा'- रुस्वन ४४९.

**चकोरी** स्त्री. चकोर पक्ष्याची मादी : 'मधुकपुरि चकोरी अंजिजे: तेही आसुई कमोदुकंदु गाळिजे :' - रुस्वन ५४७. [सं.]

**चकोली** स्त्री. वरणफळ; डाळीच्या वरणात कणकेचे सोडलेले बारीक तुकडे : 'कधी गव्हाची खीर, कधी चकोल्या...असले रुचकर पदार्थ करून मावशी मला जेऊ घाली.'- वाटा ७.

**चकोंडा** पु. भुलावण.

**चकोंदळ** पहा : **चकदळ**

**चक्क** न. १. डोळे दिपवणारे आकस्मिक तेज, प्रकाश. (क्रि. होणे.) २. आकस्मिक सुचणारा नवा विचार : 'विचार करतां करतां त्यास एकदम चक्क झालें.'- सूर्योदय ८४. [सं. चक्]
वि. १. सतेज; प्रकाशमान; लकाकणारा; चकचकणारा; लखलखीत. २. नीटनेटका; ठाकठीक; सुरेख; स्वच्छ; चांगला; झकास. (क्रि. करणे.)
वि. क्रिवि. आश्चर्यात बुडालेला; चकित : 'त्याजवर जडलेल्या खड्याचे पाणी पाहून तो चक्कच झाला.'- विज्ञावि १०.५ ते ७.१२६.
क्रिवि. १. स्पष्टपणे; डोळ्यांसमोर; धडधडीत : 'ती आपल्या प्रियकराला चक्क सांगते.'- नाकरु २.४६. २. पूर्णपणे; पुरेपूर. [सं. चक्]

**चक्ककन- दिशी, चक्कन** क्रिवि. डोळे दिपून जाण्याजोगा; एकदम प्रकाश पडून; लखकन; झळाळून.

**चक्कर** स्त्री. १. भोवंड; भोवळ; घेरी, कंगणी. २. पित्तप्रकोपामुळे डोळ्यांपुढे उभे राहणारे चक्र किंवा मंडल; डोळ्यांपुढे काजवे चमकणे. [सं. चक्र]

**चक्कर** न. तऱ्हेवाईक, लहरी, चक्रम मनुष्य; विचित्र, भ्रांत, विक्षिप्त माणूस : 'एकूण मधु देशमुख चक्कर मनुष्यच.'- कोसला ४६.

**चक्कर** स्त्री. न. १. कडे; मंडळ; वर्तुळाकृती रस्ता किंवा जमिनीचा भाग; डोंगराचा किंवा खडप्याचा वाटोळा किंवा पुढे आलेला भाग. २. (अश्वविद्या) घोडा मंडलावर धरण्याची जागा. ३. चुन्याची घाणी, घाणा. ४. खळे; तेजोवलय; कडे; परिवेष; परिघी (चंद्रसूर्य, देवादिक इत्यादिकांच्या भोवती असणारे). ५. फेरी; गरका; वळसा; हेलपाटा; येरझारा. (क्रि. घेणे.) (बे.) ० **काटणे** - फेरी मारणे; गोल फिरणे : '(नर) एखादा गळाच्या दोराच्या या बाजूला जाई, भोवती चकरा काटत अगदी पाण्याच्या पृष्ठभागापर्यंत येई.'- एको ५६. ० देणे - खेप टाकणे; फिरणे : 'त्यांनी (पाटील-कुलकर्णी) काळी-पांढरीत चक्कर दिले पाहिजे.' - गावगाडा ६५. ० **फिरणे** - संकटे, दुःखे यांत गुरफटणे; संकटात सापडणे. ० **मारणे, मारून येणे** - फेरी, गरका, वळसा, हेलपाटा, येरझारा घालून येणे; जाऊन परत येणे : 'किल्ल्यावरून चक्कर मारून परत तुझ्या महालाकडे येतो.' - कोकि २९. ० **लावणे** - एक फेरी मारून येणे : 'बळवंतरावदादांसारखी मुरब्बी

माणसे 'केसरी' ऑफिसकडून चक्कर लावून येतच.'– बहुरूपी १६. **चक्करावर धरणे** – १. घोडा मंडलाकार फिरवणे; रिंगणावर धरणे. २. (ल.) कचाटीत, जरबेत धरणे. [सं. चक्र]

**चक्कर** न. १. एक खेळणे; चक्री; भोवरा. २. चाक. ३. शेंडीचा घेरा. (व.) ४. (ल.) भाकर. (वा.) (एखाद्यावर) ० **फिरणे** – ईश्वराच्या कृपाछत्राखाली असणे.

**चक्कर** न. काही तरी क्षुल्लक काम.

**चक्करघाड** स्त्री. (विणकाम) ताण्यातील दोरे खालीवर होऊन धोटा जाण्यास वाट मिळण्यासाठी दोरीने फणीच्या वरच्या भागाला जोडलेली चक्राकृती वस्तू. (बे.) [सं.चक्र + घाट]

**चक्करणे** अक्रि. भांबावून जाणे; गोंधळणे : 'वार्ताहर कदाचित या जबाबाने चक्करले असतील.'– कोउ ३२.

**चक्करदार** वि. वाटोळी; गोलाकार : 'या बागेंत अशा वेलींची चक्करदार जाळींहि आहेत.'– गालिब १७४.

**चक्करभेंडी** स्त्री. एक फुलझाड. याची फुले सकाळी पांढरी असतात व तीच संध्याकाळी गुलाबी रंगाची होतात.

**चक्का, चक्कादही** पु. न. घट्ट दही; पाण्याचा अंश काढून टाकलेले दही; श्रीखंडासाठी तयार केलेले दही : 'चक्कादही, मसाल्याचे खमंग तांदूळ...'– मृच्छक २. [हिं.]

**चक्का** पु. १. चाक. २. एक खेळ. (झाडी). पहा : **चक्कर** ४

**चक्का** पु. घोड्याला चाल लावण्याकरिता त्याला मैदानावर फिरविण्याची क्रिया.

**चक्का** पु. सुग्रास भोजन. (दुसऱ्याच्या घरी मिळालेले).

**चक्काचक्की** स्त्री. हमरीतुमरी; उघड भांडण; झकापकी. पहा : **चकाचकी** : 'दोहोंकडून दोघां जबरदस्तांची चक्काचक्की उडू लागली म्हणजे हलक्यासलक्याने तींत पडूं नये.'–विकार.

**चक्काचूर** पु. १. भुगा; चुरा; चकाचूर. २. (ल.) नायनाट; नाश : 'रुळलेल्या मार्गाचा चक्काचूर...'– निअसा १८४.

**चक्की** स्त्री. एका लहान वाटोळ्या भोपळ्याची जात. [सं. चक्र]

**चक्की** स्त्री. १. जाते : 'जातीची चक्की सर्व समाजाला... निर्दयपणे भरडत असते.'– दोहस १००. २. पिठाची गिरणी. ३. (व्यायाम) मानेचा व्यायाम करण्यासाठी दगडाचे केलेले कडे. ४. (चर्मकार) चामडे कापण्याचा लाकडी गोल ठोकळा. (क्रि. ओढणे, फिरवणे.) [सं. चक्री]

**चक्की** न. वाऱ्याच्या किंवा पाण्याचा प्रवाहाच्या जोराने चालणारे यंत्र; पवनचक्की; पाणचक्की.

**चक्की** स्त्री. पत्त्याच्या डावातील चार ठिपक्यांचे पान. [सं. चक्री]

**चक्कीखाना** पु. पिठाच्या गिरण्या असलेली जागा : 'चक्कीखान्यांतून चक्क्या घरघरू लागतात.'– काभि २२.

**चक्की पाडणे** बुडखा काढून टाकणे.

**चक्कीर** वि. (प्रा.) विस्मित, आश्चर्यचकित झालेला. [सं. चकित]

**चक्कीवाला** पु. मुलांचा एक खेळ.

**चक्कू ताड्या घोक्या–ट्या** घोकंपट्टी; अर्थ समजून न घेता पाठ करणे : '(केशू) मन लावून अभ्यास करीत असे. चक्कू ताड्या घोक्या हा त्याचा मंत्र होता.'– स्मया ३९.

**चक्र** न. १. रथ, गाडी इत्यादींचे चाक; कुंभाराचे चाक : 'मग भवंडीचें दंडे । भ्रमें चक्र'– ज्ञा १८.३१०. २. चाकासारखे, वर्तुळाकार एक आयुध; विशेषत: विष्णूचे सुदर्शनचक्र : 'कैसें चक्र हन गोविंदा। सौम्यतेजें मिरवे।'– ज्ञा ११.६०४. ३. एक खेळणे; चक्री; चकीर; चक्कर. ४. बोटाच्या वर्तुळाकार रेषा; या शुभ असतात असे म्हणतात. ५. (विणकाम) मागाच्या कपाळकाठीच्या शेवटाला अडकवलेली दोन चाके; अथवा कपाळकाठी किंवा ढेकणी यांच्याऐवजी ज्या चाकाचा उपयोग करतात ते. नकशीच्या कामाच्या दोऱ्या – काठांचा चाळा आहे असे लाकडी चाक; ज्यावर सूत गुंडाळतात ते रीळ. ६. चक्राकार सैन्यरचना; व्यूह. ७. पाण्याचा भोवरा; आवर्त. ८. भविष्य–कथनासाठी किंवा जातक वर्तविण्यासाठी काढलेली आकृती; कुंडली. ९. संवत्सराचे मंडल, राहाटी, आवृत्ती. १०. (ज्यो.) सूर्यमंडल; वर्तुल; राशिचक्र; ज्योतिषचक्र. ११. (सामा.) मंडलाकार भ्रमण करणारा, फिरणारा पदार्थ, वस्तू, स्थिती. उदा. वायुचक्र, संसारचक्र. १२. योगमार्गात कल्पिलेली चक्रे, प्राणस्थाने : 'उर्ध्व तळौतें खाचें। तया खेवामाजि चक्रांचे। पदर उरती।'– ज्ञा ६.२३७. पहा : **षट्चक्र भेद**. १३. (ल.) भाकर. १४. आवर्तन. १५. वडा हे खाद्य (भिक्षुकांच्या भाषेत). १६. तेल्याचा घाणा. [सं.] ० **फिरणे** – हालचाली सुरू होणे; खटपट होणे : 'तिचे लग्न जुळण्याची चक्रे जोरात जोरात फिरू लागली होती.'– वासुनाका ११.

**चक्र** न. १. राष्ट्र; देश; भूप्रदेश; प्रांत; जिल्हा. २. राज्यक्रांती. [सं.]

**चक्र** न. सैन्य; सेनासमूह; जथा; जमाव : 'पालाणिजे त्वरित चक्र अशा रवा हो।'– वाविरा ५.११. [सं.]

**चक्र** न. संकट; गोंधळ; घोटाळा; कोडे; फास. (क्रि. चक्रात घालणे, येणे = फसणे.) [सं.]

**चक्र** न. चक्रवाक पक्षी : 'चक्रापरीच सजलों असतां फिराया।'– रकाव्य १७. [सं.]

**चक्र** न. परचक्र; आक्रमण; स्वारी : 'ऐन प्रसंगी हस्तिनापुरावर चक्र आणावे व युद्ध करून आपणच राज्य जिंकावे.'– कालकूट ३९.

**चक्रगति–ती** स्त्री. वर्तुळाकार (आपल्या भोवताली व पातळीत) गती; गरगर फिरणे. [सं.]

**चक्रचाळ** वि. चमत्कार करणारा; लीलानाटकी : 'तुका म्हणे चक्रचाळें। वेड बळें लाविलें।'– तुगा २१२४.

**चक्रदर्शन दीपन** (विअ.) नाट्यगृहातील नाट्यमंचाच्या मागची वक्राकार भिंत. यामुळे अमर्याद जागा असल्याचा भास आणता येतो आणि नाट्यमंचावर समान उजेड मिळविता येतो.

**चक्रदंड** पु. एक व्यायाम प्रकार. दोन्ही हातांचे तळवे जमिनीवर टेकून पाय वर्तुळाकार फिरवून दंड काढणे.

**चक्रदोष** पु. चक्रापत्ती; पुन्हा मूळ मुद्यावरच येणे : 'हा तर्कशास्त्रदृष्ट्या चक्रदोष होईल.'– पुरुषार्थ सप्टें. १९४०.

**चक्रधर** पु. १. सुदर्शन धारण करणारा; विष्णू. २. महानुभाव पंथाचे संस्थापक. ३. (ल.) मोटारीचे चाक ताब्यात असलेला; मोटार, बस

इत्यादी (ज्याला वळवण्याकरिता मोठे चाक असते अशा) वाहनाचा चालक, ड्रायव्हर : 'मी चमकून (बसच्या) चक्रधराकडे पाहिले.'– क्रेबु २३.[सं.] (वा.) **चक्रधराचा हाकारा येणे** – कैवल्यपदप्राप्ती होणे; देहावसान होणे.

**चक्रनेमिक्रम** पु. चाकाप्रमाणे पुन:पुन: वरून खाली व खालून वर जाण्याची स्थिती; उच्चनीच स्थित्यंतरे; चांगल्या मागून वाईट व वाईटामागून चांगले दिवस येणे अशी रहाटी; परिभ्रमण : 'आपले व्यक्तित्वही चक्रनेमिक्रमात गरगरू लागल्याचे दिसते.'– अंया ३१.

**चक्रपाळ** पु. प्रांताचा सुभेदार.

**चक्रपाळ, चक्ररक्षक** पु. चक्ररक्षक; युद्धात रथाच्या चाकांचे रक्षण व वेग यांवर देखरेख करणारा योद्धा : 'कीं दों पार्खीं दोघे भीमार्जुन चक्रपाळ जेविं रथी।'– मोभीष्म ११.५१. [सं. चक्रपाल]

**चक्रपाळणा** पु. १. यात्रेच्या, जत्रेच्या प्रसंगी टांगलेले फिरते पाळणे. २. गोलाकार फिरणारा पाळणा, डोला.

**चक्रपीठ** वि. योगशास्त्रातील अनाहत चक्र : 'त्रिकुट जिंतोनिया : चक्र–पीठं केले'– चौपद्या ५६. [सं.]

**चक्रपूजा** स्त्री. चक्राची पूजा करण्याचा खानदेशातला कुलाचार.

**चक्रबाण** पु. दारुकामाचा एक प्रकार; आतषबाजीतील वाटोळी फिरणारी नळेचंद्रज्योतीची यंत्रे. [सं.]

**चक्रभेद** पु. युक्ती; हिकमत; डावपेच; छक्केपंजे; युक्तिप्रयुक्ती; कावा. [सं.]

**चक्रभेंड–डी** स्त्री. एक झाड, याचे फळ चक्राकार असते. पहा : **चक्करभेंडी**

**चक्रम** पु. दोन रुपये दहा आणे किंमतीचा एक होन.

**चक्रम** वि. वेडा; लहरी; अविचारी; विक्षिप्त; तऱ्हेवाईक.

**चक्रमण** न. १. सतत भ्रमण. २. नागमोडी गती, उडी.

**चक्रमंडलकरण** न. (नृत्य) ओणवे होऊन गुडघ्याच्या आतील बाजूने दोन्ही हातांनी पायास विळखा घालणे. [सं.]

**चक्रमुद्रण** न. विशिष्ट (स्टेन्सीलवर) कागदावर मजकूर टंकलिखित करून तीवरून यंत्रावर मुद्रण करणे.

**चक्रमुद्रण यंत्र** प्रतिलिपी काढणारे यंत्र.

**चक्रवत** क्रिवि. चक्रासारखा; वर्तुळाकार; गरगर; चक्राकार [सं.]

**चक्रवर्ती** पु. १. सम्राट; समुद्रवलयांकित पृथ्वीचा राणा; सार्वभौम राजा : 'जे चैतन्यचक्रवर्तीची शोभा। जिया विश्वबिजाचिया कोंभा।'– ज्ञा ६.२७२. २. योगातील सहा चक्रांचा, स्वानंदसाम्राज्याचा सम्राट. [सं.]

**चक्रवर्ती घोडा** घोड्याचा एक प्रकार. याच्या नाकाच्या मध्यभागी भोवरा असतो.– अश्वप १.२५.

**चक्रवाक** पु. एक पक्षी. यातील नरमादीचे दिवसा संमीलन व रात्री वियोग होतो असा कविसंकेत आहे : 'तया चक्रवाकांचे मिथुन। सामरस्याचे समाधान।'– ज्ञा १८.८ [सं.]

**चक्रवाक घोडा** घोड्याचा एक प्रकार. सर्व अंग पिवळे, चारी पाय पांढरे व डोळे श्वेतरंगाचे असा घोडा.

**चक्रवाट** स्त्री. रथाची चाकोरी : 'परसैन्य देखोनि दृष्टीं। वेगें चालिला जगजेठी। धडधडिल्या चक्रवाटी। उठाउठीं पातला।'– एरुस्व १०.४

**चक्रवाढव्याज** पु. (अर्थ.) मूळ मुद्दल रकमेवर देय झालेले व्याज मूळ मुद्दलात जमा करून पुढील कालावधीत या वाढलेल्या रकमेवर व्याज आकारले जाते हीच चक्रवाढपद्धती.

**चक्रवात.** पु. न. तुफान; चक्राकार फिरणारे वादळ; सोसाट्याचा वारा. [सं.]

**चक्रवाल** पु. १. क्षितिज. २. पृथ्वीच्या भोवती कल्पिलेली पर्वतांची ओळ. ३. मंडल; वर्तुळ. [सं.]

**चक्रवाल** पु. एक पक्षी. [सं.]

**चक्रवाहा** वि. १. चक्र बाळगणारा. २. कुंभार : 'चक्रवाहा कां देवेंसी। केवि कुलाळा करूं सरिसी।'– ऋव ४७. [सं. चक्र + वह्]

**चक्रवृद्धी** स्त्री. पहा : **चक्रवाढव्याज**

**चक्रवेला** स्त्री. चक्रवेळ. फलज्योतिषशास्त्रातील एक वेळ, मुहूर्त. या मुहूर्तावर आरंभिलेले कार्य रेंगाळते असे समजतात. [सं.]

**चक्रव्यूह–विभू–विह** पु. १. विशिष्ट प्रकारची सैन्याची वाटोळी रचना : 'चक्रव्यूह गुरु द्रोण। रचिता झाला अद्‌भुत।'– पांप्र ४५.४. २. (ल.) मोठी मसलत; कपटकारस्थान; कट, जाळे पसरणे : 'आकड्यांचा भ्रामक चक्रव्यूह रचून अभिमन्यूप्रमाणे बुद्धिमान...नेटिव्ह लोकांचा छल व वध करण्यास लॉर्ड कर्झन यांच्या कारकीर्दीत हिंदुस्थानसरकारने तयार व्हावें...– लोटिकेले २.५२३. [सं.]

**चक्रव्रति** पु. सार्वभौम राजा; सम्राट : 'श्रीदत्तात्रयप्रभू म्हणीतले : अतुरबळीया होसील : चक्रव्रति'– लीचउ १४५.

**चक्राकार** पु. वर्तुळाकार आकृती; चक्रासारखी आकृती.
वि. वाटोळी; चक्रासारखी गोल. [सं.]

**चक्रापत्ति–त्ती** स्त्री. दुष्टचक्र; चक्रात, भोवऱ्यात सापडणे; परस्परविरुद्ध गोष्टींच्या परिणामांमुळे एखादी अनिष्ट गोष्ट घडत असणे. [सं.]

**चक्रापत्ती, चक्रकापत्ति–त्ती** स्त्री. (तर्क.) अन्योन्याश्रित युक्तिवादातून उत्पन्न होणारा तर्कदोष. [सं.]

**चक्रावणे** अक्रि. चकित होणे; संभ्रमित होणे. (वा.) **चक्रावून टाकणे** – गोंधळात टाकणे : 'वर वर पाहता हे विधान आपल्याला चक्रावून टाकणारे आहे.'– वायेज ९४.

**चक्रावळ** स्त्री. घोड्याचा एक रोग. याने घोड्याच्या पायाच्या तळावरचा मेंदा फुटतो, कठीण होतो आणि चेपला असता दुखतो.– अश्वप २.२५८.

**चक्राव(वा)ळ** पहा : **चक्रवाढ**

**चक्राव(वा)ळ** स्त्री. घोड्याचे एक लक्षण; अंगावर अनेक केसांचे भोवरे असणे. हे घोड्याचे अशुभ लक्षण मानतात.

**चक्रासन** न. एक योगासन; जमिनीवर उताणे निजून कमान करणे. [सं.]

**चक्रांकि (गी)त, चक्रांगद** पु. चक्राकार रेषांची वर्तुळे, चिन्हे असलेला पांढरा दगड; याची देवांश समजून पूजा करण्यात येते. हा समुद्रकाठी सापडतो : 'चक्रांगीत चक्रतीर्थाहुनी। घेऊन येती।'– दास १९.५.३; 'सोळा सप्तांकित नवांकित। शालिग्राम शकले चक्रांकित।'– दास ४.४.६.; 'महाप्रयासाने मिळवलेले बाण व चक्रांगद.'–समक १२१.
पु. देवीचे वण ज्याच्या अंगावर आहेत असा माणूस.

**चक्रांग** पु. पक्षिविशेष. हे हंसबांधव आकृतीने चक्रवाकासारखे असतात. पण रंगाने फार निराळे असतात. आकाराने कावळ्याहून थोडेसे मोठे असतात. - पद ९१-९२.

**चक्री** स्त्री. १. पागोट्याच्या बिनीवर चक्राकार एकावर एक पट्ट्या बसवून करतात ती रचना; पागोट्याचे चाक (चक्राकार वेढे असणारे); चाकाप्रमाणे बांधलेले पागोटे. २. एक खेळणे; भिंगरी. ३. सभोवार कळ्या व मध्ये फूल असलेला पुष्पगुच्छ. ४. चकली (खाद्य). (गो.) [सं.] (वा.) ० **उडवणे**– उपहास करणे; छी थू करणे; टोमणा मारणे; छद्मी भाषण करणे; (एखाद्याची) फजिती करणे. ० **करणे** – १. उपहास करणे. २. आपसात दांडगाईने किंवा धिंगामस्तीने ओढाताण करणे. ० **गुंग करणे, गुंगविणे, उतरणे, भुलविणे** – १. (चक्री=अक्कल) एखाद्याच्या पगडीचा-पागोट्याचा अगदी पुढचा भाग (म्हणजे अभिमान शौर्य निदर्शक) ओढून काढणे. २. एखाद्याची जिरवणे, एखाद्याचा नकशा, तोरा उतरवणे; मानहानी करणे. ० **गुंग होणे, भुलणे, उतरणे**– गोंधळणे; ओशाळा होणे; खुंटणे किंवा कुंठित होणे; अक्कल गुंग होणे. ० **घालणे** – भ्रमण करू लागणे; फिरू लागणे: '...विचार त्याच्या मनात चक्री घालू लागले.' – स्वप २९. ० **फिरविणे**– पगडी फिरविणे. १. पागोट्याचा, चक्रीचा पाठीमागचा भाग पुढे आणणे. २. बाजू बदलणे; विरुद्ध पक्ष स्वीकारणे.

**चक्री** स्त्री. समुदाय; मंडल; कंपू : 'जेथे चेंडूसाठी चक्री किंवा गर्दी जमली असेल.'– स्मया १९०. [सं. चक्र]

**चक्री** (लाक्षणिक) मति; अक्कल.

**चक्री** वि. वेदपठण, पुराण, कीर्तन, भजन, गायन यांचा समानधर्मी व्यक्तींनी एकत्र जमून केलेला अखंडीत कार्यक्रम. (यात शेवटी भैरवी व आरती येते.) [सं.चक्र]

**चक्री** स्त्री. परंपरा.

**चक्री** स्त्री. भोपळ्याच्या जातीची फळभाजी; डांगर.

**चक्री** स्त्री. बटाट्यावरील एक रोग.

**चक्री** पु. कुंभार : 'दे एक म्हणतां कोरी घागरी। हास्य करोनि चक्री अंतरीं। पाच रुपया द्याल जरी तरी। घडा देईन सुंदर वदे।'– दावि २३५. वि. चक्र धारण करणारा (विष्णू, कुंभार) : 'दिनमणि तव नोहे चंद्रसा रंग चक्री।'– मुरामा १०१. [सं. चक्र]

**चक्री क्रम** (ग.) अ ह्या ऐवजी ब, ब ऐवजी क, क ऐवजी ड, ड ऐवजी अ अशा क्रमाने करणे.

**चक्री ग्रंथालय** (शि.) ग्रंथ एका वाचकाकडून दुसऱ्याकडे-तिथून परस्पर तिसऱ्या-चौथ्याकडे जाऊन अखेरीस ग्रंथालयात येण्याची व्यवस्था करणारे ग्रंथालय.

**चक्रीझोप** स्त्री. ज्या झोपेत निजणारा गोल वाटोळा फिरतो अशी झोप.

**चक्री डवरा** (कृषि.) चाकासारखे फावडे.

**चक्रीदार** वि. १. पुढे चक्री असणारे (पागोटे, मुलाची टोपी). २. वाटोळे; चाकासारखे.

**चक्री दुर्मनस्कता, मनोविक्षिप्ती** (मानस.) हर्ष आणि खेद या भावावस्थांची वारंवार होणारी आंदोलने हे प्रमुख लक्षण असणारी एक गंभीर मनोविकृती. हिची कारणे मुख्यत्वे व्यक्तीच्या मनोविश्वात शोधावी लागतात. परिस्थितीमध्ये ती सापडत नाहीत.

**चक्रीपरिषद** स्त्री. गोलमेज परिषद; या परिषदेत प्रत्येकजण समान दर्जाचा गणला जातो.

**चक्री पीक** न. आळीपाळीने घ्यावयाचे पीक.

**चक्रीपुराण** न. एकाच बैठकीत एकामागून एक असे अनेकांनी सांगितलेले पुराण. पहा : **चक्री** [सं. चक्र+पुराण]

**चक्रीय क्रम** (भौ.) पुन्हा पुन्हा नियमितपणे होणाऱ्या आवर्तनाचा क्रम.

**चक्रीय चढउतार** बाजारातील तेजीमंदीचे चक्र.

**चक्रीय बिंदू** (ग.) एकाच वर्तुळाच्या परिघावर असणारे बिंदू.

**चक्रीय बेकारी** अर्थव्यवहार किंवा कृषिहंगाम इ. तील तेजीमंदीचे चक्र.

**चक्रीवादळ** न. वाऱ्याच्या चक्राकार गतीने निर्माण होणारे विध्वंसक वादळ.

**चक्रीव्याख्यान** न. लागोपाठ दिलेली व्याख्याने : 'स्टानफोर्ड विद्यापीठात चक्रीव्याख्याने देण्यासाठी टॉयनबी ह्यांनी अमेरिकेत तीन महिने वास्तव्य केले.'– क्रेबु ७४.

**चक्रेश** पु. देवताचक्राचा स्वामी; परमेश्वर; चक्रधर : 'जयाचेनि फिटे भवाचा श्रमु : तो चक्रेश जीव विश्वासु :'– सव १८. [सं.]

**चक्रेस्पर** पु. चक्रवर्ती; चक्रेश्वर. 'श्व' किंवा 'स्व' यांबद्दल 'स्प' लिहिण्याची जुनी पद्धत होती : 'तुजे उत्पतिचे होती। राये चक्रेस्पर।।' –क्रिपु ११६.

**चख** न. डोळा; चक्षू : 'चखे आसतां आंधु जाहाला।'–क्रिपु ४२.

**चखचखभाजी** स्त्री. तिखट अधिक घालून केलेली भाजी.

**च(चं) खणे** पहा : **चोखणे, चाखणे.** [हिं. चखना](वा.)**(मजा) चखवणे**– 'मजा चखाना' या हिंदी वाक्यप्रयोगाचे अपभ्रष्ट रूप. हात दाखवणे अशा अर्थी : '...या आनंदला मजा चखवायचा आहे.'– सुलतान १३३.

**चखांदळ** पहा : **चकंदळ**

**चखोट** वि. १. स्वच्छ; निर्मळ; शुद्ध; उत्तम; सुरेख; छान; चांगला; मनोहर : 'गड बहुत चखोट' – श्रीयो २.१६८. २. निवडक; उत्तम : 'येथें नवे लोक सेदोनसे माणूस चखोट ठेऊन पाठऊन देतो.'– ऐको ३६१. [सं. चोक्ष]

**चखोटतेल** न. गोडे तेल; तिळाचे तेल – (तंजा.)

**चगड(ढ)ग** स्त्री. १. कचाट; खेकटे; उलाढाल; जोखमीचे काम. २. भानगडी उत्पन्न करणे; साहसाचा व्यापार, उदीम. ३. (क.) अव्यवस्था; गोंधळ (काम, हिशेब वगैरेचा). [ध्व.]

**चगडग्या** वि. चगडग करणारा; कचाटे उडवणारा; चळवळ्या; उलाढाली करणारा; साहसी; व्यापार करण्यात धाडसी.

**चगढपण** न. अनाहूत सूचना; आगाऊपणा : 'प्याद्याविसी दोन तीन वेळां लिहिले हे चगडपण दिसते परंतु ऐतेवेलेस माणूस मिळणार नाही.' – ऐको ३६१.

**चगणे** अक्रि.वेडा होणे. (कात.)

**चगण्या** स्त्री. अव. (बायकी) आव; डौल; दिमाख; अकड; कुर्रा; मिजास. (क्रि. करणे, लावणे, आठवणे, जडणे.)

**चगद** न. वाकळाला लावतात ते ठिगळ. (अहि.)

**चगदळ–ळी–ळे, चगदाळ** पहा : **चकदळ, चकदळी**

**चगदा** पु. वर्तुळाकर तुकडा; मंडल : 'ती काळ्या मखमलीच्या चगद्याप्रमाणे चमकते.'– पंवा ३.

**चग(क)दा** पु. १. ठिगळ. २. तोडून काढलेला तुकडा किंवा भाग, अंश.

**चगदी** स्त्री. पहा : **चकती**. चिठ्ठी; परवाना; सनद : 'राजश्री भाऊसाहेब व मोदी यांचे कानावर घालून चगदी पाठऊन द्यावी.'– पेद ४२.५३.

**चगरमगर** इकडेतिकडे. (अहि.)

**चगळ** न. गळाठा; पालापाचोळा.

**चगळणे** पहा : **चघळणे** : 'चगळितो गिळितो घनवेदना।'– रकाव्य ५८.

**चगाडचगाड** वस्तू देण्यास टाळाटाळ करणे. (कात.)

**चगाळचोता** पु. चगळचोथा; गाळसाळ; पालापाचोळ : 'साऱ्या रानभर पालापाचोळा आणि चगाळचोता उडताना दिसत होता.'– आभाळ ४०.

**चगाळा** पु. (ल.) वरवरची, गाढ नसलेली झोप : 'माणसाला जी खोल झोप लागते ती अगदी थोडा वेळ असते – बाकीची झोप म्हणजे सगळा चगाळा.'– सोपिं १०१.

**चगेल** वि. १. वेडा. (खा.) २. चावट.

**चघळ** पु. न. चघळून बाहेर टाकलेला, तुडवलेला चारा; चाऱ्याचा अवशिष्ट भाग; पाचोळा; गळाठा.

**चघळ** वि. १. एकाच गोष्टीचा धोशा लावून कपाळ उठविणारा; तोंडाची एकसारखी टकळी चालवणारा. २. असंबद्ध, ताळतंत्र नाही असे बोलणारा : 'चूप रहा, चघळ कुठले.'– सख ५.४४. ३. शुष्क; पाल्हाळिक, नीरस (भाषण). [सं. गृ = खाऊन बाहेर टाकणे]

**चघळ** वि. १. सुस्त; चेंगट; मंद; जड बुद्धीने केले जाणारे (काम, गोष्ट). २. औदासीन्यपूर्ण; एकांगी. ३. एकलकोंडा (मनुष्य). [सं. गृ]

**चघळ** वि. रुंदावल्यामुळे, उघडल्यामुळे, वापरल्यामुळे, मोठे केल्यामुळे सैल झालेला; ढिला; शिथिल; पोकळ (खिळा, भोक, कुलूप, यंत्र, जोडा, कपडा इ.). [हिं.चकला]

**चघळचिपाड** न. गुरांनी खाऊन टाकलेला चारा : 'पोरे चघळचिपाडे आणून शेकोटीजवळ टाकीत होती.'–बाब २८.

**चघळचोथा** पु. पालापाचोळा : 'माळावरचा चघळचोथा टिपत टिपत गावाशेजारी यायला त्यांना संध्याकाळ होई.'–बनगर २३.

**चघळणे** अक्रि. १. खाण्याचा पदार्थ तोंडातल्या तोंडात घोळवणे, फिरवणे; चर्वण करणे; रवंथ करणे. २. निरर्थक चर्चा करणे : 'तुम्हां नोकरलोकांना पुरेसं काम दिसत नाही. म्हणून असल्या ह्या गोष्टी चघळत बसता.'– राऊ ९९. [त.शवैत्तल्][सं. गृ]

**चघळपणा** पु. एकसारखी टकळी लावणे; पाल्हाळिक बोलणे; 'तू कितीहि चघळपणानं लांबलचक चऱ्हाट वळलेस, तरी मी फसणार नाही...'– रूरा १८३.

**चघळव(चु–चू)घळ** पु. स्त्री. गुरांनी अर्धवट खाऊन बाकी राहिलेला, तुडविलेला चारा, वैरण, बाटूक : 'त्यात घे घालून चघळाचुघळाचा भारा.'– तोबं ९२. २. (ल.) मूर्खपणाने भाषण; वटवट; बडबड; निरर्गल प्रलाप. [चघळ द्वि.]

**च(चं)चणे, च(चं)चकरणे, चंचरणे** अक्रि. १. मरणे : 'चचला नाहीं म्हणती म्हातारा :'– अमृता ७२. २. कामावरून, नोकरीवरून दूर होणे; बडतर्फ होणे. (वा.) **चंची पडणे** – मरणे.

**चचविणे** उक्रि. १. दग्याने, विष घालून किंवा दुसऱ्या कोणत्याही निंद्य व गुप्त उपायांनी एखाद्यास ठार मारणे; फसवून मारणे. २. एखाद्याचा नाश, बडतर्फी घडवून आणणे. ३. (सांकेतिक) वाट लावणे; निकाल लावणे, करणे.

**चचाट** न. अवडंबर; स्तोम.

**चचोर–री** पहा : **चिचोर, चिचोरी**

**चच्कारा** पु. सुभाषित. (को.)

**चट** स्त्री. १. चव; आवड; आस्वाद; गोडी. २. चटक; नाद; सवय, गोडी लागल्यामुळे चैन न पडणे; व्यसन : 'अखंडित चटे त्यांनी लावियेला कान्हां। आवडे तयाचे संकल्प वाहती मना।'– तुगा १३२.

**चट** स्त्री. पातळ थर; गिलावा, रंग, सफेती इ.चा पातळ लेप.(क्रि. देणे.)

**चट** पु. श्राद्धसमयी आमंत्रित ब्राह्मण हजर नसला किंवा ब्राह्मण मिळाला नाही, तर त्याऐवजी अर्चन, पूजन करण्याकरिता ब्राह्मणस्थानी ठेवलेली दर्भाची प्रतिमा, दर्भ : 'कां एकुलत्या एक पोरीचें कन्यादान तिसऱ्याकरवीं चटावर करून घेऊं?'– भाबं ६९. [सं.]

**चट** वि. चावट; चघळण्याची (गोष्ट) : 'ऐकोनियां चट गोष्टी। येर धांवती येरापाठी।'– एभा ५.१८७. [सं. चाटु]

**चट** क्रिवि. १. एकदम सर्व; सारेच; निःशेष असे; लवकर; एकूणएक; एकंदर; साफ; झाडून. (क्रि. जाणे, खाणे.) : 'आले होते योगी देवर्षि महर्षि सिद्ध चट सारे।'– मोअनु ५.४०. २. भक्षण करून, खाऊन. पहा : **चट्ट** (क्रि. करणे.) : 'सद्दर्शन नचि करि गट चट कटक अंतरायाचें।'– मोआदि १०.८५. [सं. झटिति]

**चट** क्रिवि. १. पहा : **चटकन**. २. आपसूक; आपण होऊन.

**चटई** स्त्री. कळक, खजुरी, शिंदी इत्यादिकांच्या पानांची किंवा काट्यांची केलेली हातरी, अंथरी; विविध प्रकारच्या गवतांपासून रंगीबेरंगी व तऱ्हतऱ्हेच्या सतरंज्या बनवितात त्या प्रत्येकी. [सं. झट्] (वा.) **० भरणे** – (चर्मकार) चप्पलच्या पट्ट्याला चटईची वीण घालणे.

**चटईची वाक** चटईच्या विणकरीसारखी घडण असणारा स्त्रियांचा दंडात घालायचा एक अलंकार, दागिना; हातरीच्या वाकी. [सं. झट्]

**चटई तलाचार** (स्था.) इमारतीच्या प्रत्येक भिंतीला स्वतंत्र पाया न घालता संपूर्ण इमारतीच्या खाली घातलेला काँक्रीटचा थर.

**चटक** पु. चिमणी; चिमणा; पक्षिविशेष : 'श्येनार्सी धृष्टपणे गांठिबळे घालितां जसा चटक।'– मोद्रोण १०.८२. [सं.]

**चटक** स्त्री. तडफ; हुशारी; तरतरीपणा : 'जगामध्ये जर मनुष्याच्या अंगांत थोडी चटक नसेल, तर नुसत्या ज्ञानाचा तादृश उपयोग नाही.'– मौयौ १४३. [ध्व.]

**चटक** स्त्री. १. रुची; गोडी; चट; व्यसन; जडलेली आवड; नाद; चव (क्रि. लागणे.) : 'कादंबऱ्या वाचण्याची ज्यास एकदा चटक लागते त्यास मग दुसरें काहींच वाचावेंसें वाटत नाही.'– नि ७५. २. दुर्व्यसन; खोड. ३. प्रिय वस्तूच्या वियोगामुळे व ती वस्तू पुन्हा मिळावी अशी

उत्कंठा लागल्यामुळे होणारे दुःख, मनस्ताप, चटका, हुरहूर. (क्रि. लावणे, लागणे, बसणे.) : 'चटक लाउनी सोडावें। भल्या मनुष्यासी।' – दास १९.२.१३.

**चटक** स्त्री. स्वाद; लज्जत. [सं. चटुल]

**चटकचटक** क्रिवि. १. चपला, जोड्यांचा आवाज करीत तालबद्ध नखरेल (चालणे). २. झपझप; चटचट; भराभर; झरझर. (क्रि. चालणे, धावणे, बोलणे.) [ध्व.]

**चटकचांद(दि)णी–नी** स्त्री. १. सुंदर, नखरेबाज स्त्री; चित्ताकर्षक, मोहक, नखरेल तरुणी; माशुक स्त्री : 'ही रात्र अशी चटकचांदणी खाशी। घ्या बहार उठा किति घालु हात हनवटीशी।'– प्रला. २. (सागा.) अति सुंदर तरुणी; खुबसुरत : 'दोघीही रूपानें चटकचांदण्या असतील, पण एकीस माणीकमोत्यांनीं आपणांस लेवविण्याची हौस असेल (दुसरीस नसेल)'. – नि ७७८.

**चटकचांदणे** न. १. स्वच्छ किंवा टिप्पूर पडलेले चांदणे. २. शुक्रप्रकाश; शुक्राचे चांदणे.

**चटकणी** स्त्री. दारे, खिडक्या इत्यादिकांच्या फळ्या वाऱ्याने लागू नयेत म्हणून त्यांना लावलेली अटक, चिमणी.(व.) [ध्व.]

**चटक(का)णी** स्त्री. १. चापट; चपराक; तडाखा; टोला; फटकारा; फटका. २. चाबकाचा तडाखा, आघात. [ध्व.]

**चटकणे** उक्रि. गरम होणे, तापणे : 'उन्ह चटकले होते.'– चंद २४.

**चटकदार** वि. लज्जतदार; स्वादिष्ट; रुचकर; खमंग; आकर्षक.

**चटकन** क्रिवि. पटकन; पापणी लवते न लवते तोच; झटक्यात; झटपट; त्वरेने. (क्रि. जाणे, येणे.) : 'चटदिशी मिळणारा पैसा...' – हीवाअ ११२. [त. शट्टेन] [ध्व.]

**चटकन, चटदिशी** क्रिवि. चाबूक, छडी मारल्याच्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन; सपकन; काडकन; ताडकन.

**चटकपाक** पु. चिमण्यांपासून तयार केलेला एक औषधी पाक. [सं.]

**चटकमटक** वि. चटकदार; चुरचुरीत; मसालेदार : 'पारसी–उर्दू कंपन्यांतून म्हटलीं जाणारी उडती चटक–मटकची पदे...'– बहुरूपी १८१.

**चटकर–दिनी** पहा : **चटकन – दिशी**

**चटका** पु. (विणकाम) सुताची, तारेची गोल गुंडाळी, लड.

**चटका** पु. चाळा : 'चालेल जागता चटका। हा असाच घटकाघटका।'– पाळणे १७.

**चटका** पु. १. दाह; भाजणारी उष्णता; तलखी; प्रखरता (सूर्य, अग्नी किंवा तापलेला पदार्थ यांपासून उत्पन्न होणारी); ताप. २. ऊन किंवा तिखट पदार्थ खाल्ल्याने घशाशी होणारी आग; अशी आग होण्याचा गुणधर्म. (क्रि. लागणे.) ३. पोळल्यामुळे किंवा तिखट पदार्थ खाल्ल्यामुळे होणाऱ्या तात्कालिक वेदना, दुःखावेग. (क्रि. बसणे.) ४. पोळल्यामुळे पडलेला डाग, जखम; भाजल्याची खूण. ५. अंतःकरणाला होणाऱ्या वेदना; मनस्ताप; चरका; संताप; मानसिक यातना; चुटपुट; रुखरुख;एखादी वस्तू परत मिळण्याविषयी लागलेली उत्कंठा (क्रि. बसणे, लागणे.) : 'मी सोडुनि आलों तटका। तो जिवा लागला चटका।'–मध्वक २२०. ६. व्यंगोक्ती; औपरोधिक मर्मभेदी भाषण; प्रतिक्षेप; टोमणा, टोला; जिव्हारी लागणारी व झोंबण्यासारखी टीका. (क्रि. मारणे.) ७. काळजी. चिंता; आस्था; हुरहुर; पर्वा; दरकार : 'मनासि चटका म्हणुनी तव पदीं लगबग येत बालिका ।'– स्वयंवर. ८. सांडसाने दिलेला डाग; चरका. (क्रि. देणे, लावणे.) ९. मोरचूद वगैरे लावून सोने अग्नीत तापवणे. (क्रि. देणे.) १०. (जहल्लक्षणेने) वरील कृत्याला लागणारी साधनसामग्री, द्रव्यसाहित्य, साधनीभूत पदार्थांचा संच. ११. मिऱ्याचे तिखट; तिखट चटणी; विशेषतः हरभऱ्याची डाळ वाटून दही व ओल्या मिरच्या घालून करतात तो. १२. (राहिलेल्या अर्थांसाठी) पहा : **चटक, चरका** [सं. चट्]

**चटका** पु. आसुडाचा फटका : 'सितारामानं दोन दोन चटकं बैलांच्या पाठींवर वडलं...' – गोतावळा २७.

**चटका** पु. खमंग काकडी. (को.); मुळा वगैरेचा वरून फोडणी दिलेला कोशिंबिरीसारखा पदार्थ. [सं.चट्]

**चटका** पु. व्यापारात ठोकर, तोटा, थप्पड, अद्दल. (क्रि. बसणे, लागणे.)

**चटका** वि. चोर; लबाड; ठक : 'चटके गांवगुंड गारडी। येक आणिती कावडी।'– दावि ४७४.

**चटका** पु. आवड; छंद. (झाडी)

**चटकाणी** पहा : **चटकणी**

**चटकावणे** सक्रि. १. फटकारा लगावणे; सटकावणे. २. चावणे; लचका तोडणे. (माण.) [ध्व.]

**चटकावणे** सक्रि. पेटवणे : 'कानोड्यांनी चूड चटकावले.'– आआशे ३७६.

**चटकी** स्त्री. १. हाताचे एक बोट व अंगठा यांच्या साहाय्याने जो ध्वनी होतो तो. पहा : **चुटकी**. २. चकाट्या; गप्पाष्टके. (क्रि. पिटणे, मारणे.) [ध्व.] (वा.) **चटक्यांचा–चे मांडव** –एक बाई आजारी पडली असता तिने दुखण्यातून बरे होण्यासाठी देवाला एक मांडव घालीन असा नवस केला. तिने आपला नवस प्रत्येक खांबागणिक नुसत्या चुटक्या वाजवून पुरा केला. यावरून एखादे मोठे कार्य हातात घेऊन उद्योग न करता चुटक्या वाजवून त्यासंबंधी बेताबाताच्या गोष्टी सांगणे; रिकाम्या आढ्यतेचे, पोकळ डौलाचे, दिमाखाचे, बडेजावीचे, बढाईखोर शब्द, भाषण; आळशी, चेंगट व पाल्हाळ लावणाऱ्या नोकराला लावतात.

**चटकेल** वि. चटावलेली : 'तरी चटकेल जीभ...मला सोबत्यांबरोबर फरकारतेच.'–शिळान ६२.

**चटकोरा** पु. लांकडी मोठा टाळ; एक गोंडी वाद्य. (व.)

**चटक्या** स्त्री. अव. गप्पाटप्पा; वायफळ संभाषण.

**चटक्याच(प)टक्यात** क्रिवि. चटकन; हां हां म्हणता; निमिषमात्रात; एका पळात; चुटकीसरशी. [ध्व.]

**चटक्याचंग** पु. चंग वाद्य वाजवणारा : 'भाट बैकाटी टोलीके । चटक्याचंग।'– दावि ४७४

**चटचट** क्रिवि. १. चाबूक, कोरडा, छडी इत्यादिकांच्या होणाऱ्या चट अशा आवाजाप्रमाणे आवाज करून किंवा होऊन. पहा : **चटकन** (क्रि. लागणे, वाजणे.) : 'चटचटां चटक्या वाजती।'– दास १८.९.३;

'पायी खडावा चटचट करिती।'- सौभद्र. २. एकदम एखादा पदार्थ जळल्या-भाजल्यावर जो चटचट आवाज होतो त्याप्रमाणे. (क्रि. भाजणे, लागणे.) [ध्व.]

**चटचट-टा** क्रिवि. १. स्पष्ट; लवकर; झटकन; लगबगीने. २. डास, चिलट इ.नी अनेकवार दंश करणे.

**चटचटणे** अक्रि. १. चटचट आवाज करणे; खतखतणे (एखादी चटचटत, तटतटत, फुरफुरत असलेली वस्तू, पदार्थ). २. उन्हात भाजून, करपून निघणे. ३. आंबणे. (कर.) [ध्व.]

**चटचटणे** अक्रि. कमी पडणे; चणचण होणे; उणीव पडणे; टंचाई होणे : 'आणखी दोन महिने गेले की गावच्या पिण्याच्या विहिरीचे पाणी चटचटू लागते म्हणतात.'- खेया २२. [सं. चट्]

**चटचटीत** वि. १. न शिजलेला; मऊ न झालेला; अपक्व; टचटचीत; कच्चा (भात, सांजा, धान्य). २. तंतू, तारा निघण्याइतका घट्ट झालेला (उसाचा रस.); चिकचिकीत; गिचगिचीत.

**चटचटीत** वि. १. लखलखणारे; चकचकणारे (हत्यार, पाते). २. गुळगुळीत; तुळतुळीत (हजामत); तासून काढलेले (गळू, डोके). ३. भडक; गहिरा; दाट; चकाकणारा; लकाकणारा (रंग).

**चटणी-नी** स्त्री. १. मिरच्या, कोथिंबीर, खोबरे घालून केलेले तिखट तोंडी लावणे. २. (ल.) घसघस तोडलेली, फोडलेली, मोडलेली अवस्था; मोडतोड; तुकडेतुकडे, छिन्नभिन्न, विकलांग केलेली, चेंगरलेली अशी स्थिती, चेंदामेंदा; चक्काचूर; पुरा नाश. ३. (व्यापक) तिखट, मीठ, मसाले घालून केलेले तोंडी लावणे; चटका, ठेचा, डांगर, तिळकूट इ. चव अगर रुची वाढवणारा कोणताही खाद्यपदार्थ, वस्तू. [क. चट्णि] [हिं. चटणी] [सं. चट् = फोडणे]

**चटणी-नी** स्त्री. पराजित, अपमानित, पाडाव केलेली, भांबावलेली, गोंधळलेली स्थिती. [सं. चट् = फोडणे]

**चटपट** स्त्री. १. काही अनिष्ट घडल्यामुळे किंवा नुकसान झाल्यामुळे अंत:करणाला लागणारी दुःखाची टोचणी; चिंता; काळजी; हुरहूर; खेद. पहा : **चुटपुट** : 'चित्तीं चिंतेची चटपट।'- मुसभा १६.१३७. २. उत्कंठा; छंद; सोस; ध्यास; चटका. (क्रि. लागणे.) ३. तेजी; जोराची मागणी.

क्रिवि. झटपट : 'तो (भातु) चटपटा कढे'- लीचपू ४१.

**चटपट** स्त्री. १. प्रतवार लावणे; पानांची हातांतल्या हातांत पिसणी करणे; पाने लावणे. २. चपळाई; चापल्य; तल्लखपणा; चलाखी. ३. वस्तऱ्याला पलाटण्यावर घासून धार लावणे. ४. धार सारखी करण्याचे कातडे. [ध्व.]

**चटपट-टा** क्रिवि. एका चुटकीसरशी; लवकर; झटकन; सत्वर; त्वरेने; जलदीने; घाईने; झटक्यासरशी; शीघ्र : 'आवस्ता लागतां चटपट। नामस्मरण करावें।' - दास ४.३.६. [ध्व.]

**चटपटणे** अक्रि. तडफडणे; चुटपुट लागणे; व्याकूळ, बेचैन होणे; दुःखाची टोचणी लागणे; हुरहूर; काळजी लागणे. पहा : **चुटपुटणे**

**चटपटणे** न. भिजलेले चणे परतून करतात ते तोंडी लावणे. (को.)

**चटपट लटपट** हिकमत; हुन्नर : 'चटपट-लटपट करण्याचा महार जागत्यांना बालाभ्यास असतो.'- गांवगाडा ४०.

**चटपटी-ट्या** वि. १. तल्लख; चलाख; हुशार; तरतरीत; चपळ. २. कचाट्या; खेकटेखोर; उलाढाल (व्यापारात वगैरे). [ध्व.]

**चटपटी-ट्या** वि. एखादी गोष्ट मनाला लावून घेणारा, चिंताग्रस्त; चुटपुट लावून घेणारा; काळजी करणारा.

**चटाई** पहा : **चटई**

**चटाक्करून** क्रिवि. चटकन; लगेच : 'निजंची गुंगी झटकून चटाक्करून उठलो.'- गोतावळा १६.

**चटाचट-टा** पहा : **चटचट** (चटचट शब्दांपेक्षा या शब्दात जास्त जोर, अतिशयितता, आवृत्ती आहे.)

**चटार** वि. १. ग्राम्य; पाचकळ; छिचोर; टारगा; अप्रगल्भ; हलकट; छट; सोदा; हलका; अचावचा, अद्वातद्वा भाषण करणारा. २. बदफैली; दुराचारी; विषयासक्त. [सं. चाटु]

**चटारी** पहा : **चटोर**

**चटावणे** अक्रि. १. गोडी, चटक, छंद लागणे, जडणे. २. खोड, सवय, व्यसन, छंद, रीत, पद्धत लागणे, जडणे, पडणे; सवकणे. पहा : **चकसणे** [स. चप्]

**चटि-टी** स्त्री. आवड. पहा : **चट** : 'वाणीसहि लाउ चटि हरिनाम।'- मोकृष्ण ४६.१३०.

**चटी** स्त्री लंगोट. (जुन्नरी)

**चटीपटी** पहा : **चट्टीपट्टी**

**चटीचे** वि. चटकदार; चमचमीत; चविष्ट; चांगलेचुंगले : 'आम्हांलाही चटीचे खाण्याची सवय लागली.'-आआशे १४७.

**चटुल** वि. चंचल : 'मीहि माझे चटुल कटाक्ष जाता जाता काहीजणींवर फेकले.'- कथाकांत ६९.

**चटूघटाव** पु. कृपण, कंजूष माणूस.

**चटे(ट्टे)करी** पु. सैन्याबरोबरचा हरकामी शिपाई; पट्टेवाला; चपराशी.

**चटेगार** १. बाटे; कोडबुळे;.जातिभ्रष्ट. २. अशा शिपायांची पलटण.

**चटेल** वि. चट लागलेला; छटेल; व्यभिचारी : 'या चटेल मैनेच्या कांगाव्यावर तुम्ही इमारत उभारलेली !'-तोबं ७७.

**चटोवटी** स्त्री. (प्रा.) चढाओढ; बरोबरी; स्पर्धा; चुरस.

क्रिवि. चढाओढीने; चुरशीने.

**चट्ट** क्रिवि. सगळे; एकंदर; संबंध; साफ; झाडून; चाटूनपुसून; लख्ख. पहा : **चट**

**चट्टा** पु. १. चुरचुर करणारा, वेदना करणारा भाग; नायटा; खाज सुटणारा पुरळ; दुखापत; क्षत; खवंद. २. व्रण; डाग; क्षत; चिन्ह (क्रि. पडणे.) ३. (ल.) तोटा; दुर्दैवाचा आघात; कोणत्याही कृत्यात, धंद्यात आलेली, लागलेली तोहमत, ठेच; नुकसान; तूट; खोट; घस; चाट. (क्रि. येणे, बसणे.)[सं. चप्] (वा.) ० **बसणे** - नुकसान पोचणे, कमी होणे : 'मनुष्य जातीच्या सुखास चट्टा बसत आहे.'- आलेसं १८७. ० **लावणे** - खर्चात पाडणे; नुकसान करणे; खड्ड्यात घालणे; '... आम्हांला चांगला ५०-७५ रुपयांचा...चट्टा लावून त्या मूर्ति चालत्या झाल्या.'- पलकोघे ४८८.

**चट्टा** पु. फडशा; फन्ना; निःशेषपणा.
क्रिवि. पहा : **चट्ट**

**चट्टामट्टा** पु. १. खाऊन निःशेष करणे; फडशा; फन्ना; ताव मारणे : 'त्या दोघांचा श्वापदांनी केव्हांच चट्टामट्टा उडविला असता.'– स्वप १९८. २. (ल.) नाश; नागवणूक : 'मला खाली पाडून माझा चट्टामट्टा करण्याची तुझी इच्छा आहे.'–के १०.६.३०. ३. (बायकी) भातुकलीचा खेळ संपल्यावर मुलींनीं खाण्याचे सर्व पदार्थ खाऊन टाकणे : 'चट्टामट्टा बाळंभट्टा बाळंभट्टाची शेंडी उपटा.'– मुगा. [सं. चप्]

**चट्टी–टी** स्त्री. यात्रेकरू, उतारू लोकांना राहण्यासाठी केलेले गवताचे छप्पर. [काश्मी.]

**चट्टी** स्त्री. चट्टा; व्यापारात आलेला तोटा; नुकसान; हानी; ठोकर; तूट. (क्रि. बसणे, येणे, लागणे.)

**चट्टी, चण्णी** स्त्री. चढण. (गो.)

**चट्टीपट्टी** स्त्री. १. अंगावरील भूषणे; वेणीफणी वगैरे शृंगार; शरीरमंडन. २. छानछोक दिसण्याजोगा रचनाप्रकार; नट्टापट्टा; फाजील नीटनेटकेपणा; भपकेबाजपणा. [पट्टी द्वि.]

**चट्टेकरी** पु. पट्टेवाला; चपराशी; हरकामी नोकर.

**चट्टेरीपट्टेरी** वि. रंगीत पट्टे असलेले :'...चट्टेरीपट्टेरी आणि तंग तोकड्या कपड्यांनी'– पांका ८७.

**चट्शिरी** क्रिवि. झटपट; पटकन : 'किती हेलपाट द्याल? मी मोकळी न्हाई. आवरा चट्शिरी!'– गागो ४०.

**चट्सारे** वि. एकूण एक; झाडून सर्व : '...दक्षिण आशियातील चट्सारे बारीकसारीक देश चीनच्या कक्षेत येतील...'– आआआ ८.

**चड** पु. चढाई : 'वटसावित्रीचा पुजते वड, बेंदरानं केला चड'– लोसाको

**चड** पहा : **चढ, चढणे**
शअ. चढून नंतर; ओलांडून : 'धाडिती पर्वताचड पैलाड।'– दावि २०१. (वा.) ० घेणे – (चर्मकार) जोड्याला वळण देणे.

**चडक, चडकण–णा–णी, चडकाणी** स्त्री. १. चपराक; चापट; थप्पड : 'तयाकडे पहावें क्षणभरी। चडका हाणाव्या मुखावरी।'– कक १.१०.१४६; 'नातरी जैसें चडकणा। गगन हाणितलें अर्जुना।'– ज्ञा १७.४१८; 'बळें हाणोनि चडकण। पायें प्राण घेतला।'– भाराकि १४.५२; 'कोपा चढला अत्यद्भुत। धांवोनि मारी चडकाणा।'–नवनीत २०३. २. तडाखा; मारा; आवेग : 'रामा कामाचिये चडके। प्राणी सुष्टदुष्ट न देखे। जाति कुळासि नोळखे। अभिलाष गुणें।'– कक २.५.८३.[ध्व.][सं. चटचटति] (वा.) **चडकाण्या देणे** – चापट्या देणे, थपडा मारणे : 'ती तिला (मिनीला) चांगल्या चार चडकाण्या देणार होती.'– पापू १७०.

**चडकन–कर, दिनी, दिशी** क्रिवि. चाबकाने, छडीने मारलेल्या फटकाऱ्याच्या किंवा तडाख्याच्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन; फाडकन : 'चडकुनि मिथिलेसी मारिलेया हरीनें।'– कृकौ ६३.[ध्व.]

**चडचड** स्त्री. धान्य, द्रव्य इत्यादिकांची दुर्लभता; दुर्मिळता; अडचण; चणचण; टंचाई; कमतरता : 'तेथे मजूर मिळविण्याविषयीं मोठी चडचड होती.'– देव्यव्य १५७.

**चडचड–डा** क्रिवि. चापट, छडी मारण्याच्या आवाजाप्रमाणे आवाज करून; फाडफाड. [ध्व.]

**चडचडणे** अक्रि. केस विंचरताना, हिसडताना, ओढले असता केसांचा चडचड आवाज होणे; तडतडणे.

**चडचडणे** अक्रि. बाजारभाव बेसुमार वाढणे; दर कडाडणे.

**चडचडीचा** वि. तेजीचा; भरभराटीचा (व्यापार, धंदा इ.).

**चडचडीत** पहा : **चटचटीत**

**चडणे** अक्रि. वर जाणे; उडणे; वाढत जाणे; जोरात येणे; मिळणे : 'पैं पारिवा जैसा किरीटी। चडला नभाचिये पोटीं।।'– राज्ञा १८.४८०.

**चडफड, चडफडणी** स्त्री. १. जळफळ; रागाने दात ओठ चावणे; कातावणे; चडफडाट. २. तापात होणारी तळमळ; घालमेल; अस्वस्थपणा; काहिली. ३. बेचैनी; तडफड; संताप व्यक्त न करता आल्यामुळे होणारी मनाची अवस्था.

**चडफडणे** अक्रि. १. जळफळणे; धुसफुसणे; आदळआपट करणे; मोठ्या संतापाने क्रोधाविष्ट होऊन हातपाय आपटणे; रागाने दात ओठ खाणे : 'मग ज्ञानें चडफडी। जाणिवेचे खुर खोडी।'– ज्ञा १४.१४९. २. तळमळणे; तापात घालमेल होणे; माशासारखे तडफडणे; हातपाय झाडणे.

**चडफडाट** पु. तडफडाट; रागामुळे वेड्यासारखी वागणूक; जळजळाट; रागाचा उद्रेक; संताप; चडफड करणे.

**चडफणे** अक्रि. जळफळणे; तडफडणे; संतापणे : 'स्वर्गसुखें चडफाय।'– उगी १७५.

**चडवड** पहा : **चढवढ**

**चडवा–वी** पु. स्त्री. पाण्याचा माठ ठेवण्याची घडवंची : 'पाणी भरून ठेवण्याकरिता चडवी व झाकणसुद्धा माठ वगैरे...'–ऐरापुप्र ९.४५१.

**चडळ** न. १. भिंतीपासून सुटलेला चुन्याचा, गिलाव्याचा, विटांचा भाग, तुकडा, पोपडा, पापुद्रा, आवरण : 'भिंगाचिया चडळा। पदराचा पुंज वेगळा।'– अमृता ५.५९. २. जोड; तुकडा : 'तें चडळ नस्तां अंतराळ। चहुंकडे।'– दास १७.१०.७. [सं. चट]

**चडळ** न. तवा : 'आकाश आणि पाताळ। दोनी नामीं अंतराळ। काढितां दृश्यांचे चडळ। अखंड जालें।।'– दास १५.१०.२०.

**चडाव** पु. चढ; चढण; घाट. (गो.)

**चडाव** पु. पायमोजा. (गो.)

**चडाविणे** चढविणे; उत्कट करणे : 'जें इच्छेतें वाढवी। आशेतें चडावी।' ज्ञा १३.११२.

**च(चं)डू** पु. एक शस्त्र : 'नागरचंडु आणि सुरी। असिलता बाणधारी।' – कक ३.११.११५; 'प्राश लहुंडी चडु चक्र।' – मुआदि ३०.१६६

**चड्डी** स्त्री. १. कुस्ती, तालीम करतेवेळी वापरायची लांडी विजार; जांघ; पहिलवान लोक लंगोट कसून वर एक फक्त मांडीपावेतोच लांब असणारा विजारीसारखा चढवितात तो कपडा . २. लहान मुलांची गुडघ्यापर्यंतची विजार. [क.]

**चढ** पु. १. चढण; चढाव; उंच भाग; पर्वतादिकांचा उंच होत गेलेला प्रदेश. २. अशा उंचवट्याचे परिमाण.

**चढ** पु. वरचष्मा; वर ताण करणे; मागे पाडणे; जिंकणे; अतिक्रम; वरचढ; मागे टाकणे.
वि. श्रेष्ठ; श्रेष्ठ दर्जाचा; वरचढ; जिंकणारा. (वा.) **चढास देणे, चढी देणे** – उत्तेजन देणे; काम करण्यास भर देणे.

**चढ** पु. १. बढती; वाढ; उन्नती; वृद्धी; संवर्धन (संपत्ती, स्थिती, हुद्दा, दर्जा, मोल, माप, किंमत, धारण यांची). २. वाढावा; बरोबरी होऊन जास्त येणे. (वा.) **० करणे** – वरचढ करणे, लिलावाचे वेळी चढता सवाल करणे; 'यंदा सोळा सहस्र चढ करून त्याणे मामला केला'– शेंदुर्णी कागदपत्र १.५. **० देणे** – १. भर घालणे; उत्तेजन देणे : 'भाऊसाहेबाने चढ दिला।'– ऐपो १९. २. लिलावात किंमत चढविणे. **० बसणे** – वाढणे; जास्ती होणे. **चढावर चढ देणे** – जास्तीत जास्त चढणे, वाढणे, वरवर जाणे.

**चढ** पु. वाढलेली पट्टी; कर; सारावाढी (क्रि. बसवणे, देणे.).

**चढ** पु. हल्ला करणे; एखाद्यावर तुटून पडणे; एखाद्यावर चढाव, चाल करणे; हल्ला; मोहीम; चढाई : 'रघोजीच्या सैन्यावर चढ केल्यामुळे त्याच्या सैन्याची धांदल उडाली.'– विज्ञावि ८.७.१२३. (वा.) **चढीस भरणे, चढीस चढी लागणे** – १. मोठ्या जोराने, निश्चयाने, कितीही संकटे आली तरी पिच्छा पुरवणे; पाठीमागे लागणे. २. इरेस पेटणे.

**चढ** पु. पूर : 'उदकाचेनि अति चढें। आकाश न बुडे सर्वथा।'– एभा २८.३४३. ३. दुखण्याचा.

**चढउत(ता)र** स्त्री. पु. १. चढणे व उतरणे; चढण उतरण; वर जाणे व खाली येणे. २. जास्त कमी होणे; भरणे व कमी होणे; कमीजास्त प्रमाण होणे. प्रमाण सारखे नसणे (ताप, दुखणे इत्यादीचे). ३. उत्कर्षापकर्ष; क्षयवृद्धी. ४. आशा निराशा : 'म्हणोन मनांत चढउतार करुं लागले. परंतु बाहेर व्यंगोक्ति शब्द बोलेनात.'– भाब १०३.

**चढण–चढणी** स्त्री. १. चढ; चढाव; चढती; उंच होत गेलेली जागा. २. उंचपणा; उभटपणा.

**चढणारी कमान** पहा : **चढती कमान** : 'पेशवाईच्या अस्ताला त्या वेळच्या मुत्सद्यांच्या महत्त्वाकांक्षेची चढणारी कमान नडली.'– अभा ७.

**चढणे** अक्रि. १. वर जाणे; आरूढणे; वर बसणे (डोंगर, टेकडी, घोडा, झाड इत्यादीच्या). २. उंच जाणे, होणे; वाढणे; खूप उंच असणे (इमारत, तारा). ३. वृद्धी पावणे; वाढणे; जास्त होणे; अधिक होणे; फुगणे; मोठा आकार होणे; विस्तृत होणे (समुद्र, संपत्ती, ज्वर). ४. महाग होणे (किंमत,धारण). ५. गर्वाने ताठणे, फुगणे; उन्मत्त होणे. ६. सूर मोठा होणे, वाढणे, उंच होणे (गाताना आवाज, वाद्य इ.). ७. फिरणे; वर जाणे; उलटणे (अम्मल चढला असता, अथवा प्राणोत्क्रमण समयी डोळे). [सं. उच्चलन]

**चढणे** अक्रि. १. कडक होणे; जलाल होणे; तीव्र होणे (भाग).२. अम्मल चढणे; मद चढणे; निशा येणे; उन्माद चढून गिरकी येणे; कैफ येणे (विष, मादक औषधी द्रव्य, विखार इत्यादींनी).

**चढणे** अक्रि. शिरणे; जाणे; शरीर त्यात जाणे (चोळी, अंगरखा इ. च्या अंगात); आत जाणे (खुंटी, खिळा, खीळ).

**चढणे** अक्रि. साचणे; तुंबणे; थकणे; चढत राहणे; हळूहळू वाढत जाणे (ऋण, शंका, प्रश्न इ.).

**चढणे** अक्रि. १. आच्छादणे; आवरण होणे; वर पसरणे; आक्रमणे (धूळ, काजळ, जंग, बुरशी, शेवाळ). २. बसणे; लागणे; लावला जाणे (गिलावा, रंग, लेप, तेल, हात). ३. खुलणे; चकचकीत दिसणे; पूर्णत्वास पोचणे (रंग किंवा रंगविलेला पदार्थ, वस्तू).

**चढणे** अक्रि. (देवादिकांना) वाहिले जाणे; अर्पण केले जाणे.

**चढणे** अक्रि. १. ताणला जाणे (पखवाज, मृदंग). २. (धनुष्याला) गुणा लावणे; सज्ज करणे.

**चढणे** अक्रि. प्राप्त होणे; येणे; लाभणे : 'जेणें करितां महिमा चडे। विरक्तांसी।'– दास २.९.२.

**चढतऊन** नपु. मध्यान्हीचे ऊन.

**चढता** वि. १. चढणीचा; उंचट; चढावाचा; उंचवट. २. वाढणारा; सुधारत जाणारा; चांगला होणारा; प्रगतिपर : 'चढत वाढत प्रेमा।'– दावि १६६. ३. उच्च; आध्यात्मिक विचाराचा : 'चढता अर्थ लागला। तरी अंतरात्मा चढतचि गेला।'– दास १३.७.१३. ४. (ल.) उंच; उच्च; तार (स्वर) : 'चढत्या स्वरांत गद्यच पाहिजे.'– नाकरु २.२९.

**चढता दिवस** पहा : **चढती वेळ**

**चढता पाया** चढती पराई, पायरी. सुधारत चाललेली स्थिती, अवस्था (एखाद्याच्या दैवाची); उत्कर्षाचा आरंभ; ऊर्जितावस्था; भरभराटीची स्थिती.

**चढता व्यय** (अर्थ.) वाढता उत्पादन खर्च.

**चढती** स्त्री. १. वाढ; प्रगती; सुधारणा; उत्कर्ष : 'सवाई माधवराव पेशवे चढती राज्याला।'– ऐपो १७६. २. श्रेष्ठपणा; उच्च दर्जा. ३. चलती; बढती; चढता पाया. (वा.) **चढती गोष्ट सांगणे** – फुशारकीने, आढ्यतेने, अरेरावीने बोलणे.

**चढतीकमान** स्त्री. वाढत्या उत्कर्षाची स्थिती; चढती कळा; भरभराटीचा काळ; समृद्धीचा काळ; उदयकाल; वृद्धीस अनुकूल काल.

**चढती कळा** स्त्री. १. ज्या काळात चंद्राच्या कळा वाढत जातात तो काळ; शुक्ल पक्षाचे दिवस. २. (ल.) भाग्याचे दिवस; भरभराटीची स्थिती, अवस्था; उत्कर्षकाल : 'चढती कळा धन्याची जाणुन वीर असे भीडती।'– ऐपो २६९.

**चढती बाजू** स्त्री. १. गंजिफाच्या डावात आलेली (एक्का, दुरी, तिरी अशा चढत्या क्रमाने) चांगली चांगली पाने. २. (ल.) भरभराटीचे दिवस; उत्कर्षाचा काळ; चढती कमान. पहा : **चढती कळा**

**चढती भाजणी** स्त्री. (ग.) १. हलक्या परिमाणाच्या अंकास भारी परिमाणाचे रूप देण्याची कृती. उदा. आण्याचे रुपये करणे. २. किमतीनुसार वाढत्या क्रमाने केलेली रचना.

**चढती भावना** स्त्री. चढता, वाढता जोर, भर (रोग, संपत्ती इत्यादीचा).

**चढतीवाढती** वि. १. एकसारखी वाढत जाणारी : 'चढती वाढती गोडी। भगवद्भजनाची।'– दास १४.३.२३. २. जास्त जास्त; उत्तरोत्तर वाढत जाणारे : 'चढतें वाढतें वाढवावें। पूजन देवाचें।'– दास ४.७.३.

**चढती वेळ–ळा** १. स्त्री. चढणारी, वाढणारी वेळ; पूर्वान्ह; सूर्योदयापासून मध्यान्हापर्यंतचा काळ; सकाळ व दुपार. २. भरभराटीचा, उत्कर्षाचा काळ.

**चढती हळद** स्त्री. लग्नात पायाकडून वर हळद लावण्याचा विधी.
**चढते व्याज** चक्रवाढव्याज.
**चढपट्टी** स्त्री. जादा कर.
**चढभाव** पु. (वाणिज्य) मूळ किंमत व चढी किंवा जादा लावलेली किंमत यातील फरक.
**चढवट** पु. चढ; चढण; उंचवटा.
वि. वाढणारे; चढाचे; चढणीचा; चढावाचा; उंचट.
**चढवडी** क्रिवि. (प्र.) चढवढी; चढाओढीने : 'पुढें शिबंदीचा थाट सभोंवता दाट पाह्याला उडी। राहिले उभे चढवडी।'- पला ४.२२.
**चढवढ** पु. स्त्री. वरचढपणा; श्रेष्ठत्व; प्राबल्य (क्रि. चढणे.).[चढ द्वि.]
**चढवणउतरण** न. मालमत्तेच्या जुन्या मालकाचे नाव काढून नव्या मालकाचे नाव सरकारदफ्तरी दाखल करणे.
**चढवणी** स्त्री. लग्नापूर्वी मुलीस वस्त्रालंकार घालणे. पहा : **चढावा**
**चढव(वि)णे** अक्रि. १. वर जाण्यास, बसण्यास, आरूढ होण्यास लावणे, वर बसविणे. २. उठविणे; वाढविणे; जास्ती करणे; सुजविणे; फुगविणे : 'धनी (साव्हरिनचा) भाव चढविण्यास कबूल आहे.'- गुजा २५. ३. शेफारून ठेवणे.
**चढव(वि)णे** अक्रि. अंगात घालणे (पोषाख) : 'योग्य तो पोषाख चढवावा.'- ऐरा २.४८.
**चढव(वि)णे** अक्रि. १. चेतविणे; उद्युक्त करणे; भरीस पाडणे : 'समर्थे येकदां कौतुके नीच यातीस चढविलें।'- श्रीसप्र ३.७६. २. मारणे; लगावणे; तडकावणे (चापट, तडाखा, रपाटा).
**चढव(वि)णे** अक्रि. तोंडात घालणे; पिणे (तंबाखू, भांग इ.). (वा.) **चढवून येणे** - १. (भांग, दारू) पिऊन येणे. २. कैफ आल्याप्रमाणे वागणे, बोलणे, एकदम संतापणे.
**चढव(वि)णे** अक्रि. ताणणे; आकर्षणे; लावणे (धनुष्यास गुण).
**चढवणे** क्रि. खोटी स्तुती करणे.
**चढवाचढव** स्त्री. निरनिराळ्या वस्तू, माल इ. चढविण्याची क्रिया, व्यापार.
**चढवोहट** स्त्री. १. चढणे-उतरणे. २. भरती-ओहटी : 'समुद्रीं चढवोहट चांदे।'- एभा ८.५८.
**चढा** वि. १. उंच, उच्च; पहाडी; उदात्त, वरच्या पट्टीतला (आवाज, सूर). २. ताणलेला (पखवाज); चढ्या सुराचा (मृदंग इ.). ३. जास्त; अधिक : 'भाव थोडा चढा; पण दूध अस्सल.'- श्रीनापे ३२८. पहा : **चढ**
**चढाई** स्त्री. १. हल्ला; चाल; अंगावर जाण्याची क्रिया; मोहीम; स्वारी करणे : 'तलवार पुण्यावर धरून, मोंगल आला चढाई करून।'- ऐपो २३०. २. रचलेला व्यूह. ३. एखाद्यावर मिळविलेला वरचष्मा. (वा.) **चढाईच्या गोष्टी करणे** - दरडावणीच्या, अरेरावीच्या, दिमाखाच्या, मगरुरीच्या गोष्टी करणे, गुरकावणे.
**चढाईखोर** पु. अरेराव; हल्लेखोर.
**चढाईत** पु. १. पटाईत घोडेस्वार; अश्वारोहणकुशल. २. झाडावर, किल्ल्यावर चढण्यात पटाईत, निष्णात; चपळ.
**चढाऊ** वि. १. चढता येण्यासारखा; चढून जाण्यासारखा; वर जाता येण्यासारखा (वृक्ष, डोंगर, टेकडी इ.). २. आक्रमणशील; पुढे चालून जाणारा : 'अंत्यजांमधील विशेष चढाऊ पुढाऱ्यांनी...'- सासं २.४४४.
**चढाऊ-व** पु. टाच उंच असून बंद असलेला (मुसलमानी) जोडा. पहा : **चढाव** (व.)
**चढाओढ** स्त्री. चुरस; शर्यत; स्पर्धा; होड.
**चढाचढी** स्त्री. स्पर्धा : 'तें विकत घेण्याविषयीं जी लोकांची चढाचढी' - देव्यव्य १८२.
**चढाचा** वि. १. जास्ती होणारा, वाढणारा; जास्ती करणारा, वाढविणारा. २. ज्याला चढ, वाढ आहे असा; वृद्धिंगत होणारा; वाढीचा (औषध, भाषण, ध्वनी, आवाज). ३. दुराग्रहाने, मगरुरीने वाढणारी; बेपर्वाईची (भाषा, आचरण, चालचलणूक).
**चढाबुचडा** पु. मानेपासून वर ओढलेला, आवळलेला बुचडा.
**चढाव** पहा : **चढ**
**चढाव** पु. पूर : 'श्रीकृष्णेस पाण्याचा चढाव आहे म्हणोन लिहिलें तें कळलें.'- ऐको ३६२.
**चढावणी-नी** स्त्री. १. चढ; हल्ला. २. वरताण; स्पर्धा; वरचढपणा : 'तेथ वसंताकरितां चढावनी। ग्रिष्मिॲ केली रीगवणी।'- शिव ६२१. ३. उत्कटता. ४. रचना : 'ठाइं ठाइं चढावणी घे वारू'- रुस्वन ६९१.
**चढावणे** न. (चर्मकार) आढ्यावर किंवा तुळईवर चामडे अडकवण्यासाठी केलेली काठी, अडकावणे.
**चढाव सांधा** (विअ.) दोन लाकडी भाग एकमेकांना जोडण्यासाठी वापरण्यात येणारा एक प्रकारचा जोड (सांधा). यामध्ये एका भागावर दुसरा भाग जुळवून लोखंडी पट्टी, खिळे, स्क्रू यांसारख्या साधनांनी सांधतात.
**चढावा** पु. १. वरताण; वरचष्मा : 'कैवल्याही चढावा। करित विषयसेवा।'- अमृता ९.३०. २. वाढ; वृद्धी : 'अपेक्षे नाहीं रिगावा। सुखासि चढावा। जयाचें असणें।'- ज्ञा १२.१७२. ३. पूट; लेप; चढ : 'चौथा मेळौनि पांचवा। तया हरि चंदना करूनि चढावा।'- ऋव ९३.
**चढावा** पु. १. परदेशी जमातीच्या लोकांत नवरदेवाकडून विवाहविधीत पंचांसमक्ष मुलीकरिता आलेला पोषाख व इतर वस्त्रे. २. भेट; नजर.
**चढावाचे धोरण** चढाई करण्याचे धोरण; प्रथम चढाई, हल्ला करणे : 'चढावाचे धोरण स्वीकारून भारताचार्यांवर तुटून पडलो.'- नाकरु ३.६७.
**चढी** वि. १. सरस; वरचढ; श्रेष्ठ; उत्कृष्ट; थोर : 'एकाहुन एक चढी जगामधिं थोरपणाला मिरवुं नको।'- अफला ६०. २. अधिक उंच : 'वृक्ष एकाहुन एकेक चढी।'- ऐपो २४१. (वा.) ० **देणे** - भरीस घालणे; भर देणे : 'वेदमूर्ती माधवभट हे महाराजांस चढी देऊन झुंजावे म्हणतात.'- ऐको ३६३. ० **पेटवणे** - भरीस घालणे : 'शेतकऱ्यास चढी पेटवून...'- जोफुसग्रं १९८. ० **लागणे** - गर्विष्ठ होणे : 'ते दिवशी चि.रा. दादाकडील व आम्हाकडील ४०-५० माणूस जायाजखमी जाहले. यामुळे गांवकर फारच चढी लागले.'- ऐलेसं ३०१९. ० **लावणे** - भरीस पाडणे; चढवणे. ० **होणे** - अधिक प्रगत, प्रभावी होणे : 'वैज्ञानिक प्रगतीबरोबर शस्त्रेही बदलून ती चढी होत जातात.'- युजि १४०.
**चढीत** पु. अधिकमास. (को.)
**चढे, चढ्या, चढत्या घोड्यानिशी** (घोड्यावर बसला असतानाच,

एक वेळही खाली न उतरता) एका तडाख्याने; एका दौडीत; न थांबता; मोठ्या आवेशाने : 'नादिरशहा याची फौज चढत्या घोड्यानिशी दिल्लीस पोहोचली.- भाब २३.

**चढेल** वि. १. गर्विष्ठ; बेपर्वा; मगरूर; घमेंडी; माजलेला; मानी; उद्धट; उन्मत्त; शेफारलेला; ताठरलेला उच्च. २. उंच : 'मुसलमानी चढेल मगरुरीच्या इतिहासात.'- एवाका ९.

**चढोत्री** स्त्री. देवास भेट, देणगी; समर्पण : 'सत्तीनें चढोत्री यात्रेकरू कडून घेऊं नये.'- के २३.६.१९२९.

**चढोवढसा** क्रिवि. चढाओढीने. पहा : **चढोवढी** : 'मनतोष भरेल चढोवढसा।'- दावि २१९.

**चढोव(वा)ढी** स्त्री. ईर्षेची चढाओढ; स्पर्धा; झटापट, परंपरा, झुंज (या शब्दाचा प्रयोग सामान्यत: तृतीया व षष्ठी विभक्तीत करतात). वि. चढते वाढते. उत्कर्ष होणारे : 'वैकुंठ चढोवढी रामनामे' - निहरि १९. क्रिवि. १. जास्त जास्त, उत्तरोत्तर; अधिकाधिक; वाढत्या प्रमाणाने; बढीबढीने : 'वाढतें दुःख तयासी। अहर्निशी चढोवढी।'- एभा ९.२३. २. चढाओढीने; अहमहमिकेने : 'नारद प्रल्हादादि भक्त कोंडी। चढोवढी धांवती।'- एभा ११.२३२.

**चण** स्त्री. ठेवण; बांधा : 'त्याची चणच लहान.'- ब्रावि ३९. [सं.तनु]

**चणक** पु. चणा; हरभरा : 'चणक, मसुर, मूग, उडीद... दश द्विदल जाणावे।।'- मुआदि १४.११२. [सं.]

**चण(णा)क** स्त्री. एक मोठा मासा. (गो.)

**चणकन-कर, दिनी, दिशी** क्रिवि. चाबूक, छडी, काठी इत्यादींनी केलेल्या आघाताप्रमाणे आवाज होऊन; चटकन; फाडकन. [ध्व.]

**चणका** पु. १. विंचू, साप, पिसू इ.नी केलेल्या दंशामुळे होणारी चुणचुण, वेदना. २. चिमटा घेतल्याने किंवा डागल्याने होणारी तीव्र वेदना. ३. मिरी खाल्ल्याने तोंडाची, ऊन लागल्याने अंगाची होणारी आग. ४. फोडणीचा तडतड, चरचर आवाज (क्रि. मारणे, लागणे, बसणे.) ५. रागाचा झपाटा, झटका; फणकारा (क्रि. येणे, लागणे.) [ध्व.]

**चणकावणे** अक्रि. १. चुणचुणणे; वेदना होणे; तिडीक उठणे (विंचू, साप, ढेकूण, पिसा, मुंग्या, पिसोळे इत्यादिकांच्या दंशाने-चावण्याने). २. चावणे; दंश करणे (विंचू, साप इ. प्राण्यांनी).

**चणकाविणे** सक्रि. १. जोराने मारणे; चणकन मारणे; ठोकणे. २. (ल.) स्मरणशक्ती, आठवण ताजी करणे, उजळणे.

**चणच** वि. तल्लख; चणचणीत; बुद्धिमान; हुशार; तैलबुद्धीचा (मुलगा).

**चणचण** स्त्री. १. कमतरता; टंचाई; तुटवडा. चडचड; तूट (अन्न, पाणी, वस्त्र इत्यादींची). २. महागाई; दुर्भिक्ष; अडचण; तारांबळ. [सं. चण]

**चणचण** स्त्री. ठणका; चुणचुण; ठुसठुस.

**चणचण-णा** क्रिवि. १. रिकाम्या भांड्याचा, मडक्याचा जो खणखण किंवा ठणठण आवाज होतो त्याप्रमाणे आवाज होऊन; खडखडा. २. जखमेच्या किंवा क्षताच्या वेदनांप्रमाणे किंवा तिडकांप्रमाणे. ३. छडी मारली असता होणाऱ्या आवाजाप्रमाणे. ४. ढेकूण, पिसा, मुरकुटे डसताना जी चळवळ, गजबज केली जाते त्याचे निदर्शक; चडचड; चटचट : 'चण चण चण पिसा आणि ढेकूण खाणी।'- दावि. ५. मोठ्याने; स्पष्टपणे : 'शब्द बोलताती चणचणा रे।'- दावि. ७८०. [ध्व.]

**चणचणणे** अक्रि. १. चटचटून तापणे : 'ऊन चणचणत होतं...'- टारफुला २२१. २. फार वाढणे; चढणे (भाव, धारण). (को.) [सं. चण]

**चणचणणे** अक्रि. १. छडी; चाबूक इत्यादीच्या फटकाऱ्याने, तडाख्याने चणचण असा आवाज होणे; छमछम, फाडफाड लागणे. २. चुणचुणणे; तिडीक मारणे; वेदना होणे. ३. कडकडून भूक लागणे.

**चणचणाट** पु. १. अतिशय अडचण; तारांबळ. २. पैसा, संपत्ती इत्यादींचे दुर्भिक्ष; अडचण. ३. अतिशय महागाई.

**चणचणाट** पु. पिसा वगैरेंनी अतिशय चावणे; तीव्र वेदना.

**चणचणीत** वि. १. तीव्र; प्रखर (सूर्यकिरण). २. फणफणीत; जळजळीत; रसरशीत (ताप). ३. तल्लख; चुणचुणीत; चुटचुटीत; चलाख; बुद्धिमान (मूल); हुशार : 'त्यांतून जे कोणी अंमळ चणचणीत असतात.'- निअसा ४६. ४. मालमसाला किंवा मीठमिरची सुरेख लावली आहे असा (पदार्थ); चमचमीत; मसालेदार; खणखणीत (भाजी, झुणका). ५. तीव्र; कडक (भूक). ६. कढत. ७. तिडीक मारणारे; ठणकणारे; वेदना होत असलेले (क्षत, जखम).

**चणफण** स्त्री. दंश झालेल्या भागाची चुणचुण, तिडीक; फुणफुण. [ध्व.]

**चणवणी** न. हरभऱ्याच्या पिठाची आमटी.

**चणवणीमिठवणी** न. गरिबीचे जेवण; कदान्न; आलापाला; कोंडामांडा. (वा.) ० **पिऊन असणे** – केवळ कदान्नावर राहण्याची पाळी येणे; वाईट अवस्था येणे.

**चणा** पु. १. हरभरा (मोठ्या दाण्याचा) : 'वानराचें ठेवणें। गालफडां भरावे चणे।'- भाराकि १२.१०६. २. घुंगुरात घालायचा खडा : 'घागुऱ्या चरणिं चारू चण्याच्या।'- शशिसेना. (व.) [सं. चणक] (वा.) **चण्याच्या झाडावर चढविणे**– खुशामत करून किंवा तोंडापुरते बोलून एखाद्याला चढवणे, फुगवणे.

**चणाचण, चणाणा** पहा : **चटचट, चणचण**

**चणाचणा** क्रिवि. चटका बसण्याइतपत : 'गारठलास तर शेक चणाचणा.'- सीए ४७.

**चणाणणे** अक्रि. १. अतिशय वाढणे, चढणे. २. जबर वेदना होणे; ठणकणे किंवा तिडकणे. ३. अतिशय खाखा सुटणे; खाखावणे.

**चणाणणे** अक्रि. वाजणे : 'स्वर मृदांग चणाणित वीणे।'- दावि ४३१.

**चणि-णी** स्त्री. चुणूक; मोहोर; बहर : 'ज्ञानतरूची पहीली चणि : ऐसीचि होए'- उगी ६४.५४१.

**चणी** स्त्री. १. बारीक हरभरा. (गो.) २. मसूर. (बे.)

**चणेफुटाणे** पु. अव. भाजलेले हरभरे, फुटाणे. (वा.) ० **करणे** – उधळणे; उधळपट्टीने खर्च, व्यय करणे (पैसा, द्रव्य, सामग्री). [सं.चणक]

**चणेबोर** न. बारीक बोराची जात; चण्याएवढे बोर.

**चणोर-रा** वि. लहान; अल्प आकाराचा; लहानखोर (वेत, पावटा, घेवडा, शेंग इत्यादींच्या निरनिराळ्या जाती दर्शवण्यासाठी हे विशेषण लावतात).

**चण्डोल** शत्रूच्या मागून दबा धरून जाणे. [फा.]

**चण्णकदाणी** स्त्री. नखरा करणारी : 'आमच्या सासुबाईंनी वन्संना...

नटमोगरी, चण्णकदाणी... इत्यादि अनेक बिरुदं बहाल केली.' - हेतोप्रबो १५.

**चतकोर-कर** पु. स्त्री. १. (भाकरी, पोळी, फळ, लाडू इत्यादींचा) चतुर्थांश; पाव भाग : 'आमच्यांतील कांहीं चतकोर - अर्धी शहाणी मंडळी म्हणू लागली आहे.' - लोटिकेले १.३७०. २. लहान तुकडा.

**चतर(ं)ग, चतुरंग** पु. पु. (संगीत) चार अंगांनी नटलेला हा गमतीदार गायन प्रकार आहे. ह्यात तराणा, सरगम, तिवट म्हणजे तबल्याचे बोल व ख्याल अशा चार प्रकारांची रचना असते. पहिल्या भागात गीताचे शब्द, दुसऱ्यात तराण्याचे बोल, तिसऱ्यात सरगम व चौथ्या भागात मृदुंगाच्या बोलांची छोटीशी परन असते. ख्याल, टप्पा, ठुमरी याप्रमाणे गायकीचा एक प्रकार : 'गायकीमध्यें ध्रुवपद (ध्रुपद १), ख्याल, होरी...चतरग... हे प्रकार गवई वर्गात ज्ञात आहेत.' - ज्ञार्शि १६७.

**चतरसिंगी रुपया** रुपयाची एक जात.

**चतरा** पु. धूर्त; चतुर : 'दोघेही उमदे, लाघवी आणि चतरे होते.' - एपिआ ३४.

**चतुर** पु. फुलपाखरांच्या जातीतले एक पाखरू : 'कालव्यावरून जाताना खूपसे चतुर दिसले.' - भोवरा १०७.

**चतुर** वि. श्रावक किंवा जैन यांच्यातील दोन भेदांपैकी एक. दुसरे पंचम.

**चतुर** वि. १. अत्यंत हुशार; बुद्धिमान; तीव्र बुद्धीचा; चुणचुणीत; चाणाक्ष; युक्तिवान; हरहुन्नरी; कुशल; धूर्त; सुज्ञ; समंजस: 'चतुर तो चतुरांग जाणे। इतर तीं वेडीं।' - दास १३.१०.२५. २. व्यावहारिक. [सं.]

**चतुर** वि. चार; चतुर्गुण - गणित इ. [सं.]

**चतुर(करण)** न. (नृत्य) डावा हात वाकवून छातीसमोर आणणे व उजव्या हाताची करंगळीशिवाय सर्व बोटे मिटवणे व उजवा पाय जमिनीवर हळूहळू आपटणे. [सं.]

**चतुर (भुवई)** (नृत्य) भुवया मोहक दिसतील अशा तऱ्हेने दोन्ही बाजूस लांबविणे. [सं.]

**चतुरक (हस्त)** न. (नृत्य) अंगठा मिटवून त्यावर करंगळीशिवाय तीन बोटे मिटवणे व करंगळी उभी ठेवणे. [सं.]

**चतुर साबाजी** पु. (उप.) मूर्ख माणूस; अकलेचा कांदा. [सं.]

**चतुरस्र** वि. १. चौकोनी; चोहीकडून सारखा. २. चतुर, गुंड. ३. प्रमाणबद्ध. ४. अनेक विद्या व कला यांत प्रवीण; पारंगत.

**चतुरस्र जाती** (संगीत) दक्षिणेकडील तालाचा एक प्रकार.

**चतुरस्र हस्त** दोन हातांची दोन्ही कोपरे खांद्यांच्या सरळ रेषेत येतील इतकी उंच करणे व हात खटकामुख करणे. हातांचे तळवे प्रेक्षकाकडे येतील अशा रीतीने ते छातीपासून आठ अंगुले अंतरावर धरणे.

**चतुरंग** वि. १. ज्याला चार अंगे, शक्ती, साधने आहेत (हत्ती, घोडे, रथ, पायदळ इ.) अशा प्रकारचे (सैन्य) : 'चतुरंगा परिवारा। संजोडीयां रहंवरां।' - ज्ञा ११.३९७. २. कपाळावर चार दिशांना चार भोवरे असलेला (घोडा).

**चतुरंगबल** न. १. चतुरंग सैन्य. २. (आधुनिक) घोडदळ, पायदळ, आरमार व वैमानिक दळ.

**चतुरंगलिपी** स्त्री. बुद्धिबळाच्या खेळातील खेळ्या उतरण्याची संक्षिप्त लेखनपद्धती. जसे :- राघो= राजाचा घोडा, वउं हप्या = वजिराचा उंट हत्तीच्या घरातील प्यादे मारतो, घो (रा२) उं ३ = राजाच्या दुसऱ्या घरातील घोडा उंटाच्या तिसऱ्या घरी जातो; ००० = राजा वजिराकडील बुरजात जातो इत्यादी.

**चतुराई** स्त्री. १. चतुरपणा; हुशारी; चातुर्य; कुशलता; चाणाक्षपणा; बुद्धिमत्ता. २. चतुर स्त्री : 'फूल देऊनि तिला उतराई। होई मी समज हे चतुराई।' - नवनीत १३७. [सं.चतुर]

**चतुराय, चतराय** पहा : **चतुराई**

**चतुरालाप** पु. मार्मिक बोलणे, खुमासदार बोलणे : 'चतुरालापाने तो अनेकदा उच्चारला जातो.' - अंया १९.

**चतुरोक्ति-क्ती** स्त्री १. (सास.) एखादा विचार किंवा घटना यावर रचलेला चुटका अथवा लघुकाव्य. २. कुशल भाषण. [सं.]

**चतुर्घात** पु. एका संख्येला त्याच संख्येने चारदा गुणून येते ती संख्या. [सं.]

**चतुर्थ** वि. चवथा.

पु. (ल.) (विद्यातील) कात, (पुरुषार्थातील) मोक्ष, दंड इत्यादींना सांकेतिक नावे. कारण ते प्रत्येकी आपापल्या वर्गातील चवथ्या स्थानाचे आहेत. उदा. १. पान, सुपारी, चुना, कात. २. धर्म, अर्थ काम, मोक्ष. ३. साम, दाम, भेद, दंड इ. [सं.]

**चतुर्थक** न. (स.शा.) निरीक्षणाचे चार समान भाग करणाऱ्या संख्या; आकृतीचा चौथा भाग.

**चतुर्थ मूळ** (म.) अ$^४$ = ब असेल तर अ ला ब चे चतुर्थमूळ म्हणतात. (ग.)

**चतुर्थान्हिक** न. चातुर्थिक कर्म; विवाहाच्या चतुर्थदिनी गृहप्रवेशनीय होम व कंकण सोडणे हे करावयाचे विधी. [सं.]

**चतुर्थाश्रम** पु. ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ व संन्यास या चार आश्रमांपैकी शेवटला, म्हणजे संन्यास : 'मी आता संसार सोडून चतुर्थाश्रम धारण करणार.' - विज्ञावि १०.१०.२२५. [सं.]

**चतुर्थांश** पु. (ग.) चार समान भागांपैकी; चौथा भाग, हिस्सा. [सं.]

**चतुर्थी** स्त्री. १. कोणत्याही महिन्याच्या शुक्ल व कृष्ण पक्षातील चौथी तिथी : 'चतुर्थी तुझ्या मी करिन अवघ्या थोर गजरें।' - सारुह ६.१०७. २. चौथी विभक्ती.

वि. चौथी : 'सर्वत्यागें चतुर्थी। भक्ती जैसी।' - ज्ञा १४.२७०. [सं.]

**चतुर्दल-ळ** वि. चार दलांचे, पाकळ्यांचे, प्रकारचे, बाजूंचे : 'गुदस्थानीं चक्र आधार। तेथे चतुर्दळ कमळ सुंदर।' - स्वादि ९.३.५४. [सं.]

**चतुर्दली** स्त्री. चार दले असलेले हस्ताकृती(पंजासारखे) संयुक्त पान.

**चतुर्दश** वि. १. चौदा. २. चौदावा. [सं.]

**चतुर्दशविद्याधाम** वि. विद्वान मनुष्य; पंडित. [सं.]

**चतुर्दशी** स्त्री. चांद्रमासातील प्रत्येक पक्षातील चौदावी तिथी. [सं.]

**चतुर्दिशु-क्षू** वि. चारी दिशांकडील; चोहोकडील : 'चतुर्दिक्षु वारा। न लाहे निघों बाहिरा।' - ज्ञा १३.४११. [सं.]

**चतुर्दोल** पु. न. पालखी, मेणा.

**चतुर्धा** वि. क्रिवि. १. चार प्रकारचा. २. चार तऱ्हांनी, प्रकारांनी :

'चतुराश्रमवशें। एकु पुरुष चतुर्धा दिसे।' -ज्ञा १८.६२९. [सं.]
**चतुर्बाहु** न. चौकोन.
**चतुर्भुज** वि. १. ज्याला चार हात आहेत असा (विष्णू). गुणवाचक शब्द : 'जेथूनि इयें द्विभुजें हन चतुर्भुजें। सुरकार्याचिनि व्याजें। घेंवोघेंवों येसी।' - ज्ञा११.८३. २. चार बाजू, तोंडे किंवा पृष्ठभाग असलेला : 'याचे चपटे चतुर्भुज स्फटिक असतात. - सेंर २.२५. ३. (ल.) शृंखलाबद्ध कैदी; मुसक्या बांधल्या आहेत असा; हात मागे बांधलेला. (क्रि. होणे, करणे.) : 'अंत:पुरांत असा पांचटपणा करायला लागले म्हणजे चतुर्भुज होण्याला उशीर लागत नाहीं.' - मूना. ४. (ल.) विवाहबद्ध; लग्न झालेला : 'मात्र एक अक्षर कुठे बडबडलास तर असा चतुर्भुज होशील. '-भावं ५०. [सं.]
**चतुर्मान** न. चार मिती असलेले : 'तो यामिकी म्हणजे चतुर्मान (फोर डायमेन्शनल जॉमेट्री) भूमिती म्हणून संबोधित असे.' - कहीग १३५.
**चतुर्मास** पु. आषाढ शुद्ध ११ पासून कार्तिक शुद्ध ११ पर्यंतचा चार महिन्यांचा काळ. पहा : **चातुर्मास्य** [सं.]
**चतुर्मूल्य** वि. चौथ्या दर्जाची किंमत असणारा : 'कथिल हा चतुर्मूल्य आहे.' - सेंर १.३१०. [सं.]
**चतुर्वर्ग** पु. धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चार पुरुषार्थ. [सं.]
**चतुर्वर्ष चक्र** एखाद्या घटनेची दर चार वर्षांनी होणारी पुनरावृत्ती किंवा आवर्तन. [सं.]
**चतुर्विध** वि. १. चार प्रकारचा : 'मंगळ रागातें आळवीत। चतुर्विधा दंडीचे विद्यावंत।' -वछाह २१३. २. सर्व प्रकारचा : 'चतुर्विधु ठसा। उमटो लागे आपैसा।'- ज्ञा ७.२३. [सं.]
**चतुर्व्याज** न. क्षेत्र, ज्ञान, अज्ञान आणि ज्ञेय असे चार प्रकार : 'तैसें एकचि चतुर्व्याजें। कथिलें आम्हीं।'- ज्ञा १३.९५०. [सं.]
**चतुर्व्यूह** पु. वासुदेव, संकर्षण, अनिरुद्ध आणि प्रद्युम्न असे पृथ्वीस आधारभूत असलेले चार व्यूह. [सं.]
**चतुर्सीव** स्त्री.चारही बाजूंची शीव; चतु:सीमा; गावाची हद्द; वेस : 'सर्वज्ञें म्हणीतलें : 'आता हें तुमचीए चतुर्सीवेसि उभे न व्हाएं :' - लीचपू ५९०.
**चतुर्हस्ती** वि. १. चार हात असलेला. २. (ल.) माकड. [सं.]
**चतुश्शास्त्री** पु. न्याय, व्याकरण, पूर्व आणि उत्तर मीमांसा यांत पारंगत असलेला. [सं.]
**चतुष्क, चतुष्टय** न. चारांचा समुदाय; चौकडा : 'चित्त चतुष्टय डाहाळिका। कैभिजेतो।' - ज्ञा १५.९७. या पदानेयुक्त असेच बरेच समास आहेत. उदा. आश्रमचतुष्टय, पुरुषार्थचतुष्टय, वर्णचतुष्टय इ.[सं.]
**चतुष्कोण** पु. १. (ग.) चार कोन असलेली बहुभुजाकृती. २. चौकोन, चौरस, चार बाजू किंवा कोपरे असलेली वस्तू.
वि. चार कोनांचा; चार कोपरे ज्याला आहेत असा; चौकोनी. [सं.]
**चतुष्ट** वि. उघड; प्रकट; जाहीर; चार जणांस माहीत. पहा : **चतुष्टाई** : 'उतर खासदसखते चतुष्ट न होता प्राप्त व्हावे'- पेद २५.२६५.
**चतुष्ट-स्ट** न. चौकशी; शोध; चार ठिकाणी विचारणा : 'चतुष्ट करून शोध पाहून पारवानगी राजश्री नारोपंत प्रचुरे यांसी सांगितले की आल्या वरास मूल देणे.'- पेद ४३.७२.
**चतुष्टय** न. (सास.) नाट्य, कथा, कादंबरी यांसारख्या साहित्यप्रकारातील चार अन्योन्याश्रयी कृतींची मालिका; चौकडी. [सं.]
**चतुष्टाई, चतुष्ट्यी** स्त्री. १. चौघे किंवा काहीजण मिळून एखाद्या व्यवहाराची करतात ती चौकशी. पंचांची तपासणी; परीक्षा. २. बोभाटा; प्रसिद्धी; वाच्यता; गवगवा; गौप्यस्फोट. [सं.चतुष्ट्य]
**चतुष्पदी** स्त्री. (सास.) चार चरण असलेले कडवे किंवा कविता.[सं.]
**चतु:शाल-ली, चतु:शालक** स्त्री. चौसोपी वाडा.
**चतु:श्रुतिक** वि.चार श्रुतींनी युक्त : 'भरताचा षड्ज चतु:श्रुतिक सिद्ध होतो.'- मागोवा २०.
**चतु:सीमा** स्त्री. १. चारी दिशांकडची हद्द; चोहो बाजूंची मर्यादा (शेत, गाव इत्यादीची). २. या मर्यादा ठरवणे, रेखणे, घालून देणे. (क्रि. करणे.)[सं.]
**चतु:सीमापूर्वक** क्रिवि. चारी सीमा नक्की करून, नोंदून, ठरवून.
**चतु:सूत्री** स्त्री. चार तत्त्वांचा समुदाय. स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण व स्वराज्य ही लोकमान्यांची चार सूत्रे.
वि. चार प्रकारचा, तत्त्वांचा, नियमांचा (कार्यक्षम व्यवहार इ.).[सं.]
**चतूका** पु. वस्त्र : 'हातुका मतुका, चरणी चतुका'- लोसाको.
**चतोडा** पु. घेरा. (व.)
**चत्र-त्रा** वि. शहाणा; धूर्त; चपळ. पहा : **चतुर** [सं. चतुर]
**चत्राई** स्त्री. फाजील हुशारी, चपळता. पहा : **चतुराई** : 'हे पहा ! चत्राई करीत बसण्यांत काही तात्पर्य नाही.'- यख. [सं. चतुर]
**चत्राय** स्त्री. सूक्ष्म दृष्टी. (गो.)
**चत्राय** स्त्री. आठवण; सूचकता. पहा : **चतुराई**
**चत्वर** पु. चौक; अंगण : 'पाहें तों अलकापुरीसम दिसे रत्नप्रभे चत्वरें।'- नदाव्र १२. [सं.]
**चत्वार** वि. चार. [सं.]
**चद(द्द)रबिल्ली** स्त्री. चपटी कवले : 'बेळगावकडे छपरांतील वाशांवर...चदरबिल्ली...बसवितात.'- तप २८६. [हिं.]
**चदाड्या** वि. जाड. (झाडी.)
**चद्दर** स्त्री. १. चादर; वस्त्र. २. तव्याप्रमाणे उपयोग करायचा लांब पत्रा. ३. अंथरलेला थर. [फा.]
**चनका, चनकाव(वि)णे** पहा : **चणका, चणकाविणे**
**चना** पु. नासवलेल्या दुधातून पाणी काढून टाकल्यानंतर राहिलेला भाग : 'भारतीय मिष्टखाद्यात शुद्ध दूध...नासवलेले दूध (चना किंवा पनीर) हे पदार्थ वापरले जातात.'- मिष्टखाद्ये ९८.
**चना** पु. १. फुटाणा. २. जाड चण्याची, पंजाबी पद्धतीची उसळ. [सं.]
**चनी** स्त्री. मोहर; बहर : 'ज्ञानतरुची पहिली चनी ते ।'- उगी ५४१.
**चनीयामनीया** स्त्री. अव. वाळवून तिखट मीठ लावलेली बोरे : 'मधल्या सुटीत त्यानं चनीयामनीया आणि गंडेऱ्या घेऊन मला दिल्या.'- जुम्मन १६७.
**चनोडा** पु. केसाचा घेरा; संजाब (ना.)
**चनोली** स्त्री. पावटा : 'वाकुरी एवढं गाव हाई चनोली एवढं। देव ज्ञानोबाच्या तिथं साधूचा तळ एडं।।'- लोसाको.
**चन्नाल** पु. पंजा. [अर.]

**चन्नफन्न** पु. अव. खोड्या; चाळे; चेष्टा.

**चन्नी** स्त्री. कपाळावर लहान पांढरा टिकला असलेली मेंढी. (माण.)

**चन्नुला** वि. घेवड्याची एक जात : 'माळीण साद देई। भाजी चन्नुल्या घेवड्याची। रानी गर्भिण केवड्याची।।'-लोसाको.

**चप** पु. चपार; कोपऱ्याचा छाट; इमारत अगर रस्त्याचा वळणावर पुढे आलेला भाग कापून टाकणे. कोपरा असतो तो वळणावर छाटून टाकणे : 'रंगी सोनाण्याचं घर ओलांडतेसं पाहून द्वारकीनं चपेबाहेर डोकावलं.'- बाविबु २१.

**चप** न. पोचा; आदळल्यामुळे भांड्यास आलेला बाक; वाकडेपणा. (गो.)

**चप** उद्गा. गप्प; चूप.

क्रिवि. स्तब्धपणे; शांतपणे; मुकाट्याने; गुपचूप. (क्रि. बसणे, राहणे इ.)

**चपक-का, चपकन** पहा : **चबक** इ.

**चपकणे** अक्रि. भांड्याला पोचा पडणे. (ना.)

**चपकन-कर-दिनी-दिशी** क्रिवि. एका पळात, अति त्वरेने; लवकर; झटदिशी; ताबडतोब; एकदम : 'हुंदडणाऱ्या खोंडाची शिंगे चपकन पकडून तो त्याला ... शरण आणी.'- कथाकांता ५५. [ध्व.]

**चपकल, चपका** पहा : **चपखल**

**चपका** पु. १. चपकन मारलेली चापट; चापटी; रट्टा; तडाखा. (क्रि. देणे.) पहा : **बचक**. २. पंजा. (गो.) [ध्व.]

**चपका** पु. १. विशिष्ट पदार्थाचा लेप देऊन दागिना किंवा सोने विस्तवात तापवणे. (क्रि. देणे.) २. उजळा, जिल्हई देण्याची रीत, पद्धत.

**चपका** पु. दही, ताक वगैरेचा आंबटपणा मोडण्यासाठी तापविलेल्या पळीत तेल, जिरे, हिंग, मोहऱ्या वगैरे घालून ती पळी दह्यात वगैरे बुडवणे किंवा घालणे; फोडणी.

**चपका** स्त्री. अव. चमका. (खा.)

**चपक्‌चपक्** क्रिवि. चिखल पाण्यातून जाताना चपलांच्या होणाऱ्या आवाजाचा निदर्शक शब्द. ध्वन्यनुकारी शब्द : 'क्षणोक्षणीं चिखलाशीं चपक् चपक् करून हितगुज करणाऱ्या चपला...'- व्यव २००.[ध्व.]

**चपखल** क्रिवि. १. बरोबर; तंतोतंत : 'रहस्यमालादि वाङ्मय त्यात कसे चपखल बसू शकते.'- छांदसी ८८. २. (ल.) संगतवार; योग्यप्रकारे. वि. १. अनुकूल; साजेसा; योग्य. २. न्यायाचा; खरा; रास्त. ३. अचूक; नेमका.

**चपखळ** वि. स्वच्छ; स्पष्ट.

**चपचप** वि. ओला; चिंब.

**चपचप-पा** क्रिवि. १. चटकन; झटझट; तडकाफडकी; पटकन. २. चटचट; तीव्र : 'उने चांगली चपाचपा लागत होता.'- मिरास १७६.

**चपचपणे** १. पहा : **चवचवणे** २. मुरणे; (गुणधर्म इत्यादींनी) युक्त होणे; ३. माखणे: 'सल्फ्युरिक आसिडांत चपचपलेले पार्मस दगडाचे तुकडे.'- रशामू १२१.

**चपचपीत** वि. (तुपाने, तेलाने) माखलेल्या.

**चपचपून** क्रिवि. चिंब होईपर्यंत; भरपूर : 'चपचपून तेल लावल्याखेरीज न्हाल्यागत वाटत नाही आम्हांला.' -पुपु ८३.

**चपटक** वि. चप्पट; सपाट; बसके : 'पाठीमागून चपटक असलेलं डोकं आणि कोपरापासून कापलेला डावा हात...'- रथचक्र २.

**चपटा-डा** वि. १. बसका व सपाट; नकटा; चापट; बसकट; कमी उंच. २. चेपटलेला; चिवळ; चापटलेला; ठोकलेला; पसरट. पहा : **चापट** ३. लहान; बारीक (डोळे). ४. नकटा. (व.) [सं. चपेट]

**चपटी-डी** स्त्री. ठोकून, चोपून चापट केलेली कोणतीही वस्तू, पदार्थ (पैसा, तिंबलेल्या कणकेचा गोळा, उंडा). [सं. चिपट]

**चपटी-डी** स्त्री. १. जोंधळ्याची अरगडीसारखी एक हलकी जात. २. दुध्या भोपळ्याची एक जात : 'याच्या (दुध्या)... चपटी, तुंब्यासारखी वगैरे जाती आहेत.'- फचि १०८.

**चपडा** वि. (सांकेतिक, भाजीपाला व्यवहार) दोन संख्या.

**चपडा** पु. शिवण्याचा दोरा गुंडाळलेले पाकीट; दोऱ्याचे पाकीट. (व.)

**चपडाई** स्त्री. (जरतारी धंदा) १. सूत चापट करणे. २. चपण्याचे यंत्र.

**चपडा(रा)क** स्त्री. चापट; थप्पड. [सं. चपेट]

**चपडा(डी)लाख, चपडी** स्त्री. पातळ तुकड्यांची, चकत्या पाडलेली लाख. लाखेचा एक प्रकार : 'तीं (तलवारीची) पानं चपडी लाखेंत पुन्हा मुठींतून बसवली.'- स्मगा ५३६.

**चपणी** स्त्री. वल्ह्याची फळी; वल्ह्याचे पाते. [सं. चपट]

**चपणी** वि. १. चपटे, बसकट, नकटे (नाक). २. चपट्या नाकाचा; बसक्या नाकाचा; नकटा. [सं. चिपट]

**चपणी** स्त्री. झाकण; झाकणी; झाकण्याचे भांडे; वाडगा. [हिं. चपनी]

**चपतळ-ळा, चपताळ-ळा, चपताड-डा** वि. चपटा; थपकट; पातळ आणि सपाट. पहा : **चपटा**

**चपना** वि. डावखुरा; डावा; उजव्या हाताने जितके झटपट, सुलभतेने व सुबक होते तसेच डाव्या हाताने करणारा. [फा.]

**चपपक** म. धैर्य : 'तेणें चपपक त्याचें गेलें। म्हणें ओढवलें दुर्मरण।' - निगा १८.

**चपर** पु. १. सेवक; चाकर; दूत : 'अबदालीचे चपर काबुलेहून छ २० रबिलावली दिलीस पोचले.'- पेद २.१०६. २. तगादा करणारा ढालाईत, शिपाई; खास हुजऱ्या.

**चपरणी** वि. चापाच्या : 'चपरणी तोफा चोढिल्या बुरुजावर.'- ऐपो २.२०१.

**चपरंग** पु. स्त्री. चांगली नीट घासलेली, गुळगुळीत केलेली कवडी (मुलांच्या खेळात चकण्या-टाकण्याकरिता).

**चपराकणे** उक्रि. चापट मारणे; थप्पड मारणे; रपाटा लगावणे. [क. चप्परिसु]

**चपराशी-सी** पु. चपरास (बिल्ला) धारण करणारा; जासूद; नोकर; शिपाई; दूत; हरकारा; पट्टेवाला : 'मंत्र्यापासून चपराशापर्यंत सर्वांना जे मान्य आहे ते उघड बोलण्याची जरुरी तरी काय?'- आआआ २७. [क. चपरासी] [हिं.]

**चपरा(डा)स** स्त्री. १. चपराश्याच्या पट्ट्यावरील बिल्ला, बकल (पितळ इ. धातूंचा) २. मेणबत्तीचा आकडा अडकवण्यासाठी खांब, भिंत इ.ना बसवतात तो धातूचा पत्रा किंवा चकती. ३. छातीचे कवच. ४. बिजागरी कडी, ही कडी बसवायला मागे चापट भाग असतो. [हिं.]

**चपरास** स्त्री. कुरुंदाचा दगड बसविलेला लाकडाचा हस्ता.

**चपराळकी** स्त्री. चपराक; थप्पड : 'त्यावर चपराळकीसारखें दुसरें रामबाण औषध नाहीं.' - आगर ३.१०६.

**चपल-ळ-ळा** वि. १. चलाख; तरतरीत; तल्लख; हुशार. २. चंचल; अस्थिर; तरल; चुळबुळ्या. ३. स्वैरिणी; स्वेच्छाचारी; छिचोर; उठवळ (स्त्री). ४. त्वरा असणारा; निसटणारा; हाती न लागणारा. [सं. चपल]

**चपल-ळ** (शाप.) उडून जाणारे; वायुपरिणामी. [सं. चपल]

**चपल-ळ-ळी** स्त्री. पायातील वहाण; चप्पल : 'हा जरी गंभीर होये। तरी चपल्या कां खाये।'- कापु १४.१४२.

**चपलख** वि. चपळ; चलाख.

**चपला-ळा** स्त्री. स्वैरिणी; कुलटा स्त्री : 'फिरवित सकला। चपला भिंगरी।' - मानाप ८२. [सं.]

**चपला-ळा** स्त्री. वीज : 'कीं अंगावरी चपळा पडे।'- रावि ४.४९; 'मधुनि मधुनि ही चंचल चपला।'- मृच्छक.

वि. पहा : **चपळ** [सं. चपला]

**चपळाई** स्त्री. १. चपळपणा; चलाखी; तरतरी; तल्लखपणा. २. जलदी; त्वरा; घाई.

**चपळाईने** क्रिवि. झटपट; त्वरेने.

**चपळी** वि. चंचल; स्वैर : 'चपळी स्त्रियेसि मेळला वरू ।'- क्रिपु २०३.

**चपाचप-पा** क्रिवि. १. चटकन; चपकन; चटदिशी; चपचप आवाज करून; झपाझप; झटकन. पहा : **चपचप**. २. चटचट; चटके बसण्याइतपत : 'उने चांगली चपाचपा लागत होती.'- मिरास १७६.

**चपाट** न. राखरांगोळी, नि:शेषता; सत्यानाश; उद्ध्वस्त, जमीनदोस्त केलेली किंवा खाऊन फडशा पाडलेली अवस्था : 'चावोनी चपाट केले भक्त भोळे। अव्यक्त ठेविलें निजप्रेम।'- बगाथा ७०५.

वि. १. उद्ध्वस्त केलेला; जमीनदोस्त केलेला; सपाट करून टाकलेला; लुटलेला; २. खाल्लेला; फन्ना उडवलेला; साफ; चाटूनपुसून स्वच्छ, गुळगुळीत केलेला.

**चपाटचे** उक्रि. काबीज, हस्तगत करणे. (गो.)

**चपाटण** न. वस्तऱ्याला धार लावण्याचा कातडी पट्टा : 'बापूराव...सेफ्टी रेझर काढून चपाटण्यावर उगाळू लागले.'- हाचिं ३५.

**चपाटणे** उक्रि. १. खाऊन टाकणे; फन्ना उडवणे; यथेच्छ खाणे; चपाट करणे. २. चटकन, झटकन उरकून टाकणे; आटोपणे (काम-धंदा).

**चपाटा** पु. १. वेग; सपाटा. पहा : **झपाटा** २. हल्ला; मार : 'शिवाजीराजाचा चपाटा। फाजिलखान बारा वाटा'- ऐपो २१. ३. झटका.

**चपाटी** स्त्री. चिंचेच्या झाडाची तोडलेली फांदी. (व.)

**चपाटी** स्त्री. चापट; थप्पड; धबका.

**चपाती** स्त्री. कणकेची लाटून केलेली पातळ पोळी, रोटी. [हिं.]

**चपापणे** अक्रि. १. दचकणे; भिणे; घाबरणे. २. संकोच वाटणे; लज्जा किंवा भीती यांमुळे माघार घेणे, मागे सरणे; दबणे; आकस्मिक लाजेने वृत्तीत बदल होणे : 'मग एकदम चपापून गप्प होत असे.'- स्मृचापा १४९. [हिं. चपना द्वि.]

**चपापा** पहा : **चपाचप-पा**

**चपेट** स्त्री. १. चापट; थापड; थप्पड; आघात; प्रहार; तडाखा (वाघाच्या किंवा मांजराच्या पंजाचा, हाताचा) : 'मृत्युव्याघ्रें चपेटघात। मारूनि प्राण घेतला।'- मुआदि २७.१०६. २. दुर्दैवाचा किंवा संकटाचा तडाखा, झपाटा. ३. धंद्यात बसलेली ठोकर किंवा आलेली तूट. (क्रि. मारणे, बसणे.) ४. लुटारू किंवा पटकी इ. साथी यांचा हल्ला; धाड. ५. पिकांवर रोग पडून किंवा पीक उंदरांनी खाऊन झालेला नाश. ६. भूत, पिशाच यांचा तडाखा, झपाटा. [सं. चप्] (वा.) **० साधणे** - (व्यापारात वगैरे) चांगले बस्तान बसणे. **चपेटीत येणे** - तावडीत सापडणे.

**चपेट** स्त्री. १. जुलमी सत्तेकडून झालेला छळ, ताप. २. अवचित झालेला आघात, प्रहार : 'अवचिता मृत्यूचा चपेट...'- एवाका १०७.

**चपेट** स्त्री. वर्चस्व; मुठीत येणे.

वि. १. हाणून पाडलेला, उद्ध्वस्त केलेला; जमीनदोस्त केलेला; उजाड पाडलेला. २. (ल.) खाऊन फस्त केलेला; खर्चून टाकलेला; लख्ख साफ केलेला.

**चपेटघात** पु. चपराक : 'कवटाळूनी चहूं हातीं। विदारिलें चपटघाती'- नाम ४७५. [सं.]

**चपेटणे** सक्रि. मारणे; तडाखे लगावणे; झोडपणे :'हस्तिदंत दोघे घेऊन। पुढें चपेटती शेषनारायण।'- हरिवि १९.११९.

**चपेटा** पु. १. तडाखा; रट्टा; प्रहार; आफत; नुकसानी : 'सिंहाचा जो बाल तोही चपेटा। मारी त्याला जो करी मत्त मोठा।'- मचपु १४२.२. वाऱ्याचा झोत. ३. जोराचा हल्ला; वर्षाव; लोंढा, पूर किंवा लोट : 'असो यशोदा ऐके सादर। गाऱ्हणियांचे चपेटे थोर।'- ह ६.१६३. ४. वेड; झपाटा : 'तुज लागला एक्या बायकोचा चपेटा'- ५३ [सं. चप्]

**चप्क(ब्क)लश** स्त्री. हातघाई. तलवारीस तलवार भिडून होणारी लढाई.

**चप्प** उद्गा. गप्प; चूप.

क्रिवि. स्तब्ध. पहा : **चप**

**चप्पल-ळ-ली-ळी** स्त्री. वहाण. पहा : **चपल**

**चप्पी** स्त्री. १. डोक्याची गुळगुळीत हजामत करणे. २. अंग रगडणे, दाबणे.

**चप्पी** स्त्री. वस्त्राची ठाकठिकी; चापचोपी; पोषाखाच्या, वस्त्राच्या घड्या चापूनचोपून बसविणे.

**चप्पू** वि. १. सावध; हुशार; विवेकी; दूरदर्शी; शहाणा. २. तल्लख; चलाख; हुशार; समजूतदार (लहान मुलाला म्हणतात).

**चफळा** वि. चपल; चंचल : 'चफळा भुलता। निरेक्षीणीं पाहातां।'- श्रीकृष्णच १५.४९.

**चफळी** वि. छचोर; चंचल. 'वुतम पुरुषा जवळिं। न राहे स्त्री चफळि।'- श्रीकृष्णच १०.६९.

**चब** स्त्री. चेपणे; दाबणे : पहा : **चप** : 'तावदानें लांबीने बसवून चब मारावी.'- तप २५.

**चब** स्त्री. काठी.

**चबक-का** चबकण. पहा : **बचक, बचकण, बचका**

**चबकणे** अक्रि. चपापणे; वचकणे; भीतीने दवणे. पहा : **चपापणे**

**चबकरि** क्रिवि. बचकन (पाण्यात एकदम हात घातल्यावर होणारा आवाज): 'डेरेयातु हातु घालुनि पाहाति। तंव पाणियांतु चबकरि

घातला : – लीचउ ३१९.

**चबक(ख)ल** क्रिवि. १. बरोबर; नीट; ठाकठीक; तंतोतंत; नेमका; जसा हवा तसा. २. (ल.) संगतवार; योग्य प्रकारे; लागू पडेल असे. वि. १. अनुकूल; साजेसा; योग्य; बरोबर. २. न्यायाचा; खरा; रास्त.

**चबचबणे** अक्रि. ओलेचिंब असणे; पाण्याने पूर्णपणे भिजलेले असणे.

**चबचबीत** वि. क्रिवि. ओली; थबथबीत; चपचपीत; (पाणी, तूप इत्यादींनी) लिबलिबीत; चिंब; भिजलेले. (क्रि. भिजणे.) [ध्व.]

**चबड(ढ)बीत** वि. ढवळलेले; गदळ झालेले, गढूळ (पाणी).

**चबडा** पु. पहा : **जबडा** : 'हनुमंतावरी अकस्मात। वेगें लोटला विनतासुत। चबडा चंचूने झडपित। परि किंचित न हाले।'– हरिवि ३१.१४४.

**चबडा(ढा–रा)क** स्त्री. थप्पड; तडाखा. पहा : **चपराक**

**चबढ(ड)ब** स्त्री. १. पाणी ढवळणे, हलवणे; ढवळून गढूळ करणे; रबरबीत किंवा चिवचिवीत करणे. २. (पदार्थ, वस्तू) फिरवणे; इकडेतिकडे फेकणे; अस्ताव्यस्त करणे; उखरवाखर करणे. ३. दुसऱ्यांना त्रास होईल अशा रीतीने लुडबूड करणे; लांडा कारभार करणे; ढवळाढवळ. ४. (अन्न वगैरे) चिवडणे; भेसळ करणे. ५. उलाढाली करणे; खेकट्यात किंवा कचाट्यात पडणे, शिरणे; खवदव, उपद्व्याप करणे. ६. गढूळ स्थिती; रेंदाडपणा (पाणी इ.चा). ७. चिवडाचिवड (अन्नाची). ८. घोळ; घोळंकार (स्वच्छ आणि अस्वच्छ पदार्थांचा). ९. स्थानभ्रष्टता; अस्ताव्यस्तपणा (वस्तू, कामे, माणसे इ.चा).[ध्व.]

**चबढ(ड)ब** स्त्री. (युक्त्या, बेत, मसलती) पराभूत होणे; फसणे; वाया जाणे.

**चबढ(ड)बी** स्त्री. व्यभिचारिणी; बदफैली स्त्री.

**चबढ(ड)बी–ब्या** वि. १. उपद्व्यापी; पैशासाठी नाना तऱ्हेच्या हिकमती आणि युक्त्या करणारा; चळवळ्या. २. हरहुन्नरी; अष्टपैलू. (ना.) पहा : **चबढब**

**चबदार** पु. चोबदार.

**चबरख** न. चापट; चपराक. (क्रि. मारणे, चढवणे, उडवून देणे.)

**चबरचबर** क्रिवि. अबरचबर; अचावचा; बडबड करून; लबलब; चुरुचुरु; तोंडास येईल तसे; अद्वातद्वा. (क्रि. बोलणे.) न. गप्पाष्टके; चकाट्या; रिकामी वटवट. [ध्व.]

**चबरचबर** न. अरबटचरबट; शिळेपाके अन्न. [ध्व.]

**चबरा, चबरट** वि. बडबड करणारा; वाजवीपेक्षा जास्त बोलणारा; वाचाळ. (व.)

**चबाढब** स्त्री. लुडबूड; ढवळाढवळ; खवडव : 'नीट आपलं काम कर. गावात चबाढब करू नगंस.' – बनग १९.

**चबाबणे** उक्रि. १. चबचब आवाज होऊन वाहणे, चावणे, : 'चबाबिती धबाबिती। कालवे पाट।'– दास १६.४.२५. २. वचकणे; दचकणे. पहा : **चपापणे**

**चबाबा** क्रिवि. चबचब असा आवाज होऊन : 'सहज चालतां चबाबा। पाणी वाजे।'– दावि २४४. [ध्व.]

**चबारणे** क्रि. रवंथ करणे; चघळणे.

**चबिणा, चबीना** पु. १. चावून खाण्याचे पदार्थ; भाजलेले धान्य, हरभरे, फुटाणे इ. : 'खाण्याकरिता आणलेल्या चबिन्यामधून...'– जोफुसंग्र १९३. २. दाढा. ३. (सामा.) चर्वण; सतत खाणे. [सं. चर्वण]

**चबुतरा, चबुत्रा** पु. १. महालाच्या, पेठेच्या मुख्य अधिकाऱ्याची कचेरी; चावडी; चौकी. २. दस्तुरी घेण्याचे स्थळ; नाका . ३. चौकोनी ओटा, उंचवटा; चौथरा. ४. रिकामटेकड्या लोकांचे बाता मारण्याचे स्थळ, जागा; कुटाळांचा अड्डा. ५. बाजारचौक. [फा.] [हिं. चतुतराह]

**चभल चभल करणे** क्रि. मध्ये मध्ये बोलणे.

**चभळ** वि. ढिला; सैल; झिजल्यामुळे, वापरल्यामुळे रुंद, पसरट झालेला; लापट.

**चमक** स्त्री. १. लकाकी; तकाकी; चकाकी; झगमग; झलक. (क्रि. मारणे.) २. विजेचा प्रकाश : 'जैसी खग मेघडंबरी। चमका मारिती चपळापरी।'– नवनीत १५.१४०. ३. (ल.) पेच; हूल; हुलकावणी; ज्याची नुसती हुलकावणी दाखवायची असा प्रहार; हेतूचे खोटे दिग्दर्शन; बतावणी; ढोंग. ४. प्रभा; तेज; लकाकी (सोने, हिरा इत्यादींची). ५. नाकात घालावयाचा दागिना. पहा : **चमकी** [हिं.]

**चमक** स्त्री. मनात एक उद्देश असून दुसऱ्या उद्देशाची बतावणी, ढोंग.

**चमक** स्त्री. १. बुजरेपणा; घाबरटपणा : 'प्रथम त्याला माणसाळवून त्याची चमक घालवायची असते.'– चिमा १२. २. भीती; संशय : 'मीं त्यांची खातरजमा बहुत करितों. तथापि मनांतील चमक जाईना.'– ऐको ३६६.

**चमक** स्त्री. १. (स्नायूंचे) स्फुरण, हलणे, उडणे. २. (पाठीत, कमरेत इ.) उठणारी शिणक, ठणका, वेदना, उसण. (क्रि. मारणे, येणे, निघणे, भरणे, चालणे, चढणे, काढणे, उतरवणे.) पहा : **धमक**

**चमक** स्त्री. (विअ.) दीपनाचा दर्जा; पदार्थांचा एक गुणधर्म.

**चमकढवळी** स्त्री. ढालगज.

**चमकणे** अक्रि. लखलखणे; चकाकणे.

**चमकणे** अक्रि. १. डौलाने, नखऱ्याने, ठुमकत चालणे (स्त्रियांसंबंधी) २. चालणे : 'पारिखा पाई कृष्ण ठाके। हें बोलणें समूळ लटिकें। ऐसें जाणोनि निष्टंकें। चरणीं चमके वैदर्भी।'– एरुस्व ६.६६.[सं. चमत्कृ]

**चमकणे** अक्रि. वेदना होणे; चमक मारणे. [सं. चमत्कृ]

**चमकणे** अक्रि. पुन्हा प्रकट होणे; वारंवार येणे. [सं. चमत्कृ]

**चमकणे** अक्रि. आश्चर्यचकित होणे : 'प्रबोध पारवे घुमघुमिती। तेणें वागेश्वरी चमके चित्तीं।'– एरुस्व ३.७. [सं. चमत्कृ]

**चमक–दमक** स्त्री. झगमग; झळाळी : 'आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवाची मेहफिल...तिथे सगळी सिताऱ्यांची चमक-दमक !'– होब्रि १.

**चमकबिजली** स्त्री. चपळ व सौंदर्यसंपन्न स्त्री. वि. नाचरी; नखरेबाज (स्त्री). (व.)

**चमकलाडू** पु. एक विधी; संस्कार : 'मूल चालावयास लागलें म्हणजे मुलाच्या पायांत चाळ घालून आईची ओटी भरतात व मुलाच्या डोक्यावर किंवा पायांवर लाडू ओततात. याला चमकलाडू म्हणतात.' – मसाप २.२२६.

**चमक(का)विणे** उक्रि. सडकून फटके मारणे, छड्या मारणे; डोळ्यांपुढे काजवे चमकतील असे करणे; मारणे; रागे भरणे. 'सासूबाईंनी चमकावले पाहिजे.' – अहिल्या ६७. [क. चमकायिसु] [सं.]

**चमक(का)विणे** उक्रि. शोभविणे; लकाकविणे; चकाकित करणे. अक्रि. विराजणे; विलसणे; चमकून दिसणे.

**चमक(का)विणे** उक्रि. (डोळे, नथ इ.ची चमक दिसेल अशाप्रकारे) शृंगारचेष्टा करणे.

**चमकाचमकी** स्त्री. चकमक : '२-२॥ घटका चमकाचमकी बरीच जाली. ४०-५० जखमी व ठार.'- ऐको ३६६.

**चमकारणे** लखकन चमकणे : 'भिकबाळी...लांबूनहि चमकारताना दिसत होती.'- सनई ३३.

**चमकारा** पु. चकाकी; लखकन चमकणे : 'निरभ्र आकाशातल्या विजेच्या चमकाऱ्यासारखे' – एपिआ ९. (क्रि. मारणे, टाकणे.)

**चमकी** स्त्री. छडी; वेत; चाबूक; चमकावण्याचे साधन; चाबकाचा मार, फटका : 'अंगावरती चमक्यांची ओळ।'- अफला ६५.

**चमकी** स्त्री. १. कानातला सोन्याचा लोलक किंवा लवंग; नाकात घालावयाचा सोन्याचा दागिना; नथेवर, गुंडीवर बसवतात ती हिरकणी; मुगवट; मुरकी. २. हिरा, काच इत्यादींचा तुकडा; टिकली. ३. (जरतार धंदा) बनावट रेशीम.

**चमकु(को)रा** पु. अळु; पोयीची पाने. (व.) [ते.]

**चमखा** पु. मोठा लांब सुरा किंवा चाकू.

**चमचम-मा** क्रिवि. १. छडी मारताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन; छमछम; चटचट. २. पायांच्या बोटांतील घागऱ्यांचे छणछण वाजणे; छन्छन्. [ध्व.]

**चमचमणे** अक्रि. झोंबणे; चुरचुरणे. (कु.)

**चमचमणे** अक्रि. चमकणे; चकाकणे : 'मंदिरावरचा तांब्याचा कळस चांदण्यासारखा चमचमत होता.'- राऊ ३००.

**चमचमाट** पु. रोषणाई; आरास; झगझगाट; चकचकाट (दिवे, रत्ने, दिखाऊ भडक पोषाख यांचा); विजेचे लकाकणे; लकाकी; शोभा.

**चमचमाट** पु. १. भोजनाच्या पदार्थांची चंगळ; विपुलता; सुग्रास जेवण. २. (अन्नाचा, खाद्यपदार्थांचा) उत्तम मसाले वगैरे घालून आलेला खमखमीतपणा; खमंगपणा. [सं. चम् = खाणे]

**चमचमि(मी)त** वि. १. चुरचुरीत; खमंग; रुचकर; मसालेदार. २. (ल.) भानगड; कुलंगडी यावर आधारलेले (वृत्त, बातमी). ३. विपुल; रगड; लागेल तितका; यथेष्ट. ४. स्वच्छ; निर्मळ; अघळपघळ : 'मधेचि चमचमित लिहावें।'- दास १९.१.११. [सं. चम् = खाणे]

**चमचा** पु. उथळ व लांबट तोंडाची लहान पळी. [सं. चमस]

**चमचा** पु. खुशामतखोर; लाळघोटे; स्तुतिपाठक; हस्तक : 'एकदा का केशरवडीला ते लागले की ते तिचे चमचेच होतात.'- वासुनाका ११२.

**चमचा** पु. होकटीचा दांडा : 'हबसून आलेल्या बादल्या थारोळ्यात ओतताना त्यांनी जेव्हा मला चमच्यावर पाहिले...'- आआशे ३२७.

**चमचेगिरी** स्त्री. पुढे पुढे करणे; हांजी हांजी; लांगूल चालन.

**चमट्या** (छाप.) टाईप : 'किती शिशाच्या चमट्या ठसे काढले त्यावर' – बगा १५९.

**चमडी** स्त्री. चामडी; कातडे; त्वचा. [सं. चर्म]

**चमतिकारू** पु. चमत्कार : 'कांही एक चमतिकारू देखतेति : मग देउळा बीजें केलें :' – लीचपू ३२९.

**चमत्कार, चमत्कृति-ती** पु. स्त्री. १. आश्चर्य; आश्चर्यकारक वस्तु, वृत्त, स्थिती, गोष्ट, प्रकार, देखावा : 'श्लेषयुक्त शब्दाच्या एका अर्थाबरोबर दुसराही अर्थ सुचून चमत्कृति उत्पन्न करितां येते.' - जर २२. २. आश्चर्य; नवल; अचंबा. (क्रि. होणे, वाटणे.) ३. देव, औषध इत्यादींचा आश्चर्यकारक अनुभव. [सं.]

**चमत्कारणे** अक्रि. चमत्कार वाटणे; आश्चर्यचकित होणे; विस्मित होणे; नवल वाटणे : 'देखूनि अजगराची मातु। चमत्कारिला प्रमिती सुतु।'- मुआदि ३.८०. [सं. चमत्कार]

**चमत्कारिक, चमत्कारी, चमत्कृत** वि. १. आश्चर्यकारक; विलक्षण; अचंबा वाटण्यासारखा; अद्भुत. २. (निंदार्थी) विलक्षण; गैर रीतीचा, चालीचा. ३. विशेष; असाधारण; असामान्य. [सं.]

**चमन** पु. १. फुलबाग; फुलांचा ताटवा. २. बागेत फिरण्यासाठी ठेवलेली पायवाट. [फा.]

**चमन** पु. दिखाऊपणा; भपका; दिमाख; थाटमाट; डामडौल. [फा.]

**चमन** पु. १. बहार; चैन; चंगळ; मजा : 'न करी आचमन, आहे चमन।'- अमृत २५. २. अत्यानंद : 'मनीं चमन भरून।'- भजसं ६९. [फा.]

**चमनगोटा** पु. तुळतुळीत भादरलेले डोके : 'राणीचा चमनगोटा केलेला विद्रुप चेहरा...'-सप्तदशी २३२. [फा. चमन = बाग; क. गोट्ट = आंब्याची कोय.]

**चमनदही** न. सुवासिक दही.

**चमनबहार** पु. पुष्पविशेष; फूल : 'थडग्याच्या जागी चमनबहारचे ताटवे आहेत.'- नवीगा ७९.

**चमनबंदी** वि. तरवारीस दिलेले विषारी पाणी.

**चमनी** वि. रंगेल; शौकीन; खुशालचेंडू. [फा. चमन]

**चमरखा** पु. चरख्याचा एक भाग : 'चरख्याचे चमरखे एका विशिष्ट प्रकारचे असत.'- माजीया १९२.

**चमरी** स्त्री. कणीस; मंजरी.

**चमरी, चमरमृग** स्त्री. पु. वनगाय. याच्या शेपटीच्या केसांची चवरी करतात. [सं. चमर]

**चमस** पु. १. यज्ञात सोमरस ज्या लाकडी पात्रातून ठेवतात ते पात्र. हे चौकोनी असते : 'चमस आणिलें चौमुखी पात्र। यालागी।'-कक ३.८.१३९. २. चमचा; पळी. [सं.]

**चमळ** वि. ढिला; सैल; वापरामुळे पसरट झालेला; लांबट.

**चमाण** स्त्री. चंगळ. पहा : **चमान**

**चमार** पु. चांभार. [सं. चर्मकार]

**चमिंदार** आस, गवत वाढलेले मैदान.

**चमू** स्त्री. १. सेना; सैन्य. २. (ल.) परिवार; पदरचे लोक; सहकारी; सभोवतीचे लोक; मंडळी : 'हे व मुद्दई यांची चमू यांचीं नांवें घेतलीं.- मइसा १०.९५. [सं.]

**चमूयात्रा** वि. सैन्यसमूह; सैन्य. [सं.]

**चमेटी** स्त्री. हत्तीच्या पायास बांधण्याचा फास. [सं. चर्मेष्ट]

**चमेल-ली** न. स्त्री. १. एक फुलवेल. २. तिचे फूल. ३. चमेलीचे अत्तर, तेल.

**चमेली** स्त्री. तोफेचे गोळे मोजण्याचे लोखंडाचे माप; वजन.
**चमेलीनळा** पु. एक प्रकारचा भुईनळा.
**चम्मन** स्त्री. चैन. पहा : **चमन** : 'चम्मन चालते आहे लेकाची त्या बाईच्या देणग्यावर.'– वज्राघात ११४.
**चम्मा** पु. ताव, हात मारणे. (को.)
**चय, चयन** पु. न. १. एके ठिकाणी रास करणे; राशी; एकत्र जमाव, संग्रह; समूह. (समासात) अपचय, संचय; समुच्चय. २. भूमितिश्रेढी. ३. गणितश्रेढी. [सं.]
**चय** पु. (शाप.) शरीरांतर्गत विविध रासायनिक क्रिया-प्रक्रियांच्या द्वारे अन्नघटकांमधून प्रथिने, चरबी व अन्य घटकांचे होणारे संश्लेषण. [सं.]
**चयन** पु. अग्निचिती; अग्निष्टोमादी सोमयज्ञास जोडून करावयाचे एक श्रौतकर्म. यात विशिष्ट आकाराच्या विटा तयार करून त्या श्येन, कूर्म इ. आकाराच्या मांडून त्याची वेदी करून त्यावर याग करतात. २. अशा प्रकारचा यज्ञ. [सं.]
**चयन** स्त्री. नदीचा घाट.
**चयन** स्त्री. १. चैन; मौजमजा. २. विश्रांती; आराम; सुख; स्वास्थ्य.
**चयनी** वि. सुखविलासाचा, चैनीचा शौकी. पहा : **चैनी**
**चयापचय** पु. (शाप.) १. सजीवांच्या शरीरांत घडणाऱ्या नानाविध रासायनिक क्रिया-प्रक्रियांना मिळून असणारे नाव. चय किंवा संश्लेषण आणि अपचय किंवा विघटन ही त्याची दोन रूपे. २. ऊर्जा निर्मितीसाठी व मलांश काढून टाकण्यासाठी शरीरात होणारी रासायनिक प्रक्रिया.
**चयाळी** स्त्री. चंगळ; चैन. (कर.)
**चर** पु. १. कोटाच्या, किल्ल्याच्या भोवतालचा खंदक, खाच; लांबलचक खळगा, खाई, खड्डा : 'चराकडची सुरंगी पानोपानी फुलली होती.'– कथाकांता ८९. २. जमिनीखाली केलेले भुयार. [सं.]
**चर** पु. स्त्री. १. (घासल्याच्या, घोळण्याच्या योगाने किंवा इतर कारणाने पडलेला) ओरखडा; चरा; ओरबाडा. (क्रि. पडणे.) २. चिडणे; चिघळणे; चरत जाणे (जखम, व्रण इ.). ३. केशाकर्षणामुळे द्रवपदार्थ पसरणे.
**चर** पु. कोळ्याजवळ असलेला मोठा सुरा. (कोळी)
**चर** न. (सांकेतिक) गमन; जाणे.
वि. १. हलणारा; जंगम; चलनशील. २. चालण्याच्या, पळण्याच्या बेतात असलेला. [सं.]
**चर** पु. १. हेर. २. खंजरीट नावाचा पक्षी.
**चर** पु. कपड्याचा दांड.
**चर** न. १. रेखांतर; प्रथम याम्योत्तर लंकेवरून जाते असे गृहीत धरून अंतरिक्षातील तारादिकांचे उगवणे आणि त्यांचे एखाद्या विवक्षित स्थळी उगवणे या दोहोंच्या कालांतील अंतर; स्पष्ट परिघी. २. (फलज्यो.) सोमवार.
वि. १. स्वाती, श्रवण, धनिष्ठा, शततारका इ. नक्षत्रे. २. मेष, कर्क, तुला, मकर इ. राशी; एखादी गोष्ट किंवा कार्य करण्यास या नक्षत्रराशींच्या वेळी आरंभ केल्यास फलनिष्पत्ती लवकर होते; परंतु ते कार्य चिरस्थायी व्हावे असे वाटत असल्यास या काळात आरंभ करता कामा नये असे फलज्योतिष सांगते.
**चरई** स्त्री. चरवी; दूध काढण्याचे पितळेचे भांडे : 'हंडानी गुंडावर थाटीनी चरई' – एहोरा ७६.
**चरक** पु. १. उसाचा रस काढावयाचा लाकडी घाणा, यंत्र. २. (उप.) दात आणि जबडे; तोंड (पीठ करण्याचे जणू यंत्र). ३. कातण्याचे काम, नक्षीकाम, सरकी काढण्याचे काम इ. करणारे यंत्र. ४. दळण्याचे, पीठ करण्याचे, वाटण्याचे यंत्र. ५. चक्कर मारणे. ६. (ल.) सतत चालणारे काम, यंत्र. ७. जिल्हई करण्याचे यंत्र. [फा. चर्ख][सं.] (वा.) ० **करणे** – विनाकारण बोलणे. **चरकी धरणे** – १. चरकावर लावणे; धरणे. २. (ल.) काचात धरणे; सख्त मेहनत करवणे; एखाद्या कामावर इकडेतिकडे न होऊ देता कुंथविणे.
**चरक** पु. धबडगा (कामाचा, पाहुण्यांचा, स्वयंपाकाचा).
**चरक** पु. चरा; खड्डा; खोचण : 'बाजारपेठेतून रेडीतरीवर जाणाऱ्या रस्त्यास मोठमोठे चरक पडल्यामुळे दोन गाड्यांचीं चाकें व धुरा मोडून गेली.'– बलवंत १९.११.४१.
**चरक** पु. (जरतार धंदा) वाटोळी मोठी परडी.
**चरक** स्त्री. पावसाची सर; चळक. (झाडी) [सं. चलुक]
**चरक–ख** क्रिवि. थक्क; गुंग; कुंठित; स्तंभित; चकित. (क्रि. होणे.)
**चरकट** पु. चऱ्हाट; पाल्हाळिक; मिळमिळीत, नीरस गोष्ट. [सं. चर्पट]
**चरकट** पु. चापटी; चपराक. (क्रि. मारणे, चढवणे.) [सं. चर्पट]
**चरकटणे** अक्रि. १. गबाळेपणाने व सैल असे दोरखंड वळणे; (राजा.) घाईने दोरी वळणे. २. (ल.) भरकटणे; निष्काळजीपणाने करणे; घोटाळा करणे; गुरफटणे; भलतेच करणे.
**चरकटणे** सक्रि. तासणे.
**चरकट्या** वि. निष्काळजीपणाने काम करणारा; घिसाडघाई करणारा.
**चरकणे** अक्रि. १. अंत:करण द्विधा होणे; अत्यंत व्यथित होणे; व्याकूळ होणे; व्यग्र होणे; कष्टी होणे : 'सुवर्णे कीं त्याच्या चरकत असे तो दिनपती।'– विज्ञावि ८.१.२०. २. (भीतीमुळे) भांबावणे; त्रेधा होणे; गोंधळणे; घाबरणे; चपापणे. ३. धास्तावणे : 'बळवंतरावांवर खटला होणार याची बापूसाहेबांनादेखील कल्पना होतीच. परंतु तरी देखील ते चरकले.'–दुर्दम्य १.२४३. ४. पिळून काढणे : 'अनास्ता हातें चरकी। ते आलिंबनाते न लेखी' : – मूप्र १०२०. [सं.]
**चरकणे** उक्रि. फाडणे; टरकावणे. [ध्व.]
**चरकन–कर, दिनी, दिशी** क्रिवि. १. फाडताना, भाजताना होतो तसा चर्र असा आवाज होऊन; टरकन. (क्रि. फाटणे, चिरणे.) २. एकदम शहारे येऊन; व्यथा पावून.
**चरकपाठ** पु. पटवेकरी कामासाठी वापतात त्या सुताचा बिंडा.
**चरकपूजा** स्त्री. आकड्याला किंवा गळाला लोंबत, लोंबकळत राहणे; बगाड घेणे.
**चरका** पु. १. जळताना भाजताना होणारा चर्र आवाज किंवा वेदना. २. चटका; डाग; डाव. (क्रि. बसणे.) ३. भाजीला फोडणी देताना होणारा चर्र आवाज; तापविलेले हत्यार, पात्र इ. पाण्यात बुडताना

होणारा आवाज. (क्रि. बसणे, देणे.) ४. (मनाला होणाऱ्या) भाजल्यासारख्या वेदना; चटका : 'मनाला चरका बसत होता.'– गआचा १५४. ५. अप्रिय, भयंकर किंवा दुःखकारक गोष्टीने मनाला बसलेली दहशत.

**चरका** पु. घोड्याच्या सामानांपैकी एक जिन्नस.

**चरकी** स्त्री. (चर्म.) पांढऱ्या रंगावर कमावलेले कोकराचे, अगर करडाचे कातडे.

**चरकी** स्त्री. तोफेचा एक प्रकार : 'लक्कड कोटांतून व सुभेकोटावरून भांडी व गुंडगल व चरकी व जेजाला याचा मार बेसुमार जाला.'– ऐको ३६७.

**चरकी** वि. चरकावर धरून साफ केलेले, जिल्हई दिलेले (भांडे).

**चरकी–खी** स्त्री. १. (चाकू, कातर इत्यादीस) धार लावण्याचे यंत्र, चाक: 'भांडीं, जंबुरे, चरक्या आदिकरून यंत्रे बुरजाबुरजास...ठेवावी.'– मराआ २३. २. चरकीबाण. (शोभेच्या) दारूचा एक प्रकार. ३. लोकर, ताग, अंबाडी इत्यादींचे धागे काढण्याकरिता केलेले लाकडाचे साधन; यंत्र; तर्कुटी; चाती. ४. चरक; घाणा. [फा. चर्खा] (वा.) ० **न धारकी धरणे** – शिस्त लावणे; कडकपणे वागवणे : 'आबांनी जर त्यांना लहानपणापासून चरकीं न् धारकीं धरलं नसतं तर ते दोघे अशा स्थितीला पोचलेच नसते.'– माबा ११९. **चरकी येणे – (घोडा)** – चक्कर येऊन स्वतःभोवती गरगर फिरून पडणे : 'रा. चिंतामणराव आप्पाचा पाय, घोडा, चरकी येऊन खालीं पडोन सापडला. खैर मोठी जहाली.'– ऐको ३६७.

**चरक्या** वि. चरक चालविणारा.

**चरख–खी** पहा : **चरक–की**

**चरखंड** पु. १. पहा : **चर** १. २. विषुवांशासंबंधी अंतर; चरार्ध; चरदल.

**चरखा** पु. सूत काढण्याचे यंत्र, रहाट. [फा.]

**चरग(घ)ण** स्त्री. न. १. कुरण; गायरान; गायरानातील जमीन. २. चारा; गायरानात उगवलेले गवत : 'मैसी चेउलास चरगणीस प्रतेही येतात.'– आंपव्य ४.

**चरचर–रा** स्त्री. १. चुरचुर; खुपत असलेले दुःख, इजा; झणझणणे. (क्रि. लागणे.) २. (ल.) पश्चात्ताप; रुखरुख; हुरहुर. (क्रि. लागणे.) ३. तीक्ष्णता (शस्त्र, हत्यार इत्यादींची). ४. खोच; औद्धत्य. (वा.) **(काळीज) चरचर कापणे** – भयंकर गोष्टीमुळे हृदय व्याकूळ होणे; हृदयाला धक्का बसणे.

**चरचर–रा** क्रिवि. १. चिरण्याच्या आवाजासारखा आवाज होऊन. २. चरचरण्याच्या, गवत इ. कापण्याच्या आवाजासारखा आवाज होऊन : 'मग कंठनाळ चरचर तो सत्य करावया बिरुद कापी।'– मोकर्ण ४५. १४; 'धांवे कीं चरचरा नरा खावें।'– मोआदि ३०.२१. ३. भरभर बोलणे, लिहिणे, शिकणे या व यासारख्या इतर क्रिया व्यक्त करताना वापरतात. ४. पोळल्या – भाजल्याप्रमाणे वेदना देत : 'चरचर चुरचुर लागेना । ऐसें करावें ।'– दास १४.४.७.

वि. क्रिवि. तीक्ष्ण; तिखट (धार). (क्रि. लावणे, करणे.) [ध्व.]

**चरचरणे** अक्रि. १. चरचर आवाज करणे. २. पहा : **चरकणे**

**चरचरणे** अक्रि. तापणे; भाजणे.

**चरचरणे** अक्रि. भीतीमुळे घाबरणे; भांबावणे; गोंधळणे. [सं. जर्च]

**चरचरणे** अक्रि. झोंबणे : 'माधवच्या मनाला तिचे शब्द चरचरत होते.'– देश २२. [ध्व.] (वा.) **(एखाद्याचे) रान चरचरणे**– फार भूक लागणे.

**चरचराट** क्रिवि. चरचर आवाज करीत : 'मांजर होऊनियां ताट। चरचराट चाटीन मी।'– एभा ३७९.

**चरचरीत** वि. १. खरखरीत; भरभरीत; खुपणारे; जाडेभरडे (जीभ, वाळलेली पाने, वाळू, पीठ इ.). २. तिखट; झणझणीत; भाजणारे; झोंबणारे. ३. खरमरीत; ठसठशीत; स्पष्ट व खडबडीत (भाषण, हुकूम): 'पण तो बोलण्यात हुशार व चरचरीत होता.' – आपा ३७. ४. तिखट; तीक्ष्ण (धार).

क्रिवि. पुरेपूर; धडधडीत; निखालस; तब्बल; बरोबर; खास; नक्की.

**चरचारावून** क्रिवि. कडकपणे; तीक्ष्ण शब्दयुक्त : 'असें जरा चरचारावून बोलून सोडलें, की आतां तो खरें काय आहे ते आपल्याला सांगून टाकील.'– भदि ३४७.

**चरचीक** वि. तल्लख; हुषार; दक्ष; चुणचुणीत. (राजा.)

**चरचोंडा** वि. धडाडी, गवगवा, बोंबाबोंब करणारा; वल्गना, जल्पना करणारा; भकणारा; बोंबल्यागणेश; सर्व उघड करून दाखविणारा (मूर्ख माणूस). (को.)

**चरज्या** स्त्री. पहा : **चर**. चराची ज्या (परिघाचे दोन बिंदू सांधणारी सरळ रेषा). [सं.]

**चरट** न. चऱ्हाट; दोर; दोरी.

**चरटी** स्त्री. नारळाची करटी. (बे.)

**चरड, चरंडा** न.पु. कोंडा; भूस; भरडा; कण्या; न दळले गेलेले दाणे (जोंधळा, गहू यांचे).

**चरड(ढ)क** न. चघळपणाने बोलत राहणे; चर्पटपंजरी; पाल्हाळ. (क्रि. लावणे, करणे, मांडणे.)

**चरडणे** उक्रि. भरडणे (धान्य, भात); सालपटे काढण्याकरिता जात्यात घालून जाड दळणे; जाडेभरडे दळणे.

**चरडणे** उक्रि. सुरकुतणे; सुरकुत्या पडणे.

**चरडभरड** स्त्री. १. जाडेभरडे दळणे; चरडणे किंवा भरडणे. २. अशा रीतीने दळलेला. भरडलेला पदार्थ.

**चरण** पु. १. छंदाचा, वृत्ताचा एक भाग, पाद. २. चतुर्थांश (श्लोक, नक्षत्र, रुपया इ.चा). ३. अभंग इ. प्राकृत कवितेचे, गीताचे कडवे. ४. कुणबी समाजात हस्तनक्षत्राच्या या चार पादांना अनुक्रमे लोखंडी, तांबेरी, रुपेरी, सोनेरी असे म्हणतात. [सं.]

**चरण** स्त्री. १. गायरान; कुरण; गायरानातील गवत–जमीन. २. गुरे चरण्याबद्दल सरकारात द्यावी लागणारी रकम; चराई. चरण्याचा व्यापार; चरण्याची, खाण्याची क्रिया. ३. गुरांनी खाल्लेल्या गवताचे परिमाण.

**चरण** १. खांब. २. वेदशाखा. (वा.) ० **घेणे** – चौथाई वसूल करणे : 'पूर्वी रामदासपंतानें चरण बहुत घेतला होता व पीक अपरमित ते वेळेस होतें.'– ऐको ३६७.६८.

**चरण** पु. १. पाय. २. जोडा. (वा.) ० **लागणे**– घरी येणे; भेटणे; आगमन

होणे :'आपले चरण माझ्या वाडचास लागावे अशी इच्छा धरून...विनंती करतो.'- रत्नकांता १६. ० **धरणे, चरणी लागणे-** १. आश्रय घेणे; आश्रय करून राहणे. २. शरण जाणे; प्रार्थना, मिनतवाऱ्या करणे. ३. नमस्कार, वंदन करणे. ४. पैजारा. (ऐको.)

**चरणक** पु. (सास.) छंदोबद्ध ओळींचा स्वयंपूर्ण एकक, एक भाग.

**चरणचारिया, चरणचा(च्या)री** वि. १. पादचारी : 'तो कैवल्यनाथु चरण चारिया। पदें ठेवी जेआं वरियां।'- ऋव २२. २. पायउतार; पायदळ : 'वीरभद्र चरणच्यारी।'- उह १३५१.

**चरणचाल** स्त्री. १. पायी चालणे; गमन करणे. २. गती चालणाऱ्याची.

**चरणतळवट** न. तळपाय; बूड : 'अक्षयवीट चरणतळवटीं।'- भूवि २४.

**चरणतीर्थ** न. गुरु, महाराज इत्यादींच्या पायांचे तीर्थ. [सं.]

**चरणधूलि-ली-ळ, चरणरज** स्त्री.पु. १. पायधूळ : 'शिवादि चरणरज वांछित। त्या मज पाठविलें लिखित।'- एरुस्व ५.५३. २. पायांची धूळ; दासानुदास; पत्र लिहिणाराचा स्वतःचा नम्र उल्लेख. [सं.]

**चरणनिर्देशसूची** (ग्रंथ.) कवितेतील पहिल्या शब्दसमूहांची यादी.

**चरणरेषा** स्त्री. कवितेतील सामान्यतः प्रत्येक ओळीच्या शेवटी येणारी उभी रेघ : 'विरामचिन्हाऐवजी चरणरेषा वापरण्याचा प्रघातही येथे दिसतो.'- मवाइ १३१.

**चरणसंवाहन** न. पाय चेपणे; पाय चुरणे, रगडणे : 'सेज मी झाडीन। चरण संवाहन। मीचि करीन।'- ज्ञा १३.४२३. [सं.]

**चरणायुध** पु. कोंबडा.

**चरणी** स्त्री. सेवा.

**चरणे** अक्रि. १. (गुराने) गवत, पाला इ. खाणे. २. वेचणे; टिपणे (दाणे); खाणे (पक्ष्यांनी चारा). ३. (ल.) घर करणे; पसरणे; वाढत जाणे; चिडणे (व्रण, क्षत). ४. सारा दिवस काहीतरी खात असणे. ५. चीर पडणे; तडकणे. [सं. चर्]

**चरणे** अक्रि. १. गब्बर होणे; श्रीमंत होणे; पैसा कमावणे. २. वाढणे; जास्त होणे. [सं. चर्]

**चरणे** अक्रि. (लोकरीचे सूत, पेड) हातावर पिळणे; गुंडाळणे; वळणे. [सं.]

**चरदल** न. चर. पहा : **चरखंड**

**चरप** स्त्री. गाडीच्या चाकाचा मार. (व.)

**चरप** वि. तब्बल : 'तो मात्र चरप तीन तास'- गावा ५८.

**चरप** वि. महाग, तेज.

**चरपट्टी** स्त्री. लाकडी साच्याचा एक प्रकार. एका लाकडात खोल खाच घेऊन व दुसऱ्याच्या अंगाबाहेर पट्टी काढून एकमेकांत बसविणे.

**चरपरेपण** न. स्पष्टपणा; मोकळेपणा : 'गोष्टी मातेंत तों चरपरेपण दिसोन आलें.'- मइसा १.१०७.

**चरपूस** वि. श्रांत; दमलेला; थकलेला. (क्रि. होणे) (व.)

**चरपूस** पहा : **खरपूस** (ना.)

**चरप्रक्रिया** स्त्री. (शिक्षण.) एखाद्या प्रकियेतील विविध कृतींचा एकत्रित परिणाम म्हणून घडणारी अखेरची कृती.

**चरप्रतिष्ठा** स्त्री. देवमूर्तींची तात्पुरती प्रतिष्ठापना करणे. पहा : **अधिवासन**

**चरफड, चरफडाट** स्त्री. पु. धुसफूस; जळफळाट; तडफड; असंतोष.

**चरफडणे** क्रि. १. तळमळणे. पहा : **चडफडणे** : 'अमर अमृतातें सेवित। तेही चरफडित हरिदासा।'- एरुस्व १.७७. २. रागाने जळफळणे; रागावून बोलणे : 'त्याची नजर चरफडून परत फिरली.'- रानगंगा ७५. ३. कातावणे; धुसमुसणे.

**चरफी** स्त्री. जाड-भरड दळलेली कणीक.

**चरब** क्रिवि. बरोबर; ठाम; हमखास.

**चरब** वि. १. अतिशय भारी, जबर (दर, किंमत). २. जरब. [फा. जर्ब]

**चरबट** वि. मस्तवाल; उद्दाम : 'जे मायावी मात्रागमनीं चरबट इंग्रज आहे. यासी बहुत सावधपणे बोलून लौकर निरोप द्या.'- ऐको ३६८.

**चरबट** स्त्री. १. कंटाळवाणे भाषण; चऱ्हाट : 'इतक्या वेळ तिच्या...शब्दांनी लिहिलेले चरित्र वाचावयाचे आणि शेवटी आपले हे तुटक चरबट कशाला?'-पलकोघे ६०२.

वि. फाजील वटवट करणारा; चर्पटपंजरी लावणारा.

**चरबट** वि. १. ओबडधोबड; खरखरीत; चरचरीत : 'फरशांचा पृष्ठभाग साधारण चरबट माठीव असावा.'- तप ५५. २. जिभेला चरचरीत कठीण लागणारा (खाद्यपदार्थ). ३. तीव्र; तीक्ष्ण (धार, अपशब्द, निंदा, निर्भर्त्सना). ४. (ल.) हिकमती; शहाणा; कल्पक; वाचाळ; धूर्त : 'नेणती वऱ्हाडिणी चरबटा।'- एरुस्व १४.५९. ५. (ल.) बेचव, चव न समजणारी (जीभ). [सं. चर्ब, चर्बट]

**चरबट** स्त्री. उद्धटपणा; दांडगेपणा.

वि. उद्धट; दांडगा.

**चरबटणे** अक्रि. १. खरखरीत किंवा चरबट होणे (उदा. नागवेलीचे पान इ. खाल्ल्यामुळे जीभ, तोंड). २. पुळ्यांच्या, फोडांच्या, खवल्यांच्या योगाने खरखरीत, चरबरीत होणे (खरकटे, राख, माती चिकटून राहिल्यामुळे भांडी, हात वगैरे); कामाच्या योगाने खरबरीत, चरचरीत जाड होणे (हात). ४. ओरखडला, ओरबडला जाणे; खरडणे; खरचटणे; अस्ताव्यस्तपणे किंवा धुसफूस केल्याने फाटणे (शरीर, अवयव). ५. चाटून जाणे; घासून जाणे.

**चरबटणे** उक्रि. चरबीने माखणे; चरबी लावणे, लागणे : 'लवकरच नव्या चरबटलेल्या काडतुसांचे प्रकरण उद्‌भवले.'- सअस ४०७.

**चरबटणे** अक्रि. बडबडणे; वटवट करणे; चकाट्या पिटणे.

**चरबटणे** अक्रि. जोराने, धसमुसळेपणाने घासणे, घोळणे, चोपडणे, तासणे, रंधणे, छाटणे.

**चरबत्तर** क्रिवि. तर्र; थबथबीत (ना.)

**चरबदर** वि. आचरट; गबाळ्या. (व.)

**चरबने** क्रि. चपापणे; पळ काढणे.

**चरबर** वि. जाडेभरडे; रुक्ष; गरिबीचे (अन्न). पहा : **चरबट** [फा. चर्ब]

**चरबर, चरबरचरबर** वि. उद्धट; दांडगा; धीट.

**चरबरीत** वि. १. खरखरीत; खरबरीत; जाड; राठ. २. कठीण; टणक; अपक; नीट न शिजलेले (तांदूळ, भाजी).

**चरबी** स्त्री. प्राणिजन्य किंवा वनस्पतिजन्य स्निग्ध पदार्थ; मेद; वसा; माखण; ओशट; मांसाचे तेल. [फा. चर्बी]

**चरबेट** स्त्री. खाडीमध्ये आढळणारा एक मासा.

**चरम** वि. शेवटचा; अंत्य; अंतीचा; अंतिम; कनिष्ठ. [सं.]
**चरम** न. मुळांच्या अतिवृद्धीमुळे जमिनीस येणारा घट्टपणा, टणकपणा. (गो.)
**चरमकाठ** पु. जरीच्या काठाची एक जात. (नाशिक)
**चरमकोटी** पु. शेवटचा उपाय; अंतिम साधन. [सं.]
**चरमगती** स्त्री. मोक्ष.
**चरम प्रत्यय** (भाषा.) पदाच्या अंती येणारा प्रत्यय.
**चरमर** स्त्री. १. तिखटपणा; खमखमीतपणा; चरमरीतपणा. २. (ल.) बोचरेपणा; जहालपणा (भाषा इत्यादींचा); उद्धटपणा; दांडगेपणा. ३. चापल्य; चुणचुणीतपणा (भाषण इत्यादींचा).
**चरमरचरमर** क्रिवि. उद्धटपणाने; दांडगेपणाने; खरमरीतपणाने.
**चरमरीत** वि. १. मसाला घातलेले; खमखमीत; झणझणीत; चवदार; झोंबणारे. २. (ल.) चुणचुणीत; हुषार; तल्लख. पहा : **चरमर**[ध्व.]
**चरमरीत** वि. उद्धट; दांडगा; कठोर. [सं.]
**चरमस्थिति–ती** स्त्री. समाधिरूप अवस्था. [सं.]
**चरमुरणे** अक्रि. चडफडणे : 'सिंदळीचे चित्त परपुरुषावरी। पति चरमुरी रात्रंदिवस।'– तुगा ७१९.
**चरमूर्ति–र्ती** स्त्री. छबिना अगर दिंडीच्या वेळी मिरवण्यात येणारी लहान मूर्ती; उत्सवमूर्ती.
**चरवट** न. विशिष्ट आकाराचे मातीचे भांडे, पाळा.
**चरवण, चरवा** न. पु. १. कुरण; गायरान. २. गायरानाची जमीन. ३. गुरचराई; गुरे चारणीची मजुरी किंवा शुल्क.
**चरवणी** स्त्री. चारणे; खावयास घालणे : 'विषयांचे चरवणी। केली आयुष्याची गाळणी।'– तुगा २२.
**चरवा** पु. कोंडवाड्यातील गुरांची सोडबांध करणारा नोकर; गुराखी. (व.)
**चरवी** स्त्री. दूध काढण्याचे भांडे; कासंडी : 'गंगाळें चरव्या अनेक निवडी सोन्यारुप्यांची जडें।'– सारुह ३.४३. [सं. चरू][क. चरविगे]
**चरवी** स्त्री. मधाचे पोळे. (को.)
**चरवी** स्त्री. तटाला असलेले तोफांचे झरोके; तटाचा वरचा भाग : 'सुवर्णमय दुर्गे दिसती। चरव्या झळकती शेषफणाकृती।' – हरिवि २९.६४.
**चरवे** न. चारा; पशु, पक्षी इत्यादींचे खाद्य.
**चरवेदार** पु. गुराखी; मोतद्दार; जनावरांवर देखरेख करणारा, त्यांना चारून आणणारा नोकर. पहा : **चरवा**
**चरस** पु. दवासहित काढलेला भांगेच्या झाडावरील बोंडांचा मादक द्रव; एक मादक पदार्थ. (क्रि. पिणे, ओढणे.) याला 'हशीश' असेही नाव आहे. याच्या सेवनाने मेंदूला शिथिलता येते व अल्प प्रमाणात मायावी आभास होतात. [हिं.]
**चरस–सा** पु. कातड्याची पिशवी किंवा खलेती; मोठी, बादलीवजा चामड्याची पिशवी. [हिं.]
**चरसा** पु. १. कातडे (विशेषत: काळ्या गुराचे) २. दरसाल एक कातडे असा चांभारावर बसवला जाणारा कर. [हिं.]
**चरळ** स्त्री. ओळ; पंक्ती; मालिका : 'होतो निंदा परि ह्या लावित शब्दाच्या चरळा।'– देप ९९.
**चरंती** पु. लिंगायतांच्या मठांतील एक अधिकारी.
**चरंदोजी** चुण्या घातलेले कातडे. [फा.]
**चरा** पु. १. ओरखडा; रेषा; घासल्यामुळे पडणारी रेषा. २. खांडा; खांड (शस्त्राच्या पात्याचे).
**चरा** स्त्री. पाणी ओढण्यासाठी विहिरीवर आडवा टाकतात तो खांब : 'उभी ग रहेली चरेवरी...'– लोसाको.
**चराई** स्त्री. १. गुरे चारण्याचे रान. २. गुरांच्या चरण्याबद्दल द्यावा लागणारा पैसा; कुरणाचे भाडे; चरणावळ. ३. गुरे राखण्याबद्दल देण्यात येणारी मजुरी; राखणावळ : 'जंगल संरक्षण, चराई, तरवड, शेण्या वगैरेंचा लिलाव.'– गावगाडा ५५.
**चराचर** न. १. स्थावरजंगम वस्तुजात; सजीवनिर्जीव सृष्टी; अखिल विश्व : 'प्रसवतसे अक्षर। म्हणवूनि हे चराचर। ब्रह्मबद्ध ।।'– ज्ञा ३.१३६. २. जगातील लोक; जग; जनता : 'गंधर्व अग्नि सोम भोगिती कुमारी। कोठें चराचरी त्याग केला।'– तुगा २२५०.
वि. सजीवनिर्जीव; चलाचल; हलणारी व न हलणारी; स्थावरजंगम. (वस्तू, गोष्ट इ.). [सं.]
**चराचर** स्त्री. परंपरा; पिढ्यानुपिढ्या चालत आलेली रीत, वहिवाट. वि. परंपरागत असा.
**चराच(च्च)र–रा, चरारा** क्रिवि. १. टराटर; जोराने फाडताना, चिरत असताना जो आवाज होतो तसा आवाज होऊन. २. फुटणाऱ्या, मोडणाऱ्या मोठ्या तडतड किंवा कडकड आवाजाचे उद्बोधक. ३. बेपर्वाई, आवेश, त्वरा यांचे निदर्शक. (क्रि. खाणे, बोलणे, लिहिणे, वाचणे.) पहा : **चरचर** [ध्व.]
**चराचरपति–ती** पु. स्थावरजंगम वस्तूंचा स्वामी, नियंता; ईश्वर. [सं.]
**चराचरेश्वरवाद** पु. (तत्त्व.) निसर्गनियम, नैसर्गिक शक्ती आणि ईश्वर यांच्यात तादात्म्य असते असे मानणारे तात्त्विक मत. [सं.]
**चराट–ड–डी** न. चऱ्हाट; जाड दोर. पहा : **चऱ्हाट**
**चराडणे** अक्रि. अतिशय चरचरणे.
**चरारणे** अक्रि. दचकणे; घाबरणे; चरकणे : 'ह्यांनी माझ्यावर डोळे रोखले. मी चरारले.'– अहेअहे ३२८.
**चराऽरा** क्रिवि. गचकन : 'बुट्टी दिली की चराऽरा वाकती.'– खळाळ ३८.
**चरार्ध** पहा : **चर, चरखंड** [सं.]
**चराल–ळ** क्रिवि. जोराने; धो धो; संतत. (व.) [सं. चर्]
**चरांचर– चरात्चर, चरारा** क्रिवि. न अडखळता (लिहिणे, वाचणे, बोलणे).
**चरांट** न. चऱ्हाट; जाड दोर.
**चरांटचे** उक्रि. आवळणे. (गो.)
**चरांडी** स्त्री. कागद, वस्त्र इत्यादींची चीर, भेग.
**चरित** न. १. आचरण. पहा : **चरित्र** : 'चरित मुकुंदाचे।' – वच्छह ४९६. २. कथा; गोष्ट. ३. कीर्ती; प्रभाव : 'पदें चरित दाविजे त्रिजगदब्जकीलालसें।'– केका १९. ४. जाणे. [सं.]
**चरित** न. सिद्ध; सफल : 'घटिकेचीया जिज्ञासा तुझे अट अवघेचि चरित होईल'– स्मृस्थ २५१. [सं.]
**चरितार्थ** पु. १. (कामाची, धंद्याची) सिद्धी; संपादणी; हेतू साध्य, सफळ

होणे, शेवटास जाणे; इच्छा तृप्त होणे. २. कशीतरी सार्थकता; शेवट. वि. सिद्धीस, गेलेला; लागू पडलेला; पूर्ण केलेला; अभिप्रेत या अर्थी स्वीकार केलेला (नियम, विधी, आज्ञा); समाधान पावलेला; तृप्त झालेला (मनुष्य) : 'आउवेचें पींडप्रदान एथौनि चरितार्थ गा।' – लीचउ ५१. [सं.]

**चरितार्थ** पु. उदरनिर्वाह; पोटपाणी : 'स्त्रियांनी घरची कृत्ये संभाळावीं आणि पुरुषांनी पराक्रम करून दोघांचा चरितार्थ चालवावा.' – गुमं. (क्रि. चालवणे.) [सं.]

**चरित्र** न. १. विशिष्ट व्यक्तीचा आयुष्यक्रम वर्णन करणारा ग्रंथ. व्यक्तीच्या आयुष्यात घडलेल्या गोष्टींचा वृत्तांत. २. चरित; आचरण; वर्तन : 'ये दशे चरित्र केलें नारायणें।' – तुगा ८५. ३. अवस्था; स्थिती; प्रकार : 'जाणोनि चरित्र जवळीच होता। आली अनंता कृपा मग।' – तुगा १०९. ४. देवांचे, वीरांचे पराक्रम; महत्कृत्ये; मर्दुमकीची कामे. ५. इतिहास; कथा; गोष्ट; प्रकार : 'ते गुणभेदचरित्र। ऐसें आहे।।– ज्ञा १८.५२३. ६. कर्तव्य (क्रि. करणे, पाळणे.) [सं. चरित] (वा.) **चरित्र दाखविणे** – चुणूक दाखविणे; इंगा दाखविणे : 'अशा स्थितींत बाळाराम शेट याजला कांही चरित्र दाखववावे.' – ऐको ३६८.

**चरित्रअभिनेत्री** स्त्री. नाटकात वा चित्रपटात नायिकेव्यतिरिक्त एखादी वैशिष्ट्यपूर्ण, वेगळी, लक्षवेधक भूमिका करणारी नटी. '(बाई) चरित्रअभिनेत्री म्हणून ओळखल्या जाऊ लागल्या आहेत.' – स्मगा १३३.

**चरिंदा** पु. १. वैरण; घोड्याचे, गुराचे खाद्य; दाणा व चारा : 'पगार व चरिंदा वगैरे खर्च...' – स्वारी-नियम (बडोदे) ५६. २. (सामा.) कुरण; कडबा; गवत. ३. गायरानात गुरे राखण्याबद्दल द्यावा लागणारा पैसा. ४. खाद्य : 'माशांना चरिंदा म्हणून शिजलेला भात पाण्यात टाकतात.' – माआ १९६. [फा. चराइन्द]

**चरी** स्त्री. लहानसा चर; खंदक; खाच; मोरी; नहर; गटार. (को.) [चरकापासून अल्पत्वदर्शक]

**चरी** स्त्री. पौळीला वरच्या बाजूस असलेले बदामाच्या आकाराचे उभे दगड : 'आणि दाइंबासि स्तीति जाली : ते दुर्गावरि चरीयांचरीयां धावों लागले :' – लीचपू १३६.

**चरी** स्त्री. लोकर किंवा सूत हातावर वळून केलेली दोरी; जुन्या कपड्यांची पट्टी, चिंधी, दोरी इत्यादी : 'ती (चिटोऱ्यांची गाठोडी) चऱ्या-सुतळ्यांनी बांधलेली होती.' – हातभट्टी १३.

**चरी** स्त्री. पंजाबात होणारी जोंधळ्याची एक हलकी जात.

**चरी** स्त्री. चरवी; तांब्यापेक्षा मोठे भांडे : 'माय तुन दूध पिनू चरी चरी माऊलीना उपकार कधी फिटी सिरीहरी' – गि ४. (अहि) (व.)

**चरीव** न. १. गुरचरण; कुरण; गायरानाची जमीन. २. घास; गवत. (को.) पहा : **चरगण**

**चरु-रू** पु. १. शिजवलेले तांदूळ; भात २. पिशाच्च्याला अर्पण करण्यासाठी शिजवलेला भात. (गो.) ३. पिंड (भाताचे) : 'मंत्राच्या योगाने चरू सिद्ध केला.' – लोसंक्षि ३९. [सं.]

**चरुचमकुरा** पु. एक प्रकारची भाजी; अळू : 'चवळी कवळी चरुचमकुरा।' – अमृत ६२. पहा : **चमकुरा** [सं. चरु+त, चमकुरा]

**चरुस्थाली** स्त्री. १. भात ठेवण्याचे भांडे; हवि, आहुती ठेवण्याचे पात्र. २. स्वयंपाक; पाकनिष्पत्ती; पाकक्रिया. [सं.]

**चरू** पु. तांब्या. (का.)

**चरोळे** न. तूप ठेवण्याचे, रोगण दिलेले मडके, मातीचे पात्र; लाखलोटी.

**चर्क** न. होकायंत्र. (गो.) [सं. चक्र]

**चर्काखर्का** पु. चरका; चटका : 'रंभा कीं उर्वशी उमटल्या चर्काखर्का गेली लाऊन।' – पला ४.३७. [चरका द्वि.]

**चर्खी** स्त्री. धार लावण्याचे चाक.

**चर्च** न. १. ख्रिस्ती उपासना मंदिर. २. ख्रिस्ती महामंडळ, मंडळी. [इं.]

**चर्चक** वि. वादविवाद करणारा : 'म्हातारी जीज्ञासक। म्हातारी चर्चक।' – मसंत ८५.

**चर्च(र्चि)णे** उक्रि. उहापोह करणे; चर्चा करणे : 'ज्या देवा स्तविताति वेद समुदे शास्त्रें जया चर्चिती।' – निमा १.७. [सं. चर्च]

**चर्च(र्चि)णे** उक्रि. १. फासणे; चोपडणे; माखणे (चंदन, राख). २. उटी लावणे : 'चंदनातें कायसेनि चर्चावें।' – ज्ञा १०.१२. [सं. चर्च]

**चर्चन** न. १. चर्चणे; लेप देणे; चोपडणे; माखणे (चंदन, राख इ.). २. लेप; उटी : 'चिता भस्माचे चर्चन त्याच्या...' – तीम ८१. [सं.]

**चर्चरा** वि. टणक.
क्रिवि. दरदरून (घाम येणे.) (झाडी)

**चर्चराट** पु. कापण्याचा, चिरण्याचा चरचर असा आवाज : 'चरचरित चचारी चर्चराटें चरारी।' – दावि २७८. [ध्व.]

**चर्चरी** स्त्री. चरचरी; मनातील चुटपुट; काळजी : 'उगाचि व्यर्थ चर्चरी।' – दावि ७७६.

**चर्चरी** स्त्री. एक प्रकारचा वेल. (गो.)

**चर्चा** स्त्री. १. वादविवाद; खल; ऊहापोह; वाटाघाट; उत्तरप्रत्युत्तर. २. विचारमंथन. [सं.]

**चर्चा** स्त्री. १. प्रासंगिक उल्लेख; वारंवार उच्चारणे. (क्रि. निघणे.) २. वार्ता; बातमी. ३. (देवादिकांच्या) अवताराचे, महत्कृत्याचे, पराक्रमाचे वर्णन, निरूपण, कथन. ४. एखाद्याच्या पाठीमागे केलेली निंदा. ५. दोन्ही बाजूंच्या व्यक्तींनी आलटूनपालटून म्हणणे (पद, चरण, श्लोक इ.); गवयांनी एकत्र गाणे. [सं.]

**चर्चा** स्त्री. चर्चन; लेप देणे; उटणे.

**चर्चापाठ** पु. (शि.) विद्यार्थ्यांच्या सहयोगातून प्रकट विचार, खल, वाटाघाट, मुद्देसूद विवेचन, वादविवाद यांच्या साहाय्याने अध्यापन करण्याची पद्धती.

**चर्चासत्र** न. एखाद्या विषयाची सांगोपांग चर्चा करण्यासाठी विचारांचे, माहितीचे आदानप्रदान करण्यासाठी बोलावलेली सभा; बैठक : 'त्यांनी ... कोणत्या चर्चासत्रांमध्ये भाग घेतला....' – विशा २७५. [सं.]

**चर्चिका** स्त्री. अभ्यासाच्या पुस्तकातील खुलासा; टीपा : 'तीत पुस्तकांपेक्षा चर्चिकांचेच माहात्म्य...' – खर्डेघाशी १७.

**चर्चित** वि. माखलेले; चोपडलेले; लिप्त. [सं.]

**चर्पट** पहा : **चरपट** [सं.]

**चर्पट** पु. एक गाणारा पक्षी : 'जणु पक्षांतील गवयांची मैफलच भरली होती... लकेरे, बुलबुले, चर्पट...' – आआशे ३४०.

**चर्पटिका** स्त्री. १. एक वृत्त. २. निरूपण; लांबलचक वायफळ भाषण; चर्पटपंजरी. ३. अलंकृत, सुसंस्कृत, प्रौढ, भारदस्त वाक्य. [सं.]

**चर्ब** वि. १. प्रभावशाली; वरचढ : 'आपण साऱ्यांवर चर्ब असावें.' – रापु ५.१३७. २. स्निग्ध; मृदू : 'मस्लहतीचे मार्गे आलीजाह चर्ब पडतील असें दिसत नाहीं.' – ऐको ३६७. ३. गालीब. [फा.]

**चर्बट** वि. वाचाळ : 'तेथ साळेया पुसे चर्बट : ते वसता कैवारू करिते भाट' – रुस्व ७४९. [सं.]

**चर्बण** न. चर्वण; चावणे : 'अपुले वोंठा चर्बण करिती।' – क्रिपु २.४४.५५. [सं. चर्वण]

**चर्म** न. १. कमावलेले कातडे; चामडे : 'चर्म रंगू लागे रोहिदासासंगे।' – तुगा ३६९१. २. साल; वरील आवरण; त्वचा. ३. ढाल : 'खड्गचर्म देई आणोन।' – जैअ ३१.३२. [सं.]

**चर्मक, चर्मकार** पु. चांभार; मोची; जोडे शिवणारा; : 'नाम न म्हणे ज्याचें तोंड तेचि चर्मकाचें कुंड' – तुगा २५०८. [सं.]

**चर्मका** स्त्री. पखाल : 'चौमुखिया चर्मका जळपूर्णा।' – कृमुरामा २७.९८.

**चर्मकाम** न. चामड्याच्या वेगवेगळ्या वस्तू बनवणे.

**चर्मकील** पु. चामखीळ. [सं.]

**चर्मकुंड** न. कातडी भिजत घालण्याची चांभाराची कुंडी.

**चर्मचक्षु–क्षू, चर्मदृष्टि–ष्टी** पु. स्त्री. पाहण्याचे डोळे; व्यावहारिक पदार्थांचा बोध होणारे डोळे; दृश्य भौतिक डोळे; दृष्टी; पाहण्याची शक्ती.

**चर्मचोर** पु. व्यभिचारी पुरुष : 'ना तरी परद्वारी चर्म चोरु : सांपडलेला' – ज्ञाप्र १०५४. [सं.]

**चर्मदंड** पु. (संकेताने) शिस्न; लिंग. [सं.]

**चर्मधन** न. मेंढरे, घोडे, बैल इ. जनावरे हेच धन. [सं.]

**चर्मपत्र** न. लिहिण्यासाठी कमावून तयार केलेला कातडी कागद. [सं.]

**चर्मपादुका** स्त्री. पायातील जोडा; वहाण. [सं.]

**चर्मफराश** पु. कमावलेली कातडी व चामडी यांचा व्यापार करणारा.

**चर्मरंध्र** न. (जीव.) त्वचेवरील सूक्ष्म छिद्र. [सं.]

**चर्मवाद्य** न. चामड्याने मढविलेले वाद्य; पखवाज, नगारा, तबला, डग्गा इ. [सं.]

**चर्मशोधन** न. (शाप.) कच्ची कातडी कमावणे. [सं.]

**चर्मांतु–तू** न. कातडे : 'नाहीं नाहीं चर्मांतु। कृष्णाजिन व्याघ्रांबर।।' – तुगा ४५४.

**चर्मिकी** स्त्री. चांभारीण : 'मातंगीचें नाम तुळशी। चर्मिकेचें नाम काशी।' – दास १४.१०.१५. [सं.]

**चर्मिल चिवट** वि. (वन.) चामड्यासारखे चिवट. उदा. वड, रबर, आंबा इत्यादींची पाने.

**चर्मी** वि. चामड्याचा, कातड्याचा (जोडा इ.).

**चर्मीना** वि. कातड्याचे; कातड्यापासून बनवलेले.

**चर्या** स्त्री. १. पद्धत; चाल; रीत; तऱ्हा; आचरण. २. विहित कर्मांचे, रूढीचे सतत आचरण, पाळणूक. ३. वहिवाट; व्यवहार : 'चर्या हे नुमजे त्या मतिमंदा।' – दावि ४६७. [सं. चर्.]

**चर्या** स्त्री. रचना; बांधणी; तटाच्या फळ्या : 'उभारिली दारवंटे फांजी। कोटी चर्या माजीं शोभलिया।' – तुगा १००.

**चर्या** स्त्री. संचार; गमन.

**चर्या** स्त्री. लीला; पराक्रम : 'हे असो दासाची अगाध चर्या।' – दावि ४६७.

**चर्या** स्त्री. परिस्थिती : 'आई वारल्यानंतर घरात एकंदर चर्या बदलली.' – पलकोघे २१२.

**चर्या** स्त्री. युक्ती; मसलत : 'अवघ्या मानली हे चर्या। म्हणती प्रगट बोलूं नका।' – पांप्र ८.९७.

**चर्या** स्त्री. मुद्रा; चेहरा; रूप; तोंडवळा; तोंडाची घडण; (रोगी किंवा निरोगी) चेहऱ्यावर किंवा मुद्रेवर असणारी कळा, छटा, चिन्ह, तेज. [सं.] (वा.) ० **पालटणे, बदलणे** – चेहऱ्यावर टवटवी येणे, तजेला दिसू लागणे (आजारीपणानंतर); चेहऱ्यावरील विकार बदलणे; काळवंडणे (अपराधाच्या, भयाच्या जाणिवेमुळे).

**चर्र** वि. क्रिवि. फाटताना, चिरताना, भाजताना, डागताना जो आवाज होतो तसा आवाज होऊन.

न. भीतिदायक गोष्ट पाहिल्यामुळे बसणारा धक्का किंवा होणारी वेदना; धसका; पोटात गोळा उठणे : 'तेथे गर्दी नसलेली पाहून मला चर्र झाले.' – कोआत्म १५. [ध्व.]

**चर्वण** न. १. चावणे; चघळणे; दातांनी बारीक करणे; रवंथ. (क्रि. करणे.) २. चावण्याचा पदार्थ (भाजलेले धान्य इ.). [सं.]

**चर्वणा** स्त्री. १. एखाद्या गोष्टीविषयी आपले मत चढत्या स्वराने, जोराने पुन: पुन्हा उच्चारणे; पुनरुच्चारण. २. वाटाघाट करताना, हुकूम सोडताना इ. निरर्थक पुनरुच्चारण; अनेक शब्दप्रयोग करून तीच गोष्ट वारंवार सांगणे; (निंदार्थी प्रयोग) काथ्याकूट. ३. सर्व प्रकारची भाषणशैली वापरणे; युक्तिवाद लढविणे. [सं.]

**चर्वणा** स्त्री. १. रवंथ करणे. २. एखाद्या ललित कृतीचा घोळून घोळून आस्वाद घेणे. [सं.]

**चर्वणे** उक्रि. चावणे; चघळणे. [सं. चर्वण]

**चर्वित** वि. चावलेला; चघळलेला; रवंथ केलेला (पदार्थ). [सं.]

**चर्वितचर्वण** न. १. चघळलेले पुन्हा चघळणे; चावलेले पुन्हा चावणे. २. (ल.) काथ्याकूट; निष्फळ, रसहीन चर्चा; रिकामी पुनरुक्ती; निरर्थक पुनरुच्चारण (विनंती, हकीगत, गोष्ट वगैरेचे) : 'तुच्छें चर्वित चर्वणोपम सुखें जीं तीच तीं भोगितां। संसारीं न तिरस्कृती उपजते हे कोण निर्लज्जता।।' – वाश्लो ६७. [सं.]

**चर्वेदार** पु. मोतद्दार. पहा : **चरवेदार** : 'वोपुनि तुरंगा चर्वेदार करी।' – दावि २८०.

**चर्वो** पु. चोरीचा व्यवहार. (गो.)

**चऱ्हा** पु. १. घासल्यामुळे पडलेला ओरखडा. २. चाकू, सुरा, तरवार यांच्या पात्याला पडलेले खांड. पहा : **चरा**

**चऱ्हाट** न. १. दोर; जाड दोरी, दोरखंड. २. (ल.) चर्पटपंजरी; पाल्हाळ; कंटाळवाणे भाषण. (क्रि. वळणे, लावणे.) : 'अहमद याप्रमाणे

'आपलें लांबलचक चऱ्हाट वळीत असताना दोन घटका निघून गेल्या.' – उष:काल [सं.चृत+वराट]

**चऱ्हाटकाणी** स्त्री. बैलाच्या गळ्यात बांधायची चऱ्हाटे, दावे, दोरखंड : 'सालाकाठी बैतकऱ्याला चऱ्हाटकाणी दिली की मांगाचे काम झाले.' – बाब १५.

**चल** पु. चाल; हल्ला (क्रि. देणे, करणे) : 'जाणों दारिद्र्यावरि निधिनीं सज्जन बळेंचि चल केला।' – मोअश्व ४.८६.

वि. १. हलणारे; चालू असलेले; गतिमान; जंगम. २. विनाशी; क्षणिक; चंचल; अस्थिर. [सं.]

**चल** (ग.) एखाद्या संचातील कोणत्याही घटकाची किंमत धारण करणारी राशी. [सं.]

**चलक** स्त्री. पावसाची सर.

**चलकर्ण** पु. पृथ्वीपासून ग्रहापर्यंतचे अंतर.

**चलकंप** पु. कापरे; थरकाप. [सं.]

**चलका** स्त्री. अव. झुंड; घोडदळाची धावाधाव किंवा दाणादाण : 'फौजेच्या चलका सुटल्या, तेव्हां सरदारांनी काय करावें ! कोणास कोणी पुसेनासें झाले.' – ऐको ३६८.

**चलकूच** स्त्री. सैन्याची चालकूच वगैरे; हालचाल; गडबड : 'आधींच बापू सत्वर जबाब देत नाहींत. त्याहीमध्यें चलकुचीकरतां जबाबास फारच विलंब लागतो.' – पेद ६१६७.

**चलखाई, चलखपणा** पहा : **चलाखी** : 'वैय्याकरणाच्या दृष्टीस जे तिचे दूषण प्रकार दिसतात तेच तिच्या अंगी अर्थव्यंजकता, माधुर्य, चलखपणा वगैरे गुण आणणारे असतात.' – नि १२१.

**चलगोजा** पु. १. पिस्त्याप्रमाणे एक कवचीचे फळ. २. मोगली एरंडाची बी : 'तेथील राहणार दिव्याचे ऐवजी चलगोजेच जाळतात.' – भारत ६९. [फा.]

**चलगोपालेख** पु. विमा; हमी.

**चलचल, चलचलाट** स्त्री. पु. १. चलती; भरभराट; अनुकूल काळ. २. अधिकार; वर्चस्व; वजन. [सं. चल्]

**चलचलाव** पु. गडबड; घालमेल; घोटाळा; चळवळ; हालचाल : 'शत्रूची बातमी राखीत आसों त्यासी चलचलाव झाला तरी स्वामींचे पुण्य समर्थ आहे.' – पेद २४.३६. ३. दळणवळण; राबता : 'शिंदे यांजकडे कुंजर यांचा चलचलाव फार आहे.' – ऐको ३६९.

**चलचित्र** न. (शि.) मूलत: स्थिर असणारी पण क्रमश: खंडितपणे पडद्यावर प्रक्षेपित केल्यावर सलग हालचालींचा आभास निर्माण करणारी चित्रांची मालिका. अध्यापनाचे साधन म्हणून या शैक्षणिक चलचित्रांचा उपयोग केला जातो. पहा : **चलत्‌चित्र** [सं.]

**चलचित्रदर्शक** पु. प्रारंभकाळातील चित्रपटप्रक्षेपक.

**चलटा** पु. एक सुंदर फळझाड. याला पांढऱ्या रंगाची फुले येतात. याचे फळ नारळाएवढे मोठे असते.

**चलण** न. चालचर्या; वर्तणूक : 'मल्हारपंत आमची नालस (चहाड्या) नानाप्रकारे लिहितील त्यास (म्हणून) आपला येक कारकून येथे पाठवावा. तो सर्व चलण पाहोन जाईल.' – ऐको ३६९.

**चलण** पु. वज्रमुष्टीचा व्यायाम. उभे राहून क्रमाने एक एक पाय व त्याच बाजूचा हात जमिनीवर पुढे टेकून करावयाचा व्यायाम.

**चलणे** अक्रि. १. निघणे; सुटणे; चालायला लागणे; प्रवासाला आरंभ करणे; जायला निघणे. (सहवर्तमान, पुढे, मागे यांबरोबर प्रयोग. बहुधा विध्यर्थी, क्वचित भविष्यकाळी.) २. चालू ठेवणे : 'श्री विठला रायासि आचंद्रार्क पांडा चलावेया दत्त ग' – पांढर शिला ३.४४.[सं. चलन]

**चलता** स्त्री. गतिशीलता; चलनशीलता.

**चलतापाणी** न. चेंडूने खेळावयाचा एक खेळ.

**चलतापुर्जा** पु. १. यंत्राचा सुरळीत चालणारा भाग. २. (ल.) चालू माणूस; कुठल्याही परिस्थितीत, वातावरणात चपखल बसणारी व्यक्ती.

**चलती** स्त्री. १. भरभराट; उत्कर्ष; अभ्युदय; सुकाळ; चांगले दिवस : 'खायावांचून बैल दमले कर्जबंदी झाला चलतीचे सोयरे धायरे कोणी पुसेना याला।' – पला ८६. २. अंमल; वजन; वर्चस्व; सामर्थ्याचा किंवा अधिकाराचा काळ.

वि. चालू; उपयोगात असणारे; लागणारे. [सं.चल]

**चलती** स्त्री. प्रवेश; रिघाव; प्राप्ती.

**चलतीदप्तर** न. चालू व्यवहाराला लागणारे दप्तर.

**चलती हुंडी** हुंडीचा प्रकार : 'ग्वाल्हेरची– हुंडी चलती होत होती त्यास त्याणे नको म्हणाला. ठिकाणबंद झाशीची हुंडी देववावी म्हणोन बोलला.' – ऐलेसं ३९५०.

**चलते नाणे** (ल.) काही मूल्य असलेला विषय, वस्तू, विचार इत्यादी; महत्त्वाचा वाटणारा विषय, लोकव्यवहारात मान्य होणारा विचार : 'आजच्या युगांतील कुठच्याहि शिक्षित व बुद्धिमान् माणसाच्या मनांतली ही चलती नाणीं आहेत.' – खपा २००.

**चलत् चित्र, चलत् चित्रपट** न.पु. हालचाल करणाऱ्या चित्रांचा देखावा; सिनेमा; चित्रपट : 'चलत्‌चित्रपटातील प्रसंगाप्रमाणे त्याच्यासमोर घटना व प्रसंग सारखे धावत असतात.' – रचि प्रस्ता. [सं.]

**चलत्रिज्या** स्त्री. सूर्याच्या मध्यबिंदूपासून ग्रहाच्या मध्यबिंदूपर्यंत कल्पिलेली रेषा : 'सूर्य व ग्रह यांस साधणारी जी एक रेषा कल्पितात, त्या रेषेला 'चलत्रिज्या' किंवा मंदकर्ण म्हणतात.' – सुज्यो ३१०.

**चलदृश्य** न. संचलनाच्या किंवा मिरवणुकीच्या प्रसंगी चालत्या वाहनावर दाखवला जाणारा देखावा.

**चलन** न. १. चालू नाणे; नाण्याची चाल, प्रकार, वहिवाट; देवघेवीत उपयोगी पडणारी नाणी, कागद इत्यादी. २. पैसे मिळाल्याची चिठी, पावती; चलान. [सं.]

**चलन** न. १. चालणे; जाणे; निघून जाणे; वाटेला लागणे. २. चालणूक; वागणूक : 'चिंतामणी किण्यांचें चलन चांगले नव्हतें.' – विक्षिप्त ३.६७. ३. (शाप.) पदार्थाची एका स्थानापासून दुसऱ्या स्थानाकडे जाण्याची क्रिया. [सं.]

**चलन** न. (वाणिज्य) विनिमय व्यवहारात विनिमय माध्यम म्हणून कायद्याने ठरविण्यात आलेले नाणे, नोट.

**चलन** स्त्री. रूढी; प्रथा. (झाडी) [हिं.]

**चलन अवमूल्यन** (वाणिज्य.) परकीय चलनाच्या संदर्भात स्वकीय

चलनाचे कमी केले गेलेले मूल्य.

**चलन एकक** (वाणिज्य.) विनिमय व्यवहारातून वस्तूच्या मूल्यमापनासाठी प्रमाणभूत ठरविलेले प्रधान वा मुख्य मानक. भारतात रुपया हे मापनाचे मुख्य एकक आहे.

**चलनतारा** पु. (नृत्य) डोळ्यांनी बुबुळे या बाजूकडून त्या बाजूकडे सारखी हलवीत राहणे. हा अभिनय वीर व रौद्ररसद्योतक असतो. [सं.]

**चलनफुगवटा, चलनवृद्धी** पु. स्त्री.(वाणिज्य.) आत्यंतिक किंमतवाढीस कारण होणारा चलनातिरेक.

**चलनवलन** न. चालणे; हलणे; सरकणे; हालचाल करणे; जिवंत प्राण्याची चुळबूळ, हालचाल. [सं.]

**चलनवाढ** स्त्री. (अर्थ.) नोटा, नाणी इत्यादींच्या निर्मिती प्रमाणात केलेली वाढ :' 'आंधळेपणाने चलनवाढ करीत राहिल्यास... भाववाढीचा धोका असतो.' – कराअ १३.

**चलन विनिमय** (वाणिज्य.) देशादेशांतील चलनांची पूर्वनिश्चित दरानुसार केली जाणारी अदलाबदल.

**चलनविस्तार** पु. (अर्थ.) वाढत्या अर्थव्यवहारासाठी शासनाने चलनाच्या पुरवठ्यात केलेली वाढ.

**चलनशील–क्षम** वि. आतील किंवा बाहेरील चेतकामुळे हालणारे अथवा स्थानांतर करणारे.

**चलनाट्य** न. ऐतिहासिक, सामाजिक देखावे वगैरे असलेली बहुरंगी मिरवणूक. [सं.]

**चलनी** वि. चलनात, वापरात असणारे; बाजारात चालणारे; चालू (नाणे). (समासात) गावचलनी, पेठचलनी, बाजारचलनी, सरकारचलनी, चलनीनोटा. (वा.) ० **नाणे** – व्यवहारात किंमत, मागणी, मान्यता असलेली गोष्ट : 'पण हे चलनी नाणे सर्रास चालविण्याच्या मोहाने अनेक नाटककार तथाकथित 'श्रम विषयात' फारच गढून गेले.'– क्रेबु १८०.

**चलनी** स्त्री. छोटी, हलकी तोफ.

**चलनी नोट** (वाणिज्य.) नाण्याच्या ऐवजी चालणारी त्याच किंमतीची कागदी नोट.

**चल परिव्यय** (वाणिज्य.) कच्चा माल, वेतन, वीज, कोळसा इत्यादींवर होणारा आणि प्रत्यक्ष उत्पादनाशी निगडित राहून उत्पादन वाढीबरोबर बदलत जाणारा खर्च.

**चलपुंजी** स्त्री. फिरते भांडवल [सं.]

**चलफल** न. बाह्य ग्रहांचा वार्षिक स्थानभेद व अंतस्थ ग्रहांचे इनापगम (सूर्यापासून अंतर). [सं.]

**चलबिचल** स्त्री. १. अनिश्चितता; अस्थिरता; अनित्यता; अस्थायित्व; द्विधा मन:स्थिती : 'शंका आल्या असतील म्हणून थोडी चलबिचल झाली.'– श्रीयो ३४१. २. धरसोड; इधरतिधर.
वि. चंचल; अस्थिर; अस्थायी; अनिश्चित; अनिर्णित. [सं.]

**चलबुलाई, चलबुलावणी** स्त्री. त्रासदायक किंवा अधिकाराने केलेले बोलावणे; तातडीचे बोलावणे; समन्स.

**चलमाध्य** न. अस्थिर सरासरी.

**चलमोगरा** पु. एक औषधी वनस्पती.

**चल यारी** (स्था.) एका जागेवरून दुसऱ्या जागेवर वाहून नेता येईल असे, जड वजने उचलणारे यंत्र, यारी.

**चलराशि–शी** स्त्री. उत्तरायण संपात सुमारे ७२ वर्षांत १ अंश याप्रमाणे क्रांतिवृत्तातून पश्चिमेकडून वळत असतो. या चलसंपातापासून राशिचक्राचे होणारे तीस तीस अंशांचे भाग. [सं.]

**चल लोकसंख्या** कायम एका ठिकाणी वास्तव्य नसलेला जनसमूह; अस्थायी लोकसंख्या.

**चलवादी** वि. १. भांडखोर; छटोरा; एक बायकी शिवी. (व.) २. चवचाल, नखरेल (स्त्री.)

**चल वेग** कमीजास्त होणारा वेग.

**चलसंक्राति–ती** स्त्री. सूर्याला राशिक्रमणाला लागणारा काळ; सौरमास. पहा : **चलराशि–शी** [सं.]

**चलसंपत्ती** स्त्री. अस्थिर मालमत्ता.

**चलसोपान** पु. सरकता जिना.

**चलाई** स्त्री. पायपीट; प्रवास. (झाडी) [हिं.]

**चलाऊ–ऊ** वि. चालण्यासारखा; चालढकल करण्यासारखा; काम भागविण्यासारखा; वेळ निभावून नेण्यासारखा : 'साऱ्यांच्याच कडा जीवनाच्या चलाऊपणाने बोथट झालेल्या आपणास जाणवतात.'– जास्वंद २०.

**चलाख–क** वि. हुशार; चाणाक्ष; पाणीदार; धूर्त; तरतरीत; तल्लख; चपळ. [फा. चालाक]

**चलाखी–की** स्त्री. १. तल्लखपणा; चपळपणा; धूर्तता; हुशारी; चाणाक्षपणा. २. नजरबंदी; दिशाभूल; फसवणूक; हातचलाखी.

**चलाचल** वि. १. चल व अचल; स्थिर व अस्थिर; स्थावरजंगम. २. (ल.) सजीव व निर्जीव. पहा : **चराचर** [सं.]

**चलाची व्याप्ती** (ग.) स्वतंत्र चलाच्या मूल्यासाठी मिळणाऱ्या अवलंबित चलाच्या सर्व संगत मूल्यांचा संच.

**चलाचे अधिक्षेत्र** (ग.) चल जी मूल्ये घेऊ शकतो त्या सर्व मूल्यांचा संच.

**चलाधिकार** पु. पगारी नोकरी, चाकरी. [सं.]

**चलान** न. खटला भरणे. (क्रि. करणे.) : 'नऊजणांस चलान न करितां सोडण्यांत आलें.'– के २२.७.३०. [सं. चल्, हिं.]

**चलान** न. मालाची यादी; पावती; पास; मालाबरोबर पाठविलेला कागद; खजिन्यात रकमेबरोबर पाठवायचा कागद. [हिं.]

**चलान** न. (तुरुंगातील सांकेतिक भाषा) अट्टल चोर, दरोडेखोर, खुनी इत्यादींचा समुदाय.

**चलाव** पु. कूच : 'दुसरे दिवशी मनसुबी करून आपला व सूर्याजीचा कथला तोडावा तो लष्कराचा चलाव जाला.'– ऐको ३६९.

**चलित** वि. १. चलन पावलेला; सरकलेला; हललेला. २. (शाप.) फिरणारा. ३. चालू असलेला. [सं.]

**चलितगर्भरोग** पु. एक विकार. गर्भाशयातील गर्भाची हालचाल सामान्यत: होते त्यापेक्षा जास्त होणे. [सं.]

**चलितोरुकरण** न. (नृत्य) हात व्यावर्तित व परावर्तित करून शुकतुंड करणे व मग मांड्या हलविणे.

**चलित्र** न. (विअ.) विद्युत किंवा दुसऱ्या ऊर्जेचे यांत्रिक शक्तीत रूपांतर करणारे यंत्र.
**चलिष्णुता** स्त्री. (भौ.) गतिशीलता; चलन; हालचाल करण्याची क्षमता.
**चली** स्त्री. मुलगी; चेटी. (गो.)
**चलो** पु. मुलगा; चेडा. (गो.) पहा : **चेला**
**चलोच्च** न. ग्रहाच्या कक्षेतील सूर्याला जवळ असणारा बिंदू. [सं.]
**चल्मा** पु. ओहोळाच्या काठची लहानशी विहीर. (व.) [क. चिलिमे]
**चव** स्त्री. १. रुची; (जिभेने, कानाने, समजशक्तीने) ग्रहण; बोध (क्रि. घेणे, पाहणे, जाणणे.) : 'ज्वरिता जसें ससितपय सद्‌वचन न दुर्जना तसें चव दे।'– मोसभा ४.८७. २. आवड; गोडी; आस्वाद; रुचिरता; स्वारस्य : 'सत्कीर्तिची सदां चव घे।'– मोआदि ११.६७. ३. सौख्य; आराम; सोयीस्करता (धंदा, नोकरी इत्यादीची). [सं.चर्व] (वा.) ० **नसणे** – योग्यता नसणे; समज नसणे. **चवेस पडणे** – पसंत पडणे; मानवणे; आवडणे.
**चव** न. ज्यावर फाळ बसवतात त्या नांगराच्या भागाचे बारीक लाकडी टोक. (व.)
**चव** पु. मोत्यांची संख्या व वजन यावरून त्यांच्या किमतीचे बसवलेले प्रमाण; मोत्यांची किंमत काढण्याची रीत, नियम. चव हे मोत्याची किंमत ठरवण्याचे परिमाण आहे : 'जे मोती वजनाने अधिक चव भरेल.'– मसासंअभा ९०.
**चव** पु. चेव; स्पर्धेमुळे उत्पन्न झालेला आवेश; एखादी गोष्ट करण्याविषयी आलेली उर्मी; उत्कंठा. (क्रि. येणे.) : 'मद्‌विशीं असुनि कां चव नाला।'– किंगगवि ५३.
**चव** पु. नारळाचा कीस. [क. चिव्वु=खरडणे, तासणे]
**चवअवचव** स्त्री. गोंधळ; चबढब; अव्यवस्था : 'अग्रवादी बोलिला जे सभेस चवअवचव आली. याजकरितां हजर मजलासी तेच वेळेस गैर जाले.'– सनदा ११७.
**चवई** स्त्री. चौरंग; घडवंची (चार पायांची). पहा : **चवकी**
**चवई, चवईण** स्त्री. एक प्रकारची रानकेळ. या जातीचे केळे फार बारीक असून खाण्याच्या उपयोगी नसते. पानांचा उपयोग केळीच्या पानांसारखा भोजनासाठी करतात.
**चवक** पु. १. काळ्या मिऱ्याच्या झाडाचे मूळ; मिरवेलीचे मूळ; चवगिऱ्याचे मूळ; एक औषधी. २. पिंपळीची वनस्पती. [सं. चबिक]
**चवक** न. १. आश्चर्य. २. भीती; धाक; वचक : 'अत्यंत न्याहारें पाहतां। चवकुं पडेल प्राण्याच्या चित्ता।'– एभा ३.४५८. ३. अधीरपणा : 'थरक सरक दावी चवक । अति नि:शंक निजगडा ।' एरुस्व १२.१२७. [सं.चक्र]
**चवकणे** अक्रि. १. भिणे; चमकणे; दचकणे; चकित होणे; संशयात पडणे : 'जैसें कामे कवळिलिया मारकें। विरहिणी भोग होती पारिकें। रिपूंचिया परी चवके। चंद्रातें देखोनी ।।'– ज्ञाप्रबो ७६७. २. माघारे घेणे; मागे पाऊल टाकणे : 'धैर्य धरोनि उभा ठाके। मृगभावें मागें चवके।'– भाराबाल २.२४.
**चवकणे** अक्रि. बदलणे; फितूर होणे : 'बाबाच्या वर्तमानावरून गडकरांनी चवकावे असे नाही. गडकरी पदरचे पहिल्यापासून आमच्या विचारात आहेत. त्यांनी भाऊच्या विचारे वर्तावे...'– ऐसंसाख ७. पृ. १६.
**चवकार** १. अब्रू; २. प्रतिष्ठा. ३. वचन.
**चवकासीचा** वि. १. चौकस. २. स्वच्छ राहाणारा.
**चवकी** स्त्री. चौरंग; चौकी : 'त्यामध्यें चवकीस। जानकीवर विराजे।'– वेसीस्व ८.१३.
**चवग** वि. चार : 'नारवे नगराचेनि नेमिते जण ४ चवग'– नाम्र १.९[सं.]
**चवगिरा** पु. मिरवेल. पहा : **चबक**
**चवचव** स्त्री. चबढब; कालवाकालव; अतिशय गोंधळ; दुर्दशा; अव्यवस्था (वस्तू, कामे, माणसे इ.ची); चावाचाव; चिवचिव. [ध्व.]
**चवचवणे** अक्रि. चिडखोर बनणे; अडचणीच्या, संतापदायक परिस्थितीत चेवणे; कातवणे; कावणे. (को.) पहा : **चिवचिवणे**[ध्व. चवचव]
**चवचवीत** वि. बेचव. (कु. गो.)
**चवचाल** पहा : **चौचाल**
**चवचिंदी** स्त्री. अंदाधुंदी; झोटिंगपाच्छाई. (ना.)
**चवचुंदी** वि. अस्ताव्यस्त.
**चवट** न. दोऱ्याचा गुंडा; चिवट दोर : 'पेशजी चवटे आपण दिल्हे होते ते खर्च जाहाले. '– पेद ३.८९.
**चवड** स्त्री. एकावर एक ठेवून होणारा ढीग; गठ्ठा; चळत; रास : 'हातातील वाट्यांची चवड एकदम खाली पडली.' – काचक २६.[क. सिवडि]
**चवड** न. १. नारळीला येणारे शहाळ्यांचे झुबके. २. नारळाचे पापुद्रे, वेष्टन. पहा : **चोड**
**चवड** वि. साडेचार ही संख्या. (गो.)
**चवडचाल** स्त्री. घोड्याची एक चाल; दुडकी; लांब फिरतीच्या घोड्याला योग्य अशी विशिष्ट चाल.
**चवडना** क्रि. निवडणे; सुधारणे. (झाडी)
**चवडशी** स्त्री. चपट्या तोंडाचा हातोडा; भांड्याचा गळा अगर तोंड सारखे करण्यासाठी उपयोगी पडणारा हातोडा.
**चवडा** पु. १. पावलाचा मधला भाग; तळपायाचा बोटाजवळचा भाग : 'तो नुचली चवडा। कोण्हेयांवरी।।' – शिव ४८६. २. पावलाचा तळव्याचा एक रोग; वाघचवडा. ३. हाताचा तळवा : 'न्याहाळा पां केवढा। पसरलासे चवडा।' – ज्ञा १३.६४. ४. अंगावर एखाद्या ठिकाणी सुजून वर आलेली जागा. (व.) ५. लाखेचा तुकडा. (झाडी) ६. चपलेचे टोक. (झाडी.) [सं. चपेटा] (वा.) **चवड्यावर चालणे** – १. अतिशय जलद चालणे; फार घाईत असणे. २. दिमाख करणे; ऐट करणे : 'किती दिवस तू अशी चवड्यावर चालते तर मीही बघते!' – बाविबु ११४. **चवड्यावर बसणे**– १. पायांच्या बोटांवर बसणे; टाचा न टेकता बसणे. २. (ल.) सावध असणे.
**चवडा** वि. रुंद : 'विश्वामित्राची लंबी– चवडी चौदा फूट पांढरी दाढी धरून...'– नाकु ३.३०. [हिं.]
**चवडा** पु. भात कापल्यावर जमिनीत राहिलेला बुडखा.
**चवडाभर** वि. अगदी थोडे; चुळकाभर : 'घरात अजून चवडाभर पाणी होतं.' – एल्गार ९१.

**चवडी** स्त्री. आवरण; सपाट आच्छादन . पहा : **चवडा** २ : 'जेंवि पुरूष जीर्ण वस्त्र सांडी। नवीं पांघुरे घडिघडी। तैशी स्थूळ देहाची चवडी। भोगी देही।।'– कथा ६.१२.१२०.

**चवडे कलम** गुटी कलम; झाडाच्या फांदीस वरचेवर मुळ्या आणणे.

**चवढव** स्त्री. १. गोंधळाचे, भानगडीचे स्वरूप. पहा : **चवचव** : 'मराठी भाषेविषयीं नाक मुरडणें व तिची चवढव सांगणे या भानगडींत आमच्या ख्रिस्ती बंधूंनीं फार करून पडूंच नये.' – नि ९१७. २. आवडनिवड; रुचिवैचित्र्य : 'सोलीव चवीढवी अशा माणसाबरोबर वागताना मी थोडा बिचकतो.'– सोबां ४३.

**चवढाई** चार जागी.

**चवढाळ** स्त्री. उचापत; ढवळाढवळ; खटपट : 'कोणेहिप्रकारें चवढाळ करून पैसा मिळेल तो हाताखालीं घ्यावा.'– पेद २८.२९०.

**चवढाळ, चवढाळणे, चवथरा, चवथा, चवथाई, चवरंग, चवतकोर** पहा : **चौ मध्ये**

**चवणा–ना** पु. १. आवड; गोडी; चटक. २. व्यसन; खोड; वाईट सवय; दुर्गुण; चाळा. ३. लाड, नखरा; चोचला : 'जिभेचे चवणे करायचे.'– हेतोप्रबो ४९.

**चवणे** अक्रि. १. चळणे; स्वैराचारी बनणे; बहकणे. २. वेड लागणे; वेडे होणे. [सं. च्यवन]

**चवणेखोर** वि. मिजाशी. (ना.)

**चवत** स्त्री. चतुर्थी : 'चवतीच्या चांदा कधी बा उगवशी। जोडिते मी हात कंथ माझा उपवाशी ।।'– लोसाको.

**चवत(ता)ळणे** अक्रि. १. क्रुद्ध होणे; संतापणे; आवेशाने दात–ओठ खाणे; आदळाआपट करणे. २. बेताल वागणे.

**चवताळे** न. केरकचरा, गळाठा काढण्याचे लाकडाचे दाताळे; कुळव. एका लाकडात चौदा दात (मेखा) बसवून हे केलेले असते.

**चवथल** स्त्री. चौथाई; चतुर्थांश; चवथा भाग : 'शेतें करीत असता चवथल घेतली.'– आघई १०३.

**चवथी** स्त्री. चतुर्थी : 'माघ मासी वधि चवथीचा दिसी श्रीप्रभुगोसावी ही प्रवृत्यंतर केलें'– स्मृस्थ ५. [सं.]

**चवदा** वि. चौदा; दहा अधिक चार ही संख्या

**चवदार** वि. रुचकर; लज्जतदार; खमंग; खुमासदार. पहा : **चव**

**चवधव** पहा : **चवढव**

**चवधारी** वि. चार धारांचा; चार कडा असलेला (घेवडा, निवडुंग इ.) पहा : **चौधारी**

**चवन** न. क्षण. (गो.) पहा : **किंवण**

**चवनट** वि. १. चोखंदळ; मिजासखोर. २. गोडघाशा. ३. विचकट; शिवराळ; चावट.

**चव्न्या** स्त्री. चिकित्सा; चोचले (झाडी).

**च(चं)वर** स्त्री. १. चवरी; चामर : 'जगळदरणेनि गोसांवियांकारणें दांडी : चवर : नवा माचा...दोनि तांब कळस :'– गोप्रच; ८७.२. (लेखणी, काठी, खुंटी इत्यादींच्या शेवटास) मारून, आपटून पिंजल्यामुळे आलेला चवरीसारखा आकार; चोचण. ३. मोहोर : 'रामाच्या बागेमधी...चवरा मोठा दोन्ही। आंब्याची सावली चींचेवरी'– लोसाको. १०९. (गो.) [सं. चामर]

**चवर, चवरगोंडा** पु. श्रावण शुद्ध पौर्णिमेच्या दुसऱ्या दिवशी बैलांच्या शिंगास बांधतात तो झाडाच्या सालींचा, तागाचा झुबकेदार साज. (व.)

**चवरखा** पु. कागदाचा चौकोनी तुकडा : 'शाई पिऊन पिऊन गच्च फुगलेले टिपकागदाचे चवरखे...'– सनई ३३.

**च(चं)वरडोल** १. अंबारी; हौदा : 'सहस्रकरी मदोन्मत्त। चवरडोल त्यां पृष्ठीं।'– मुविरा ८.२. २. देव्हारा, गाडी इत्यादींवरील चांदवा, छत, मंडपी; मेघडंबरी. ३. चौरीचा डौल, चवरीचा मान : 'इव्हाई गृहस्थाचा चिरेबंदीवाडा खोल भाई राजाच्या ग माझ्या कसा जाईल चवरडोल'– रापा १०. ४. हत्तींसाठी उभारलेला मांडव.

**चवरडोली** स्त्री. १. मूर्तीवरली मंडपी; देवावरील छत : 'रुप्याच्या पत्र्यांनी मढविलेल्या चवरडोलीत.'– पंवि ५०. २. स्त्रियांकरिता असलेली डोली.

**चवरधर** वि. चवरी ढाळणारा : 'मी तळ उपरु जाणविता। चंवरधरू हातुदेता।'– ज्ञा १३.४१७.

**चवरसडका** भाल्याला लावलेली पताका : 'चवरसडकाचीया ढाला : डोलत दीसती विशाळा' – रुस्व १५३३. [सं.]

**चवरंग** १. पहा : **चौरंग**. २. खुडुक होणे; पंगुपणा : 'केला चहूकुन चवरंग पतीचा घरामधी पडले खाडे।' – पला ७५.

**चवरंग** पु. पूजेचा पाट; बैलाच्या शिंगांना बांधायचा गोंडा. (झाडी)

**चवरा** पु. नदीच्या, खाडीच्या नजीक असलेला व पाण्याने कधीकधी वेढला जाणारा भूप्रदेश.

**चवरा** पु. ओटा; आसन : 'चैतन्य स्वरूपाचा चवरा : चौफळ सरिसा साजिरा' : मूप्र ४९६.

**चवराशी** चहुकडची.

**चवरी** स्त्री. वनगाईच्या केसांच्या झुबक्याचे देव, राजा किंवा इतर मोठी व्यक्ती यांच्या अंगावरील माशा वगैरे वारण्यासाठी सोने, चांदी इ.ची दांडी बसवून केलेले कुंच्यासारखे साधन. चवरी देणे हा पूर्वी एक मोठा मान असे व तो सरकारातून खर्चासह मिळे : 'मोहोरांच्या चवऱ्या ढाळीत उभे...'– अज्ञामागो १६. [क. चवर, चवुरि, चौरि.] [सं. चामर]

**चवरीगोंडा** पु. पालखीचा किंवा मुंडावळीचा गोंडा. (गो.)

**चवरीबरदार** वि. चवरी वारणारा, ढाळणारा; चवरधर.

**चवरीभवरी** स्त्री. विवाहातील सप्तपदीचा विधी. (अहि.)

**चवरे** न. १. मस्तक; शिखर; माथा : 'ब्रह्मभुवन गा चवरें। लोकाचळाचें।'– ज्ञा ८.१५४. २. गादी; सिंहासन; आसन : 'चैतन्याचेया। चवरेयांवरी।'– शिव ३६. ३. शेवट : 'येतां धारणेचे नि पैसारें। क्रमी ध्यानाचें चवरें। सांपडे तवं।' – ज्ञा ६.५८. [हिं. चौरा]

**चवरेचा(ता)ळ, चवरेचा(ता)ळीस** पहा : **चवेचाळ**

**चवऱ्याण्णव, चवऱ्यांशी** पहा : **चौऱ्याण्णव, चौऱ्यांशी**

**चवल–ली, चव्वल** पु. स्त्री. रुपयाचा आठवा भाग, हिस्सा; दोन आणे; पूर्वी प्रचारात असलेले दोन आणे किमतीचे एक नाणे, दुणेली : 'त्याच्या कनवटीची चवली काढून घेऊन...'– भेटी ८५. (वा.) **चवला खाणे**

– लाच खाणे; बदलणे : 'सातारकर गडकरांनी राजश्री बाबाच्या वर्तमानावरून चवला खादला'. – ऐ.सं. सा खं ७. १५.
**चवल कम पावणे आठ** १. जवळ जवळ नपुंसक; षंढ. २. (ल.) पुरुषार्थहीन; भेकड; दुबळा : '...चवल कम पावणे आठ आर्य बाजीराव साहेबांनी...स्वजातीच्या धूर्त आर्यधर्मलंड भिक्षुकास मात्र... वग्राळ्याने दक्षिणा वाटली' – जोफुसग्रं २०१.
**चवलचा** पु. शेळ्यामेंढ्यावरील कर वसूल करण्याचा मक्ता.
**चवला** पु. कापराची वडी. (झाडी) [सं.]
**चवलादी** वि. चवचाल : 'पायातलं काढून हातात घेतलं तवा कसी पळाली चवलादी बया.' – वाळवण १९४.
**चवलीचा मामला** १. शेळ्यामेंढ्यावरचा कर वसूल करण्याचा मक्ता. २. किरकोळ गोष्ट.
**चवल्या** वि. दोन आणे रोजावर लावलेला इसम; चवलीचा मजूर.
**चवल्या** स्त्री. अव. गमज्या. (व.)
**चवल्यापावल्या** स्त्री. अव. (ल.) कच्चीबच्ची. (कु.)
**चवल्ला** वि. सुदृढ. (झाडी)
**चवविणे** उक्रि. १. जागृत करणे. २. चेतविणे; प्रोत्साहन देणे : 'मनोगुण इंद्रियां चववितो।' – मुआदि २०.६५. [सं. च्यवन]
**चवस** वि. चार दात असलेला. [सं.]
**चवसट** वि. चौसष्ट.
**चवसा** वि. चारसहा (दिवसांनी) : 'परस्परें बोलती असें जन कळों येईल महिन्या चवसा।' – पला.
**चवसून** क्रिवि. चोहोकडून; सर्वप्रकारे. (राजा. कुण.)
**चवळई चवळा–ळी** स्त्री. एका धान्याचे नाव.
**चवळा** पु. चवळी वगैरे कडधान्ये खाण्यापूर्वी करायची पूजा. धान्याच्या राशीपुढे पणत्या लावून त्याची पूजा भगत करतो.
**चवळी** स्त्री. १. अफवा; बातमी; वदंता; आवई (क्रि. निघणे, उठणे, पिकणे, होणे, राहणे.) २. बोभाटा करणे; गवगवा किंवा बभ्रा करणे. ३. बेअब्रूची अवस्था. (क्रि. करणे, होणे.)
**चवळी** स्त्री. १. एक कडधान्य. २. चवळीच्या पाल्याची किंवा शेंगांची भाजी.
**चवंक** पु. धाक; भीती : 'पाहातां देवही चवंक पडे' – ज्ञा ११.३३४.
**चवंग** वि. चौघे : 'भनी भावंडांची चवंगांची एक जानी। बया मालनीचं एक्या पेलो पानी।।' – लोसाको १०९.
**चवंग** प. लहान मुलांचा एक खेळ; यात घरे आखून कवड्या किंवा चपट्या खापऱ्या उडवून खेळतात.
**चवंट(ड)के** न. एकतारी वाद्य; गोंधळी इ. वापरतात असे एकतारी वाद्य. पहा : **चोंडके**
**चवंडक्या** पु. चवंडके वाजवणारा : 'बेहाया नाचत होते, गात होते. चवंडक्या जीव तोडून साथ देत होता.' – नागीण १२४.
**चवंढाळे, चौढाळे** न. घालमेल; गडबड; गोंधळ : 'यास कोण प्रकारें चवंढाळें करून पैसा मिळेल तो हाताखाली घ्यावा.' – पेद २८.२४४.
**चवा** पु. लाकूड उंच चढविण्याकरिता दोन लाकडे किंवा वासे एकत्र बांधून केलेली कैची, कातर.
**चवाई** स्त्री. चौरंग; घडवंची. पहा : **चवई** : 'चारी पुरुषार्थाची चवाई। तेंचि आसन त्यावरी पाहीं।' – एरुस्व १४.८०.
**चवाक** पु. चौक; लग्नादी मंगल प्रसंगात पाठपासोड्यावर गहू, तांदूळ यांनी काढलेला चौकोन : 'तिसरी माझी ववी चारी चवाक सादवील.' – जलोसा ३६.
**चवाटके** नं. तूप, तेल इ. मापण्याचे माप, परिमाण; शेराचा सोळावा हिस्सा; छटाक.
**चवाठा** पु. १. जेथे चार रस्ते एकत्र येतात ते स्थळ. चौक; चव्हाटा; खुंट. २. गप्पीदास लोक गप्पागोष्टी करीत असतात ते ठिकाण. [सं. चतुष्पथ](वा.)
**चवाठ्यावर आणणे** – उघडकीस आणणे; गौप्यस्फोट करणे; गुप्त गोष्ट जाहीर करणे
**चवाठा** पु. देवसकीचा देव. (कशेळी).
**चवाडे** न. लहान गाठोडी; लहान मोटळी; पुरचुंडी : 'तू भाकरीच चवाडं सोडलंस.' – खळाळ ८०.
**चवाणमाणकी** स्त्री. समुद्रमाणकी; समुद्रफेस. (कु.)
**चवाणी** स्त्री. चवन्नी; चार आण्याचे नाणे; पावली : 'एक चवाणी सूर्याच्या हातावर ठेवून वामन म्हणाला.' – बाविबु ११४.
**चवार** स्त्री. औत.
**चवारी** स्त्री. सुपारीची एक जात. हिचे फळ लहान कोवळे असतानाच खातात, जून झाल्यावर ते फार कठीण होते.
**चवाळ** न. १. अंथरुण. २. बैलांची झूल. [सं.]
**चवाळ** स्त्री. एकसंध विणलेले चार पंचे. पहा : **चवाळे**
**चवाळा, चवाळामण** पु. विशिष्ट वजनाचा मण.
**चवाळी** न. अव. लहान घोंगड्या : 'रान केवढं? असेल दोनतीन चवाळी.' – जैरेजै १३३.
**चवाळे** न. १. पहा : **चवाळ**. २. दोन पट्ट्यांची जाडीभरडी लहान चौरस घोंगडी; लहान उणाख घोंगडी : 'एका नवारीची खाट त्यावर चवाळ्यासारखें कांहीं तरी टाकलेले.' – वज्राघात ८७. ३. ज्यांच्या साहाय्याने चार माणसे ओझे नेतात ते वासे आणि दोऱ्या. (को.) ४. चार माणसे (दगड इ.) ओझे उचलून आणतात ती क्रिया. ५. गबाळे या शब्दानंतर शब्दपूरणार्थ उपयोग. (व.)
**चवि** स्त्री. चव; रुची : 'अमृताची चवि' – राज्ञा ४.१८१.
**चविक–का** पु. स्त्री. पिंपळी वनस्पती; मीरवेल. [सं.]
**चविणे** अक्रि. मोकाट सुटणे; चळणे. पहा : **चवणे** : 'निष्कपणास्तव शुष्कपणें गिरा। शुष्कवना चविते।' – आपद ५२. [सं.]
**चविनट** वि. ज्याला चव नाही तो; ज्याची चव किंवा रुची नाहीशी झाली आहे असा : 'चविनटानें कालविलीं। नाना अन्नें।' – दास १७.१०.१५.
**चविष्ट** वि. चवदार; रुचकर; स्वादिष्ट.
**चवी** स्त्री. १. चव; रुची; गोडी; जिभेने ग्रहण करणे : 'दाविली आपुली चवि।' – रापं ३.७०. २. आस्वाद; बऱ्यावाईटाची परीक्षा, चाचणी. (क्रि. पाहणे.) : 'कीं तेंचि चवी करूनि पाहिजे। तव अमृत आहे।' – ज्ञा ६.३.

**चवी, चवी(वै)ण, चवेण-णी** स्त्री. रानकेळ. पहा : **चवई, चवईण** : 'चढणीत चवेणीची दोन रोपं होती.' – जैरेजै १३१.

**चवे(व्वे-व्हे)चा(ता)ळ, चवे(व्वे-व्हे)चा(ता)ळीस** वि. चाळीस अधिक चार; ४४ ही संख्या. [सं. चतुचत्वारिंशत्]

**चव्य** न. १. पिंपळी; २. मिरवेलीचे मूळ. पहा : **चवक** [सं.]

**चव्या-व्वा** पु. १. गंजिफांच्या, पत्त्यांच्या डावांतील चार ठिपक्यांचे पान. २. फाशांतील चार; चारांचे दान.

**चव्वल** पु. दोन आण्याचे नाणे. पहा : **चवल, चवली**

**चव्हाटा** पु. चावडी 'चव्हाट्यावरचीं कुत्रीं भाकरीच्या तुकड्याने तरी भुंकायची थांबतात.' – वेबा ५. २. होळीच्या समारंभाची जागा. (को.) पहा : **चवाठा**

**चव्हाण चौथाई** स्त्री. उदाजी चव्हाण लोकांपासून जबरदस्तीने जो कर वसूल करीत असे त्यास म्हणत : 'उदाजी चव्हाण बंड करून चव्हाण चौथाई अशी बाब गांवगन्ना घेत होता.' – मइसा ३.११.

**चव्हाणपट्टी** स्त्री. शाहू राजाच्या प्रांतात उदाजी चव्हाण लूट करीत असे त्याचे निवारण करण्याकरिता घ्यावयाचा कर : 'राजश्री प्रतिनिधिनी चव्हाणपट्टी तीनशे साठ रुपये घेतले.' – मइसा ३.११.

**चव्हाळे** न. जाभाडे; जबडा.

**चश्म** पु. डोळा. [फा.]

**चश्म झख्म** दुर्दैव; नजर; दृष्ट.

**चश्मा** पु. झरा. [फा.]

**चश्मा-ष्मा-स्मा** पु. १. दृष्टिदोष असल्यास डोळ्यांना लावायचे साधन; आरशी; चाळशी; डोळ्यांची भिंगे; उपनेत्र : 'अधिकाराचे चष्मे याच्या डोळ्यास लागल्यावर त्याला पूर्वीचे जग निराळ्या रंगाचे दिसू लागते.' – टिकेले ३.३३७.[फा. चष्म] (वा.) **(अमुक) चष्म्यातून पाहणे** – अमक्या प्रकारची, विशिष्ट दृष्टी ठेवणे; अमुक दृष्टीने पाहणे.

**चश्मा-ष्मा-स्मा** पु. १. पडवी; ओटी. २. नाट्यगृहात प्रेक्षकांसाठी केलेली खास खोली. २. दोन खांबांमधील किंवा तुळ्यांमधील जागा; खण. [फा. चष्म]

**चषक** पु. पेला; भांडे; पात्र. [सं.]

**चष्का** पु. शौक; नाद. नादी लावणे : 'प्रत्येक घोडी जणू काय परी असते व ती चंद्राला आपला चष्का लावते.' – दर्हिदी १७.[फा. चशक]

**चष्की** वि. शौकीन, मौजमजा करणारे : 'ऐटबाज पोषाख घातलेली 'चष्की' माणसे त्यांना आवडायची नाहीत.' – आमा ९६. (वा.) **चष्क्या करणे** – नखरे करणे; चवणेबाजपणा करणे : 'आपण येतात तेव्हा कशा चष्क्या करतात?' – रथचक्र १५१.

**चष्मपोशी** स्त्री. डोळेझाक : 'गोष्टी बोलले त्याच चष्मपोशी करून ऐकल्या पाहिजेत.' – मरिउवि २.३१४. [फा.]

**चष्मिष्ट** वि. चष्मा घालणारा : 'एवढ्यात सद्या चष्मिष्ट उठला.' – मिरास २६४.

**चष्मेवाला** पु. डोळ्याभोवती कडे असणारा चिमणीएवढा लहान पक्षी : 'पक्षी एखाद्या मोठ्या सुपारी एवढाले होते. त्यांचा रंग हिरवा होता... त्यांच्या डोळ्यांभोंवती पांढरे शुभ्र कडे दिसून येते. या कड्यामुळे यांना चष्मेवाला असे म्हणतात.' – पद ५१.५२.

**चसणे** अक्रि. (सोनारी) १. फसणे; बसणे; बुडणे (धंदा, पैसा.) २. चाकरीवरून, हुद्यावरून दूर होणे, निघणे. ३. मरणे. (कुण.) पहा : **चचणे** [हिं. चलना] (वा.) **चसणापुरास जाणे** – मरणे.

**चह** काय; कोणते.

**चहड, चहडणे** पहा : **चढ, चढणे** : 'मग चहडुनि माथ्यावरी।' – देप ७०.

**चहल** चाळीस.

**चहलदा, चहदला** पु. एकेकाळी वंजारी लोकांवर लादलेला कर.

**चहा** पु. १. एक झाड व त्याची पाने; याच्या वाळवलेल्या पानापासून तयार केलेले एक पेय. २. गवती चहा. [फ़ा. चा][हिं.]

**च(चा)हा** स्त्री. १. आवड, वासना; हौस (मनुष्य, वस्तू इत्यादींची). २. अपेक्षा; आशा. ३. आस्था; आदर; प्रेम; मान; वाहवा; कीर्ती : 'आपल्या पतीची लोकांत चहा होते हें पाहून तिला धन्यता वाटत असे.' – कोकि २६. (वा.) ० **करणे** – आवड असणे; आस्था असणे : 'त्यांच्या इतर गुणांची तुमच्याइतकीच चहा मीही करतो.' – व्यक्तिरेखा २०७. [सं. चष्, जुष्, हिं. चाहा]

**चहाचटी** चहाची चट, सवय असलेला : 'रावसाहेबांच्या घरीं जेव्हां बनेल तेव्हां येऊन या चहाचटी व खेळकटी मंडळीच्या तैनातींत वेळ घालवावा.' – माबा ७३.

**चहाटळ** वि. १. चटोर; चावट : 'चटोर आणि चहाटळ फ्रेंच लोकांप्रमाणे...' – सारा ३३७. २. खणपटीस बसणारा; पिच्छा पुरविणारा; चघळ. ३. उगाच बभ्रा करणारा, षट्कर्णी करणारा; गजरघंटा. ४. (सामा.) फाजील; वात्रट; टवाळ.

**चहाड** वि. १. लोकांची दुष्कृत्ये, गुप्त गोष्टी बाहेर फोडणारा. २. बनावट गोष्टी सांगणारा; मनचे सांगणारा; खोटेनाटे सांगणारा. ३. चुगलखोर; लावालावी करणारा; चहाड्या सांगणारा; निंदक : 'कोतवालाच्या घरी एक चहाड होता...' –घाको २.

**चहाड** वि. शिजविला असताही मऊ होत नाही तो; भिजत घातला असता फुगत नाही मोड येत नाही असा; कुच्चर; अशिजा (दाणा). पहा : **चाड**

**चहाडखोर, चहाडबुचका-लुतरा** वि. चहाड्या करणारा; चुगल्या करणारा : 'मी कांहीं चहाडबुचका नाहीं सांगायला.' – बाळमित्र २.१८१.

**चहाडणे** उक्रि. चुगल्या, चहाड्या करणे.

**चहाडा** पु. संध्याकाळी इशाऱ्यादाखल डफडे वाजविणे. (व.)

**चहाडी** स्त्री. १. लावालावी; चुगली; दुसऱ्यांची वर्मे-रहस्ये प्रकट करणे: 'मग हामजाने घरी चहाडी न करण्याबद्दल आबासला ताकीद दिली.' – व्यंमाक ५२. २. बनावट गोष्ट; निंदा; खोटेनाटे.[सं. चर्ति, का. चाडि]

**चहाडीचुगली** स्त्री. (व्यापक) लावालावी; चहाडी.

**चहाण-न** न. गाय, म्हैस यांचे जननेंद्रिय. (व.)

**चहाता** वि. चहा करणारा; आवड बाळगणारा; भक्त; उपासक.

**चहादाणी** स्त्री. किटली; चहा ठेवण्याचे भांडे.

**चहादारी** स्त्री. वाहवा : 'राज्यकारभार हाकावा, जमेदार बनावे... ह्यासारख्या उद्योगांची दक्षिणेत अतिशय चहादारी झाली.' – मवाइ १४.

**चहापाणी** न. तोंड धुऊन चहा घेणे इत्यादी सकाळचे कर्म; (सामा.)

चहापान; फराळ, अल्पआहार.

**चहाबाज** वि. चहाचे व्यसन असलेला : 'जपानी लोक पट्टीचे चहाबाज आहेत.'– जजदि १०३.

**चहार** चार.

**चहारुम** वि. क्रमांकाने चौथा. [अर.]

**चहाळ** पु. चाहूल; आवाज; शब्द. (वा.) ० **घेणे** – कानोसा घेणे : 'पक्ष्यांच्या चकार कानांनी पाखरांच्या दुःखपूर्ण निःश्वासाचा चहाळ घेतला.'– वास्तु ५०. (व.)

**चहाळी** पहा : **चहाडी** : 'निळा म्हणे चहाळी करी। रिचवीवरी आणि हांसें।'– निगा ८७.

**चहुकडला–कडील** वि. सभोवतालचा; सर्व बाजूंचा; सार्वत्रिक.

**चहुकडून** क्रिवि. सर्व प्रदेशांकडून; सर्व बाजूंकडून; जिकडूनतिकडून : 'स्वगजांसहि भी तो गज मारित येतां चहूंकडुन चवघे।'– मोभीष्म ५.५३.

**चहुकडे–फेर–फेरी, चहुदिशांस** क्रिवि. चोहीकडे; सभोवार; जिकडेतिकडे; सर्व बाजूंना : 'सदा भय वाटे चहूंकडे। तरी देवक्षोभ जाणिजे।'– हरिवि ६.२०९.

**चहुकोण** क्रिवि. चोहीकडून.

**चहुत्रा, चहुतरा** पहा : **चबुत्रा** : 'लोखंडी चबुतऱ्यावर घोड्यावर बसलेला पुतळा उभा केला.'– कोकि ३३७.

**चहु(हो)त्रा** पु. दरमहा दरशेकडा चार टक्के दराचे व्याज.

**चहुमती** वि. चातुर्याने; कुसरीने : 'चहुमती पाक केले घृती'– मधउ ६२.

**चहुरंगी** वि. बहुरंगी : 'चोरटा चहुरंगी बलचंडा'– आम २६.

**चहू** वि. चार; चौ याचे समासात योजावयाचे रूप. २. (सांके.) चार वेद : 'सा चहूं अठरा निराळा। गाऊं वाजवूं एक चाळा रे।'– तुगा २४६. [सं. चतुस्] (वा.) ० **पायांनी, दोहो पायांनी उतरणे** – शिंगरू, वासरू, पाडा वगैरेंनी चार पाय किंवा दोन पाय पुढे करून जन्मणे.

**चहू** पु. नारळाचा कीस. पहा : **चव**

**चहू(हो)टा** पहा : **चवाठा** : 'चहोटा पडला उताणा।'– गीतार्णव १.१९०४.; 'प्राणसख्याचा महाल चहूटा। जागा धरा जा चहूकून वाटा ।'– पला ४.८.

**चहे** पु. अव. एक पाणपक्षी. [सं. चाष]

**चहोत्रा** पु. महिना चार टक्के दराने लावलेले व्याज.

**चळ** पु. १. चंचलपणा; अस्थिरता, २. अंतर; फरक; च्युती (वचन, कायदा, नियम, आचार इत्यादींपासून). ३. खूळ; चित्तभ्रंश; बुद्धिभ्रंश; भ्रम. उदा. काम-द्रव्य-मद्य-शास्त्र-स्त्री-चळ. (क्रि.लागणे) : 'तरलों म्हणुनि धरिला ताठा। त्यासी चळ झाला फाटा।'– तुगा २८७७. ४. हाव; उत्कटेच्छा; अधीरपणा; उतावीळपणा; वेड. (क्रि. घेणे, भरणे, येणे, लागणे.) पु. स्त्री. एकसारखा नाद; छंद; हट्ट; खंत (मुले घेतात ती). (क्रि. घेणे.)[सं. चल्] (वा.) ० **भरणे** – वेड लागणे : 'द्रव्याच्या शोकेकरून कितीकाला भरला चळ।'– ऐपो ३८८.

**चळ** पु. हुलकावणी; हल्ला; चाल; आक्रमण : 'करकमभोसे पंढरपूर इकडेच चळ द्यावा. दबाव पाडावा.'– पेद २८.२८. (क्रि. देणे.)

**चळक** स्त्री. १. मोठी पर्जन्यवृष्टी; पावसाची सर : 'चार वाजता पावसाची एक चळक आली...'– गार २८. (क्रि. येणे, पडणे.) २. जोराचा प्रवाह; लोंढा; पूर (एखाद्या रसाचा किंवा पदार्थाचा). ३. टोळी; मंडळी; झुंड; समुदाय; जमाव. ४. धाड; हल्ला; मुसंडी; झपाट्याने येणे, जाणे (घोडेस्वार, मनुष्ये, जनावरे, कुत्री इत्यादींनी). [सं. चल्]

**चळक** स्त्री. रास; ढीग. पहा : **चळत.** (वा.) ० **देणे** – पुडी सोडणे; खोटे परंतु पटेल असे बोलून एखाद्याला भुलवणे : 'पाटलानं अशी चळक दिली आणि मंडळी फुटली.' – गागो ९९.

**चळकणे** पहा : **चळणे** : 'धातु कराया गेला। तेथ मुळी चळकला।'– दावि २०१.

**चळकधार** वि. सरीवर सरी येणारा; मुसळधार (पाऊस) : 'वरून चळकधार पाऊस.'– पेरणी ११५.

**चळकंप–काप** पु. १. कापरे; थरकाप; भीतीने गांगरून शरीरास सुटणारा कंप; धडकी (क्रि. भरणे, सुटणे.) : 'एकास सुटला चळकंप। गेला बळदर्प गळोनिया।'– रावि ८.६०. २. (ल.) घाबरगुंडी.

**चळका** स्त्री. एक वाद्य : 'गोमुखी चळका चौडकी दुटाळ'– हरिवि २२.२७.

**चळकापणे** अक्रि. चळचळ कापणे; कंपायमान होणे; भीतीने कंप सुटणे : 'तिचें उभे शरीर चळकांपले.'– अहा १८.

**चळकी** स्त्री. जोराचा प्रवाह; लोंढा (एखाद्या रसाचा किंवा पदार्थाचा) : 'चिपळ्या चळक्या भळाळ। चपळ पाणी।।'– दास ११.७.४.

**चळचळ–ळा** क्रिवि. १. थरथर; लटलट (कापणे) : 'मान कापे चळचळां।'– दास ३.५.३८. २. चळचळ असा आवाज होऊन; फळफळा (अति भयाने, गांगरून मुतणे) : 'नदी फुंफाती चळचळ रे रे।'– दावि २५२. [सं. चल्]

**चळचळाट** पु. १. विपुलता; रेलचेल; चंगळ; लयलूट (खाद्य, पदार्थ, पक्वान्ने इत्यादींची). (कुण.) २. समृद्धी; वैपुल्य (गाई, म्हशी, गुरे, धान्य, पैसा इत्यादींचे). पहा : **चळाळ**

**चळचळाट** पु. १. दबदबा; दरारा; धाक : 'तिच्यानं चेव येऊन खुशालचंद असलेल्यांच्या घरादारात चळचळाट निर्माण करता यावा.'– बएरा ४१. २. भीतीने थरथर कापणे.

**चळचळाट** पु. प्रसार; हालचाल; फैलाव; जोरा : 'यंदा तोतयांचा चळचळाट भारी झाला.' – ऐलेसं २५४३.

**चळचळीत** वि. १. विपुल; भरपूर; समृद्ध; प्रचुर; पुष्कळ (मेजवानीचे प्रसंगीचे उत्तमोत्तम पदार्थ). २. मिष्ट पदार्थांची चंगळ असलेली (मेजवानी). (कुण.)

**चळचूक** स्त्री. (सर्वसमावेशक अर्थी) दोष; हयगय; चूक; कमतरता; टंगळमंगळ; कमजास्तपणा.

**चळण** न. चलनवलन; चैतन्य; हालचाल; जिवंतपणा : 'जोवरी चळण गा तोंवरी म्हणती माझा ।'– तुगा ३५१. [सं. चलन]

**चळणे** अक्रि. १. खुळा, मूर्ख, भ्रमिष्ट होणे, बनणे : 'कार्या कार्य न समजे चळला तो वृद्ध काय सांगावे।'– मोभीष्म ११.१६. २. क्षुब्ध होणे : 'चळला वायू वाहटुळी। चेष्टे तैसा।'– ज्ञा १८.६६६. ३. चूक करणे; प्रमाद होणे; घसरणे. ४. च्युत होणे; ढळणे; हलणे; सोडून जाणे.

५. चालणे : 'कां उचलिलें वायुवशें। चळे शुष्क पत्र जैसें।'– ज्ञा ३.६१. ६. निसटणे; वगळला जाणे; स्मरणातून जाणे; नाहीशी होणे : 'सगुण भक्ती ते चळे।'– दास ४.१०.३१. ७. दीर्घ रोदन करणे; एकसारखे रडणे (मूल). (को.)[सं. चलन] (वा.) **चळो का पळो करणे** – सतावून सोडणे. (प्र.) सळोकापळो करणे.

**चळत–थ** स्त्री. १. गड्डी; चवड; रास; ढीग; उतरंड : 'सदा उच्छिष्टांच्या उचलिसि असंख्यात चळथा।'– सारुह ६.१५२. २. समुदाय : 'म्हणूनि असुराचिया चळथा।'– मुआदि ४९.११०. ३. रांग; पंक्ती : 'मम क्षेमें चालती चळथा। कपि पुंगवाचिया।'– कृमुरा २.७८.

**चळत(थ)णे** उक्रि. रचणे; रास करणे.

**चळतागुण्या** पु. सुतारकामात फळी कोनदार कापावयाची असल्यास, चळत्या काटकोनाचे कोन ज्याने आखून घेतात तो गुण्या.

**चळती** स्त्री. चळत; चवड; थप्पी : 'माझ्या माहेराला ताटवाट्यांची चळती जेऊन उठले माजे भाऊ तुझे पती'– स्त्री जी १ १७३.

**चळते** वि. चालणारे.

**चळथ** स्त्री. फेरा; पाळी; चक्र : 'अमृत म्हणे हरिभजने चुकती जन्ममरण चळथा रे।'– अमृत ११५.

**चळथ** स्त्री. फोड; फाक; तुकडा : 'फाडूनि वदन केल्या चळथा।'– निगा १८.

**चळथा** स्त्री. श्वासोच्छ्वास क्रिया.

**चळना** पु. चोळणा; पायजमा : 'चीडुका वासे : नीळिची आंगी : नीळिचाचि चळना : नीळिचें टोपरें : कवडे यांचे आभरण :'– लीचपू २०४.

**चळफळाट** पु. रागराग; संताप; जळफळाट : 'पण उधारीवाला कितीहि... चळफळाट करीत असला... तरी, केवळ खाटेवरून उठणं जिवावर येत असल्यानं वामन त्याला परत करीत असे.'– बाविबु ३१५.

**चळबळ, चळबळणे, चळबळाट** पहा : **चळवळ**

**चळबळणे** अक्रि. हालचाल करणे : 'चळबळिजे अनिळें। तें देविकेनि जी बळे।।'– राज्ञा १४.९.

**चळबळीत** वि. चांगले तेलतुपाने माखलेले; तुपट अगर तेलकट.

**चळवळ** स्त्री. १. हालचाल; चलनवलन : 'वायु चळवळेंसीं। जिराला व्योमाचिये कुसी।'– अमृता १.४८. २. अव्यवस्था; वळवळ; चांचल्य. ३. उद्योग; गडबड; खटपट : 'सामर्थ्य आहे चळवळीचें। जो जो करील तयाचें।'– दास २०.४.२६. ४. समाजात उत्पन्न केलेली जागृती; चेतना; उठावणी : 'राजकीय चळवळ करणारापाशी संपत्तीच असली पाहिजे असे नाही.'– टिव्या. ५. प्रचार; प्रसार. ६. खळबळ; अशांतता. [क. चळवळ –ळि.] [सं. चल्+वल्]

**चळवळणे** अक्रि. १. अस्वस्थ असणे : 'अस्वस्थतासूचक हालचाल करणे; हातपाय हलविणे (आजारी मनुष्याने). २. वळवळ करणे; इकडेतिकडे धावणे (मुलाने). ३. हालचाल करणे; फिरणे; हलणे : 'जें चळवळिजे अनिळें। तें देविकेनि जी निजबळे।'– ज्ञा १४.९. ४. उद्योगी असणे; खटपट करणे. [सं. चल्+वल्]

**चळवळाट** पु. अतिशय मोठी चळवळ; क्षुब्धता; मोठी खळबळ.

**चळवळे** वि. (पु.अ.व.) चपळ : 'चळवळे दिसत असा'– इप्र ४४४.

**चळवळ्या** वि. १. चळवळ करणारा; अचपळ; चुळबुळ्या. २. उलाढाल्या; साहसी; चबढब्या. ३. प्रचार, प्रसार करणारा. ४. लोकांत जागृती उत्पन्न करणारा : 'श्री. शिंदे हे राजकीय चळवळ्ये नाहीत.'– के १७.५.३०.

**चळविणे** उक्रि. १. वेड लावणे; खूळ लावणे; बुद्धिभ्रंश करणे; मूर्ख बनविणे; २. गोंधळविणे; आडमार्गात, भ्रमात, घोटाळ्यात घालणे.

**चळविणे** उक्रि. हलविणे; सरकवणे; सरकू देणे.

**चळाचळ–चळा, चळाळा** पहा : **चळचळा**

**चळाळ** पु. १. भीतीने लटलट, थरथर कापणे; थरकाप. (क्रि. सुटणे, होणे.) २. खळाळ; खळखळ आवाज : 'शुष्क जळाचे चळाळ। धारा धबाबे खळाळ।'– दास ११.७.४.

**चळाळणे** अक्रि. १. भळभळा वाहणे; फळफळणे. २. प्रवाह सुरू होणे.

**चळिया** स्त्री. चंचलता.

**चळित्र** न. चलनवलन करणारा प्राणी; सरपटणारा प्राणी : 'सरसर सरसर करीत डब्यांतलं चळित्र बाहेर पडलं...चांगला जातिवंत, तरुण नाग होता.'– स्मगा ४७.

**चळी** स्त्री. सांडणे; सांडलवंड; सांडलेला पदार्थ. [सं.]

**चळी** स्त्री. लाटा; धारा : 'अहंकाराचिया चळिया। वरि मदत्रयाचिया उकळिया'– ज्ञा ७.७५. (वा.) **० पडणे** – चळणे; नाहीशी होणे; उडून जाणे; दूर होणे (झोप इ.).

**चळी** क्रिवि. चळचळ : 'चळीं कांपती लागला घायवारा।'– दावि ४६५.

**चळे** न. धान्य काढून घेतल्यामुळे सैल झालेला मुडा, जुडी. [सं.]

**चळेल** वि. चळ लागलेला, वेडा; भ्रमिष्ट; खुळचट; पागल.

**चळोबळिक** स्त्री. चुळबूळ; चळवळ; विकारोत्कटता; : 'फुन बहुतां चळोबळिकां पुढें रींगतांती।'– शिव ६६८.

**चक्षु–क्षू,चक्ष** पु. डोळा; नेत्र; नयन; आख : 'बाह्यत्वचा श्रवण। चक्षु रसना प्राण। हे पंचविध जाण। इंद्रियें गा।'– ज्ञा १८.४९९; 'जगीं पाहता ज्ञानचक्षीं न रक्षे।'– दावि ५७. २. दृष्टी. ३. दिव्य ज्ञान [सं.चक्षुस्]

**चक्षुमान** वि. १. ज्याला डोळे आहेत असा; पाहणारा; डोळस. २. ज्याचे डोळे सुंदर आहेत असा. [सं.]

**चक्षुराग** पु. १. डोळ्याची लाली. २. प्रेमकटाक्ष. [सं.]

**चक्षुरिंद्रिय** न. नेत्ररूप इंद्रिय; नजर; दृष्टी. [सं.]

**चक्षुरुन्मीलन, चक्षुर्दान** न. डोळे उघडणे; दृष्टी देणे. मूर्तीची प्राणप्रतिष्ठा करताना किंवा दक्षिणाचाराच्या संप्रदायाच्या विधीत मूर्तीला दृष्टी देण्याचा किंवा तिचे नेत्र उघडण्याचा विधी. [सं.]

**चक्षुर्वैसत्यं** वि. क्रिवि. डोळ्यांनी पाहिले ते खरे; प्रत्यक्ष पाहिलेला : 'थेऊरचा चक्षुर्वैसत्यं वृत्तांत आपल्या कानावर येईल.'– स्वामी १८.

**चक्षुष्मान** वि. १. ज्याला डोळे आहेत असा म्हणजे डोळस. २. सुंदर डोळे असलेला.

**चक्षुश्रवा** पु. (डोळे हेच ज्याचे कान आहेत असा) सर्प; शेष. [सं.]

**चक्षुष्पथ** पु. क्षितिज.

**चंक्रमण** न. १. (शाखाचंक्रमणाचे संक्षिप्त रूप, वानराचे या फांदीवरून त्या फांदीवर उड्या मारणे यावरून) कसेतरी जाणे; उड्या मारीत जाणे.

२. असंबद्ध, असंगत किंवा बेशिस्त अभ्यास. [सं.] ३. चालणे; फेरा : 'चंक्रमण उत्सुर्गु। मळमूत्रांचा।।'– राज्ञा १३.११९.

**चंख** पु. १. अलगुजासारखे एक वाद्य : 'हातात घेऊन चंग रंग जमवीला।' – होपो १५. २. मोठा डफ. ३. (ल.) घुंगरासारखे वाजवणारे कडे : 'हरिनामे वाजवि चंग, अहो चंग।'– देप ६६. ४. घुंगुरमाळ; चंगाळ; बैलांच्या गळ्यात घालावयाची घुंगराची माळ. [फा.]

**चंग** पु. दातात धरून वाजवावयाचे एक पोलादी वाद्य.

**चंग** पु. वावडी उडवताना फडफड वाजण्यासाठी तिला लावण्याचा कागदाचा फरारा. पतंगाची शेपटी. (ना.)

**चंग** पु. चंगकांचनी गंजिफाच्या आठ रंगांतील पहिला रंग.

**चंग** पु. पैज; प्रतिज्ञा. (वा.) ० **बांधणे**– १. उद्युक्त होणे; कंबर बांधणे; २. पैज, फुशारकी मारणे; खात्रीपूर्वक सांगणे; प्रतिज्ञा करणे : 'सळो की पळो करायचा चंग बांधला काय?'– जमा २५.

**चंग** वि. १. चपळ; चलाख; चुणचुणीत; हुशार; तैलबुद्धीचा (मुलगा). २. चांगले; सुरेख. [सं.]

**चंगकांचनी** वि. गंजिफाचा एक जुना प्रकार. या गंजिफाच्या जोडांतील आठ बाजूंची नावे चंग, कांचन, वरात, कुमाश, ताज, मुलाम, रूप व समशेर. याहून दशावतारी गंजिफा हा निराळा प्रकार आहे.

**चंगचिलकत, चंगचिलत, चंगचिल्लत–द, चंगच(चि)ल्ली** स्त्री. गंजिफाच्या खेळातील काही विशिष्ट संज्ञा. खेळात शेवटी शेवटी दोन रंगांची पाने राहिली असता खेळणाराने एक पान उताणे पडावे म्हणून दोन पाने जुळवून वर उडवण्याचा प्रकार. पहा : **चंचल**

**चंगन्या** पु. नाच्या (मुलगा). (अहि.)

**चंग(गा)राणी** स्त्री. १. प्रेमातील स्त्री; प्रिय पात्र; अतिपरिचित स्त्री. २. चंग डावातील राणी.

**चंगळ–ळी, चंगळपट्टी–वटी** स्त्री. १. वैपुल्य; प्रचुरता; ऊरपूर; समृद्धी; रेलचेल; लयलूट. (क्रि. उडणे.) २. समृद्धता; भरभराट; चालता काळ; सधनता; सुबत्ता; वैभवाची स्थिती. ३. परिपूर्णता; तृप्ती. ४. चैन; मजा : 'बळवंतरावांच्याबरोबर प्रवास केला म्हणजे या बाबतीत चंगळ असायची.'– दुर्दम्य २.४६. [सं. चंग]

**चंगा** वि. क्रिवि. १. चांगला; निर्मळ; शुद्ध; पवित्र. जसे :– मन असे चंगा तर काथोटीत (काटवटीत, लाकडी परात, भांडे) गंगा. २. चांगली; रुचकर; उत्तम; चखोट. ३. निकोप. [सं. चंग]

**चंगाल** पु. १. पंजा. २. पक्ष्याच्या पायाच्या नख्या. [फा.]

**चंगाळ–ळी** स्त्री. १. चंगळ; वैपुल्य; समृद्धी. २. परिपूर्ती; रेलचेल; अतितृप्ती. पहा : **चंगळ**

**चंगाळ–ळे** न. बैलांच्या गळ्यात, गाडीच्या भोवताली लहान घंटांची बांधतात ती माळ; घुंगुरमाळ : 'ऊसगाड्यांच्या बैलांच्या चंगाळ्यांचे आवाज.'– शिदोरी ३८. [गु. चंग]

**चंगीफंदी** पु. छंदीफंदी; व्यसनी; वाईट सवयी असलेला : 'तो चंगीफंदी व नालायक असल्याने...'– सप्तदशी २१९.

**चंगीभंगी** पु. १. दुर्व्यसनी; बदफैली; उनाड : 'इतर श्रीमंत मुलांप्रमाणे तो चंगीभंगी न निघता अभ्यासीही निघाला.'– गणप १३. २. भांग, गांजा वगैरे व्यसनांच्या अधीन : 'पुण्यामुंबईहून चंगीभंगी लोक गोव्यात येतात.'– अक्षर १३५. [गु. चंगी+ भांग]

**चंगीभंगी छत्तिसरंगी** व्यसनी; रंगढंग करणारे; छटेल; बदफैली : 'चंगीभंगी छत्तिसरंगी अशा लोकांचा सुळसुळाट... झाला आहे.'– संक २.

**चंगील** वि. भरपूर : 'चंगील तूप पोळीवर'– जोफुसग्रं ५६.

**चंगेरी** स्त्री. परडी; लहान टोपली; करंडी : 'रात्री मीर पोकद अली याचे कबील्याकरिता मिठाई पन्नास खाने व फुले चंगेऱ्या व पानसुपारी...दौलाचे हवेलीस पाठविले.'– मइसा ७.२२६.

**चंगोन्या, चटोऱ्या** चांगले चुंगले खाणारा. (अहि.)

**चंगोली** स्त्री. भाड्याने किंवा रोजाने केलेले काम.

**चंघी** प्रा.वि. वेगवान.

**चंच** वि. १. धूर्त; हुशार; दक्ष; वाकबगार; चतुर. २. तल्लख; चपळ; चलाख; तरतरीत. पहा : **चंचिबाग** [सं. चंच् = उड्या मारणे]

**चंच** पु. कसून घेतलेली व सूक्ष्म अशी तपासणी, परीक्षा; बारीक तपासणी, चौकशी. (को.)

**चंचकारी** स्त्री. गोडगोड भाषण; खुशामती बोलणे : 'धरूनि चंचकारी मुषारा सगट। करूनियां गट्ट धीट जालों।'– दावि २४०.

**चंचनी** वि. एक प्रकारचे रेशमी वस्त्र; एक घर हिरवे, एक काळे उभार, आडवणही एक घर हिरवे व एक काळे. किनार कोणत्याही प्रकारची असे रेशमी (लुगडे, वस्त्र).

**चंचरीक** पु. भ्रमर : 'चतुरचंचरिकांची मांदी...गुंजारवें गर्जती।।'– मुआदि १.४४४.

**चंचल–ळ** वि. १. हलणारा; सरणारा; कापणारा; डगमगणारा; धावणारा. २. अस्थिर; अधीर; लहरी; तरल. ३. क्षणभंगुर; अशाश्वत; क्षणिक; फार वेळ न टिकणारे; उडून जाणारे; नाहीसे होणारे. ४. नाचरी; चाळक; स्वैरिणी; स्वेच्छाचारी (स्त्री). ५. चलाख; तल्लख. : 'चंचळीं चंचळ निश्चळीं निश्चळ।'– तुगा ३८.६५. [सं.]

**चंचलता** स्त्री. १. अस्थिरता; अनिश्चितता; अशाश्वतता. २. संक्रमावस्था : 'इंग्लडच्या इतिहासाचा हा काल पराकाष्ठेचा चंचलतेचा असल्यामुळे नाटककारास आपल्या नाटकांत गुंफण्याजोग्या पुष्कळ गोष्टी त्याच्या डोळ्यांपुढे घडत असतील.'– विकार.

**चंचलताप्रधान** वि. (मानस.) आनंद व दुःख यांची सारखी आवर्तने जिच्या वर्तनात दिसून येतात अशी (व्यक्ती).

**चंचळवेळ–ळा** स्त्री. दिवसाच्या किंवा रात्रीच्या तीस घटकांच्या आठ विभागांपैकी एक. पहा : **वेळ**

**चंचळाकार** वि. क्षणभंगुर; अल्पजीवी : 'चंचळाकार तितुकी माया। माईक जाय विलया।'– दास ११.२.९.

**चंचा** स्त्री. १. गवत, काड, पेंढा किंवा भुसा भरून ठेवलेली मनुष्याकृती; बुजगावणे. २. (ल.) रोडका, अशक्त; हातपाय अधू किंवा काडीसारखे आहेत असा माणूस; पेंढ्याच्या माणसाप्रमाणे हातपाय निर्जीव, लुळे असणारा मनुष्य. [सं.]

**चंचि(चु)बाग–ज** वि. १. हुशार चतुर; कर्तबगार; शहाणा; दक्ष. २. चपळ; तल्लख; चुणचुणीत.

**चंची** स्त्री. १. सुपारी, कात, लवंगा, विड्याची पाने इत्यादी सामान ठेवण्याची, निरनिराळे चढते कप्पे असलेली पिशवी. ही वळकटी करून गुंडाळता येते; बटवा : 'मार्मिकरावांच्या चंचीतला हळूच एक बार भरला.' – नाकरु ३.३५. २. पिशवी, घड्याळ, चष्मा इ. चे घर. [क.संचि][सं.चंच]

**चंची पडणे** मरणे : 'चंची पडलों तरि येणें। मज नाहीं त्रासिला।।' – क्रिपु ४४.९२.

**चंचु–चू** वि. निष्णात; हुशार. [सं.]

**चंचुक** न. (सर्पाच्या) नाकाच्या टोकाला असलेला चोचीसारखा खवला : 'चंचुकाच्या जागी मस्तकाचे टोक उंचावलेले' – भास ८६.

**चंचुपात्र** न. (शाप.) सपाट तळ व निमुळता आकार असलेले प्रयोगशाळेत वापरण्यात येणारे काचपात्र.

**चंचुप्रवेश** पु. अल्प शिरकाव होणे; किंचित पगडा बसणे; थोडीशी वाट, वाव मिळणे; थोडा हात शिरकणे. [सं.]

**चंट** वि. वस्ताद; धूर्त; बनेल; चपळ; चाणाक्ष; बेरकी : 'त्याला वाटलं ही पोरगी भलतीच चंट आहे.' – जॅकपॉट १८९. [हिं.]

**चंड** पु. १. महादेवाच्या मूर्तीजवळ बसवलेली ओबडधोबड दगडी मूर्ती. हिला महादेवाचा गण समजतात; स्कंध. २. यमकिंकर. [सं.]
वि. १.रागीट; क्रोधिष्ट; तामसी; तापट; उग्र. २. (समासात) जोराचा; कडक; तीव्र; प्रखर. उदा. चंडवात, चंडांशु, चंडकिरण : 'चंडवातें ज्योति। आहत जैसी।' – ज्ञा २.३२३. ३. मोठा; विशाल; अवजड; अवाढव्य; स्थूल : 'किंवा घालून चंडपाषाण !' – रावि २०.२७.[सं.]

**चंडकर, चंडकिरण, चंडारा, चंडांशु – शू** पु. सूर्य. [सं.]

**चंडकाई, चंडाबाई** स्त्री. एक देवता : 'देवी नामें वडजाई वाघजाई...चंडकाई या देवतांच्या बाबतींत, चहूंकडे आंग्लाई, मोंगलाई माजून राहिली असून...' – खेया ५६; 'तुकाई यमाई नमूं चंडाबाई।' – दावि ११८. [सं. चंडी]

**चंडगो** पु. माशाची एक जात. हे अश्विन कार्तिकात सापडतात. (को.)

**चंडघाई** स्त्री. प्रखर घाव; भयंकर प्रहार : 'निर्जरांची दिव्य शरीरें। चंडघाई शतजर्जरें।' – मुआदि ६.५६.

**चंडप्रचंड** वि. १. प्रखर; तीक्ष्ण; तीव्र; जालीम; जाज्वल्य. २. वरचढ; जास्त प्रखर; एकापेक्षा एक अधिक जालीम; तल्लख; ३. कडक; अवाढव्य : 'वतनाचे रक्षण करणाऱ्या चंडप्रचंड दिक्पालांबद्दल...' – शसौ २०. [सं.]

**चंडमुंड** पु. १. दोन प्रबल दैत्यांची नावे. २. (ल.) शौर्य, बल, विद्या इत्यादी गुणांनी सारख्याच विख्यात असलेल्या जोडीला म्हणतात.[सं.]

**चंडळ** न. भिंत, जमीन, दगड इ.चा उखळून निघालेला ढलपा, तुकडा किंवा खड.

**चंडा** पु. कथाकलीतील कर्कश नादाचे टोलासारखे तालवाद्य.

**चंडातक** पु. लहान चोळी; काचोळी : 'तदुपरि तिस अर्पी पीत चंडातकातें।' – सारुह ८.७४. [सं.]

**चंडायुधनक्षत्रदोष** पु. हर्षण, वैधृति, साध्य, व्यतिपात, गण्ड व शूल हे संपण्याच्या वेळी असणाऱ्या अशुभ चंद्रनक्षत्रामुळे होणारा दोष. ती शुभकार्यात संपूर्ण वर्ज्य करावी असे म्हणतात. – सुज्यो ४०५.

**चंडाल–ळ** पु. १. ब्राह्मण स्त्री व शुद्र पुरुष यांपासून झालेल्या संततीच्या जातींपैकी; अंत्यज. २. (ल.) नीच; अति पापी मनुष्य. ३. क्रूर, राक्षसी, अधम, भयंकर, दुष्ट असा मनुष्य अगर कृत्य.
वि. दुष्ट; निर्घृण; अत्यंत वाईट. [सं.]

**चंडालवृत्ति–ती** स्त्री. अधमता; नीचपणा; अघोरपणा; भयानकत्व; अत्यंत दुष्टपणा; कापट्य; क्रौर्य.
वि. अधम; नीच; दुष्ट; उलट्या काळजाचा.

**चंडाळ** पु. अपवित्रता; अशुद्धपणा : 'कसला आलाय विटाळा न चंडाळ' – माजीगा ४८.

**चंडाळखत** न. रद्द झालेले, मुदतीबाहेर गेलेले, निरुपयोगी दस्तैवज रोखा, कर्जफेड झाल्यानंतर कुळाचा सावकाराजवळ राहिलेला दस्तैवज.

**चंडाळचौकडी** स्त्री. दुष्ट माणसांची जूट; कुटाळखोर लोकांची टोळी; टवाळ कंपू.

**चंडाळण्या** स्त्री. अव. खटाळ्या; खोड्या. (व.)

**चंडाळी** स्त्री. १. दुष्ट कृत्य; नीचपणा; विक्षिप्तपणाची, राक्षसी कृत्ये; क्रोधाचा किंवा संतापाचा झटका. २. संतापलेल्या मुलाचे मोठमोठ्याने आरडणे–ओरडणे; उच्छृंखल, बेताल होऊन वेडेचार करणे. (क्रि. येणे.)

**चंडाळी–ळीण** स्त्री. १. चंडाळ जातीची स्त्री. २. (ल.) अत्यंत ओंगळ, किळसवाणी स्त्री. ३. तामसी, पाषाणहृदयी, अघोर कृत्ये करणारी स्त्री; कैदाशीण. [सं.चंडाल]

**चंडांशु–शू** पु. सूर्य. [सं.]

**चंडिका, चंडी** स्त्री. १. दुर्गादेवता; महांकाली; भवानी : 'सुवर्णाचिया चंडिका। सुवर्णशूळेचि देखा।' – ज्ञा १८.४४४ २. (ल.) (चंडीसारखी) अति रागीट, कैदाशीण, निर्दय स्त्री.[सं.] (वा.) **चंडिकेचा अवतार धारण करणे** – अतिशय क्रुद्ध, संतप्त होणे : 'दादा जाताच मी एकदम चंडिकेचा अवतार धारण केला.' – अचावा ५२.

**चंडी** पु. १. चंडी मंत्र; दुर्गादेवतेला इष्ट फल प्राप्तीसाठी केला जाणारा मंत्र जप : 'कोणी गृहस्थ एका भटापासून एक चंडी म्हणवितो (आणि त्यास रुपया देतो)' – लोश ३४५. २. राग; आततायीपणा. [सं.]

**चंडीष–स** वि. चंडीला, देवतेला अर्पण केलेले सबब निषिद्ध. ईश्वरार्पण; कृष्णार्पण; देवतेचे : 'हे मज आतां चंडीष की : म्हणोनि नेघतीचि :' – वृद्धाचार ७.

**चंडोल** पु. १. एक गाणारा पक्षी. २. (ल.) हुशार; बोलका माणूस : 'वाटेल त्याच्या मनांतील हालचाल ओळखणारे चंडोल पुरुषोत्तमराव पडले ना !' – इंप १०. ३. रंगेल, आनंदी प्राणी. ४. नीटनेटका, ठाकठिक्या, छबडा, गोजिरवाणा माणूस. [हिं.]

**चंडोल** पु. सैन्याची पिछाडी; सैन्याच्या पिछाडीची रक्षक फौज : '(निजामाचा) चंडोल अगदीं बुडविला.' – मइसा १.२५७.

**चंडोल** पु. सर्व बाजूंनी व्याप्त करण्याची क्रिया.

**चंडोल** पु. अफू, विड्याची पाने इत्यादिकांचे बनविलेले मिश्रण; अमली पदार्थ : 'चंडोल उपासक हातपाय ताणून...' – सामा २००.

**चंडोलखाना** पु. अफू किंवा चंडोल तयार करण्याची किंवा ओढण्याची जागा, स्थळ. [हिं.]

**चंत्त** वि. चतुर, हुषार, चलाख.
**चंद** पहा : **चांद**
**चंद** वि. काही; थोडे. [फा.]
**चंद दर चंद** अनेक; कित्येक. विविध. [फा.]
**चंदन** न. १. एक झाड. हे २० ते ४० फूट उंच वाढते. याचे पान कडुनिंबासारखे असून लाकूड फार सुवासिक असते. २. या झाडाचे लाकूड, गाभ्याचा तुकडा, खोड. ३. (चंदनाचे) लाकूड उगाळून देवास लावण्यासाठी करतात ते गंध. ४. (ल.) नाश; धूळधाण; उच्छेद; निर्दाळण; सत्यानाश; नुकसान. (क्रि. करणे होणे.) [अर. सन्दल; त. चांदम्][सं.] (वा.) ० **उडवणे** – बरोबर नेम मारणे. (व.) ० **काढणे** – सडकून ठोकणे; यथास्थित बडविणे; चोपणे.
**चंदनकाचोळी** स्त्री. काचोळीच्या आकाराचा अंगास लावलेला चंदनाचा लेप : 'चंदन काचोल्या रेखिल्या। पाटावांच्या चोळिया।' – कापु १६.४७.
**चंदनचारोळी** स्त्री. चंदन वृक्षाचे बी.
**चंदनबटवा** पु. एक पालेभाजी.
**चंदनहौशी** वि. गुलजार; गुलहौशी; चैनी; ऐषआरामी; विषयी; खुशालचंद.
**चंदनी** वि. चंदन काष्ठाचा (चौरंग, देव्हारा, तेल इ.).
**चंदनी–न्या पोपट,** विशिष्ट जातीचा पोपट; याच्या गळ्यावर व पंखावर तांबड्या रेषा व पट्टे असतात.
**चंदनेल न.** चंदनाचे अत्तर, तेल.
**चंदर** पु. एक वृक्ष; यास चांदा, चांदाडा, चांदवडा असेही म्हणतात. याची पाने एका बाजूस वाटोळी व शेवटी निमुळती होत गेलेली असतात.
**चंदराई** वि. चंदर वृक्षाच्या पानासारखे: वाटोळे व शेवटी निमुळते होत गेलेले : 'शामियान्याचे सोन्याचे चंदराई कळस उन्हात तळपत होते.' – श्रीयो २४२.
**चंदरी** स्त्री. ध्यास. [सं.]
**चंदरी** स्त्री. चांदणी; मुखाची शोभा. (व.) [फा.]
**चंदा** पु. १. वर्गणी; सर्वसाधारण पट्टीचा अंश, हिस्सा. २. वर्गणीने पैसे गोळा करणे, उभारणे. (क्रि. करणे.) [फा.]
**चंदा** पु. चंद्र. पहा : **चांद** [सं.]
**चंदाचंदी** स्त्री. लुगड्याची एक जात : 'चंदाचंदी ओर कलंदर।' – अमृत ४९.
**चंदाजी** पु. आगंतुक; अनाहूत. (व.)
**चंदी** स्त्री. १. घोडा, उंट इत्यादींना नित्यशः देतात तो दाणा. २. (ल.) कुटुंबाला दररोजचा लागणारा खर्च अगर सामुग्री. (क्रि. चालणे.) पैसाअडका. ३. उकाडा; रतीब (दूध इत्यादींचा). (ना.) [हिं.](वा.) ० **वाढवून खाणे** – चांगली मेहनत करून आपला मुशाहेरा वेतन वाढवून घेणे; आपल्या गुणांनी वर येणे.
**चंदीदाणा** पु. गुरांचा घास, कडबा : 'वेठबिगार चंदीदाणा, चोरटी वर्गणी वगैरे.' – खेया.
**चंदीवैरण** स्त्री. (ल.) योगक्षेम; जेवणखाण : 'तुम्ही व्याख्यान देत हिंडताना तुमची चंदीवैरण हे गरीब लोक चालवणार !' – धाधो ४१४.
**चंदुलाल** पु.१. या नावाचा निजामाचा एक मुख्य दिवाण होता. याचा दानधर्माबद्दल लौकिक असे. २. (ल.) फाजील दानशूर, उधळ्या, चैनी माणूस.
**चंदेरी–ली** वि. चंदेरी गावी तयार केलेले, बनवलेले किंवा त्या गावासंबंधी (वाटी, पातेली, पागोटं, शेला). 'नाना भाऊंनीं करून पोषाग चंदेरी तऱ्हा।' – ऐपो १११.
**चंदेरी** वि. १. चांदण्याचा; चांदण्यातील. २. चांदीसारखे चमकदार; रुपेरी.
**चंदोरी** स्त्री. (उप.) पातळ भाकरी; चांदकी. [सं. चंद्र]
**चंद्र** पु. १. आकाशात दिसणारा, कला असलेला एक सूर्यप्रकाशित गोल; पृथ्वीचा उपग्रह; नवग्रहांतील दुसरा ग्रह; चंद्रमा; चांद; चांदोबा; सोम. २. मुसलमानी तारीख. ३. (ल.) गाई, म्हशी इत्यादिकांच्या कपाळावरील पांढरा ठिपका. ४. स्त्रियांच्या कपाळावर गोंदलेली अर्धचंद्राकृती कोर. ५. मोराच्या पिसातील डोळा. ६. चंद्रामृत : 'तैसें शरीर होये। जै वेळीं कुंडलिनी चंद्र पिये।' – ज्ञा ६.२.५९. ७. स्त्रियांच्या नाकातील किंवा डोक्यातील एक चंद्राकार दागिना. –(तंज्ञा)[सं.] (वा.) (सुताने) ० **ओवाळणे** – द्वितीयेच्या दिवशी दिसणाऱ्या नूतन चंद्रावरून सूत किंवा दशी ओवाळणे. यामुळे नवीन वस्त्रे मिळतात अशी समजूत आहे. ० **पिकणे** – पूर्ण चंद्रबिंबाचा प्रकाश पडणे : 'चंद्र पिकलासे अंबरीं । तें पिक घ्यावे की चकोरीं।' – कक १.८.६२.(माण.) **चंद्राने कोंबडा करणे** – चंद्राला खळे पडणे.
**चंद्रकर** पु. १. चंद्रकिरण : 'हारपली कां चंद्रकर। फांकतां जैसे।' – ज्ञा १८.४०६. २. चंद्रकळा लुगडे : 'थाट करुनि मार नेसली चंद्रकरकाळी।' – मसाप १.१.२.
**चंद्रकला–ळा** स्त्री. १. चंद्राची कला; चंद्रबिंबाचा षोडशांश. २. चंद्राचा प्रकाश, किरण : 'जैसें शारदीयेचे चंद्रकळे –। माजीं अमृत कण कोंवळे।' – ज्ञा १.५६. [सं.]
**चंद्रकला–ळा** स्त्री. एक प्रकारची साडी; साडीचा रंग काळा किंवा लाल असतो. साधारणत: काठ लाल व साडी काळी असते. साडीच्या दोन्ही किनारांना जर असते : 'तुम्ही नेसलेल्या चंद्रकळेने तुम्ही आमच्या डोळ्यांत भरलात.' – श्रीयो ४९.
**चंद्रकंस** पु. (संगीत) मालकंस रागाशी समप्रकृती असणारा ओडव जातीचा राग. [सं.]
**चंद्रकांत** पु. १. एक रत्न, मणी; यावर चंद्राचे किरण पडले असता याला पाझर फुटतो असा समज आहे : 'अहो चंद्रकांतु द्रवतां कीर होये। परि ते हातवटी चंद्रीं कीं आहे।' – ज्ञा ९.२९. २. (भूशा.) ऑर्थोक्लेज अथवा अल्बाईट या फेल्सपार खनिजाचा मोत्यासारखी चमक असणारा, उपरत्न म्हणून वापरला जाणारा खेडा.
**चंद्रकांत** पु. (संगीत) एक राग. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर. [सं.]
**चंद्रकांति–ती** वि. चंद्रकांताचा बनविलेला (चष्मा).
**चंद्रकोर** स्त्री. १. चंद्राची कोर; २. चंद्रकोरीच्या आकाराचे एक शिरोभूषण. ३. कपाळावरची कुंकवाची लहान कोर.
**चंद्रगमनी** वि. चंद्रोदयाच्या अनुरोधाने गमन करणारा. चंद्रोदयाबरोबर खाडीस भरतीचे पाणी येऊ लागते. त्यामुळे ती वेळ निघण्यास सोईस्कर असते यावरून : 'त्याजवरीन हे तेथून चंद्रगमनी होऊन होडीस पांच

रुपये देऊं करोन आले.'– मइसा १०.१५७.

**चंद्रग्रहण** न. पौर्णिमेला पृथ्वी ही सूर्य आणि चंद्र यांच्यामध्ये आल्यामुळे चंद्रावर पडणाऱ्या सावलीने चंद्राचा पृष्ठभाग व्यापला जाणे.

**चंद्रघार–री** स्त्री. (उप.) कानशिलावर मारलेली चपराक, चापटी. (क्रि. दाखवणे, देणे.)

**चंद्रचकोरन्याय** पु. चंद्र अमृतबिंदू स्रवतो व चकोर सेवन करतो त्यावरून एकावर दुसऱ्याचे जीवन अवलंबून असण्याचा संबंध.

**चंद्रजोत, चंद्रज्योति–ती** स्त्री. १. चंद्रासारखा प्रकाश देणारे दारूकाम : 'ओटीवर चंद्रज्योत लावली...'– गेलेदि २५. २. मोगली एरंडाच्या बिया. या जाळल्या असता चंद्राप्रमाणे प्रकाश पडतो. (व.) ३. चांदणे, चंद्रप्रकाश. ४. (उप.) कुटुंबाला लागलेला कलंक, डाग.

**चंद्रज्योत** स्त्री. डोळ्यात घालावयाचे एक अंजन. [सं.]

**चंद्रधणी** स्त्री. मनाची तृप्ती : 'जाऊं चोरूं लोणी। आजी घेऊं चंद्रधणी।' – तुगा २२८.

**चंद्रनक्षत्र** न. ज्या नक्षत्रात चंद्र असेल ते, चंद्राधिष्ठित नक्षत्र. [सं.]

**चंद्रपर्व** न. चंद्रग्रहणाचा काल, अवधी. [सं.]

**चंद्रप्रभा वटी** अतिसारावरील एक गुणकारी रासायनिक औषध.

**चंद्रफूल** न. सोन्याचा, केसात घालायचा एक दागिना.

**चंद्रबल–ळ** न. १. चंद्राची जन्मराशीस असलेली अनुकूलता. २. (ल.) मदत; साहाय्य : 'नेदावे चोराशी चंद्रबळ ।– तुगा ३२५३. (वा.) **ओढून चंद्रबळ आणणे** – १. इष्ट गोष्टीविषयी वरपांगी अनिच्छा दाखवणे; आढेवेढे घेणे : 'आजीने मला हाका मारल्या मी बराच वेळ उं उं करून ओढून चंद्रबळ आणिले...शेवटी दुर्गेनि मला ओढून नेलें.'– पलकोघे. २. अंगी प्रतिष्ठा नसताना बळेच तिचा आव आणणे. **एखाद्यास चंद्रबळ देणे** – एखाद्याला कार्य करण्यासाठी उत्तेजन देणे.

**चंद्रबाली** स्त्री. कानात घालावयाचा एक मोत्यांचा दागिना.

**चंद्रबिंब** न. चंद्राचे बिंब, मंडल, गोल. [सं.]

**चंद्रभाल** न. एक शस्त्र.

**चंद्रम** पु. चंद्र : 'पाण्या पाण्या रे जमीन। ओली कर रे अजून।। वर येऊ दे चंदन। आड लपू दे चंद्रम।।'– गआचा १२०.

**चंद्रमणि–णी** पु. एक काल्पनिक रत्न. पहा : **चंद्रकांत** [सं.]

**चंद्रमंडळ** न. १. चंद्रलोक; चंद्रभुवन; चंद्राचे राज्य. २. चंद्रबिंब.

**चंद्रमा** पु. १. चंद्र. २. एक शिरोभूषण : 'एक कोटी चंद्रमे...पंचवीस लक्ष येलुरी होन...'– श्रीयो २.४९२.

**चंद्रमूलिका, चंद्रमूळ** स्त्री. न. एक औषधी वनस्पती. [सं.]

**चंद्रमौळी** वि. ज्याच्या छपरातून चंद्रकिरणांचा प्रवेश आत होतो असे (म्हणजे मोडकळीस आलेले, जीर्ण झालेले) घर, इमारत. पडक्या घराला व्याजोक्तीने म्हणतात : 'चंद्रमोळी झोपडीत वास्तव्य करणार'– बिजी १५४. [सं.]

**चंद्र(द्रा) य** पु. चांदवा; छत; चांदणीमंडप :'चौ भुता वरुतें काए केले। तेया शोभवंते आकास रचिलें। चंद्रयाचे परी विस्तारिलें। विशाल बरवें ।'– क्रिपु १.२.४१. [सं. चंद्र + आयत]

**चंद्ररेखा** स्त्री. चंद्राची कोर : 'पाडिव्याची चंद्ररेखा। निरुती दावावया शाखा।'– ज्ञा १५.४७०. [सं.]

**चंद्ररेणुवृत्ति–त्ती** स्त्री. वाङ्मयचौर्य; दुसऱ्याचे लेखन स्वत:च्या नावावर प्रसिद्ध करणे : 'हे भाषांतर आहे असे ग्रंथकर्त्यानें प्रस्तावनेत म्हणावयाचें होतें; अशी चंद्ररेणुवृत्ति धरावयाची नव्हती.'– निबंधचं १४.३०.

**चंद्रवट** न. पोलादाचा एक प्रकार.

**चंद्रवंती** स्त्री. चांदणे : 'नदीतटीं रात्रीं न चंद्रवंती।'– राग्रं. (जगन्नाथ) (शके १६६९).

**चंद्रवेली** स्त्री. एक गुन्हेगार पंथ.

**चंद्रशाला** स्त्री. उंच माडी; गच्ची : 'चंद्रासही स्पर्शति चंद्रशाळा।'– सारूह ५.२०.

**चंद्रशिला, चंद्रोपल** स्त्री. पहा : **चंद्रकांत**

**चंद्र(द्रु–द्रो)स** पु. एका झाडाचा सुवासिक चीक; राळ. निघंटात यास सर्जनिर्यास म्हटले आहे : 'धावटीची साल, चंद्रस... लोखंड या गलबते बाधणाऱ्या वस्तूंवर जकात आहे.'– शिआ १४९. [अ. सुंदरोस]

**चंद्रसमुद्रन्याय** पु. चंद्रोदयाने समुद्रास भरती येते या न्यायाने : 'बॉसबेल यास या महापंडिताचे (जॉन्सनचे) वक्तृत्वसेवन करण्याची...अतोनात इच्छा होती व इकडे जॉन्सन यासहि कोणी भाविक श्रोता मिळाला असतां चंद्र–समुद्रन्यायाने त्याच्या वाणीस मोठे भरतें येई.'– नि ६८६.

**चंद्रसूर** पु. (योग.) डाव्या नाकपुडीने श्वास सोडणे.

**चंद्रसूर्य** पु. १. चंद्र आणि सूर्य. २. इडा व पिंगला या दोन नाड्या : 'चंद्रसूर्या बुझावणी। करूनि अनुहताची सुडावणी।'– ज्ञा १२.५४.

**चंद्रसूर्यसंपुट** न. इडा व पिंगला या दोन नाड्यांचे संगमस्थान : 'बंधत्रयाचीं घरटीं। चंद्रसूर्य संपुटीं। सूये चित्त।'– ज्ञा १३.५०८.

**चंद्रहार** पु. स्त्रियांच्या गळ्यातील अलंकार; सोन्याच्या कड्यांची माळ.

**चंद्रहास** न. खड्ग; तलवारीचा एक प्रकार. [सं.]

**चंद्रक्षय** पु. अमावस्या.

**चंद्रा** स्त्री. इडा (तीन नाड्यांपैकी एक) : 'पवन पूरो मन स्थीर करो : चंद्रा मीळावो भानु:'– लीचउ २.३१०.

**चंद्रातप** पु. १. चांदणे. २. छत, चांदवा.

**चंद्रात्मज** पु. बुध.

**चंद्रामृत** न. १. सतरावी कळा; चंद्रकिरणांतून होणारा अमृताचा स्राव : 'सूर्य विकासिनी नेघे चंद्रामृत। वाट पाहे अस्त उदयाची।'– तुगा ७५७. २. योगिक मते मस्तकात असणाऱ्या तळ्यातील अमृत : 'तंव वरिलेकडेनि ढाळें। चंद्रामृताचें तळें।'– ज्ञा ६.२४७. [सं.]

**चंद्रार्क, चंद्रार्कवरि** क्रिवि. चंद्रसूर्य आहेत तोपावेतो; यावच्चंद्रदिवाकरौ; सतत; कायमचे; निरंतर. [सं.]

**चंद्रार्ध** पु. चंद्राची कोर.

**चंद्रावळी** स्त्री. १. कृष्णाच्या अष्टनायिकांतील राहीची बहीण : 'अविद्या चोरिली चंद्रावळी।'– एरुस्व ८.२७. २. एक गाणे. ३. सुंदर स्त्री : 'नुसतीच चंद्रावळी आहे बघा.'– पाणकळा.

**चंद्रिका** स्त्री. १. चांदणे; चंद्रप्रकाश : 'जळीं चंद्रिकेचिया पसरती वेली। ते वाढी चंद्रें नाहीं वाढविली।'– ज्ञा ९.१२३. २. रंगाला येणारा तजेला, झिलई, सफाई. [सं.]

**चंद्री** स्त्री. १. तंद्री; टक; एकसारखी नजर; एकलय; एकाग्रता; चंदेरी; एकटक नजर (प्राणोत्क्रमणाच्या वेळी किंवा मद्याच्या धुंदीत) : 'चंद्री लागे होय विरूप। जठराग्निही विझे।'– स्वादि १३.५.३१. २. मनाची विचारांची एकाग्रता झाली असता बुबुळांना येणारी निश्चलता. (क्रि. लागणे.) : 'येकांच्या बैसल्या अमृतकळा। येकांस चंद्री लागली डोळां।'– दास ३.५.४. ३. अतिशय उत्कंठा; चिंता : 'परी संततीवीण दिसे दरिद्री। म्हणोनी लागली मनीं चंद्री।'– मुसमा ६.८. ४. चटक; नाद : 'लोकांस चंद्रि लागली.' – मला १५०. ५. निश्चल न बसण्याजोगी स्थिती. (वा.) (एखाद्याची) ० **भुलणे, गुंग होणे** – (हर्ष, भय, आश्चर्य यांमुळे) बावरणे; घाबरणे; गडबडणे; बेभान, गुंग होणे : 'लोकांची घरे भडभडा चेत घेताहेत... पाहशील तर चंद्री गुंग होईल.'– बाळमित्र २.१०४.

**चंद्री–द्या** वि. कपाळावर पांढरा ठिपका असणारी (गाय, बैल, म्हैस, इ.). स्त्री. चंदेरी, पितळी वाटी.

**चंद्रीबा** स्त्री. ध्यास; संमोहन. (झाडी) [सं. तंद्री]

**चंप** स्त्री. अधोली; दोन शेराचे माप. (खा.)

**चंपई** वि. चाफ्याप्रमाणे पिवळ्या रंगाचा : '(कमरबंद) चंपई रंगाचा, सव्वातीन वार लांबीचा'– खानोपो ३५. [सं. चंपक]

**चंपक** पु. एक पुष्पवृक्ष; चाफा. हिरवा, सोन व पांढरा अशा याच्या जाती आहेत : 'पतंग कवळी दीपिकलिका। मधुकर झेपावे चंपका। विवर भाऊनि सर्पमुखा। मूषक जैसा प्रवेशे।'– मुआदि २८.१९. न. चाफ्याचे फूल. [सं.]

**चंपकझेला** पु. स्त्रियांचा एक दागिना : 'बहु टवटवले मौक्तिक पाणी, अमोल्य भावी चंपकझेला।।१।।'– मंजुघोषा ४५.

**चंपकमाला** स्त्री. एका अक्षरवृत्ताचे नाव. याला रूक्मवती, रुक्मवती अशीही नावे आहेत. उदा. 'धांव मुकुंदा दृष्टविमर्दा। धांव रमेशा दुःखविनाशा।'.

**चंपकमाला** स्त्री. गळ्यात घालायचा विशेष प्रकारचा कंठा.

**चंपकललिता** न. काव्यातील एका वृत्ताचे नाव : 'चंपकललिता कवीने प्रसिद्ध 'चंपकमाला' वृत्तापासून बनवलेले आहे.'– मसं ११२.

**चंपत होणे** १. एकदम अदृश्य होणे; नाहीसे होणे. २. चटकन निघून जाणे; पळून जाणे; दडी मारून बसणे; लपून बसणे; तोंड काळे करणे (काही अपराध किंवा गुन्हा केल्यामुळे). [सं.चंप्]

**चंपरा** पु. चवडा : 'ती पायाच्या चंपऱ्यावरनं बोट दाबून बघू लागली.'– ऊन ३.

**चंपा** पु. पायाचा पंजा; चवडा : 'गुडघे वर करून टाचेला टाच आणि चंप्याला चंपा जुळवून तो सांगू लागला.'–ऊन ७८.

**चंपा** आघाडीवर असलेल्या तुकडीच्या – हरोलच्या मागचे मुख्य सैन्य व सेनापती यांचे रक्षण करणारी डावी फळी. [फा.]

**चंपा–फा** पु. चमचा.(व.खा)

**चंपा** पु. चाफा; चार बोटांचे अंतर (झाडी). [सं. चंपक]

**चंपाषष्ठी** स्त्री. मार्गशीर्ष शुक्ल षष्ठी; खंडोबाचा सण. [सं.]

**चंपाष्टमी** स्त्री. मार्गशीर्ष शुद्ध अष्टमी; खंडोबाच्या कुळधर्माचा दिवस.

**चंपी** स्त्री. १. मर्दन; अंग रगडणे, चेपणे. २. चेंदामेंदा : 'पूर्वी हत्तीच्या पायी बांधून त्याची चंपी करून सोडीत.' – विइसं २.४७. [सं. चप् = दाबणे] [गु.] (वा.) ० **उडवणे** – फजिती करणे. ० **करणे** – हजेरी घेणे; खरडपट्टी काढणे.

**चंपी** स्त्री. डोक्यावरचे संपूर्ण केस वस्तऱ्याने काढून टाकणे.

**चंपीगोटा** पु. डोक्याची तुळतुळीत हजामत.

**चंपू** पु. गद्यपद्यमय वाङ्मयप्रकार. उदा. नलचंपू, भारतचंपू, इ. [सं.]

**चंपे** पु. अव. एक खेळ : 'चंपे पेंड खडी एकीबेळी।। ध्रु.।।' – तुगा ३०८१.

**चंफा** पु. मुलांचा एक खेळ.

**चंबा** वि. तरळ; चंचल; हलणारे : 'चित्सौंदर्या चंबा नयनीं चुंबाया हृत्खंबा वरिल्या बिंबा।' – अमृत १०१. [सं.चंब]

**चंबारुमाल** पु.एक वस्त्र.

**चंबू–भू** पु. पोट मोठे पण गळा लहान असे उभट भांडे, गडवा, तांब्या; गिंडी; एक धातूचे पात्र; सुरई; गडू. [क. चंबु]

**चंबू** पु. गाल फुगवून ओठाचा गोल आकार करणे : 'छबी तोंडाचा चंबू करीत... घुमू लागली.' – शेलूक ८३. (वा.) ० **होणे** – निरुत्तर होणे; स्तब्ध बसावयास लागणे.

**चंबू (भू) गवाळे, चंबूगबाळे** न. १. सोवळे–भांडे ठेवण्याचे वस्त्र. २. भांडीकुंडी, कपडेलत्ते वगैरे सामानसुमान. ३. बिऱ्हाड; अंथरूण पांघरूण; बस्तान : 'चंबूगबाळे उचलून त्याने पळच काढला.' – एहोरा ४६. (वा.) ० **आटोपणे** – सामानाची आवराआवर करणे; बांधाबांध करणे; मुक्काम हलविणे; बिऱ्हाड उचलणे : 'आपले चंबुगवाळे आटोपून तो तुळापुरी आला.'– स्वप ११. ० **फेकणे** – बळेच आमंत्रण लावणे; आगंतुक जाणे.

**चंबेल– ली, चंबेली अत्तर** पहा : **चमेल, चमेली, चमेली अत्तर**

**चंबेल** न. मोगली एरंडाच्या बियांचे तेल.

**चंभारकुकडा** पु. कोकीळ पक्षी. (व.)

**चा** षष्ठी विभक्तीचा प्रत्यय; याचे अर्थ १. मिळकत किंवा ताबा. उदा. 'हे त्याचे घर.' २. विनियोग; विवक्षित उपयोग; योजना. उदा. 'ती स्नानाची जागा.' ३. एखाद्या क्रियेचा काल किंवा कालाचे समकालीनत्व. उदा. 'मी दुपारचा येईन'; 'तो केव्हाचा येऊन बसला आहे.' ४. संबंध; अन्वय. उदा. 'तो गावचा पाटील'; 'झाडाचे पान.' ५. पूर्ती; पूर्तता; साकल्य. उदा. 'घरचे घर = सबंध घर'; 'महिन्याचा महिना.' ६. अवस्थांतर; फरक. उदा. 'दरिद्याचा श्रीमंत होतो श्रीमंताचा दरिद्री होतो.' चा हा प्रत्यय लागल्यामुळे नामाचे रूपांतर विकल्पेकरून होते. नामरूपांतरात प्रासंगिक संबंध किंवा अन्वय दृष्टीस पडतो. उदा. 'घरचा धनी' = घरचा मालक, 'घरचा पैका' = घरापासून उत्पन्न झालेला पैसा. रूपांतर नसेल तेव्हा विशेष निकट, जवळचा संबंध, स्वाधीनता, अवलंब यासारखे अर्थ होतात. उदा. 'घरचा धनी' = कुटुंबाचा मुख्य; 'घरचा पैका' = घरातले भांडवल; 'घरची माणसे' = घरातील माणसे. 'अंगचे बळ' = शरीर सामर्थ्य. सारांश नामाचे सामान्यरूप झाले असता 'चा' हा षष्ठी विभक्तीप्रत्यय असतो. व तदभावी चा हा त्या नामास विशेषण रूप देतो.

**चाई, चाईचाट** स्त्री. पु. केसाला व लोकरीला होणारा रोग; ह्याला कातर,

कातरी, उंदरी असेही म्हणतात; कसर. (क्रि. लागणे.) यामुळे त्या ठिकाणचे केस गळून पडतात. [हिं.]
**चाई, चाईन** स्त्री. १. एक झुडूप. याची पाने खातात. २. एका वनस्पतीचे मूळ.
**चाउटी** स्त्री. १. कंटाळवाणी बडबड; बाष्कळ गप्पा. पहा : **चावटी** : 'येक म्हणती सांडा गोठी। वायाचि करिता चाउटी।' – दास ८.१०.१४. २. चावटपणा; वात्रटपणा; फाजीलपणा; भलती गोष्ट : 'भलतेंची काय रे करिसी चाउटी।'– दावि २८.
**चाउ(ऊ)री** स्त्री. १. मंडपी; घुमट; आच्छादन. २. चवरी; ३. चार पायांवरील मेघडंबरी. ४. चादर : 'काळाचेया मुकुटावरी। जयाचिये ज्ञानाची चाउरी।' – ऋव ७७. [सं. चतुर]
**चाऊ** पु. कान. चाऊमाऊ हा खेळ कान धरून खेळतात. [ते.चेवी]
**चाऊमाऊ** पु. लहान मुलांचा एक खेळ. या खेळात एकमेकांचे कान धरून 'चाऊमाऊ पत्रावळीचे पाणी पीऊ' इ. गाणे म्हणतात.
**चाऊर** पु. चावर. पहा : **चाहूर**
**चाऊर** पु. तांदूळ.(बाग.)
**चाऊल** पहा : **चाहूल**
**चाऊस** पु. पोलीस अधिकारी; जमादार. [तु.चावुस]
**चाक** न. १. यंत्र, वाहन इ.ना रथ इत्यादीस गती देणारे वर्तुलाकार साधन. २. ज्यावर दोर घालून विहिरीचे पाणी ओढतात ते चक्र; कप्पी; खराडी. ३.मडक्यास आकार देण्याचे (कुंभाराचे) साधन.४.विहीर बुजवण्यासाठी वापरायच्या भाजलेल्या मातीच्या कड्या.[सं. चक्र] (वा.) ० **आवळणे** – चाकावर नवीन धाव चढविणे. **चाक बुडणे** – सूर्य मावळणे; दिवस मावळणे. **चाक वर येणे**– १. चाकाचा खालचा भाग वर येणे यावरून. २. (ल.) अडचणीतून चांगल्या स्थितीत येणे; अवनतीमागून उन्नती होणे: 'आपल्या राष्ट्ररूपी गाडीचे चाक आता वर आले पाहिजे.'– टिव्या.
**चाक** स्त्री. दृष्ट; दृष्टिबाधा. (वा.) ० **काढणे**– मीठ मोहऱ्या ओवाळून टाकणे; लोण उतरणे. [सं.चक्षु]
**चाक** न. (शिंपी काम) तोंड, फट (कापडाला असलेली); न शिवलेला भाग.[सं.चक्र ] (वा.) ० **करणे** – फाडणे; कापणे : 'उभयतांचे पोट चाक करावे म्हणोन आज्ञा केली आहे.' – दिमरा २.८२.
**चाक** वि. नीटनेटका; चकपक; ठाकठीक; लख्ख. पहा : **चक्क** [तु. चाक् = चपळ; तयार]
**चाकचक्य** न. चकचकीतपणा; तेज; चमक; लकाकी : 'केवळ बाह्य चाकचक्याचा फार दिवस टिकाव निघत नाहीं.'– नि. [सं.]
**चाकचोप–पी** स्त्री. १. ठाकठिकी; चापचोपी. २. थाटणे; नटणे; साफ, गुळगुळीत करणे; मोठ्या दक्षतेने काळजीपूर्वक शेवटास नेणे, तडीस नेणे. ३. नीटनेटकेपणा; चकपकपणा (गुण किंवा तत्त्व या दृष्टीने असणारा); टापटीप.
**चाकचोप** वि. तडफदार; नीटनेटका; ठाकठीक; सुरेख; झकपक. पहा **: चाक**
**चाकट** वि. कठीण.
**चाकटणे** अक्रि. १. आश्चर्यचकित होणे; विस्मित होणे. २. गोंधळणे; बावरणे. पहा : **चाकाटणे** : 'सिद्ध चाकटले समस्त। जाले विस्मित महाऋषी।'– भाराकि ९.९५. ३. पश्चात्ताप होणे. (माण.)
**चाकटून** क्रिवि. भीतीने जागच्या जागी खिळून.
**चाकण** स्त्री. एका जातीचा साप.
**चाकदांडा** पु. (मोट असलेल्या विहिरीच्या) चाकाचा आस; रहाटगाडग्याचा कणा; चाकाचा फिरत राहणारा कणा.
**चाकदोरीचा खेळ** चक्रीचा खेळ; या खेळात चक्र एकदा खाली सोडले म्हणजे दोरीच्या स्थितिस्थापकत्वामुळे पुन्हा आपोआप वर येते.
**चाकपट, चाकपट्टी–पाटी** स्त्री. १. चाकाचा कणा असलेल्या लाकडाच्या दांड्या ज्यात बसविलेल्या असतात ती आडवी दांडी. 'सर्जा... असा झपाट्यानं धावायचा की चाकपटांतनं विस्तू पडावा.' – भेटी ९४. २. मोटेच्या विहिरीच्या उभ्या खांबांना जोडणारे आडवे लाकूड.
**चाकपट्टी** स्त्री. वाहनांवरील कर.
**चाकपाक** वि. नीटनेटका; व्यवस्थित; बेताबाताचा. पहा : **चकपक**
**चाकबंदी** पहा : **चकबंदी**
**चाकर** पु. कमी दर्जाचा नोकर; सेवक; गडी. [फा.]
**चाकरचुकर – नफर** पु. अव. नोकरचाकर; मजूर; हुजरे : 'आपली फजिती हा आपल्या चाकराचुकारांच्या देखत करतो.'– चाक १२५.
**चाकरचुकर** वि. भाडोत्री; मजुऱ्या; नोकरडा (चाकर निंदाव्यंजक).
**चाकरपेशा** पु. १. (समुदायार्थी) गडी; हुजरे; घरकाम करणारे सेवक. २. चाकराचे काम, पेशा, हुद्दा, पदवी; मोलमजुरी. ३. दास; नोकर; हुजऱ्या.
**चाकरमानी – न्या** वि. १. नोकरीपेशा असलेला माणूस; चाकरमाणूस; आश्रित : 'पावतो मुशारा चाकरमाना।'– दावि २११. २. पगारदार : 'चार चार चाकरमान्या मुलांचा तो धनी आहे.'– विभूत ९४.[फा.]
**चाकराचाकरी–नफरी** क्रिवि. चाकराकडून; चाकरामार्फत.
**चाकरी** स्त्री. चाकराचे काम; सेवा; नोकरी; शुश्रूषा : 'स्वदास समयीं जपे तरि न देवरा चाकरी।' – केका ८४. [फा.]
**चाकरीचुकरी** स्त्री. (व्यापक.) रोजगार; नोकरी; धंदा; काहीतरी उद्योग : 'तेव्हा शेवटी त्याला सुख पाहिजे तर कोठेतरी चाकरीचुकरी धरून बाहेरगावी जाऊन स्वतंत्रपणे राहील तेव्हाच !' – पलकोघे ४४१.
**चाकरीचोर** वि. अंग चोरून किंवा चुकारपणाने काम करणारा; चुकारतट्टू.
**चाकरीया जमीन, चाकरिया** स्त्री. नोकरी करण्याच्या कबुलीने सारा न घेता दिलेली जमीन; इनाम जमीन; प्रपंचार्थ, धर्मार्थ जमिनीप्रमाणे.
**चाक्रल** पु. घोडयाचा एक रोग. यामध्ये मांड्यांवर किंवा पोटाखाली सहाणेएवढी वाटोळी सूज येते– अश्वप २.२८३. [सं. चक्र]
**चाकव** स्त्री. उपोद्रका; एक वनस्पती.
**चाकवत** पु. एक पालेभाजी. [का. चकोत][सं चक्रवत]
**चाकव (वा) रा** पु. वावटळीचा भोवरा: 'इंद्रीयाची चाकवरां'– उगी २०.२०९; 'भवैधडांचा चाकवारा ।'–शिव ४४८. [सं. चक्रवात]
**चाकवी** स्त्री. चक्रवाकी : 'उदते चाकवी बैठलिया वल्है' – कला ५६.
**चाकळ** वि. अति बडबड्या; बोलका. (प्रां) पहा: **चथळ**
**चाकळा** पु. १.घास; तुकडा; चकती; 'तेवींचि संतोषाचे चाकळे। अखंड चघळी '– ज्ञा९.१८१. २ गुदद्वाराच्या मांसाचा गोळा. [सं. चक्र]

**चाकळ्या** पु. घोट्यापासून वरच्या बाजूचे जनावराचे हाड : 'घोट्यापासून वर तो चाकळ्या.'–बलुतं ४७.

**चाकाटणे**अक्रि. दिपून जाणे; आश्चर्याने थक्क होणे; चकित होणे:'चित्त चाकाटले आटु घेत।'–ज्ञा९.५२७.

**चाकाट्या** स्त्री.अव.चकाट्या;गप्पा;शिळोप्याच्या गोष्टी. पहा : **चकाट्या** (क्रि.पिटणे,मारणे.)

**चाकारी** स्त्री. वाहनाच्या चाकाची धुळीत किंवा चिखलात उमटणारी रेषा; चाकोरी; मळलेली वाट. पहा: **चकारी** [सं.चक्र]

**चाकी** चक्री बटाटा. [सं.चक्र]

**चाकी** स्त्री. १. चपटा, बसकट, वाटोळा भोपळा; कोहळा;सुरणाचा वाटोळा गड्डा: 'अळवाचे कांदे, सुरणाच्या चाक्या'– आआशे ३९. २. चक्राकार, वाटोळा, चकती (धातू, लाकूड इ. ची.). [सं. चक्र]

**चाकी** स्त्री. गुळाच्या ढेपेसारखा लहान खडा. [सं. चक्र]

**चाकीकर** पु. वर्तुळाकार कडे (चाकी) वाजवणारा, कडगी:'पेखणे अवळोकिलें : मादळीया: वंशकरू :चाकीकरू : आळतीकरू : जे जेयाचें अंग ते तो दाखवी:'–लीचपू १२१.

**चाकू** पु. १. पेन्सील, बोरूसारखी लेखणी करण्याचे , आंबे इ. फळे कापण्याचे व मिटवून ठेवता येणारे एक लहान हत्यार; शास्त्रविशेष; लहान सुरी. २.युद्धाचे एक हत्यार. [फा] (वा.) ० **मारणे** – नमुना दाखविण्यासाठी चाकूने धान्याचे पोते कापून आतील माल काढणे.

**चाको, चाकोरा–री–रे** पु.स्त्री.न. १. गाडीच्या चाकांनी पडलेला रस्ता. पहा: **चाकारी**: 'ते वेळी कर्मरहाटीचा चाकोरा। भ्रमणीं पडे।'– ज्ञाप्र २४४. २. गाडी गेल्याबद्दलची किंवा आल्याबद्दलची चाकाची खूण:'इंद्रियांचा चाकोरा। भवसी गरगरां।'–उर्गी २०९.

**चाकोत्या** वि. (निंद्यव्यंजक) मध्येमध्ये लुडबुडणारा. (व.)

**चाकोर, चाकोरी** पहा: **चाकारी,चाको** (वा.) ० **बसविणे** – जमीनदोस्त करणे : 'दीड हजार माणसांतून दोनशे माणूस पळून गेले. वरकड अवघे मारुन चाकोर बसविले' – पेद ३.१६३

**चाकोली** स्त्री. १. चकली. २. होळीत जाळण्यासाठी हाताच्या बोटावर केलेल्या शेण्या. (व.)

**चाकोलेट** न. एक मिठाई; कोकोच्या गोड वड्या. [इं.]

**चाकोळे** न. रिकामटेकड्या लोकांचा अड्डा, कोंडाळे; चौकडी. (को.)

**चाकोंडी** स्त्री. गाडी मार्गावरील चाकाची खूण; चाकोरी. (झाडी)

**चाकोंदळ** पहा: **चकंदळ**

**चाख** वि. नीटनेटके; चकपक. पहा : **चाक**

**चाखणी** स्त्री. चाखणे;चाखण्याची क्रिया.

**चाखणे** सक्रि. फाडणे; नष्ट करणे : 'पत्र वाचून चाख करावे.'–ऐको ३७२. [फा.चाक]

**चाखणे** उक्रि. चव समजण्यासाठी खाऊन पाहणे;चव घेणे; रुची आस्वाद घेणे.[सं.चष्](वा.) **चाखत माखत जेवणे** –नाजूक तऱ्हेने, रुची, चव घेत जेवणे (भूक नसताना); चिकित्सा करीत करीत किंवा नाका ओठावर जेवणे. **चाखतमाखत बोलणे**– अडखळत, थांबत थांबत बोलणे. **चाखून रांधणे** – रुची पाहून मग शिजवणे. (स्वयंपाक्याला पदार्थ चांगला किंवा नाही हे चाखल्याशिवाय समजत नाही. म्हणून या वाक्प्रचाराचा उपयोग निषेधार्थी व शेवटाविषयी, परिणामाविषयी अनिश्चित किंवा संशयी असणे या अर्थी करतात).

**चाखवटी** स्त्री. चव; चाखणे : 'त्या स्वादामृतांची चाखवटी।'–रामदासी २.४४.

**चाखळ** पहा : **चघळ**

**चाखुंदा** पु. (प्रां.) विचका; वाईट व त्रासदायक गती, दशा; त्रेधा; गोंधळ.

**चाखेणे** उक्रि. अनुभवणे. पहा : **चाखणे** : 'चाखेती स्वामिकृपेची गोडी। म्हणती स्वर्गसुखें रांकडीं ।।'– ऋव ३६.

**चाखो–को** पु. फणसाची भाजी. (गो.)

**चाखोळा** पु. मुंजीच्या वेळी आई मुंज्या मुलाला आपल्या ताटात भोजनास घेते तो समारंभ; मातृभोजन.

**चाखोळे** न. अड्डा; बैठक. (को.) पहा : **चाकोळे**

**चाच** न. चाचे लोकांची टोळी; चाचा.

**चाचड** पु. मोठा तांबड्या रंगाचा मुंगळा; दात्या.
न. एक क्षुद्र जंतू.

**चाचण–णी,चाचणूक** स्त्री. १ परीक्षा करणे; चव पाहणे; पारखणे; तपासणी; परीक्षा. (क्रि.करणे, पाहणे, घेणे); २. (सोनारी)कसासाठी ठेवलेला भाग. [सं. चंच्]

**चाचण–णी** स्त्री. साखरेचा पाक. (मिठाई, मुरंब्याकरता केलेला)

**चाचणी** स्त्री. उंटासाठी खुराक. हरभऱ्याची भिजलेली डाळ वाटून परतून दूध शिंपून ढवळतात, वेलदोडा मसाला टाकून लाडू बनवतात.

**चाचणी–परीक्षा** स्त्री. एखाद्या व्यक्तीची वा वस्तूची योग्यता, क्षमता पारखण्याची परीक्षा; कसोटी.

**चाचणूक** स्त्री. चुणूक; पारख.

**चाचपड चाचपड** न. पहाटेचा अंधुक अंधुक उजेड, प्रकाश; संधिप्रकाश; अरुणोदयाच्या वेळीचा प्रकाश.
क्रिवि. (अंधारात हातांनी चाचपडतात त्याप्रमाणे) अंधुक; अस्पष्ट; तुरळक. (क्रि.दिसणे.)

**चाचपड (ळ) णे** अक्रि. १. चाचपणे; दिसत नसल्यामुळे अगर अंधार असल्यामुळे हातांनी स्पर्श करून धोरणाधोरणाने चालणे : 'मोहअंधारीं मणी पडला।तो युक्तीच्या हातीं चांचपडला।'– एरुस्व ५.८५. २. (ल.) भीतभीत, शंका घेत बोलणे अडखळत बोलणे (प्रश्नास उत्तर देताना) बहुधा, चाचपडत बोलणे असा प्रयोग करतात . ३. धडपडत जाणे; धडपडणे. [सं.चप्]

**चाचपडत,चाचपत** क्रिवि. अडखळत; रडतखडत; रेंगत; धोरणाधोरणाने; शंका घेत घेत : 'चंद्र आकाशात पूर्ण तेजाने तळपत असता त्याला शोधण्याकरितां अंधारांत चांचपडत जावे लागतें कां ?'– वप २९.

**चाचपणी** स्त्री. १.परीक्षा; कसोटी; चाचणी : 'त्यांनीही रामायणाचे एक कांड वाचून त्यांच्या पद्धतीने माझी चाचपणी केली.'–माचू ४८९. २. दुसऱ्याची मते किंवा प्रतिक्रिया अजमावणे. ३. स्पर्शेंद्रियाने ओळखणे. (वा.) ० **करणे** – पडताळा घेणे; परीक्षा घेणे; अंदाज घेणे: 'त्या विषयात मुळात त्याला किती ज्ञान आहे याची चर्चा करून

चाचपणी करीत.'-अहीबिवा १३४.

**चाचपणे-ने** उक्रि. १. हातांनी स्पर्श करून पाहणे, शोधणे; समजण्यासाठी दाबून पाहणे (दुखावलेला अवयव अगर एखादी वस्तू). २. विशिष्ट वस्तू आहे किंवा नाही हे हात लावून पाहणे. पहा : **चाचपडणे** [सं. चपू]

**चाचर** स्त्री. बोलताना अडखळणे, बोबडी : 'किंबहुना सात्विका आठां। चाचरू मांडता कउमेठा। '-ज्ञा १८.१६.६. [क. चच्चर] [सं.]

**चाचर** स्त्री. काळजी; रक्षण: 'पोरा चाचर चाकरासि कथुनी दारा समूदायसी ।'-आनच ६. [फा.चच्चर]

**चाचर** स्त्री. घेरी; तोल जाणे : 'व्याकुळ निर्बल चाचर जाउनि कामिनी काय वदे सखियांला' - अकक २. [क. चच्चर]

**चाचर** न. मच्छर; चिलट.

**चाचर** वि. चंचल; कुरळे : 'वरुनि चांचर केशही वांकुडे।'-वारुवि १२. [सं.चर्चरिक]

**चाचरणे, चाचरत, चांचरी जाणे** अक्रि. १. झुकणे; रेलणे; झोकांड्या खाणे: 'ब्रह्मविद्ये झगटैली। परा चाचरैली।'-ऋव ९४. २. (ल.) भलतीकडेच भरकटत जाणे; विषयान्तर करणे; बहकणे; भटकणे; स्वत: कोठे आहोत हे विसरणे. ३. अडखळणे, ठेच लागणे: 'जैसें आंधळें चाचरोन पडे । गारीं आणि गडधरां।'-दास ५.१.३७ ५. भुलना. ६. अडखळत, भीतभीत बोलणे.

**चाचरा** वि. बोबडा; अडखळणारा. [सं. चर्]

**चाच(चा)री** क्रिवि. १. झोके, झोकांड्या खात. (क्रि.जाणे) : 'चांचरी जात सुपर्ण। महाद्वारीं मूर्छा येऊन।'-हरिवि ३१.१२४. २. कांकू करीत; कासकूस करीत; क्षणिक विसराळूपणाने. ३. घसटून; निसटून; चुकून एकीकडे , भलतीकडे : 'तेणे हात चांचरी गेला। मिशी भादरली ते वेळा।'-रावि १९.१८३. ४. तातडीने; लगबगीने : 'इतुकिया अवसरीं। पातला गणेश ब्रह्मचारी । रावणापुढें चांचरी ।'- गुच ६.१५३.५. भांबावून; फिरून : 'डोळां न पाहावे सुंदरी । दृष्टी जातसे चाचरी। '-एरुस्व १५६६. ६. अडखळत; बोबड्या शब्दांनी : 'तो एक बाळ बोले चांचरे। त्यांस तैसेंची वेडावती। '-हरिवि ५.१०४. (वा.) **चाचरी चाचरी जेवणे** - रेंगाळत, नखरे करीत, नाजूकपणाने चिकित्सा करीत जेवणे.

**चाचरी, चाचरी मुद्रा** स्त्री. योग्याची एक मुद्रा; ध्यानस्थ स्थिती.

**चाचल** पु. चाहूल; ध्वनी; आवाज : 'इतक्यात दार वाजवल्याचा चाचल येतो' - कमफा १९. [ध्व.]

**चाचा-ची,चाचवा** पु. स्त्री. समुद्रावरील लुटारू; चाच्यांची जात.

**चाचावणे** अक्रि. चेवणे; जळफळणे; गुरगुरणे. पहा : **कातावणे**

**चाचावणे** उक्री . १. हलकेच चेचणे; चोचणी, चाक, इ. नी हळूहळू हत्याराचे घाव घालणे; तोडणे; चेचणे(तासताना, तुकडे करताना, चिरा पाडताना). [सं. चंचु] पहा : **चोचावणे**. २. जखमा करणे :'अति निष्ठूर वैकर्तन निशित शरांहीं यथेष्ट चाचवी।'-मोकर्ण ३९.५.

**चाचुयते** वि. अरुंद.

**चाचुर** वि. भुरभुर उडणारे : 'बरवे चाचुर जाईवळां । जैसी रत्नाची किळा।'-श्रीकृष्णच ८३. [सं.]

**चाचुरमुदी** स्त्री. चौरस्ता; चौफुली; चव्हाटा : 'चाचुरमुदीपासी आसन.'- निराडोमे.

**चाचुरी** स्त्री. १.चाचपडण्याची क्रिया. २. झोकांडे; झोक : 'पुत्रसोखु पडला तीये नारी। चालता जाय चाचुरी।'- क्रिपु २९.२४.

**चाचुवडा-डे** नपु. चोच; चंचुपट : 'जें पांखिरू एकु चांचुवाडा धरौनि उपटिलें ।' - शिव ८१७. [सं. चंचुपुट]

**चाचुवेस** स्त्री. चोच; तोंड. [सं.]

**चाचेगिरी** स्त्री. समुद्रावर जहाज किंवा त्यातील माल इत्यादींची लुटालूट करण्याचा धंदा. पहा : **चाचा** [हिं.]

**चाचोड** स्त्री. चोच. पहा : **चाचुवडे**

**चाच्या** पु. एक बारीक मासा (झाडी).

**चाट** वि. १. हलकट; नीच; लबाड; सोदा;व्यसनी;लुच्चा; हरामखोर; पाजी; चावट: 'मेळवूनी चाट करी सुरापान.'- तुगा २५०९. २. चहाटळ; चावट; वात्रट: 'गोकुळींची मुलें चाट। तेथें समस्त केलीं पै।'- हरिवि ७.६०. [सं.]

**चाट** वि. १.रिकामी बडबड करणारा; गप्पीदास; चयळ. २. गजघंटा; तोंडाळ; तोंड स्वाधीन नसणारा. [सं.चाटु]

**चाट** स्त्री. गप्प; बात (क्रि. देणे, मारणे.)(वा.) [सं.चाटु] ० देणे- १.फसविणे.२. गाळणे; वगळणे : '...मुद्रणसुलभतेकरिता (अक्षरावरील) ओळीला गुजरातीमध्ये चाट देण्यांत आला..'- हिंदोद ४२.

**चाट** स्त्री. १. कुस्तीत जोडीदारास पाडण्यासाठी त्याच्या पायात जोराने पाय घालणे.; पायाची धडक देणे. (क्रि. मारणे.) (व.) २. तडाखा : 'आणि ही पायावरची चाटही त्याच्याच फटकाऱ्याची.'- चंग्र ४३. ३. तोटा; झीज; नुकसान. (क्रि.बसणे.) (वा.) ० **पडणे** - आश्चर्यचकित होणे;थक्क होणे : 'मी चाट पडतो.' - लबोतोअ ३३. ० **बनणे** -चकित होणे; फजिती होणे: 'जर्मन वैमानिक क्रिट बेटावर येताच त्यांच्यावर चाट बनण्याचा प्रसंग आलाच ?'- किर्लोस्कर(ऑक्टो ४१) . ० **मारणे** - चुकवणे; गैरहजर राहणे : 'आज चाट मारणारांना परहेड पाच रुपये दंड होणार आहे.'- सुलतान १०७. ० **देणे**- करायला पाहिजे असलेले काम, गोष्ट न करणे: 'अनेकदा दाढी, आंघोळ यांनाही चाट मिळते.'- माचू २०५. ० **होणे** - थक्क, आश्चर्यचकित होणे; फजिती होणे: 'मनात चाट झालो.'-अचावा १०४.

**चाट** पु. तबल्याच्या पुठ्ठ्याचा कडेचा भाग, काठावरची वाजविण्याची बाजू. पहा: **चाटी** [ध्व.]

**चाट** स्त्री. इच्छा.

**चाटक** स्त्री. रमणीयता; सौंदर्य. [सं.चाटुक]

**चाटकी** वि. चटावलेले; लाडावलेले:' हिनंच पोंर चाटकी करून ठेवल्यात. पर्तेक बाजारी खायला आणती.' - खळाळ १६९.

**चाटकेबुटके, चाटलेबुटले** न. मुलांच्या खेळातील भांडीकुंडी, चूलबोळकी. (ना.)

**चाटण** न. औषधी उगाळून बनवण्यात येणारे रसायन; लेह; चाटण्याचे औषध.

**चाटणफाटण** न. चाटायचे औषध इ. : 'काही चाटणेफाटणे मात्र त्यांनी दिली.'- पलकोघे ११०.

**चाटणी** स्त्री. अन्न चाटून खाणे : 'मग गोसावीं तेयांसरिसें बीजें केले :

गोसावीयासि पाणीपात्र होए : ते गोसावीयातें पुसौनि चाटणीये जाति ।'- लीचपू ३६.

**चाटणे** उक्रि. १. जिभेने ग्रहण करणे; जिभेने खाणे. २. (ल.) ओझरता स्पर्श होणे; घासून जाणे (गोळा, गोळी, बाण). ३. (ल.) नागवणे; लुबाडणे : 'मोगलांचे दंग्यामुळे रयत चाटली गेली.'-थोमारो २.६९.[ध्व.] (वा.) **चाटले आणि बाटलेसे होणे** – सुखाच्या थोड्याश्या सेवनाबद्दल जितक्या शिक्षा किंवा प्रायश्चित्ते असतील ती भोगणे. **चाटून पुसून खाणे** – सारे खाऊन टाकणे; ताट निपटणे. **चाटूंन पुसून जेवणे** – उदासीन वृत्तीने, चव न घेता जेवणे. **चाटून पुसून नेणे** – सपशेल लुटणे; निव्वळ नागविणे; सर्वस्व नेणे.

**चाटथाप** स्त्री. तबल्याच्या कडेवर व मध्ये केलेला आघात : 'तबलासुद्धा चाटे- थापेला सारखा सुरात वाजेल याचीही अनेक प्रयोग करून त्यांनी गुरुकिल्ली शोधून काढली होती.'-अस्ताई ८.

**चाटपण** न. चघळपणा.

**चाटरू** न. लहान मूल : 'चाटरुवे रडते होती'-लीचपू ५४१. [सं.]

**चाटवण** न.पहिल्या पावसाने उगवलेली हिरवळ; आखूड गवत. पहा: **चाटण**

**चाटळ** वि. वात्रट; बडबड्या; कुटाळखोर; चाट. पहा : **चहाटळ**

**चाटंक** पु. पाच तोळे वजनाचे परिमाण.

**चाटा** पु. पल्ला; अंतर: 'अशा संकटाने रोज कूच करून वीस पंचवीस कोसांचा चाटा पाडावा.' – भाब ७८. (टीप).

**चाटा** पु. (विणकाम) गन्या; बॉबिनवर सूत गुंडाळण्यासाठी बॉबिन ज्या कांडीवर बसवतात ती.

**चाटा** पु. १. देवळातील सेवक, नोकर : 'एतुलेनी एक चाटा आला : तेणें म्हणतलें : भटो माझें धोत्र धुवावें :'-लीचपू ३११. २. विद्यार्थी : जीजी : मीं भीक्षेसि गेलां : तवं चाटे पटिसाळे पढत होते:'- लीचपू ५०. ३. मुलगा.

**चाटा** वि. स्वच्छंदी; स्वैराचारी.

**चाटा-टी-ठ्या** पु. कापडाचा फिरता व्यापारी : 'तव गंगातीरिचे चाटे गुजराते कापड वीकुं गेले होते: ते भेटले: ते माहादाइसांचे भाचे:'- लीचउ ६५४.

**चाटाई** स्त्री. वात्रटपणा : 'का करिसी चाटाई।'- दावि २४१.

**चाटारू** वि. फालतू; बडबड्या.

**चाटी** स्त्री . तबला अथवा पखवाज यांच्या तोंडाच्या कडेचे सुमार दोन बोटे रुंदीचे गोल कातडे. पहा : **चाट** [ध्व.]

**चाटी** वि. चावट : 'निगुरीक चाटी जल्पती तें न्यायें'-दावि २७६. पहा : **चाट**

**चाटी** स्त्री. चमनगोटा, टक्कल.(झाडी) [हिं.]

**चाटी-ट्या** पु. १. कापडाचा व्यापार करणारी एक जात; कापडवाला: 'चाटी आणि सराफ सोनार।'-जैअ १०.४०. २. कोष्टी. (व.)[सं.]

**चाटीर** पु. सेवक : 'तेहीं एकु चणयां घावला: साउमे आले तवं चाटीरीं तीया भाजिलिया होतिया : तयांसी स्वस्तिवचन केलें :'- लीचउ २८१.

**चाटु** पु. न. १. गोड भाषण; लाडीगोडी. २. स्पष्ट बोलणे.

**चाटुकर चाटुपुटू ,चाटूबटू** पु. विदुषक.

वि. गोड भाषण करणारा, खुषमस्कऱ्या.

**चाटु-टु** पु. १. लाकडाची पळी (स्वयंपाकाची); डाव; चमचा : 'जैसा चाटू क्षीरी आंत ।'- एभा १०.४६७. २. नाव चालविताना पाणी तोडण्याचे हत्यार; वल्हे. ३. मोहाची फुले ज्या भांड्यात ठेवतात त्याच्या तोंडावर ठेवण्यासाठी शंकराच्या पिंडीच्या आकाराचे केलेले भांडे.

**चाटु-टू** वि. मनाला संतोष सुख देणारे; हृदयंगम; मनोहर (चेहरा, भाषण, कृत्य): 'अगाधु चाटु स्तवितां।' - वच्छह २९७. [सं ]

**चाटुक** वि. गोड; गुळचट : 'मिथ्या मधुरशब्दे चाटुक । जे भोगीं अणुमात्र नाहीं सुख ।' - एभा ५.८६.

**चाटुवा** पु. पीठ मळण्याचे लाकडी पात्र : 'येकु पोसा कणिक चाटुवांतू आहे ।'- क्रिपु २७९.

**चाटुसी** स्त्री. लहान पळी : 'ते चाटुसीएते व्यापारवीत .. पाक निष्पती करी'- लीचउ ५६४. [सं.]

**चाटू** पु. मोठ्या ढेकणासारखा एक जलकीटक.

**चाटू** वि. १. लाचखाऊ, २. मुठदाब्या; लाच देणारा.

**चाटूक्ति-क्ती** वि. लाडिक, गोड (भाषण), लाडीगोडीने (बोलणे) : 'यांनी आपल्या चाटुक्तिपूर्ण भाषेत म्हटले आहे.'-भास्मग्रं १६. स्त्री. समयोजित, चलाख प्रत्युत्तर. [सं ]

**चाटूपुटू** वि. तात्पुरते; कामचलाऊ.

**चाट्यामाट्या** वि. वाचाळ; बोलघेवडा; स्तुतिपाठकासारखे बोलणारा.

**चाड-डी** स्त्री. १. आवड; गोडी; चटक; छंद; सवय : 'वाईट गोष्टीची आम्हांस चाड लागत चालली आहे.'-विज्ञावि ४.७४. २. जरूर; गरज; इच्छा: 'आपुलिये चाडे सज्ञाना। योग्य नोहे ।'-ज्ञा ४.८४. ३.पर्वा; भीड; किंमत; मर्यादा; मुरवत; मुलाजा : 'आता याची चाड नाहीं आम्हा भीड। '-तुगा १३०. [सं.चाटु]

**चाड** पहा : **चाडे**

**चाड** न. झाड : 'चाडातोले हुतो.'-भिल्लीगा १८. (खा.)

**चाड-डी-ड्या, चाडखोर** पहा : **चहाड, चहाडखोर, चहाडी, चहाड्या**

**चाडगा** पु. पाभरीवर असलेली, बी-बियाणे सोडण्याची वाटी : 'त्याच्या हाताची एक मूठ चाडग्यावरच्या वाटीत बी सोडीत होती.'- पेरणी १४४.

**चाडदोर** पु. स्त्री. १.चाडे पाभरीला बांधण्याची दोरी. २. जिला चाडेगाठ मारलेली आहे अशी दोरी.

**चाडयेरो** वि. चहाडखोर : 'तो सलो चाडयेरो.'-लोककथा २.२८. (को.)

**चाडा** पहा : **चादर**

**चाडा-डी** पु. स्त्री. पेरणीचे मोठे नरसाळे.(झाडी)

**चाडा** वि. बडबड्या; लुबरा; तोंडाचा शिनळ; फटकळ; शिवराळ; ज्याच्या तोंडात काही राहत नाही असा; बाष्कळ. (को.)

**चाडी** स्त्री. पहा : **चहाडी**

**चाडी** स्त्री. (स्था.) पाण्यात काँक्रीटचे काम करताना वापरतात तसा जलाभेद्य पोलादी नळ, पाईप.

**चाडी-डू** स्त्री. किंमत; पर्वा; जरुरी. पहा : **चाड** : 'लोह परीसाचा

चाडू : देवा रे'-स्तोत्रमाला १३४.

**चाडीशैल** पु. (भू.शा.) चाळणीसारखी छिद्रे , भोके असणारा खडक.

**चाडीस अडणे** मोहास, लोभास गुंतणे :'तये चाडीस अडले। अज्ञान तें पैं।'- सिसं ४.१५७.

**चाडे-ढे** न. १. समईत तेलवात घालतात तो वाटीसारखा भाग; टवळे. २. वरच्या टवळ्यातील तेल ठिबकते तो भाग. ३. बी सोडण्यासाठी पाभरीवर असलेली लाकडाची वाटी, यातून धान्याची मूठ सोडतात:'ज्ञानदेव म्हणे मी चाडे। सद्गुरूंनी केले कोडें।'- ज्ञा ६.४९२. (वा.) **चाडे मूठ धरणे, चाड्यावर मूठ धरणे –** कोणतीही गोष्ट, कार्य आरंभणे. **चाडेमूठ लागणे, चालणे –** पेरण्याचे कार्य, पेरणी चालू असणे, सुरू असणे.

**चाडेगाठ** स्त्री. एक विशिष्ट प्रकारची गाठ; पेडेगाठ; साधी व सोपी गाठ.

**चाडेफूल** न. समईचा वरचा भाग (ज्यात तेल घालतात तो). याला फूल असेही म्हणतात.

**चाढे** न. खाबांचा उथळा; खाच. (को)

**चाणकी** स्त्री. भाकरी; पोळी: 'बारा अंड्याची चाणकी.'- बलुतं ६८.

**चाणके** न. तुणतुणे; चोंडके.(ना.)

**चाणक्य** पु. १. एक दशग्रंथी ब्राह्मण. याने पुष्कळ कारस्थाने करून मगध देशाच्या नंद राजवंशाचा निःपात केला व चंद्रगुप्त राजास गादी मिळवून दिली. २. (ल.) अतिशय पाताळयंत्री व कारस्थानी मनुष्य. [सं.]

**चाणाख्य, चाण(णा)क्ष** वि. १. बुद्धिमान; जात्या धूर्त; चतुर; धोरणी; व्यवहारचतुर; कुशल. २. उत्तम (वक्ता) ३. चलाख; हुशार (मुलगा, स्त्री) : 'चाणाक्ष हा शब्द महाधूर्त व चतुर ब्राह्मणाच्या नांवावरून मराठींत आलेला आहे.'-चंद्रगुप्त ३६. [सं.]

**चाणी** स्त्री. माशाच्या सुकविलेल्या बोट्या : 'ते बोटाच्या आकाराच्या लांबच लांब अशा चाण्या करीत.'- बलुतं ४८.

**चाणूक** पहा : **चुणूक**

**चाण्णी** स्त्री खार: 'भोकरीवर एक चाण्णी भोकर खाईत बसली होती.'- खळाळ ४.

**चात** स्त्री. न. १. सूत कातण्याच्या चरख्याला लावलेला एक भाग, त्यावर सूत गुंडाळले जाते. हाताने गरगर फिरवून सूत काढण्याचे साधन. २. सोनाराची भोके पाडण्याची लोखंडी सळई, सामता; भोके पाडण्याचे साधन. ३. चातीच्या आकाराचा लांबट मळसूत्रासारखे करवे असलेला शिंपला, शंख. [सं.कृत्]

**चातक** पु. एक पक्षी; हा फक्त पावसाचे पाणी पितो अशी समजूत आहे: 'पाहापां भरोवरी आघवी। मेघ चातकांसी रिचवी।'-ज्ञा १५.२० [सं.]

**चातक न्याये करून** क्रिवि. मोठ्या उत्सुकतेने; पराकाष्ठेच्या प्रबल उत्कंठेने. (वाट पाहत बसणे, प्रतीक्षा करणे).

**चातली** स्त्री. सुताला पीळ देण्यासाठी केलेली भिंगरी.

**चाती** स्त्री. १. धातूचा वाटोळा व चपटा तुकडा,चकती. २. वजन म्हणून उपयोगात येणारी (शिसे इत्यादीची) वाटोळी चकती. ३. लाटण्यासाठी केलेली पिठाची वाटोळी दामटी; एखाद्या पदार्थाची थापटी, वडी, चकती, लाटी. ४. सूत काढण्याच्या चरख्याचे चाक; चकतीला मधोमध भोक पाडून त्यात दांडा घालून केलेले यंत्र, टकळी. ५. सूत भरलेली सुताची कांडी; बॉबीन. ६. (मानस) मानवी शरीरात पेशी विभाजनाच्या क्रियेत, पेशीकेंद्राच्या बाहेर एखाद्या नळीसारखा परंतु मध्यभागी फुगीर असा जो आकार तयार होतो त्याला चाती म्हणतात. ७. (विअ.) यंत्राचा स्वतःभोवती फिरणारा लांबट नळीसारखा भाग.

**चातुर** वि. १. (पोवाडे) शहाणा; हुशार; बुद्धिमान; समजूतदार; कुशलः 'दादु चातुर बोलला। '-ऐपो ९६. २. (विशेषतः लावण्यांमध्ये) प्रियकर; सखा. [सं.चतुर]

**चातुरी** स्त्री. हुशारी; चतुराई; धूर्तता; कौशल्य; कल्पकता; करामत.

**चातुर्जातक** वि. दालचिनी, वेलदोडा, पत्री, नागकेशर ही चार द्रव्ये एकत्र करून बनविलेले (औषध).

**चातुर्थ(र्थि)क** पु. १. दर चवथ्या दिवशी येणारा हिवताप; चौथरे हीव 'चातुर्थकः तरी नोहे।'- गीता १.१६४९. २. शुद्र; चार्तुवर्ण्यातील चवथा वर्णः 'चातुर्थिके वदे नाही स्मरण।'-दावि १५१. [सं].

**चातुर्दक्ष** क्रिवि. चहू बाजूस; चारही दिशांच्या ठायी :'संतरितु नगराची बरंव । तैसे चातुर्दक्ष आरव।'- ऋ १५. [ सं. चतुर+दिक्]

**चातुर्भद्र** न. अतिविष, सुंठ, नागरमोथा, गुळवेल या चार उत्तम औषधी द्रव्यांचा समुच्चय. [सं]

**चातुर्मास-स्य** न. १. (चातुर्मास अप.) चार महिन्यांचा काळ; आषाढ शु।।११ ते कार्तिक शु।।११ हा काल. पहा: **चर्तुमास**. २. हिवाळा, उन्हाळा व पावसाळा या चार चार महिन्यांच्या अवधींपैकी कोणताही. ३. या चार महिन्यांच्या काळात केलेली व्रते-वैकल्ये, होमहवन वगैरे. ४. एक विशिष्ट इष्टी. [सं]

**चातुर्य** न. चतुरपणा; बुद्धिमत्ता; हुशारी; बुद्धिसामर्थ्य; कर्तृत्व : 'मुख्य मनोगत राखणें । हेंचि चातुर्याची लक्षणें।'-दास १३.१०.२५. [सं.]

**चातेपोते** न. (व्यापक) सोनार, शिंपी इ. कारागिरांची लहानसहान किरकोळ हत्यारे, उपकरणे .

**चाथा** पु. सार : 'कथित सुरस गाथा, सर्व संसार चाथा।'- आमा ९. [सं. चुस्त=चोथा]

**चादड** वि. म्हातारा; अशक्त, दुर्बळ; जखखड (मनुष्य, पशु). (दे.)

**चादर** स्त्री. शरण आल्याचा पांढरा बावटाः 'त्यापेक्षा चादर फिरवून किल्ला स्वाधीन करू'- शामब ३५. [फा.चद्दर]

**चादर** स्त्री. १. पलंगपोस; कापडी आच्छादन; बैठकीचे वस्त्रः 'भीमकें केला बैसकार। चादरिया घातल्या अरुवार।'- कथा १.८.१४८. २. धबधब्याचे पाणी पडत असताना दिसणारा सरळ पसरट ओघ. पहा : **चद्दर** (झाडी) [फा. चद्दर]

**चादर** स्त्री. धातूचा पत्रा. [फा.]

**चादर** स्त्री. लक्ष्याचे निशाण (निशाणबाजेसाठी): ऐसे चौदा बार केले पण एकही गोळा चादरेस लागला नाही.'- ऐको ३७३.

**चादरी दारुकाम** तप्त सुवर्णाप्रमाणे लाल व पिवळ्या रंगाच्या फुलांचे दारुकाम.

**चादल्ला** वि.वाईट, घाणेरडा.

**चानक्या** स्त्री. अव. बशा. (चंद्रपुरी)

**चानी** स्त्री. खार : 'केळीत एक चानी बसली होती.' – सनई २५. (को)
**चानी** स्त्री. भेंडीचा काप. (झाडी)
**चानूक** पहा : **चुणूक**
**चान्नी** स्त्री. १. चांदणी. २. (ल.) नक्षत्राप्रमाणे सुंदर : 'घरची अंधयी पराईनी चान्नी' – खावा २७. (अहि.) (वा.) ० **पडणे**– आसडी पडणे; जखमेवर पांढरा, पिवळा ठिपका येऊन जखम सडणे : 'उग चान्नीफिन्नी पडंल म्हनलं' – पाचोळा ८१.
**चान्स** पु. संधी : '... तेवढीच मोटार अंगाला लागायचा चान्स हा सुप्त हेतु!' – व्यव २०१. [इं.]
**चाप** न. १. धनुष्य. २.(फज्यो.) धनु राशी. [सं.]
**चाप** पु. बांबूचा मोठा हारा. पाला भरण्यासाठी उपयोगी डालगे.
**चाप** पु. कानाची पाळ.
**चाप** पु. १. कापसाचे गठ्ठे दाबात घालण्याचे एक यंत्र. २. शारीरिक दुःख अगर तीव्र वेदना देणारे यंत्रसाधन (कान, अंड वगैरे ठिकाणी लावतात). ३. उंदरास दाबून मारण्याचा लोखंडी सापळा. ४. मळसूत्र फिरवल्याने हवा दाब घालण्याचे साधन. [सं. चप्] (वा.) ० **लावणे** – १. सापळ्यात अडकवणे : 'कोमिन्टांग पक्षाला चाप लावण्यासाठी ...' – माओ १४३. २. चिमटा लावणे; छळ करणे: 'रुपये बेजरब चापा लावून घ्यावे. मजुरी घ्यावी.' – ऐको ३०४. ३. रचून ठेवणे. (कर.)
**चाप** स्त्री. उडी; उड्डाण; झाप. (क्रि. करणे)
**चाप** पु.स्त्री. तट्ट्या; झाप : 'ही शाळा चापांनी मढवलेली व छपराला पत्रे घातलेली होती.-' आआं २२. (व.)
**चाप** पु.तंबाखूची लागवड.
**चाप** पु. ढोलाच्या ज्या बाजूवर हाताची बोटे मारून बोल काढतात ती बाजू. दुसऱ्या बाजूला घुमाड म्हणतात.
**चाप** स्त्री. ढीग; रास; थडी. (कर.)
**चाप** पु.खणाळे; खणांचा तागा. (कर.)
**चाप** पु. एक पक्षी. हा वाळवी, नाकतोडे, टोळ खातो.
**चाप** पु. (ग.) वर्तुळाच्या परिघाचा भाग, वृत्तखंड.
**चाप** पु. कानाची पाळी पहा : **चापा**
**चाप** पु. १. आवळून धरणे; पकड; चिमटा. २. सुताराचे हत्यार. (झाडी)
**चाप** पु. बंदुकीचा घोडा. [सं. चप्]
**चापकर्ण** न. १. (ग.) ज्या (वर्तुळाची). २. धनुष्याची दोरी.
**चा(च)पकशी** स्त्री. तलावा; टेहळणी; (सैन्याच्या पुढे किंवा तळाच्या पुढे १०-१२ मैल शत्रूंची टेहळणी करीत फिरणारी घोडेस्वाराची तुकडी).
**चापकेसी** स्त्री. धमकावणी.
**चाप(फ)खण** पु. १. घराचा सर्वात मोठा खण. २. माजघर. ३. चौकाच्या कोपऱ्याजवळ दोन बाजू मिळतात तेथे होणारा मोठा खण.
**चापचणे** पहा : **चापसणे**
**चापचोप-पी** पु. स्त्री. नीटनेटकेपणा; चाकचोप. पहा : **चाकचोपी** : 'मस्तकीं मुद राकडी फावडी चापचोपमधें सदा।'–पला ४.३३.
**चापट-टी** वि. सखल असून चपटा; थबकट किंवा बसकट; चेपटलेला; थापटलेला; ठोकून सपाट केलेला.
**चापट** पु. पतंगाचा एक प्रकार.
**चापट** स्त्री. थप्पड; चपराक; थापट. [सं. चपेट]
**चापटणे** उक्रि. १. चापट करण्यासाठी ठोकणे, प्रहार करणे; ठोकून ठोकून चपटा करणे. २. खप्पड होणे; बसणे : 'गाल अगदी असे चापटून गेलेले..'–पलकोघे २१६.
**चापटपोळी** स्त्री. तळहाताने मारलेली चपराक : 'तुम्हाला अन्नवस्त्र मिळून शिवाय चापटपोळ्या, धम्मकलाडू वगैरे तुमची आवडती खाद्ये मिळतात.' – सको ९६२.
**चापटी** स्त्री. १. ठोकून चापट केलेला पदार्थ. २. चपराक. ३. लहान पातळ भाकरी.
**चापट्या** वि. चिकट. (को.)
**चापड** न. धान्याचा चुरा: गव्हाचा कोंडा. (इंदूर)
**चापणी** स्त्री. १. दाबात घालण्याची क्रिया. २. अफू तयार करताना अफूच्या गोट्या (गोळे) दाबून पाडण्याचे काम.
**चापणे** उक्रि. १. चेपणे; दाबणे; पिळून काढणे. २. दाबणे; लाटणे, गिळंकृत करणे (लाच वगैरे). [सं. चप्]
**चापणे** अक्रि. १. चाचपडणे; २. चाचपणे; दुःखाची जागा शोधण्यासाठी दाबणे, स्पर्श करणे. [सं.चप्]
**चापणे** अक्रि. धमकावणे; कानउघाडणी करणे; धमकी देणे; खडसावणे. (वा.) **चापून म्हणणे** – बिनदिक्कत म्हणणे : 'लोक चापून म्हणणार, की आम्ही आधीच म्हणत होतो तुमची फजिती होणार म्हणून' – आजच १८०. [सं. चप्]
**चापणे** सक्रि. पुष्कळ खाणे. [सं. चप्]
**चापती** स्त्री. उटाळीसारखा जिचा उपयोग करतात अशी काठी किंवा दांडी; तरफ.(को.)
**चापर** स्त्री. गुरांच्या गळ्यातील घाट : 'गुरांच्या गळ्यातील चापरांचा आवाज गोड वाटतो.' – शालाप (आग ३९).
**चापरणे** क्रि. मधेमधे बोलणे. [फा.]
**चापरपाटा** पु. (विटांचे बांधकाम) खिडक्या व जाळ्या यांच्या पायथ्याचा सपाट गिलावा.
**चापराभर** वि. फारच थोडे.
**चापरी** स्त्री. चटई, कडा, तट्टा.
**चापऱ्या** पु. शिंदीच्या पार्तीचा विणलेला बोऱ्या, चटई, हातरी. (व.)
**चापल** स्त्री. फांद्या; झाडी.
**चापलणे** अक्रि. हाताळणे; उपभोगणे : 'ज्यांना माझं शरीरच केवळ चापलायचं होतं...' – पंवा ११४. [सं.]
**चापलुशी, चापलोसी** स्त्री. हांजी हांजी; खुशामत; मनधरणी : 'दरबारी चापलुशीच्या ढंगात मुरलेल्या...'–व्यक्तिरेखा ८९.
**चापल्य** न. १.चपळाई; चलाखी. २. चांचल्य; अस्थिरता. [सं.]
**चापसणे** अक्रि. चाचपणे; हाताने पाहणे; फिरविणे. पहा : **चापणे** : 'शेंडीतून हात चापशीत– पांडू म्हणाला..'–धाधो ६७. [सं.स्पश्]
**चापसाचापसी** स्त्री. १. चाचपडण्याची क्रिया; घाईघाईने तपासणे. २. लाचलुचपत; लाच घेणे-देणे; खूप दडपादडपी करणे. लाच

खाण्याचा क्रम; सपाटा.

**चापळणे** अक्रि. बडबडणे : 'लोक भलभलते चापळीत त्याची त्याला काडीइतकीही दिक्कत नाही.' – गांधारी ४९.

**चापा** पु. कानाची पाळ : 'कांहीं तजविजी करून कानाचे चापे लांब करावे अशी कोठें कोठें एक चाल असे.' – मपु ३४.

**चापा** पु. एक दागिना.

**चापा** पु. पडवी.(झाडी)

**चा(चां)पा, चाफा** पु. एक पुष्पवृक्ष. [सं. चंपक]

**चा(चां)पा, चाफा** पु. एक विवक्षित दारुकाम. [सं. चंपक]

**चापाचंदन** न. सप्पा; नायनाट.

**चापाचाप-पी** स्त्री. १. दाबणे किंवा स्पर्श करून पाहणे. पहा : **चापणे**. २. दाबादाब या अर्थी; लपवालपवी; छपवाछपवी.

**चापाची जायपत्री** निवडक, जाड जायपत्री.

**चापाची फतरी** १. बंदुकीच्या चकमकीसाठी उपयोगी पडणारी गारगोटी : 'चापाच्या फतऱ्या पुण्याहून आल्या. मागाहून रवाना करतो.' – ऐको ३७४. २. चापाची बंदूक.

**चापी** वि. चापाची, घोडा असलेली (बंदूक).

**चापी** स्त्री. तंबाकूची पेंढी.

**चापी** स्त्री. चटई : 'चापी (चटई) खाली पसरून स्वारी.. उकिडवी बसली.'– उरा १०५.

**चापीचोपी** स्त्री. १. नट्टापट्टा, साज, शृंगार करणे; सजविणे (शरीर). २. दाबणे व साफ करणे. ३. मोठ्या दक्षतेने, हुशारीने, कसोशीने करणे, संपविणे. ४. ठाकठीकपणा; व्यवस्थितपणा. ५. उचलाउचल; घालकाढ; चाचपाचाचप. (क्रि. मांडणे.)

**चापी धनुकाटा** पु. उंदीर धरण्याचा एक प्रकारचा सापळा.

**चापीयमापन** न. त्रिज्यातुल्य चापाचे एक माप धरून कोण मोजण्याचा प्रकार. [सं.]

**चापू** पु. चाकू.

**चापून** क्रिवि. यथेच्छ; भरपूर : 'चापून झोप काढायची' – मकथा ५९/९०.

**चापूनचोपून** क्रिवि. पहा : **चोपूनचापून**

**चापे** न. १. चाफ्याचे फूल : 'चापे वो चंदनु।' – मला २२१. २. फणसातील गऱ्याभोवती असणारी पाती.

**चापेकळी** स्त्री. चाफ्याची कळी : 'चाफेकळिया मिरवत। चापेकळी जानकी।' – वेसीस्व ९.१३४.

**चापेकळ्यांची माळ** चापेकळ्याप्रमाणे आकृती असलेल्या सोन्याच्या किंवा चांदीच्या मण्यांची माळ – हार.

**चापेपण** न. सुगंध.

**चापेमोळ** न. छपराच्या आढ्याची दोन्ही टोके.

**चापे(फे)ल** न. चाफ्याचे तेल : 'वाटिली हळद चांगली। चापेल तेलें मोहिली।' – स्त्रीगीत १४.

**चापेसट** स्त्री. चंपाषष्ठी.(कुण.)

**चापौळ-ळी** न. स्त्री. चाफ्याची कळी किंवा फूल : 'नाना चांपा चांपौळी पूजिला।' – ज्ञा १८.८५३.

**चाफणे** सक्रि. स्पर्श करणे; कवटाळणे : 'साहेब अंधारातच बाईला चाफण्यासाठी सरकतात.' – बलुतं १६७.

**चाफणे, चाफसणे, चाफा, चाफे, चाफेकळी, चाफेखण** पहा : **चापणे, चापसणे** वगैरे

**चाफलणे** अक्रि. १. चाचपडणे; अडखळणे : 'ती अंधार चाफलू लागली.'– शिळान ३२. २. अर्धवट चावणे. (व.)

**चाफा** पु. फुलझाड. याच्या सोनचाफा, हिरवा चाफा, पांढरा चाफा, तांबडा चाफा, नागचाफा इ. निरनिराळ्या जाती आहेत . पांढऱ्या चाफ्याची साल, चीक व शेंग औषधी आहे. [सं. चंपक]

**चाब(भा)डा** पु. जाबडा; जबडा; जाभाडा; तोंड. [सं. चर्व]

**चाबडुबली** स्त्री. पाण्यातील खेळ.

**चाबडूब** वि. १. तुडुंब; २. गटांगळ्या. (झाडी)

**चाबरट** वि. वाह्यात; चावट; फाजील : 'चाबरट बोलण्याबद्दल नवऱ्याने.. डागले होते..' – मिरास ११६.

**चाबरणे** अक्रि. गोंधळणे, भांबावणे; थक्क होणे; सुचेनासे होणे. (को.)

**चाबरा** वि. लावालावी करणारा; वाह्यात बोलणारा; वात्रट; कुटाळ : 'पर त्यो कोन चाबऱ्या तोंडाचा...' – मिरास २०.

**चाबलणे** अक्रि. चघळणे.

**चाबा** पु. १. चावणे; खाणे; जेवणे. (क्रि. करणे, पाडणे.) चावण्याचा उद्योग. २. खाण्याचा पदार्थ; चावण्याचा पदार्थ. (झाडी) [सं. चर्व]

**चाबाचबीना** पु. चावून खाण्याचा पदार्थ; खाण्याची क्रिया.

**चाबाडा** पु. चोथा. [सं. चर्व]

**चाबुक** वि. हुशार; चपखल; चलाख.

**चाबु(ब)कणे** उक्रि. घोड्यास चाबूक मारणे; चाबकाचा फटकारा लगावणे.

**चाबुक सिवणी** चाबूक मारला असता त्याची दोरी स्पर्श करील इतके थोडे अंतर.

**चाबु(बू)कस्वार** पु. १. घोडेस्वार. २. घोड्यास शिक्षण देणारा.

**चाबू** वि. खादाड; अधाशी. (कुण.)

**चाबूक** पु. १. घोड्यास, बैलास मारण्यासाठी काठी दोरी, वादी वगैरे लावून केलेला कोरडा; आसूड. (क्रि. ओढणे, मारणे.) २. (ल.) चरचरीत, उद्दीपक औषध, रसायन. ३. (ल.) तिखट मिरची. [का. चब(बु)कु][फा.]

**चाभरा** वि. वटवट्या; शेखी मिरविणारा; कुटाळखोर; वात्रट; लावालावी करणारा. (व.)

**चाम** न. १. कातडे; चामडे : 'घातला चामाचा बोकसा.' – उगी ७५८. २. एक नाणे : 'राजाकरी तैसे दाम। चाम तेही चालती।' – तुगा २६६०. [सं. चर्म] (वा.) **चामाचे दाम चालविणे**– अधिकाराच्या जोरावर कातड्याचे नाणे सुरू करणे; आपला अधिकार वाटेल तसा चालविणे; अनन्वित कृत्ये बिनदिक्कत करणे.

**चाम** स्त्री. मोठा कासव. (झाडी.) [सं.चर्म]

**चामगोचीड, चाम-मू, चामऊ-वा** पु. स्त्री. (गुरांच्या) शरीरावर, अंगावर वाढणारी ऊ, गोचीड : 'गोचीड अशुद्ध सेविती। चामवा मांसांत

घुसती।' – दास १.१०.५४. [सं. चर्म]

**चामकणी** स्त्री. चमक : 'कीटकाची चामकणी' – कला १५.

**चामकणे** अक्रि. जाणे; थबकत चालणे : 'मातें साण्डोनी पुढारें। पाय कैसे चामकती।' – मुवन ७.१२३.

**चामकना** वेगवानः 'गरुडु होऐ चामकना : पुण रूपे रेखा उणा'-शिव ९९१.

**चामकूट** पहा : **चामखीळ** (कु.)

**चामखंड** पु. चामड्याचा तुकडा : 'भातरी जिव्हा ते चामखंड..' – एवाका १३१. [सं. चर्मखंड]

**चामखीळ-कीळ-खोड-फोड** स्त्री. न. पु. शरीराच्या बाह्यत्वचेवर असलेला फोडासारखा मोड. त्यास वेदना नसतात : 'वांग तिळ सुरमें लासें। चामखिळ गलंडे मसें।' – दास ३.६.५०. [सं. चर्मकील]

**चामगाद्रू** पु.वटवाघूळ. (झाडी) [हिं. चामगांदड]

**चामचक** पु. लढाईत वापरण्याचा एक परशू.

**चामचिराई, चामचिडी** स्त्री. कातड्यासारखे पंख असणारे वाघूळ किंवा पाकोळी. [सं.]

**चामचोट** पु. शिस्न; पुरुषाचे जननेंद्रिय; चामड्याचे कृत्रिम शिस्न.[सं.]

**चामचोरी** स्त्री. गुराढोरांची चोरी. [सं. चर्म + चौर्य]

**चामट** वि. १. कातड्यासारखे चिवट; वातड. २. दृढ; पक्की; मजबूत बसलेली; न सुटणारी; जाम (पकड). ३. चेंगट (माणूस). [सं.चर्म]

**चामठा** पु. पावसाच्या अखेरीस काळा पडणारा नदीतील खेकडा. (राजा.)

**चाम(मा)ठी** पु.स्त्री. चामड्याचा चाबूक : 'वेगा चालावेया चामठी हाला'. – पंचो १६६.१२.

**चामडचावू** वि. त्याच त्याच गोष्टींची निरर्थक चर्चा करणारी.

**चामडी** स्त्री. अंगाचे कातडे, त्वचा. [सं. चर्म] (वा.) **० लोंबवणे** – कातडी काढणे; बेदम मारणे; चाबकाने,छडीने निर्दयपणाने झोडपून काढणे.

**चामडीबचावू** वि. स्वतःला सुरक्षित ठेवणारा : 'मला इथेहि चामडीबचावू धोरण पत्करावे लागले.' – सनई १३१.

**चामडे** न. १. कातडे; साल; सालटी; बाह्यांग. २. कमावलेले कातडे. [सं. चर्म] (वा.) **० फुटणे** – कातडी सोलून निघणे : 'शिवाय हातापायांच्याहि चामड्या फुटल्या होत्या.' – स्वप १९५; **० रंगविणे**- १. कातडे कमावणे; मेलेल्या जनावराचे कातडे जोडा तयार करण्यास योग्य होईल असे करणे. (व.) २. मारणे.

**चामडेरक, चामरडेल** पु.स्त्री.न. मोठ्या बेडकाची एक जात.

**चामडो(ढो)क** पु. पाण्यातील एक कीटक : 'पाण्यातला वळवळता चामडोक पाहून...' – शिळान १०५.

**चामफोड** पु. चामखीळ.

**चामर** १. पहा : **चवरी** (क्रि. ढाळणे, वारणे) : 'मग वर्णामाजीं छत्रचामर।' – ज्ञा ९.४७५. २. एक वृत्त, याच्या चरणात १५ अक्षरे व र, ज, र, ज, र असे गण असतात. [सं.]

**चामल** वि. १. वातड. २. संथ. (झाडी) [सं. चर्म]

**चामलोणी** न. त्वचेचे खाद्य.

**चामवा** स्त्री. अव. अंगावर वाढणाऱ्या उवा : 'वा चामवा गोचिड दोहिकडे ।।' – दास १७.६.१३.

**चामळ** वि. कातड्याचे, चामड्याचे : 'जें चामळ डोळे दाविति।' – राजा १८.५७०.

**चामाठी** स्त्री. वादीचा चाबूक.

**चामाडौला** पु. दृश्य; देखावा; थाटमाट; ढोंग; बतावणी; आविर्भाव; डामडौल. (क्रि. करणे, मांडणे, मिरविणे.)

**चामाडौली** वि. चोंबडा; मध्ये लुडबुडणारा. (व.)

**चामार** पु. चांभार : 'मग चामाराचेया घरा घेउनि गेले :' – लीचउ २६८.

**चामीकर** न. शुद्ध सोने; सुवर्णालंकार. [सं.]

**चामुचोर** पु. व्यभिचारी पुरुष : 'चामुचोरू होय म्हणे-- मीयां थोर चामचौरी केली की ।' – गोप्रच २८६.

**चामुंडा** स्त्री. १. पार्वतीचे नाव : 'प्राणशक्ती चामुंडे। प्रहारूनि संकल्प मेढे।' – ज्ञा १२.५३. २. (ल.) भांडखोर बाई : 'असे असता हीच चामुंडा अशी कशी झाली ?' – चाक ११९. ३. (उप.) विधवा.[सं.]

**चामोटा** पु. पळून जाता येऊ नये म्हणून पायात घातलेले पायाला बोचतील असे लोखंडी काटे किंवा चिमटे (क्रि. थिटणे.) : 'बावीस आसामी शामला कडील स्वारीतील धरून चामोटे थिटून रायगडास नेली' – ऐसंसा १६.६.

**चामोटा-टी** पु.स्त्री. १. कातड्याचे मोजे. (क्रि. खिळणे.) २. कातड्याची वादी अगर पट्टी.

**चामोठा** पु. घोड्याचा लगाम : 'चामोठा गरूडाचा कानी घालति'. – स्थापो ८.

**चाम्हार, चाम्हारकी, चाम्हार-गोचीड, चाम्हार-चतुराई, चाम्हारचौकशी, चाम्हारचाळवणी, चाम्हारडा, चाम्हारवाडा, चाम्हारहिरडा, चाम्हारी 'चांभार' मध्ये पहा.**

**चाम्हारवनी** स्त्री. चांभाराच्या हातचे पाणी : 'तेथ चाम्हारवनीयें : डोहरवनिये : मोचवनियें पीयालों :' – लीचपू २: २५२

**चाय-या** पु. पिण्याचा चहा : 'बाराबंदीत घेई चाय । खेडूत हा।।' – मर्ढेक ४४.

**चायना** स्त्री. चिनी माती : 'दोन लहान पोरे चायना नाहीतर पिवडी काढत होती.' – शेलूक ५३.

**चाया** पु. नखरा; चाळा : 'एवढीशी डबी, चुणूक चाया.' – एहोरा १०३.

**चार** स्त्री. गुरे चारण्याची जागा : 'कोटा अलीकडे चार आहे तेथपर्यंत मावळे लोक वगैरे बरखंदाज गेले.' – पेद ३.३८.

**चार, चारचार** पु. अव. १. चेष्टा; चाळे; ढंग; छंद; सोंग; थेर : 'मना आले करितां चार। त्या फार हा एकला।' – तुगा १४८. २. अक्कडबाजी; मौजा; लहर; दिमाख. [सं. चर]

**चार, चारचार** पु. अव. गाठ दिल्यावाचून जोडणे; सांधणे. (क्रि. चारणे =गाठ न देता सांधणे). [सं. चर]

**चार** पहा : **चाड** : 'आतां मोटी वार। माझी नका धरू चार।' – तुगा १४५.

**चार** पु. १. हेर; गुप्त दूत; टेहळणी करणारे जासूद : 'राजाप्रमाणे जरी आम्हांला चार किंवा डिटेक्टिव्ह ठेवतां आले नाहीत तरी एवढे खूप समजा की, परमेश्वर सर्वांत मोठा डिटेक्टिव्ह आहे.' – टिव्या २. निरोप्या; सेवक : 'चार प्रेरिले असंख्यात' – मुविरा ४.१०. [सं.]

**चार** स्त्री. १. हिरवे गवत; नुकतेच उगवलेले हिरवेगार गवंत. २. गुरांनी खाण्याजोगा हिरवा पदार्थ (झाडपाला, हरळी इ.).

**चार** पु. एक वृक्ष, याची पाने मोहाच्या पानांसारखी मोठी व लांबट असतात. ही झाडे महाबळेश्वर, गंगातीर, गुजराथ या भागांत असून याच्या पानांच्या पत्रावळी करतात.

न. या वृक्षाची फळे. (राजा.)

**चार** पु. चार वृक्षाच्या बिया; चारोळ्या.

**चार** पु. फणसाचे गऱ्याभोवतीचे तंतूसारखे अवयव; पाती.

**चार** क्रिवि. प्रकर्षद्योतक म्हणून हिरवा या शब्दापुढे अत्यंत हिरवा, हिरवागार या अर्थी योजितात. जसे :– हिरवाचार.

**चार** पु. एक हलक्या जातीचे बोर.

**चार** वि १. ४ ही संख्या. २. एक परिमित संख्या दर्शविणारा शब्द. उदा. चार गोष्टी, चार पैसे. ३. चवथ्या प्रतीचा. [सं. चतुर] (वा.) **० घेणे, देणे** – शेजारधर्माने देवघेव करणे; भांडणतंट्यात शिव्या, मार देणे, खाणे. **० दिशा मोकळ्या होणे** – वाटेल तिकडे जाण्यास मोकळीक असणे. **० पाने टाकणे** – जेवणावळ घालणे; लोकांना जेवू घालणे : 'वार सण... इत्यादि निमित्तानें जेव्हां जेव्हां गांवकऱ्यांच्या घरीं चार पानें टाकतात तेव्हा तेव्हा महार, जागले व सर्व कारूनारू ह्यांना वाढणी द्यावीं लागतात.'– गांवगाडा ७२. **चारी(ऱ्ही)चे सहा होणे** – लेकुरवाळे होणे; मूल होणे.

**चार** पु. आचार; वागणे : 'तुना चार लागते गोड'.– ज्ञाग २५०. [सं.]

**चारआणी–णे** स्त्री. पावली; चार आण्यांचे नाणे. (व.)

**चारकट** न. साल काढलेला वाळलेला दोडका. जनावरांचे अंग खाजविण्याकडे याचा उपयोग करतात.

**चारक(ग)ट, चारट** वि. १. वात्रट; चावट; खोडकर; खट्याळ; कुटाळखोर; कुचेष्टेखोर; उपद्व्यापी; फंदी. दुसऱ्याची मर्मे बाहेर काढणारा; थट्टेखोर. २. लहरी; विनोदी; छांदिष्ट.

**चारकटा–ट** पु.न. गऱ्याशिवाय फणसामध्ये जी पाती वगैरे असतात तो भाग; कोवळ्या फणसाच्या आतील भाग. याची शिजवून भाजी करतात. पहा : **चारखंड** (को.)

**चारका** पु. फाशाच्या खेळातील एक दान.

**चारकाणे–ने–न्हे** तिफाशी खेळातले एक विशिष्ट दान.

**चारकुवा** स्त्री. १. मुसलमानी तऱ्हेचा एक उंची पोशाख. २. चौकटीदार कापड : 'वकील मुतलख व अमीर उल् उमरावची खिलत चारकुवा व जोगी व शिरपेच व परिंदा...'– ऐको ३७३. [अर.]

**चारकू(कूं)ट** न. नुकतेच उगवलेले कोवळे गवत.

**चारकूर** पु. मरळ मासा.

**चारखणी** स्त्री. एक प्रकारचे कापड.

**चारखंड** न. १. फणसाचा तुकडा किंवा अलग केलेला भाग. २. गरे काढून घेतलेला फणसाचा भाग; चारीसकट किंवा सागूळीसकट जो फणसाचा भाग तो : 'फणसाची चारखंडे व आंब्याच्या साली यांचा केर पडे.'– माजीया २८५. ३. वरील काटे व गरे काढल्यानंतर राहणारी फणसाची सागूळ. ४. गरे काढलेला फणस.

**चारखु(खुं)ट** क्रिवि. चोहोकडे; सर्वत्र : 'अक्कलकोटचे थेट राहणार चारखुंट फिरलों शाही.'– पला ४.१३.

**चारखुंट जहागीर** स्त्री. १. पूर्व, पश्चिम, दक्षिण व उत्तर या चार दिशांकडे भिक्षेकऱ्याच्या झोळीचे कोपरे असतात. झोळीचा विस्तार हाच जहागिरीचा प्रदेश. २.(ल.) भिक्षेकऱ्याची वृत्ती; दरिद्री स्थिती.

**चारगट** पहा : **चारकट**

**चारगटा** पु. कोवळ्या फणसाची भाजी.

**चारगा** पु. कवडा पक्ष्याची एक जात. (गो.)

**चार घटका** अव. १. थोडासा वेळ २. बराचसा वेळ.

**चारचण–चंचू** वि. ऐटीत चालणारा.

**चारचक्षु–क्षू** पु. राजांचे हेररूपी डोळे.

वि. हेर हेच ज्याचे डोळे आहेत असा (राजा, सेनानी) : 'राजा चारचक्षु असतो.'– चंद्रगुप्त १०४. [सं.]

**चारचूर** क्रिवि. भरलेली कावड वाहताना होणारा आवाज : 'चारचूर चारचूर कावड वाजवीत यावं.'– ऊन ८९.

**चारचौघे** पु. अव. चार–पाच माणसे; काही थोडी माणसे.

**चार चौरस** सगळीकडे; सर्वत्र : 'जिरात जमिनीस बागाईत करून चारचौरस लावणी...'– बाबारो ३.५५.

**चारज(जा)मा** पु. १. कापडाच्या घड्यांचे बनविलेले व झालरी लावलेले खोगीर. (क्रि. घालणे, कसणे, ठेवणे.) २. घोड्यावर खोगीर (क्रि. चढविणे, करणे.)

**चारट** वि. १. हिरवे. २. पहा : **चारकट**

**चारट** न. रथ; इंग्रजी चॅरिअट या शब्दाचे अपभ्रष्ट रूप : 'मोठमोठ्या चारटांत बसून...'– जोफुसग्रं १२९.

**चार, चारही ठाव** जेवणातले चार मुख्य पदार्थ (भात, वरण, भाजी, पोळी किंवा भाकरी).

**चारडी** पु. क्षत्रिय : 'त्यांतील एक ब्राह्मण ख्रिस्ती व एक चारडी (क्षत्रिय) ख्रिस्ती होता.'– इशा २६४.

**चारडोळे** पु. अव. दोन माणसे (एकाच कामात गुंतलेली). उदा. तुमचे आणि माझे असे चार डोळे झाले म्हणजे चुकी होण्याचा संभव कमी.

**चारड्याईरड्या** स्त्री. चिंध्या; तुकडे : 'अंगावरल्या चोळीपातळाच्या फाडून चारड्याईरड्या केलेल्या...'– चिताक ८९.

**चारण** पु. धान्य, मीठ इ.ची ने आण करणारी एक जात; तांडेवाले. [सं. चर्]

**चारण** पु. १. देवयोनीतील एक भेद. २. भाट; स्तुतिपाठक : 'वेदकालीन कवींनी किंवा चारणांनी रचलेली'– लोसारू २३३. [सं.]

**चारण** स्त्री. जेथे चारा पुष्कळ आहे असे ठिकाण.

**चारणकस** पेंढारी : 'होळकर शिंदे यांजकडील चारणकस पथके तमाम इकडे आलीं त्यांनीं लुटून पस्त केलें.'– ऐको ३७५.

**चारणी** स्त्री. १. चारण्याची क्रिया; चारणीवर, चारणीस, चारणीला पाठविणे, घालणे, ठेवणे = (गुरांना) चरण्यास सोडणे. २. गुरांना खायला लावणे. [सं. चर्=खाणे]

**चारणी** पु. वंजारी : 'चारणी नवरा नको बये गा चारणी नवरा नको।

पथारी मार देतो बये ग। पथारी मार देतो।।'– लोसाको.

**चारणे** उक्रि. १. गवत खाण्यासाठी गुरांना कुरणात घालणे. २. खावविणे; भरविणे. ३. (ल.) लाच देणे. ४. विषयसेवन करणे : 'जो इंद्रियें अव्हासवा। चारी एथ।'– ज्ञा १३.७७०. [सं. चर्]

**चारणे** क्रि. चरकात ऊस टाकणे. (झाडी)

**चार दाणे** तिफाशी डावातील एक विशिष्ट दान; चार काणे.

**चार दिवस** थोडे दिवस; थोडा काल; काही काळ.

**चारदिवाली–ळी** स्त्री. ज्याला चोहोकडून भिंती आहेत असे आवार : 'टेबलाईजवळ उत्तर दिशेस एक टेकडी आहे. त्याजवर चारदिवाली पाऊणशें हात हमचौरस होती.'– ऐको ३७५. [हिं. दीवार]

**चारपगडे** एक प्रकारचा अंगरखा. यास बाह्या नसतात. आगापिच्छा असतो. आघाडीस व बाहुवर मोत्यांची झालर असते.

**चारपंजम** वि. चवथ्या व पाचव्या प्रतीचे, हलक्या दर्जाचे (रेशीम). [फा. चहारम+पंजम]

**चारपायी** स्त्री. खाट; पलंग. [सं. चतुर्+पद]

**चारबी** स्त्री. चारोळी. (झाडी)

**चारबोट चौबा** मुलांचा एक खेळ.

**चार लोक** समाज; समाजातील माणसे; काही स्नेही.

**चारवट** न. जनावराने गवत चावून खाल्ल्यानंतर रवंथ करण्यापूर्वीचा पोटात राहिलेला खाद्य पदार्थ. (माण.) [सं. चर्=खाणे]

**चारवा** पु. चर्या. तटाच्या भिंतीवरच्या माथ्यास कातरलेल्या करंजीप्रमाणे किंवा कमळाच्या पाकळ्यांप्रमाणे केलेले बांधकाम : 'त्यांनी शहरचे दरवाजे लाऊन कत्तल केली. त्यात एक तर कोटाचे चारव्यास अडकून बरोबर जाहला (ठार जाहला).'– ऐको ३७५.

**चार वाटा** १. कोणतीही बाहेरची वाट. २. (ल.) विस्तीर्ण जगात हिंडण्याची परवानगी. दहा वाटा किंवा बारा वाटा असेही म्हणतात. उदा. तुला चारी वाटा मोकळ्या आहेत.

**चारशेवीस** वि.(भारतीय दंडसंहितेच्या कलम ४२० वरून लक्षणेने) फसवणूक करणारे लुच्चे : 'भडवे सगळे चारशेवीस जमतात.'– लबोतोअ १६.

**चारसोबीसगिरी** स्त्री. फसवाफसवी, फसवेगिरी. उदा. माझ्याशी चारसोबीसगिरी करू नको. [हिं.]

**चारा** पु. पशू, पक्षी यांचा आहार, भक्ष्य, खाद्य (गवत, पाला, दाणे, किडे, कीटक इ.); गव्हाचे भूस; कुठार; कुटार; तुकडा; कडधान्याचे भूस : 'चारा घेतला पोटभरी। कमळांचा।'– कथा १.३.५७. [फा.चरा][सं. चर् = खाणे]

**चारा** पु. १. उपाय; पर्याय; भाग. २. दोन खांबांतील अंतर. (झाडी) [हिं]

**चाराचारांनी, चारेचारे** क्रिवि. चोखंदळपणाने; नाजूकपणाने; नाक मुरडून; तोंड वेडेवाकडे करून; तोऱ्याने; नखरेबाजपणाने. (क्रि. जेवणे, खाणे, पिणे, बोलणे, चालणे, लिहिणे इ.)

**चाराचुरा** पु. पदार्थाचे बारीक तुकडे; भुगा. (क्रि. करणे, पडणे.) : 'पुण्ये जोखुनी चाराचुरा। समान आलिया तुलाभारा।'– एभा २.२२०.

**चारापेरी** स्त्री. गवतपेरणी : 'आपल्याकडे शेकडा सतरा जमीनसुद्धां चारापेरीला ठेवीत नाहींत.'– गांवगाडा १२८.

**चाराबो(मो)रा** पु. गवत वगैरे : 'एक चाराबोरा गुंतले नाही जीवन चित्तीं।'– तुगा १७०.

**चारित्र्य** न. १.व्यक्तीची वर्तणूक नैतिक आचरण व व्यक्तिगत आचारविचार. २. सामान्यत: व्यक्तिवर्तन नैतिकतेच्या कसोटीवर तपासून तिचे चारित्र्य ठरविले जाते. तथापि मानसशास्त्रात व्यक्तिमत्त्वाचे एखादे खास व सातत्यपूर्व वैशिष्ट्य किंवा व्यक्तिमत्त्वाच्या छोट्या-मोठ्या सर्व गुणवैशिष्ट्यांचे एकात्मीकरण म्हणजे चारित्र्य होय. [सं.]

**चारित्र्य कसोटी** (शिक्षण.) व्यक्तीच्या वर्तनातील नैतिक मूल्यांची वस्तुनिष्ठ चाचणी व्हावी यासाठी तयार करण्यात आलेली लेखी अथवा प्रसंगनिष्ठ कसोटी.

**चारित्र्यघडण** स्त्री. (समाज.) व्यक्तीचा स्वभाव, शील, धर्म, विशेष गुण इत्यादी गोष्टी व्यक्तीमध्ये जाणीवपूर्वक निर्माण करणे.

**चारित्र्यपट** न. (शाव्य.) एखाद्या सेवकाच्या गुणावगुणांचे मूल्यमापन करणारे नोंदपत्र; वर्तनपत्रिका.

**चारित्र्यहनन** न. (समाज.) व्यक्तीची अब्रू, ख्याती, पत नष्ट करण्याचा जाणीवपूर्वक प्रयत्न करणे; व्यक्तीची समाजमानसात असलेली प्रतिमा डागळणे. चारित्र्यावर शिंतोडे उडविणे भ्रष्टाचाराचा, नैतिक अपराधाचा आरोप करणे.

**चारी** वि. पु. जाणारा किंवा चालणारा. (समासांत) अश्वचारी, आकाशचारी इ. [सं. चर्]

**चारी** स्त्री. मोटेच्या विहिरीचे उतरते क्षेत्र; मोटेची उतरण; धाव.[सं. चर्]

**चारी** पु. स्त्री. पाट; कालवा; कालव्यापासून काढलेला लहान पाट : 'गोदावरी कॅनॉलचे पाणी चाऱ्यांत सुटल्यावर.'– माआ २८७.

**चारी** स्त्री. (नृत्य) नर्तनात एका पायाने केली जाणारी क्रिया. हिचे दोन भेद आहेत. भौमीचारी व आकाशिकी चारी.

**चारु** पु. चाळे : 'त्या पितरांचे मांडिले चारु । ऐसा पुत्र निपजला।'– बगाथा ४६६. [सं. चर्]

**चारु–रू** वि. १. प्रिय. २. चांगले; उत्तम; सुंदर; रमणीय; देखणे (मनुष्य किंवा वस्तू). [सं.]

**चारुकेशी** पु. (संगीत) हा एक दाक्षिणात्य राग आहे. शुक्ल बिलावल व भैरवी या दोन रागांच्या मिश्रणातून हा राग तयार केला असावा असे याचे वर्णन केले जाते. या रागाच्या पूर्वांगात शुद्ध स्वर व उत्तरांगात कोमल स्वर असतात.

**चारुगात्र** वि. रूपवान; सुस्वरूप; सुंदर व ठाकठीक अवयवांचा.

**चारुगात्रा–त्री** स्त्री. जिचे सर्व अवयव सुडौल, सुंदर आहेत अशी स्त्री : 'त्या चारुगात्रेची जी मदिरारूपी मुखश्री ती नेत्रमुखी प्राशन करीत असता...'– मंजुघोषा २१. [सं.]

**चारुस्थळ** न. १. उत्तम ठिकाण; सुंदर मनोहर स्थान. २. ब्रह्मस्वरूप : 'चारुस्थळीं एकाहारीं। एकांगाचा।।'– अमृता १. २. [सं.]

**चारुळे** न. भांडे; चरवी. [सं. चरु]

**चारुळी** वि. चवथी : 'गोठ चारुळी'– भिल्लीगो १३. (खा.)

**चारू** पु. चारा; गवत : 'नाना वसो घातला चारू। माथां तुरंबिला बुरू।'– ज्ञा १७.२८१.

**चारोमेरी** क्रिवि. चौफेर; सर्व बाजूंना : 'माझ्या माहेराच्या वाटे । देख मये चारोमेरी ।।'– बगा ८.

**चारोळी–ळे** स्त्री. न. १. चार या झाडाच्या फळाची बी; चारोळ्या, या भाजून पेढे, बर्फी इ. मिठाईवर घालतात. २. चंदनाची बी; चंदनचारोळी. [त. शा (चा) रम्]

**चार्डे** पु. क्षत्रिय : 'ब्राह्मण, चार्डे (क्षत्रिय), शूद्र व महार या जाती अजून क्रिस्ती लोकांमध्ये आहेत.'– प्रिस्मृग्रं २९.

**चार्वाक** पु. एक नास्तिक तत्त्व. यावरून नास्तिक मताचा प्रवर्तक. [सं.]

**चार्वाकवाद** पु. चार्वाकमताचे प्रतिपादन करणारी विचारसरणी. [सं.]

**चाऱ्ही** पहा : **चार** वि.

**चाल** स्त्री. १. जाणे; गमन करणे; मार्ग आक्रमण करणे; प्रवास करणे. २. रीत; वहिवाट; पद्धत; रिवाज; परिपाठ; प्रघात : 'या बेटातील जुन्या लोकांच्या चालीप्रमाणे त्यांचा पोषाख होता.'– पाआव्ह ३. ३. चालण्याचा नोक; पाऊल टाकण्याची, ढब, ऐट. ४. घोड्याचा कदम किंवा गती. उदा. तुर्की, दुडकी, धावरी, चौक इ. ५. बुद्धिबळाच्या खेळात केलेली खेळी किंवा डाव. [सं. चल् = चालणे] (वा.) ० **घालीत चालणे** – दडपून वहिवाट पाडणे : '(वाटण्यात) चिटणवीसीचा वाटा नाही असे असोन अलिकडे मल्हारराव यांनी चाल घालीत चालले आहेत.'– चिटणीस घराण्याची संक्षिप्त माहिती व यादी. **चालीवर आणणे** – वळवणावर, वठणीवर आणणे. **चालीस लागणे** – १. मार्गास लागणे; चालू, सुरू होणे (धंदा, काम यांस). २. चालू करणे; सुरवात करून देणे. ऐजुले २.२.

**चाल** स्त्री. १. चलती; फैलाव, प्रसार. २. वर्चस्व; अधिकार. [सं. चल्]

**चाल** स्त्री. काम भागविणे; गुजराण करणे. [सं. चल्] (वा.) **चालीवर घेणे** – गुजारा करणे; निर्वाह करणे; भागविणे.

**चाल** स्त्री. १. नीतीची कसोटी लावता येईल अशी वागणूक; आचार; वर्तणूक; वर्तन : 'जयवंताची आई वाईट चालीची बायको होती.'– स्वयं ३६. २. पद्धत; रीत : 'यांचे घरचे चालीत याची वागणूक आहे.' – ओंकार २५. [सं. चर्या]

**चाल** स्त्री. (संगीत) १. प्रकार; तर्ज; तऱ्हा; गाण्यातील तान; स्वर, गती. २. (काव्यातील छंदविषयक) जातितऱ्हा. [सं.चल्]

**चाल** स्त्री. हल्ला; चढाई. (क्रि. करणे.)

**चाल** स्त्री. दुसऱ्या भिंतीचा जोड करता यावा म्हणून बाहेर काढलेला भिंतीचा भाग; जोड करता यावी म्हणून छप्पराची खांडे पाडलेली कड; चरकाच्या नरमादीमध्ये असलेली मळसूत्रासारखी खोबण व पुढे काढलेला भाग.

**चाल** वि. विशिष्ट ठिकाणी चालू असलेले किंवा पाडलेले नाणे. (समासात) पुणेचाल; चांदवडचाल; समशेरीचाल.

**चालक** वि. १. मुख्य सूत्रधार; संस्था चालविणारा : 'मुंबईतील सर्व कंपन्यांचे चालक संचालक दाराशी खुर्च्या टाकून आपली प्रतीक्षा करीत असतील.'– विराम १९. २. गती देणारा; चालविणारा; वागविणारा; हाकणारा. ३. जलद चालणारा; वेगवान; चपळ. [सं.]

**चालक** पु. चाळक; खेळिया; कारस्थाने करणारा : 'परंतु हे गृहस्थ परम चालक आहेत. यास निर्बंध ठेवलीयानें पुण्यामध्येसुद्धा राहणार नाहीं.'– ऐको ३७६.

**चालक** पु. चलाख; चांगली मजल मारणारा : 'मकसुया बादी टाकण (घोड्याची एक जात) चालक पाठविणे' – राखं ३.११.

**चालक** पु. पायाचा एक रोग. [सं.]

**चालकबाऊ** पु. पायाचे सांधे धरणारा एक रोग.

**चालकबाऊचा मणी** पायाच्या घोट्यावर मंत्रून बांधावयाचा काचेचा मणी किंवा पांढरी गारगोटी.

**चालकशक्ति–क्ती** स्त्री. प्रेरक शक्ती; स्फूर्ती आणणारी शक्ती.

**चालका** वि. १. चालणारा; चालावयास समर्थ. २. चालू लागलेले (मूल).

**चालकाबोलका** वि. १. चालण्याबोलण्यात समर्थ असलेला; चालूबोलू लागलेले (मूल). २. बोलून चांगला, भला, गोड; तोंडाचा गोड; मिळून-मिसळून वागणारा.

**चालगती** पु. मुदतीने आणलेले पिशाच्च; अनुकूल पिशाच्च : 'भुतासारखा ! चालगतीसारखा !'– किरिस्तांव ९०. (कु.)

**चालचरित्र** न. वर्तणूक : 'मसलतीविषयी नेट आहे कीं उपेक्षा आहे हे चालचरित्र शोधून बातमी लिहीत जावी.'– ऐको ३७७.

**चालचर्चा** १. हालहवाल. २. वागणूक; रीतभात; नेहमीचे आचरण; आचारविचार : 'त्यांची चालचर्या, चेहरामोहरा...'–कती ६०.

**चालचलन–चलाण, चालचलणूक** स्त्री. वर्तणूक; आचारविचार; वर्तन; वागणूक; आचरण : 'त्यांची चालचलणूक हेरून जमते.'– खर्डेघाशी ३.

**चालचलाऊ** वि. १. चालण्याजोगा; वेळ निभावून नेण्यासारखा तात्पुरता. २. प्रसंगोपात्त आचरण ठेवणारा. ३. कसे तरी काम भागविणारा.

**चालचलाक–ख** वि. मजबूत, बळकट आणि तल्लख (मनुष्य); वेगवान, चपळ (जनावर).

**चालचलाव** पु. जा ये; वहिवाट; वर्दळ : 'त्यांचा वाडा आमच्या वाड्याशेजारी. मध्ये भिंत मात्र. त्यांचा चालचलाव जाला आहे. उपद्रव करितात.'– ऐको ३७६.

**चालचालण** ठरावाविरुद्ध वर्तन, गैरवर्तन.

**चालचूक** स्त्री. वाट चुकणे; भलत्याच मार्गाने जाणे; गोंधळ; नजरचूक; आड वाटेस लागणे : 'काहीं फौज तिकडे चेमलकडे चालचूक होऊन निघाली. त्याचा थोडाबहुत गलाटा जाला.'– पेद २९.१२७.

**चालढकल, चालढाळ** स्त्री. १. कामात हयगय; काम रखडत करणे. २. कार्य लांबणीवर टाकणे; दिवसगतीवर सोपविणे; ढकलाढकल करणे : 'त्याने चालढकलीची भाषा करावी याचें मला आश्चर्य वाटले.'– कपाती ४३. ३. कशीबशी गरज भागविणे. ४. अडचणीत, तारांबळीत आयुष्य कंठणे.

**चालढब** स्त्री. व्यक्तीची चालण्यावागण्याची पद्धत.

**चालढाल** स्त्री. चालढकल : 'त्याणी चालढाल करून त्याजकडून कौलकरार लिहून आणावा म्हणून.'– ऐको ३७६.

**चालढाळ** पु. १. सवय. २. क्रम; रीतभात; कार्यपद्धती. ३. परिपाठ.

**चालणकार** पु. चालणारा : 'आला चंद्रभागे पूर। वाहे पाणी तुपावाणी। वाटेचा चालणकार । पाहने का वेड्यावाणी।'– वलो १२. (व.)

**चालणा** स्त्री. गडबड; उलाढाल : 'चालणा फार करतील.'– पेद २६.९७.

**चालणा** वि. चालणारा : 'तें मी होईन सुखासन। तें मीचि वाहीन आपण।

भोई होईन चालणा।'- एभा १२.५६.६.

**चालणी** स्त्री. काथ्याचा दोर.

**चालणे** उक्रि. १. गमन करणे; जाणे; मार्ग क्रमण करणे; रस्ता क्रमणे; जाण्यासाठी पावले टाकणे. २. पुढे जाणे; प्रगती होणे; चालू असणे; चालण्याची क्रिया. ३. जाणे; लोटणे; गतीत असणे; कंठिला जाणे (दिवस, भरभराट, आयुष्य); चालू राहणे; वर्षानुवर्ष अस्तित्वात असणे (जिंदगी, रीतरिवाज). ४. चालू असणे; सुरू असणे (काम, यंत्र). ५. विवक्षित, विशिष्ट गतीने, ढबीने, नेकीने गमन करणे, चालण्याची क्रिया करणे.[सं. चल्] (वा.) **चमकून चालणे** – ऐटीत चालणे : 'चाले चुकावुनि पुढें चमकोनि घोषा।'- आकं ३. **चालता घेणे** – चालवून घेणे; गुजारा करणे; चालू होणे. **चाली घेणे** – कूच करणे : 'विजयादशमीचे मुहूर्त चाली घेतील.'– ऐको ३७७. **चालून जाणे** – हल्ला करणे; चढाई करणे; स्वारी करणे : 'हिंदुस्थान सरकारचें लष्करी धोरण जरी रशिया संबंधाने बचावाचे असले तथापि एकंदरीनें चालून जाण्याचेच आहे.'- लोटिकेले २.३५७.

**चालणे** उक्रि. १. अधिकार, वर्चस्व असणे; प्राधान्य असणे. उदा. त्याचे घरी काही चालत नाही. २. पटणे; यश येणे. ३. मान्यता असणे; पसंत पडणे; उपयोगात असणे; चालू देणे; बाजारात, व्यवहारात घेणे, स्वीकारणे (नाणे, गोष्ट, वागणूक, हकीकत) : 'तू दिलेला रुपाया आमच्या मुलखात चालत नाहीं.'- गुजा ३७.

**चालणे** उक्रि. वागणे; वर्तणे; ऐकणे (आज्ञा, हुकूम). उदा. गुरु जसे सांगतील तसे चालावे.(वा.) **चालू न देणे** – न ऐकणे : 'चालो न देचि मत, करि मन तैशाचेहि काय पाप तिचे।'- मोमंभा ३.५२.

**चालणे** उक्रि. कामास उपयोगी पडणे; पुरवणे; समाधान करणे; भागणे : 'चालला तर गाडा नाही तर वाडा' = उपयोगी असला तर सोय, नाही तर अडचण.

**चालणे** उक्रि. १. योग्य होणे; उपयोगी पडणे; उतरणे; जमणे; हेतूला, उद्देशाला योग्य असणे. २. उपाय, युक्ती असणे.

**चालणे** उक्रि. लिहिण्यास धजणे (लेखणी वगैरे).

**चालणे** उक्रि. दरवळणे; भरून जाणे (सुवास वगैरेनी).

**चालत** स्त्री. धोरण; चालचलणूक : 'नबाबाकडील मजकूर लिहिला आहे, त्यास त्याचीं चालत कारभारी यास मठीं ठेवावयाची आहे. (कैदेत ठेवावयाची आहे.)'- ऐको ३७६.

**चालता** वि. १. चालू असणारा; गतीत, उपयोगात असणारा; वापरण्यात असलेला; सुरू असलेला. २. उपयोगात येण्यासारखे, तीक्ष्ण (धार किंवा धार लावलेले हत्यार, शस्त्र). ३. प्रचारात असणारा; अस्तित्वात असलेला; वर्चस्व असलेला. (वा.) **चालत्या घोड्यावरच्या गोमाशा** – घोडा जिवंत असतानाच त्याच्या अंगावर गोमाशा बसतात, मेल्यावर बसत नाहीत. (ल.) माणसाजवळ पैसा, अधिकार असतो तोपर्यंत लोक त्यास चाहतात. आश्रयाला असणारे, कार्यसाधू, लाळघोटे.

**चालता काळ** भरभराटीचा काळ; उत्कर्षाचे दिवस : 'बा तुझा चालता काळ । खायाला मिळती सकळ।'- अमृत ११८.

**चालता गाडा** सरळ चाललेला गाडा; सुरळीत चाललेला क्रम, परिपाठ, एखादे काम.

**चालताबोलता** वि. १. मूर्तिमंत; २. चालता बोलता येते असे (मूल).

**चालताबोलता, चालताबोलता असता** क्रिवि. १. चटकन; सहजासहजी; लवकर; अनायासे. २. अल्पकाळात; एकाएकी; तात्काळ.

**चालता रुमाल** (कचेरीकामात) प्रकरणांचा समूह.

**चालता स्वैपाक** वि. साधा, सोपा, सहज होण्याजोगा; शिजत असता फारसे लक्ष द्यावे लागत नाही असा (स्वयंपाक).

**चालती** वि. चालू असलेली; चालणारी; सुरू असणारी. (वा.) **चालतीस लावणे** – सुरू करणे; चालू करणे.

**चालती** स्त्री. व्यवहार; मैत्री. (झाडी)

**चालती तबलक, चालते पुडके** चालू प्रकरणांचा समूह.

**चालती मज(जी)ल, चालता कूच** न थांबता कूच, मार्गक्रमण करणे.

**चालती वहिवाट** चालू देखरेख, उपभोग, मालकी; (परंपरागत आलेल्या जिंदगीचा) प्रस्तुत उपभोग.

**चालते** वि. चालू असणारे; सुरू असणारे.

**चालते औषध** रोग्याला नेहमीप्रमाणे वागण्यासवरण्याची मोकळीक ठेवणारे औषध.

**चालते काम** सध्याची गरज भागविण्याची ताकद किंवा सामर्थ्य.

**चालते थबल्याची पत्रे** चालते थैल्यांची पत्रे, चालू टपालांची पत्रे : 'सदरेस आल्यास चालते थबल्याची पत्रे तुमची येतील तेव्हा विस्तारयुक्त बोलण्याविसी लिहून पाठवू' - ऐलेसं ८२२७.

**चालते दप्तर** १. चालू सरकारी कामासाठी नेमलेली मंडळी अगर कचेरी, कारखाना. २. चालू कामाकरिता तयार करून ठेवलेले कागदपत्र. ३. (लक्षणेने) चालू काम.

**चालत्या पायी** क्रिवि. चालत असतानाच; न थांबता; ताबडतोब.

**चालधारणा** वागणूक. (अहि.)

**चालन** न. १. (छपराची कौले, पुस्तकाची पाने, गंजिफा, विड्याची पाने इ.) चाळविणे; उलथीपालथी करणे; (ग्रहासंबंधी वर्तविलेले गणित, शास्त्रीय मूलतत्त्वे) पुन्हा करून, अगर उलटून पाहणे; नीट व्यवस्थित लावण्याकरिता, बसविण्याकरिता, फेरतपासणीकरिता, छानण्याकरिता फिरविणे अगर उलटणे. २. चालवणे; सरकणे; गती. [सं.]

**चालन** न. ग्रहादिकांच्या अस्तोदयाचे अंतर जाणून कल्पितात ते क्षेपक; अशा प्रकारे मिळवून, वजा करून काढलेले अंतर. [सं.]

**चालना** स्त्री. गती; प्रेरणा : 'ब्रिटीश राष्ट्राने आंतून आंतून चालना दिली.'- पवा २०५. [सं.] (वा.) **० देणे** – सुरू होईल असे करणे. **० मिळणे** – वेग येणे, गती प्राप्त होणे, सुरू होणे. (क्रि. देणे, मिळणे.)

**चालनी** स्त्री. १. तारा. २. एक मासा. ३. चाळणी. (झाडी) [सं. हिं.]

**चाल परिपथ** (विअ.) गुंतागुंतीच्या विद्युतमंडळाला चालना देणारे सुरुवातीचे विद्युतमंडळ.

**चालबाज** वि. लबाड; धोकेबाज; गैरवर्तनी : 'घरचा मालक चालबाज निघाला.'- माखा ६१.

**चालरीत** स्त्री. वहिवाट; रिवाज; परिपाठ; पद्धत : 'समानरूढी आणि चालीरीती यांनी, ....एकजातीय व्यक्तींना जी वैशिष्ट्ये प्राप्त होतात

त्यांतली काही भाषिक स्वरूपाची असतात.'– भाईभू.

**चालवर्तणूक, चालवळ, चालवा** स्त्री. १. (वि.प्र.) चालचलणूक; (व्यापक) वागणूक; वर्तन. २. चाल; रोख : 'शत्रूचा मुक्काम कोपळापलीकडे तुंगभद्रातीरीं आहे. त्याची चालवा पाहून कनेकगिरीच्या सुमारे जावें, असे आम्हीं योजिले आहे.'– ऐको ३७७.

**चालविणे** उक्रि. १. सुरू करणे; गती अगर चालना देणे : 'सोफे धर्मशाळा चालवावीं। नूतनचि कार्यें।'– दास ४.७.४. २. चाल, वहिवाट, परिपाठ ठेवणे; गती, कारभार सांभाळणे. ३. चालू करणे; प्रसृत करणे; उभारणे. ४. क्रम चालू राखणे; हाकणे; उपयोगात आणणे; प्रचारात, व्यवहारात आणणे. ५. मारणे (हत्यार, काठी वगैरे). ६. कारभार हाकणे (गादी, संस्था यांचा). ७. लिहिणे (लेखणीने). ८. नेणे, घेऊन जाणे : 'ए बया कोणाचा कंदील चालवला आहे?'– परिपूर्ति. ९. परामर्ष घेणे; समाधान करणे; उपयोगी पडणे : 'जेया घरा भीक्षे जाति : तीये घरीं चालविति :'– लीचउ २४२. १०. साजेसे, अनुरूप करणे; ठीक जमवून देणे. ११. (व्याक.) शब्दांची सर्व रूपे सांगणे; चालविण्यास लावणे; विशिष्ट शब्दांचे सर्व व्याकरण सांगणे. १२. खोटे नाणे हातचलाखीने दुसऱ्यास घ्यावयास लावणे किंवा देणे. (वा.) **चालवून घेणे** वस्तू हवी तशी नसल्याने होणारी अडचण न भासेल असे करणे.

**चालाकुचाला** पु. आवाडाव; घालमेल चाळाकुचाळा : 'चालेकुचाले करून कार्यनाश करू म्हणतील तरी बऱ्या विचाराच्या गोष्टी चार सांगोन थंड करावे.'– पेद ३३.४०

**चालाख** वि. हुशार; चपळ; तरतरीत. (व.) [फा. चालाक्]

**चालाणापालाणा** पु. सैन्याचा मुक्काम संपवून डेरे राहुट्या वगैरे सामानासह कूच करण्याची तयारी अगर सिद्धता : 'चालाणापालाणा भणजोनि आफाविलिया भेरी'– धवळेपू २६.

**चालान** पहा : **चलान**

**चालित** वि. चालण्यास लावलेला; चालविलेला. [सं.]

**चाली** स्त्री. उसाच्या चरकाच्या नवरानवरीमधील अडकवलेली खिटी, पाचर, मळसूत्र.

**चाली** स्त्री. प्रवेश; वशिला; वजन : 'ज्याची चाली रायापाशी। लांच हाता ये तयासी।'– एभा २८.६६४.

**चाली** स्त्री. व्याप : 'सकळ सृष्टीची चाली येथुनी।'– दास २०.२.१७.

**चाली** स्त्री. पत्ते खेळण्याची पाळी. (झाडी) [हिं.]

**चालीवजा** वि. १. चालीप्रमाणे; रूढीबरहुकूम; सर्वसंमत; सांप्रदायिक; सामान्य. २. कामचलाऊ; वेळ भागवून नेणारे; प्रसंगोपात्त असे.

**चालू** वि. धूर्त; वाईट चालीची; वाईट वागणुकीची : 'फोमण्या परसूकडे एक चालू बाई आली आहे.'– वासुनाका १८.

**चालू** वि. चालता; सुरू असलेला; सध्याचा; प्रचलित.

**चालूक** वि. जलद जाणारा; चपळ.

**चालू खाते** (वाणिज्य.) ज्या ठेवीमधील पैसे ठेवीदाराला केव्हाही काढता –ठेवता येतात असे बँकेतील खाते.

**चालू दायित्व** (अर्थ.) आर्थिक व्यवहारातील परत फेडीची जबाबदारी.

**चालू धारणाधिकार** पु. कर्जाची परतफेड होईपर्यंत दुसऱ्याची मालमत्ता ताब्यात ठेवण्याचा हक्क असणे.

**चालू नाणे** (अर्थ.) विनिमय व्यवहारात मूल्यमापनाचे माध्यम म्हणून वापरले जाणारे राजमुद्रांकित नाणे. भारतात रुपया हे असे नाणे आहे.

**चालू पत** (वाणिज्य.) बँक खातेदारास काही एका मर्यादेपर्यंत विमातारण रक्कम उपलब्ध करून देते.

**चालू भांडवल** (अर्थ.) कच्चा माल, वीज, वेतन यांसारख्या उत्पादनाच्या प्रमाणात बदलणाऱ्या बाबींवर वापरले जाणारे चालू किंवा खेळते भांडवल.

**चालेचाले** हळूहळू; कूच मुक्काम करीत.

**चाल्ला** पु. कुंकवाचा टिळा : 'तू विधवा? मग डोक्याला हा चाल्ला का?' – धाधो १३.

**चाव** पु. ऐट; ढंग : 'आपले सोवळे चाव करून...'–जोफुसग्रं १४४.

**चाव** पु. वर्चस्व; अधिकार सत्ता. (व.)

**चावका** वि. चावणारा; चावरा (कुत्रा वगैरे). [सं. चर्व]

**चावट** वि. १. बाष्कळ बडबड करणारा; वात्रट; तोंडाळ; चघळ; वाचाळ; चहाटळ : 'चावट गोष्टींची प्रचारातील पुस्तके त्यास (पालला) आवडत नसत.'– पाआव्ह ८५. २. नापसंती दर्शविणारा, सलगीतल्या लहान माणसाला लावण्यात येणारा शब्द : 'केव्हां चालविलें खडे खुपतिसें कोठें तुला चावटा।'– मनोरं (जून १९२१). [सं. वाचाट]

**चावट** वि. चिवट; वातड; चावण्यास कठीण (भक्ष्य पदार्थ वगैरे).

**चावट** वि. झीज झाल्यामुळे ढिले अगर सैल झालेले (स्क्रू, बिजागऱ्या, यंत्रे वगैरे).

**चावटा** स्त्री. वटवट; बडबड : 'तंव दैत्येश म्हणे वाजटा। व्यर्थ कां करिसी चावटा। तव सैन्य लाविले बारा वाटा। हें काय दृष्टीं न देखसी।'– जैअ ७९.६७. [सं.वाचाट]

**चावटाई, चावटगिरी–पणा** स्त्री. वात्रटपणा; बडबडेपणा; पाजीपणा.

**चावटी–टे** स्त्री. वाचाळता; बाष्कळ बडबड; थट्टा (क्रि. करणे, पिटणे.) : 'तैसा मीं जरीं तुम्हांप्रती। चावटी करितसें बाळमती।'– ज्ञा ९.१६.

**चावडी** स्त्री. १. कोतवालाची कचेरी; बाजारातील पोलीस चौकी : 'वा: म्हणजे त्याने मला आयतेच चावडीवर न्यावें.'– मृच्छ ४३. २. गावातील कामकाजाची जागा; गावकचेरी. ३. प्रवासी, उतारू वगैरेंसाठी असलेली धर्मशाळा, अड्डा वगैरे. ४. कुटाळकंपूचा अड्डा. (हॉटेल किंवा न्हाव्याचे दुकान यांसारखा). ५. शेतसारा; सरकारला द्यावयाचा कर : 'तलाठ्यांस रुपये १६।१२।२० काय चावडी म्हणेल ती रयतेने द्यावी.'– खेया १७. [सं. चौहाट] [हिं.]

**चावणे** उक्रि. १. चर्वण करणे; दाताखाली रगडणे. २. दंश करणे; दातांनी जखम करणे; नांगी वगैरे टोचणे. ३. लचका तोडणे, दु:ख देणे; टोचणे. उदा. जोडा चावणे. ४. पोटात तोडणे; आतड्यांस पीळ पडणे. ५. डोके दुखणे; डोक्याला खाज सुटणे; चिवचिवणे; बेचैन होणे. ६. लाच घेणे. [सं. चवर्ण] (वा.) **चावत बोलणे** – दात आवळून बोलणे. **चावू का गिळू करणे** – एखाद्याच्या नाशास उद्युक्त होणे. **चावून घालणे** – पुष्कळ विवरण करून आणि पुन:पुन्हा बोलून सांगणे अथवा शिकविणे. **चावून चिकट करणे** – १. स्वत:ला फसवून घेणे; लोचटपणामुळे काम बिघडवून घेणे. २. कंटाळवाणी बडबड करणे; जपमाळ घेणे;

व्यर्थ काथ्याकूट करणे. **चावून चिवून खरचणे** – कृपणपणे, कंजूषपणाने खर्च अथवा उपयोग करणे. **चावून चिवून ठेवणे** – अतिशय काटकसरीने संचय करणे. **चावून चिवून संसार करणे, घर चालविणे** – काटकसरीने संसार चालविणे. (चिवून चावून अथवा चिवून चाचून असेही म्हणतात.)

**चावणे** न. खांबाची उंची वाढविण्याकरिता त्यास जोडलेला तुकडा.

**चावदस–सी** स्त्री. चतुर्दशी. पहा : **चौदस** : 'चोरा जसि कृष्णपक्षि चावदसी।'– मोकर्ण २८.४. [सं. चतुर्दशी]

**चावदसी** स्त्री. जागृतावस्था; जागेपणा; जागृती.

**चावदिवस, चावदीस** पु. अश्विन वद्य चतुर्दशी; नरकचतुर्दशी : 'चावदिवसादिवशी घमघमणारी आंघोळ शेजारीपाजारी करीत.'– पक्षिणी १८.

**चावनट** वि. वात्रट; बडबड्या; पाजी; फाजील त्याच त्या गोष्टीची कटकट करणारा : 'ई: दोडा ! चावनट मुडदा !'– गंगो १०६.

**चावनटपणा** पु. फाजीलपणा; चावटपणा : 'हा हो काय तुमचा चावनटपणा !'– आआशे १०१.

**चावर** न. चार बैल हाकायचा चामड्याचा कोरडा; चावराइतक्या लांबीचे माप : 'जमीन ८ चावर आहे.'– पेसाआप ६८.

**चावर** पु. (सामा.) चाहूर; १२० बिघे जमीन : 'त्या खर्गी क्षिति कितेक चावर। व्यापिली प्रभु मधे जिचा वर।'– वावेणु २.१०.

**चावर** पु. १. उसासाठी खोल वाफे तयार करण्याचे हत्यार. २. पाचर.

**चावर** स्त्री. नांगराच्या धुरीपुढच्या बैलजोडीची जागा. पहा : **चाहूर, चाव्हर**

**चावरा** वि. चावणारा (घोडा इ.); झोंबणारा : 'हवेत चावरा गारठा आलेला होता.'– व्यमांक २१०.

**चावरा** स्त्री. चौरंग. [सं. चतुर]

**चावरा–री** पु.स्त्री. जनावरांनी चावून तुडविलेला चारा. चावलेल्या अन्नाचा/ गवताचा जनावरांपुढील अवशेष. [सं. चर्व]

**चावरा, चावरीमोट, चाव्ऱ्या** पहा : **चाव्हरी**

**चावराणा** क्रिवि. चाहुरवार; प्रत्येक चाहूर जमिनीस अमुक अशा पद्धतीने : 'मग बेलेपटी व प्रजेपटी दोनी बाबा याची खिस्त चावराणा करून दिली.'– पेद ४५.३.

**चावरात** पु. अव. चाहूर अनेकवचन.

**चावरी** वि. बोचणारी; झोंबणारी : 'चावऱ्या थंडीनं ते हैराण झाले आहेत.'– लव्हाळी १३४.

**चावरी** स्त्री. एक प्रकारची घडवंची. पहा : **चाहूर** [सं. चतुर]

**चावरीचा** वि. नांगराच्या दुसऱ्या जोडीला योग्य असा.

**चावरे** वि. चंचल; स्वैर; बहकणारा : 'यापरी स्वकर्मादिकीं। मन होय अधिकीं चावरें।'– एभा २३.६३६.

**चावरे** न. चावणारे कीटक : 'चावडीत चावरे बेसुमार होते.'– वाटा ४३.

**चावल** पु. तांदूळ. [हिं.]

**चावल** स्त्री. चाहूल; हालचाल : 'माजीया अंगनात तुळशीबाईची चावल.'– जलोसा ७१४.

**चावल** स्त्री. उपदेश : 'तेथे पांचाल देश सुभिक्ष सुकाळ। भिक्षेचा नाही दुष्काळ। ऐसा करोनिया चावल। गेला व्यास देवो।'– कक ५.१२.८३.

**चावलीन** न. मुलांस औषध देण्याचे काचेचे लहान भांडे. (कु.)

**चावळ** स्त्री. हालचाल; चळवळ. [सं. चल्]

**चावळ** स्त्री. चौफणी पाभर.

**चावळणे** अक्रि. १. सांगणे; बोलणे : 'आपुलिया मना बरवी। असमाई गोडी जीवी । ते कवणेसि चावळावी। जरी ऐक्य जाहले।'– ज्ञा ६.११८. २. बडबडणे; भलभलते बोलणे : 'चावळतांही वाग्जल्पू। अर्थहीन उमजेना।'– मुआदि १९.७६. ३. ज्वर, भय, निद्रा इत्यादी कारणांमुळे विचूक बोलू लागणे; बरळणे : 'भय घेतलें मानसीं । म्हणोनि भलते चावळसी।'– रावि २३.८३. ४. वेडे होणे; खूळ लागणे.

**चावळी** स्त्री. निरर्थक बडबड.

**चावा** पु. दंश; दंशाचे चिन्ह; व्रण; दाताने केलेली जखम. [सं. चर्व] (वा.)
  ० **मारणे** – लग्गा साधणे.

**चावाचवीना** पु. लाच.

**चावाचीव–चावी** स्त्री. १. असंतोष; कुरकुर; विनाकारण केलेली हरकत, टाळाटाळ इ.२. लोचटपणाची मागणी.

**चावाचुक होणे** गप्प होणे : 'गावकरी एकदम चावाचुक होऊन गेले.'– वावारू १४६.

**चावारणे** अक्रि. वखवखणे : 'एखादे बुभुक्षित जनावर आहाराकरितां जसें चावारलेलें असतें... '– स्वस्था १०२.

**चाविरा** वि. चावणारा; चावण्याची सवय असलेला : 'पुढे चाविरा मागे लातिरा'– एवाका ११९.

**चावी** स्त्री. १. किल्ली. २. खुबी. ३. हार्मोनियममधील सुराची पट्टी. ४. बांधकामातील कमानीच्या मध्याचा दगड. [तु. चावे]

**चावी** स्त्री. तोटी; किल्ली फिरवून पाणी ज्यातून पडते असे नळ : 'बाई माणूस असून 'मी गेलो', 'मी आलो' 'म्हणे, नळाला चावी म्हणे.'– डाली ९९. (वा.) ० **फिरवणे** – हेतुपूर्वक विपर्यस्त बातमी सांगणे; सूचक बोलून भडकावणे व गंमत पाहत राहणे; एखाद्या बातमीचा चिडविण्यासाठी उपयोग होणे : 'त्याच्या हातात कोणाचंही खुस्पट मिळालं, की सगळ्या वालपाखाडीत चाव्या फिरवत हिंडायचं...'– वासुनाका २१.

**चावीचा दगड** (स्था.) १. दगडी कमानीचा मधला पाचरीच्या आकाराचा दगड. २. (ल.) अत्यंत महत्त्वाचा भाग; सर्व कार्यक्रमाचा आधार : 'अंदाजपत्रकातील चावीचा दगड म्हणजे दारुबंदीचा कार्यक्रम.'– के २५.४.३९.

**चाव्येकार** पु. किल्लीवाला; कोठीवाला. (गो.)

**चाव्हरा–ऱ्या आसूड** शेतकऱ्याचा लांब चाबूक; कातडचाचा, चामड्याचा चार बैल हाकावयाचा कोरडा.

**चाव्हरी** स्त्री. बैलांची दुसरी जोडी लावावयाच्या सोलाचा, दोराचा पुढचा भाग. [सं. चतुर् = चार]

**चाव्हरी–रे बैल** पुढल्या जोखडाला जुंपलेली बैलांची दुसरी जोडी. (यावरून सहा बैली चाव्हरी, आठ बैली चाव्हरी, सोळा बैली चाव्हरी हे सामासिक शब्द होतात).

**चाव्हरी मोट** बैलानी ओढायची मोट.

**चाश-ष-स** पु. पक्षिविशेष; तास पक्षी; ह्यास खंजन, खंजरीट, मणिकंठ असेही म्हणतात : 'रावे, मयूर, भारद्वाज, चाष, हंस...इकडून तिकडे उडत आहेत.' - मंजुघोषा २. [सं. चास.]

**चाषगति-ती** स्त्री. (नृत्य) उजवा पाय पुढे सरकवून पुन्हा पहिल्या जागेच्या मागे ठेवणे व डावा पाय मागे गेलेल्या त्या उजव्या पायाजवळ आणून ठेवणे. [सं.]

**चास** स्त्री. नांगरताना पडलेली नांगराची रेषा, तास; नांगरट. [हिं]

**चास** पु. ओढा, नाला; नदीवरील उंचवटा : 'चक्रपाणीवरिलीकडे वास : तेया चासाचेया टेंकावरि गोसावी उभे राहीले :' - लीचउ ३७८. [सं.]

**चासणी, चाशनी** स्त्री. साखरेचा पाक: 'खडीसाखरेची भुकटी करून ती अदपाव पाण्यांत टाकावी व तिची चासणी तयार करावी.' -गृशि २.३२.

**चासणी** स्त्री. ऊसाचा रस कढविण्याची काहील.

**चासणी, चासणूक** पहा : **चाचणी, चाचणूक**

**चासणीकार** पु. राजे लोकांचा स्वयंपाक आधी खाऊन पाहणारा अधिकारी; चोख्या. [फा. चास्नी]

**चासनी** स्त्री. चव. [फा. चास्नी]

**चासपणे** अक्रि. चापसणे; चाचपणे. [सं.]

**चासेचास** क्रिवि. नांगराने पाडलेल्या प्रत्येक रेषेत; पाभरीच्या प्रत्येक तासात : 'जिया अमृत लेशालागीं सायास। तयाचा पाऊस केला चारी मास। पृथ्वी वाहून चासेचास। चिंतामणि पेरिले।' - ज्ञा ११.५८२.

**चास्नीगर** पु. नाणे पाडण्याच्या मिश्र चांदीची परीक्षा करणारा.

**चाह** पहा : **चहा**

**चाहणे** अक्रि. आवडणे; प्रिय असे मानणे; इच्छा करणे; मानणे, आदर करणे. उदा. मला तो भारी चाहतो. [हिं. चाहना, सं. इच्छा]

**चाहता** वि. भक्त; मानणारा; आवड असणारा : 'ही सगळीच चाहते-मंडळी अप्पांच्या आवडीची नसत.' - गंगाजल २५.

**चा(च्या)हरम, चाहारूम** पु. चौथाई; चौथ; चौथा हिस्सा; वसुलीचा चौथा भाग; खंडणी : 'सुज्यावेतखान अलजपूरचा सुभा यानें तीन वरशें आमचा च्याहरम दिल्हा नाहीं.' - पेद १५.८२. [फा. चहारुम]

**चाहरुम** वि. चौथ्या दर्जाचे; क्षुद्र.

**चाहाडी** स्त्री. १. चाड; चडी; लावालावी २. इच्छा : 'म्हणोनि देसी शब्द उघडी। जे अर्थामृती चाहाडी' - रकौ ६.

**चाहादाणी** पहा : **किटली**

**चाहाळ** पु. चाहूल, आवाज. (व.) [सं.चल्]

**चाहाळु** पु. चाहूल; अस्पष्ट आवाज : 'मग गोसावीं खांकलिले : तीहीं म्हणीतलें : एथ माणुसांचा चाहाळु असे :' - लीचपू ५११.

**चाहुरा** पु. चाबूक; कातड्याचा कोरडा : 'सिपाय नवरा नको बये ग, चाहुऱ्याचा मार देतो बये ग' - एहोरा ७९.

**चाहुरी, चाहुरीमोट** पहा : **चावर, चाहूर, चाव्हरी**

**चाहुली-ळी** स्त्री. चाहूल; आवाज; हालचालीने होणारा शब्द : 'राक्षस आला तेचि वेळीं। जाणोनि विप्राची चाहुली।' -- कक २.१३.१२१. [सं. चल्] (वा.) ० **मारणे** - चाहूल लागू न देणे; आवाज न करता चालणे : 'गडी ठेवूनिया बाहेरी। चाहुली मारूनियां संचार करी। तंव या शिंकियाचिया हारी। चाचपडतां सांपडल्या।' - निगा ३६.

**चाहूर** पु.पहा : **चावर** [फा. चाहर]

**चाहूर** पु.न. १. चार बैली आउतांतील पुढची जोडी; धुरवीच्या पुढची जोडी. [सं. चतुर्]

**चाहूर** पु.न. धान्य वाखण्याची घडवंची; वावडी.

**चाहूल** स्त्री. पडसाद; कानोसा; मनुष्याच्या अथवा जनावराच्या हालचालींचा आवाज, चिन्ह; माणसाच्या येण्याची सूचना : 'जागा रे गोपाळांनो ठायी ठायी जागा। चाहुलीने भागा दूर मजपासूनी।' - तुगा २५१. (वा.) ० **लागणे** - कोणतरी जवळपास आल्याची जाणीव (होणे) : 'त्याला कशी काय चाहूल लागली आपली?' - गआचा ५. [सं. चलनवलन]

**चाळ** स्त्री. अनेक बिऱ्हाडासाठी बांधलेली एकाच नमुन्याच्या सलग खोल्या असलेली इमारत. [सं. शाला]

**चाळ** पु. वाळू वगैरे पदार्थ चाळला असता चाळणीवर जो जाडाभरडा भाग शिल्लक राहतो तो; चाळून राहिलेला अवशेष.

**चाळ** पु. तोंडावरील वण; देवी वगैरेचा डाग. (खा.)

**चाळ** पु. पैंजण; नाचताना पायांस बांधावयाची घुंगरांची माळ. [सं. चल्]

**चाळ** पु. शोधणे; हुडकणे.

**चाळ** पु. १. उलथापालथ; घडामोड. २. (ल.) कारवाई; पाताळयंत्र.

**चाळ** पु. धोतरजोड्याची दोन पाने कापून वेगळी करण्यासाठी मध्ये न विणता ठेवलेली मोकळी जागा; कुरळ.

**चाळ** पु. चालणे; हालचाल; हलविणे.

**चाळ** पु. नदीतील भोवरा.

**चाळ** पु. तोंडाने घातलेली शीळ; सूं असा आवाज.

**चाळ** पु. एक प्रकारचा गजकर्णाचा किडा.

**चाळ** पु. मासे पकडण्यासाठी खारे पाटात केलेले खड्डे.

**चाळ** पु. टाकून बोलणे : 'उपहासु चाळु । वर्मस्पर्श' - ज्ञा ३.२७०.

**चाळ** पु. खेळावयाच्या सागरगोट्यांचा संच.

**चाळ** पु. लुगडे इत्यादीच्या काठांमध्ये नक्षी उठविण्याचे हातमाग/यंत्रमाग यातील साधन.

**चाळ** स्त्री. खोडी; चाळा.

**चाळ** स्त्री. पट्टी : 'चौदा चाळ कोकण' - मुआदि २६.२८.

**चाळक** पु. चाळकबाऊ नामक व्याधी (गजकर्ण). पहा : **चालक**

**चाळक** वि. चालविणारा; प्रेरक; गती देणारा. जसे :- विश्वचाळक : 'कोण होईल तो ब्रह्मांड चाळक।' - तुगा २६६८. [सं. चालक]

**चाळक** वि. १. खोडकर; व्रात्य; खट्याळ : 'द्वाड आपेसी वोंगळ। चाळक चुंबक लव्याळ।' - दास २.३.२८. २. नखरेबाज, छिचोर (स्त्री). [सं. चल्]

**चाळक** वि. चपळ; चंचल : 'चाळक माझे मन, पांगुळ पै जाले' - नाम ३५५. [सं. चल्]

**चाळक भवानी** चटकचांदणी; नखरेबाज; छिचोर चाळे करणारी स्त्री : 'आई काय आहे चाळकभवानी कमी. तिचंच कारटं हे.' - यखे १०२.

**चाळढाळ** पु. १. चालढकल; अडचण दूर करणे. २. हालचाल : 'जियेते अळुमाळु। रूपागुणाचा चाळढाळु। ते भलतैसाही खेळु। लेखा आणि।' -

ज्ञा १३.९.८५. ३. मोहक आविष्कार.

**चाळण** स्त्री. १. धान्य, पीठ इ. चाळण्याचे सच्छिद्र साधन.२. (ल.) पुष्कळ झरे असलेली विहीर. ३. झिरझिरीत विणीचे अथवा जीर्ण झालेले कापड. ४. चाळण्याचा पदार्थ, धान्य, पीठ वगैरे. ५. चाळण्याची क्रिया. ६. चाळल्यानंतर राहिलेले भूस, केरकचरा. [सं. चालन]

**चाळणपुळी, चाळपुळी** स्त्री. चाळपुळी; दूरवर पसरणारी पुळी, व्रण, क्षत.

**चाळणा** पु. १. लाह्या भाजण्यासाठी दोन हात लांबीच्या काठीच्या टोकाला कापड गुंडाळून केलेले साधन; घाटाणा; घोळणा. २. गहू, डाळी इत्यादी चाळण्यासाठी केलेली पत्र्याची मोठी चाळणी. [सं. चालन]

**चाळणा** स्त्री. सूक्ष्म चिकित्सा; छाननी; विचार : 'पण आद्य हेतूप्रमाणें ते (हुन्नरी) चालतात किंवा नाही ह्याची चाळणा करण्याचें सोडून दिलें.' – गांवगाडा १४८.

**चाळणावळ** स्त्री. चाळण्यासाठी दिलेली मजुरी, पैसे.

**चाळणी** स्त्री. १. पहा : **चाळण १**. २. उलथापालथ. ३. गंजिफांची पिसणी. ४. घराची कौले शाकारण्याची क्रिया. ५. शोधणे; हुडकणे. ६. (ल.) पहा : **चाळणा** : 'आम्ही घेतलेल्या चाळणींत अखेरीस कांहीं नावडतेच खडे राहिल्यास...' – टिकेले २.१०४. [सं.चालनी] (वा.) **चाळणीत पाणी घालून जीव देणे** – विनाकारण जिवावर उदार होणे; अत्यंत निराश होणे; कोरड्या विहिरीत जीव देणे.[सं. चालनी]

**चाळणे** सक्रि. १. करणे : 'ऐसा चाळीत नाना युक्ती' – मुआदि ४२.३. २. पेलणे; झेपणे : 'परी जेणें शस्त्रासी चाळिजे। यश गौरव त्यासीच साजे।' – मुसभा ७.७०. ३. फिरविणे : 'वायसा एकें बुबुळें दोहींकडे। डोळा चाळिता अपाडें।' – ज्ञा १३५. ४. चाळणीत घालून गाळणे. ५. पुस्तकाची पाने, घराची कौले, विड्याची पाने इ. उलटणे; गंजिफा पिसणे. ६. धुंडाळणे; शोधणे. ७. (पुस्तक वगैरे) धावते वाचन करणे. [सं. चालन]

**चाळणे** सक्रि. आचरणे : 'भूतीं दुष्टपण चाळितां। समूळ निजचित्ता निर्दाळू पाहे।' – एभा ८०.३.३६३.

**चाळणे** सक्रि. पाळणे; संभाळणे : 'रायाचे देह चाळू । रंकाते परउते गाळू' – ज्ञा १२.१४५.

**चाळणो** पु. १. मोठी चाळणी. (गो.) २. पहा : **चाळण ६**

**चाळवट** न. थोपटण्यापूर्वीचे हाताने तयार केलेले मातीचे भांडे.

**चाळवण–णी, चाळवणूक** स्त्री. आशा लावून दिरंगाईवर टाकणे; झुलविणे; टाळाटाळ करणे; आज ये उद्या ये असे सांगणे; खेटे घालावयास लावणे : 'पाहू, सांगू असे करून चाळवण्या चालवल्या.' – भदि २.६९. [सं. चालन]

**चाळवणे** अक्रि. १. भलतेच सांगून नादी लावणे : 'काय आम्हा चाळविसी वायाविण। म्हणती दुरून देखिलासी।' – तुगा ३८. २. चकवणे; झुलविणे. [सं. चालन]

**चाळवणे** सक्रि. बाजूस सरकवणे; ढळण्यास लावणे.

**चाळवाचाळव** स्त्री. १. झुलवणे; व्यर्थ आशा लावणे. २. एकसारखी उलथापालथ करणे; खालीवर करणे; उसकटणे. ३. चलबिचल : 'कळालं तेव्हा बरं वाटलं. मनाची उगाच चाळवाचाळव नको.' – ल्व्हाळी ६८.

**चाळविणे** उक्रि. १. झुलविणे; व्यर्थ आशा लावणे; वेडे करणे : 'कोणी येकें चाळविलें। कोणी येकें भ्रष्टविलें।' – दास ३.७.१६. २. हलविणे; चेतना देणे; प्रवृत्त करणे : 'तव प्रवृत्तिचे काइं सांघे। चाळविलों फळश्रुतीचेनि मार्गें ।' – ऋव २८. ३. आजूबाजूस फिरविणे. ४. घसरावयास, निसटावयास, झुकावयास लावणे; मूळ जागेवरून हलविणे. ५. चेष्टा करणे; हरभऱ्याच्या झाडावर चढवणे. ६. चीड येईलसे करणे; त्रास देणे; खोडी काढणे.

**चाळविता** पु. चालक : 'मना इंद्रियाचा तूंचि चाळविता' – नाम १७२१.

**चाळ(िळ)शी–सी** स्त्री. १. वयाला चाळीस वर्षे झाल्यावर दृष्टीत येणारा अधूपणा. २. चाळीस वर्षांचे वय. ३. चष्मा : 'पिवळ्या पिंपळपानाचे देठ तोडून दोन्ही डोळ्यांना त्यांची चाळशी.' – सोपिं ५३. [का. चाळीसु.]

**चाळा** पु. १. छंद; नाद; सवय; ध्यास. २. वेड : 'चाळा लावियेला गोप गोपीनाथें.' – तुगा ११२. ३. खोडी : 'उगला राहे न करी चाळा। तुज किती सांगों रे गोवळा।' – तुगा १२९. [सं.चल्] (वा.) **० लागणे** – नाद किंवा छंद लागणे. **० लावणे** – नाद किंवा छंद लावणे : 'चाळा लावूनि गोवितोसी। दावूनिया लपसी। लपोनि केउता जासी। तैसा माव न करी आम्हांसी रे गोविंदा ।' – ज्ञानदेव.

**चाळा** पु. १. पदार्थ जोडण्याचा सांधा, जोड. जसे : – हाताचा चाळा, मनगटाचा चाळा, गुडघ्याचा चाळा. २. हातमागाचा पावडा व पावसरा जोडणारी दोरी. ३. करळी; जेथे कापडाचे भाग करावयाचे तेथील न विणलेला भाग. ४. मागातील ओवी किंवा वही.

**चाळा** पु. भुतांच्या एका वर्गाचे नाव.

**चाळाकुचाळा** पु. उपद्व्याप; भानगड; खोडी; गडबड; बंडखोरी : 'कोठंहि असतील तेथें लटकी राजकारणें करावीं, चाळाकुचाळा करावा. च्यार लोक फोडावे.' – पेद २०.१०४.

**चाळाचाळ–ळी** स्त्री. १. पहा : **चाळवाचाळव**. २. सोय. जुळवाजुळव : 'आठ आने भराची करा की कशी तरी चाळाचाळ !' – मळणी १०७. [सं.]

**चाळाचूळ** वि. उतावळा.

**चाळाबोळा** पु. १. हाताने चुरगळून चोळाबोळा केलेला, बऱ्याच सुरकुत्या पडलेला कागद अथवा कापड. २. चोळाबोळा करण्याची क्रिया. ३. (ल.) (प्रवाशाप्रमाणे अथवा लुटारूप्रमाणे) घाईघाईने, अव्यवस्थित रीतीने केलेली सामानाची, कपड्यांची, कागदांची बांधाबांध.

**चाळाळ** पु. लाटांचा किंवा पाण्याचा खळाळ : 'पहाटे जाहले चाळाळ। पाणियाचे।' – क्रिपु २.२७.७९. [ध्व.]

**चाळिता** पु. हलविणारा; प्रेरक; गती देणारा : 'म्यां हालविल्या प्राणु हाले। जो जगातें चाळिता।' – ज्ञा ९.२८३. [सं. चल्]

**चाळिसा** पु. १. चाळीस शेरांचा मण. २. सामान्यत: चाळिसांचा समुदाय. ३. चाळीस हात कापड. ४. जे ओझे वाहण्यासाठी चाळीस माणसे अथवा पशू लागतात असे ओझे.

**चाळिसा** स्त्री. अव. चाळिसांचा समुच्चय; अनेक चाळीस. (कुण.)

**चाळिसा** पु. उत्तर हिंदुस्थानात संवत् १८४०मध्ये पडलेला दुष्काळ : 'हा भयंकर दुष्काळ संवत् १८४० मध्ये पडला यावरून त्याला 'चाळिसा'

हें नांव पडलें. तें अद्यापि लोकांच्या बोलण्यांत येतें.'– मशिंच १९१.

**चाळीचिपळी** स्त्री. फसवणे; छक्केपंजे : 'जेथे चाळ्याचिपळ्या करून निभण्यासारखे आहे.'– गांगा १२२.

**चाळीपाळीने, चाळूनपाळून** क्रिवि. आळीपाळीने; पाळीपाळीने; आलटूनपालटून.

**चाळीव** वि. १. चाळलेला; चाळावयाचा. २. (ल.) गाळीव.

**चाळीस** वि. ४० ही संख्या; चार दशक. [सं. चत्वारिंशत्]

**चाळीसपत्र** न. चष्मा; उपनेत्र.

**चाळु** पु. असोशी; चाड; ध्यास : 'व्रत आचरीले चाळु। कृष्णालागी।'– श्रीकृष्णच १५४.

**चाळुंद्रा** वि. चाळे करणारा; खोडकर; खट्याळ.

**चाळूनचा(पा)ळून** क्रिवि. पुनः पुनः उचलून; फिरवून; उलटापालट करून; अदलाबदल करून.

**चाळेखोर** वि. खोडकर; खट्याळ; वात्रट; हूड.

**चाळेगत** पु. भुतांचा जमाव; पिशाच्चाचा समुदाय. (कु.) न. पिशाच्च. (गो.)

**चाळौणी** स्त्री. टाळाटाळ; दिरंगाई; चाळवाचाळव. (गो.)

**चाक्षुष** न. प्रत्यक्ष ज्ञान, डोळ्यापासून होणारे ज्ञान.
वि. १. डोळ्यासंबंधी; दृष्टीसंबंधी. २. दृश्य; दिसणारे. [सं.]

**चाक्षुष** पु. सहावा मनू. [सं.]

**चाक्षुषी** स्त्री. एक अस्त्र : 'मग योजिता झाला चाक्षुषी । कामिनी सैन्य वधावया।'– जैअ २२.५८.
वि. डोळ्यासंबंधीची; दृष्टिविषयक. [सं.चक्षुस्]

**चाक्षुषी प्रेम** बाह्य स्वरूपावरून उत्पन्न होणारे प्रेम : 'चाक्षुषी प्रेमाच्या पहिल्याच दृष्टीने आषुकमाषुक बद्ध होतात.'– विह २०.

**चाक्षुषी विद्या** जादूगिरी; नजरबंदीची विद्या; दृष्टिमोह करण्याची विद्या; जगातील कोणताही पदार्थ आपल्या चक्षूंनी जसा दिसावा असे इच्छावे तसा तो दिसणे ह्या विद्येला चाक्षुषीविद्या म्हणतात. ही चित्ररथ गंधर्वाने अर्जुनास दिली होती : 'अर्जुनें सावधानें ते क्षणां। चाक्षुषी विद्या जपिन्नली।'– जैअ ७५.१७३.

**चां** चा; षष्ठीचा प्रत्यय : 'जेआंतळी नंदाचां कुमरू।'– वच्छह १३९.[सं.]

**चांग** वि. १. चांगला; बरा; उत्तम; छानदार : 'ते वेळीं भूमि तैसें चांग। चोख जें असणें।'– अमृता ४.४३. २. धीट; धैर्यवान; शूर : 'एका उभयांचि प्राण गेले। चांगांचे दांत बैसले ।'– ज्ञा १.१३५. ३.चांगले, नीट : 'सर्वज्ञें म्हणीतलें : चांग पाहा : मग दंडवत घाला :'– लीचपू १९४. [सं. चंग = सुंदर, सुदृढ]

**चांग** पु. एक प्राणघातक यंत्र. एका उंच मंचाखाली एक खड्ग जोडलेले असे. त्या मंचावरून अपराध्यास त्या खड्गावर फेकून देत असत.

**चांगट** वि. सुंदर; सुरेख; सुबक; गोजिरवाणा; सुरूप; देखणा : 'कडिसांखलिचा माळा चांगट,...'– मंजुघोषा ४६.

**चांगटणे** क्रि. थक्क होणे.

**चांगभला–ले** पु. १. भैरवउपासक यात्रेकरू, ज्योतिर्लिंगाचे भक्त, हमाल, मजूर इत्यादी एकदम मोठ्याने जो गजर करतात तो. या शब्दाचा अर्थ 'कल्याण अगर चांगले होऊ दे' असा आहे. भैरवाच्या प्रार्थनेचा शब्द : 'देव ज्योतिबा बोलती चांगभला'– जलोसा ६८. [का. चांगुभला] २. शुभचिंतक जयघोष.[सं. चंद्रभाल] (वा.) ० **करणे** – जयजयकार करणे; स्तुती करणे; प्रशंसा करणे. गुलाल उधळणे.

**चांगभांग** पु. स्त्रियांचा नट्टापट्टा; वेणीफणी.

**चांगला–ले** वि. १. उत्तम; बरा : छान; योग्य; नीट; साफसूफ असा. २. भरभराटीचा; समृद्ध; गब्बर; सुखी. ३. नेहमीचा; सांप्रदायिक; शिरस्त्याचा; रूढीस साजेसा; लोकरिवाजाप्रमाणे योग्य. [सं. चंग]

**चांगलाचुंगला** वि. सुरेख; उत्तम : 'मी आणि माझा मित्र चांगलेचुंगले कपडे घालून...बाहेर पडलो.'– वावारू ७१.

**चांगलेपण–पणा** न.पु. चांगले असणे; भलेपणा; उत्तमपणा.

**चांगा–गी–गे** वि. चांगला. पहा : **चांग** : 'हें समरे तो चांगु। बहुतांमध्यें।'– विसिं २.९०. [सं. चांग]

**चांगाचांगी** स्त्री. उत्कृष्टता; चांगुलपण : 'धैर्याचिया चांगाचांगी।'– राज्ञा १८.६३५.

**चांगावा–वे** पु. न. चांगुलपणा; महत्त्व; उत्तमत्व : 'जे गीतार्थाचें चांगावें। मोक्षोपायपर आघवें।'– ज्ञा १८.१२३०.

**चांगी** वि. चांगली : 'ठाई ठाई राखणें घातलीं : चांगि नीर्वेडि केली :'– लीचपू ११८.

**चांगुलपण–णा** पहा : **चांगलेपण** [सं.]

**चांघा** पु. (सोनारी) चांदी ठोकून वाढविण्याचा हातोडा; विशिष्ट प्रकारचा हातोडा.

**चांच** वि. हुशार; चपळ; चलाख; दक्ष (मूल). पहा : **चंच** : 'समय न कळे वेडगळ बुद्धी। विजाती ते शुद्धी चांच चाट।'– तुगा ३७४१. [सं. चंच]

**चांचड** न. मोठी तांबडी मुंगी.

**चांचण–णी** न. स्त्री. १. चाचड. २. डास; मच्छर; चिलट.

**चांचर** पु. तुकडे, टरफल; चिंध्या (उंदरांनी कुरतडलेल्या वस्तूच्या). (को.)

**चांचरी** स्त्री. मुद्रेचा एक प्रकार.

**चांचरें** न. चाल : 'घेतां त्रिपेचे चांचरे : वावडाए पांचवीए धारे।'– शिव १०१२

**चांचलें** न. चंचलता : 'भणों तरंगवत जीव : चांचलें तेचि कर्मभाव'–ज्ञाप्र ६०३. [सं.चांचल]

**चांचल्य** न. १. चंचलपणा; अस्थिरता; अस्वास्थ्य (मन, स्वभाव इ.चे); घालमेल; अस्वस्थता. २. क्षणिकत्व; नश्वरता; अशाश्वतता. [सं.]

**चांचवर** न. पीठ, कणिक, कोंडा वगैरेंचे मिश्रण. (गो.)

**चांचु–चू** स्त्री. चोच : 'तिऐ प्रिये भणौनि चांचु आंडे खोविती। चुंबना लागी।।'– शिव ६४७. [सं. चंचु]

**चांचुडा** पु. चोचीचा चिमटा :'पक्षिकुलाचां चांचुडा धरलेया।'– कला ९.

**चांचुवडा** पु. चोच चंचुपुट : 'चकोर चांचुवडे पसरीति ।'– ज्ञा १३.३२५. [सं. चंचु]

**चांचूं** न. १. एकही अक्षर, शब्द. पहा : **ब्र** (निषेधार्थी प्रयोग). २. जागरुकता; सावधानता; अस्तित्व दर्शविणारा आवाज; हुंकार, खाकरणे अगर दुसरे काही शब्दोच्चारण; हूं का चूं. [ध्व.]

**चांचोड** स्त्री. चोच.

**चांट** स्त्री. १. टाच. (गो.) २. (ल.) प्रगती; पुढे पाऊल.

**चांडा** वि. निलाजरा. (बे.)

**चांडा-डी-डे** वि. लाडावलेला; लाडका. (कर.)

**चांडाल-ळ** पु. १. अति नीच माणूस : 'चांडाळ पूर्विचा वैरी।...उलट त्या निचारीस मारी।' - शारदा. २. अंत्यज; अस्पृश्य : 'नाना चांडाळ मंदिरासीं । अवचटें आलिया संन्यासी।' - ज्ञा १६.१७६. ३. ब्राह्मण स्त्री व शूद्र पुरुष यापासून जन्मलेला : 'त्याच्या लिखाणात चांडाळांचा उल्लेख आला आहे.' - आंविमं ४४. [सं. चांडाल]

**चांडाळखत** न. पहा : **चंडाळखत**

**चांडाळ चौकडी, चांडाळी** पहा : **चंडाळ चौकडी**

**चांडे** न. शेतात बी पेरण्याचे लाकडाचे नरसाळे : 'ज्ञानदेव म्हणे मी चांडे। सद्गुरुकृपा केला कोडें। - ज्ञा ६.४८९.

**चांद** पु. १. चंद्र : 'देखोनि निजप्रबोध चांद। भरते अगाध तुज दाटे।' - एभा २०.२. २. चंद्राच्या आकाराचा दागिना; बिल्ला; पदक. ३. चांदई. (बे.) ४. एक प्रकारचे दारुकाम. यात चंद्राच्या आकाराच्या कांबी असतात व उडताना निरनिराळ्या रंगांचे तारे बाहेर पडतात. ५. पांढरा वाटोळा ठिपका : '(गायीच्या) कपाळावर चांद होता.' -शंशिं ६. ० **बांधणे**- भिंतीस पाऊस लागू नये म्हणून आडोसा बांधणे. **चांदाची वृद्धी असणे** - द्वितीयेच्या चंद्राप्रमाणे वाढणे : 'चांदाची वृद्धि असो नांदा सानंद सानुग स्वस्थ।' - मोआदि ३५.७७.

**चांदई-ली** स्त्री. दुपाखी घराची आढ्यापर्यंतची उंच भिंत; कडेची रुंद भिंत; करा. [क. चंदी]

**चांदका** पु. पानगा.

**चांदकी** स्त्री. लहान भाकरी किंवा पोळी. [सं. चंद्र]

**चांदणापाख** पु. शुक्ल पक्ष. [सं. चंद्र + पक्ष]

**चांदणी** स्त्री. १. लहान तारा; तारका. २. घोड्याला होणारा एक विकार. ३. छत; चांदवा; ४. राखडीसारखा परंतु जरा लहान असा स्त्रियांचा दागिना. ५. घोड्याच्या कपाळावरील पांढरा ठिपका. (वा.) **० तरारणे** - आशाळभूतपणे पाहणे; भीती, क्षुधा, राग इत्यादी कारणाने मुद्रा कावरीबावरी होणे; डोळ्यांपुढे काजवे चमकणे. **० बघणे** - अर्धवट उताणे होणे; वर पाहणे : 'चांदणी बघितली, एका कुशीवर झाला, एक खांदा जमिनीला लागला की कुस्ती झाली.' - के २०.१२.३८.३. **० बुडी जाणे** - शुक्रास्त होणे.
वि. चंद्रप्रकाश असलेली (रात्र, पंधरवडा इ.).

**चांदणी, चांदली** स्त्री. छोटा तंबू; शुभ्र कापडाचा मंडप : 'भाऊसाहेब स्नानभोजनाकरितां चांदणीवर आले तर विश्वासराव तेथेच असत.' - दुरं १७७.(ल.) लहान आकाराची वस्तू.

**चांदणीकेदार** पु. (संगीत) गायनशास्त्रातील एक राग. गायनसमय रात्रीचा पहिला प्रहर. [सं.]

**चांदणे** न. १. चंद्रप्रकाश. २. ग्रहांचा प्रकाश.

**चांदनी दिवाल** स्त्री. लहान भिंत.

**चांदमारी** स्त्री. नेम मारण्याचा अभ्यास; लक्ष्यवेध; शिकार.( लक्ष्य चंद्राकृती असते यावरून) : 'वर्षातून ५१० गोळ्या पाच पंचवीस यार्डावरून उडवून चांदमारी केली.' - युजि २३.

**चांदर** वि. कपाळावर पांढरा ठिपका असणारी (गाय, बैल). (को.)

**चांदरात-त्र** स्त्री. १. अमावस्येनंतरची पहिली चांदणी रात्र. २. चांदणे असलेली रात्र. ३. (ल.) आनंदाचा काळ; सढळ हाताचा खर्च. [हिं.; सं. चंद्र + रात्रि] (वा.) **० उडवणे** - वाटेल तसा पैसा उडविणे, चैन करणे; लुटणे : '... आपल्या कचाट्यात सापडलेल्या टोळधाडीची ते पुरेपुर चांदरात उडवीत असत.' - स्वप २२७. **० करणे** - उत्सव करणे; चैन करणे : 'गाडद्यांनी दोन्हीकडील फारच चांदरात केली. हुजरातेची व चोहीकडील फौजेची खैर जाहली.' - ऐको ३७३. **० झडणे** - ज्या रात्री प्रथम चंद्रदर्शन होते त्याच रात्रीपासून मुसलमानी महिन्यास प्रारंभ होतो. त्या रात्री नोकर-चाकर लोकांस पगार मिळतो. त्यावरून पैसा मिळणे; द्रव्यप्राप्ती होणे; चैन होणे; लाच मिळणे इत्यादी : 'एकाएकीं स्वप्नीं नसते ती चांदरात झडूं लागली.' - टिकेले ४८०.

**चांदला** पु. १. कुंकवावर लावावयाची चकचकीत टिकली. २. गंधाचा मोठा टिळा. ३. टिकली; पुतळी.

**चांदला** पु. वस्त्रविशेष.

**चांदला** पु. गुजराती लोकांत विवाहसमयी वधूवरांस केला जाणारा रोख रकमेचा आहेर. [सं.]

**चांदवड-डा** पु. एक वृक्ष. याची पाने एका बाजूस वाटोळी व शेवटी निमुळती होत जातात, देठ मध्यभागी असतो.

**चांदवड-डा** न.पु. कुंभा, बाभळ इ. वृक्षांच्या सालीचा तुकडा; खांप.

**चांदवा** पु. १. पाळणा, मंडप यांच्यावरील छत. २. देव, देवता यांच्यापुढे टांगलेली लाकडी चौकट, मंडपी : 'चांदवा मोत्यांचा गुंफीयेला।' - रासक्रीडा २०. ३. मांडव; मांडवाच्या मध्यभागी असलेला उंच भाग. ४. बायका कपाळावर कुंकवाच्या खाली लावतात ती टिकली. ५. टोपीचा वर्तुळाकार भाग. [क. चांदिण]

**चांदवेल** स्त्री. एका जातीची वेल.

**चांदसलामी** स्त्री. १. नूतन चंद्रदर्शनाच्या दिवशी सरदाराला अगर उमरावाला दिलेली सलामी, मुजरा. २. प्रसंगोपात्त चाकरीवर असणे (चुकारपणा करणाऱ्या चाकराविषयी बोलताना). [हिं.]

**चांदा-द्या** वि. १. कपाळावर पांढरा ठिपका असणारा (बैल). २. डोक्यावर सफेत ठिपका असणारा लहान मासा.

**चांदा, चांदाडा** पु. एक वृक्ष. पहा : **चांदवड**

**चांदा** पु. मध्यप्रदेशात शेताच्या हद्दीवर खुणेकरिता बांधलेला दगड अगर विटांचा खांब.

**चांदामांदा** पु. लहान मुलांचा खेळ. 'चांदामांदा गिरगिर कांदा, अर्धी भाकर सगळा कांदा, 'टीऽऽकल्यो, टीऽऽकल्यो' म्हणून मुलाच्या कपाळाला हात लावावयाचा.

**चांदिणा** क्रिवि. चांदण्यात.

**चांदिणापाख, चांदिणी-णे** पहा : **चांदणापाख**

**चांदिणी-ण-ने** स्त्री. न. १. चांदणे. २. चांदणी : 'तुझेया सन्निधानाचें चांदिने : माझेया जिवचकोरांसि नव्हें पारणें' - उगी १७(१)८०.

**चांदिणे** वि. पांढरे.
**चांदी** स्त्री. १. शुद्ध रुपे; लगडीचे रुपे; वीट; चीप; चांदी नरम, पांढऱ्या रंगाची, जड, रंग न बदलणारी अशी असते. २. रुपे. ३. अशुद्ध रुपे. ४. (रसा.) रुपे; आणव क्रमांक ४७. आणव भार १०७.८८ असलेले धातुरूप मूलद्रव्य. [हिं.; सं. चंद] (वा.) ० **आटणे, आटविणे–** १. खरपूस समाचार घेणे; रग जिरवणे. २. जिवावर बेतणे : 'पण जर का...कटकटीत सापडलो तर चांदी आटल्याशिवाय राहायची नाही.'– तोबं १५८. ० **उडणे –** नाश होणे; अतोनात त्रास होणे; नुकसान होणे; त्रेधा उडणे : 'परमुलुखातील लोकांकरितां आमची चांदी आणखी किती दिवस उडणार...'– टिकेले २.२.६३. ० **उडवणे, करणे –** नाश करणे. खाक करणे; बिघडवणे; नासणे; उधळून टाकणे.
**चांदी** स्त्री. १. मजा. २. वारकरी पक्षी. (झाडी)
**चांदी** स्त्री. चट्टा; पांढरे कोड.
**चांदुकली** स्त्री. पहा : **चांदकी**
**चांदे** न. पहा : **चांदा–द्या**
**चांदोड** पहा : **चांदवड**
**चांदोडपणा** पु. लुडबूड.
**चांदोडी** पु. (चर्मकार) मारवाडी जोडा (हा सामान्यतः बायका वापरतात).
**चांदोबा** पु. चंद्र : 'पण ते आशेचे पंख चांदोबाच्या सबबीवर मोर्ले साहेबांनी तोडले...'– टिव्या. (वा.)० **दाखविणे –** डोळ्यांपुढे काजवे चमकतील अशी कानशिलात भडकावणे.
**चांदोरा** पु. मोठे कुंकू.
**चांदोवा** पु. १. चांदवा; कापडी छत; छताला बांधलेला फुलोरा : 'गोसावी म्हणीतलें : सारंगधरीचे भोपे सारंगधरासि आर्ति करीत होते : ते चांदोवेयासि आगी लागली :'– लीचपू ७. २. फिरताना किंवा मिरवणुकीत डोक्यावर धरलेले वस्त्र : 'गोसावी तेथ बीजे केलें : गोसावीयांवरि चांदोवा धरिला :'– लीचउ १०३.
**चांद्र** योगमार्गातील मस्तकाच्या ठिकाणी असणारे चंद्रामृत : 'जेव्हळि कुंडलिणी चांद्र पिए।'– ज्ञा ६.२५९. [सं.]
**चांद्र, चांद्रिक** वि. चंद्रासंबंधी, चंद्राविषयी. [सं.]
**चांद्रदिन** पु. (भौ.) चंद्राचा आपल्या अक्षाभोवती फिरण्याचा कालावधी.
**चांद्रमहिना** पहा : **चांद्रमास** : 'एका अमावस्येपासून दुसऱ्या अमावास्येपर्यंत चांद्रमहिना होतो...'– सुज्यो ८.
**चांद्रमान** न. चंद्राच्या फेऱ्यावरून, स्थितीगतीवरून केलेली गणना; कालमापन. अमावस्येपासून किंवा पौर्णिमेपासून सुरू होणारा महिना. चांद्रमानाने वर्षाचे दिवस ३५४ होतात : 'एवंच चांद्रमानें तेराही स्पष्ट सारिले अब्द।'– मोविरा ४.६३. [सं.]
**चांद्रमास** पु. चंद्राचा पृथ्वीभोवती एक प्रदक्षिणा किंवा परिभ्रमण करण्याचा कालावधी; दोन नवचंद्रदर्शनांच्या मधला कालावधी. हा २९ दिवस, १४ तास, १४ मिनिटे, ३ सेकंद इतका असतो. [सं.]
**चांद्रयान** न. चंद्रावर उतरवण्यासाठी तयार केलेले आकाशयान; चंद्रावर सोडलेले विमान : 'चांद्रयान हें...अगदी ठरल्या वेळीं चंद्रभूमीवर उतरले.'– अहीदि ७७.
**चांद्रवर्ष** न. बारा चांद्रमासांइतका कालावधी. [सं.]
**चांद्रायण** न. चंद्राच्या चढत्या किंवा घटत्या कलांप्रमाणे जेवण कमीजास्त करण्याचे एक प्रायश्चित्तात्मक व्रत. हे चंद्राच्या वृद्धीप्रमाणे करतात : 'अथवा एकांतरा कृच्छ्री। चांद्रायणे मासोपवासी।'– ज्ञा १७.३६४. [सं.]
**चांधई** पहा : **चांदई**
**चांप** स्त्री. कडी.
**चांपाहुली** वि. चाफ्याच्या फुलासारखी पिवळट : 'वानि चांपाहुली नाही काइ ताहि तूलि।'– राजमती.
**चांफी** न. अव. चाफ्याची फुले : '...धोतराच्या घोळांत मावतील तेवढीं चाफीं गोळा करून...'– सोबत ६४.
**चांब** पु. चामडे : 'चांबाचे पहा दाम चालती ज्याचा तो मुल्ला काजी।'– पला ६९. [सं. चर्म]
**चांबऊ, चांब** पहा : **चामऊ**
**चांबट** वि. १. चिमलेले, कोमेजलेले : 'बाजूला चांबट-पिवळसर हिरवे गवत पडलेले होते.'– सोपिं १२१ २. चावट. (माण.)
**चांबडी–डे** (प्र.) चामडी, चामडे : 'जैसे धमनाचे चांबडे ।'– कक १.१.५२.[सं. चर्म] (वा.) ० **लोंबविणे, चांबड्या लोंबविणे –** शरीराची कातडी निघेपर्यंत मारणे; मरेमरेतोवर मारणे.
**चांबुळी** स्त्री. एक झुडूप.
**चांबेटा** पु. चाप; खोडा : 'हातास चांबेटे खिळून पहाऱ्यात ठेवले.'– आंघई १०.
**चांबोटा–टी** पहा : **चामोटा–टी**
**चांभार** पु. कातड्याचे जोडे, वहाणा वगैरेची निर्मिती, दुरुस्ती वा विक्रीचा धंदा करणारी जात अगर व्यक्ती. [सं. चर्मकार]
**चांभार ओढ** अत्यंत जिकीर; ज्याप्रमाणे चांभाराला गिऱ्हाईकांनी मुदत टळल्याबद्दल सतवावे त्याप्रमाणे झालेली ओढाताण.
**चांभारकी** स्त्री. चांभाराचा धंदा; चामड्याच्या वस्तू तयार करण्याचा व्यवसाय.
**चांभारकुकडी** स्त्री. भारद्वाज पक्षी. (व.)
**चांभार(री–ऱ्या)गोचीड** १. गुरांच्या अंगावरील एक प्रकारची गोचीड. २. (ल.) अत्यंत लोचट, चेंगट मनुष्य.
**चांभारचतुराई** पहा : **चांभारचौकशी**
**चांभारचाळवणी** स्त्री. चाळवण्या दाखविणे; लांबणीवर टाकणे; टोलवाटोलवी करणे. (चांभार जोडा शिवावयास दिला असता आज देऊ उद्या देऊ अशा चाळवण्या दाखवितो यावरून).
**चांभारचौकशी** स्त्री. आपला संबंध नसताना उगाच केलेली चौकशी : 'तुला चांभारचौकशा काय करायच्या आहेत?'– पडछाया १४६.
**चांभारफट** स्त्री. नसती पंचाईत. (राजा.)
**चांभारवाडा** पु. चांभार लोकांच्या वस्तीचा भाग, पेठ, मोहल्ला.
**चांभार(री)हिरडा** पु. एक झाड व त्याचे पिवळे फळ; चामडे रंगविण्याकडे याचा उपयोग करतात. बाळ हिरडा व सुरवारी हिरडा अशा दुसऱ्या दोन जाती आहेत.
**चांभारी** स्त्री. एक प्रकारचे झुडूप.
**चांभारी** स्त्री. १. ढोराच्या, जनावराच्या अंगावर उमटलेला माराचा वळ

किंवा वण. (व.) २. ओळ, पट्टा. (व.)

**चांभारी पाटी** आट्यापाट्यांच्या खेळातील पहिली पाटी; कपाळ पाटी.

**चांभारी लाख** लाखेचा एक प्रकार.

**चि** शअ. काव्यात वापरले जाणारे शब्दयोगी अव्ययाचे रूप. पहा : **च** : 'प्रेक्षक त्या युद्धाहुनि बहु वर्णिती आपुलेंचि तैं पुण्य।' – मोकर्ण १०.१०.

**चिऊ** स्त्री. चिमणी या पक्ष्याचे लहान मुलांच्या भाषेतील नाव. जसे : – काऊ-चिऊ. [ध्व.]

**चिक** पु. बांबूच्या बारीक कामट्यांचा केलेला पडदा. [फा.चीघ]

**चिक** पु. झाडाच्या पानातील पांढरा रस.

**चिकचिक** स्त्री. १. चिकटी; चिकटाई; घामाने शरीराला आलेला ओलसरपणा; पावसामुळे झालेला पातळ चिखल. २. वादंग; घासाघीस (क्रि.करणे). [स. चिक्कण]

**चिकचिकणे** अक्रि. १. चिकट होणे (घाम इत्यादीपासून शरीर इत्यादी). २. अस्वस्थ होणे; धुमसणे : 'मत्सरानं त्यांची म्हातारी मनं चिकचिकली होती.' – सीए ३४. [ध्व.]

**चिकचिकाट** पु. अति चिकटपणा; चिगचिग; रेंदाडपणा.

**चिकचिकि(की)त** वि. चिकट; चिकटणारे, डकणारे; घामाने चिकट झालेला.

**चिकट** वि. १. चिकटपणा असलेला; चिकटणारा. २. (ल.) कंजूष; कद्रू; घासाघीस करणारा. ३. (ल.) चिवट व मजबूत बांध्याचा (माणूस). ४. लाळघोट्या; पिच्छा पुरविणारा. [सं.क्लिद्, चिक्कण]

**चिकटगोड** वि. लोचट; आर्जवी : 'त्या (सौ. नाबर) लाल ओठांतून चिकटगोड हसायच्या.' – त्रिशंकू ९.

**चिकटण** स्त्री. चिकटपणा.

**चिकटणे** सक्रि. १. चिकटपणामुळे एक पदार्थ दुसऱ्या पदार्थाशी संलग्न होणे. २. (ल.) एक पदार्थ दुसऱ्याच्या अगदी जवळ येणे. ३. एक पदार्थ, वस्तू दुसरीस लागून असणे. ४. खोडी, सवय, व्यसन जडणे. [सं.शीक्.]

**चिकटपट्टी** स्त्री. सरस, गोंद किंवा डिंक लावून डकवण्यासाठी तयार केलेली कापडी पट्टी; जखमेवर घट्ट बसणारी कापडाची पट्टी.

**चिकटबुक–वही** न. कात्रणे, मजकूर चिकटवून ठेवण्याकरिता असलेली वही : तसंच आपल्या कार्यक्रमांच्या प्रसिद्धीचं एक चिकटबुक...' – न्यूनगंड ८८ : 'हे विडंबनगीत प्रियोळकरांच्या चिकटवहीत अर्धवट राहिलेले आढळते.' – प्रिस्मृग्रं १६६.

**चिकट भेंडी, भोकर, चिकट्या** वि. (ल.) पिच्छा पुरविणारा; लोचट : 'एक एक मानस चिकट भोकरागत असत्यात.' – रैत ११८.

**चिकटमाती** स्त्री. (भूशा.) ओली झाल्यावर दाट, चिकट, लापशीसारखी होणारी काहीशी बुळबुळीत माती.

**चिकटवट** स्त्री. (जमिनीची) स्निग्धता; कस, चिकणपणा.

**चिकटवणा** न. चिकटण्याचे पदार्थ गोंद, डिंक, खळ, सरस इ.

**चिकटव(वि)णे, चिकटाविणे** सक्रि. १. गोंदाने डकविणे. २. (ल.) नोकरीला लावून देणे :'मला म्युनिसिपालटीत चिकटवायला गुंडीत मदत करणार होते असं कळलं.' – लव्हाळी ७.

**चिकटा** पु. एक प्रकारचे गवत.

**चिकटा** पु. १. केसांना, कातडीला चिकटून आलेला मळ; केसांचा चिकटपणा. २. पावसाची बारीक सर पडल्यावर होणारा जमिनीचा चिकचिकीतपणा. ३. जखमेतून वाहणारा चिकट पू इ.; गाई, म्हशी इत्यादिकांच्या स्तनांतून येणारा चिकट दुग्धांश. ४. धान्यावर रोगरूपाने येणारा चिकट पदार्थ; बुरशी. ५. दळताना जात्याच्या तळीस चिकटलेले पीठ. ६. रोगट हवेने झाडांना, जनावरांना होणारा रोग. ७. पक्षी पकडण्यासाठी केलेला चिकट पदार्थ. जिभेवर बसतो तो पांढरा साका. (वा.) ० **पडणे** – पिकांवर पानउवा पडणे.

**चिकटा–टे** पु. पुरुषांचे नेसावयाचे मुकट्यासारखे सोवळ्याचे रेशमी किंवा लोकरीचे वस्त्र.

**चिकटाई** स्त्री. चिकटपणा.

**चिकटी** स्त्री. १. केसांतील चिकट मळ. २. घामटपणा; ओंगळपणा. ३. जात्याच्या तळीस पीठ चिकटल्यामुळे जात्यास येणारा चिकटपणा; नव्या धान्याचा चिकटपणा. ४. चिंचोक्याची खळ.

**चिकटोबा** पु. चिकटणारा : 'चिकटोबा कुठला...' – सबा ११.

**चिकण** वि. १. कठीण (दगड); चिवट (लाकूड); मजबूत (कापड, कागद, दोरा) कणखर; दमदार; कसदार (मनुष्य, जनावर). २. (ल.) द्रव्यसंपन्न (मनुष्य). [सं.चिक्कण]

**चिकण** वि. १. चिकट; स्निग्ध (जमीन). २. ज्यात कस विशेष आहे असे (दूध) किंवा असे दूध देणारी (गाय). ३. (ल.) कंजूष; कृपण; चिक्कू. ४. गुळगुळीत; मऊ; नरम.

**चिकण काकडी** तवसे; एक प्रकारची काकडी.

**चिकण खडू** १. पांढरी माती; एक प्रकारचा शाडू. २.विशेष प्रकारची सकस शेतजमीन.

**चिकणचोपडा–डे** वि. १. स्निग्ध; जास्त तेल किंवा चरबी असलेले; चिकट (जमीन). २. गुळगुळीत (दगड, कागद, लाकूड). ३. मऊ, चिवट, मजबूत (रेशीम). ४. चकचकीत; पॉलिश केलेले; तुळतुळीत.

**चिकण दुमट** (कृषि.) चिकणमाती आणि बारीक वाळू यांचे मिश्रण असलेली माती.

**चिकणवट** वि. ओशट; चिकट (जमीन).

**चिकण–णी** वि. विशिष्ट प्रक्रिया करून तयार केलेली सुपारी; मऊ, नरम केलेला सुपारीचा एक प्रकार : 'चिकणिला म्हणशिल का बरडा.' – राम जोशी – मला ११०. [का. चिकणि.]

**चिकणा, चिकणामूळ** पु. न. एक औषधी वनस्पती. याला चुंच असेही दुसरे नाव आहे : 'उडीद, चिकणामूळ... अश्वगंधा या सात औषधांचा काढा.' – निऔ ४२.

**चिकणा–चिकणा–ना** वि. १. स्निग्ध; तेलकट; मऊ; चमकदार; गुळगुळीत : 'मातीचा तांबूस चिकणा गाळ... – डोह १६०. २. (ल.) लोभस; सुंदर; आकर्षक : 'हसताना तू इतकी चिकणी दिसत होतीस...' – ऑक्टोपस ७२. [सं. चिक्कण]

**चिकणाई** स्त्री. स्निग्धपणा; गुळगुळीतपणा; तेलकटपणा : 'कलिंगडाच्या

मगजात एक भाग चिकणाई म्हणजे चरबी...'-फचि ५७.[सं. चिक्कण]

**चिकणी** स्त्री. एक प्रकारचे झाड.

वि. पहा : **चिकण**

**चिकन** वि. (ल.) द्रव्यसंपन्न; पैसेवाला : 'झालंच तर चिकन आसामी हाय. पान्यावनी पयसा वतील.'- पाचोळा ५३.

**चिकन** न. नक्षी, कशिदा असलेले पातळ; झिरझिरीत पांढरे कापड : 'चिकनचे काम कोठे छान पाहिले.'- अहीदि २०.

**चिकन** न. कोंबडीचे मांस : 'एक ऑमलेट - एक डझन चिकन समोसा !'- निक १२०.

**चिकनदोजी, चिकंदोजी** वि. कापडाची एक जात : 'अंगात चिकनदोजीचा अंगरखा शोभत होता.'- श्रीयो ४९१.

**चिकना** वि. (ल.) सुंदर; आकर्षक; लोभस : 'ट्रक ड्रायव्हर इत्यादींच्या शब्दांत 'चिकना माल'.'- अंअ ४७.

**चिकभरित** वि. चीक भरलेल्या; अर्धपक; खाण्यास योग्य : 'चिकभरित जाहल्या पिकातें। भोरड्या वोरबडिती तेथें।।'- एभा ३१.४००.

**चिकभावई** स्त्री. फाल्गुन अमावस्या.

**चिकरणे** सक्रि. विखरणे.

**चिकलदोडकी** स्त्री. भाताची एक मध्यम जात.

**चिकलवणी** वि. दलदलीत; चिखल व पाणी यांनी युक्त. (गो.)

**चिकलवाणी** वि. घाणेरडा; चिखलात फिरून तसाच राहणारा. (गो.)

**चिकवडी** स्त्री. तांदळाचे पीठ, मीठमिऱ्यांचे एक प्रकारचे तोंडी लावणे.

**चिकशा-स्या** स्त्री. १. संशय; खुरखुर; संदेह; आशंका. (क्रि. आणणे, बाळगणे, धरणे, वागविणे, येणे, उठणे, वागणे इ.). २. कंटाळा; वीट. (क्रि. येणे.) [सं. चिकित्सा]

**चिकसा** पु. अंगाला लावण्याकरिता केलेले एक प्रकारचे सुगंधी द्रव्य; जोंधळा, हळद इ. वाटून अंगाला लावण्याकरिता केलेले उटणे : 'नाना नुठिता देहदशा। कालवूनि लाविजे चिकसा।'- अमृता ७.७२.

**चिकसे** न. खाण्याचा एक गोड पदार्थ.

**चिकंदाज** वेलबुट्टी काढणारा; मुतर्रिज.

**चिकाचा पडदा** पहा : **चिक**

**चिकाट, चिकाटढ्यान** वि. चिकट पदार्थाने पूर्णपणे माखलेले; अतिचिकट : 'सारखी शेपूट फिरवून फरं चिकाटढ्यान करून टाकलेलं...'- गोतावळा १२. [का. चिक्कण.; ध्व.]

**चिकाटी** स्त्री. १. धडाडी; नेट; करारीपणा; निग्रह; सोशीकपणा. २. अनेक अडचणी सोसून दीर्घकाल प्रयत्न करण्याचा गुण; प्रयत्नशीलता एखाद्या गोष्टीचा हिंमतीने पाठपुरावा करण्याचा गुण. दीर्घसूत्रीपणा.३. विरंगुळा.

**चिकाटी** स्त्री. १. बळाची परीक्षा करण्यासाठी मनगटावरची पकड सोडवणे : 'धरूनिया हाती हात पोरा धरिसी चिकाटी।'- निगा ९६. (क्रि. धरणे, सोडणे.) २. पहिलवानाची विशिष्ट पकड. ३. स्वाराची घोड्यावरील मजबूत मांड. ४. (ल.) वादविवादात प्रतिपक्षाची अडवणूक करण्यासाठी घातलेला प्रश्न.

**चिकाटी-ठी** स्त्री. १. पक्षी धरण्यासाठी केलेला चिकट पदार्थ; लावलेली काठी; चुना, सफेता : 'सुर्णी ससाणे चिकाटी खोंचरा। घेऊनि निघती डोंगरा। पारधी जैसे।'- ज्ञा १६.३४५. २. चिकटपणा (लाकडाचा). ३. (ल.) लघळपणा; लोचटपणा; लांगूलचालन. [सं. चिक्क]

**चिकाटी** स्त्री. स्वाराची घोड्यावरची मजबूत मांड.

**चिकाटी** स्त्री.मिठी; पाठलाग; पिच्छा.

**चिकाटी** स्त्री. आरोळी.(खान.) [ध्व.]

**चिकाडा** पु. एक प्रकारचे दुधाळ झाड; शेर.

**चिकार** क्रिवि. पूर्णपणे; खच्चून; रिकामी जागा न ठेवता. (क्रि. भरणे.) वि. दाट; गच्च; फार; कल्पनातीत; अतोनात : 'गेले चार दिवस चिकार पाऊस पडतो आहे.'- लव्हाळी २१.

**चिकार** पु. माकडाचा चीत्कार : 'माकडें चिकार करित आथि'- कला ९. [सं.चित्कृ]

**चिकार-रा** पु. कंजारी लोकांची सतार; दोन तारांची किनरी; एक गोंडी वाद्य. [हिं.; सं.]

**चिकार** वि. बिनलढाऊ; कचरा : 'किल्ल्यातून चिकार माणूस नित्य थोडे बहुत पळोन जात आहे.'- ऐलेसं ४३७९.

**चिकारा** पु. नावड; तिटकारा; किळस.

**चिकारा** पु. काळवीट.

**चिकारी** पु. सतारीस लावलेल्या सात तारांपैकी शेवटची (सातवी) तार.

**चिकारी बोली, भाषा** शब्दांच्या आरंभी च-चि लावून त्यातील वर्णाची उलटापालट करून बोलण्याची सांकेतिक भाषा. उदा. चलाम, चिलाम = मला, चलातु, चिलातु = तुला इ.

**चिकार्र** न. मूल, पोर. (नंदभाषा)

**चिकाळ-ळा-ळ्या** वि. फार चीक असलेले (झाड, फणस, आंबा).

**चिकांदी** स्त्री. चिळकांडी; फवारा : 'घोड्यांच्या खुरांबरोबर चिखलाच्या चिकांद्या उडू लागल्या.'- श्रीयो २३५.

**चिकित** (नृत्य) खालचे-वरचे दात एकमेकांपासून दूर ठेवणे. जांभई आली असे दाखविण्याच्या वेळी नृत्यात हा अभिनय करतात.

**चिकित्सक** पु. १. वैद्य. २. (ल.) काथ्याकूट करणारा; कीस काढणारा; खोदूनखोदून चौकशी करणारा. ३. दर्दी; तज्ज्ञ. ४. सूक्ष्म निरीक्षण, तपासणी, विश्लेषण करणारा : 'बहिणी तर अतिशय चिकित्सक आहेत.'- लव्हाळी १७१. [सं.]

**चिकित्सा** स्त्री. १. वैद्यकी; वैद्यक्रिया; उपचार : 'ते हिंसा निवारावया केली। चिकित्सा कां।'- ज्ञा १३.२२५. २. रोगासंबंधी साध्यासाध्य विचार व औषधयोजना. ३. रोगाची परीक्षा; निदान. ४. (ल.) सूक्ष्म निरीक्षण; काथ्याकूट. (विशेषत: फाजील, विचक्षणापूर्ण असे).[सं.]

**चिकित्सा, चिकित्सिका** स्त्री. १. सूक्ष्म तपासणी; विश्लेषण; मीमांसा; चौकस विचार. २. कांक्षा; अंदेशा; वितर्क. [सं.]

**चिकित्सा मनोविज्ञान** (मानस.) उपयोजित मानसशास्त्राची ही एक शाखा आहे. मानसशास्त्रीय सिद्धांत व पद्धतींचा अवलंब मनोविकारांच्या निदानासाठी व उपचारांसाठी यामध्ये केला जातो.

**चिकित्सालय** न. विशिष्ट रोगाची चिकित्सा किंवा तपासणी करून त्यावर औषधोपचार करण्याची व्यवस्था असलेले स्थळ; दवाखाना; रुग्णालय.

**चिकित्सेखोर** वि. उगीच काथ्याकूट करणारा; फाजील चिकित्सा करणारा; भलभलते संशय-शंका घेणारा (मनुष्य).
**चिकी-क्की** स्त्री. १. गुडदाणी. २. पातळ चिकट पदार्थ; गोंद; खळ. ३. पाघळणारा आंबूस गूळ. ४. काकवी. ५. दाट होईल इतकी कढवलेली साखर, पाक. ६. उडदाच्या पिठाची खळ. ७. तावदाने चौकटीत घट्ट बसविण्याचे लुकण, लांबी इ.; लोट्याची लाख.
**चिकीचा** वि. खडी काढलेला (लुगडे, कापड, कपडा).
**चिकीर** वि. किचकट; त्रासाचे; घोटाळ्याचे; जिकीरीचे.
**चिकू-क्कू** पु. एक गोड, साधारणपणे बटाट्याएवढे फळ.
**चिकू-क्कू** वि. कंजूष; कृपण; कद्रू. [सं.स्तोक; क. चिक्क]
**चिके** क्रिवि. क्षणभर; जरा; काही क्षण. [क.]
**चिकोटा** पहा : **चिकटा** १,२,३,४,६.
**चिकोटी** स्त्री. खेळाचा एक प्रकार : 'मुलांचे किती गमतीदार खेळ : चिकोटी, हंज्याप इ.' - बलुतं १८.
**चिकोटी** स्त्री. घट्ट मिठी.
**चिकोडा** पु. जोंधळ्यावर पडणारा रोग; थंडी पडली म्हणजे जोंधळ्याच्या पातीवर तयार होणारा एक चिकट पदार्थ.
**चिकोरपणा** पु. थट्टेखोरपणा; छिचोरपणा. (व.)
**चिकोरी** पु. मातीची पणती.
**चिकोरी** स्त्री. (प्राय: बहुवचनी प्रयोग) थट्टा; मस्करी. (व.)
**चिकोरोंडी** स्त्री. विवाहातील धेंडा.
**चिक्क** वि. चिवट.
**चिक्क** वि. छोटी, लहान : 'ह्या मूर्तीची लहान आटोपशीर प्रतिकृती 'चिक्कमूर्ती' म्हणून उत्सवासाठी असते.' - परिपूर्ति ६४. [क.]
**चिक्कट** पहा : **चिकट**
**चिक्कण** पहा : **चिकण**
**चिक्कर** वि. लहान; चिमुकले; क्षुल्लक; आकारात कमी (फळे, फुले, अक्षरे, आकृती, विड्याची पाने इ.). [क. चिक्क = लहान]
**चिक्का** पु. मावा; पिकावरील रोग. (अहि.)
**चिक्की** स्त्री. गुळाच्या, साखरेच्या पाकात दाणे, तीळ, खोबरे इ. घालून करण्यात येणारी मिठाई; गुडदाणी : 'चिक्कीमध्ये वापरण्यासाठी चिक्कीचा गूळ मिळतो.' - मिखा १०७.
**चिक्कू** पहा : **चिकू**
**चिक्कूल** पु. चिखल : 'वाटंला चिक्कूल झाला असल, नीट पायांकडं बघून जपून जावा.' - आभाळ ४८.
**चिक्ना** पु. एक झुडूप. याची केरसुणी खळ्यावर वापरतात. (झाडी)
**चिक्नावट** स्त्री. गुळगुळीतपणा. (झाडी) [हिं.]
**चिक्र** न. कपबशी. (गो.)
**चिखल** १. पु. गारा; किचड; रेंदा. २.विहिरीतून वर काढलेली बादली ज्यावर टेकवतात ती हिरवळीची जागा. [सं. क्लिद] (वा.) ० **करणे** - भाताचे रोप लावण्यापूर्वी करण्यात येणारी दुसरी नांगरट. शेतात चिखलासारखी जमीन करणे; गलगलीत, रबरबीत करणे; मिसळणे. **चिखलात धोंडा टाकणे** - भलत्याच भानगडीत पडून स्वत:ला त्रास करून घेणे. **चिखलात रुतलेली गाय** - असहाय व्यक्ती; संकटात सापडलेली व्यक्ती.
**चिखलणी** स्त्री. (कृषि.) लोखंड शुद्ध करण्याची पद्धती.
**चिखलणे** अक्रि. १. पावसाने जमिनीवर चिखल होणे. २. चिखल्यांचा विकार होणे. ३. रेंदाड करणे.
**चिखलणे** सक्रि. हाकणे; लोटणे (हत्ती, घोडा); चेतवणे; पुढे ढकलणे.
**चिखलधुणी** स्त्री. भाताची बोणी, पेरणी करणाऱ्या मजुराचे कामानंतरचे हातपाय धुणे, स्नान करणे, अवजारे वगैरे धुऊन काढणे इ. काम : 'चिखलधुणी सोंपली, तेव्हां बापू तावड्याचे घर लावणीच्या कामगिरीतून अजिबात मोकळे झाले होते.' - तोरण ९७. (को.)
**चिखलफेक** स्त्री. (ल.) स्वैर निंदा, टवाळी, अशोभनीय टीका, धूळफेक करणे : 'चिखलफेक म्हणजे टीका नव्हे.' - गोबे १२३.
**चिखलभावळी, चिखलभावी** स्त्री. ज्येष्ठ अमावस्या. (व.)
**चिखलवट** स्त्री. दाराचा उंबरा.
वि. १. जेथे लवकर चिखल होतो अशी (जागा, जमीन). २. जेथे चिखल झाला आहे अशी (जागा, जमीन); चिडचिडीत; रेंदाड.
**चिखलवणी** न. चिखलाने युक्त पाणी; गढूळ पाणी.
**चिखली** स्त्री. चिखलात फिरल्यामुळे पायांच्या बेचक्यात होणारा एक विकार. अव. चिखल्या : 'चिखल्या जिव्हाळ्या लागती। या नांव आदिभूतिक।' - दास ३.७२२.
**चिखल्या** पु. हळीशील रुमणे खुंटी मारून बसवतात ती खुंटी.
**चिखिमिखी** स्त्री. चिरचिर; कुरकुर: 'हे चिखिमिखी काइसी?' - तसा ९४३.
**चिखोरा** पु. नखांनी घेतलेला चिमटा; नखांनी त्वचेवर काढलेला ओरखडा; चिमकोरा. (व.)
**चिगचिग, चिगढा(धा)ण** स्त्री. १. चिकचिक; चिडचिड; बराच चिखल होणे. २. घामाने अंगाला येणारा चिकटपणा; चिवचिव.
वि. रेंदाड; चिखल असलेले.
**चिगट** पहा : **चिकट** : 'कुल्फीमलईवाला आला, तसाच ढकलीत चिगटबाटल्या.' - मर्ढेक ७९.
**चिगर** वि. किरकोळ.
स्त्री. वाळूतील पिसू.
**चिगलेबिगले** पु. फासेपारधी. [क.]
**चिगूर** पु. चिंचेचा कोवळा पाला : '...चिगुराची भाजी त्याच्या विशेष आवडीची होती.' - गालिब ६३.
**चिगू(घो)र** पु. घोळका; समुदाय; गर्दी : 'बाकी लहान पोरांचा चिगूर होता.' - वाब ६४; 'पोरांचा चिघोर गोंगाट करीत बसला होता.' - उअ २.
**चिघळ** पु. गूळ, साखर, मीठ इत्यादी पदार्थाला सुटतो तो द्रव. (को.)
**चिघळ** स्त्री. एक प्रकारची रानभाजी.
**चिघळणे** अक्रि. पाझरणे; गळणे; स्रवणे (मीठ, साखर, गूळ इ.); जखमेत पू होऊन ती पसरणे, वाहणे. [सं. गल]
**चिघळ्या** वि. पाझरणारा; वितळणारा; झिरपणारा (गूळ, साखर इ. पदार्थ).
**चिघळ्यादेवी** स्त्री. अव. ज्यातून पू वाहतो अशा देवी; कथल्या देवी.
**चिघुर** वि. लहान; चिमुकला; छोटा; खुजट. पहा : **चिक्कर**
**चिचकाट** स्त्री. भानगड.

**चि(चिं)चणी** स्त्री. गवतात अथवा भातखाचरात उगवणारी एक वनस्पती; हरळीसारखे एक प्रकारचे गवत.

**चि(चिं)चणी** स्त्री. चिंच : 'चिंचण्या तोडू झाडावर.' – दावि २६२.

**चिच(चा)रा** पु. चिंचोका; चिंचेचे बी. (गो.)

**चिचांदर** स्त्री. चिचुंदरी; उंदराची एक जात. (गो.)

**चिचिर चिचिर** क्रिवि. चिचिर असा विशिष्ट आवाज करीत; न अडखळता : 'पुढले दोन पाय ठेवून चिचिर पिऊ लागले.' – जैरजै ३७.

**चिची** स्त्री. रानकिड्यांचा, रातकिड्यांचा आवाज; चिमण्यांचा चिवचिव शब्द. [ध्व.]

**चिचुकली** स्त्री. चिमटी.

**चिचुं(चों)दरी, चिचुं(चों)द्री** स्त्री. १. उंदराची एक जात; उंदरासारखा परंतु आखूड शेपटीचा व चूंचूं आवाज करणारा एक प्राणी. २. एक प्रकारचे चक्राकार फिरणारे दारूकाम : 'चंद्रज्योति, हातनळे...चिचुंदऱ्या...वगैरे आतषबाजीचे प्रकार.' – मसंघवि २२३. ३. (ल.) लहान चुणचुणीत मुलगी : 'शेवटी एक चिचुंद्री पुढे आली...' – कावढा ४६. [सं. छुछुंदरी]

**चिचेरा** वि. चुलत : 'भानू मजकूर बाळाजीपंतांचे चिचेरे बंधु ते मृत पावले.' – ऐको ३७९. [हिं. चचेरा]

**चिचोर–रा, छिचोर** वि. अचावचा बोलणारा; पोकळ डौल करणारा; बाष्कळ; दुर्व्यसनी; विषयासक्त.

**चिचोरा** पु. चिंचोका.

**चिचोरडा** वि. क्षुल्लक (जीव). (व.)

**चि(चिं)चोरा** पु. चिंचोका; चिंचेतील बी : 'चिंचोऱ्यांचा खेळ खेळताना त्यांनी सर्व चिंचोरे जिंकले.' – मसं ३१. (व.)

**चिचोरी** स्त्री. छिचोर वर्तन; हलकटपणा; क्षुद्रपणा; पोकळ ऐटबाजपणा; पोरकटपणा; स्वभावाचा, वर्तनाचा मूर्खपणा.

**चिचोऱ्या** वि. लाल रंगाचे लुगडे.

**चिचोंदरा** वि. चपळ; हुशार; चुरुचुरु बोलणारा (मुलगा).

**चिच्छक्ति–त्ती** स्त्री. सचेतन तत्त्व; शुद्ध चैतन्य; परमात्मा; बुद्धी; मन. [सं.]

**चिजपट–वट–बीज** वि. गिचमिड; चिताड (अक्षरे); वाईट रीतीने लिहिलेले, काढलेले.

**चिज्जड** पु. मायास्वरूपाचा एक विभाग : 'जड अजड चिज्जड एवं त्रिविधमाया' – लीचउ १३३.

**चिट** क्रिवि. निमूटपणे; स्तब्धपणे; मुकाट्याने; चूप.

**चिटकी** स्त्री. विशिष्ट आकाराचे मातीचे भांडे : 'कुंभार...डेरा, सुगडे, वेळण्या, चिटकी वगैरे बलुत्यात देतो.' – गांवगाडा ७७.

**चिटकी** स्त्री. १. मुळ्याची शेंग; डिंगरी. २. एका विशिष्ट वनस्पतीची शेंग; एरंडाचे बारीक जातीचे बी. ३. गवारी.

**चिटकी** स्त्री. हाताचे मधले बोट व आंगठा यांच्या संयोगवियोगाने होणारा आवाज; चुटकी : 'शतसंख्या वाजवी ज्या जेवविता माय देवकी चिटक्या।' – मोउद्यो ७.७६. [ध्व.]

**चिटकुरा** न. कागदाचे कपटे, तुकडे : 'मी फाडलेली चिटकुरं घाईघाईत वाचलीं.– कोसला ५६.

**चिटकुला** वि. लहान; चिमुकला; छोटासा. [क. चिट्टि = लहान]

**चिटके** न. छटाकाचे माप; शेराच्या एक सोळांशाएवढे माप. [क. चिट्टे]

**चिटकोबा** पु. मातीचे लिंग.

**चिटकोरा** पु. कपटा : 'रुपया रुपया गोळा करून पावतीचे चिटकोर झोपडकरूंच्या तोंडावर फेकीत होते.' – माखा १२९.

**चिटक्यांचे मांडव** पहा : **चटक्यांचे मांडव**

**चिटचिट–टा** क्रिवि. दूध काढायच्या भांड्यात थेंबथेंब गळणाऱ्या दुधाच्या होणाऱ्या शब्दाप्रमाणे; वासरू गाईचे दूध पीत असताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे.
स्त्री. चिटचिट असा आवाज : 'अंधारात काही दिसत नव्हतं; पण चिटचिट ऐकू येत होती.' – आभाळ १२. [ध्व.]

**चिटणी** स्त्री. पहा : **चिटणे**

**चिटणीस** पु. (राज्य.) एखाद्या व्यक्तीचा किंवा संस्थेचा पत्रव्यवहार, लिखाईपढाई इत्यादी पाहणारी व्यक्ती.

**चिटणे** सक्रि. कासेतील, स्तनातील दूध संपल्यावरही थेंब थेंब दूध काढणे, पिणे.
न. थेंब थेंब पिळून काढलेले दूध. [ध्व.] (वा.) **चिटणीस पडणे** – मूल, वासरू यांच्या निःशेष पिण्याने (गाईचे, आईचे) क्षीण होत जाणे.

**चिटणे** अक्रि. (पालीने) चिट असा शब्द करणे; पालीच्या आवाजाचा वाचक धातू. [ध्व.]

**चिटणे** क्रि. बिलगणे.

**चिटनविशी, चिटनिशी** स्त्री. १. चिटनविसाचे काम, अधिकार. २. चिठ्ठ्याचपाट्या लिहिणे; निव्वळ पत्रे लिहिण्याचे काम. ३. चिटणिसाच्या अक्षराप्रमाणे सुंदर, लहान (अक्षर.) [फा. चिटनवीस]

**चिटनवीस, चिटणी(नी)स** पु. पत्रे व पत्रांची उत्तरे लिहिणारा सरकारी कर्मचारी; शिरस्तेदार. [फा.]

**चिटप(पि)ट** वि. क्रिवि. खरडलेले; गिचमिड लिहिलेले.
न. खरडलेला, गिचमिड लिहिलेला कागदाचा तुकडा.

**चिटपाखरू** न. कोणीही (मनुष्य, पक्षी, जनावर इ.); लहान पाखरूसुद्धा (ह्या शब्दाचा उपयोग नेहमी अकरणरूपीच करतात) : '...कोणी माणूस – अगदी चिटपांखरूंसुद्धां...तिथे उभे राहू देऊ नका.' – केस्व ३२५. (वा.) ० **नसणे** – पूर्ण शून्यता, शांतता असणे.

**चिटफंड** पु. दर महिन्याला सभासदांकडून ठरावीक रक्कम जमा करून एकत्रित करायचा निधी : 'तिच्या संसाराकरिता ऑफिसच्या चिटफंडातून कर्ज काढलं आहे मी – तीनशांचं.' – अआगं ८०.

**चिटमिटा** वि. चुटमुटा; चुटपुटता; जेमतेम पुरेल असा.

**चिटरं बाटरं** न. जनावरांची पिल्ले.

**चिटलिंग, चिटू** पु. लहान पण हुशार व मोहक मूल.

**चिटवी, चिटी** वि. चिटाचे; चिटाने आच्छादलेले.

**चिटी** स्त्री. ठिपका : 'पिवळ्या अंगावर तांबड्या चिट्या उठू लागल्या.' – खळाळ १२०.

**चिटी** स्त्री. चिमूट : 'कस्तुरीत पडली हिंगाची चिटी। बिगडली सोन्याची भटी।' – लोसाको

**चिटी-ठी-ट्टी मसाला-ले** सरकारी हुकूम पोहोचविणारास रयतेकडून मिळणारी पोटगी : 'चिटी मसाला मौजे कोलोसे इनाम पैकी सालाबादी जमा आहेत.'- मसाप २.१५३; प्रतिवादीला बोलावण्याची फी. [सं.चिट्]

**चिटुक(र)ली** वि. अगदी लहान; चिमुकली : 'बाहुलीचं रक्षण करायचं कशाला आणि ही चिटुकली उषा तिचं रक्षण करणार काय?'- सुदे ५८.

**चिटू** पु. लहान, हुशार मूल.

**चिटूक** पु. न. एका पक्ष्याचे नाव.

**चिटोरा-रे, चिठोरा** न. कपटा; कागदाचा लहान तुकडा : 'शिवचरित्रावर काही नवा प्रकाश पडेल असं वाटणारं एखादं चिटोरं सापडण्याची आशा वाटली.'- गणगोत ११२.

**चिट् का मिट्** क्रिवि. अगदी गप्प : 'सुंदरी इतका वेळ ओरडून अगदी कल्लोळ करीत होती; पण आता अगदी चिट् का मिट्'- पलकोघे ८१.

**चिट्टी** स्त्री. वेलबुट्टी; नक्षीकाम; विविध आकाराची आकृती : '(पाडीने) गार्रकन मुतात भिजलेली शेपूट फिरविली...) पान्हण्याच्या कापडावर चिट्ट्या चिट्ट्या.'- गोतावळा २.

**चिट्टी-ठ्ठी, चिटी-ठी** स्त्री. पहा : **चिटी** १. छोटे पत्र. [का. चिट्टे; चीटी = लहान पत्र.] २. हुंडी. ३. मटक्याच्या अड्ड्यांवरील पावत्यांचे लहान लहान तुकडे : 'तो... एका मटक्याच्या अड्ड्यावर चिठ्ठ्या फाडतो.'- धुश ४१. [सं. चिट्] (वा.) ० **उतरणे** - (वर किंवा विषयी या शब्दयोगी अव्ययाला जोडून उपयोग) मरण्याची सनद मिळणे. (श्रीमंताची, देवाची इ.).० **उतरणे** - एखाद्याकडून पैशाची विलक्षण मदत होणे. **चिठ्ठी, चिठ्या टाकणे** - १. आपल्या मनात जो प्रश्न असेल त्याची होकारार्थी व नकारार्थी अथवा संभाव्य असतील तितकी उत्तरे कागदाच्या सारख्या निरनिराळ्या चिठ्ठ्यांवर लिहून त्या चुरगळून देवासमोर टाकून व प्रार्थना करून त्या चिठ्ठ्यांपैकी एक लहान मुलाला उचलायला सांगून अशी चिठ्ठी वाचणे आणि त्यात लिहिलेले आपल्या प्रश्नाचे उत्तर असे समजणे. २. लाभार्थीची नावे चिठ्ठ्यांवर लिहून, चिठ्ठ्या उचलून अग्रक्रम ठरवणे. ० **फिरवणे, माघारे टाकणे** - असाध्य दुखण्यातून बरे होणे.

**चिट्ट्या** पु. चित्ता; बिबळ्या (वाघ).

**चिट्याचिट्याची** वि. नक्षीदार, वेलबुट्टीची : 'हिरीतल्या पाण्यावर हुंबराची काळीभोर चिट्याचिट्याची सावली डसलेली.'- खळाळ ११४.

**चिठ(ठो)डी, चिठोरा** पहा : **चिटोरा**

**चिठिकार** पु. चिठी, पत्र देणारा : 'ठाओ न पवतां जेयाचा। मनेसि मुरडील वाचा। तो देओ होये शब्दाचा। चिठिकारू'- ज्ञा १५.१५.

**चिठ्ठ-ठ्ठी चिठ्ठ-ठ्ठा-ठ्ठी** पु. स्त्री. १. जमाबंदीचा तक्ता. २. खजिन्यावर केलेली मागणी. ३. इनामचिठ्ठी; इनाम जमिनीचा तक्ता. ४. (प्रांतातील) पगारदारांच्या पगारवाटणीचा तक्ता. ५. (लावणी हा शब्द पूर्वी जोडल्यास) लागवड केलेल्या जमिनीचे पत्रक. ६. टाचण; टिपण; नोंद. [सं. चिट्]

**चिठ्ठीचपाटी** स्त्री. चिठ्ठी पत्र वगैरे; चिठ्ठीबिठ्ठी.

**चिठ्ठीचा आकार** चिठ्ठी येताच हजर होणारा आज्ञाधारक; विश्वासू नोकर.

**चिडका, चिड(ढ)खोर** वि. चिडणारा; लवकर रागावणारा.

**चिडखोरपणा** पु. बारीकसारीक गोष्टीवरून रागावणे; चिरमिरा स्वभाव.

**चिडचिड** स्त्री. १. चिकचिक; रेंदाडपणा. २. घामामुळे शरीराला आलेला चिकटपणा; चिबचिब.

**चिडचिड** स्त्री. थोडक्या जागेत पुष्कळ माणसे, पदार्थ असल्याने होणारी दाटी, गर्दी, अडचण.

**चिडचिड** स्त्री. कुरकुर; त्रासिकपणा.

**चिडचिडणे** अक्रि. १. चिखलाने युक्त होणे; रेंदाड होणे (जमीन, जागा इ.). २. चिकट होणे; चिडचिडीत होणे (डोळे, शरीर इ.).

**चिडचिडणे** अक्रि. चिडणे; त्रासणे.

**चिडचिडा** वि. चिखलाचा; चिखलाने युक्त असा; रेंदाड.

**चिडचिडा-ड्या** वि. त्रासिक; चिडखोर.

**चिडचिडीत** वि. १. चिखलाने युक्त; रेंद्याचा; निसरडा. २. (घामाने) चिकट झालेले (डोके, शरीर); चिबचिबीत.

**चिड(डी)चिप** स्त्री. स्तब्धता; सामसूम. उदा. मास्तरांची दृष्टि वर्गाकडे वळताच सगळीकडे चिडीचिप.

**चिडचीड** स्त्री. दाटी; गर्दी.

**चिड(ढ)णे** अक्रि. १. चीड, राग येणे; कावणे; संतापणे. २. फोड झालेल्या, सडलेल्या जागेतून मांस वगैरे वर येणे; उभरणे; उतणे. (वा.) **चिढीला येणे** - रागावणे : 'शिपाईबोवा... चिढीला येऊन त्यांनी... तरवारीला हात घातला.'- मोचन १४. [सं.चर्द्]

**चिडमिड, चिडमिडाट** स्त्री. अतिशय दाटी, गर्दी, गोंधळ; गर्दीपासून उत्पन्न होणारा संकुचितपणा; अडचण : 'चिडमिडाट तरी कमी होईल.'- लव्हाळी २६०.

**चिडमिडणे** अक्रि. चिडमिड करणे; अंग फिरवणे; हलणे; सरणे (गर्दीत, दाटीत).

**चिड(ढ)रा** वि. चिडका; चिडखोर; चिडचिड्या; तिडतिड्या.

**चिड(ढ)वणी** स्त्री. खिजवणी; (एखाद्याला) कुत्सित बोलून, त्याचे वर्म काढून राग आणणे, चिडवणे.

**चिडविणे** सक्रि. खिजविणे; चीड, राग, संताप येईलसे बोलणे.

**चिडा** पु. पक्षी; चिमणी : 'चिडाकायी बोल व बोल चिडा हारबर फोल फोलता फोलता तानेली झाली '- लोश २८. [हिं.]

**चिडाणी** स्त्री. काटेरी जागा : 'क्रोधाचें प्रबल भरतें। भरी द्वेषाचिया तरियातें। असूया तिरस्कारांची तेथें। चिडाणी उते अतिरुति।'- एभा २.९७.

**चिडाणी** स्त्री. १. कुजकेपणा; कुजणे : 'अन्नाचिया चिडाणीं। पीडती पशुपक्षिप्राणी।'- एभा २३.८५१. २. घाण; कुपात्र; घाणेरडे भांडे : 'जे कां दुर्गंधाची पोहणी। जे उतली चिडाणी विष्टेची।'- एभा २६.२०३.

**चिडार** न. कोंबडे : 'मातांगाचे चिडारू'- गोप्रच १८४.

**चिडि(डी)कामिडी, चिडिमिडी** स्त्री. दाटी; गर्दी; चेंगराचेंगरी; गोंधळ.

**चिडी, चिडिया** स्त्री. चिमणी : 'काळी चिडी काकण घारी'- एभा १०.५८१; 'चिड्या चिमणे कावळे।'- दावि २४४. [सं. चटिका]

**चिडी** स्त्री. १. चिमणी. (व.) २. पत्र्याचा लहानसा दिवा : 'गरीबाच्या घरात असत तशा 'चिडी' म्हणजे चिमण्या'- एस्पृडा २६.[सं. चटिका.]

**चिडी** स्त्री. पत्त्यातील एक पान.

**चिडीचीप, चिडीचूप–चिप्प** शांत; अगदी स्तब्ध : 'मुंबई शहर चिडीचूप झोपलं होतं.' – अदेशी १३४.

**चिडीयाघर** न. प्राणिसंग्रहालय : 'सायंकाळी मध्यभागी असलेल्या चिडीया घराभोवती घोटाळणारे गोंगाटाचे थवे...' –मावि १३. [हिं.]

**चिड्ड** क्रिवि. वाढ खुंटलेले. 'भात चिड्ड धरले.' –भाताची वाढ खुंटली. (बे.)

**चिड्डी** पहा : **चड्डी** : 'शेवटच्या दोन खुंट्यांपैकी एकीवर दहाबारा वर्ष वयाची चिड्डी अन् दुसरीवर त्याच आकाराचं रेघारेघांचं कुडतं लोमकळत होतं.' – बाविबु ३.

**चिढखोर, चिढणे, चिढरा, चिढवणी** पहा : **चिडखोर** इ.

**चिणका, चिणकारा** पु. १. फणकारा; संताप; रागाचा झटका; क्रोधावेश. (क्रि. येणे, लागणे.) : 'वयस्कर बायकांना देखील चिणकारा आला.' – परेपा २३२. २. तिटकारा; किळस; शिसारी. (क्रि. येणे.) [ध्व.]

**चिणका–क्या** वि. चिडका; चिडखोर; रागीट.

**चिणकारणे** अक्रि. रागाचा, संतापाचा झटका येणे.

**चिणकुला, चिणुकला, चिगो(णो)रा** वि. चिमुकला; लहान. [क. चिण्ण = मूल]

**चिणचिण** स्त्री. १. (उष्णतेने, उन्हाने होणारी) चुणचुण; आग. २. धुसफुस; रागाची कुरकुर; चडफड; फणफण : 'क्रोधें करी चिणचिण। तो येक पढतमूर्ख।' – दास २.१०.३३. ३. चिणाचीण. ४. जिकीर; फिकीर; काळजी; धास्ती घेतलेल्या मनाची अवस्था : 'दोन तीन हजार माणूस जमलेलें पण चिणचिण करीत सगळा बाजार मागें पुढें मागें पुढें रेलत होता.' – उअं २१. [ध्व.]

**चिणणे** सक्रि. १. वीट, दगड इ. रचून बुजविणे (दार, खिडकी इ.) : 'धर्माचा दारवंटा दृढतर चिणिला हा कली फार खोटा।' – निमाक १.५७. २. (बीळ इत्यादिकात) दगड, माती ठोकून भरणे. ३. ठासणे (लहानशा जागेत माणसे, सामान); कोंबणे; चेंदणे. ४. जिवंत गाडणे (एखाद्या माणसाला भिंतीच्या पोकळीत जुलमाने घालून) भिंत बांधून काढणे. ५. ठार मारणे. [सं. चि]

**चिणणे** सक्रि. १. वीण घालणे. २. परकर इ.ना चीण घालणे.

**चिणाचीण** स्त्री. अनेक खिडक्या, बिळे इ. बुजवण्याचे काम.

**चिणो** पु. राळा. [गु.]

**चिणोरा** पहा : **चिणकुला** [क.]

**चित** वि. उताणा; पाठीवर निजलेला. पहा : **चीत**[हिं.] (वा.) ० **करणे** – उताणा पाडणे; कुस्तीत जिंकणे.

**चित** वि. जागृत : 'चितचि गा चेवलि गा चेवविले। निदैलेचि निदविले' – अमृ ७६५. [सं.]

**चित** न. मन : 'हे लाखां चितां पुनवंता' – कालवार शील्ला ९.२४.

**चितई–चितई–या** स्त्री. १. अजगरासारखे एक जनावर. हे आकाराने मोठे, मंद व निरुपद्रवी असते : 'कोंबड्या खाणारी चितई...' – सामा १४३. २. सर्पाची एक जात.

**चितकवडी** स्त्री. (खेळात) उताणी पडलेली कवडी.

**चितड** वि. गिचमिड लिहिलेले; खरडलेले; खोडाखोडी केलेले; काट मारलेले (लिखाण).

**चितणे** क्रि. चिंतणे, ठरविणे, विचार करणे : 'आदी रामाचं नाव घ्यावं मग चितल्या कामा जावं' – जसा १७.

**चितपट** वि. निकाली कुस्ती; निर्णायकरीत्या कुणीतरी विजयी ठरेपर्यंत चालणारी कुस्ती : 'तर त्या झुंजीला निकाली किंवा चितपटाची कुस्ती म्हणता येणार नाही.' – युजि ६९. (वा.) ० **करणे** – पराभूत करणे : 'पर्ल हार्बर येथल्या पहिल्या सलामीत तर जपानने अमेरिकेला चितपट केले होते.' – दुमयु १३५.

**चितर** पु. काळवीट; चितळ. (झाडी)

**चितर** न. चित्र : 'चितारिया चितरें काढी भिंतीवरी' – नर ९. [सं. चित्र]

**चितर** न. भूतखेतं : 'हे चालतंया कसं? का चितराबितराची भानगड हाय?' – उपरा ४६.

**चितरकथा** स्त्री. १. आश्चर्यकारक घटनांनी भरलेली कथा. २. तमाशा, धिंगाणा : 'एक हा मुलगा. त्याची अशी चितरकथा.' – बाब ७८.

**चितरकथी–थ्या** वि. पौराणिक कथांची चित्रे काढून त्यावरून कथा सांगणारी एक जात किंवा त्यातील व्यक्ती; चित्राचे विवरण करणारा. [सं. चित्र+कथ्]

**चित(ता)रणे** सक्रि. १. चित्रांनी, आकृतींनी आच्छादणे (जमीन, भिंत, कागद इ.) : 'हृदयभिंतिवरी चितरावा।' – दावि २७२. २. वाईट रीतीने चित्रे, आकृती इत्यादी काढणे. ३. (वाऱ्याने) आकाश बारीक ढगांनी आच्छादित करणे. [सं. चित्र, चित्र्]

**चितरनिथर होणे** पांगणे : 'माणसांचे घोळके त्यांना पाहून चितर-निथर झाले.' – अहेअहे २०५.

**चितरंग** न. चित्र.

**चितवाती** स्त्री. मन:स्थिती; चित्तवृत्ती. [सं. चित्त+वृत्ति]

**चितळ** पु. न. अंगावर ठिपके असलेले, आखूड शिंगाचे किंवा बिनशिंगाचे हरिण; चित्रमृग. [सं. चित्र, चित्रल]

**चितळ** न. एक नाणे.

**चितळं बाह्याडं** वि. नक्षीदार; वेलबुट्ट्याच.

**चितळी** वि. चित्रमृगाच्या रंगाचा; चित्रमृगासारखा (प्राणी) : 'एके मोहरीं मोरी पारडीं। एके वायी चितळी पुंडीं ।' – वाह २८१. [सं. चित्रल = चित्रविचित्र]

**चितं(तां)ग** पु. स्त्री. पहा : **चितां(ता)क**

**चिता** स्त्री. प्रेतदहनासाठी रचलेली लाकडे; सरण. [सं.]

**चिता, चितेवान** पहा : **चित्ता, चित्तेवान**

**चिताक(ग)ती** वि. चिंतेत; चिंताग्रस्त : 'आज असा का चिताकती बसलास?' – भुज १११.

**चिता(त)ड, चिताडगुतार** वि. गिचमिड लिहिलेले; डाग पडलेले, रेघोट्या, फराटे ओढलेले.

**चिताड** क्रिवि. पूर्णपणे चीत : 'कायदा फास झाला कीं रयत चिताड मेली.' – खेया १३. (कुण.)

**चिताडणे** क्रिवि. चित्रित करणे; रेखाटणे : 'प्रणवा पै चिताडैली खुने : जेथ देवांचे ठाकले वर्णने ते वस्तु कारणे' : – ऋम ७९. [सं.]

**चिताभस्म** न. चितेतील राख. [सं.]

**चिताभूमि-मी** स्त्री. स्मशान; प्रेत जाळतात ती जागा. [सं.]

**चितामती** वि. चिंतातुर : 'मी चिंतेत पडलो. चितामती झालो.'– तअं १७६.

**चितारणी** स्त्री. चित्रे काढणारी स्त्री : 'अन्यथा ज्ञानाचें चित्र उठी। तेथ चितारणी हे त्रिपुटी। प्रसिद्ध जे कां।'– ज्ञा १८.४६०. [सं.]

**चितारणे** सक्रि. १. चित्रित करणे, रेखाटणे. २. घाण करणे; रंगविणे : 'पिचकाऱ्या, थुंकी यांनी चितारलेला फुटपाथ.'– धुश १३.[सं. चित्र]

**चितारिया** पु. चित्रकार : 'चितारिया चितरें काढी भिंतीवरी'– नर ९.

**चितारी** पु. चित्रे काढणारा; चित्रकार; चित्रे रंगवणारा. [सं. चित्रकार]

**चिताविणे** सक्रि. १. जागे करणे; सूचना देणे. २. चिडविणे; त्रास देणे; खोडी काढणे; सतावणे. [सं. चित्]

**चितां(ता)क –ग** पु. स्त्री. मराठे लोकांतील स्त्रियांचा गळ्यात सरीसारखा घालण्याचा अलंकार. परंतु आठव्या शतकाच्या सुमारास तो कमरेचा दागिना होता असे दिसते : 'फिटला चिंतेचा अभिलाख। म्हणोनी न घाली चितांक। कृष्णपदींचा पदांक। तेचि पदक हृदयीचे।'– एरुस्व ७.३७; 'सरी चिताक भोंवरी। अलंकाराचिया परी। नामें झालीं दुरी। एक सोनें आटिला।'– तुगा ३७७५. [सं. चित्र+अंक]

**चिति–ती** स्त्री. सहा काटकोन–चौकोनांनी मर्यादित असलेली घनाकृती. उदा. पुस्तक, पेटी, चौकोनी ओटा इत्यादी. [सं.]

**चिति–ती** पु. विशिष्ट आकारांच्या विटा मांडून तयार करायची यज्ञवेदी. 'गरुडाच्या आकाराची चिति (विटांची रचना) बनवून...'– गादे ४२. पहा : **चयन** [सं.]

**चिति–ती** स्त्री. (भौ.) निमुळता खांब.

**चिती** स्त्री. बुरा; बुरसा; बुरशी.

**चिती** स्त्री. भिंग

**चिती** पु. अजगर. [हिं.]

**चिती–त्ती** स्त्री. धूळ; राख : 'आंगी चितीयेचे काले' – ज्ञानप्रबोध ८१९. [सं. चिति]

**चितीय तुळई** (स्था.) ज्या तुळईचे सर्व आडवे छेद एकरूप असतात अशी तुळई.

**चितूर** पु. काळा तित्तर पक्षी. करड्या तित्तराएवढा तपकिरी काळा, अंगावर भरपूर पांढरे ठिपके व पट्टे आणि पंख व डोक्यावर लालसर पट्टे असलेला पक्षी. मादी बहुधा पांढरा गळा असलेली.

**चितेणे** अक्रि. पांढऱ्या बुरशीने युक्त होणे; बुरसणे.

**चिते(त्ते)वान** पु. शिकारखान्यांतील शिकारी चित्त्यांचे काम पाहणारा किंवा निगा राखणारा अधिकारी.– ऐको ३७९.

**चितोड–डा** पु. घोड्याचा एक रंग; पांढऱ्या अंगावर तांबडे ठिपके असलेला (घोड्याचा) रंग; तद्विशिष्ट घोड्याचा प्रकार.

**चित्** स्त्री. ज्ञान; बुद्धी; चैतन्य; शुद्ध ज्ञान – चैतन्यरूपी ईश्वर; ब्रह्म; आत्मा. [सं.]

**चित्कण** पु. चैतन्ययुक्त, चैतन्यरूपी कण : 'त्या चित्कणाच्या वरच्या जडाचे...'– पासंग ४५. [सं.]

**चित्कब्रा** वि. राखी रंग

**चित्कला–ळा** स्त्री. १. प्राण्याचे सचेतनत्व; ज्ञानशक्ती; चैतन्य. २. जीवनकला; जीव : 'तूं प्रेमाचा पुतळा। भक्तीचा जिव्हाळा। मैत्रियेचि चित्कळा। धनुर्धारी।'– ज्ञा ४.२९. [सं.]

**चित्कलि(ळि)का** स्त्री. चैतन्यकलिका; ज्ञानरूप ज्योती : 'अर्जुनालागीं चित्कळिका। उजळलिया श्रीकृष्णें।'– ज्ञा ११.१७८. [सं.]

**चित्गेह** न. ईश्वर; ज्ञानमय शांती, आनंद इ.चे स्थान, घर, ठिकाण.

**चित्घनचपला** स्त्री. ज्ञानरूपी मेघातील वीज : 'ज्ञाताच्या कुंपणावरून 'चिद्घनचपला' उड्डाण करून जाते तेव्हा...'– अंया २०.

**चित्त** न. मन; अंतःकरण; बुद्धी; वृत्त्यात्मक अंतःकरण पंचकातील चवथा अवयव; मनोवृत्ती, विकार, भावना, राग इत्यादिकांचे अधिष्ठान मानलेले हृदयस्थान : 'जे वस्तुचा निश्चयें केला। पुढें तेंचि चिंतूं लागला। तें चित्त बोलिल्या बोला। येथार्थ मानावें।'– दास १७.८.८.[सं.] (वा.) ० **उडून जाणे** – १. घाबरणे, उदास होणे; मन न रमणे. (कर्त्याची षष्ठी असते): 'तें ऐकून महाराजांचे चित्त उडून गेले.'– चंद्रगुप्त १३४. २. एखाद्या गोष्टीविषयी मन विटणे; नावड उत्पन्न होणे. ० **पुरविणे** – लक्ष देणे; लक्षपूर्वक ऐकणे. **चित्तात कुन्हा जाणे, येणे** – चित्तात विकल्प येणे.

**चित्तक** वि. हुशार; चलाख; अल्पवयस्क असून मोठ्या विषयाची आवड असलेला.

**चित्तचमत्कार** पु. आश्चर्य; अचंबा; सानंदाश्चर्य. [सं.]

**चित्तचाळक** वि. १. इच्छेचे, मनोवृत्तींचे नियमन करणारा (ईश्वर). २. मन रमवणारा; मनोरंजक; मन चाळवणारा, विकारयुक्त करणारा. [सं. चित्त+चालक]

**चित्तज** पु. मदन; कामदेव; मनात जन्मणारा (मदन). [सं.]

**चित्तथरारक** वि. मनात भीती निर्माण करणारे : 'खून–मारामाऱ्या व चित्तथरारक प्रसंग यांनी गाजलेली रहस्यकथा...'– गोबे १८८.

**चित्तभ्रंश, चित्तवैकल्य** पु.न. १. मानसिक शक्तींचा भंग; म्हातारचळ. २. देहभानाचा नाश; डोके ठिकाणावर नसणे; डोके फिरणे. [सं.]

**चित्तभ्रामक** वि. मन मोहून टाकणारा; चित्ताकर्षक; मन वेडे करणारा. [सं.]

**चित्तर** न. विचित्र : 'तू तर लेका चित्तरच हायेस निव्वळ!'– भुज ४६.

**चित्तलहरी** स्त्री. अव. मनोविकार; मनाचे छंद, तरंग, विलास इ. [सं.]

**चित्तविभ्रम** पु. मन बहकणे; बुद्धिभ्रंश; मन ठिकाणावर नसणे. [सं.]

**चित्तविक्षेप** पु. चित्ताचा समतोल बिघडणे; विमनस्कता. [सं.]

**चित्तवृत्ति–ती** स्त्री. १. मन. २. मनाच्या लहरी, तरंग, परिभ्रमण.[सं.]

**चित्तस्पंद** पु. चित्ताचे आंदोलन; चित्ताची चंचलता : 'लोकनिंदेच्या अतिरेकाने वैतागून देशहिताचे क्षेत्र सोडण्याला चित्तस्पंद'– आभासे ५३.

**चित्तहीन** वि. मन ठिकाणावर नसणारा; मनावर योग्य संस्कार नसलेला : 'ते आघवेंचि गेलें वाया। जे चित्तहीन।'– ज्ञा ९.१७८. [सं.]

**चित्ता** पु. वाघाच्या जातीचे एक जनावर. याच्या अंगावर ठिपके व डोळ्याखाली तिरक्या काळ्या रेघा असतात.[हिं. चीता; सं. चित्रक]

**चित्तागत–ती** वि. चिंतामग्न, चिंताग्रस्त : 'भरली चंद्रभागा वेढा वेशीला पडला। रुक्मीन चित्तागती कुंडलीक का बुडाला।।'– लोसाको.

**चित्ताथिला** वि. सजीव; विचारी; चित्तसंपन्न; एकाग्रचित्त : 'मा मी तंव चित्ताथिला। आणि श्रीगुरु ऐसा दादुला'– ज्ञा १८.१७११.

**चित्ती** स्त्री. राख, धूळ. [सं.चिति]

**चित्तीर्ण सर्प** घोणस. हा जंगलात सावल्यांमधून वावरत असतो.
**चित्पद** पहा : **तत्पद**
**चित्य, चित्याग्नि–ग्नी** पु. जमिनीवर विटा मांडून पेटविलेला पवित्र अग्नी : 'चित्य, चिती व चित्याग्नि म्हणजे तीन वार औरस–चौरस नांगरलेल्या जमिनीवर विटा मांडून पक्ष्यांच्या बाह्यरेषा दाखविलेल्या भागांत प्रज्वलित केलेला पवित्र अग्नि...' – सह्याद्री ४६१.
**चित्याकृति–ती** स्त्री. (ग.) खडीच्या रुळासारखा आकार.
**चित्र** न. १. रंगीत तसबीर; रेषांनी, रंगांनी दगड, कागद, धातूंची भांडी इत्यादिकांवर काढलेली मनुष्य, जनावर, पदार्थ, निसर्गदृश्य इत्यादिकांची आकृती. २. पत्त्यांच्या डावातील, गंजिफातील चित्रांतील राजा, राणी, गुलाम. ३. चित्रविचित्र रंग. ४. मृगजल. [सं.](वा.) ० **पाडणे** – चित्र काढणे, रेखाटणे : 'ऐको दिसीं गोसावीं पुसिलें : 'बाई तुम्हीं चीत्र पाडूं जाणा ?' : – लीचपू ४४३.
**चित्र** पु. एरंड. [सं.]
**चित्र** न. विचित्रपणा; विचित्रपणाचे चाळे : 'माते पाहुनि चित्र काय करितां कां पां। तुम्हीही असे।' – आसुच ४३.
**चित्र** न. आश्चर्य; नवल : 'द्रोणवधे रिपु मानिति जय मानू द्या, न चित्र हे तोही।' – मोकर्ण २.५.
वि. १. आश्चर्यकारक; चमत्कारिक. २. निरनिराळ्या रंगांचा; बहुविध; नानाप्रकारचा. [सं.]
**चित्रक** पु. चित्ता; बिबळ्या वाघ. [सं.]
**चित्रक** पु. एक औषधी वनस्पती.
**चित्रक** पु. चित्रकार; चितारी : 'गर्विष्ठ चित्रक शस्त्रधारी।' – गुच ३६.६७.
**चित्रक** पु. एक रत्न.
**चित्रक** वि. विविध प्रकारचे : 'कोदंडी सर चित्रकी भयकरी तीरीं' – गरा १११.
**चित्रकथी–थ्या** पु. एक लोकरंजनकार. तो गीतबद्ध कथा सांगतो. त्या गीतांतील कथांचा दृक्प्रत्यय येण्यासाठी तो त्या कथेतील विविध प्रसंगांची रंगीत चित्रे दाखवितो.
**चित्रकला** स्त्री. चित्रे काढण्याची कला; सृष्टिसौंदर्यांचे अगर एखाद्या ऐतिहासिक प्रसंगाचे किंवा एखाद्या व्यक्तीचे हुबेहूब चित्र कागदावर अगर सपाट फलकावर काढणे. [सं.]
**चित्रकंठ** पु. १. खबूतर. २. सारस पक्षी.
**चित्रकाई** वि. अपूर्व देहाचा; ज्याचे शरीर विचित्र आहे तो.
**चित्रकार** पु. चित्रे काढणारा; चितारी; चित्रे बनविणारा. [सं.]
**चित्रकाव्य, चित्रगाथा** न. केवळ शब्दांच्या रचनेची चमत्कृती असणारे काव्य : 'तिवारींची प्रवृत्ती चित्रकाव्ये रचण्याकडे फार आहे...' – सासंचा १४. [सं.]
**चित्रगुप्त, चित्रगाथा** पु. १. मनुष्यमात्राच्या पापपुण्यांची नोंद ठेवणारा यमाच्या दरबारातील सांकेतिक अधिकारी. २. (ल.) हिशेबाच्या, लिहिण्याच्या कामात तरबेज असलेला मनुष्य; कलमबहादूर. ३. (उप.) लोकांची गुप्त व निंद्य कृत्ये दुष्ट हेतूने पाहणारा. [सं.]
**चित्रचंद्रिका** स्त्री. चित्रपटात काम करणारी स्त्री : 'त्या सुप्रसिद्ध चित्रचंद्रिका आहेत ना !' – जॅकपॉट ११९.
**चित्रठसा** पु. चित्र असलेला छापण्याचा ठोकळा.
**चित्रण** न. रेखन; बारकाईने वर्णन करणे.
**चित्रण** न. कॅमेऱ्यातील चित्रपट्टीवर बाह्य देखाव्याची चित्रे घेणे : 'चित्रपटाच्या चित्रणासाठी मुंबईला जाण्याचा कार्यक्रम...' – विशा २.८०.
**चित्रदीप** पु. दृक्–शिक्षणाला उपयोगी पडणारे एक यांत्रिक साधन किंवा उपकरण. लहान लहान काचांवर काढलेली चित्रे व लिहिलेला मजकूर प्रखर प्रकाशाच्या झोतात पडद्यावर प्रक्षेपित करणारे साधन. इंग्रजीत त्याला मॅजिक लँटर्न असे म्हणतात. [सं.]
**चित्रदूरलेखन** न. (विअ.) दूर अंतरावर विद्युत्संदेशांनी चित्र पाठवण्याची तारायंत्रासारखी एक पद्धत. [सं.]
**चित्रन्यास** पु. १. चित्राप्रमाणे दृश्य, मांडणी. २. (स्था.) जमिनीत संगमरवरी दगडाचे विविधरंगी तुकडे बसवून केलेले जडावाचे काम. [सं.]
**चित्रपट** पु. १. अनेक हलती चित्रे असलेला पट; सिनेमा. २. चित्रे असलेले कापड; नकाशा. [सं.]
**चित्रपट्टिका** स्त्री. (शिक्षण.) व्यक्ती, वस्तू, आकृती इत्यादींच्या स्थिर छायाचित्रणाच्या आधारे तयार केलेली चित्रमालिका. एक प्रभावी शैक्षणिक दृक्साधन. [सं.]
**चित्रपारेषण** न. (विअ.) संदेशसंकेत पद्धतीने चित्र एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी पाठविणे. [सं.]
**चित्रबई** पु. मोर.
**चित्रबंध** पु. काव्यातील शब्दरचनेचा एक प्रकार : 'अर्धभ्रमक यासारखे चित्रबंध...' – सासंप्र ६६.
**चित्रबोध** पु. चित्रे पाहिल्यामुळे होणारे ज्ञान व अक्षर ओळख : 'चित्रबोधाच्या आधाराने रामापाशीच ती मुळाक्षरे शिकली...' – उअं ९२.
**चित्रभंगी** वि. एक किंवा तीन पाय पांढरे असलेला (घोडा). – अश्वप १.९८. हा अशुभ मानितात. पहा : **अरजल, अरजली, अरजेल**
**चित्रभानु–नू** पु. अग्नी.
**चित्रमणि–णी** पु. ठिपक्यांनी युक्त असे रत्न : 'नीलमणी हे कण सोन्याचे चित्रमणी तिकडे।' – टिक ४८. [सं.]
**चित्रमंदिर** न. चित्रपट तयार करतात किंवा प्रदर्शित करतात ती जागा, इमारत किंवा आवार : 'नाटकाच्या तालमीला हजर रहावयाचे त्या वेळी तो चित्रमंदिरात अडकलेला असतो.' – ननाना १४१. [सं.]
**चित्रमार्ग** पु. (वादन) दोन मात्रा या प्रमाणाचा ताल. [सं.]
**चित्रमूळ** स्त्री. एका वनस्पतीचे नाव.
**चित्रयुक्त शब्दसंग्रह** (शिक्षण.) अक्षर आणि त्या अक्षराचे बोधदर्शक चित्र एकाच ठिकाणी मुद्रित केलेल्या चित्रांचा संच; विद्यार्थ्यांना अक्षर ओळख सुलभतेने व्हावी म्हणून वापरावयाची चित्रदर्शिका.
**चित्रयोग** पु. मातीची चित्रे तयार करण्याची कला. [सं.]
**चित्ररथ** पु. मिरवणुकीतील सजवलेला देखाव्याचा गाडा.
**चित्ररूप, चित्ररमणीय** वि. (सास.) डोळ्यांपुढे हुबेहूब उभे करणारे; दर्शनीय; चित्राप्रमाणे सुंदर. [सं.]
**चित्ररेखा** स्त्री. १. चित्राची रूपरेषा, बाह्यरेषा, आराखडा. २. एका सुं

स्त्रीचे नाव; उषेची दासी. ३. चित्रासारखी जिची रूपरेषा आहे अशी सुंदर स्त्री. [सं.]

**चित्रलिपि-पी** स्त्री. (सास.) अक्षराऐवजी चित्रांमधून आशय व्यक्त करणारी लिपी. 'कानजी ही चित्रलिपी सर्वांत अवघड आहे.' – जाजपू १५१. [सं.]

**चित्रलेखन** न. चित्रे काढण्याची कला; चित्रे काढणे : 'कृषिकर्मशास्त्र किंवा चित्रलेखन हे विषय घेऊन जे परीक्षा देतील त्यांसच नोकरीस लायक समजलें जाईल.' – रशामू १. [सं.]

**चित्रलेखसृष्टि-ष्टी** स्त्री. चित्रकाराची सृष्टी; चित्रसृष्टी. [सं.]

**चित्रलेप** पु. १. गोपीचंदन अथवा गंधगोळ्या यांची केलेली मूर्ती : 'तांब्याचे देव चित्रलेपे।' – दास १९.५.१. २. तसबीर; भिंतीवर काढलेली चित्रे : 'तटस्त जैसी चित्रलेपे।' – वेसीस्व ५.७. [सं.]

**चित्रवज्रतुंड** न. एक रत्न. [सं.]

**चित्रविचित्र** वि. चमत्कारिक; निरनिराळ्या रंगांचे; आश्चर्यकारक; नानाविध. [सं.]

**चित्रविथि-थी** स्त्री. चित्रदालन; कलाकृतींचे प्रदर्शन करण्यासाठी असलेले विशिष्ट दालन. [सं.]

**चित्रशब्दकोश** पु. (शिक्षण.) पूर्णतः किंवा बहुतांशाने शब्दार्थबोधक चित्रे समाविष्ट केलेला शब्दकोश. [सं.]

**चित्रशाळा** स्त्री. चित्रसंग्रहाचा दिवाणखाना; कलादालन. [सं.]

**चित्रस्तीत** वि. तटस्थ, स्तब्ध : 'इंद्रिय चित्रस्तीते : जाली गात्रे स्तीतमंते' – ऋव ३९६.

**चित्रा** स्त्री. सत्तावीस नक्षत्रांपैकी चवदावे नक्षत्र. [सं.]

**चित्रा** वि. ठिपक्यांचा. [सं. चित्रक]

**चित्राचे ऊन** चित्रा हे पर्जन्यनक्षत्र असताना पडणारे ऊन. हे रुक्ष व कडक असते. उंची वस्त्रे या उन्हात तापवली तर त्यांना कसर लागत नाही, हरिणांच्या पाठी ह्या उन्हाने काळ्या होतात. [सं.]

**चित्राचे बाहुले** बाहुल्याप्रमाणे वागविता येणारा आश्रित मनुष्य.

**चित्रान्न** न. प्रसंग विशेषी डाळ टाकून केला जाणारा एक प्रकारचा फोडणीचा भात. [सं.]

**चित्राबाहाडा** वि. रंगीबेरंगी.

**चित्रालंकार** पु. साहित्यशास्त्रातील एका अलंकाराचे नाव. याचे दोन प्रकार आहेत. १. प्रश्नातच उत्तर अंतर्भूत असते तो. २. दोन किंवा अधिक प्रश्नांना एकच उत्तर असते तेव्हा होतो तो.

**चित्राव(हु)ती; चित्रावली-थी, चित्राधी** स्त्री. अव. भोजनारंभी ब्राह्मण पानाच्या बाहेर उजव्या बाजूस देवतांना उद्देशून जे घास ठेवतात ते. त्यांची संख्या संप्रदायपरत्वे दोन ते पाचपर्यंत असते : 'पानाभोवती चित्राहुती घातल्या' – एस्पृडा ८. [सं.]

**चित्राविणे** पहा : **चितरणे** [सं. चित्र]

**चित्रासारखा** वि. (ल.) स्तब्ध; मूक; निश्चल.

**चित्रांकन** न. १. चित्र काढणे; रेखाटणे; उदाहरणादाखल किंवा स्पष्टीकरणार्थ काढलेली चित्रे, रेखाटने इ. २. एखादा प्रसंग किंवा दृश्य शब्दांच्या सहाय्याने हुबेहूब उभे करणे.

**चित्रिक** पहा : **चित्रक** : 'जैसा चित्रिकु आपुलां करीं। चित्र काढी जाता कुसिरीं।' – क्रिपु २२.

**चित्रिणी** स्त्री. शृंगारशास्त्रानुसार ठरविलेल्या स्त्रियांच्या चार (पद्मिनी, चित्रिणी, हस्तिनी, शंखिनी इ.) वर्गांपैकी एक. नानाविध कलागुणांनी युक्त स्त्री. [सं.]

**चित्रिणे** सक्रि. शब्दांनी वर्णन करणे : 'सुशीलेच्या व्यक्तिमत्वातल्याच सहजतेच्या आधाराने – हा सर्व प्रसंग चित्रिला जातो.' – जास्वंद १८.

**चित्रित** वि. १. रेखाटलेले; चित्रांनी युक्त; चितारलेले; चित्रांकित केलेले; ज्यावर चित्रे काढली आहेत असा. २. स्तंभित; दिङ्मूढ; आश्चर्याने थक, चकित झालेला. [सं.]

**चित्रीकरण** न. चित्रपटातील दृश्ये कॅमेऱ्यातून चित्रपट्टीवर उमटविण्याची क्रिया; पद्धती. देखाव्यांचे चित्रपट्टीवरील चित्रण : 'चित्रीकरण पहायला आलो आणि आता सिनेमात आपण काम करणार.' – अक्षर ८३. [सं.]

**चि(ची)त्रीव** वि. १. चित्रांतील; चित्रात काढलेले; चितारलेले : 'जाण पोकळीचे पेडवळे। अगा चित्रीव फळें। वीर हे देखें।' – ज्ञा ११.४६४. २. चित्रित; रंगीत; नक्षीदार : 'हातीं चित्रीव काठी होती :' – लीचपू २०५.

**चित्रींचा लेख** १. भिंतीवर काढलेले चित्र. २. (ल.) देखण्या मनुष्यास व प्राण्यास म्हणतात; सुंदरी; सुंदर स्त्री.

**चित्रोपम** वि. चित्रासारखे.

पु. (तत्त्व.) आत्मा हाच अंतिम अथवा प्राथमिक सत्य आहे असे सांगणारे तत्त्वज्ञान. [सं.]

**चित्सागर** पु. ज्ञानसिंधू; ज्ञानरूपी समुद्र. [सं.]

**चित्साक्षी, चित्स्वरूप** पु. ईश्वर. [सं.]

**चित्सुख** न. चित्मध्ये असणारे सुख; ज्ञानमय आनंद, चिद्रूपी सुख. वि. ज्याचे चित् हेच सुख आहे तो; ज्ञानमय आनंदाचा भोक्ता.

**चित्सूर्य** पु. ज्ञानरूपी सूर्य; ज्ञान हाच सूर्य.

**चित्स्वरूप** वि. ज्ञानरूप; ज्ञान हेच ज्याचे रूप तो (ईश्वर).

**चिथ(था)ड** पहा : **चितड**

**चिथडा-डी** पु. चिंधी; फडका; रगटे; सुडके; चिरगूट; फाटलेला कपडा; ठिगळ. [हिं.]

**चिथडा** पु. माणसाच्या, जनावराच्या अंगावरील तीळ, मस, डाग; फळावरील डाग. [हिं.चिथ्रा]

**चिथडे** न. पातळ साल, सालपट, टरफल, पापुद्रा.

**चिथणे** अक्रि. चिडणे; रागावणे; कावणे.

**चिथ(था)वणी** स्त्री. १. (वाईट गोष्ट करायला दुसऱ्याला दिलेले) प्रोत्साहन; उत्तेजन. २. (एखाद्याच्या विरुद्ध दुसऱ्यास दिलेली) उठावणी. ३. चिडविणे; संतापविणे. भडकवणे : 'बौद्धांची चिथावणी होती.' – एवाका २७. (क्रि. देणे)

**चिदचिद्ग्रंथि-थी** स्त्री. चैतन्य व जड देह यांची गाठ, भेट; जड व चैतन्य यांचा परस्पराध्यास : 'जीव नाशे शिवपणेंसी। चिदचिद्ग्रंथीसी अहंकारू।' – एभा २०.३७८. [सं.]

**चिदरने** क्रि. १. फुशारकी मारणे. २. चिडणे.

**चिदंबर** न. १. चैतन्यरूप आकाश; चिदाकाश : 'कां प्रतीतिपार्खी चिदंबरा। गोसाविया नोहावें।' – ज्ञा ७.१५४. २. चिद्रूप, चैतन्यरूप वस्त्र. [सं.]

**चिदात्मा** पु. १. परमात्मा. २. विचारशक्ती.

**चिदानंद** पु. ज्ञानमय आनंद; ब्रह्मानंद. [सं.]
**चिदाभास** प. (प्राण्याचे) सचेतन तत्त्व; ज्ञानाभास; चैतन्याचा आभास; जीव. [सं.]
**चिद्घन** वि. चैतन्यमय, ज्ञानमय (ईश्वर). [सं.]
**चिद्द्रव्य** न. (तर्क.) आकलन, स्मरण, निर्णय, इच्छा किंवा तर्क या गोष्टी करण्याची क्षमता असलेली शक्ती अथवा शक्तिसमुदाय. मानवामधील बौद्धिक किंवा तार्किक इंद्रियशक्ती.
**चिद्रु(द्रू)प** वि. चैतन्यरूपी, शुद्धज्ञानस्वरूपी (ईश्वर) : 'तो साक्षी चिद्रुप। कर्मप्रवृत्तीचा संकल्पु।'– ज्ञा १८.४५७. [सं.]
**चिद्वाद** पु. १. (तत्त्व.) अंतिम सत्ता ही मायावी सत्याच्या पलीकडे असते अथवा कोणत्याही वस्तूचे सारतत्त्व तिच्या संबंधी आपल्याला होणाऱ्या आकलनात अनुस्यूत असते असे प्रतिपादन करणारा तत्त्वज्ञानातील सिद्धांत, मत. २. (सास.) वस्तुजात हे चित्तत्त्वाचा आविष्कार आहे असे प्रतिपादणारी विचारसरणी. [सं.]
**चिद्वादी** पु. (तत्त्व.) एकतर मायावी सत्यापलीकडील वस्तूच फक्त सत्य असतात किंवा कोणत्याही वस्तूचे सारतत्त्व तिच्या आपल्याला होणाऱ्या आकलनाच्या अथवा बुद्धिगम्यतेच्या व्यतिरिक्त काही नसते असे मानणारी व्यक्ती.
**चिद्विलासवाद** पु. बद्ध किंवा मुक्त अशी कोणत्याही तऱ्हेची सापेक्ष जाणीव ज्ञानाच्या ठिकाणी न राहणे हे तत्त्वज्ञान.
**चिद्वृत्ति–त्ती** स्त्री. १. चैतन्यस्वरूप वृत्ती असणे. २. माया; आदिप्रकृती : 'तेथ चिद्वृत्ती पहिलें। महतत्त्व उमललें। तें पान वाल्हेंदुल्हें। एक निघे।'– ज्ञा १५.९४. [सं.]
न. (सास.) चित्तत्त्वाचा आविष्कार. [सं.]
**चिन** न. चिन्ह; खूण : 'सीताबाई लळे झाडाझाडाले पाहून। मारोती बरमचारी चिन पाहे वरतून।।'– लोसाको.
**चिन(ना)ई** वि. चीनदेशाचा; चीनदेशासंबंधी; चिनी.
**चिनका–क्या** वि. चिडखोर; रागीट; तामसी. पहा : **चिणका**
**चिनका–गा** वि. लहानगा; छोटा; चिमुकला (मुलगा). [क. चिन्न]
**चिनका, चिनकारा, चिनकारणे** पहा : **चिणका, चिणकारा, चिणकारणे**
**चिनकाविणे** सक्रि. १. चिडविणे; चेतविणे; खिजविणे; डिवचणे; टोचणे. २. इशारा, खूण करणे.
**चिनकु(गु)ला** वि. छोटा; लहानसा; चिमुकला; चिमणा. पहा : **चिणकुला** [क. चिन्न]
**चिनख** स्त्री. चिंता; काळजी. (व.)
**चिनगवने** सक्रि. भडकवणे. (अहि.)
**चिनगारी** स्त्री. ठिणगी; तेज : 'कृतार्थ जीवनाच्या स्मृतीची चिनगारीहि होती.'– डाली ४२.
**चिनगी** स्त्री. ठिणगी. (अहि.) [ध्व.]
**चिनचिनी, चीनचीनी** स्त्री. १. रातकिडा; रात्री चिनचिन असे ओरडणारा किडा; रात्र : 'निजो नेदी सकाळवेळीं । राती काळीं चिनचिनी ।'– तुगा २२८७. २. (ल.) कटकट. [ध्व.]
**चिनट** न. चिनीमातीचे वैशिष्ट्यपूर्ण भांडे : 'काचसामान घ्यावयाचे तर चिनटपासून...उत्तमोत्तम माल...'– अशिदि २०.
**चिन(ल)ट** न. डास; मच्छर इत्यादी.
**चिनणे** सक्रि. चहूकडून घेरणे, लहान जागेत बंदिस्त करणे, भिंतीत चिनणे : 'जैसा येकादा पारधी वनांतु । भोवतेआ वागुरा चिनितु ।'– क्रिपु ७४२. पहा : **चिणणे** [सं.चि.]
**चिनपाट** पु. टमरेल; पत्र्याचा डबा : 'तवलीचा कचकोल किंवा रिकामा चिनपाट त्याला पुरे.'– बलुतं ६.
**चिनभिन होणे** काही न सुचणे; चक्रावणे : 'दोन दिस रडून रडून त्येचं डोसकं चिनभिन झालंय...'– गोतावळा ५९.
**चिनमुला** वि. लहान; छोटा; सुरेख.
**चिनवल** जकात महसूल.
**चिना–नॉ** स्त्री. एक प्रकारचे फळ; चिनी; एक कंद. (कु.)
**चिनाई** पु. जमिनीवरील एक पक्षी; यास गिनी असेही म्हणतात.
**चिनाटी** वि. लहानसा पण सुंदर; नीटनेटका. [क. चिन्न]
**चिनान** क्रिवि. जोरात : 'अप्पा लवंड...तट्ट्याची बैलगाडी चिनान पळवीत येऊन दाखल झाला.'– मिरास २८७.
**चि(चे)नापटणी** वि. मद्राससंबंधी; मद्रासचा; मद्रासकडील.
**चिना बेटींग** एक प्रकारचा जुगार : 'चिना बेटींग' हा खेळ खेळायला तर एक आणाही पुरे.'– बलुतं ६. [इं.]
**चिनार** स्त्री. १. चेरी. (गो.) २. काश्मिरातील एक वृक्ष.
**चिनांसुक** न. तलम रेशमी वस्त्र : 'पाय धुनि दाटिले चिनांसुकें'– एरुस्व ५०.३९५. [सं.]
**चिनिमारो** वि. लहानसा, चिमुकला. (कु.) [क. चिन्न]
**चिनी** वि. लहानसा. [का. चिन्नी = लहान मुलगी]
**चिनी–ने** स्त्री. कोनफळाची एक जात; चिनी कोनफळ, चिनी कोनफळाचा वेल, मूळकंद.
**चिनी** स्त्री. चूक; खिळा; मेख.
**चिनी** स्त्री. १. ज्याने पत्रा तोडतात तो लोखंडी जाड खिळा; छिनी. २. भांड्यावर नाव घालण्याचे हत्यार. [सं. छिद्र]
**चिनी** स्त्री. मेंदीची एक जात.
**चिनी** स्त्री. (विटीदांडूच्या खेळातील) विटी. [क. चिन्नी]
**चिनी** स्त्री. (धोतराची) चुणी. (व.)
**चि(ची)नी, चिनी साखर** स्त्री. १. एक प्रकारची पांढरी पिठीसाखर. २. साखरेचा एक प्रकार. [हिं.]
**चिनी कापूर** कापराची पांढरी जात (चीन देशातून हा कापूर येतो असा समज आहे).
**चिनी माती** स्त्री. चिकण मातीचा एक प्रकार. ही शुभ्र पांढरी असते. हिचीच चिनी भांडी (पेले, बशा, चहादाण्या इत्यादी) करतात; शाडू : 'अन् सलते ही माझ्या चित्तीं । 'आज-काल'ची जणु चिनिमाती।'– मर्ढेक ५२.
**चिनी रेशीम** चीन देशातील रेशीम; हलक्या जातीचे रेशीम.
**चिनुक(ग)ल, चिमुला** वि. चिमुकला; इवलासा; छोटा. [क.चिन्न]

**चिनूक** पु.(भू.) रॉकी पर्वताच्या उतरणीवरून सखल भागाकडे वाहणारे गरम वारे.

**चिनोरा** वि. लहान पण सुंदर; चिमुकले (मूल, पिलू, वस्तू इत्यादी). [क. चिन्न]

**चिन्नादाणी–नी** वि. चुणचुणीत आणि हुशार (मुलगा); चलाख; हजरजबाबी (पोर, मूल).

**चिन्ने** न. रताळे. (बे.)

**चिन्मय, चिन्मात्र** वि. १. शुद्ध ज्ञानस्वरूपी; चैतन्यरूप; शुद्ध ज्ञानमय (असा ईश्वर, ब्रह्म). २. शुद्ध ज्ञानाने, बुद्धीने युक्त : 'रक्त श्वेत कृष्ण पीत प्रभा भिन्न। चिन्मय अंजन सुदलें डोळां।'– तुगा ४०३६.३. चिन्मय; चैतन्यरूप असे. [सं.]

**चिन्ह** न. १. मनुष्य, वस्तू, पदार्थ ओळखण्याची खूण; निशाणी. उदा. मस, तीळ, डाग, ठिपके इत्यादी. २. (साहचर्य, समानाधिकरण इत्यादी नियमांमुळे कोणा एका गोष्टीचे, गुणादिकांचे) ज्ञापक; गमक; अभिज्ञान; व्यंजन. उदा. क्रॉस, स्वस्तिक, बिल्ला, संप्रदाय, द्योतक, वेष इत्यादी. ३. (गणितशास्त्र, रसायनशास्त्र) पारिभाषिक सांकेतिक खुणा. उदा. अधिक (+); उणे (–); गुणिले (×); भागिले (÷) इत्यादी. ४. (लाकडाच्या फळीने, बंदुकीच्या बाराने दिली जाणारी) सूचना. ५. अवलक्षण; लोकविलक्षण कृती; चाळा; खोडी. ६. अवलक्षणी; विचित्र, खोडकर, द्वाड, लोकविलक्षण असा मनुष्य, मूल. ७. ज्ञापक अगर गमक गोष्ट, वस्तू; रोगाचे बाह्यलक्षण. उदा. पिवळे डोळे, काटेरी जीभ इत्यादी : 'नाना रोगांची परीक्षा। नाना चिन्हांची परीक्षा। हें ज्ञान नव्हे।'– दास ५.५.१५. [सं.]

**चिन्हणे** सक्रि. ओळख पटविणारी खूण करणे; 'ऐसा चिन्ही चिन्हतु। देखसी तो चि मुगतु – ज्ञा ३.७४. [सं. चिह्न]

**चिन्हाचिन्ह** न. मुद्रा, टिळे, पताका इ. : 'चिन्हाचिन्ह अपार झाले होते'– लीचउ ४५४. [सं.]

**चिन्हांकन** न. १. (ग्रंथ.) वर्गीकरणात वापरलेल्या सांकेतिक खुणा. २. खुणा करणे.

**चिन्हांकनपद्धति–ती** स्त्री. (ग्रंथ.) वर्गीकरणाची सांकेतिक पद्धती.

**चिन्हित** वि. खूण केलेला; डाग, ठिपका असलेला; आकृती काढलेला; ज्यावर चिन्ह आहे असा. [सं.]

**चिन्हित धनादेश** (वाणिज्य.) आडव्या किंवा उभ्या रेषा मारलेला धनादेश. अशा धनादेशाची रक्कम त्यावर निर्देशित केलेल्या व्यक्तीच्या, संस्थेच्या खात्यातच भरली जाते.

**चिप** पहा : **चीप**

**चि(ची)प** क्रिवि. चूप; गप्प; काही न बोलता; हूं का चूं न करता; अगदी स्तब्ध : 'काय स्तनार्थिशिशुच्या शब्द उचित सांत्वनी पडे चिप हा।'– मोउद्यो १०.६३.

**चिपकणे** अक्रि. चिकटणे : 'चिपकून बसल्यावनी म्हशीच्या पाठीवर बसून राहिला.'– वाळवण १३१.

**चिपका** वि. (वर्णविपर्यासाने झालेले पिचका या शब्दाचे रूप). १. अर्धवट मिटलेला; चिपड्या; मंद तेजाचा; ज्यातून पाणी गळते आहे असा (डोळा). २. पिचक्या डोळ्याचा (मनुष्य).

**चिपकी** स्त्री. चिमूट; चिमटी (तपकीर इ.ची).

**चिपकुरा** पु. अळू; एक प्रकारची पालेभाजी. पहा : **चमकुरा**

**चिपचिपणे** पहा : **चपचपणे, चवचवणे इत्यादी**

**चिपचिपीत** पहा : **चबचबीत** : 'आंघोळ करायची आणि...चिपचिपीत अंग पुसायचे...'– मकथा ६०.

**चिपट–ड** न. १. द्विदल धान्याची सालपटासह असलेली डाळिंबी. २. डाळीवर राहिलेले फोलकट; डोळ. ३. पोकळ, न भरलेला दाणा. [सं. चिपट]

**चिपट–ड, चिपटचिपट** न. १. प्रभातकाल; अरुणोदय. २. संध्याकाळी; संधिप्रकाश. (क्रि. पडणे.)

**चिपट** स्त्री. संध्येची पळी; आचमनी. (कर.)

**चिपट** पु. चोथा.

**चिपटा** पु. (कुस्ती) एक डाव. एका पटाऐवजी दोन्ही पट उपसणे.

**चिपटी** स्त्री. १. रस काढून घेतलेला, पिळलेला ऊस; उसाचे चिपाड. २. खायला न मिळाल्यामुळे, आजारामुळे वळलेली पोटाची खपाटी, दामटी; रोडावलेले शरीर, पोट इत्यादी. ३. झाडाची बारीक फांदी; फोक; शिपटी; शिमटी. [सं. चिपिट्]

**चिपटे** न. पावशेराचे जुने माप : 'शेवट बारीला बळहो सात चिपटी बेतल.'– एहोरा १३७. [क. चिट्टे]

**चिपड–डा** न. डोळ्याला येणारा चिकट पांढरा मळ, मळाचा तंतू; तुकडा : 'डोळा निघतीं चिपडें । नाकीं दाटलीं मेकडे ।'– दास ३.१.२१. वि. चिपडलेल्या डोळ्याचा; मिचमिच्या डोळ्याचा (मनुष्य). [सं. चिपिट्]

**चिप(पा)ड, चिप(पा)डचिप(पा)ड** वि. अंधुक अंधुक; अस्पष्ट दिसणारे; भुरकट दिसणारे.

**चिपडणे** अक्रि. (डोळ्यांना) चिकटा, चिपड येणे; चिकट्याने डोळे चिकटणे.

**चिपडा** पु. एक जाड मध्यम भात.

**चिपडी** स्त्री. डोळ्याचे पाते लवण्यास लागणारा काळ; क्षणार्ध; निमिष. [सं. चप्]

**चिपडी** स्त्री. १. एक गवत. २. चकलीचा साचा.

**चिपणे** सक्रि. चेपणे; दाबणे; मिटणे. या रूपात या क्रियापदाचे जुळविणे, एकमेकांजवळ आणणे, एकमेकांशी जोडणे, संलग्न होणे इत्यादी अर्थ होतात. उदा. पाय चिपणे – (उडी मारताना) पाय एकमेकांशी जोडणे, जुळविणे. फासे चिपणे – (दान टाकताना) इष्ट त्या दानाचे फासे जुळविणे. डोळे चिपणे – चिपडाने डोळे चिकटणे. डोळे चिपणे, हाताने चिपणे – (खुणविताना, सूचना करताना) डोळे मिटून, मिचकावून, नाकावर बोट ठेवून, हात दाबून खुणावणे. तोंड चिपणे – (तापात) ओठ एकमेकांना चिकटणे. [सं. चप्]

**चिपतळ–ळा, चिपताळा** वि. बसकट; थबकट; चपटा.

**चिपनळी** स्त्री. १. पिचकारी; पाण्याची धार जोराने दूर उडवण्याकरिता केलेले नळीच्या आकाराचे एक यंत्र. २. सळईच्या आकाराचे एक वैद्यकीय हत्यार. (क्रि. मारणे.)

**चिपरी** स्त्री. चिळकांडी, पिचकारी : 'एखादी मोटार पाण्याच्या चिपऱ्या उडवीत भरधावत चालली.' - नागीण ६०. पहा : **चिपळी**

**चिपला-चिपली** स्त्री. पिचकारी : 'सेनाधुरंधरास मूत्रकृच्छामुळें प्राणांतिक श्रम जाले. सेवट बाह्योपचार इंद्रियद्वारा कवायाची चिपली (काढ्याची पिचकारी) मोठ्या प्रयासें करून केली, तेव्हां होत होत (हळूहळू) मूत्र मोकळे जाले.' - ऐको ३८०.

**चिपली** स्त्री. एक प्रकारची पिवळट माती.

**चिप(पु-पो)ळी** स्त्री. १. पिचकारी. फवारा. २. सळईसारखे वैद्यकीय शस्त्र; कापसाची वात. ३. ओघळ; ओहोळ. ४. पाण्याची चिळकांडी : 'धारा धबाबे खळाळ। चिपळ्या चळक्या भळाळ।' - दास ११.७.४. ५. मांड्यांची पकड. [सं. चप्]

**चिपळी** स्त्री. ताल धरण्याचे एक लाकडी साधन, वाद्य. भजन, कीर्तन इत्यादिकांच्या वेळी ताल धरताना वापरतात. [सं. चप्]

**चिपळी** स्त्री. पावसाची सर. (कर.) [ध्व.]

**चिपाट-ड** न. १. उसातील रस पिळून काढल्यावर राहिलेला शुष्क भाग; कडब्याची फोलकटे, वाळलेली ताटे : 'उंसाचीं चिपाडें सांडुनी। जैसा रस घेईल गाळूनी' - विसिंउ ६.६७. २. (ल.) पोट खपाटी गेलेला, दुबळा झालेला मनुष्य. ३. डोळ्यातील चिकट मलांश, चिपडा, गू; डोळ्यातील चिपड्याचा तंतू अथवा थोडासा भाग. [सं. चिपिट]

**चिपाड्या** वि. गुऱ्हाळातील चिपाडांची वारावार करणारा.

**चिपारी** स्त्री. एक विशिष्ट वनस्पती.

**चिपारी** स्त्री. खडकातील, डोंगरातील भेग, कपार, खबदड : 'खिडीच्या चिपारींतून सारखे पाण्याचे प्रवाह वाहत होते.' - स्वप २८.

**चिपारी** स्त्री. चांभाराची बारीक आरी.

**चिपिटास्थि-स्थी** स्त्री. चापट हाड. [सं.]

**चिपी उडी** पाय जुळवून मारलेली उडी.

**चिपुटचिंगळी** स्त्री. चिटपाखरू; याचा प्राय: अकरणरूपी प्रयोग करतात.

**चि(ची)पुळी** स्त्री. १. चुटकी : 'मोटकें दादोसाकडिल विचारीति : आणि गोसावी चिपूळी वाति :' - लीचउ १.१. २. पिचकारी [सं.]

**चिपोटा** पु. लाकडातील अथवा दगडातील भेग, छिद्र; पोकळी बुजवण्यासाठी वापरलेला लाकडाचा तुकडा, चीप, कपची इ. [सं. चिपीट] (वा.) **(अंगाचा, शरीराचा, पोटाचा) चिपोटा होणे** - अंग, शरीर, पोट आजाराने, अशक्तपणाने, खायला न मिळाल्याने सपाट, कृश होणे.

**चिपोटी** स्त्री. वरून व खालून दाब देऊन बांधून काढलेली गठडी, गाठोडे. [सं. चिपिट]

**चिपोरा** पु. (दगडाचा, सुपारीचा) बारीक तुकडा; बारीक खंड : 'चंचीतला सुपारीचा चिपोरा काढला.' - वानगी १४४. (व.)

**चिपोळी** स्त्री. १. दगडाची, लाकडाची लहान चीप, कपची, धलपी. २. कथेकरी, भजनकरी यांच्या हातातील चिपळ्यांपैकी प्रत्येक.

**चिपोळी** स्त्री. मडक्याची खापरी.

**चिप्प** वि. ओले चिंब; संपूर्ण; चपचपीत : 'तेलाने चिप्प भिजलेला झगा...' - सामा २०१.

**चिप्प** क्रिवि. शांत; गप्प; चूप; स्तब्ध; गपचीप.

**चिबचिब-बा** क्रिवि. पावसाची रिपरिप, पाण्याचे थेंब टपकणे इत्यादिकांच्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन. [ध्व.]

**चिबचिब** स्त्री. १. (कपडे इत्यादिकांचा) ओलेचिंबपणा; चिबचिबीतपणा. २. (रस्त्याची) चिडचिड; चिगचिग. ३. (जमिनीचा) दलदलीतपणा; निसरडेपणा; दलदल.

**चिबचिबणे** अक्रि. १. (कपडे इत्यादी) ओले चिंब भिजणे; पाण्याने थबथबणे. २. (जमीन) निसरडी, बुळबुळीत होणे, चिखलाने युक्त होणे; चिडचिडीत होणे; रेंदाडणे.

**चिबचिबित** वि. १. ओलेचिंब; पाण्याने थबथबलेले; ज्यातून पाण्याचे थेंब टपकत आहेत असे. २. चिडचिडीत; चिखलाची; दलदलीत; निसरडी; रेंदाड (जमीन).

**चिबटणे** क्रि. दाबणे, आवळणे.

**चिब(बो)ड** वि. दलदल; पाणथळ; झिलाण (जमीन) : 'ते चिबडीचं रान तेवढं तुझ्या वाटणीला...' - पेरणी १४६.

**चिबडीण** स्त्री. चिबुडांची वेल; शेंदाडाची वेल. (राजा.)

**चिबणे, चिंबळणे** क्रि. दाबणे, चिरणे.

**चिबलणे** सक्रि. चिवडणे : 'खुंटीवरची सोल काढून चिबलीत बसला.' - मळणी.

**चिबल्ले** वि. वाह्यात; खोडकर; द्वाड. (खा.) [हिं. चिबिल, चिबिल्ला]

**चिबळ** पु. धान्य खाणारा एक पक्षी.

**चिबुक** पु. १. हनुवटी. २. (नृत्य) हनुवटीचे अभिनय. हे ओठ, जीभ व दात यांच्या साहाय्याने करतात. हे सात प्रकारचे आहेत. [सं.]

**चिबूड, चिबडे** न. शेंदाड; वाळूक : 'चिबडें तउसीं विनोद...तें कोठां मेळतीं।।' - क्रिपु २१.०३. [सं.चिर्भिट]

**चिभ(भू)ट-ड** स्त्री. शेंदाडाची, चिबुडाची वेल.
न. १. शेंदाड; चिबूड; वाळूक; राजापुराकडे यालाच चिभाड, चिबुड म्हणतात. काही प्रांतात फूट असेही म्हणतात : 'हागतां चिभाडे वाळुकें खातु असे.' - पंचतंत्र १.२६. २. पूर्णपणे वाढ होण्यापूर्वी पिवळा पडलेला आंबा. [सं. चिर्भिट]

**चिभाड** स्त्री. पाणी धरून ठेवणारी जमीन.

**चिभावनी** स्त्री. वाकुली; वेडावून दाखवणे. (व.)

**चिम** न. पोल; फोलकट; पोचट भात. (कु.)

**चिमकचारी** वि. कंजूष.

**चिमकणे** सक्रि. (मिचकणे याचे वर्णविपर्यासाने झालेले रूप). (डोळ्याने) खूण, इशारा, संकेत करणे.

**चिमकी** स्त्री. चोयटी : 'नारी तू नटलीस तू का उसाच्या चिमकीला। पित्या माज्या दौलतीचं आंबं लोळती जिमिनीला।' - लोसाको.

**चिमकु(को)रा** पु. (अंगाला घेतलेला) चिमटा; (अंगावर नखांनी काढलेला) विचकुरा, ओरखडा : 'ती चिडली आणि चिमकुरे काढण्यासाठी अबदुलचा पाय शोधू लागली.' - गागो ८८. [क. चिमटु]

**चिमकुरादळ** पु. एक प्रकारच्या अळवाची भाजी. पहा : **चमकुरा, चमकु (को)रा** : 'चिमकुरादळ चिरुनि चांगली चमचमीत फोडणी देउनि चरारित।' - अमृत ३४.

**चिमकुला** वि. लहानसा; चिमणासा; छोटा; न्हानुला. [क. चिन्न]
**चिमखडा** पु. १. (कामटीवरून बोटाच्या जोराने फेकायचा) लहान खडा. २. (ल.) चलाख, चुणचुणीत, चाणाक्ष मुलगा. ३. रस्त्याच्या बाजूची दगडांची रास; रस्त्यावर आल्यागेल्या लोकांनी एक एक दगड टाकल्यामुळे जमलेला दगडांचा ढीग. पहा : **चिमणखडा**
**चिमखु(खो)रा, चिमकु(को)रा, चिमको(खो)डा** पु. एक पालेभाजी; अळू. पहा : **चमकोरा**
**चिमचिम** क्रिवि. त्रस्त : 'दुपारचं उन्ह चिमचिम करत होतं.' – राकाधाका ४५.
**चिमचिमणे** सक्रि. कुजबुजणे; निंदणे : 'चटक चांदण्या मज चिमचिमती। तारे तरुणे दर्पण गणति।' – बाल. [ध्व.]
**चिमचिमणे** अक्रि. झोंबणे; चावणे; दुखणे.
**चिमट–टी** स्त्री. (अंगाला घेतलेला) चिमटा; चिमखुरा. [सं. मुचुटी]
**चिमट** स्त्री. चिमूट; चुटकी; हाताचा अंगठा आणि पुढले बोट यांच्या जुळणीने घेतलेल्या पदार्थाचे परिमाण; आंगठा व तर्जनी यांची जुळणी: 'उजव्या हाताची चिमट पुढं करून ते म्हणू लागले...' – व्यंमाक ४६.
**चिमट** स्त्री. स्पर्श केला असता जिची पाने मिटतात अशी लाजाळूसारखी वनस्पती.
**चिमट** पहा : **चिंबट**
**चिमटणे** अक्रि.१. चिमटा घेणे; दाबणे; चिमटीत धरून आवळणे. २. चेंगरणे; चिरडणे; चेपणे; चिंबटणे. ३. आकसणे; संकोच पावणे; संकुचित होणे; सुरकुत्या पडणे.
**चिमटा** वि. कपाळावर दोन भोवरे असलेला (घोडा).
**चिमटा** पु. ताल धरण्यासाठी वापरण्यात येणारे दोन पात्यांचे लोखंडी हत्यार; वाद्य; साधन : 'एक पेटी, एक ढोलकं, एक चिमटा... हा भजनी मंडळीचा जामानिमा.' – रामन २३.
**चिमटा** पु. १. हाताचा आंगठा व तर्जनी यांची पकड; चिमखुरा; विचकुरा. २. पदार्थ, वस्तू घट्ट धरण्याकरिता, पिळवटण्याकरिता, उचलण्याकरिता, उपटण्याकरिता केलेले सोनार इ.चे हत्यार. ३. (ल.) एकमेकांना मिळणाऱ्या (परस्परांशी लघुकोन करणाऱ्या) दोन नद्यांमधील, दोन रस्त्यांमधील जमिनीचा त्रिकोणाकृती चिंचोळा भाग. ४.(ल.) इकडे आड तिकडे विहीर अशा प्रकारची पेचाची, अडचणीची, संकटाची स्थिति. ५. (चिमट्याने केस इत्यादी) उपटणे. [हिं.; क. चिम्मु] (वा.) ० **घेणे** – एखाद्याला झोंबेल, बोचेल असे बोलणे, तशी कृती करणे. ० **धरणे** – न्हाव्याकडून चिमटा करवून, केस उपटून घेणे. **चिमट्यात धरणे** – पेचात धरणे; अडचणीत आणणे. **चिमट्यात सापडणे** – अडचणीत, पेचात पडणे, धरले जाणे.
**चिमटागुडघा** पु. मिंधेपणा; पेच; अडचण : 'तुम्हास कोणाचा चिमटागुडघा असल्यास दिक्कत घेऊन लांबणीवर पडल्यास तुम्हास वाईट आहे.' – ऐसेसा २.१७.
**चिमटा वळण** (स्था.) घाटाच्या रस्त्यावरील १८०अंशातून दिशा बदलणारे अवघड वळण.
**चिमटी** स्त्री. चिमट (तपकीर इ.ची). (वा). ० **घालविणे** – एखाद्याला मारण्यासाठी मंत्रप्रयोग करणे.० **टाकणे** – कीटकांचे विष उतरविण्यासाठी मंत्र घालणे. ० **लावणे** – युक्तिप्रयुक्तीने कोणा एकाला वश करणे.
**चिमटी** स्त्री. डोंगरावर पसरणारे एक काटेरी झुडूप.
**चिमडी** स्त्री. (सांकेतिक) तलवार.
**चिमण–णा, चिमणसा** वि. लहान. चिमुकला; इवलासा; छोटासा; लहान पण सुरेख; लहान आकाराचा.
**चिमणखडा** पु. कामटीने, गलोलीने, धनुकलीने जोराने उडवायचा बारीक खडा. [क. चिम्मु = बोटाने उडवणे]
**चिमणचारा** पु. गवताची एक जात; हे गवत चिमण्यांना विशेष आवडते म्हणून याला हे नाव पडले असावे.
**चिमण(णा)चारा** पु. मुलांचा खाऊ.
**चिमणचिटके** न. प्रातःकाळची चिमण्यांची चिवचिव सुरू होण्याची वेळ.
**चिमणडोळ्या** वि. चिमणीच्या डोळ्यांप्रमाणे लहान, बारीक डोळे असलेला (मनुष्य).
**चिमणबाग** पु. स्त्री. लहानशी बाग : 'तिच्या (झाडीच्या) मध्यभागी एक लहानसा चिमणबाग असे.' – पाआव्ह ३७.
**चिमणसाळ** स्त्री. एक प्रकारचे भात.
**चिमणा** पु. चिमणी या पक्ष्यांतील नर.
**चिमणी** स्त्री. १.चिमण्यांतील मादी. हा पक्षी रानात न राहता मनुष्याने गजबजलेल्या वस्तीत राहतो. हा जगातील बहुतेक भागात आढळतो. ह्याची उपजीविका धान्य व किडे यांवर असते. २. लाकडाचे, मातीचे चिमणीचे चित्र. यातून शिटी वाजविता येते. ३. दोन वाटोळ्या खापऱ्यास चामडे मढवून केलेले खेळणे; कुडमुडे. ४. दारांची, खिडक्यांची तावदाने बंद करण्याच्या उपयोगी असलेले, काट्याभोवती फिरणारे चिमणीच्या आकाराचे लाकडी बोंड. ५. केळफुलातील फ़णीच्या दात्याच्या तळातील कोश. हा शुभ्र व अर्धवट पारदर्शक असतो. हा भाजीला निरुपयोगी असतो.[सं.स्यम] **चिमणीच्या दाताने फोडणे** – (सुपारीसारखा) खाद्य पदार्थ वस्त्रात गुंडाळून दातांनी फोडणे. असे केल्याने तो पदार्थ मुखरसदूषित, दुसऱ्या माणसाने खायला उष्टा होत नाही अशी (मुलांची) समजूत आहे. **चिमणीसारखे तोंड करणे** – (निराशेमुळे, दुःखामुळे, अपमानामुळे) मुद्रा, तोंड, चेहरा उतरणे; निस्तेज होणे; एवढेसे तोंड करणे : 'पण पहा तो कसे चिमणीसारखे तोंड करून बसला आहे.' – गुमं.
**चिमणी** स्त्री. १. (गिरण्यांतील, कारखान्यांतील) उंच धुराडे : 'पुण्याच्या आसपास शेंकडों चिमण्या उभ्या राहतील...' – लोटिकेले १.१६९. २. धारे (धूर बाहेर घालविण्यासाठी घराला असते ते). ३. रॉकेलच्या दिव्याच्या बर्नरवर ठेवण्याची काचेची नळी, फुगा इत्यादी. ४. तेल इत्यादी ओतण्यासाठी केलेले नरसाळे. ५. टिनच्या पत्र्याचा धुराडदिवा.५. रॉकेलवर चालणारा, समभुज असणारा, पत्र्याचा गोल छोटासा दिवा. [इं. चिम्नी]
**चिमणीची मुरकुंड** चिमण्यांच्या चित्रांनी (भिंत इ.वर) काढलेली, रंगवलेली वर्तुळाकृती. हीत चिमण्यांची तोंडे बाहेर असतात.

**चिमणीचे पोहे** एक प्रकारच्या गवताचे बी. हे चिमण्यांना फार आवडते. पहा : **पोहे**

**चिमणे, चिमळणे** पहा : **चिंबणे, चिंबळणे** : 'त्यामुळं त्याचा चेहरा चिमून गेला.'- बाविबु १०७. [सं.]

**चिमधार** वि. झिमझिम : 'बाहेर चिमधार पाऊस लागला होता.'- चदृपा ११३.

**चिमाई चोट्टी** वि. चोरटी, गुपचूप, गप्प.

**चिमाईना** स्त्री. सोन्याची सरी.

**चिमाटी** स्त्री. (चर्मकार) तजाची, (जोड्यावरील सागळीची) मागील दोन टोके जोडायला मध्यस्थी धरलेली चामड्याची चीट.

**चिमी–मू** स्त्री. लहान मुलांच्या भाषेतील चिमणीचा वाचक शब्द.

**चिमुकला** वि. लहान पण सुरेख; तल्लख (मुलगा). [क. चिन्नु]

**चिमुटणे** सक्रि. पहा : **चिमटणे** १ : 'तैशी सुबद्ध आटली। पुटीं होती दाटली। तें वज्रासनें चिमुटली। सावध होय।'– ज्ञा ६.२२५.

**चिमुटा** पु. लचका; तुकडा : 'जिंतिया मासाचे चिमुटे। तोडिती जेथ ।'- ज्ञा १७.२५७. [सं.मुचुटी]

**चिमुटी–चीमुटि** स्त्री. चिमूटभर मीठ : ' साधेंहो : तुम्हासि तक्रपाना अनोज्ञा: सी: बीं: चुळु: चीमुटि: यां चहुंमध्यें न गमे तरि एकु ठाओ आपजवीजे:'– लीचउ ७८.

**चिमुरडा** वि. १. लहान; छोटा. २. खुजट; पूर्ण वाढ न झालेला (मुलगा).

**चिमु(मो)रा–टा** पु. चिमटा; चिमखोरा (क्रि. काढणे, घेणे); विचकुरा; ओरखडा. (वा.) ० **उठणे** – ओरखडा, विचकुरा पडणे.

**चिमुळणे** अक्रि. सुरकुतणे : 'त्वचा किंचित चिमुळली होती.'– भदि ३१.

**चिमू(मो)ट** स्त्री. १. चिमट (तपकीर इत्यादी पदार्थांची). २. चुकटी; चिमटी. ३. घोड्याच्या कपाळावरील एक अशुभ चिन्ह; घोड्याच्या कपाळावरील दोन भोवरे जोडणारी केसांची रेषा, चिमटा. पहा : **झुपका** [सं.] (वा.) ० **लावणे** – तगादा लावणे; पिच्छा पुरवणे; निकड लावणे : 'या पुस्तकांचे काम मजकडून अगदी चिमूट लावून करवून घेतलें.'– आम प्र. १२.

**चिमोरा–री–रे** पु. स्त्री. न. नदीतील खेकड्याची एक जात.

**चिमोल–ला** वि. लहान व सुंदर; चिमुकला; छोटा. (प्रां.)

**चिम्म** वि. भिजलेले. पहा : **चिंब**

**चिम्मटपंथी** वि. कवडीचुंबक; कृपण : 'डॉ. आपटे मोठें धार्मिक असून चिम्मटपंथी होते.'– आघइ १२५.

**चिर** क्रिवि. दीर्घकाळापर्यंत; बरेच दिवस. उदा. चिरकाल. इ. [सं.]

**चिरक** स्त्री. तिटकारा; वीट; शिसारी; किळस. (प्रा.)

**चिरकखोर** वि. तऱ्हेवाईक; कंटाळखोर; मिजासी; आजारपणामुळे चोखंदळ झालेला.

**चिरकणे** उक्रि. चर्, टर् आवाज होऊन, करून फाटणे, फाडणे (वस्त्र इत्यादी). [ध्व.]

**चिरकणे** अक्रि. आमांशादी विकाराप्रमाणे लहान मुलाला, आजारी मनुष्याला एकदम पण थोडे शौचाला होणे; पिळकणे. [फा. चिर्कित; ध्व.]

**चिरकणे** अक्रि. (हत्तीचे) चीत्कार करणे. [ध्व. चर्]

**चिरकणे** अक्रि. १. (मातीच्या, काचेच्या भांड्याला) चीर, तडा पडणे. २. (वयात आल्यावर मुलाचा, फार गायन केल्यामुळे गवयाचा) आवाज फुटणे; बदसूर होणे. (सामा.) (गवयाचा आवाज गाताना) मधूनमधून बदसूर होणे. ३. बिघडणे; फसणे; फिसकटणे (धंदा, मसलत, बेत इ.). ४. (रागाच्या भरात, आवेशात) बडबडू लागणे. ५. ओरडणे; चीत्कार करणे : 'एक खार...खोडावर उलटी होऊन चिरकू लागली.'- व्यंमाक ५४. [ध्व.]

**चिरकर–न, दिनी–दिशी** क्रिवि. चिळकन; टर्रकन; चिर्र, टर्र असा आवाज करीत; टर्रदिशी. [ध्व.]

**चिरकं(कां)डी** स्त्री. पहा : **चिळकांडी, चिपळी.** १, २. (ल.) पावसाची जोराची सर. (क्रि. लागणे) [ध्व.]

**चिरका** स्त्री. डोंगरावरील हरळीसारखे गवत.

**चिरका** वि. १. सहज फाडला, चिरला, कापला जाणारा; ठिसूळ (कागद, लाकूड इ.). २. फाटलेला (कागद); भेग, फट, चीर पडलेले (लाकूड, दगड). [ध्व.]

**चिरका** वि. चिरकणारा; चिडखोर.

**चिरकाम** न. करवतीने लाकडे कापण्याचे काम; अरेकसाचे काम.

**चिरकाल** क्रिवि. फार दिवसपावेतो; बहुतकाळ; दीर्घकाळपर्यंत. [सं.]

**चिरकालिक** वि. फार दिवस टिकणारे, राहणारे; फार दिवसांपासून चालत आलेले. [सं.]

**चिरकाळी** स्त्री. चिरटी; पट्टी (लाकडाची, पानाची, कापडाची).

**चिरकांब** स्त्री. चीप (सोन्याची, चांदीची). (प्रा.)

**चिरकी** स्त्री. १. पहा : **चिळकांडी, चिपळी.** २.आतड्याचा एक विकार; आमांशामुळे थोडा थोडा विसर्जिलेला मळ. (वा.) **चिरकीस येणे**– थकणे; दमणे; जिकीरीला येणे.

**चिरकी–क्या** वि. ज्याला लवकर किळस, कंटाळा, वीट येतो असा (मनुष्य); खंतखोर.

**चिरकु(कू)ट** न. १. कापड; कपडा. २. चिंधी; फाटलेले कापड; चिंधुक; फटकूर : 'सर्वांगी लोबलें मांस । चिरकुटा सारिखें ।'-दास ३.५.४६ फाडिलें चिरकुटा।'-दाविधा २९४. पहा : **चिरगुट**

**चिरखाडणे** अक्रि. रेघोट्या ओढणे, असंबद्ध लिहिणे : '... पाटीवर काहीतरी चिरखाडून ...'– माअ ८६.

**चिरखांब** पु. तुळई उभी चिरून, कापून केलेला खांब.

**चिर(रं)गटणे** उक्रि. (दोन पदार्थांच्या कैचीत, पेचात, दाबात सापडून) चिरडले जाणे; चिरडणे; दाबणे; चेंगरणे; दाबले जाणे.

**चिरगु(गू)ट** न. १. (उप) कापड; कपडा; वस्त्र. २. चिंधी; चिरटी; फडके; चिंधूक. ३.पांघरूण; अंथरापांघरायचे कपडे; वस्त्रप्रावरण; कपडालत्ता वगैरे. [सं. चीर+क. गुड्ड]

**चिरघोडी** स्त्री. (सामा) १. कुरघोडी. २. बेडूकउडीचा, कुरघोडीचा खेळ.

**चिरचिर** स्त्री. चिगचिग; रपरप; चिबचिब; रेंदड.

**चिरचिर–रा** क्रिवि. १. चरकन, टरकन, चर्र आवाज करीत. २. बुरबुर पाउस पडत; झिरीमिरी; शिरिशिरी. [ध्व.]

**चिरचिरणें** अक्रि.१. ओरडणे; चीत्कार करणे (हत्ती इत्यादीकांनी) . २. रागावणे. ३. तडकणे; तडासणे; फुटणे; चिरकणे (आवाज). ४. आवाज होउन फाटणे. ५. कुरकुरणे; हळू रडणे : 'पोर तेवढ्यात उठले नि चिरचिरू लागले.'- चंद २९. [ध्व.]

**चिरचिरीत** वि. जुने; झिरझिरीत; विरविरीत झालेले (कापड). [ध्व.]

**चिरचिऱ्या** वि. तापट स्वभावाचा; चिडखोर; किरकोळ कारणावरून चिडणारा (मनुष्य). [ध्व.]

**चिरचुंबक** पु. चुंबकत्वाचे कायम स्वरूपाचे गुण असलेला लोहचुंबक.

**चिरचोळी** स्त्री. एक प्रकारचे झाड; (सामा.) मेळ ह्या नावाने ओळखले जाणारे झाड.

**चिरचोळे** न. गेळफळ; चिरचोळीचे फळ.

**चिरट-ट, चिलट** न. डास; घुंघुरटे;मच्छर; मुरकूट. पहा : **चिलट**

**चिरटा** पु. एका बाजूकडून घेतलेला केळीच्या पानाचा तुकडा,फाळका.

**चिरटी-टे** स्त्री. (चिरटा या शब्दापासून लघुत्ववाचक) १. चिरटा; केळीच्या पानाचा एका बाजूने फाडलेला तुकडा : 'मात्राचिया त्रिपुटीया। प्रणव काय केला चिरटीया।'- अमृता १.५८. २. जमिनीचा चिंचोळा तुकडा. ३. चिंधी; चिरफळी; पट्टी (कापडाची,कागदाची). [सं.चीर]

**चिरटोळी** स्त्री . १. तान्ह्या मुलाला स्तनपान शिकविण्यासाठी कापसाचा भिजवून चोखायला देतात तो बोळा. २. तुकडा; चिरफाळी : 'लाकडी गजांनी चिरटोळ्या केलेलं ते आकाश ...'-दुर्दम्य २८६. [सं. चीर]

**चिरड, चीड** स्त्री. १. रोष; रुसवा; राग; त्रास; उणे उत्तर, मर्मश्रवण इ. पासून होणारा मनाचा क्षोभ; अपमान जाणवणे; राग. (क्रि. भरणे.) २. चिडखोरपणा. ३. तिटकारा. किळस. (क्रि.येणे).

**चिरड-डी, चिरड(डी)खोर** वि. चिडणारा; लवकर रागावणारा; तिडतिडा; चिडचिड्या; हिरवट.

**चिरडणे** उक्रि. १. चेपणे; दाबणे; संतापणे. २. मारणे; कुसकरणे. [सं. चृत्]

**चिरडी** स्त्री. लहान मुलीचे लुगडे. (वा.) ० **नेसणे, मागणे**- रागाने, संतापाने फणफणणे, धुमसणे; तळपायाची आग मस्तकाला जाणे. (रागाने फणफणणाऱ्या मुलामुलीसंबंधी म्हणतात).

**चिरडीखपती** वि. उग्र आणि तापट; शीघ्रकोपी.

**चिरण** स्त्री. १. उभे चिरलेले केळीच्या पानाचे अर्ध, तुकडा; फाळका. २.चीर; भेग; तडा; फट. ३.अरुंद रस्ता; बोळ (दोन घरांमधील).

**चिरणा** पु. फाळका. पहा: **चिरण १**

**चिरणी** स्त्री. १. चिरण; केळीच्या पानाचा मधूनच उभा कापलेला तुकडा; फाळका. २. लाकडाला, दगडाला पाडलेली खोबण, खाचण ३. खाचणरंधा; खोबण पाडण्याचे हत्यार; एक प्रकारचे किंकर; अरुंद पटाशी, किकरे. ४. वेगवेगळे भाग; भेगा : 'चाकूने दंश झाला होता त्या ठिकाणी भराभरा चिरण्या पाडल्या.'- वाटा ४३. ५. पहिली नांगरट. ६. करंज्यांचे काठ कापण्याचे साधन; कातण.

**चिरणी** स्त्री. आडोशासाठी केलेली एक विटेची भिंत; भिंतीचा पुढे आलेला भाग; कंगोरा.

**चिरणी** स्त्री. एक प्रकारची लहान गाडी.

**चिरणी** स्त्री. रचना; आखणी : 'ऐसी वागुर चिरिजे : ऐसी मांडीजे : ऐसी चिरणी करावी :' - अली ४४.

**चिरणे** न. १. कागदाची जाळी पाडण्याचे हत्यार. २. मूर्ती कोरण्याचे हत्यार. ३. करंज्यांच्या कडा कापण्याचे साधन, कातण.

**चिरणे** उक्रि. फाडणे; कापणे; चीर पाडणे; तुकडे करणे; वेगळाले भाग करणे : 'तेणे भावशुद्धिचिया वाटे । विखुरले विकल्पांचे काटे । मग चिरिले अव्हाटे। अप्रवृत्तींचे।'-ज्ञा ७.१७०. [सं.चिरि]

**चिरणे** उक्रि. मर्यादा आखणे : 'मग महाभूतांचे एकवाट। सैरा वेंटाळूनि भाट। भूतग्रामांचे आघाट। चिरिले चारी ।' - ज्ञा१३.४५.

**चिरणे** उक्रि. पसरणे : 'एकीकडे त्याने चिरिल्या वागुरा । ठेविले श्वानपुत्रा एकीकडे ।'-तुका ३. [सं.]

**चिरनिद्रा** स्त्री. काळझोप; मृत्यूनंतरची अचेतन अवस्था : 'हे सोव्हिएत नेते काळाच्या कुशीत चिरनिद्रा घेत आहेत.'-क्रेबु. १६६.

**चिरनिर्भय** वि. सदाधीट, कधीही न भिणारा : 'तू चिरनिर्भय होतास'- किरिस्ताव १०५.

**चिरपणे** अक्रि. १. दबले जाणे. २. झिरपणे : 'तेणे गर्भिची पखाल चिरपे'- एरुस्व ५४.४२९.

**चिरपणे,चिरपुटणे** अक्रि. (आजारीपणामुळे, अशक्तपणामुळे) एकदम न कळत पण थोडे शौचास होणे, चिरकणे. [ध्व.]

**चिरपाटा** वि. हाडकुळा : 'पाटील चिरपाटा हुता...'-रैत ९५.

**चिरपाटी** स्त्री. आट्यापाट्यांवर खेळण्याचा एक खेळ.

**चिरपी** पु. खोदकाम करणारा : 'बाय मारिली चिरप्याघरी। पाणी पाडिले पाउल भर। पाणी काढिले गाडीवर।।'-लोसाको. (को.)

**चिरपुट** स्त्री. टिचकी : 'त्याने सिगारेटची रिकामी पेटी डाव्या हातात घेतली आणि तिच्या खालच्या पृष्ठभागावर उजव्या अंगठ्याने चिरपुटं लगावून ती वर उडवून दिली-' अंवा. [ध्व.]

**चिरपुट -टी** स्त्री. एक प्रकारची वनस्पती. ही हात -दीड हात उंच असून हिला पांढरट हिरवट लहानशा वाटोळ्या बोराएवढी फळे येतात. ही फळे खातात. (गो.)

**चिरफळ** स्त्री. एक झाड.
न. चिरफळीचे फळ. याची मिरमिर लागते. याला कोकणात तिरफळ असेही म्हणतात. [सं.]

**चिरफळ, चिरफा(फो)ळी** स्त्री. (वस्त्र, लाकूड, कागद इत्यादिकांचा) फाडून, चिरून काढलेला लांबट तुकडा; चिरटी; चिंधी : 'अंगातल्या कुडत्याच्या चिरफळ्या झालेल्या... आयबूची माझी जास्त भाषा झालीच नाही.' - बनगर २०. [सं.चीर+फलक]

**चिरफळणे** अक्रि. वेगळी होणे; भिन्न होणे : 'यांमुळे दोन प्रकारच्या चिरफळलेल्या भाषा तयार होतात. अभिजात आणि लौकिक.' - भाअव्य ११५,११६.

**चिरफाड** स्त्री. १. तुकडे. २. (ल.) एखाद्या विषयाचा खरमरीत समाचार : '(ते) तावातावानं पंचांगाची चिरफाड करीत होते' - दुर्दम्य २.७५. [सं.चीर+फाट किंवा सं. छृद्+ स्फट्]

**चिरबीड** वि. दाटीने लिहिलेले; खोडाखोडी करून लिहिलेले.

**चिरबुट** न. एक लहान झाड व त्याचे फळ. (कु.)
**चिरबोटी** स्त्री. एक वनस्पती : 'चिरबोटीची झाडे हात, दीड हात उंच वाढतात.' – फचि ९०.
**चिरबोटे** न. चिरबोटीचे फळ. पहा : **कपाळफोडा**
**चिरभोग** पु. (राज्य.) चालू वहिवाट; चालू वहिवाटीचा हक्क. [सं.]
**चिरभोजी** पु. दीर्घ काळपर्यंत (राज्य) उपभोगणारा, राज्य करणारा.
**चिरमी** स्त्री. १. मनुष्याचे शरीर, लाकूड, फळ इ.तील रसांश कमी झाल्यामुळे वरील त्वचा आकुंचित होऊन पडलेली सुरकुती पडलेली वळी. २. वस्त्र इ. पडलेली वळी. [सं. चीर]
**चिरमी जोडा** साध्या आकाराचा एकतळी जोडा; मारवाड्याच्या लग्नात लागणारा एक जोडा.
**चिरमुटणे** पहा : **चिमटणे** ३, **चिमुळणे**
**चिरमुली** वि. बारीक; लहान : 'एक चिरमुली खारीक माझ्या हातात कोंबली.' – मळणी ४७.
**चिरवट** वि. गिचमिड लिहिलेले; खरडलेले; चिताड.
**चिरवटणे** अक्रि. आवाज खरडून ओरडणे : 'तातू... चिरवटून ओरडू लागले.' – आआशे २५८.
**चिरवटा** पहा : **चिरोटा**
**चिरविश्रांती** स्त्री. १. मृत्यू; २. मृत्यूनंतर अचेतन मानवी देह मातीत पुरून ठेवणे : 'परदेशातील कम्युनिस्टही इथे चिरविश्रांती घेत आहेत.' – क्रेबु १६६.
**चिरसमय** पु. दीर्घकाळ. [सं.]
**चिरस्थायी** वि. कायम टिकणारा; शाश्वत; चिरंतन : 'एऱ्हवीं जगदाकाराचें सिरें। जें चिरस्थायी यांचे धुरे।' – ज्ञा ८.१५४. [सं.]
**चिर(रा)ळणे** अक्रि. भेगा पडणे, चिरा पडणे.
**चिरं** वस्त्र, लुगडे : 'दिवाळी बाईनं कसं दिवाळं काढिलं। बंधुजीनं माझ्या चिरं घेऊन धाडिलं।।' – लोसाको. पहा : **चीर**
**चिरंगट** स्त्री. (पदार्थाची, वस्तूंची, सामानाची) ठेचाठेच; गर्दी; खेचाखेच.
**चिरं(र)गटणे** सक्रि. एखाद्या जागी वा बारदानात ठासून बसविणे,कोंबणे.
**चिरंगटाचिरंगट** स्त्री. (सामा.) चेंगराचेंगर; ठेचाठेच.
**चिरंजी** स्त्री. आत चारोळ्या असलेली गोड मिठाई.(झाडी) [हिं.]
**चिरंजीव** पु. १. पुत्र; मुलगा : 'पण आपले चिरंजीव आपणांस उलट लिहिणार नाहीत कशावरून !' – पलकोघे. २. आपल्यापेक्षा कमी वयाच्या मनुष्याला पत्र लिहिताना त्याच्या नावामागे लावायचे उपपद, शब्द. उदा. चिरंजीव गोपाळ यास अनेक आशीर्वाद. ३. अमरपुरुष; ब्रह्मकल्पापर्यंत जगणाऱ्या सात पुरुषांपैकी प्रत्येक (अश्वत्थामा, बली, व्यास, मारुती, बिभीषण, कृप, परशुराम हे सात पुरुष चिरंजीव आहेत). ४. दीर्घायुषी; पुष्कळ वर्षे जगणारा; चिरकाल टिकणारा : 'तेणें न लोटती जे भाग्याचे। देखती ते स्वर्गींचें चिरंजीव।' – ज्ञा ८.१५७.[सं.]
**चिरंजीवी** स्त्री. मुलगी; कन्या.
वि. चिरकाल जगणारा; दीर्घायुषी.
**चिरंट** न. चिऱ्हाटीचे फळ.
**चिरंतन** वि. १. जुना; प्राचीन; पुरातन; शाश्वत. २. चिरंजीव : 'तरी सांगे कायि हे होती। चिरंतन।' – ज्ञा २.९८. [सं.]
**चिरा** पु. १. इमारतीचा घडीव दगड; खाणीतून सुरुंग लावून उडवलेला दगडाचा, खडकाचा तुकडा, खपला; दगड, शिळा : 'हरिनें कामा घातला चिरा। वित्तवरा मुकविलें।' – तुगा १२३. २. बांधावरील हद्दीचा दगड. (वा.) ० **उभारणे** – व्यक्ती किंवा घटना यांची स्मृती म्हणून दगड बसवणे. ० **उलथणे** – (कोणी लठ्ठ मनुष्य) एकाएकी मरण पावणे. ० **घालणे**– धोंडा घालणे; नाहीसे करणे; नष्ट करणे : 'तुका म्हणे घालू जिवपणा चिरा। जाऊं त्या माहेरा निजाचियां।' – तुगा २५५४.० **पडणे** – १. धोंडा, दगड पडणे. २. (ल.) (एखादी क्रिया) बंद पडणे : 'शरीरा येणे सरे। किंबहुना येरझारे। चिरा पडे।' – ज्ञा १२.१३६. **चिऱ्यावरची रेघ**– १. दगडावरील लेख. २. (ल.) कधी न पुसले जाणारे लिखाण. ३. कधीही न मोडली जाणारी चाल. **चिऱ्यांचा पाया** – १. दगडी पाया. २. (ल.) (स्त्री संततीहून विरुद्ध गुण, भिन्न अशी) पुरुष संतती (स्त्री संतती दुसऱ्या कुळात जाते आणि पुरुषसंतती मूळच्या कुळात कायम राहते म्हणून पुरुषसंततीस चिऱ्यांचा पाया असे म्हणतात). ३. (ल.) स्थैर्य, भक्कमपणा असलेले राज्य, मालमत्ता, हुद्दा, उद्योग, मसलत इत्यादी.
**चिरा** पु. कौमार्य; ज्वानी; कुमारीदशा. [हिं.] (वा.) ० **उखळणे, उतरणे**– कौमार्य नष्ट करणे; वेश्येच्या अनुपभुक्त मुलीशी प्रथम संभोग करणे : 'चिरा उखळा माझा राव नशा। घेऊन तुम्ही पलंगावर बसा।' – पला ४.२५.
**चिरा** पु. रंगीत खांब, त्यावर छत्रीच्या आकाराचे चुणीदार बांधलेले लुगडे म्हणजे तरंग. त्यास तेथे चिरे म्हणतात. (गो.)
**चिरा** पु. शस्त्र : 'आवारू सांडुनि तेलंग देसा नीगाले : आसूची वाखारी कढीवां बांधली : हातीं चिरा :' – लीचउ ५४८.
**चिरा** पु.गोव्यातील शिरगावच्या देवळात लई राई (देवी) म्हणून ठेवलेला पंचधातूचा उलटा कलश : 'पंचधातूचा एक कलश तेथे उलटा ठेवलेला आहे. हा कलश म्हणजे लईराई. हा कलशच रात्री डोक्यावर घेऊन मिरवला जातो. मिरविणाऱ्यास 'मोड' म्हणतात व कलशास चिरा.' – अहागो ५७.
**चिरा** पु. जरीच्या उभ्या काड्याचे अरुंद व लहान पागोटे; मंदील : 'शिरी बांधियेला चिरा। खोवी मोतियाचा तुरा।' – अमृतसं १२७.[सं. चीर]
**चिरा** पु. वाफा : 'दोन्ही वक्ताचं मिळून तीस बत्तीस चिरं (पाणी) प्यालं.' – गोता ४.
**चिराई** स्त्री. लाकडे कापण्याची मजुरी.
**चिराई(य)त** स्त्री. किराईत; काडेचिराईत. पहा : **किराईत**
**चिराक–ख** पहा : **चिराग** : 'तो शहरांत सर्कारचे वाड्यापासून भवानी पेठेपर्यंत दो बाजूनें चिराखा तयार केल्या.' – ऐको ३८०. [फा.चिराय]
**चिराखदान** न. दिवा किंवा मेणबत्ती ठेवण्याचे घर.
**चिराखबत्ती** स्त्री. (देवळातील, मशिदीतील, घरातील) दिवे लावून ते व्यवस्थित ठेवण्याची क्रिया. [फा.]
**चिराखी** स्त्री. १. (मुसलमानांच्या) पिराजवळ दिवाबत्ती लावणे, पिरास फुलांचे हार व इतर वस्तू अर्पण करणे इत्यादी कार्य. २. वरील कामाबद्दल मिळणारे सरकारी वेतन, वर्षासन. ३. वरील काम करण्याची नोकरी,

कामगिरी. ४. फकिरास संध्याकाळी द्यायची भिक्षा. [फा. चिराग]

**चिराग** पु. दिवा; बत्ती दिव्यांची रांग ठेवण्याची चौकट; बत्ती. [फा.]

**चिराग(ख)दान** न. १. दीपस्तंभ; दीपमाला : 'झुंबराची चिरागदाने पेटविण्यात आली.' – बहुरूपी १३. २. शोभेकरिता ओळीने लावलेल्या दिव्यांचा समुदाय. [फा.]

**चिरागान, चिरागदान** कामट्यांच्या ताट्या करून त्यावर पणत्या वगैरे लावून केलेला दीपोत्सव.

**चिराटा** पु. पावसाळ्यातील पहिली नांगरणी. (झाडी)

**चिरादस्ती** कौशल्य.

**चिरायत** स्त्री. हिमालयातील एक औषधी झुडूप,क्षुप. औषधाकरता सर्व क्षुप मुळासकट बाजारात आणतात.

**चिरायु–यू** वि. दीर्घायुषी; बरेच आयुष्य असलेला. [सं.]

**चिराळणे** उक्रि. चिरफाळणे : 'मागच्या बाजूला उभा करून चिराळला अडसर ठेवला होता.'– पधों १८.

**चिरांबा** पु. चिरलेला आणि खारलेला आंबा.

**चिरि(री)मिरी** स्त्री. बक्षिशी(क्रि.घेणे). बक्षीस म्हणून दिलेला पैसा; लाच : 'साहेबाची भेट घ्यावयाची म्हणजे शिपायाला चिरिमिरी द्यावी.' – के २६.७.३०.

**चिरी** स्त्री. १. केळीच्या पानांची चिरटी. २. भेग; चीर; ओरखडा. ३. (कुंकवाची, गंधाची) बारीक कोर; रेघ : 'भाळीं शोभे कस्तूरी। जैसी ते अर्धचंद्राची चिरी।' – कक १.२.६१. ४. एखाद्या वस्तूचा चिरून केलेला तुकडा; बारीक कापलेली फोड : 'तंव तेचिये अवसरीं। जरा नामें निशाचरी। तियेनें देखिल्या दोन्ही चिरी। रात्रिभागीं।' – कक ४.१.७४. [सं. शृ]

**चिरी** स्त्री. लहान साडी; चिरडी. [सं.चीवर]

**चिरीक** स्त्री. आकस्मिक भीती, धास्ती; गाळण; त्रेधा; तिरपिट.[फा.]

**चिरीकचिरीक** वि. रिमझिम.

**चिरीचिरी** क्रिवि. भीतीने (क्रि. ओरडणे, चिरकणे, खचणे) : 'बगितल्या बगितल्या तर चिरीचिरी चिरकले.' – पाचोळा ८२.

**चिरीपट्टी** स्त्री. बायकांची वेणीफणी, काजळ कुंकू इत्यादी प्रसाधन–विधी. [सं.चीवर]

**चिरीव** वि. चिरलेले; फाडलेले; फाटलेले; करवतीने कापलेले; उभे चिरलेले.

**चिरीव** वि. कोरून काढलेले; कोरीव; रेखलेले : 'हिमवतीयेचे आटिले हीव : ते दळवाडे काढुनि चिरीव : दामोधर केले कांतीव हिमोदकाचे' – रुस्व ४१६. (राजा.)

**चिरू** स्त्री. कपड्यात होणारी मोठी व पांढरी ऊ.

**चिरूट** पु. निवळ तंबाखूचीच विडी; दोन्ही बाजूंनी उघडी सिगारेट.[इं.]

**चिरेकोर** पु. इमारतीचे दगड घडवून विकणारा.(गो.)

**चिरेदार** वि. घाटदार : 'केळीच्या खांबासारख्या चिरेदार मांड्या' – अयेवाफु ४९.

**चिरेबंदी** स्त्री. १. घडीव दगडाचे बांधकाम; चिऱ्यांनी केलेली बंदिस्ती फरशी; फरसबंदी. २. (ल.) दमदार व स्निग्ध पदार्थाचे भोजन. वि. चिऱ्यांनी बांधलेला; भक्कम; मजबूत. (वा.) ० **पाया घालणे** – (ल.) (कोणत्याही कार्याचा ) भक्कम पाया घालणे; पक्केपणी आरंभ करणे.

**चिरो(ऱ्हो)टा** पु. रवा व मैदा एकत्र मळून, त्याच्या आठ नऊ घड्या घालून व चौकोनी लहान तुकडे करून तुपात तळून केलेले पक्वान्न :'लाडू बुंदिचे गोमट। तिथे चिरोटे धाकूट।'–मसाप २.२३.

**चिरोटी** स्त्री .लहान चिरोटा.

**चिरोटी** पहा **चिरटी–टे** : 'जुने बारदान, चिरगुटे, कंतानाच्या चिरोट्या...'–डाली २७.

**चिरोंजी** स्त्री . चारोळी; चार नामक झाडाचे बी. [हिं.]

**चिर्मटी** स्त्री. सुरकुती. (झाडी.)

**चिऱ्हाट** न. चऱ्हाट; दोरखंड.

**चिऱ्हाट–टे** न . चिऱ्हाटीचे फळ.

**चिल** न. अफूच्या शेतातील एक गवत.

**चिल** स्त्री. घार. (अव. चिला) : 'होले तितर गोंबी चिला।'– दावि २४४. [सं. चिल्ल.]

**चिलक(बा)ट** न. जनावराच्या ओल्या कातड्याच्या मांसाकडील भागाला चुना लावून ठेवल्यावर. ९ –१० दिवसानंतर रापीने त्याचा तासून काढलेला मांसल भाग, त्याची घाण. : 'घाणीची चिलकटं दूर फेकू लागला.'–आ १०.

**चिलका** स्त्री. बरग्यावरची फळी. (कर.) ['किलचा'चा वर्ण विपर्यास]

**चिलखत** न. १. किल्ल्याच्या तटाच्या आतील बाजूचे आधारादाखल केलेले बांधकाम; अस्तरी बांधकाम; दुहेरी किंवा जोड बांधकाम : 'गडाची इमारत गरजेची करु नये. तट , बुरूज, चिलखते, पाहार, पडकोट जेथे जेथे असावे ते बरे मजबूत बांधावे.'– बावद १.९७.

**चिलख(क)त** न. शरीराला बंदुकीची गोळी किंवा तरवारीचा, शस्त्राचा वार लागू नये म्हणून घालायचा लोखंडी कड्याचा , पट्ट्यांचा अंगरखा; कवच; शरीरत्राण. [फा. चिहिल्कद]

**चिलखती** वि. संरक्षणात्मक कवच असलेला.

**चिलखती काच** (स्था.) बंदुकीच्या गोळीने न फुटणारी काच.

**चिलखती दल** चिलखती आवरणयुक्त वाहने असलेला लढाऊ सैन्याचा विभाग: 'स्थल सेनेचे लढाऊ विभागात १) पायदळ २) चिलखती दल( आर्मर्ड् कोअर्स) ३) तोफखाना .... हे पोटविभाग आहेत.' – युजि ३४.

**चिलखी** वि. १.चांगला; उत्कृष्ठ; नामी; उंची. २. घणकोरा; मूर्तिमंत (रुपया इ. नाणे). [हिं. चिलक]

**चिलगोंडा** पु. वेणीचा गोंडा : 'शेर सोनीयांच रखमाईचं चिलगोंडं इठ्ठल महाराजाला पंढरीचा राजदंड ।'– जसा ५३६.

**चिलघोळ** स्त्री. बारीक पानांची घोळ नावाची भाजी.

**चिलचिलाट** पु. (मनुष्ये, पक्षी, माकडे इत्यादींच्या) घोळक्याचा आवाज; किलकिलाट; गलबला. [ध्व.]

**चिल(ली)ट** न. १. डास. २. घुंगरटे ३. उंबरातील कीटक. [सं]

**चिलण** स्त्री. १. चीर; चिरण; भेग; तडा. २. खिंड; भगदाड. ३. बोळ;

शेरी. (को.)

**चिलप** स्त्री. चामड्याचा पट्टा बसविलेली खडावा. प्रत्येक; चप्पल. (गो.)

**चिलपाट–टी–ट्या** पु. एक प्रकारचा खेळ; लोणपाट; आट्यापाट्या. (व.)

**चिलपे** पु. अव. लाकडाचे ढलपे; सालपा.

**चिलबिलणे** सक्रि. कुरवाळणे : 'कासेत हात घालून तिचे इवलेसे सड चिलबिललं.'– व्यमांक २४.

**चिलबिलाट** पहा : **चिलचिलाट** (झाडी)

**चिलबिल्या** वि. अवखळ. [हिं.]

**चिलबील** स्त्री. हालचाल. (झाडी)

**चिल(ली)म** स्त्री. १. तंबाखूचा धूर ओढण्याची मातीची नळी. २. चिलिमीत घातलेली तंबाखू इत्यादी. [हिं.]

**चिलमनी पडदा** पहा : **चिकाचा पडदा** : 'बायकाही चिलमनीच्या पडद्याआड बसल्या होत्या.'– जीसे ३१६.

**चिलमी** वि. १. चिलीमबाज; तंबाखू ओढणारा. २. चंगीभंगी लोकांनी उठवलेली लोणकढी (कंडी, थाप, गप्प).

**चिलमी वर्तमान** पुण्यातील भांग्या मारुतीच्या अड्ड्यावरील लोकवार्ता : 'चिलमी वर्तमान मिरजेच्या सनदा श्रीमंतांनी श्री. चिमाजी अप्पास करून दिल्या असे बोलतात.'– ऐको ३८१.

**चिलवणा–ना, चिलवाण–न** वि. ठेंगू; खुजट; बुटका (मनुष्य, जनावर इत्यादी). [क. चिल्लरे]

**चिलसी, चिळिसी** स्त्री. किळस; वीट : 'सांधें पूयपंकिंचे किडे । काइ चिळिसी घेती।।'– ज्ञा ५.१२०.

**चिला** पु. जरीच्या उभ्या काड्या असलेले लहान पागोटे; मंदील. पहा : **चिरा**

**चिला** पु. तळ्यातील गवत. लव्हाळे. (गो.) (झाडी)

**चिलाटी** स्त्री. अव. एक काटेरी झुडूप : ' काही चिलाटी' – जैरेजै १०८.

**चिला (ल्हा) र–री** स्त्री . १. झुडूपाचा एक प्रकार २. तीन चार फूट वाढणारे एक झुडूप. याच्या फोकांपासून दुरड्या, कणगी, टोपली इ. तयार करतात.

**चिलारी** वि . लहानगा; छोटा; चिमुकला: 'यमुना जमुनाची बारीक वाळू। तेथे खेळे चिलारी बाळू।'– मसाप ४.२५१. [क. चिल्लरे]

**चिलिच्चि(च्ची)ल** वि. चिलचिलीत; चिकचिकीत. (दे.)

**चिली, चिलये** स्त्री. आग्नेयी दिशा. (हेट.)

**चिलीपिली** न. अव. १. मुलेबाळे, कच्चीबच्ची, बालबच्ची. २. मकर संक्रांतीच्या वाणातील बारीक बारीक बोळकी.

**चिलीम माती** (भूशा.) भाजलेल्या मातीच्या वस्तू तयार करण्यासाठी उपयुक्त असा मातीचा एक प्रकार.

**चिलुका** पु. पाण्यातील जंतू. [सं.]

**चिलेबखतर** न. चिलखत; शरीरत्राण : 'आंगातील चिलेबखतर धाडिले लिहून आले सविस्तर।'– गापो ८०. [फा.चिहिल बख्तर]

**चिल्या–ल्ल्या** पु. १. आग्नेयकडील वारा. पहा : **चिली**. २. होडी सरपटत किनाऱ्यावर नेण्याकरता केलेली फळ्यांची रचना.

**चिल्यापिल्याची पाटी** मुलेबाळे असलेली स्त्री.

**चिल्ल** पु. घार. [सं. चिल्ला ध्व.]

**चिल्ल (ल्हा–ल्हे) र** पु. हलकी नाणी; खुर्दा. वि. किरकोळ; बारीकसारीक; लहानसहान; फुटकळ: 'चिल्लर देशांच्या महामंत्र्याच्या भेटीचा उल्लेख होतो.'– अहीदि १४३. [त. शिल्लरै] [फा. चिल्लर]

**चिल्लरखर्च** पु. १. किरकोळ खर्च. २. वसुली नोकरास दिलेली सादीलवारी.

**चिल्ला** पु. धनुष्याची दोरी, प्रत्यंचा: 'धनुष्याचा बाण वीर रात्रंदिवस चढवून चिल्ले ।'– पला १०९. [हिं.]

**चिल्ला** पु. चाळीस दिवसांचे उपोषण व ध्यानमग्नता : 'तुम्ही चिल्ल्यातून उठले याची खबर लिहिली जाते.' – २३९. [फा.]

**चिल्लाय** स्त्री. आरोळी : 'पोरं निंघाले भिजत दारी चिल्लाया मारत' – बगा १३७

**चिल्ला(ल्हा)र, चिल्ला** वि. चिडलेला. (झाडी) स्त्री . वनस्पतीविशेष; एक काटेरी वेल : 'पांदीवाटेला आली. कडंन चिल्लाराची जाळी.'– नागीण २.

**चिल्लावणे** अक्रि. रडणे; ओरडणे. (व.) [ध्व.]

**चिल्हा** पु. शेवाळ.

**चिल्हाटी** स्त्री. चिव्हाटी; एक काटेरी वेल : 'वाटच्या वाटसरा लेक जन्मते चिल्हाटी। मायबापाच्या कुळाला डाग लावते शेवटी'– वलो ७१. (व.)

**चिल्हार–पिल्हार** न. लहान मुले, लेकरे.

**चिव** पु. मासे पकडण्यासाठी घातलेला बंधारा. (कु.)

**चिवचंदी** वि. अस्थिर.

**चिवचिव** स्त्री. १. चिमणी, उंदीर वगैरे प्राण्यांचा आवाज. [क. चिवुचिवु] २. (ल.) लहान मुलांची बोबडी बडबड : 'अरूची बोबडी चिवचिव.' –वैष्णव ११९. ३. रागावलेल्या लोकांचा, तगादा करणाऱ्यांचा , भिकाऱ्यांचा, शाळेतील मुलांचा कलकलाट. ४. चीत झालेल्या पहिलवानाचे, मुष्टीयुद्धयांचे पुटपुटणे, चडफडणे, कबुली देणे. ५. असंतुष्टपणे स्वत:च्या मनाची कशीबशी समजूत घालून घेणे; अक्षमतेची, दुबळेपणाची पिरपिर. [सं.चिव् द्वि.]

**चिवचिवणे** अक्रि. १.(चिमण्यांचे) चिवचिव आवाज करणे; (उंदरांचे) चूं चू करणे. २. चिडणे; कावणे; खिजणे. [ध्व.]

**चिवचिवणे** अक्रि. १. (जखम, गळू इ.) ठुसठुसणे; शिणका मारणे. २. (आम्ल पदार्थ) फेसयुक्त होऊन फुरफुरणे, फिदफिदणे. ३. (पक्वान्न) बेचव आणि पाणचट होणे.

**चिवचिवाट** पु. अतिशय पराकाष्ठेची चिवचिव, कलकलाट; गोंगाट. [ध्व.]

**चिवचुंदरी** स्त्री. सुसुंदरी; उंदरासारखा एक प्राणी; चिचुंद्री.

**चिवट** न. जाड्या भरड्या सुताची गुंडाळी. ही बहुधा बारा हात लांब आणि तानवटाभोवतालच्या शंभर दोनशे फेऱ्यांची असते.

**चिवट** न. वि. १. वातड; चामट; चिकट. २. (उप.) चिकट; कृपण; हिमटा. ३. कुसकरलेले; चिवडलेले. (अन्न,फळे इ.).४. सोशीक. [सं.सीव्]

**चिवटणे** उक्रि. १. चुरडणे; चेंदामेंदा करणे; २. चिमटणे. [सं]

**चिवटा** पु. कितान; गलबताच्या शिडाचे जाड कापड. कॅनव्हास.
**चिवटी** स्त्री. चोय; चोयटी; शिळक . (व.)
**चिवटी** वि. चिवटाचे केलेले; चिवटासंबंधी .
**चिवटाँग नवटाँग** कच्चीबच्ची; चिल्लीपिल्ली. (कु.)
**चिवड** स्त्री. चुगली; नापसंतीदर्शक गोष्ट; चिडण्यासारखी गोष्ट : 'सखारामजवळ बाबांनी नानाची चिवड सांगितली येथीलहि पुसले.'– पुद १.१८१.
**चिवडणी** स्त्री. १. चिवडण्याची क्रिया. २. (ल.) चिडविणे; खिजविणे; संतापविणे.
**चिवडणे** सक्रि. १. काला करणे, कुसकरणे; चेंगरणे; चुरडणे. २. अव्यवस्थित करणे; चबढब करणे; बचाबचा कालवणे. ३. (ल.) वेळ कसातरी दवडणे : 'दिवस चिवडीत राहिली.'– पुपू ७३. [सं.चर्पट्]
**चिवडा** पु. पोहे, चुरमुरे, हरभऱ्यांचे डाळे, खोबरे, दाणे इत्यादी अनेक पदार्थ तळून एकत्र मिसळून केलेले तिखटमिठाचे खाद्य.[सं.चिविट्]
**चिवडा** पु. १. ( फळे, फुले अन्नपदार्थांची )पुन्हापुन्हा चिवडल्यामुळे झालेली दुर्दशा, भेसळ. २. (ल.) बिघाड; विचका; घोटाळा; बचबच : 'दारिद्रे चिवडाचि सर्व, दवडा थोरीवडापावडा।'– आसुच ५. [सं. चिविट्]
**चिवडाचिवड** स्त्री. १. पुनः पुनः चिवडणे; काला करणे; घालमेल करणे. २. सरभेसळ; खिचडी.
**चिवणे** अक्रि. चूं चूं असे (उंदराचे) ओरडणे : 'तरी न तरोनिया उंदिरी। कां पां घरोघरीं चिंवताती।'– एभा ५.११७.
**चिवणे** न. एक प्रकारचा मासा.
**चिवनारू** वि. (आदि.) चिमणे; इवलेसे; चिवचिव करणारे.
**चिवरे** न. कच्चे पोफळ; सुपारीचे कच्चे सालासकट फळ.
**चिवली–चिवाटी** स्त्री. एक प्रकारचे रेशमी कापड. [सं. चिव्]
**चिवळ** वि. १. रोड; सडपातळ; बारीक; प्रमाणाबाहेर लहान घेराचा : 'जें हळुवट ना गहिंस। जें चिवळ ना सपोश।'– एभा ३.६७९. २. लांब आणि बारीक; चपटा केलेला; चेपटलेला. ३. अरूंद. (बे.)
**चिवळ** पु. एक पक्षी : 'सकाळ-संध्याकाळ धान्यावर झेप टाकीत भोरड्याचिवळांचा थवा हिंडू लागला.'– मिरास २५४.
**चिवळ** स्त्री. उन्हाळ्यात होणारी एक पालेभाजी. (व.)
**चिवळणे** सक्रि. १. हाताने दाबणे; (फळे इत्यादी) हातांनी दाबून चोळून मऊ करणे. २. चेपटणे; चापट; लांबट करणे.
**चिवळी** स्त्री. नद्यादिकांच्या काठी असलेली अरूंद वाट. (कु.)
**चिवा, चिवली** पु. स्त्री. लहान जातीचा जंगली बांबू : 'रानहाके काठ्या, चिंवे जमवू लागले'– नभ ७५.
**चिवा** पु. १. एक पक्षी. (झाडी). २. उंदीर. (कात.)
**चि(ची)वार** स्त्री. न. १. चिवा जातीच्या बांबूचे बेट : 'कमानीसारख्या सुकलेल्या चिवारीवाली उभा राहून पाहू लागलो.'– सोबत ९४. २. एका जातीचे गवत.
**चिवारी** स्त्री. बांबूची भरीव काठी; बांबू : 'शरीरयष्टी ... चिवारीच्या काठीसारखी कणकणीत होती.'– सीपो २.
**चिवाळणे** अक्रि. बारीक होणे (कु.)
**चिवून चावून** क्रिवि. काटकसरीने; कोरून कोरून; जेमतेम; मितव्ययाने.
**चिव्याचे भेत** बांबूचे चापट पाते : 'कुणाच्या तरी कुंपणाला आडवे बांधलेले चिव्याचे भेत त्याने घेतले.'– शेलूक १०४.
**चिह(हा)ळणे, चिळणे** अक्रि. १. चिघळणे. २. (मीठ, साखर, गूळ इत्यादी पदार्थ) द्रवणे; झिरपणे; गळणे; निचरणे. ३. (ल.) गळून जाणे : 'बकाल दाटीतून आलेले डॉक्टर चिहाळून गेले.'– कृकादे ८२. [सं. जिघृ]
**चिहाळ** पु. घाम; पाझर; (मीठ इ.चा) द्रव, स्राव; दमटपणा. (को.)
**चिळकं(कां)डी, चिळकी** स्त्री. चिरकांडी; (रक्ताची, दुधाची) जोराने बाहेर उडणारी धार. [क. चिळकिसु; ध्व.]
**चिळण** पहा : **चिलण**
**चिळणे** उक्रि. गिळणे; पोटात ढकलणे : 'भूक लागली असेल तर चिळा दोन घास पोटात'–धाधो ८८.
**चिळवे** न. एक माप; कोळव्याचा निम्मा भाग; शेराचा बत्तिसावा भाग.
**चिळस सी– शी** स्त्री. किळस; वीट; तिरस्कार; शिसारी : 'किंबहुना चिळसी। पात्र होईन।'– ज्ञा १३.५७४.
**चिळसखोर – बाज** वि. मिजासखोर; चोखंदळ; चिकित्सेखोर.
**चिळसणे** अक्रि. १. कंटाळणे; विटणे; कंटाळा, तिटकारा करणे. २. किळस, वीट येणे : 'ती त्याबद्दल चिळसली नाहीं.'– कालकूट ६९.
**चिळसी** स्त्री. किळस; घृणा : 'चिळसी मना येतसे।'– एभा ७.१४९.
**चिळहाट** पहा : **चिहाळ**
**चिंकारा** पु. एक हरणविशेषः 'आधींच चिंकारा हरणांची जात मोठी देखणी...'– स्वामी ११०.
**चिंगचिंगा** क्रिवि. भन्नाट वेगाने : 'लातूरच्या वाटं चिंगचिंगा पळविनार व्हतो'– मळणी ९७.
**चिंगचिंग्या** वि. कंजूष. (व.)
**चिंग(गू)ळ** स्त्री. १. एक अतिशय लहान मासा : 'आतील बारीक चिंगाळा उगाचच फडफडल्या'– शेलूक २८. २. लहान विंचू, खेकडा. ३. चिमुकले गाजर, बटाटा, कांदा, अपक्व फळ इत्यादी.
**चिंगाटी – री, चिंगोटी** स्त्री. १. लहानसा भोवरा. २. (ल.) चलाख, चपळ, मोहक मूल. ३. ठेंगू मनुष्य.
**चिंगिरा** पु. झुकांडी : 'पोरांनी दिला चिंगिरा बरं का साहेब.'– जांदि ७३.
**चिंगुटी** स्त्री. चिंधोट; चिंधी : 'कोबराल इ लेंगुटी आन मुनकांचें इ. चिंगुटी = कंबरेला ही लंगोटी आणि डोक्याला ही चिंधोटी.'– भिल्लीगो ३५. (भि.)
**चिंगुरा** वि. चिमुकला.
**चिंगुली** वि. छोटीशी : 'अव्वा किती चिंगुली खोली !'– माताजी ५३.
**चिंग्री** पु. एका जातीचा मासा : 'चिंग्री या जातीचे मासे घेताना फार जपले पाहिजे.'– आरोशा १.११४.
**चिंघरा** पु. तिळावरील एक प्रकारचा रोग.
**चिंच** स्त्री. एक झाड आणि त्याचे फळ. चिंच आंबट असून स्वयंपाकात

भाज्या वगैरे पदार्थात उपयोग करतात. [क. चिंचा]

**चिंचकरटे, चींच (चु) करटा** न. चिंचा, चिंचोके कुटून, त्याचा जाड लगदा करून, त्यापासून तयार केलेले भांडे : 'माहादाईसें भीक्षेसि गेली होती : तवं आंडोरीं एके घरी चींचकरटां पाणी घातलें:' -लीचउ ४४९.

**चिंचणी** न. हरळीसारखे एक गवत.

**चिंचतसर** न. चिंचेवरील कर.

**चिंचपटी** पहा : **चिंचपेटी** : 'सोळाव्या शतकात महाराष्ट्रीय स्त्रियांना कोणकोणते दागदागिने आवडत ते काव्यातून लक्षात येते. सीसफूल, हसली, ... चींचपटी ... इत्यादी.'- मजीस्थि८८.

**चिंचपानी** वि. चिंचेच्या पानाच्या रुंदीचे काठ असणारा (धोतरजोडा, पातळ) : 'तिने दोरव्याचे पांढरे व चिंचपानी जरतारीचे बारीक पातळ नेसून...-रत्नप्रभा २.

**चिंचपेटी** स्त्री. स्त्रियांचे एक कंठभूषण; चिंचेच्या पानांच्या आकाराच्या सोन्याच्या पेट्यांवर मोत्याचे किंवा हिरकण्यांचे कोंदणकाम करून त्या पेट्या वज्रटिकेप्रमाणे रेशमाने पटवून केलेला अलंकार.

**चिंचबरट** न. चिंचोक्याचे बरबट :'मग कुचिळ रूप धरीलें : चींचबरटें हातपाए तोंडे माखीं : वरी राख उधळीं :'- लीचअ २८.

**चिंचमोहर** पु. मेथी, मोहरी, हळद, चिंच यांची चटणी; चिंचेचे पाणी, मिरची, मीठ याला फोडणी देऊन केलेला पदार्थ. (बे.)

**चिंचवणी** न. चिंच कोळलेले पाणी; चिंचेचे पाणी: 'चिंचवणी खादलें । त्या चिंचोऱ्याचे वृक्ष आले।।-' मब ४०.

**चिंचळा** पु. १. दिव्याच्या वातीची काजळी, कोजळी. २. तेलाच्या दिव्यात पडणारे स्फुल्लिंग, जळते कण.

**चिंचारा** पु. चिंचोका. (कु.) पहा : **चिचरा**

**चिंचावणे** अक्रि. चिवचिव करणे; चिवचिवणे. [ध्व.]

**चिंचिणी** स्त्री. भातात, गवतात वाढणारे एक रोप (हे दुभत्या गाईंना खाऊ घालतात). पहा : **चिचणी**

**चिंचुकली** स्त्री चिमटा. (क्रि. घेणे)

**चिंचु(चो)टी-डी** स्त्री. वांग्याच्या जातीची एक वनस्पती.

**चिंचु(चो)रटे-डे** न. चिंचुरटीचे फळ.

**चिंचेचे तकू** गाभुळ्या चिंचा वाटून त्यात तिखट, मीठ घालून केलेला पदार्थ.(व.)

**चिंचोका, चिंचोरा-री** पु. चिंचेची बी : 'सर्वज्ञे म्हणीतलें : चींचोरीचीया आसू करा : दामनियांचे दाम करा :'- लीचए ५६.

**चिंचोणी** स्त्री. चिंच दाट कोळून त्यात गूळ, खोबऱ्याचा कीस, चारोळी घालून सर्वपित्री अमावस्येला करतात तो पदार्थ. (व.)

**चिंचोळके** वि. निमुळते: 'बुडाशी चिंचोळकं झालेलं अभिषेकपात्र' – पुत्र २२.

**चिंचोळा** वि. निमुळता; निरुंद; अरूंद होत जाणारा; चिवळ; (हत्तीच्या सोंडेप्रमाणे) क्रमाने बारीक होत जाणारा : 'धाडधाड करीत वरच्या माळाचा चिंचोळा जिना ते चढू लागले.'- एल्गार २९.

**चिंचोळा** पु. १. दिव्याच्या वातीची काजळी. २. कोळीष्टक. पहा : **चिंचळा**

**चिंटुकली** वि. चिटुकली, लहान: 'त्या गादीवर निळीच चिटुकली उशी.'- कोउ ६३.

**चिंतक** वि. चिंतणारा; चिंतन करणारा; इच्छिणारा; मनात आणणारा, बाळगणारा. (समासात) शुभचिंतक, अनिष्टचिंतक. [सं.]

**चिंतणी, चिंतवणूक** स्त्री. चिंतन करणे; विचार करणे; (गुरूच्या उपदेशाचे) मनन करणे. [सं. चिन्त्]

**चिंतणे** सक्रि. १. चिंतन, विचार करणे; मनात धरणे, योजणे. २. (काही एक गोष्ट कधी होईल, कशी होईल इत्यादी संबंधाने) विचार करणे. ३. इच्छिणे; देवाजवळ मागणे. (कल्याण, शुभ, अकल्याण.) ४. मनात रचणे, कल्पिणे, धरणे. ५. (शिकलेला ऐकलेला विषय) मनात घोळवणे; मनन करणे. [सं चिन्त् =विचार, मनन करणे]

**चिंतन** न. मनन; ध्यान; विचार करण्याची क्रिया; ध्यास. [सं. चिन्त्]

**चिंतनिका** स्त्री. (सास.) चिंतनशील विचारगर्भ काव्य; मानवी जीवन आणि मुख्यत्वे मानवाचे आत्मिक जीवन यासंबंधी सखोल विचार ज्यात अभिव्यक्त झाला आहे असे काव्य. [सं.]

**चिंतनीका, चिंतना- नी** स्त्री. मनन; ध्यान; विचार (विशेषत: गुरूने शिकविलेल्या गोष्टी मनात साठविण्यासाठी) मनन; चिंतन करणे.

**चिंतनीय** वि. मनन, ध्यान, विचार करण्यास योग्य; ज्यांचे ध्यान, मनन, चिंतन करायचे ते. [सं. चिन्त्]

**चिंतलमक्ता, गुत्ती** पु. स्त्री. मोठ्या प्रमाणावर लावलेला कर.

**चिंतवणी-न** स्त्री. काळजी; चिंता : 'जया सर्वत्र सर्वपणें। सर्वांही काळीं असणें। जें पावूनि चिंतवणें। हिंपुटी जाहलें।'- ज्ञा १२.४३; 'पाडियेलों वनीं थोर चिंतवनीं। उशीर का अझूनि लावियेला।' – तुगा १६०६. [सं. चिन्त्]

**चिंता** स्त्री. काळजी; धास्ती; आच; घोर. [सं.]

**चिंताकुल-क्रांत-ग्रस्त-तुर-न्वित** वि. काळजीने ग्रासलेला; खंगलेला; गांजलेला.

**चिंतागती** वि. चिंताग्रस्त; काळजी करणारा : 'एवढा वेळ आई चिंतागती बसली होती-' परणी ९५.

**चिंताग्नि- ग्नी, चिंताज्वर** पु. पराकाष्ठेची काळजी; घोर चिंता; चिंतारूपी अग्नि, ज्वर, ताप.

**चिंताचूर** वि. चिंताग्रस्त; चिंता करण्यात गढून गेलेला : 'भोवतालची मंडळी सदैव चिंताचूर दिसू लागली.'- श्रीयो १४.

**चिंतामणि-णी** पु. १. चिंतलेली इष्ट वस्तू देणारे स्वर्गीय रत्न : 'कां चिंतामणि जालया हातीं । सवा विजयवृत्ति मनोरथीं ।' – ज्ञा१.२४. २. गणपती; गणेश :'धुंडी विनटला तुझ्या चरणीं । दयाळू तूं चिंतामणी।'-चिंवि २.६. ३. परीस; ज्याच्या स्पर्शाने लोखंडाचे सोने होते तो कल्पित दगड : 'चिंतामणीचा होता स्पर्श। सुवर्ण करी लोहास।'- गुच ५.६८.४ (उप.) चिंचवणी; चिंचेचे पाणी.

**चिंतामणि-णी** वि. मानेवरील केस खुरापर्यंत असणारा (घोडा).

**चिंतावणे** अक्रि . काळजी करणे; काळजीत, विवंचनेत पडणे : 'मग समुद्रपति चिंतावला।'- जैअ १५.३३.

**चिंतावस्था** स्त्री. (मानस.) शंका- कुशंका व भीतीने युक्त आणि मानसिक ताणाची अवस्था. बहुसंख्य मनोविकारांचे मूलकारण.

**चिंतित** वि. चिंतलेले; मनात आणलेले; मनन केलेले. [सं.]

**चिंतू (छाप) सोने** न. विशिष्ट कस निर्देशित करणाऱ्या छापाचे सोने. चिंतू पटवर्धन या नावाच्या सराफाची मुंबई येथील पेढी सोन्याचा कस ठरवून छाप मारून देत असे यावरुन : 'शिक्षकानें स्वार्थत्याग केला पाहीजे असा घोष पूर्वी कधीं काळीं सुरू झालेला आहे तो जशाचा तसा चिंतू सोन्याप्रमाणे अखंड टिकून आहे.' – साधा १६

**चिंत्य** वि. विचार करायला योग्य; मननीय; लक्षात घेण्याजोगा. [सं.]

**चिंदडी, चिंधुडी, चिंदी, चिंदीचोळा, चिंधुकली, चिंदोडी** पहा : **चिंधी**

**चिंदर, चिंधी** स्त्री. चिरगुट; फाटके वस्त्र : 'मग महिले चिंदर घालुनु ... पुसती तेयाचे ।।' – क्रिपु ४६.११२.

**चिंदीचांदी** स्त्री. फाटलेले वस्त्र, लहान चिंध्या: 'पण काही झोपड्या पोत्या– तरटांनी उभ्या केल्या होत्याच. त्यावर पुन्हा वाकळा – लपेटांची, चिंद्या – चांद्याची भर टाकली होती.'– हातभट्टी १२.[ध्व.]

**चिंधडी** स्त्री. १. (चिंधीचे तुच्छतादर्शक रूप). जीर्ण व फाटक्या कापडाचा तुकडा; सुडके रगटे. २. कपची; चिरफळी; झिलपी; ढलपी. (वा.) **चिंधड्या उडणे, चिंधड्या उडून जाणे** – चिंध्या होणे; तुकडे तुकडे होणे; नाश होणे.

**चिंधा (धी) चोळा** पु. (उप.) चिरगूट; पांघरूण. (वा.) ० **करणे** – सुंदर वस्तूचा, गोष्टीचा विध्वंस करणे : 'केवळ द्वारकेप्रमाणे दिल्ली नांदत होती. ऐशा शहराचा चिंधीचोळा केला.'– भाब २३.६.

**चिंधा (ध्या) देवी** स्त्री १. जिला रस्त्याने जाणारे लोक चिंध्या अर्पण करतात अशी रस्त्यावरील देवता (या चिंध्या रस्त्याच्या बाजूस असलेल्या झाडास बांधतात). २. (ल.) चिंध्या गाळणारी, नेभळट. ३. एका काठीला चिंध्या गुंडाळून केलेली मुलींच्या खेळातील देवी.

**चिंधी** स्त्री . कापडाचा, जमिनीचा , अरुंद पण लांब असा वाकडातिकडा किंवा सरळ तुकडा, पट्टा, पट्टी; फाटलेले वस्त्र; पटकूर. [सं छिद्]

**चिंधीचीरकुटी** स्त्री. फाटके तुटके वस्त्र : 'चिंधीचीरकुटी नेणो कैची मिळेल' – सुआ २७४. [सं.]

**चिंधुकली** स्त्री. चिंधूक याचा लघुत्ववाचक शब्द; लहान चिंधी; लंगोटी.

**चिंधूक–ट** न. (उप.) लहान चिंधी; फटकूर; क्षुल्लक वस्तू : '... एकदा हुंडा दिला की, मग एक चिंधुकदेखील मिळायचे नाही..'– पलकोघे.

**चिंधोटी** स्त्री. चिंधी; धांदोटी; चिरफळी.

**चिंध्यादान** न. अत्यंत क्षुद्र किंवा टाकाऊ गोष्ट देणे : 'अस्मद्‌गान नव्हे 'गान' ते गाना चिंध्यादान...' – केक.

**चिंध्यापीर** पु. १. ज्या पीराला चिंध्या वाहतात तो. २. (उप.) गोधड्याबुवा, चिंध्याबुवा, पटकुऱ्याबुवा.

**चिंपाट** पहा : **चिनपाट**

**चिंपांझी** न. आफ्रिकेतील एक जातीचे गोरिलापेक्षा लहान माकड. पुच्छहीन माकडाची शिकवून तयार होणारी एक हुशार जात. [इं.]

**चिंब** न. बांबूची कामटी, कांबीट इ.

**चिंब** न. पूर्णपणे न पोसलेली शेंग.

**चिंब** वि. ठिबकण्याइतका भिजलेला; चिबचिबीत, थबथबलेला; भिजलेला. [सं. स्तिम्]

**चिंब** पहा : **चिंबचॉल;** भाताचा पोकळ दाणा : 'साल्याची आजची पैली मल्नी आसाल. सग्ला चिंब घात्लान्.' – अउआ १२५.

**चिंबका** वि. १. चेंबटलेला; चपटा; बसकटलेला. २. सुरकुत्या, वळ्या, चिरम्या पडलेला; चिरमुटलेला.

**चिंबचळे** न. न भरलेला दाणा (मुख्यत्वे भाताचा).

**चिंबचॉल** पु. भाताचा तांदूळ नसलेला पोकळ दाणा : 'चिंबचॉल सेत्चा आनि थोटामोटा पोटचा.' – अउआ ४४.

**चिंबट** स्त्री. (अव. चिंबटा) बांबूची कामटी, पट्टी; कांबीट : 'बांबूच्या बारीक बारीक चिंबटा करून उभ्या आडव्या बसवीत.' – कृवि ४८६.

**चिंबट, चिमट** वि. १. चिवट (लाकूड). २. सुरकुत्या, वळ्या पडलेले. ३. हिरवट; कच्चे; पूर्णपणे न पिकलेले; आत रस, द्रव असलेले (धान्य, कणीस). ४. आंबट ओले; पूर्णपणे न वाळलेले (वस्त्र इ.).

**चिंबटणे** अक्रि. १. चिमटा घेणे. २. चिमटणे; दाबणे; पिळणे; चेंगरणे.

**चिंबणे** अक्रि. चिरमुटणे; सुरकुतणे. (फळ इ.); आकसणे (लाकूड) कातडी.

सक्रि. १. चेपणे; दाबणे; दाबून एकत्र करणे. २. चिरफाळणे; पिंजणे. [क. चिंपु]

**चिंबपोल** न. भाताचा, वरीचा, साव्याचा, कडधान्याचा न पोसलेला, न भरलेला दाणा; पोचट, पोकळ दाणा.

**चिंबवणी** न. पुन्हा पाणी देऊन भिजविणे : 'पुनः तीन चार दिवसांनी (हळदीला) चिंबवणी म्हणजे दुसरे पाणी द्यावे लागते.' – गार १५.

**चिंबळ** स्त्री. डोक्यावर ओझे घेताना ते डोक्याला रुतू नये म्हणून डोक्यावर ठेवण्यासाठी केलेले कापडाचे, गवताचे वेटोळे; चुंबळ.

**चिंबळणे** सक्रि. चिमटणे, दाबणे.

**चिंबा** पु. फुलोरा. (व.)

**चिंबा** वि. १. चिरम्या, सुरकुत्या, वळ्या पडलेला; आकसलेला. २. चापटलेला; दाबलेला; चेंगरलेला; चेचलेला; चिरडलेला.

**चिंबिवणे** सक्रि. चिरून लिबलिबित करणे : 'डोसकं कोयता घालून चिंबीवल्यागत झालं.' – खळाळ २३.

**चिंबुता** पु. भाला; तीराला असलेले पोलादी पाते.

**चिंबू** पु. आवळ गळ्याचे पाणी घ्यावयाचे एक भांडे; चंबू. (गो.)

**चिंबू(भू)ळ** स्त्री. (को.) चुंबळ. पहा : **चिंबळ**

**चिंबोणी** न. उसाची लागवड केल्यावर त्याला पाच सहा दिवसांनी द्यायचे पाणी. पहा : **अंबवणी**

**चिंबोरा–री चिंबो(भो) रा–री** पु. खेकड्याची एक जात : 'चिंभोऱ्या पकडण्याकरिता लोक खलाटीतून हिंडताना दिसत.' – आआशे १६९.

**चिंबोळी** स्त्री. चिंधी; चिंधडी : 'त्या इसमाच्या आवाजाच्या चिंबोळ्या होऊन त्याला बोलतां येईना.' – मरं ३०.

**चिंभ** न. पूर्णपणे न भरलेली, दाणा काढून घेतलेली शेंग. पहा : **चिंब**

**चिंभाटी** स्त्री. बांबूची एक अगदी बारीक जात.

**ची** पहा : **चि, च**

**ची** स्त्री. (कुस्तीतील) पराभव, दुर्बलता कबूल करण्याचा शब्द. [ध्व.]

**चीक** पु. १. (वड, उंबर, रुई, शेर इत्यादी झाडांचे) दूध; चिकट पदार्थ; (बाभूळ, निंब इ. झाडांचा) डिंक. २. नुकत्याच प्रसूत झालेल्या स्त्रीच्या, नुकत्याच व्यालेल्या गाय, म्हैस इत्यादी पशूंच्या स्तनांतील चिकट दूध. ३. बलक; गोंद. ४. चिकवड्या अथवा पापड्या बनविण्यासाठी शिजवलेले तांदळाचे पीठ. ५. केळीच्या सोपटापासून किंवा गहू इत्यादी धान्ये भिजत घालून वाटून त्यापासून काढलेले सत्त्व. ६. तिळाच्या तेलात काढलेले चमेलीचे सत्त्व. [सं. चिक्कण] (वा.) **चिकीत, चिक्कीत असणे –** अपरिपक्व अवस्थेत असणे; चीक भरलेल्या स्थितीत असणे : 'बागायती शाळू अजून हुरड्यात आहे. काही चिकींत आहे.' – गार १०७. **चिकी भरणे –** धान्यात रस उत्पन्न होणे; दाणा भरणे : ही पिकें ऐन चिकीं भरण्याच्या वेळींच वाळून गेल्यामुळें.' – के १०.११.१९३६.

**चीकसा** पु. सुगंधी उटणे : 'ओलणी तेल चीकसा आणिला' – लीचपू ११५.

**चीच** पहा : **चिंच**

**ची ची** स्त्री. छी थू.; फजिती; पराभव : 'जिकडेतिकडे होते चीची। अवलक्षणें।'–दास १९.३.२४.

**ची ची** स्त्री. फोलपणा; क्षणभंगुरता; निरर्थकता : 'काया माया दों दिसांची। आदिअंतीं अवघी चीची।' – दास १५.८.३८.

**चीची माशी** स्त्री. आफ्रिका खंडातील एक विषारी माशी.

**चीज** स्त्री. वस्तू; गोष्ट; (सामा.) चित्ताकर्षक, चमत्कारिक, सुंदर वस्तू, गोष्ट : 'या मुंबईत जगातल्या सर्व चिजा भरल्या आहेत.' – पापू ३. [फा.]

**चीज** स्त्री. १. गाणे; पद. २. लकबीने गाण्याकरिता रचलेले पद : 'अमक्या अमक्या चिजा आमचे गुरुजी...' – गाविदि ७. [फा.]

**चीज** न. सार्थकता; सफलता. उदा. याने माझ्या श्रमाचे चीज केले. (क्रि. करणे, होणे).

**चीजवस्तू** स्त्री. सामानसुमान; भांडीकुंडी; वस्त्रप्रावरण वगैरे. जंगम मिळकत; मालमत्ता : 'चोरांनी त्याची सर्व चीजवस्तू लांबविली.' – गुमा १०८.

**चीझ** न. दह्यापासून केलेला एक खाद्य प्रकार; खमीर. [इं.]

**चीट** न. पातळ, रंगीत, वेलबुट्टीदार कापड; छाप काढलेले कापड; छीट : 'मुली कशा छान छान चिटं नेसून येतात.' – दुर्दम्य २६०. [पोर्तु.]

**चीड** स्त्री. १. चिरड; तिटकारा; घुस्सा; राग; संताप; तिडीक; नाराजी. २. शीघ्रकोपीपणा; रागीटपणा. [हिं. चिढना]

**चीड** न. वृक्षविशेष : 'हिमालयाच्या उतारावर ... २००० ते २५०० मीटरपर्यंतच्या उंचीवर चीड या नावाची झाडे विपुल आहेत.' – वसृ २१९.

**चीड** पु. कोयंड्यासह असलेला कलदार रुपया. हा कंजारणी स्त्रिया गळ्यामध्ये घालतात.

**चीडारू** न. कोंबडे : 'आवो : मातांगाचे चीडारू होयचि म्हणे :' – गोप्रच ६२.

**चीडीमुंगी** स्त्री. किडामुंगी : 'नारायन देव सांगाया लागला ऐकी महादेवा, चीडीमुंगीला पशुपंगशाला सगळ्यालेच जोडा आहे अन् तूलच तो नसावा ह्या काय बरा दिसत नाय.' – आलो ४४.

**चीण** स्त्री. १. (वस्त्रादिकांस पडलेली) सुरकुती; (परकर, विजार इत्यादिकांस घातलेली) चुणी; निरी. २. (जमीन, भिंत इत्यादिकांस पडलेली) भेग; चीर; फट. [सं. चि]

**चीण** स्त्री. १. घराला ओल येऊ नये म्हणून चिणून बसविलेला दगडाचा थर. २. चांगली ठोकलेली, चोपलेली जमीन. (को.) [सं.चि]

**चीत** वि. १. कुस्तीत पराभूत होऊन उताणा पडलेला; जमिनीला पाठ लागलेला. २. (ल.) जमीनदोस्त केलेला; नासधूस झालेला; खराब झालेला; व्यापारात गमावलेला (पैसा). ३. (कवड्यांच्या खेळात) उताणी पडलेली (कवडी). ४. चिताड; खरडलेले; गिचमिड लिहिलेले. [सं. जित] (वा.) **० करणे** – जमीनदोस्त करणे; ठार मारणे; उताणा पाडणे; पराजित करणे.

**चीतपट कुस्ती** कोणीतरी चारी मुंड्या चीत झाल्याशिवाय न सुटणारी कुस्ती.

**चीत्कार** पु. हत्तीचे ओरडणे : 'हत्तींच्या चीत्कारांनी आसमंत..' – अआमागो २४. [सं.]

**चीन** पु. न. रताळ्याची एक जात.

**चीन** स्त्री. चुणी; टीप.

**चीन** स्त्री. १. (प्र.) चीण (कपड्याला, कापडाला पडलेली) सुरकुती; चुणी; निरी. २. (जमिनीतील, भिंतीतील) फट; भेग. [फा.]

**चीप** स्त्री. १. दगड, लाकूड, सोने इ.चा पातळ, सपाट तुकडा; पाचर; कपची; धलपी : 'विविधा औत्सुक्यांची दाटी। चीप दाटत होती कंठी।' – ज्ञा १८.१५५६. २. (चर्म.) टाचेचा मागचा भाग उजरण्याकरिता, सुधारण्याकरिता लावलेला चामड्याचा तुकडा. [सं. चिपिट]

**चीप** न. खाडीतून, खाऱ्या दलदलीतून वाढणारे, ठेंगणे पण फैलावणारे एक प्रकारचे झाड : 'तेथेंच आज खारवट पाण्यावर पोसणारीं ही दळभद्रीं इंपळीचीं व चिपीचीं झाडें मातलीं आहेत.' – सपा ९४. (को.)

**चीप** स्त्री. फुलांची माळ. पहा : **तुरा**

**चीप** स्त्री. (विशेषतः लहान मुलांना होणारा) आतड्यांचा एक प्रकारचा विकार. [सं. चिपिट]

**चीप – ब** वि. ओलाचिंब; निथळता; थबथबीत; चबचबीत. [ध्व.]

**चीप** क्रिवि. लवकर; जलद. [सं.क्षिप्रम्]

**चीप** क्रिवि. चिरडलेले; चेपलेले : 'घोड्याचा खुरखी जाता : माणुसे चीप जाली '– शिव ५५६.

**चीपतळ** पु. लहान चीप; दगडाचा लहान पातळ तुकडा : 'डावां स्त्रीकरीं काळी इट : अुजिवा स्त्रीकरीं चीपतळ :' – लीचउ ६३२.

**चीपी** स्त्री. दाटी : 'तेथ रवीची जाली थोर : असंक्षात आत पडले पायाचे मोगर : चीपीआंतौनी दडपले आतुर : येरयेरांचे '– रुस्व २१७५.

**चीम** पु. १. आमरस. २. पन्हे. (व.)

**चीमा** पु. चिमखडा; लहान खडा : 'बुंथी आंतु झाकुनि घेउनि एतें असति : गोसावी चीमेनि हाणीतलें :' – लीचउ १०१.

**चीमोरा** पु. चिमटा : 'रात्रीं इंद्रभट गौराइसांसि कोपों लागले : चीमोरे घेति : इसाळु केला :' – लीचपू ३९८.

**चीय** पु. एक पक्षी : 'अंगाने बारीक साधारण चिमणीएवढे पोपट आढळतात. त्यांच्या शेपटीच्या आरंभी लाल रंग असतो. त्यांना त्यांच्या

ओरडण्यावरूनच चीय असे नाव दिलें आहे.' – पद ६७.

**चीर** न. वस्त्र; कपडा; (सामा.) अंतर्वस्त्र : 'पांचवण चीर नेसो देतसा' – उगी १२१. [सं.]

**चीर** स्त्री. १. फट; भेग; तडा. २. (बायकी) कुंकवाची चंद्रकोर लावण्याची चांदीची काडी. ३. कुंकवाची कपाळावर काढलेली आडवी रेघ.

**चीर** न. एक प्रकारचे झाड. या जातीच्या झाडांपासून राळ तयार करतात. यापासून टरपेंटाईन निघते. याला इंग्रजीत पाईनचे झाड म्हणतात.

**चीर** पु. १. जंबियाचा एक डाव. बेंबीच्या उजव्या बाजूला मारून डावीकडे चिरत जाणे. २. शत्रूंच्या पायांमधून वर करावयाचा लाठीचा वार. ३. फरीगदग्याचा वरीलप्रमाणे वार.

**चीरक** पु. कस्तुरी पक्ष्याच्या समूहातील पक्षी. रॉबीन. वर खेचलेली शेपटी फिरवीत आवाज करीत हिंडणारा. रंग थोडा तपकिरी चकचकीत काळा कायम उभारलेल्या शेपटीच्या बुडाशी तपकिरी रंगाचा भाग दिसतो.

**चीरचोळी** स्त्री. मकर संक्रांतीच्या दिवशी सुवासिनी स्त्रिया एकमेकींना जे चोळी आणि लुगड्याचे वाण देतात ते; लुगडेचोळी : 'मग म्हाइंमटीं चीर चोळी घेतली.' – गोप्रच ५२.

**चीरणी** स्त्री. दाटी : 'इकाची चीरणी चीरिली' – गोप्रच ९९.

**चीरणे** सक्रि. रचना करणे, लावणे : 'ते अवघेयांते बुधि सीकवी : ऐसी वागुर चीरिजे : ऐसी मांडिजे :' – लीचअ ४४.

**चील** स्त्री. एक निकृष्ट पालेभाजी : 'भणंग कंगाल अन्नरहित, वस्त्रानें रहित, कळाहीन चीलाची भाजी खात आले.' – भाब १४२. पहा : **चिलघोळ**

**चील** स्त्री. १. भेग; फट; चीर. (राजा.) २. खिंड; बोळ; दरी; चिलण.

**चील** स्त्री. पोते (गोणपाटाचे). (गो.)

**चील** स्त्री. राजपुऱ्याचे झाड.

**चील** न. चामड्याला लागलेले मांस.

**चीला** पु. आंबोळीचा एक प्रकार : 'झाकण तापल्यावर काढावे व चीला उलटावा.' – पाकसिद्धी २७०.

**चीळ** स्त्री. (स्तन, सडातून) एकदम निघणारी दुधाची चिळकांडी; पान्हा. [ध्व.]

**चीं चीं** उद्गा. पराभवाच्या कबुलीचा वाचक शब्द.

**चींपुली** पहा : **चिपुळी**

**चुई(य)टी, चुइटी, चुई, चोय** स्त्री. १. पत्रावळीची पाने जोडण्यासाठी केलेली बोरूची, बांबूची बारीक काडी, चोय, चोई, चोयटी. २. फणीला, कंगव्याला असलेली बांबूची बारीक सळई. ३. डफावरील बोल काढण्यासाठी वापरायची लवचीक वेताची काडी. [सं. सूचि]

**चुइटी** स्त्री. उसाच्या गर्डेरीचा, जोंधळ्याच्या ताटाचा चावून राहिलेला चोथा. [सं. चिपिट]

**चुइटी** स्त्री. घोड्याच्या आयाळाच्या केसांच्या वळलेल्या वेणीस जोडलेली साटणीची, फितीची चिरमी, धांदोटी, चिंधी, पट्टी.

**चुकचुक** स्त्री. हुरहुर, अस्वस्थपणा; पश्चाताप (क्रि. वाटणे.) : 'जायच्या वेळी आईची आठवण काढलीन ह्याने आम्हाला चुकचुक लागली.' – रथचक्र १२१. [ध्व.]

**चुकचुक** स्त्री. पालीचा आवाज; काही जातीच्या पक्ष्यांचा आवाज. [ध्व.]

**चुकचुक–का** क्रिवि. चुकचुक अशा शब्दाने; चुकचुक असा आवाज करीत. [ध्व.]

**चुकचुकणे** अक्रि. १. पालीचे, काही विशिष्ट पक्ष्यांचे चुक्चुक् आवाज करणे. २. (ल.) हळहळणे : 'आठदहा लोक दूर उभे राहून चुकचुकत होते.' – पेरणी ८७.

**चुकटी** स्त्री. १. चिमूट. २. हाताचा अंगठा व मधले बोट यांनी वाजणारी चुटकी. पहा : **चटकी** [हिं. चुटकी] [ध्व.]

क्रिवि. कचकचा; कडकडून : 'मोठी आरभटी करूनि चुकटी दंतावळी चावुनी।' – आसीस्व ४२.

**चुकटी** स्त्री. (एखाद्या कामातील) खुबी; हातखंडा; प्रावीण्य. (क्रि. साधणे, येणे, बसणे.)

**चुकटी** स्त्री. भुकटी; पूड.

**चुकणे** अक्रि. १. चूक, प्रमाद करणे; नको ते करणे; अपराध करणे. २. मार्गापासून चळणे; बहकणे; भकणे; भलत्या रस्त्याला जाणे : 'उंडळ उंडळ चुकों नये। हेकाडपणें।' – दास १४.४.१३. ३. कामात कसूर, कुचराई, कामचुकारपणा करणे. ४. (नेम, लक्ष्य इ.) न साधणे; न लागणे; अंतरणे: हुकणे : 'वाटा लागे तरी गगना भेटे । एऱ्हवीं चुकें।' – ज्ञा ८.२५३. ५. व्हावयाचे टळणे; न घडणे. ६. (इष्ट, योग्य वेळात, पद्धतीत) कमी किंवा जास्त होणे. ७. संख्येमध्ये आकड्याचा फरक पडणे, लागणे; आकडा कमी येणे. ८. गफलतीने, नजरचुकीने वगळला, टाकला जाणे; गळणे. [सं. च्यव्] (वा.) **चुकल्या चुकल्यासारखे होणे** – आपल्या सवयीचे माणूस किंवा वस्तू जवळ नसल्यामुळे, परक्या ठिकाणी गेल्यामुळे मनास अस्वस्थ वाटणे.

**चुकणे** अक्रि. १. (हिशेब) चुकता करणे; फेड करणे; निवाडा होणे; कज्जा तुटणे. २. (एखादे काम, गोष्ट) केली जाणे. [सं. च्यव्]

**चुकणे** सक्रि. (एखाद्यास चुकणे) एखाद्याकडे दुर्लक्ष करणे किंवा एखाद्यास विसंबणे किंवा एखाद्याबद्दल उदासीन राहणे : 'तेव्हा ते दोघे नांदीवशास गेले आणि आईच्या चरणावर मस्तक ठेवून समजाविते झाले की आम्ही सोमाजीरावास चुकणार नाही.' – दसशिमोइ प्र.४.

**चुकतचु(मा–वा)कत** क्रिवि. चुका करीत; काही चूक काही बरोबर अशा रीतीने अडखळत : 'चुकत वांकत आठवलें। इतुकें संकळित बोलिलें। न्यूनपूर्ण क्षमा केलें। पाहिजे श्रोतीं।' – दास १३.५.१९. [चुकणे द्वि.]

**चुकता** वि. १. पुरा केलेला; बाकी नसलेला (हिशेब); फेडलेले (कर्ज); निकालात काढलेला; तोडलेला; मिटवलेला (कज्जा, दावा, खटला). २. पुरता; पूर्ण : 'साहेबांची गाडी पुसता पुसता तू अगदी चुकता ड्रायव्हर झालास की रे !' – कॉन्ज ९०.(वा.)**० करणे, ० करून देणे**– १. निकालात लावणे. २. बाकी राहिलेला (हिशेब), शिल्लक असलेले (कर्ज), वादग्रस्त असलेला (हप्ता), निकालात काढणे : 'करा माझा पगार चुकता ! हा मी चाललो.' – संक ५.

**चुकर** वि. गोंधळलेला; घाबरा; बावरा; आश्चर्याने थक्क झालेला.

**चुकर** स्त्री. टंचाई.

**चुकरा** वि. चुकणारा; चुका करणारा.
पु. चुकामूक; भेट न होणे. (क्रि. पडणे).
**चुकराइ–ई** स्त्री.दीनपणा; उदासपणा : 'तुमचे पत्र बहूत चुकराईचे आले ते ऐकोन चित्तास बहूत श्रम जाहले' – ऐको ३८२.
**चुकलामा(वा)कला** वि. नजरचुकीने राहून गेलेला; दखल घेण्याचे राहिलेला; योग्य वेळी हजर न राहिलेला; वाट चुकून भलतीकडे गेलेला. [चुकला द्वि.]
**चुकवती, चुकती** स्त्री. कर्जाची फेड; तडजोड; कर्जाचा निकाल लावणे.
**चुकवाचुकव–वी** स्त्री. १. टंगळमंगळ; अळमटळम; (एखादे कार्य आपल्याला करावे लागेल म्हणून कुचरपणे केलेली) टाळाटाळ; उडवाउडव; आज उद्या करणे; दुर्लक्ष करणे. २. (अनेक देण्यांचा, कज्यांचा) निकाल; तडजोड; वारावार. [चुकवणे द्वि.]
**चुकविणे** सक्रि. १. (नजर) टाळणे; झुकविणे; चुकवाचुकव करणे; झुकांडी देणे. २. घोटाळ्यात पाडणे; चूक करावयास लावणे; फसविणे. [चुकणे प्रयोजक]
**चुकविणे** सक्रि. (कज्जे, देणी इ.) निकालात काढणे : 'सदर अदालतीने जिल्हे कोडतांचे निवाड्यावरिल अपिलें चुकवावी.' – न्यासे ४. [चुकणे प्रयोजक]
**चुका** पु. चूक; घोटाळा : 'परांतरासि न लावावा ढका। कदापि पडो नेदावा चुका।' – दास १२.१०.२०.पहा : **चूक**
**चुका** पु. हिशेबाचा निकाल.
**चुका–क्रा** पु. १. एक प्रकारची औषधी वनस्पती. २. एक पालेभाजी; आंबटचुका. [सं.चुक्रिका]
**चुकाऊ** वि. (काम, कर्तव्य) टाळणारा; चुकविणारा; (कामात) कुचरपणा, टंगळमंगळ करणारा.
**चुकाचूक** स्त्री. १. फार मोठी चूक; घोडचूक; घोटाळा; गोंधळ. २. चुकामूक; गाठ न पडणे. [सं.युच्छ्]
**चुकाभुका** वि. क्षुल्लक. (झाडी)
**चुकामुकी–मूक** स्त्री. १. भेट ठरली असूनही ती चुकणे व गाठ न पडणे : 'चुकामुकी माजि माय देखतांचि वाडेकोडें बाळ जसें गळा पडे।' – अमृतध्रुव ६. २. योजलेल्या अनेक साधनांत मेळाचा, ऐक्याचा अभाव. [चुकणे द्वि.]
**चुकार–री–रू** वि. वाट चुकलेले; भटक्या मारणारे; हरवलेले (जनावर, वस्तू). हरवलेले जनावर, वस्तू परत सापडल्यावर त्यासंबंधीही हा शब्द योजतात. (वा.) **चुकाऱ्या जाणे** – चुकणे; नाहीसे होणे; मरणे. नाश पावणे : 'पणतोंडें भक्षितो पणजा। मूल बापास मारी वोजा। चुकाऱ्या गेला राजा। चौघां जणांचा।' – दास १५.५.२.
**चुकार–री–रू–वू** चुकारतट्टू; कामाची टाळाटाळ, टंगळमंगळ करणारा; कुचराई करणारा : 'ही आमची खेडेगावची माणसे म्हणजे अशी चुकारतट्टू' – समक ११३.
**चुकारा** पु. १. पैसे चुकते करणे, मजुरी देणे. २. खंडणीची चुकती किंवा चुकोती; फेड : 'भदावरचाहि चुकारा (खंडणीची चुकती) जाला.' – ऐको ३८२.

**चुकावणा** वि. चुकार; चुकारतट्टू; चुकवाचुकव करणारा.
**चुकावणी** स्त्री. नजर चुकविणे; टाळणे; डोळा चुकविणे.
**चुकाव(वि)णे** सक्रि. १. चुकविणे; खोटे करणे : 'लोकीं केलें तें चुकावी। लोकिं भाविलें तें उलथवी।' – दास ११.१०.११. २. टाळणे; नजर, डोळा चुकविणे : 'मातें करीं धरिल देखुनि एक लीला। चाले चुकवुनि पुढें चमकोनि घोषा। बिंबाधरा शशिमुखीं पिकमंजुघोषा ।' – आकं३. [चुकणे प्रयोजक]
**चुकांडी** स्त्री. झुकांडी; दृष्टी चुकवून पळून जाणे; हातावर तुरी देऊन पळून जाणे; फसविणे.
**चुकी** स्त्री. १. चूक : दोष; अशुद्धता. २. अपराध. ३. अपराधाबद्दल शिक्षकाने केलेली शिक्षा. (वा.) ० **ठेवणे** – दोष लावणे; मागे सारणे, टाकणे : 'जे साहित्यातें वोजावी। अमृतातें चुकी ठेवी। गोडिसेंपणें।' – ज्ञा १३.१२५६.
**चुकी** स्त्री. तांब्याएवढी टोपली. (झाडी) [सं. चुलूक]
**चुकीची अर्जी** पुरवणी अर्ज; अधिक खुलासा करणारा अर्ज.
**चुकीभुली** स्त्री. चूक : 'चुकीभुली ते चाटेयांही सांगति–लीचपू १५.
**चुकु(कू)र** पु. १. भ्रम; भ्रांती. २. चुकवाचुकव.
वि. आश्चर्याने चकित झालेला; बावरलेला; गोंधळलेला : 'तुका म्हणे संग देशी कोण्या काळीं। चुकूर दुर्बळी होतों आम्ही।' – तुगा. (वा.) ० **होणे** – दीन होणे : 'आपण अन्नाविण चुकुर जाहलो व मेलो तरी आपणांस वतन काय होये?' – ऐको ३८२.
**चुकूनमा(वा)कून** क्रिवि. चुकीमुळे; नजरचुकीने; दुर्लक्ष होऊन; यदाकदाचित; न ठरवता; सहजगत्या : 'चुकूनमाकून एखाद्याला हिंमत झालीच तर' – दुर्दम्य २. १७२.
**चुकूनसुद्धा** क्रिवि. चुकीनेदेखील (नेहमी अकरणरूपी प्रयोग).
**चुकूर काळ** भयंकर, मोठा दुष्काळ : 'सन ११९४ आपला लेक व भाऊ पोटाविण मेले. चुकुर काल पडिला. माणसे सुजलीं.' – ऐको ३८२.
**चुकूरपणा** पु. भ्रमिष्टपणा; बावरलेपणा : 'मंजुघोषा चुकुरपणे म्हणते. हं हं हें काय?' – मंजुघोषा ३५.
**चुकोट** वि. चांगले. (राजा.) पहा : **चोखट**
**चुकोति–ती** स्त्री. (कर्जाची) फेड; तडजोड; वारावार; घटवटना; व्यवस्था. पहा : **चुकवाचुकव** २.
**चुक्र** पु. १. एक पालेभाजी. पहा : **चुका**. २. धान्यापासून बनविलेला सिरका. [सं.]
**चुगई** पहा : **चुगली**
**चुगडी** वि. किरकोळ, थोडे; लहान पोते किंवा गाठोडे.
**चुगल(ली)खोर** वि. चहाडखोर; पश्चात निंदा करणारा; खोटेनाटे सांगणारा; कुटाळखोर; बालंटखोर; कुचाळखोर; तुफानखोर; कानाशी लागणारा; लावालावी करणारा.
**चुगली** स्त्री.चहाडी; गाऱ्हाणे; चहाड्या करणे; चहाडखोरी; लावालावी : 'वडिलांच्याकडे कोणी चुगली केली की काय कुणास ठाऊक.' – पवा २९.(वा.) ० **खाणे** – निंदा, लावालावी, कुटाळी करणे.
**चुगल्या** वि. चहाडी करणारा; चहाडखोर चुगली लावणारा.

**चुगी** स्त्री. १. मूठभर धान्य. २. गवताची किंवा कडब्याची पेंढी. ३. शहरात विकल्या जाणाऱ्या वस्तूवर बसविलेला कर.

**चुचकार(वि)णे** उक्रि. १. (बुजलेल्या जनावराला शांत करण्यासाठी) ओठांनी चूं चूं असा विशिष्ट शब्द करून गोंजारणे; थोपटणे. २. लाडीगोडी लावणे; आंजारणे गोंजारणे; मन वळविणे; समजाविणे : 'या नेमस्तांना चुचकारून नेणं हेंच आपल्या हिताचं आहे.' – दुर्दम्य ७१. [ध्व. चूं चूं +कर]

**चुचर, चुचरट** न. आंबा इ. फळांतील रेषा.

**चुचळा, चुचुरा** पु. समई मालवल्यानंतर लिकलिकत राहणारे वातीचे टोक; दिव्याचा काजवा, काजळी.(कु.)

**चुचा** स्त्री. १. लहान पक्षी पकडला, दुखावला गेला असता त्याने केलेला केविलवाणा आवाज. २. (ल.) आर्त, दुःखाचा आवाज. [ध्व.]

**चु(चुं)चावणे** अक्रि. १. (बंदुकीची गोळी) सणसणणे; झणकारणे; सूं सूं करणे. २. (उंदीर इ.) चूं चूं करणे. ३. हूं का चूं करणे; शब्द करणे.

**चुची** स्त्री. स्तनाचे बोंड : 'मग गोसावी तीची चुची तयाचां तोंडीं घातली' – गोप्रच ४.

**चुचु** स्त्री. पक्ष्यादिकांची चोच.

**चु(चू)चुक** न. स्तनाचे अग्र, बोंड : 'चुचुकाचिया चर्या' – उगी ६८.

**चुटकल** न. चिपळीसारखे एक गोंडी वाद्य. (ना.)

**चुटका** पु. १. अगदी लहान पण विनोदी, हास्यकारक गोष्ट, आख्यायिका, किस्सा, गाणे; उपहासपर पोवाडा; विनोदी कोडे, उखाणा; प्रहेलिका; अन्तर्लापिका इ. : 'गुणें वेधी भेदी रसिकचि कळा रम्य चुटका।' – दावि २२३. २. अनपेक्षित विरोध किंवा साम्य किंवा अर्थविपर्यासामुळे चमत्कार वाढविणारे वाक्य. [क. चुटकु.]

**चुटका** पु. (झोपेची) डुलकी. (क्रि. लागणे.) ३. (चिलमीचा, विडीचा) झुरका; (उसाचा रस, दूध, पाणी) घोट.(क्रि. घेणे.) [सं.सम् + उत्+कृत]

**चुटका** पु. तापवलेल्या लोखंडाने दिलेला डाग, चटका. (क्रि. देणे.)

**चुटका** पु. मनाला चुटपुट, हुरहुर लावणारी गोष्ट; मनाला लागणारी गोष्ट.

**चुटका** पु. (कर.) रहाटाला गुंडाळलेल्या पंचवीस फेऱ्यांचे सूत. [हिं.]

**चुटका–की** पु. स्त्री. पायातील जोडवे. (गोंडी)

**चुटकी** स्त्री. १. (हाताचा अंगठा व मधले बोट यांच्या संयोगवियोगाने वाजणारी) चिटकी; चुटचुट असा आवाज. २. चिमूट; चिमटी; हाताचा अंगठा व मधले बोट यांच्या चिमटीत राहील इतका कोणत्याही पदार्थाचा अंश; चुटकी. ३. चुटकी वाजविण्यास लागतो इतका वेळ; अत्यंत अल्प काळ. [सं.छोटिका]

**चुटकी** पहा : **चुंगी**

**चुटकीसरसा** पहा : **चुटकी** : 'विधानसभेच्या सभागृहांत बाजू बदलली की, पक्ष बदलला इतका राजकीय प्रवास चुटकीसरसा होऊं नये' – रचिं ४७.

**चुटकुला** पु. छोटासा चुटका.
वि. छोटा; चिमुकला; इवलासा; लहानगा; चिटकुला.

**चुटक्यांचे मांडव** पहा : **चटक्यांचे मांडव**

**चुटचुट** क्रिवि. दूध वगैरे पिताना होणारा तोंडाचा आवाज : 'तिचं अधरामृत चुटचुट पिईन' – उःशाप ४२६. [ध्व.]

**चुटपुट** स्त्री. तळमळ; चडफड; हुरहुर; खुरखुर; पश्चात्तापाचा चटका; न करावी ती गोष्ट केल्यामुळे, न आवडणारी गोष्ट झाल्यामुळे होणारी मनाची चडफड : 'काशीबाईना उगाच चुटपुट लागून राहिली.' – राऊ १९७.

**चुटपु(पु)ट–टा, चुटपुटता, चुटपुटीत** वि. १. बेताचा; अगदी मोजका; हवा असेल तितकाच; आटोपशीर; अल्प; जेमतेम पुरेल इतका. (क्रि.होणे.) २. ओझरते : 'कशाला आल्या आहेत कुणास ठाऊक ?...इ. इ. चुटपुटते ऐकले नसते ...'– पलकोघे ३२९. [सं. चुट्ट]

**चुटपुंजी–ज्या** वि. (प्र.तुटपुंजी, तुटपुंज्या) लहानसा; थोड्याशा भांडवलावर केलेला (व्यापार, धंदा). पहा : **तुटपुंजी**

**चुटमचारा** पु. अबरचबर खाद्य : 'कदाचित दुकानातला चुटमचारा चघळायला मिळावा म्हणूनही असेल, सूर्या जेवायला फारसा धजत नसे.' – बाविबु १७७.

**चुटरा** वि. खादाड.

**चुटाचुर्मा, चुटिया, चुटिया चुरमा, चुट्याचुरमा** पु. कणकीचे गाकर चुरून त्यात तूपसाखर घालून केलेले लाडू.

**चुटिमुटी, चुठिमुठी** वि. अपुरा; बेताचा; तुटपुंजा.
क्रिवि. काटकसरीने; अगदी बेताबेताने; हात राखून (खर्च करणे).

**चुटी** पहा : **चुइटी**

**चुटी–ट्टी** स्त्री. चिमूट; चिमटीत राहील एवढा पदार्थाचा अंश.

**चुटी–ट्टी** स्त्री. चिरूट; सिगार; तंबाखूच्या पानाची विडीप्रमाणे ओढण्यासाठी केलेली वळी; चुट्टा. [क.]

**चुटूचुटू** वि. भरभर; लगबग : 'बावचीच्या शेंगा मोडल्यागत चुटूचुटू चाललेली.' – खळाळ २७. [ध्व.]

**चुटूरूचारा** पु. खाजे.(झाडी)

**चुटूरू चुटूरू** क्रिवि. चुरूचुरू (बोलणे). (झाडी)

**चुट्कन–कर–दिशी** क्रिवि. १. चटकन; झटकन. २. चुटकीसरशी; एका क्षणात, निमिषात. [ध्व.]

**चुट्टा** पु. १. केळीच्या पानात वळलेली विडी. २. बंगाली चिरूट. ३. तंबाखू ओढण्याची नळी, चिलीम : 'या गड्याने अफूचा चुट्टा तयार करून ओढला...'– गंगो १४९. [क. चुट्टी]

**चुडणी** स्त्री. अंधाऱ्या रात्री प्रवास करताना उजेडासाठी सणकाड्या, माडाच्या पोई पिंजून केलेले तुकडे इत्यादिकांची जुडी पेटवून घेतात ती दिवटी. पहा : **चुडी** : 'पेटत्या चुडण्या घेऊन...' – गादै ११६. (को.)

**चुडत–ते, चुडवत** न. १. नारळीचे, ताडाचे पान; क्वचित भेरली माडाच्या पानासही म्हणतात. २. झाप (माडाचा) : 'गजा सोमण अंगणात चुडतं विणत होता.'– विभूत १३०.

**चुडती** स्त्री. नारळीच्या चुडताची, माडाच्या झापाची पाती. (कु. हेट.)

**चुडती** स्त्री. उजेडाकरिता पेटवायची दिवटी, चूड.(गो.)

**चुडळ** न. झावळ्या, झाप : 'नारळीच्या... चुडळे... करवंट्या सरपणाच्या उपयोगी पडतात.'– फचि ११२.

**चुडा–डी** पु. १. कांकण; बांगडी. २. (ल.) स्त्रियांचे सौभाग्य (कारण नवरा मेल्यावर स्त्रिया करभूषणे घालत नसत) : 'करी लोगपाठ चित्त वित्त नको पाहीं। अखई तो चुडा तुज भोगईल नाहो।' – तुगा २८८. [सं. चूडा] (वा.) ० **भरणे, लेणे** – १. बांगड्या भरणे; सौभाग्यवती होणे : 'जन्मसावित्री चुडा ल्याली.' – नामदेव ९२. २. (उप.) भित्र्याप्रमाणे मागे सरणे, हटणे. **चुड्यावरची बांगडी** – बांगड्यांच्या विक्रीवर फुकट दिली जाणारी बांगडी.

**चुडाचोंबडा** वि. लुबरेपणाने पुढे पुढे करणारा; फार लुडबुड करणारा; फाजील कारभार करणारा; लुडबुड्या. [चोंबडा द्वि.]

**चुडा(डि)त** न. नारळीची झावळी; नारळीच्या झाडाचा झाप. (हेट. कु.) पहा : **चुडत**

**चुडाला** स्त्री. सौभाग्यलंकारयुक्त विवाहित स्त्री : 'चुडाला स्त्रियेचे संगती' – एवाका ११२.

**चुडावोंडा** पु. चुडी ओंडा वगैरे : 'सरकारची वेठबिगार चुडावोंडा व शाकार फडफर्मास व राबता महार वगैरे येणे.' – थोमारो ७.४७.

**चुडि** स्त्री. चूड; पुढे आलेले लांबट तोंड : 'तेथचें सार तेंही अमेध्यूचि कीं : सोरू असे : तें बोडी आंतु चुडि खोवी :' – लीचउ ३०३.

**चुडियार** पु. बांगड्या करणारा.

**चुडी** स्त्री. अंधाऱ्या रात्री उजेडाकरिता सणकाड्या, माडाचे झाप इत्यादींची जुडी पेटवून केलेली दिवटी; मशाल; चुडणी; पेटवलेली गवताची जुडी, पेंढी : 'क्षणार्धात जिकडे तिकडे चुड्या पेटून उजेड झाला.' – स्वप.

**चुडी** स्त्री. चूड; सोंड : 'बोडीआतु चुडी खोवी' – लीचउ ३०३. [सं.चूड]

**चुडी** स्त्री. शिजविण्याची क्रिया.

**चुडी–चांचुडी** क्रिवि. चिमूट चिमूट वेचून, गोळा करून : 'सर्वज्ञें म्हणीतलें : बाइ : बापुडें वानरें चुडी चांचुडी करूनि घेऊनि ए :' – लीचउ ६०१.

**चुडीत** न. चुडत; नारळीचा न विणलेला झाप, झाबळ.(को.) पहा : **चुडत**

**चुडीदार पायजमा** गुडघ्यापर्यंत सैल व खाली पोटऱ्यावर घट्ट असा पायजमा : 'हिंदु मुलींनीं चुडीदार पायजमा व अंगरखा घालावा अशी नोटीस हैदराबाद येथे लागली आहे.' – के ३०.६.१९३९.

**चुडीपुनव** स्त्री. माघ शुद्ध पौर्णिमा. कोकणात त्या दिवशी होळीला सुरुवात होते. ह्या दिवशी रात्री चंद्रासमोर व गावाच्या सीमेची खूण दर्शविणाऱ्या देवाभोवती, दगडाभोवती चुड्या, दिवट्या फिरवितात.

**चुडुडी** स्त्री. जुडी : 'माहुलुगाची चुडुडी मुखीं धरिजें' – वैवसं ६.

**चुडुफणे** अक्रि. रागाने दात ओठ खाणे.

**चुडुमुडू** क्रिवि. अंगाची घडी करून.

**चुडूप** पु. गोळ्यांचा गठ्ठा, जुडगा : 'बंदुकीत गोळ्यांचं चुडूप भरून...' – रानगंगा ३२.

**चुडेदान** न. १. सौभाग्यचिन्ह म्हणून सुवासिनींना बांगड्या दान म्हणून देणे : 'काल मकरसंक्रांत, राजवाड्यात हळदीकुंकू. चुडेदान.' – बएरा ४.२. एखाद्या स्त्रीच्या नवऱ्याचा जीव वाचवणे; एखाद्या स्त्रीचे सौभाग्य राखणे. (वा.) ० **देणे** – एखाद्या स्त्रीचे सौभाग्य राखणे; तिच्या पतीस जिवंत सोडणे : 'रुखमादेवी म्हणे देई चुडेदान। संरक्षी रे प्राण भ्रताराचा।' – तुगा. ० **मागणे** – वैधव्य येऊ नये, सौभाग्य कायम, अखंडित राहावे अशी प्रार्थना करणे; पतीचे जीवित, प्राण रक्षण व्हावे अशी विनंती करणे.

**चुडेमंडित** वि. सुवासिनीच्या हाताच्या कोपऱ्यापर्यंत बांगड्या भरलेले हात : 'दोन्ही हात कोपऱ्यापर्यंत चुडेमंडित करावेत' – किरिस्ताव ५६.

**चुडेर(रा)हाट** पु. एक प्रकारचा पाणरहाट; कनेकडास चोवीस रवे मारून केलेला रहाट. (को.)

**चुडेल** स्त्री. स्त्रीरूप दुष्ट पिशाच्च; हडळ; चेटकी. 'येता डोक्यामधी राग जशी चुडेल घुमते.' – बगा १२४. (अहि.) [गुज.; हिं. चुडैल]

**चुडेल** वि. छचोर; खट्याळ. (व.)

**चुड्या** वि. १. दिवटी, चूड धरणारा. २. (ल.) आगलाव्या, कळलाव्या; लावालावी करणारा; कज्जेदलाल; कळचेट्या.

**चुणकन–कर–दिनी–दिशी** क्रिवि. सणसण करीत; सूं सूं करीत; सणसणा. [ध्व.]

**चुणकस** स्त्री. कापडास चुण्या पाडण्याचे, करण्याचे शिंप्याचे हत्यार.

**चुणकळी** स्त्री. ज्याचा भाजून चुना करतात असा भुसभुशीत खडा; दगड; चुनखडी.

**चुणका** पु. चुणूक.
वि. १. तरतरीत; हुशार; चलाख; चपळ; चुणचुणीत (मुलगा). २. निवडक; वेचक; उत्कृष्ट. (प्रां.)

**चुणखडा** पु. १. निवडक, वेचक, उत्कृष्ट रत्न. २. (ल.) चुणचुणीत आणि आनंदी मूल, मनुष्य.

**चुणचु(चू)ण** स्त्री. १. चुरचुर; सणसण; झणझण; तिडीक; फुणफुण. (क्रि. लागणे, होणे, करणे.) २. (ल.) पस्तावा; मनस्ताप; रुखरुख; हुरहुर. (क्रि. लागणे.) ३. झोंबणे; शहारणे : 'खोलीतून बाहेर पडू नये वाटते, सारखी चुणचुण थंडी वाजते.' – वावटळ ५. [ध्व.]

**चुणचुणणे** अक्रि. चुणचुण करणे; चुरचुरणे; झणझणणे; ठसठसणे.

**चुणचुणाट** पु. चरचराट; सणसणाट; फार तीव्र चुणचुण; अतिशय झणझणणे. (क्रि. लागणे, होणे, करणे.)

**चुणचुणीत** वि. तरतरीत; हुशार; चलाख; चपळ; फटाकडी.

**चुणचेणी साखर, चुनचुनी खडीसाखर** पत्री खडीसाखर.

**चुणणे–चुनणे** उक्रि. १. निऱ्या करणे; घडी घालणे; (वस्त्रास) चुण्या पाडणे : 'ठेव दादासाहेबांची धोतरं चुणून.' – यख१. [क. चुनाइसु]

**चुणणे–चुनणे** उक्रि. (विड्याची पाने इ.) चळत लावून ठेवणे; व्यवस्थित रचून ठेवणे. [सं. चुण]

**चुण(न)णे** सक्रि. निवडणे. [हिं.चुनना] (वा.)

**चुणफुण, चुणफुणणे, चुणफुणाट** पहा : **चुणचुण**

**चुणी** स्त्री. अणी; टोक; अग्र : 'पाठीमागून कट्यारीची हूल चालविली. ते चुणी लागली.' – भारतवर्ष पंतप्रधान दुसरी शकावली १९३९.

**चुणी** स्त्री. निरी; सुरकुती; दुमड; सळ; मोड; दूण. [सं.चुण]

**चुणी** स्त्री. कण्या मिसळलेला, भरड कोंडा; डाळीची सालपटे, धान्याचे कण इ. मिसळून गुरांना खायला घालायचा कोंडा; चूण. [सं. चूर्णिका]

**चुणी** स्त्री. लहान माणिक; हिरा; हिरकणी : 'कनकगर्भाची धगधगित। मुक्तमणी ढाळ देत। रत्नचुणी हेलावत। तेजलहरी लोटती।' – वेसीस्व ९.१२७. [सं. चूर्णिका]

**चुणीदार** वि. दुमड, सुरकती असलेला : 'चुणीदार पैजमा' – अहीदि ५.

**चुणूक** स्त्री. १. (एखाद्या शास्त्राचा, कामाचा) नमुना; आस्वाद (कृतीचा, कार्यपद्धतीचा); मासला; मासल्याकरिता म्हणून दिलेले शिक्षण, पाठ; (एखाद्या उद्दिष्ट क्रियेचे) अंधुक, अग्रसूचक दिग्दर्शन. (क्रि. दाखविणे, पाहणे.) २. थोडीशी चुणचुण; चुरचर; फुणफुण.

**चुणूकदार–बाज** वि. तरतरीत; चुणचुणीत; चलाख; पाणीदार; हुशार.

**चुणेदार आरसा** फ्रेम किंवा चौकटीवर माणकांचे खडे बसविलेला आरसा.

**चुतड–डा, चुताड** न. पु. (अश्लील) स्त्रीचे गुह्यांग; जननेंद्रिय. [सं. च्यु]

**चुतडबंधू** पु. एकाच स्त्रीचे जार.

**चुतबावळा, चुतिया, चुत्या, चुत्यानंदन, चुतियानंदन** वि. (ग्राम्य) बावळट; मूर्ख; व्यवहारज्ञानशून्य; खुळा; खुळचट. [हिं. चूतिया]

**चुथडणे** सक्रि. नष्ट करणे; नाहीसे करणे : 'समुद्रा, तेणें त्या सकल खलनौका चुथडवू।' – केक ३३.

**चुथडा** पु. उलथापालथ केल्यामुळे वस्तूंची, सामानाची झालेली सरभेसळ; घालमेल; दुर्दशा; नासाडी; बिघाड; खराबी; कार्याची अव्यवस्था; विचका : 'हिंदी राजकारणाचा कसा चुथडा उडाला आहे.' – व्यक्तिरेखा ४३.

**चुथणे** सक्रि. चाळाचाळ करून धुंडाळणे; उलटापालट करणे. (एखादी वस्तू शोधण्यासाठी उलथापालथ, गल्लत करणे.)

**चुथाचुथ** स्त्री. चाळाचाळ केल्यामुळे झालेली दुर्दशा; घालमेल; अस्ताव्यस्तपणा; गोंधळ; खोडाखोड, डाग इत्यादिकांनी (लिखाणाची) झालेली दुर्दशा; चुथडा. [चुथणे द्वि.]

**चुनकट** स्त्री. चिवटगाळ; चुना असलेले.

**चुनकशी** पहा : **चुणीदार**

**चुनकळी, चुन्याची कळी** स्त्री. भाजलेल्या चुन्याचा खडा; न विरवलेल्या चुन्याचा खडा.

**चुनका** वि. निवडक; वेचक; शेलका. पहा : **चुणका** २

**चुनकी** स्त्री. १. ठिणगी. २. अग्निचक्र.

**चुनखडक** पु. (स्था.) चुनखडीचा दगड; न भाजलेल्या चुन्यांच्या खड्यांचा बनलेला दगडासारखा पदार्थ किंवा खडक. प्रामुख्याने कॅल्शिअम कार्बोनेट असलेला खडक, कंकर.

**चुनखडा** पु. १. निवडक रत्न. २. (ल.) हुशार, चपळ, चुणचुणीत मुलगा, माणूस.

**चुनखडी** स्त्री. १. न भाजलेल्या चुन्याच्या खड्यांचा ढीग, रास. २. जीत चुनखडे असतात अशी माती : 'चुनखडीने रंगवलेल्या पांढऱ्या शुभ्र भिंती.' – गआचा ७३.

**चुनखडी** स्त्री. चुणचुणीत मूल.

**चुनडी** स्त्री. १. ठिपक्याठिपक्यांचे, स्त्रियांचे एक वस्त्र; बुटीदार लुगडे : 'आणि देवकाईला कोरी चुनडी नेसविली.' – उअं १५५. २. लहान मुलींचे नेसावयाचे वस्त्र. ३. चुनडीवरील ठिपका. [हिं. चुनरी]

**चुनडी** स्त्री. एक प्रकारचे रत्न. यास संस्कृतात पुलकमणी व इंग्रजीत गार्नेट म्हणतात.

**चुनपटी–ट्टी** स्त्री. चुना लावलेले विड्याचे पान.

**चुनभट्टी** स्त्री. चुना भाजण्याची भट्टी.

**चुनलाखडा** वि. कळलाव्या. (व.)

**चुनवटा** पु. चुनखडीची खाण; चुनखाण.

**चुनवणी** न. चुन्याची निवळ.

**चुनळ, चुनाल–ळ–ळे** न. विड्याच्या पानास लावण्याचा चुना ठेवण्याचे लहानसे पात्र, डबी. [सं. चूर्ण+ आलय]

**चुनंदा–दी** वि. उत्कृष्ट; निवडक; तेजदार : 'पहा प्रभाकराचे छंद चुनंदावाणी' – मला १८५. [फा.]

**चुना** पु. (रसा.) १. कळीचा चुना, कॅल्शिअम ऑक्साइड. २. फकी, विरलेला चुना, कॅल्शिअम हैड्रॉक्साइड.

**चुना** पु. १. शिंपा, कालवे, चुनखडीचे दगड भाजून व विरवून केलेले चूर्ण. चुना बांधकामाला वापरतात, तसेच विड्याच्या पानांनाही लावतात. २. (ल.) विध्वंस; निर्दालन. [सं. चूर्ण] (वा.) ० **करणे** – (ल.) एखाद्या पदार्थाचा सत्यानाश, विध्वंस करणे. ० **घालणे** – शंख करणे; अपशब्द उच्चारणे. ० **पिटणे** – चुन्याचा गिलावा देऊन तो पक्का होण्यासाठी ठोकणे : 'तेणें नीवणिचेया देउळा चुना पीटिला : पोळी केली : तीए अस्तीके:' – लीचपू ४८. **(प्रतिपक्षीयांच्या नाकास) ० लावणे** – आपल्या कार्याच्या आड येणाऱ्या माणसाचे काही चालू न देता आपले कार्य साधणे. ० **लावणे** – बोंबलत राहणे : 'मन्सफ गेला चुना लावीत...' – सवा २३.

**चुना** क्रिवि. अशाप्रकारे : 'मी भूमिकेवरि असोनि तया चुनाहि' – नंदस्व २२५. [का.]

**चुनाडा** पु. चुना तयार करणारा : 'प्रदखिणेसि बीजें करितातिं तवं चुनाडे चुना उखरडीत होते :' – लीचपू ७६.

**चुनी** पहा : **चुणी** : 'जडविल्या चुन्या बेसरी। करून कुसरी। नयनांची खोचली सुरी।' – पला ४.२३.

**चुनी** असे, इतके.

**चुनी(नीं)दा** वि. निवडक : 'त्याचे उपराळ्यास जनरल मंडोर यार्णे आपले हमराहीपैकीं बेश चुनीदी जमी येत पाठविली.' – पया ४८१.

**चुनेकी** स्त्री. चुन्यामध्ये पूर्णपणे न रापलेले चामडे.

**चुनेगच्ची** स्त्री. १. चुन्याने बांधलेली आगाशी. २. (ल.) नुसती तंबाखू चुना लावून खाणे : 'चुनेगच्चीच्या भक्कम तंबाखूच्या बाराची सवय झाल्यावर मीठा पानवाल्यांचा गुळचटपणा आवडेनासा होतो.' – गणगोत २३९.

वि चुन्याचा गिलावा करून बांधलेले.

**चुनेरी** वि. चुन्याचे बनलेले.

**चुनोटा–टी** पु. स्त्री. चुनाळे. [सं. चूर्णवटी]

**चुनाँचे** अ. म्हणून; ज्याअर्थी; या करिता : 'चुनाँचे आँ मेहेर्बाही इंग्रजांची मकाणें घेतली' – एको ३८३. [फा.]

**चुन्नडी** स्त्री. चुनडी.-(तंजा.)

**चुपकड** न. १. रहाटगाडग्याच्या माळेची लाकडे; ज्यावर रहाटगाडग्याची मडकी बांधतात ती लहान लाकडे; खापेकड. २. रहाटगाडग्याचे चाक.

**चुपकणी, चुपकणे, चुपकळणे** पहा : **चुबकणी** इ.

**चुपकारना** क्रि. बैलांना गोंजारणे. (झाडी)

**चुपणे** पहा : **चुंफणे**

**चुप्प, चुपचाप** क्रिवि. गप्प; स्तब्ध; गुपचुप; मुकाट्याने; काही आवाज न करता.

उद्गा. गप्प रहा; बोलू नको; खामोष. [हिं.]

**चुबक** स्त्री. टोचलेले, वेधलेले लहानसे भोक, छिद्र.

**चुब(बु)कडा** पु. ताशा किंवा नगारा वाजवण्याची काठी.

**चुबकडा** वि. लहान आकाराचा व गरगरीत, वाटोळसर; अटस आणि सुबक (घोडा, मनुष्य).

**चुबकणी** स्त्री. धुवायचे वस्त्र दोन्ही हातांनी धरून दगडावर हळूहळू आपटण्याची क्रिया.

**चुबकणे** उक्रि. १. धुवायचे वस्त्र दोन्ही हातांनी दगडावर चुबचुब आवाज होईल अशा रीतीने चोळणे : 'काठच्या दगडावर एखादी बाई धुणे चुबकीत होती.' – भुज ४३. २. खुपसणे; टोचणे; बोचणे; छिद्र पाडणे. [ध्व.]

**चुब(बु)कणे** अक्रि. थांबणे; कुंठित, स्तब्ध, तटस्थ होणे; मौनावणे : 'सभा अवलोकितां दृष्टीं। शोभासमुद्र हेलावे पोटीं। चक्षु पोहणार उठाउठी। ऐलकांठीं चुबकलें ।' – मुसभा २.७७. [सं. स्तंभ]

**चुबकणे** न. शिल्पकाराचे एक हत्यार.

**चुबकती उडी** मोटकुळी उडीच्या उलट उडी. दोन्ही पाय जोडून पाण्यात टाकलेली उभी सरळ उडी.

**चुबकवड्या** स्त्री. गोळ्याचे सांबारे. (व.)

**चुबकळणे** उक्रि. बुचकळणे; बुडवणे : 'जे आनंदसमुद्रीं कुंभ। चुबकळोनि भरिले।' – ज्ञा ९.१९१.

अक्रि. १. बुडणे; गटांगळ्या खाणे. २. (ल.) मौनावणे; कुंठित होणे.

**चुबक(कु)ळी** स्त्री. बुडी; बुचकळी.

**चुबका** पु. १. (गवताचा, केसांचा, पानांचा) झबका; बुचका; गुच्छ; तुरा. २. पुंजका; जमाव; घोळका; समुदाय. [सं. स्तबक]

**चुबके** न. (लोहार) भोके पाडण्याचे हत्यार.

**चुबचुबणे** अक्रि. चिंब, ओले गच्च होणे; थबथबणे; चिबचिबणे. [ध्व.]

**चुबुककाटा** पु. भुईवर पसरणारी ही शाक असते. त्याचा उपयोग विशेष दुष्काळात भाजी म्हणून करतात. – वसृ ६२८.

**चुबुकचुळ्** वि. पाण्यात बुडी मारताना किंवा पाण्यातून बाहेर येताना होणारा पाण्याचा आवाज : 'जवळपास मासळी उडत होती आणि चुबुकचुळ् असा गमतीदार आवाज होत होता.' – शेलूक ६.

**चुबुकडुबूक** स्त्री. लुडबुड; विचकाविचक. [ध्व.]

**चुबुकणे** उक्रि. वेधणे; छेदणे; टोचणे.

अक्रि. शिरणे; आत जाणे; बोचणे. [हिं. चुभना]

**चुबुकळणे** सक्रि. बुडविणे : 'तियें प्रमेयाचीच हो कां वळलीं। कीं ब्रम्हरसाच्या सागरीं। चुबुकळलीं।' – ज्ञा ७.१८८.

**चुबुकळणे** अक्रि. बुटकुळी, बुडी मारणे : 'नाहीं धारणा ध्यान। नाहीं समाधि आसन। चुबुकळीत आनंदघन । आपणामाजीं।' – परमा १३.५.

**चुबुका** स्त्री. हनुवटी : 'श्यामचंद्राची सपोष कोर। तैशी चुबुका अतिसुंदर।' – एभा १४.४७६. [सं.चिबुक]

**चुबुक्कन** क्रिवि. चुबुक असा आवाज करून : 'त्याच वेळी चुबुक्कन एखादा बारीक सारीक दगडही...' – किरिस्ताव २४.

**चुबूक चुबूक** क्रिवि. पाण्यात एखादी वस्तू बुचकळल्यानंतर पाण्याच्या लाटांमुळे येणारा आवाज : 'होडीच्या दोन्ही बगलांना चुबूक चुबूक करून आदळणाऱ्या स्वच्छ पारदर्शक पाण्यात माशांची ...' – गआचा ९८.

**चुबूकाठा** स्त्री. चुबुककाटा; पसरणाऱ्या लहान वेलीचे काटे : 'घरापुढं चुबुकाठ्यांचं, सावराचं जंगल वाढलेलं.' – बलुतं २०.

**चुभकळणे** सक्रि. बुचकळून काढणे : 'गोसावी दोन्ही श्रीचरण फाकिले : आणि : साधाचे तोंड चुभकळलें :' – लीचउ१४५.

**चुभय** स्त्री. चुंभळ.(व.)

**चुभल्या** वि. कामी; विषयासक्त; स्त्रीलंपट.

**चुभळीजणे** सक्रि. बुडवणे : 'उसळत तैलाची कटई । तेथें चुभळीजती सपायीं। तळिली कुरवंडी सांडयी। तैसे होती।' – ज्ञाप्रबो ३०३.

**चुमक** वि. कंजूष; कृपण. (व.)

**चुमडे** न. गाठोडे : '(जोंधळ्याचे) चुमडे बांधून दिलें...' – गंगो ६.

**चुमळ–डी, चुमकळ** स्त्री. चुंबळ.

**चुमाचूम** वि. तंतोतंत. (झाडी) [सं.चुंब]

**चुयक्या** वि. गाऱ्हाणी करणारा. (व.)

**चुयमुंगी सुटणे** क्रि. चुटपूट लागणे.

**चुरकन–कर–दिशी–दिनी** क्रिवि. कापड फाटताना, फाडताना, तापलेले लोखंड पाण्यात बुडताना होणाऱ्या चुरर् अशा शब्दाप्रमाणे; चुरर् असा आवाज करीत. [ध्व.]

**चुरका** पहा : **चरका** : 'पण माझ्या फुललेल्या वृत्तीवर चुरका देणारी गोष्ट ...' – कथाकांता ७५.

**चुरग(गा)ळणे** सक्रि. १. (कागद, कापड, फूल इ.) चुरडणे; चेपणे; कुसकरणे; चोळामोळा करणे; रगडणे. २. (मनुष्य, पशु इ.) दांडगाईने वागविणे; भलत्याच रीतीने उपयोग करून खराब करणे. ३. खराब, अव्यवस्थित, विस्कळित करणे.

**चुरग(गा)ळा, चुरग(गा)ळामुरग(गा)ळा** पु. १. चुरगळून, पिळवटून, चेंगरून, कुसकरून केलेली दुर्दशा; चोळामोळा करून केलेली खराबी. २. (ल.) (कामाने, श्रमाने, आजारीपणाने, काळजीने झालेली शरीराची) दुर्दशा.

**चुरगुडी** स्त्री. सुरकुती.(व.)

**चुरचुर** स्त्री. १. भाजल्यामुळे, जखमेस मीठ इत्यादी क्षारयुक्त पदार्थ लागल्यामुळे, औषध झोंबल्यामुळे होणारी थोडीशी आग, वेदना. २. (ल.) पहा : **चुटपुट**; (एखाद्या कृत्याबद्दल मनाला लागलेली) टोचणी; हुरहुर; रुखरुख; पश्चात्ताप; खेद; काळजी; अनुताप.

३. कटकट; कचकच; बाचाबाच; धुसफूस. [सं. चुर्.]

**चुरचुर-रा** क्रिवि. १. पदार्थ तळताना होणाऱ्या चुर्र् आवाजाप्रमाणे; चुर्‌चुर् आवाज करीत. २. चुणचुण; फडफडा; चरचर; न अडखळता (क्रि. बोलणे). ३. (कापड इत्यादी एकदम फाटताना होणारा) चर्र् आवाज करीत; वाळलेल्या पानावर चालताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे : 'पाने चुरचुर करू लागली.' – अहीदि ५२.[ध्व.]

**चुरचुरणे** अक्रि. १. थोडीशी आग होणे; चुरचुर होणे; चुणचुणणे; सणसणणे. २. (ल.) पश्चात्ताप होणे; मनाला लागणे; खेद होणे; चुटपुट, हुरहुर, खंत वाटणे : 'तेणें करून दुसऱ्या स्त्रिया आपणांस तसी संपदा नाही म्हणून आपल्या मनांत चुरचुरत असतात.' – व्यनि ३५. [सं. चुर्]

**चुरचुराट** पु. १. अतिशय चुरचुर; फुणफुण. २. (ल.) अतिशय खेद होणे; फार वाईट वाटणे. [सं.चुर्]

**चुरचुरीत** वि. १. सुके आणि तळण्यास योग्य; कुरकुरीत; खुसखुशीत २. खडखडीत वाळलेले; पूर्ण सुकलेले (धोतर इ.).

**चुरचुरून** क्रिवि. धीम्या गतीने, सतत आणि सौम्य आवाज करीत : 'अवकाळी पावसाची सर चुरचुरून येत होती.' – बएरा १८.

**चुरचोंडा, चरचोंबडा** वि. लुब्रा; बडबड्या; (दुसरे बोलत असता) मध्ये तोंड घालून बोलणारा; टकळी लावणारा. पहा : **चरचोंडा**

**चुरडई-य** स्त्री. सापाची एक जात.

**चुरडणी** स्त्री. चुरडणे; चोळामोळा करणे; चेपणे; दाबणे; चेंगरणे; कुसकरणे.

**चुरडणे** सक्रि. दाबून चुरा करणे (चुरणे आणि चुरडणे हे शब्द जरी समानार्थक आहेत तरी चुरडणेच्या अर्थात अधिक तीव्रता आहे. चुरडून कायमचा नाश होतो तसा चुरण्याने होत नाही). [सं. चूर्ण]

**चुरडा** पु. चोळामोळा; कुसकरा; चुराडा; चुरडलेली, चिवडलेली स्थिती.

**चुरण** न. (धान्याची) मळणी.(व.)

**चुरण** न. १. करंज्यात घालण्याचे सारण, पुरण. २. चूर्ण; औषधी पूड. (गो.) ३. सुरण. (हेट.) [सं.चूर्ण]

**चुरणे** सक्रि. १. (हाताने कुसकरून, दाबून) चुरा, भुगा, चूर्ण करणे; बारीक बारीक तुकडे करणे. २. (ल.) (शरीराचे अवयव) दाबणे आणि कुसकरणे; चेपणे; रगडणे; चंपी करणे; हलक्या हाताने दाबणे; चोळणे : 'पार्थ स्वहस्तें चुरी पायां।' – मुआदि ३९.३. ३. (ल.) दुःखाने, संतापाने हात चोळणे : 'लोक शोकें चुरिती कर। आप्त म्हणती अनर्थ थोर।' – मुसभा १४.१६६. ४. चुरगळणे; चोळामोळा करणे. ५. जोराच्या दाबाने खराब करणे. [सं. शॄ-छुर्]

**चुरणे** अक्रि. (एखादे जनावर अथवा मनुष्य शक्तीपेक्षा अधिक काम पडल्यामुळे) खुरटणे; वाढ खुंटणे.

**चुरन** नपु. मळणी. (व.) [सं.]

**चुरपने** क्रि. चोखणे. (व.)

**चुरबुरा, चुरबुरीत** वि. तीक्ष्ण.

**चुरम(मु)टणे** अक्रि. सुरकुत्या, वळ्या पडणे; चिरमटणे; चिरम्यांनी युक्त होणे; (सामा.) आकुंचन पावणे, आकसणे; संकोचणे; अटरणे; चिमटणे.

**चुरम(मु)टी** स्त्री. सुरकुती; वळी; चिरमी.

**चुरमरणे** सक्रि. सुरकुत्या, वळ्या पडणे; गुधडणे. [सं.]

**चुरमा** पु. एक पक्वान्नविशेष. पहा : **चुटाचुर्मा** [हिं.]

**चुरमा** पु. आंगमोडे.

**चुरमाडणे** सक्रि. चुरगळणे : '... हातातली विडी जमिनीवर चुरमाडीत नाना म्हणाला...' – गागो ५६.

**चुरमुर** स्त्री. १. तळमळ; हायहूय; विव्हळणी. २. कुरकुर; कुरबुर; पुटपुटणे; मुळमुळणे; संताप; रुसवा; रुखरुख. ३. (वरील प्रकारांनी दर्शविली जाणारी) चीड; संताप; रुसवा; खेद; हुरहुर इत्यादी.

**चुरमुरणे** अक्रि. १. तळमळणे; विव्हळणे; शोक करणे; खेद करणे. २. असंतुष्टपणे कुरबुरणे; चरफडणे. ३. 'कोणी कोणाशी न बोलता एकमेक आपणाशीच चुरमुरत राहिले.' – रत्नप्रभा ९०.

**चुरमुरणे** क्रि. मुरुडणे; सुरकतविणे.

**चुरमुरा-री** पु.स्त्री. भात उष्ण पाण्यात भिजवून खापसत भाजतात ते कुरमुरे.[सं. चुर्+ मृ] (वा.) ० **खाणे, खात बसणे, देत बसणे** – (उप.) जागच्या जागी मुकाट्याने चुरमुरत,चरफडत बसणे; धुसफुसत राहणे; आशाभंग झाल्यामुळे खजील होणे. **चुरमुऱ्याचे लाडू खाणे** – (उप.) जेवण न मिळाल्यामुळे चरफडत राहणे.

**चुरमु(बु)रा-रे** वि. झणझणीत; चुरचुरणारे; तीक्ष्ण : 'आधींच द्रव्यें चुरमुरीं। वरि परिवडिजती मोहरी। जिये घेतां होती धुवारी। नाकें तोंडें।' – ज्ञा १७.१४६.

**चुरमूर** पहा : **चुरचुर**

**चुरम्या** वि. तुरळक, बारीक (कळा), बारीक (वेणा) : 'आता कुठं तुला चुरम्या येणा सुरू हैत' – ऊन ८.

**चुरली** स्त्री. खेकडा. (कु.)

**चुरवट** वि. १. चुरलेला; चुरडलेला. २. चुरगळलेला; चोळामेळा केलेला.

**चुरस** स्त्री. १. स्पर्धा; ईर्षा; दुसऱ्यावर चढाई करण्याची इच्छा; चढाओढ. २. द्वेष; वैमनस्य; अदावत; वैर; आकस; दावा; डाव.[सं. चिकीर्षा]

**चुरस** स्त्री. चढाओढ. [सं.चिकीर्षा, हिं.]

**चुरसाचुरस** स्त्री. एकमेकांतील मत्सर, हेवा, द्वेष, दावा, स्पर्धा : 'स्वाऱ्या करून सरदार बुडविती रिपु चुरसाचुरशीं।' – ऐपो ३०४. [चुरस द्वि.]

**चुरसी** वि. द्वेष, मत्सर करणारा; डाव धरणारा; मनात अढी बाळगणारा; खुनशी; हाडवैरी; दीर्घद्वेषी.

**चुरंगटणे** पहा : **चुरगळणे** [सं. चूर्ण + गम +ट]

**चुरा** पु. १. (ठेचण्याने, मोडण्याने, फुटण्याने, फोडण्याने झालेले एखाद्या पदार्थाचे) बारीक बारीक तुकडे, कुटके, कण इ.; भुगा. २. (ल.) (शरीराची) जर्जर स्थिती; शैथिल्य; शीण; उठवण. [सं.]

**चुराचारा** पु. तुकडेताकडे; काटकेकुटके; चाराचुरा; (कोणताही पदार्थ फुटून मोडून त्याचे झालेले) तुकडे इ.; भुगा. [चुरा द्वि.]

**चुराडा** पु. १. (पदार्थ फुटून, तुटून त्याचा झालेला) चकनाचूर; चक्काचूर; भुगा; नाश; खुर्दा; खराबी : 'कालचक्रानें आजपर्यंत मोठमोठ्या राज्यांचा पार चुराडा झाला.' – पाआव्ह १०. २. (ल.) (अतिश्रमाने

शरीरास आलेली) ग्लानी; थकवा. ३. (मसलतीची) नासाडी.

**चुरिजणे** सक्रि. चूर्ण करणे; चुराडा करणे : 'कुळाचळाचे घांटे : चुरिजति करपुटें' – ज्ञगी २३.२३१.

**चुरी** स्त्री. डोळाचा भरडा; चूर. [सं. चूर्ण]

**चुरुक** स्त्री. पावसाची सर. [सं. चुलूक]

**चुरु(रु)चुरु–रू** क्रिवि. उद्धटपणाने; मर्यादा सोडून (बोलणे).

**चुरुमुरु** वि. गोड, रूचकर.

**चुर्र** क्रिवि. (भाजताना, डागताना, तापलेले धातूचे तुकडे पाण्यात बुडविताना होणारा) चुर्चुर् असा आवाज करीत. [ध्व.]

**चुलकोंबडा** पु. घरकोंबडा : 'काय बसलायऽऽ आयेच्या पदराखाली चुलकोंबड्यागत..' – तोरण १३.

**चुलखंड** न. (उप.) (बायकी) चूल : 'घरांत चुलखंड थंडावलं आहे, तिथं माझी हाडं लावूं कां तुमची.?' – एप्या ४१.

**चुलचुले** वि. अधीर; उतावीळ; अस्वस्थ : 'हे गोष्ट नबाबास विचारिली. उत्तर दिधले की, कुरूक्षेत्राकडे फौजहि पाठवणें आम्हास पुरवत नाहीं व अत:पर आम्ही फार चुलचुले जालों.' – पेद २.३९. [ध्व.]

**चुलटी** स्त्री. उसाची साल : 'संन्यासी भिक्षु चुलट्या सोलून ऊंस खातात.' – संख ७९.पहा : **चुइटी**

**चुलत** वि. चुलत्याच्या संबंधाचा; चुलत्याकडून; चुलत्याच्या बाजूच्या नातेविषयक शब्दास हा शब्द उपसर्गाप्रमाणे लावतात. (चुलत हा शब्द एक अंश दूरचा असा शरीरसंबंध दर्शवितो.)

**चुल(ले)त** न. होडीचे वल्हे ज्या उभ्या दांड्याला टेकून खेचतात तो दांडा, खुंटा.

**चुलता** पु. बापाचा भाऊ; काका. [सं.क्षुल्लतात]

**चुलती** स्त्री. चुलत्याची बायको; काकी; काकू.

**चुलदान** न. गलबतावरील विस्तव पेटवायचे भांडे.

**चुलभानवशा, चुलभानोश्या** वि. १. चूल व भानवस सोडून न जाणारा; घरकोंबडा; रांड्याराघोबा; बाईलकाम्या. २. (ल.) नेभळट; दुबळा; क्लीब; बायकी.

**चुलमोगरा** पु. एक प्रकारचा मोगरा : 'बंगालमध्ये चुलमोगऱ्याचे तेल अंगाला लावण्यास देतात..' – निऔ ४५.

**चुलवण** न. चुलीच्या आसपासची जागा : '.. सुस्तावलेली मांजरीही चुलवणाशी बसल्या बसल्याच पेंगली होती.' – गागो ९२.

**चुलवा** पु. तात्पुरती केलेली चूल; ओबडधोबड चूल.

**चुल(व)वाण–न, चुलांगण, चुलाण–ण** न. १. उसाचा रस काढण्याची काहिली ठेवायची चूल, भट्टी. २. चुलींची रांग. ३. मोठी चूल: 'चुलवाणाजवळ बसलेला मालक धावून गेला.' – गोतावळा १२२; 'गुन्हाळात चुलांगणाला महाराने सरपण पुरवावे.' – गावंगाडा ११८.

**चुलहानेवाला** वि. रसाचा रांधा करणारा.

**चुला–ल्हा** पु. वैल नसलेली मोठी चूल : 'बाकीचे आपापले चूले पेटवतात.' – काभिं ४२.

**चुलीचा रान** पु. उसाचा वाफा.(झाडी)

**चुल्हिकापूजन** न. १. चुलीची पूजा, आराधना, सेवा. २. (ल.) स्वयंपाक : 'त्यानें आपले अन्न तयार करण्यास चुल्हिकापूजन केलें.' – चंद्रगुप्त ४१.

**चुवक** गलबत प्रकार – मआपा प्र. ५७.

**चुवा** पु. चंदनाच्या लाकडापासून केलेला एक पदार्थ : 'अबीर, गुलाल चुवा चंदन ...' – एहोरा २३. [हिं.चोआँ]

**चुवा–हा** पु. १. उंदीर. २. (ल.) हुशार, तरतरीत मनुष्य. [हिं.चूहा, फा.चुवा]

**चुवा–वा** पु. उन्हाळ्यात पाण्यासाठी तळ्यामध्ये खणलेली विहीर. (व.)(वा.) ० **घालणे**– वांगी अगर मिरच्या लावल्यानंतर पाऊस न पडल्यास तांब्यातांब्याने रोपाच्या बुडाशी पाणी घालणे.

**चुव्वेगिरी** स्त्री. कुरतडण्याचे काम : 'हे हेवेदावे, चुव्वेगिरी, मिळकतीचे वाद..' – आआशे २६१.

**चुस्टाई** स्त्री. चौकशी; पारिपत्य : 'हैबतरामोशी सांप्रत सासवडासच आहे त्यास याची चुस्टाई बहुत होईलसे वाटतें' – पुद २.१८६.

**चुस्त** वि. १. तंग; नीटनेटका. २. धूर्त. [फा.]

**चुस्ती** स्त्री. चपळता. [हिं.]

**चुहा(व्हा)ड** पु. ओरिसा प्रांतातील एक लुटारू जात : 'सोनपूरचे व संबळपूरचे रानांत आला तो तेथे चुव्हाडांनीं लुटून घेतला.' – ऐको ३८४.

**चुहे(वे)दान** न. उंदराचा सापळा, पिंजरा.

**चुळ** पु. ताकाचे पाणी : 'सी.बी. : चुळु : चिमुटी.. हे साधनचतुष्टयें' – लीचउ ७८.

**चुळक** वि. चमकणारे : 'एके (रुपें) सवियांची चुळकीं जैसे ब्रह्मकटाह खेंवणिले माणिकीं' –ज्ञा ११.१३३.

**चुळकर–कन–दिनी–दिशी** क्रिवि. पाण्याची, दुधाची चिळकांडी उडताना होणाऱ्या चुळू आवाजाप्रमाणे आवाज करीत. [ध्व.]

**चुळका** पु. डोंगराचे शिखर, मस्तक; सुळका : 'सिंहाचळाचिये चुळके।' – उगी १.

**चुळकाभर** पु. १. पाणी, दूध इत्यादी द्रवपदार्थ हातावर राहावा म्हणून केलेला तळहाताचा विशिष्ट आकार; खोलगट तळवा. २. हाताच्या खोल केलेल्या तळव्यात, चुळक्यात मावेल इतके पाणी, दूध इत्यादी पदार्थ; चूळ. (क्रि. भरणे.) [सं.चुलुक]

**चुळकी** स्त्री. नूतन आम्रवृक्षाच्या पानाप्रमाणे कोमलता; आरक्तता.

**चुळके** न. एक बायकी शिवी.

**चुळचुळ** स्त्री. निकड; तातडी; घाई; अधीरता; उत्कंठा. [ध्व. चुळ द्वि.] (वा.) ० **लागणे**– उतावीळ, अधीर होणे; (एखादे काम, गोष्ट) केव्हा करीन असे होणे. ० **लावणे** – अतिशय उतावीळ, त्वरा, घाई करणे.

**चुळचुळ–ळा** क्रिवि. चुळ चुळ आवाज करीत. [ध्व.]

**चुळचुळ मुंगळा** १. मुलांच्या खेळातील एक शब्द. २. मुलांच्या एका खेळाचे नाव. (उप.) ज्याला फार घाई झाली आहे, जो फार अधीर झाला आहे असा मनुष्य.

**चुळचुळा** पु. १. अधीरता; उत्कंठा. २. (ल.) खाज; खवखव. (क्रि.सुटणे.) खरूज. ३. खेद; पश्चात्ताप; मनाची अस्वस्थता; हुरहुर इ.

**चुळचुळा–ळ्या** वि. अधीर; उतावळा; अस्वस्थ.

**चुळचुळी** स्त्री. निस्तेज : 'चंद्रकळा होए चुळचुळी' – शिव १८७.

**चुळणी** स्त्री. चूळ भरण्यासाठी तोंडात घेतलेले पाणी; गुळणा; चूळ.

**चुळबुळ** स्त्री. १. चळवळ; उठपळ; वळवळ; लहान मुलांचा खेळकरपणा. (क्रि. करणे, चालवणे, मांडणे, लावणे.) २. पिसवांची चपळ हालचाल. ३. मानसिक अस्वस्थता; संभ्रमावस्था इत्यादी भाव सूक्ष्मपणे दाखवणारी शरीराची प्रतिक्रिया, हालचाल : 'तेव्हा चुळबुळ करीत चिरंजीवच म्हणाले..' - राऊ ९. [फा.चुलबुल.]

**चुळबुळणे** अक्रि. (झोपेत, तापात) तळमळणे; अस्वस्थ होणे; (मूल) वळवळणे; चुळबुळ करणे. [फा.चुलबुल]

**चुळबुळणे** अक्रि. ओशट पदार्थाने माखले जाणे, लिप्त होणे, चोपडणे.

**चुळबुळ–ळ्या** वि. अस्वस्थ; चुळबुळ करणारा; चळवळ्या; ऊठपळ करणारा; एका ठिकाणी शांत न बसणारा; अधीर.

**चुळबुळाट** पु. चपळाई; अतिशय चुळबुळ; वळवळ; (लहान मुलांची) अधीरता.

**चुळबुळीत** वि. तेल चोपडलेला; ओशटलेला; बुळबुळीत.

**चुळमुळ** स्त्री. १. चुळबुळ; अधीरता; उत्कंठा. २. धुसफुस. (क्रि. करणे.)

**चुळमुळणे** अक्रि. १. चुळबुळ करणे. २. उतावीळ होणे; उत्कंठा लागणे.

**चुळवरा** पु. पाच बोटे एकत्र जुळवल्यावर होणारा हाताचा आकार : 'पाणी चुळवऱ्याने डाव्या हातात घेऊन..' - पाकसिद्धी २२.

**चुळी, चूळ** स्त्री. पहा : **चुळका** १ [ध्व.]

**चुलुक** न. शिखर : 'सैहाळाचिया चुळुके.' - उगी १.

**चुलु(ळू)क** वि. सुंदर; चमकणारे : 'एकें सावियाचि चुळुकीं। जैसा ब्रह्मकटाह खचिलें माणिकीं।' - ज्ञा ११.१३३.

**चुलुचुलु** वि. थोडे थोडे; चुळभर : 'चुलु चुलु पाणी ऐसें। घेउनि निगे।' - राज्ञा १८.१६९३.

**चुळोदक** न. चुळकाभर पाणी : 'कां चुळोदके आपांपती। अर्घ्यु नेदिजे।' - ज्ञा९.१३.

**चुळोबळिक** स्त्री. चपळता. पहा : **चळोबळिक** : 'हावभावाचिया चुळोबळिका।' - उगी ३१०.

**चुव्हा** पु. चूळ. (खा.)

**चुं(चु)खणे** पहा: **चोखणे**

**चुंग–गा** स्त्री. पु. पलटण, तुकडी; तांडा; टोळी; कळप; संघ; झुंड; (सामा.) जमाव; समुदाय.

**चुंग–गा** पु. वस्त्राच्या पदराचा भाग; सोगा.

**चुंगडा** पु. न. १. एकत्र बांधलेला मोत्यांच्या लडींचा, सरांचा समुदाय; पेंडाळे. २.(पेंढ्याचे, ताटांचे, वेतांचे, केसांचे, आगकाड्यांचे, लहान सळ्यांचे, काठ्याचे) जुडगे; जुडी; पेंढी; पुंजका; जुंबड.

**चुंगडी** वि. किरकोळ; थोडे; चिल्लर : 'अमर सिंगाने अकरा वर्षे चुंगडी दिवस राज्य केले.'–मऐशि ११४.- (तंजा.) [गुज.; क. चुंगु]

**चुंगडे** न. गाठोडे; चुमडे; धान्याने अर्धवट भरलेले लहान पोते : 'धाबारा पायल्याच एक चुंगड कर' - मळणी १५०.

**चुंगल** मूठभर.

**चुंगल** स्त्री. चिमटी.

**चुंगाल** पु. १. पंजा, पकड २. (ल.) जुलूम; जबरदस्तीचा ताबा : 'बहुत खुशवक्त झाले कीं जबरदस्ताच्या चुंगालापासून गरिबांचे वतन खलास जाले.' – मइसा २०.४९. [सं.चतुर + अंगुली]

**चुंगी** स्त्री. १. पहा : **चुंग.** २. गवताची,कडब्याची पेंढी. [हिं.]

**चुंगी** स्त्री. शहरात आणायच्या वस्तूंवर बसवलेला कर; जकात. [हिं]

**चुंच–चु** स्त्री. चोच : 'उडी घालोनी महाडोही । चुंची धरोनी काटीजे अही।'–मुआदी ३२.७५. [सं.चंचु]

**चुंच** स्त्री. एक औषधी वनस्पती.

**चुंदडी** स्त्री. बुटीदार लुगडे; ठिपक्या ठिपक्याचे (स्त्रियांचे) एक प्रकारचे बांधणीचे वस्त्र : 'तसेच चुंदड्या रंगविण्याचे व बांधणीचे... कौशल्याचे कामही तेथे सतत चाले...' – सांजवात ३८.

**चुंफणी** स्त्री. १. (मुलाचे) चोखणे; रिंगणे. २. लहान मुलांच्या गळ्यात बांधलेली चोखणी.

**चुंफ(प)णे** उक्रि. (फळातील रस) चोखणे; (स्तनातील दूध) पिणे : 'दोन मुलांनी आंब्यांच्या कोयी चुंफून नुकत्याच संपविल्या होत्या.' –कलंदर १४४. [सं.चुम्ब]

**चुंफा** पु. १. तोंडाने फळातील रस, स्तनातील दूध ओढून घेण्याची क्रिया. २. एका वेळी ओढून घेतलेला फळातील रस, स्तनातील दूध.

**चुंब** स्त्री. गर्दी; दाटी; झोड; झुंड. (क्रि. पडणे.) (राजा.)(वा.)**चुंब, प्रचुंब उडविणे** –परस्परांस भेटणे; चुंबणे; मिळणे : 'डोळ्यांवरखाली पापण्या असती । पळें पळ चुंब उडविती। परी डोळे कांही त्यांस न देखती।'–योस ८.५४. [सं. चुम्ब]

**चुंबक** पु. (भौ.) लोखंड, पोलाद यांसारख्या पदार्थांना खेचून घेण्याचे अंगभूत सामर्थ्य असलेली वस्तू.लोहचुंबक : 'चुंबकसन्निधानमात्रे लोह भ्रमतसे विचित्रे।' –विसिंउ २.५७. [फा. चंबक; सं.]

**चुंबक** वि. १. (ल.) चुंबन, मुका घेणारा; स्त्रीलंपट; विषयी. २. कृपण, कद्रू; कंजूष; कवडीचुंबक : 'द्वाड आपेसी वोंगळ। चाळक चुंबक लच्याळ।'– दास २.३.२८ ३. प्रत्येक विषयात तोंड घालणारा : 'जो निंदकू नास्तिकु। ज्ञानेविण चंबकु '– विस १५६. [सं. चुम्ब]

**चुंबक क्रोड** वि.अ. विद्युतचुंबकात वापरले जाणारे लोखंडी क्रोड. याच्याभोवती चुंबकीय तारेचे वेटोळे असते. या वेटोळ्यातून विजेचा प्रवाह वाहू लागला की विद्युतचुंबक कार्यरत होतो.

**चुंबकत्व** न. आकर्षित करून घेण्याचा, खेचण्याचा गुणधर्म. [सं.]

**चुंबकत्वमापी** पु. चुंबकीय आकर्षणाची तीव्रता मोजण्याचे उपकरण.

**चुंबक पाषाण** (भौ.) चुंबकाचे गुणधर्म असलेला पत्थर. यात मुख्यत: मॅग्नेटाइट हे लोहखनिज असते.

**चुंबक फलक** शैक्षणिक दृक्साधनांपैकी एक महत्त्वाचा घटक. मागील बाजूस चुंबक चिटकविलेली चित्रे आवश्यकतेनुसार या फलकावर चिकटविता येतात व काढून घेता येतात.

**चुंबक फित** (भौ.) लोहचुंबकत्वाचे गुणधर्म असलेल्या लोहखनिजाच्या पुडीचा लेप दिलेली पातळ लवचिक फीत.

**चुंबकमणि–णी** पु. लोकांना आकर्षित करण्याचे सामर्थ्य असलेली व्यक्ती, स्थान. [सं.]

**चुंबकसूचि-ची** स्त्री. होकायंत्र; लोहचुंबकाची लहानशी कांडी टांगून ठेवली असता पृथ्वीच्या चुंबकीय क्षेत्राच्या प्रभावामुळे तिचे ठरावीक टोक उत्तरेकडे राहते. दिशा ओळखण्यासाठी चुंबकसूचीचा उपयोग होतो. [सं.]

**चुंबकक्षेत्र** न. लोहचुंबकाचे प्रभावक्षेत्र. लोहचुंबकाच्या शक्तीनुसार चुंबकाभोवतीच्या ज्या भागात काही अंतरापर्यंत चुंबकाचा लोखंडाला आकर्षून घेण्याचा गुणधर्म दिसतो ते क्षेत्र.

**चुंबकावरण** न. (पदार्थ) ग्रहाभोवतालचा स्वतःच्या चुंबकत्वाच्या प्रभावाखालील प्रदेश.

**चुंबकीय अक्ष** लोहचुंबकाच्या ध्रुवांमधून जाणारी काल्पनिक रेषा.

**चुंबकीय दृक्शास्त्र** प्रकाश व चुंबकत्व यांच्या परस्पर संबंधाचे शास्त्र. याचा शोध प्रथम फॅराडे याने लावला.

**चुंबकीय ध्रुव** (भौ.) १. लोहचुंबकाच्या प्रवर्तनरेषा अनुक्रमे उत्तर व दक्षिण ध्रुव या दोन अग्रांजवळ एकत्र आलेल्या असतात. अशा प्रत्येक अग्रास चुंबकीय ध्रुव म्हणतात. उत्तर ध्रुवापासून प्रवर्तनरेषा विभागतात तर दक्षिण ध्रुवावर त्या एकत्र येतात अशी कल्पना आहे. २. पृथ्वीवर भौगोलिक उत्तर व दक्षिण ध्रुवापासून जवळ चुंबकीय उत्तर व दक्षिण ध्रुव आहेत. चुंबकीय ध्रुव एक संकल्पना आहे.

**चुंबकीय परिपथ** (भौ.) चुंबकीय स्त्रोताचा वलयाकृती मार्ग.

**चुंबकीय याम्योत्तर, चुंबकीय रेखावृत्त** (भौ.)पृथ्वीवरील एक बृहत वर्तुळ. (रेखावृत्त) चुंबकीय याम्योत्तरावर असणारी चुंबकसूची फक्त पृथ्वीच्या चुंबकक्षेत्राच्याच प्रभावाखाली असते.

**चुंबकीय युग्मन** (वि.अ.) एकमेकांना छेदणाऱ्या चुंबक-क्षेत्राच्या योगे विद्युतवेटोळ्यांना जोडणारा दुवा.

**चुंबकीय वादळ** (भौ.) पृथ्वीवरील चुंबकीय क्षेत्रात अचानक आलेली खळबळ. सूर्यामधील डागांमधून निघणाऱ्या चुंबकीय कणांच्या झोतामुळे पृथ्वीवर असे बदल घडून येतात.

**चुंबकीय विषुववृत्त** (भौ.) भौगोलिक विषुववृत्तापासून भिन्न असे पृथ्वीवरील बृहत्वृत्त. या वृत्तावरील प्रत्येक बिंदू चुंबकीय उत्तर व चुंबकीय दक्षिण ध्रुवापासून नव्वद अंशावर असतो. त्याची पातळी पृथ्वीच्या चुंबकीय अक्षाशी काटकोनात असते.

**चुंबकीय क्षेत्र** पहा : **चुंबकक्षेत्र**

**चुंबडे** न. गाठोडे; बोचके : 'कुळत्या भरडून आणल्यालं चुंबड हाय.' - रैत ११२.

**चुंबणे** उक्रि. मुका, चुंबन घेणे. [सं. चुंबन]

**चुंबणे** उक्रि. १. (स्तन, फल इ.) चोखणे; सेवन करणे : 'परी ते वेगळेपणे भोगिजे। जैसे पक्षिये फळ चुंबिजे।' - ज्ञा ५.१३१. २. (ल.) चोखून शुष्क करणे; (ताप, भूतसंचार, इ.) कृश , क्षीण करणे. [सं. चुंबन]

**चुंबत** क्रिवि. नाईलाजाने; मुकाट्याने; बिनतक्रार; निमूटपणे : 'जेव्हा बाहेर गावचे मजूर शोधू लागलो तेव्हा कातोडी चुंबत कामावर आले.' - आआशे ३७६.

**चुंबन, चुंबा** न. १. मुका घेण्याची क्रिया. २. मुका. ३. आकर्षण. (क्रि.घेणे, देणे.) [सं.]

**चुंब(भ)ळ** स्त्री. १. डोक्यावरील ओझ्याखाली, घागरीखाली ठेवायची कापडाची, चिरगुटाची गुंडाळी, वेटोळे. २. (ल.) मूळव्याधीच्या मोडाचे वेटोळे, वेठ .

**चुंबळ** स्त्री. सुसरीचा जबडा व नाक यांमधील सुळका : 'तिची छद्मी दृष्टी, करकरीत दाढा, चुंबळ ...' - डोह १२८.

**चुंबळ** न. उसाचे चिपाड. (को.)

**चुंबा** पु. (मुंग्याचा, अळ्यांचा, कीटकांचा) बुचका, पुंजका, झुंड, घोळ, जमाव. [सं.]

**चुंबाचुंबी** स्त्री. लगट : 'प्रतिगामी संघटनांशी चुंबाचुंबी न आवडून...' - अहीदि २३६.

**चुंबित** वि. चुंबन घेतलेले, चुंबिलेले. [सं.]

**चुंबि(बी)त** क्रिवि. आपण होऊन; मुकाट्याने; निमूटपणे; दबकत; नाईलाज होऊन आपसुख; खाली मान घालून; नाक मुठीत धरून : 'मी आपली चुंबित तेथून उठून दुर्गीला घेउन खाली चालती झाले...' - पलकाघे २२६.

**चुंबी** स्त्री. गर्दी; झुंड.

**चुंबी** वि. १. चुंबन घेणारा. २. (ल.) पोचणारा; स्पर्शणारा. उदा. गगनचुंबी, मुखचुंबी, चंद्रचुंबी इ.

**चुंभळ** पहा : **चुंबळ**

**चुंभळ** वि. आशाळभूत; हावरा; लोभी : 'रिद्धीसिद्धी देसी। आम्ही चुंभळी नव्हो तैसी।' - तुगा १४५५. [सं. चुम्ब]

**चुंभळ** स्त्री. सुरुंगासाठी भोक पाडताना अंगावर गदळ उडू नये म्हणून पहारीच्या टोकावर बांधलेली कापडाची गुंडाळी.

**चुंभळी** स्त्री. व्यभिचारी स्त्री : 'चुंभुळीशी करी चुंभुळीचा संग। अंगीं वसे रंग क्रियाहीन ।' - तुगा २१२२. [सं.चुम्ब]

**चू, चुवा, चुहा** पु. ओल्या खोबऱ्याचा हळदमिश्रित कीस. (कर.) पहा: **चव**

**चूक** स्त्री. लहान खिळा.

**चूक** स्त्री. दोष; चुकी; अपराध; गैरवाजवी कृत्य; घडू नये अशी गोष्ट; गफलत; हयगय.

**चूकडाव** पु. सोंगट्यांच्या खेळात चुकीने दिलेला डाव.

**चूकभूल** स्त्री. नजरचुकीने, विस्मरणाने राहिलेला, झालेला दोष, अशुद्ध इ.; अशुद्ध, व्यंग, दोष, कसर, न्यून इ. अर्थाचा व्यापक शब्द.

**चूकमाक** स्त्री. अपराध : 'मोठ्या बायांच्या कौलावरून जी चूकमाक केली झाली असेल, त्याची बायांजवळ क्षमा मागून तळी भरली'.- धाधो २४३.

**चूकवाक** स्त्री. चुकी वगैरे; दोष; अपराध :'आम्हाकडून चूकवाक बोलीमध्ये झाली असेल तर क्षमा असावी.' - पेद २६.५३.[चूक द्वि.]

**चूच** स्त्री. डोक्याचे पुढील केस काढून टाकणे; एक प्रकारची हजामत : '१। रुपया वरास (नवऱ्यामुलास) चूच केली तेव्हा न्हावी यास शेला १.' - ऐको ३८५.

**चूटणी** स्त्री. निवडणूक. [सं. चुण्ट]

**चूड** न. कांडर जातीचा साप. याचे शरीर चकचकीत असते. म्हणून यास हे नाव पडले.

**चूड** स्त्री. गवत वगैरे : 'वेठबेगार व चूड वोंडा वगैरे कारसाज पाहिजे.'– बाबा ३.२७५. पहा : **चुडाबोंडा**

**चूड, चुडी** स्त्री. गड्डी; पेंढी : 'सर्वज्ञे म्हणीतले : बाई : बापूडे वानरे चुडिचां चुडि करूनि घेउनि ए : तें तेया हाती दे :'– लीचउ ४६५.

**चूड** पु. मुकुट; तुरा. [सं.चूडा]

**चूड** स्त्री. १. पहा : **चुड; चुडी** २. (भात पेरणीच्यावेळी हातात धरून लावण्याचा) भाताच्या रोपांचा झुबका. (वा.) ० **उचलणे, धरणे, लावणे** – एखाद्यावर खोटा आरोप करणे, बालंट घेणे. ० **फिरवणे** – देश, गाव इ. लुटणे; जाळपोळ करणे.

**चूडा** स्त्री. १. शेंडी; २. मोराच्या डोक्यावरचा तुरा; कोणताही तुरा, गुच्छ. ३. (ल.) मुकुट; शिखर; शेंडा. ४. मुंजीत शेंडी राखण्याचा विधी.[सं.]

**चूडाकर्म** न. चौल; लहान मुलाचे जावळ काढून प्रथम शेंडी ठेवायचा विधी. [सं]

**चूडामणि–णी** पु. शिरोरत्न; शिरोभूषण; मस्तकी धारण केलेला मणी, रत्न: 'हस्तें ओढिल वस्त्र चुंबिल तदा चूडामणी मागणें।'–विरमं ६८. २. (ल.) अत्युत्तम कर्तबगार माणूस, वस्तू; अतिशय निपुण मनुष्य. उदा. संगीतचूडामणी, चिकित्सकचूडामणी इ. [सं.]

**चूडारत्न** न. तुऱ्यातील रत्न; मस्तकी धारण केलेले रत्न. वि. (ल.) अग्रेसर; अग्रभागी असणारे: 'जो मातें सेवी किरीटीं। तो होय ब्रह्मतेच्या मुकुटी । चूडारत्न ।'–ज्ञा १४.४००. [सं.]

**चूडि** लांबट तोंड : 'सूकर असे : तो बोडीआंतु चूडि खोवी :' – चदृपा १७.९.

**चुडेल** स्त्री. चेटकीण : 'रात रातभर जागनचं चाललं तं कसा नाई होनार अवतार चूडेलसारखा ?'–माणूस ११७

**चूण** स्त्री. न. गुरास खायला घालायचा तूर, हरभरे इ. द्विदल धान्याचा चुरा आणि कोंडा; आंबोण : 'जनावरांना घालतात ती तुरीची चूण घेउन येतो' – आआशे २१३. [सं. चूर्ण]

**चूण** न. बेसन; हरभऱ्याच्या डाळीचे पीठ.(बा.)

**चूण** स्त्री. लहान माणिक; हिरकणी; रत्नाचा लहान तुकडा. पहा : **चुणी**

**चूण** स्त्री. वळी; सुरकुती; चुणी; वळकटी;मुरड; निरी; चीण; वस्त्राची मुरडलेली, सुरकुतलेली अवस्था. [सं. चूण]

**चूणकस** स्त्री. कातण्याचे, चुण्या पाडण्याचे हत्यार. पहा : **चुणकस**

**चूण(न)डी** स्त्री. ठिपक्यांचे लाल लुगडे : 'एक म्हणे पैल माझी चूनडी।' – आपद् ९५. [हिं. चुतरी]

**चूत** पु. आम्रवृक्ष; आंब्याचे झाड : 'लता पिके आघवी । तवं चूत बांधे पालवी ।'–ज्ञा १८.१२४. [सं.]

**चूत** पहा: **चुतड**

**चूतपिसा** वि. स्त्रीलंपट; कामुक. [सं. च्युति]

**चूतफळ** न. आंबा; आम्रवृक्षाचे फळ : 'जैसें एकेची चूतफळें । इंद्रिया वेगळेंवेगळें ।'–ज्ञा१८.४७३. [सं.]

**चूतांकुर** पु. आंब्याचा मोहोर.

**चून** न. १. नारळाची खरवड; खवलेले खोबरे. (कुगो.) २. बेसन. 'गंजातलं घट्ट चून चमच्यानं ताटात वाढलं.'–माणूस ६०. (व.) ३. घासकामात खाली पडलेल्या पत्र्याचा भुसा. ४. चूर्ण; औषधी पूड. (गो.) [सं.चूर्ण]

**चूनबीड** न. बिडाचे भूस. हे शोभेच्या दारूकामात घालतात.

**चूनवडा** पु. गव्हाच्या पिठाचा सांजा हरभऱ्याच्या डाळीच्या पिठात घालून तुपात तळून केलेला वडा. (गो.)

**चूप** क्रिवि. गप्प; स्तब्ध; निमूटपणे. पहा : **चुप्प** : 'चूप आग लावायची आहे मला–' नाकरु २.४१. [सं.चुप]

**चूर** पु. १. चूर्ण; भुगा; तुकडेतुकडे; खुर्दा; चुरा; पूड : 'असुरांचे अस्थिपंजर। चूर होती लागता ।'– रावि२५.१४६. २. (ल.) (अति श्रमाने, थकव्याने, तापाने झालेला) गळाठा; ग्लानी; उठवण; शैथिल्य : 'थकून थकून चूर होउन, निकालाची सगळी उत्सुकता मरुन रिकामा झालेला.'– मुखवटे १३९. [सं.चूर्ण]

**चूर** वि. १. (अभ्यासात,निद्रेत,मद्याच्या धुंदीत, प्रेमलीलेत); मग्न; गुंग; गर्क; तल्लीन; निमग्न; गढून गेलेला : 'जो तो आपल्या ठिकाणी अगदी चूर होउन गेला.'–वज्राघात ५१.२. थिजलेला; आश्चर्यचकित झालेला; विस्मित; गोंधळलेला : 'आपणा स्वतःहून अधिक बुद्धिमान अशा स्त्रीशी बोलत आहों ही खात्री पटून तो मनात चूरच झाला.'– के १५.५.३४. [हिं.]

**चूरचार** पु. तुकडे, कपटे, कण इ.

**चूरमार** वि. आश्चर्यचकित; गोंधळलेला : 'तो मला भेकड म्हणाला !... इतकं मनापासून म्हणाला की मी चूरमार झालो...'–कृकादे ११२. [हिं.चूर]

**चूरवर्ग** पु. अग्निजन्य खडकाचा एक प्रकार. या वर्गात ज्वालामुखीपासून जे पदार्थ उडून मोकळे बाहेर निघतात त्यापासून झालेले खडक येतात.

**चूर्ण** न. १. पूड; पीठ; भुकटी; औषधादिकांची कुटून वस्त्रगाळ केलेली पूड; बुकणी. २. चुना. [सं.]

**चूर्णखंड** पु. चुनखडी; बारीक पूड करण्याची क्रिया. [सं.]

**चूर्णिका** स्त्री. १. पद्याचे गद्यात्मक निरूपण. २. अलंकारप्रचूर वाक्य; गद्यात्मक छंद : 'चंपूकाव्यातील चूर्णिकांचा गद्याचा प्रथम प्रयोग मराठी रचनेत केला तो आनंदतनयाने.'– हरिश्चंद्र–प्रस्तावना ४. [सं.]

**चूर्णी** स्त्री. गद्याला पद्यबंधाचा भास निर्माण करून देणारा जैन वाङ्मयप्रकार : 'असा शब्द वररुचीची कथा असलेल्या जैन चूर्णीत मिळतो.'–लोसारू ७४.

**चूल** स्त्री. पदार्थास उष्णता देण्यासाठी, अन्न शिजवण्यासाठी केलेली मातीची वीत– दीड वीत उंचीची, चार बोटे जाडीची अर्धवर्तुळाकार रचना. हिच्या पोकळीत लाकडे पेटवून वर भांडे ठेवतात. [सं. चुल्ली] (वा.) ० **अडणे** – पैशाची अत्यंत अडचण भासणे; स्वयंपाक करून जेवण्याइतकेही पैसे नसणे; भूकमार होणे. ० **थंड पडणे**– शिजवायला काही नसणे. **चुलीजवळ शौर्य दाखविणे**– घरकोंबडेपणा करणे; रांड्याराघोजी बनणे. **चुलीत जाणे**– नाश पावणे; विध्वंस होणे; निरुपयोगी ठरणे. **चुलीत मांजरे व्यालेली असणे**– १. एखाद्याची अतिशय विपन्नावस्था, दारिद्र्यावस्था होणे. २. कारणपरत्वे चूल पेटविण्याचे बंद पडणे. **चुलीतून निघून वैलात पडणे**– आगीतून

निघून फोफाट्यांत पडणे; एका संकटातून वाचल्यावर दुसऱ्या त्यासारख्या संकटात पडणे. **चुलीला अक्षत देणे**- एखाद्या घरची सर्व मंडळी जेवायला बोलावणे. **चुलीला अक्षत लागणे** - घरातील सर्व मंडळींना दुसरीकडे जेवायला जायचे असल्याने चूल बंद असणे. कोणतेही धर्मकृत्य संपले म्हणजे ब्राह्मण इष्टदेवतांवर अक्षता टाकून ते संपले असे सूचित करतात. त्या वरून चुलीचे त्या दिवसापुरते काम नसणे असे वरील वाक्प्रचाराने दाखवितात. **चुलीला विरजण घालणे** - चुलीतील अग्नि विझणे. **चुलीशी डोके खुपसणे**- स्वयंपाकाची जिगजिग सहन करणे.

**चूल** स्त्री. हौस. उत्साह.(झाडी.) [हिं.]

**चूलखंड** न. चूल.

वि. उसाच्या गुऱ्हाळात काहिलीखालील भट्टीत उसाच्या चिपाडांचे जळण घालणारा; जाळव्या.

**चूलदान** न. १. चुली घातलेल्या आहेत तो मातीचा ओटा. २. चूल.

**चूलपोतेरे** न. चूल झाडणे, सारवणे इ. स्वयंपाकाच्या तयारीच्या पूर्वीचे काम. या दोन्ही शब्दांची वरील अर्थी अदलाबदल होते. (क्रि.करणे.)

**चूलभाणस** न. वधूवर वरातीनंतर वरगृही आल्यावर होणाऱ्या लक्ष्मीपूजनानंतर वरमातेने नववधूस स्वयंपाकगृह दाखविण्याचा विधी.

**चूलभानवशा** वि. घरघुश्या; रांड्याराघोबा; चुलीपाशी बसण्याची आवड असणारा.

**चूलभान(ण)वस, चूलभान(नो)स** स्त्री. पु. १. चुलीच्या मागील मातीचा, चुन्याचा ओटा. २. चूल सारवणे, चुलीत पेटवण घालणे, वर भांडी ठेवून स्वयंपाकास लागणे इ. चुलीपुढील कामे. जेवण तयार आहे या अर्थी चूलभानवस झाडली-सारवली-लिंपली-आटपली असे शब्द वापरतात.

**चूलभुई** स्त्री. स्वयंपाकानंतर, जेवणानंतर, चुलीजवळील भांडी आणि ताटे काढून टाकून जागा साफ करणे, सारवणे इ. काम. या अर्थी चुकीने चूलपोतेरे या शब्दाचाही उपयोग करतात.

**चूलवेल** पु. बाजूच्या भागासह असलेली चूल : 'माझी आई... कमरेवर मातीचा चूलवेल घेऊन आमच्या नवीन घरीं जात होती' - विरंगुळा २.

**चूष** स्त्री. १. गोडी; मजा; गंमत : 'ही फळे थोडी खाण्यातच चूष आहे.' - फचि ३०. २. टूम.

**चूषण** न. चोखणे; शोधून घेणे.

**चूषलेख** पु. पसंतीच्या किंवा आवडीच्या, महत्त्वाच्या प्रासंगिक विषयावर केलेले लेखन : 'अतिशय सकस व गोड दूध असावे; परंतु ते गळक्या अथवा फुटक्या खापरांतून पिण्यासाठी दिले जावे तसे किती तरी अग्रलेखांच्या अथवा चूषलेखांच्या (फीचर्सच्या) वाचनाच्या वेळी वाटत रहाते.' - भाअव्य ७१.

**चूषित्र** न. (भौ.) हवा किंवा द्रव यांचा, जोराने ओढून (शोषून) प्रवाह मिळविण्यासाठी वापरले जाणारे यंत्र.

**चूहेटी** स्त्री. चोयटी : 'बोलता बोलता ग हरीनं माव केली । चूहेटी घेऊन बोट चिरून घेतली ।।' - लोसाको.

**चूळ** स्त्री. १. पहा : **चुळका**. २. तोंडात घालून खळबळून बाहेर टाकण्यासाठी तोंडात घेतलेले पाणी; गुळणी : 'कीं चूळ जो जलधिची करि, त्या मुनीची ।' - वालोसं ६. [सं.चुलुक]

**चूळ** स्त्री. १. खाज; कंडू. २. खुमखुमी; बलवत्तर इच्छा. (खा.)[हिं.चुल]

**चूं** न. स्त्री. १. धनुष्याचा टणत्कार. २. बंदुकीच्या गोळीचा सणसणाट. ३. नाजूक, सौम्य आवाज, शब्द. उदा. उंदराचा चूं चूं असा आवाज. (क्रि.म्हणणे, करणे.)(वा.) ० **करणे** - बोलणे; तोंडातून शब्द काढणे : 'पण स्टालीन हयात असेपर्यंत कोणाची चूं करण्याची टाप लागली नाही.' - आआआ १६.

**चूंचूं** न. चिमण्यांचे चिवचिवणे; उंदरांचे चुंचावणे. [ध्व.]

**चेइ(ई)णे,चेणे** अक्रि. जागृत होणे; चेतणे; जागे होणे; निजून उठणे; निद्रेचा त्याग करणे : 'चेइलिया आपुलें ज्ञान। जैसें नाहींचि होय स्वप्न।' - ज्ञा १५.५५९. [सं.चित्]

**चेइरी-रे** स्त्री. न. जागृती : 'आंतु महानंदा चेइरें जाहलें। बाहेरि गात्रांचें बळ हारपोनि गेलें।' - ज्ञा ११.२४६.

**चेइलेपण** न. जागृतावस्था; जागेपण : 'काय कीजिती चेइलेपणी । स्वप्नींचीं तिर्ये बोलणी।' - ज्ञा १५.२१८.

**चेक** पु. धनादेश; हुंडी; नमूद केलेली रक्कम निर्दिष्ट व्यक्तीला देण्याचा बँकेला दिलेला लेखी आदेश : 'चेक वटला पण खातेदार बुडाला.' - गुमा २. [इं.]

**चेक** पु. कापडाचा एक प्रकार; चौकटीचे कापड. [इं.]

**चेक** पु. (अधिकाऱ्याचा) दपटशा; तंबी; दाब; अडथळा. [इं.] (वा.) ० **करणे**-तपासणी करणे. ० **ठेवणे, घालणे**- दाब ठेवणे; शह घालणे. ० **येणे**-दाब येणे; निरोध, अडथळा येणे, होणे.

**चेकचाक** वि. स्वच्छ.

**चेकना** वि. एका डोळ्यांनी आंधळा, तिरळा. [सं.चक्षु]

**चेक नाका** पु. जकात वसूल करण्याचे ठिकाण : 'चेक नाक्याच्या कारकुनाने...' - मुंपोचाक ८.

**चेकर** पु. (तिकीट इ.) तपासणारा. [इं.]

**चेकरने** क्रि. चरकणे.(व.)

**चेकरमू** वि. तऱ्हेवाईक, लहरी.(व.)

**चेकळ** स्त्री. चंगळ; रेलचेल; विपुलता; बाहुल्य; प्राचुर्य; लयलूट; आबादानी.

**चेकानी** स्त्री. चकणी : 'याची नजर चेकानी...' - बगा १३०.

**चेका(क)ळणे** अक्रि. १. बेबंद वागणे. २. निश्चयाने, आवेशाने, जोराने उद्योगाला, कामाला, खेळायला लागणे; आवेशाने प्रवृत्त होणे. ३. (घोडा, बैल इ.) बुजणे, बेफाम होणे. ४. (पाऊस, वारा इ.) जोरात, सोसाट्याने सुरू होणे. ५. (मूल इ.) बेसुमार रडणे. ६. (आग इ.) भडकणे; पसरणे. ७. (धान्य, फळे इ.) माजणे; विपुल होणे; वेडे पीक येणे. या क्रियापदाचा उपयोग अनियंत्रित आहे. सामान्यपणे या शब्दाच्या सर्व प्रयोगामध्ये अमर्याद विपुलता, प्राचुर्य अभिप्रेत असते.

**चेकोंडा** पु. चाट; भुलावण; हुलकावणी.

**चेचकट, चेचट** वि. थोडाबहुत चेचका; चेपलेला.

**चेचका** वि. १. अनेक चरे पडून विरूप झालेला (रुपया इ.).

२. खोमललेला; चेचलेला; ठोकलेला; खोचा पडलेला.

**चेच(चा)ड** वि. १. काहीसा चेचका (रुपया इ.). २. उंचसखल; खडकाळ; खडबडीत; चोरचिलटांचा (रस्ता). ३. (ल.) दुर्बोध; घोटाळ्यात टाकणारा; किचकट (ग्रंथ, श्लोक इ.). ४. जड; अवजड. (माण.)

**चेचणे, चेचरणे** उक्रि. १. ठेचणे; चिरडणे. २. दणकावणे; कुटणे; ठोकणे; मारणे; पिटणे; कुचलणे. [ध्व.]

**चेचरचाचर** वि. हलक्या हाताने वाटलेले; फार बारीक न वाटलेले : 'फुटाण्याची पुरचुंडी चेचरचाचर होईल.'–वानगी ५०. (व.)

**चेचवड** वि. बोटचेप्या; ठामपणा नसलेला : 'तथापी धर्मार्जुन याकामी बरेच चेचवड आहेत हे कृष्णाने ओळखले होते.'– विश १२९.

**चेचा** पु. ठेचा; धने व मिरच्या एकत्र कुटून केलेली जाडीभरडी चटणी.

**चेचे** न. (अन्न इत्यादिकांकरिता) पक्ष्यांच्या पिलाची चिवचिव. [ध्व.] (वा) ० **करणे** – दीनवाणीने विनवणी करणे.

**चेट** पु. दास; सेवक; चाकर : 'तिकडे चेट, इकडे विट, हे आहे तरी काय?'– मृच्छ १३. [सं.]

**चेट, चेटक** पहा : **चेटूक**

**चेटक** न. चेटूक; जादू; जादूगिरी : 'ते देउळा आंतु कोंडिजति : तवं बाहीरि खेळता देखिजति: सर्वज्ञे म्हणीतलें : हें चेटकाचें कार्य गा :'– लीचपू २००.

**चेटका–की–क्या** वि. १. जादूटोणा, मंत्रतंत्र, करणी करणारा; कवटाळ्या; जारणमारणाचे प्रयोग करणारा. २. (ल.) दुसऱ्याचा घातपात करणारा; दुसऱ्याच्या नाशासाठी गूढ हिकमती योजणारा; कारस्थानी : 'मैद भोंदु परद्वारी। भुरेकरी चेटकी।'– दास २.३.३१.

**चेटकीण** स्त्री. जादूटोणा, जारणमारण, करणी करणारी स्त्री.

**चेटणी** स्त्री. चटणी; तिखट. (गो.)

**चेटा** पु. मुलगा : 'सुईणीपुढे चेटा लपणार नाही.' या म्हणीशिवाय हा शब्द इतरत्र क्वचित आढळतो : 'सुईणीपुढें चेटा। काय लपविसी चाटा।'–तुगा ६२३.

**चेटाडणे** क्रि. चेतविणे; पेटविणे : 'तिले फासमां टाकी दिधं अन् फास चेटाडले.' – तीसा १५१

**चेटाळणे** अक्रि. संचरणे; वारे शिरणे. [सं. चेष्ट्]

**चेटांग** स्त्री. थाप. (व.)

**चेटी** स्त्री. दासी; सेविका. [सं.]

**चेटीचंद** पु. महिन्याच्या प्रथम दिवशी दिसणारी चंद्रकोर; सिंधी समाजाचा एक उत्सव. [सिंधी]

**चेटुल्या** स्त्री. थट्टा. (झाडी) (को.)

**चेटूक** न. १. जादूटोणा; जादूगिरी; करणी; मंत्रतंत्र; कुविद्या; जारणमारण. २.(ल.) कपट; शाठ्य; छक्केपंजे; चकरमकर. [सं.चेट]

**चेड** स्त्री. मुलगी; तरुण स्त्री. [सं.चेट,चेटी]

**चेड–ड, चेडरु** न. लहान मूल. (को.)

**चेडका** पु. माणूस : 'चेडका थार्नार नाय.'– अउआ १०२.

**चेडको** वि. आईबाप नसलेला; पोरका. (गो.)

**चेडवळ** पु. तुरा असलेला चंडोल पक्षी.

**चेडवा** स्त्री. मुलगी. (को)

**चेडा** पु. मुलगा. (को.) [सं.चेट]

**चेडा–डे** पु.न. १. चेटूक; करणी; जारणमारण; जादूटोणा : 'कोणी एकाचा श्राप जडे। कोणी येकें केले चेडे।'– दास ३.७.१५. २. एक प्रकारचे पिशाच्च : 'रिचविती जळतकुडी। लाविती चेड्याचां तोंडी।'–ज्ञा १७.९७. ३. महारांचा देव.

**चेडाबेंडा** पु. लहान वासरू.

**चेडी** स्त्री. मुलगी. (गो.)

**चेडीपण** वि. पोरका; आईबाप नसलेला (मुलगा); चेडका. (गो)

**चेडू** स्त्री. मुलगी; कुमारी; कुंवार. (को.)
न. मूल.

**चेडूली** चंडोल; सैन्याची पिछाडी.

**चेढा** पु. कटकट, हेका.

**चेढुल** पु. सैन्याची पिछाडी; चंडोल : 'यशवंतराव पंवार याणी सदरीं लिहिल्याप्रमाणे मोगलाकडील चेढुल लढाई करून बुडविला नंतर यशवंतराव पवार पानिपतचे लढाईत फौजेसुद्धा गर्द होऊन गेले.'– ऐको ३८५.

**चेणे** न. जागेपणा; जागृतावस्था : 'ययांचेनि बोभाटे। आत्मयाची झोप लोटे। पूर्ण तरी ऋण न फिटे। जें चेणेंचि निंद की।'– अमृता ३१.[सं. चेतन]

**चेणे, चेयिणे** अक्रि. जागृत होणे; जागे होणे : 'नुरेंचि चेयिलिया। नींद जैसी।'– अमृता २.४१. पहा : **चेइणे** [सं.चेतन]

**चेत** न. चित्त; मन; अंतःकरण. [सं.चेतस्]

**चेत** स्त्री. पेट; भडका. (क्रि. घेणे, होणे, येणे)

**चेत** वि. १. मूर्च्छित; बेशुद्ध; निश्चेष्ट. २. चीत; पाठीवर पडलेला; उताणा.

**चेत** वि. जागा; जागृत : 'असतेनि देहें एतुला। जो चेतुचि दिसे निदेला।'– ज्ञा ६.६५. [सं. चेतस्]

**चेतक** पु. (सास.) उत्तेजक; प्रोत्साहक. [सं.]

**चेतक** वि. (मानस.) व्यक्तीला कोणत्याही स्वरूपाची क्रिया करायला प्रवृत्त करणारा तिचा अंतर्गत किंवा बाह्य घटक.

**चेतणे** अक्रि. १. (विस्तव, आग इ.) पेटणे; भडकणे; जळणे. २.(ल.) (काम, क्रोध इ.) जागृत, उद्दीपित होणे : 'चित्त आपुलें आपण जिंतिलें। ते निश्चित जेथ सुतले। चेतीचिना।'– ज्ञा ५.१४८.
सक्रि. १. पेटवणे; भडकवणे; उद्दीपित करणे. २. अंगात (भूत, पिशाच्च) आणणे; (भूत) घालणे. [सं. चित्]

**चेतन** न. (सास.) प्रोत्साहन; उत्तेजन. [सं.]

**चेतन** न. १. जागेपण; जागृती; उद्‌बोध. २. सजीवपणा; जिवंतपणा : 'त्याणें झालें मज चेतन। ज्ञानसूर्य प्रकाशून।'– गुच १९.४.
वि. १. सजीव; जिवंत. २. संवेदनक्षम. ३. शुद्धीवर असलेला.[सं.]

**चेतनगुणोक्ति–क्ती** स्त्री. (सास.) निसर्ग इ. अचेतन पदार्थांवर मानवी भावनांचा आरोप करून केलेले चित्रण; एक अर्थालंकार. [सं.]

**चेतनवाद** पु. (सास.) प्राकृतिक वस्तू; घटना व विश्व यांच्या ठायी आत्म्याचे अस्तित्व आहे असे मानणारे मत. [सं.]

**चेतना** स्त्री. १. जीवनशक्ती; प्राणशक्ती; जीव; प्राण; जाग; जागृती :

'म्हणोनि अग्नीविण देहीं। चेतना न धरे।'– ज्ञा ८.२१४. २. पुरुषत्व; पौरुष; जननशक्ती. ३. आकलनशक्ती; ग्रहणशक्ती; बुद्धी; चित्त; मन; ज्ञानशक्ती : 'विवेकाचे लोपल्या भान। स्तब्ध चेतना होय जाण।'– एभा २१.२१८. [सं.]

**चेतनावर्ग** पु. इंद्रियसमुदाय : 'हा चेतनावर्गु आघवा। मरणीं असे टवटवा।'– ज्ञा ८.२१०. [सं.]

**चेतनाशून्यत्व** न. बधिरपणा; बधिरता. [सं.]

**चेतनासंस्थाशास्त्र, चेतनीविज्ञान** न. (वैद्यक.) मेंदू, मज्जातंतूंची रचना, त्यांच्या क्रिया व विकार ह्यांचा विचार करणारे शास्त्र.

**चेतनी** (मानस.) पहा : **चेता**

**चेतनीकरण** न. (सास.) सजीवीकरण; सचेतनकरण. [सं.]

**चेतरा** वि. धूर्त; चतुर; हुषार. [सं.]

**चेतव** पु. १. क्षुब्धता; विकारवशता; (एखाद्या साहसकृत्यासंबंधीचा) आवेश; अभिनिवेश; क्षोभ; उद्दीपन; उत्साह. (क्रि. येणे, अंगी आणणे.) २. जिवंतपणा; प्राणशक्ती. ३. पाझर; स्त्राव. (क्रि. फुटणे, सुटणे.)

**चेतवण** न. अग्नी उत्पन्न करण्याकरिता, पेटविण्याकरिता उपयोगात आणण्याचे गवत, काड्या, धलप्या, काटक्या इ.; गूल; चूड; पेटवण.

**चेत(ता)वणी** स्त्री. सूचना; इशारा; आव्हान. चिथावणी : 'या प्रकरणी एक चेतावणी मात्र दिलीच पाहिजे'– मसासंअभा ४१९. [सं.चित्]

**चेतवणे** अक्रि. क्षुब्ध होणे; विकारवश होणे; खिन्न, लज्जित होणे : 'देखोनि मोइसे चेतवला। तंव तेचि परौतीं मृत्यु पातला।'– क्रिपु १.२२.१९. [सं. चित्]

**चेत(ता)वणे** अक्रि. १. पेटणे; चेतणे. २. रडू कोसळणे; (लहान मुलास) रडण्याची लहर येणे.

**चेत(ता)विणे** सक्रि. १. पेटविणे; पाजळणे; शिलगावणे; प्रदीप्त करणे. २. (ल.) उद्दीपित करणे; क्षुब्ध करणे; क्षोभविणे : 'कंकणें रुणझुणती प्रचंड। मनातें चेतवावया।'–मुआदि १९.२२. ३. चैतन्ययुक्त करणे; जीव घालणे; जिवंत करणे; उत्तेजन देणे; फिरून जिवंत करणे : 'जे जडातें जीववी। चेतनेतें चेतवी ।'– ज्ञा ७.२०.

**चेतव्य** वि. १. चिंतनीय; विचार करण्याजोगा, योग्य इ. : 'तेणेंचि चित्तासि चेतव्य। बुद्धिसी बोधव्य तेणे ब्रह्मबोधें।'– एभा ३.६४०. २. जिवंत करणारा, चैतन्य देण्यारा, जागृत करण्यास योग्य. [सं.चित्]

**चेत(ता)ळणे** उक्रि. १. (लाकडे हलवून, ठसकारून अग्नी) प्रदीप्त करणे. २. (ल.) प्रबुद्ध, जागृत करणे; उचल, उठावणी करणे. ३. (ल.) राग, द्वेष, मत्सर, उत्साह, क्रोध इ. मनोविकारांना चालना देणे; (भावना) उद्दीपित करणे.

**चेता** वि. जागा; जागृत; सावध : 'परि चेता चेतयिता जाला। दोनी तोचि ।'– अमृता २.६६. (व.)

**चेतासंस्था** स्त्री. मज्जापेशींच्या गुंतागुंतीच्या जाळ्याचा बनलेला शरीराच्या सर्व क्रियांचे नियंत्रण करणारा अवयव. यात मेंदू, पृष्ठमज्जारज्जू तसेच शरीरभर पसरलेल्या मज्जारज्जूंचा समावेश होतो.

**चेताबंद रेशीम** एक प्रकारचे रेशीम.

**चेती** स्त्री. बुरशेपणा; बुरसलेली अवस्था; बुरा. पहा : **चिती**

**चेद्दर** स्त्री. चादर. (व.)

**चेन** स्त्री. १. साखळी. : 'किल्लीची चेन ती उलट्या दिशेने फिरवू लागली.'– वर्षा १२७. २. जमीन मोजण्याची ६६ फूट लांबीची लोखंडी साखळी. [इं.]

**चेन** स्त्री. राड; पाणी साचून झालेली रेंदाड. (कु.)

**चेन** शअ. पासून; च्याने : 'आत्म्याचेनी जाला पवन। पवनाचेन प्रगटें अग्न।'– दास १६.१०.६.

**चेन** वि. जागृती : 'कीं चेडूला चेऊ वैसे । ऐसे चेन '– अमृ. ३०९[सं.]

**चेनलाइन** स्त्री. शेतातील परस्परांपासून दूरची ठिकाणे सांधणारी कल्पित रेषा, ज्या रेषेवर इतर कोणबिंदूपासून लंब कल्पितात ती रेषा. [इं.]

**चेनि–नी** शअ. त्याने; मुळे; पासून; – च्या योगाने : 'जाओनि पूर्णगिरीचेनि घाटे। कळां आस्वादितांती।'– वच्छह १५०.

**चेन्नोर** स्त्री. भाताची सुवासिक जात. (झाडी.)

**चेप** स्त्री. पु. १. दाब; चेपणी; ठासणी. २. दाटी; गर्दी; कचाटी : 'विधीनिषेधाचे सापडलो चेपे। एक एका लोपे निवडेना।'– तुगा १५०७.

पु. काटेरी काड्याकुड्याचा दाबून बांधलेला भारा; काट्यांचा फेसाटा.

स्त्री. १. गुळाची चपटी ढेप. २. एकास एक चिकटलेल्या कागदांचा, जटा वाढलेल्या केसांचा समुदाय; केसातील गुंतवळांचा पुंजका. (को.)

**चेप** स्त्री. रोगाची साथ.

**चेपकडे** न. काट्यांचा फेसाटा बांधून लहान करण्याच्या, घट्ट दाबण्याच्या उपयोगी अशा बांबूच्या दोन कामट्या, चिरट्या. (राजा.)

**चेपकने** क्रि. मुडपणे, चपटा होणे.(व.) [सं.]

**चेपट** वि. चापट; बसकट; थबकट; चापटलेला.

**चेपटणी** स्त्री. दाबून, ठोकून, पसरट चापट करण्याची क्रिया.

**चेपटणे** सक्रि. दाबून, दडपून चापट, पसरट करणे; चेपून सपाट करणे.

**चेपण–णे** न. (एखादा पदार्थ) चेपण्याकरिता, दाबण्याकरिता त्याच्यावर ठेवलेले वजन, दडपण.

**चेपणी** स्त्री. १. गवंड्याचे थापटणे; करणी. २. दाब देण्याची, चेपण्याची क्रिया; दडपण; दाब.

**चेपणी** स्त्री. आढी : 'एऱ्हवीं चांदिणें पिकविजन आहे चेपणीं। कीं वारया घालत आहे वाहणी।'– ज्ञा ९.२०.

**चेपणे** सक्रि. १. दाबणे; आवळणे; दाबून सपाट करणे; दाबून लहान करणे; जोराने दाबणे. २. स्पर्श करणे; हात लावणे : 'जैसा वेश्याभोगीं कवडा वेंचें। मग दारही चेपूं न ये तियेचें।'– ज्ञा ९.३२९. [सं.चिप्]

अक्रि. (पाया, भिंत, तुळई, खांब) खचणे; दबणे. [सं. चप्]

**चेपणे** अक्रि. १. दडपणे. २. मिळणे : 'गोसावीं बाइसांते दृष्टीं अवळोकिलें : दीठी दीठि मिळे आणि बाइसें ऐसीं खालुति वास पाहाति : गोसावियांची दृष्टि चेपे ना :'– लीचपू १०७.

**चेपणे** न. जमीन चोपण्यासाठी केलेले लाकडी आऊत; चोपणे. (कु.)

**चेपन्या** स्त्री. अव. वहाणा; चप्पल–चपला.

**चेपली–ळी** स्त्री. वहाण; पायतण. (राजा.) पहा : **चप्पल**

**चेपा** वि. बसकट; थबकट; दाबल्यामुळे सपाट झालेला; चापट; चपटा.

**चेपाचेप** स्त्री. १. दाटी; गर्दी; ठेचाठेच. २. (ल.) दाबादाबी; छपवाछपव; दडपून टाकणे. [चेपणे द्वि.]

**चेपाटी** स्त्री. मागावरील गोणपटाची खालची सुते चेपण्यासाठी व विणलेला भाग दाबण्यासाठी त्यावर दडपल्या जाणाऱ्या बांबूच्या पोकळ काठीला जागा करून देण्यासाठी उपयोगात आणलेली काठी, पट्टी.

**चेपारा** पु. चेप; दाटी; गर्दी; दाब.

**चेपावले** न. स्त्रियांनी पायांत घालायची वहाण. (को.)

**चेपे** पु. अव. पाय चेपणारे : 'महाराष्ट्रात आजमितीला...देवळाचे देवळे, पूजा करणारे पुजारी... पाय चेपणारे चेपे आहेत.' – मजीस्थि ९.

**चेपे** न. बसकी चपटी टोपी. विशेषत: लष्करातील शिपायांची, अधिकाऱ्यांची हॅट; टोपी : 'आताहि त्याने डोक्यावर चेपे घातले होते.' – माखा ५८. (राजा. कु.)

**चेमट, चेमटणे, चेमणे** पहा : **चेंबट, चेंबटणे**

**चेमटणे** अक्रि. रोडावणे; कृश होणे : 'मी अगदी चेमटून गेलो होतो.' – वाटा १०.

**चेयिरा–रे** वि. जागा; जागृत. पहा : **चेइरा** : 'चेयिरा करिताहि अवगणोनि। घोंरती घोरें पुन्हपुन:।' – दावि २३४.

**चेर** स्त्री. खिजवणी; खाजवणी; चिडवणी; क्षोभ; गांजणूक; क्षुब्धावस्था; चेतवलेली स्थिती. (प्रा.)

**चेर** शअ. वर. उदा. मेजाचेर = मेजावर. (गो.)

**चेर–रा** पु. एक रानटी वनस्पती. या झाडापासून एक प्रकारचा चिकट पदार्थ निघतो. याचे बोंड काटेरी असून त्याला तीन खापे असतात व आत सहा बिया असतात.

**चेरगडी** पु. खिजवणारा; चेतवणारा; चिडवणारा; आगलाव्या.

**चेरणे** पहा : **चेकळणे**

**चेरंजी** स्त्री. देवळाच्या आवारात प्रसाद म्हणून विकले जाणारे हलव्यासारखेच काटे असलेले साखरेचे दाणे; साखरफुटाणे : 'माझ्या हातावर कधी दोन चेरंजीचे दाणे ठेवले नाहीत.' – आआं १००.

**चेरा** पु. फजिती; टवाळी. हा शब्द फजिती या शब्दाला जोडून योजतात. उदा. फजिती चेरा = फजिती; खूप फजिती. पहा : **फजिती** : 'जनवाद लोकनिंद्य पिशुनाचे चेरे। साहूं तुजसाठीं अंतरलीं सहोदरें।' – तुगा २९५.

**चेरा** पु. चेहेरा, मुद्रा.

**चेरामोरा** पु. तोंडवळा; रंगरूप; मुद्रा; चेहरामोहरा. [चेहरा द्वि.]

**चेरी** पहा : **चिरी १, ३**

**चेल** न. कापड; वस्त्र; कपडे. पहा : **सचेलस्नान** [सं.]

**चेल** स्त्री. वैपुल्य; समृद्धी.

**चेलगडी** पु. १. खेळगडी. २. पहा : **चेरगडी**

**चेलतीचं** वि. फायदेशीर. (व.) [हिं.]

**चेलमडणे** सक्रि. चेमटणे : 'मांजरानं उंदीर चेलमडावा तसा पाटील उलथापालथा झाला.' – फकिरा १४५.

**चेला** पु. शिष्य; छात्र : 'चेल्यांचा सुकाळ। पिंडदंड भगपाळ।' – तुगा २८१९. [हिं.]

**चेला** पु. मुलगा; पालकपुत्र; चेडा. (गो.) [सं. चेटक]

**चेला** पु. लाकडाचा ढलपा.

**चेलो** न. व्हायोलिनच्या जातीतील एक मोठे तंतुवाद्य. झांज संगीतात याचा वापर करतात : 'त्यांच्याकडे डबलबास किंवा चेलो वाजवण्याचें काम देण्यात येई.' – प्रका २२७.

**चेव** पु. १. उद्दीपन; ईर्षा; स्पर्धा; उत्साह; आवेश; त्वेष; मस्ती, जोर; सणक. २. जाग; जागृती; झोपेतून उठणे; चेतना : 'दणके वाजतां दणदणा। चेव आला पांचांजणा।' – मुआदि ३७.३८. [सं.चित्]

**चेवचेव, चेवचेवणे** पहा : **चिवचिव, चिवचिवणे**

**चेवचेव** स्त्री. त्रास; जिगजिग. (व.)

**चेवणा** वि. बिथरलेला; उच्छृंखल : 'जो आशेचिया चेवणा। सर्वांगाचा वोळगणा।' – एभा १७.५१७.

**चेवणे** अक्रि. १. उच्छृंखल, बेताल, बदफैल होणे; भ्रष्ट होणे. २. ढळणे; मुकणे : 'तो आज्ञाचक्रावरोनि चेवला। केल्या मुकला कष्टासी.' – एभा १२.३.५०. ३. चळणे; वेडे होणे; (एखाद्या गोष्टीचे) वेड लागणे; उन्मत्त होणे; नादी लागणे : 'विषयीं चवलों मीपणा मुकलों । शरण तुज आलो पांडुरंगा।' – तुगा ९४७. [सं. चि]

**चेवणे** अक्रि. त्रासणे; चेतणे : 'तंव देखला स्कुंदत। नारद कळी लावित। त्यासि पुसे जगन्नाथ। कां चेवलासि।' – कक ३.१०.१०. [सं. चेतन]

**चेवव(वि)णे**, सक्रि. जागे, जागृत करणे; प्रबुद्ध करणे; चेतविणे : 'जैसा एकला जग चेववी। सहस्रकरू।' – ज्ञा ६.२०; 'कां निदेले चेववुनी। चेवविते जैसें।' – अमृता ५.२४. [सं. चित्]

**चेवा** पु. जागृती; जागेपणा.

**चेवाचेवाने** क्रिवि. तणतणून; रागावून; चिडून; त्वेषाने : 'अशा रीतीने तो चेवाचेवाने बोलू लागला, तेव्हां मिसेस स्वीटने त्याला दाबलें.' – सुदे १५१.

**चेवांडी** स्त्री. कुचेष्टा; खोडी.

**चेवूनचेवून** शअ. जोर करून : 'विठ्ठलरावांनी चेवून चेवून त्याला पाडला.' – विभूत १५३.

**चेष्टक** वि. १. चिडविणारा; खिजविणारा, त्रास देणारा; कुचाळखोर; खोडकर; आगलाव्या. २. चेतवणारा; उत्तेजन देणारा.

**चेष्टखोर, चेष्टबाज, चेष्टेबाज** पहा : **चेष्टेखोर** [हिं. बाज]

**चेष्टणे** अक्रि. चलनवलनादि क्रिया करता येणे; वर्तणे; वागणे; हालचाल करणे : 'जसें चेष्टे सूत्राधीन। दारुयंत्र।' – ज्ञा १.८१. [सं. चेष्ट्]

**चेष्ट(ष्टा)विणे** सक्रि. १. प्रबुद्ध, जागे करणे; उठविणे; हालचाल करावयास लावणे : 'देह जेणें स्वभावें धनंजया। जालें तें अपैसया। चेष्टवीच तें।' – ज्ञा १८.४२८. २. चिडविणे; संतापविणे; चेतविणे. ३. सचेतन, जिवंत करणे; जीव घालणे; उत्साह उत्पन्न करणे.

**चेष्टविता** वि. प्रेरणा देणारा; कार्यप्रवृत्त करणारा : 'इंद्रिया मनातें चेष्टविता आत्मा : सकळांही प्रकृतीतें चेष्टविता परमात्मा : ' –लीचउ ६४४.

**चेष्टा** स्त्री. १. चलनवलनादी क्रिया, व्यापार; (जिवंत प्राण्याची) हालचाल;

चळवळ : 'जे चेष्टा ते गुणाधीन। आपेसी असे।'- ज्ञा ३.५३. २. हावभाव; वेडावाकडा प्रयत्न. [सं.]

**चेष्टा** स्त्री. टिंगल; टवाळी; चीड आणणारे कृत्य किंवा भाषण. [सं.]

**चेष्टा** स्त्री. क्रिया; हावभाव :'श्रीप्रभूचीया केळिक्रीडा देखिलीया आणि माहात्मेयाचीया चेष्टा देखिलीया :' - लीचपू ५८९.

**चेष्टापर** वि. टवाळकीच्या स्वरूपाचे, खिजवणारे (भाषण) : 'मात्र तिला पाहून तिच्या स्वरूपानें मोहित झालेले एकदोघे पहारेकरी आपापसात चेष्टापर बोलत राहिले.'- रूरा ६३.

**चेष्टावणी** स्त्री. १. खोडी; कुचाळी; चीड आणणारी गोष्ट. २. (एखाद्याविरुद्ध) पिशाच्चास चेतवणे.

**चेष्टावणीचे भूत** १. (एखाद्यास सतावण्याकरिता) चेतवलेले, उठवलेले भूत, पिशाच. २. (ल.) (एखाद्याविरुद्ध) भांडण करण्यास चिथवलेला शांत व निरुपद्रवी मनुष्य.

**चेष्टाव(वि)णे** सक्रि. १. एखाद्याला दुसऱ्याविरुद्ध भांडण्यास प्रवृत्त करणे. २. एखाद्याविरुद्ध पिशाच्याला चेतविणे, उठवणे.

**चेष्टित** न. कृत्य; आचार; कृती; कर्म; हालचाल : 'आतां जाहलिया भ्रमहत। जैसें पिशाचाचें चित्त। मग इंद्रियांचें चेष्टित। विकळु दिसे।'- ज्ञा ५.५७.

वि. आचरलेले; केलेले; हालचाल करण्याची शक्ती असलेले; चलन पावलेले. [सं.]

**चेष्टित** स्त्री. हालहवाल, हकीकत : 'तीर्थरूपास तेथील चेष्टित सविस्तर लिहीत जावे.'- ऐको ३८५.

**चेष्टेखोर-बाज** वि. थट्टेखोर; मस्करी करणारा; खोड्या, टवाळ्या, कुचाळ्या करणारा.

**चेस** पु. (मुद्रण) छापण्याचा मजकूर कंपोज केलेला फॉर्म ज्या चौकटीत बसवतात ती चौकट. [इं.]

**चेस** पु. बुद्धिबळाचा खेळ. [इं.]

**चेसवटपणा** पु. लोचटपणा; कोडगेपणा : 'अन्यायमूलक निर्बंधाच्या कर्दमांत लोळत राहिल्यानें त्यांच्या मनाला असा चेसवटपणा आला होता.'- रभी

**चेस्टनट** पु. (वन.) थंड प्रदेशात वाढणाऱ्या कास्टानिआ या वनवृक्ष प्रजातीची लाल-किरमिजी रंगाची फळे अथवा बिया. [इं.]

**चेहन** स्त्री. कुशल; सुखी. (व.)

**चेहरगडी** पहा : **चेरगडी**

**चेहरणे, चेहरावणे** पहा : **चेकळणे**

**चेह(हे)रा** पु. १. मुख; तोंड; रूप; तोंडवळे; रंग, वर्ण आणि मुखचर्या (ज्यावरून एखाद्याच्या आजारीपणाचा किंवा निरोगी स्थितीचा बोध होतो) या दोहोंबद्दल हा शब्द वापरतात : 'चेहरा भव्य व मनोवेधक होता.' - पाआव्ह ३. (क्रि. उतरणे, पालटणे, बदलणे, टवटवीत होणे.) २. मुद्रा; चर्या; सुरत.[फा.चिहरा] (वा.) ० **करणे, बनवणे**- दाढी वगैरे करवून, मिशा वळवून चेहरा मोहक, आकर्षक करणे. ० **पडणे** - अत्यंत दुःख होणे; दुःखामुळे चेहरा खिन्न होणे : 'जुगारावर बापू पैसे उडवतात हे कळलं तेव्हा आईचा चेहरा साफ पडला.'- लव्हाळी ५४. ० **मालवणे** - चेहरा म्लान, निस्तेज होणे; मलूल होणे : 'काही दुःख होणारी गोष्ट आठवून त्याचा चेहरा मालवल्यासारखा झाला असावा.'- पलकोपे १११.

**चेहरामोह(हो)रा** पु. तोंडवळा; चेहऱ्याची ठेवण.

**चेहराविणे** अक्रि. चेतविणे; खिजविणे; चेष्टविणे.

**चेहरेदार-बाज** वि. सुंदर व आकर्षक चेहरा असलेला; भव्य चेहऱ्याचा; देखणा; गोरागोमटा.

**चेह(हे)रेपट्टी** स्त्री. १. तोंडवळा; चेहऱ्याची ठेवण : 'त्याचं नाव, गाव, चेहरेपट्टी...'- देशमु १३९. २. तोंडवळ्याच्या वर्णनाचा तपशील.

**चेहलक(ख)त** पहा : **चिलखत**

**चेहलदा** पु. वंजारी लोकांकडून वसूल करावयाचा कर.

**चेहळ** पु. पहा : **चिहाळ**

**चेह(हे)ळ** स्त्री. समृद्धी; चंगळ, विपुलता.

**चेह(हे)ळणे** पहा : **चिह(हा)ळणे, चिळरे** २

**चेळ** स्त्री. (प्र.) चेल; समृद्धी; वैपुल्य; चंगळ. [हिं. चेल]

**चेळ** पहा : **चळ** ३,४.

**चेळणे** उक्रि. जोराने आत शिरकावणे; ठासणे; चेंदणे; चिणणे.[सं.चल्]

**चे(चि)ळणे, चिहळणे** अक्रि. १. ओलसर होऊन पाघळणे. पहा : **चिघळणे**. २. बारगळणे; वेडे चाळे करणे. पहा : **चेकळणे**

**चेळपंत्रा, चेंदरला** वि. वेडेचार करणारा. (व.)

**चेळमडणे** सक्रि. कुस्करणे; क्रूरपणे हाताळणे : 'तरण्या पोरी चेळमडून बेजार केल्या.'- रानगंगा २४.

**चेळा** वि. हट्टी, खोडकर, टवाळ; वात्रट; कुचाळ (मूल). (प्रा.)[सं.चल्]

**चेळा** पु. विहिरीत माळ सोडणे व ओढणे यासाठी माकडी ज्या दोराने व खुंट्यांच्या साहाय्याने सोडतात ते साधन.

**चेळे** न. १. चळ; खूळ; पिसे; वेड; भ्रांतिष्टपणा; म्हातारचळ. (क्रि. भरणे, येणे, लागणे, घेणे.) २. दुराग्रह; हट्ट; माथाकूट; जिकीर. (प्रा.)

**चेंगट-टी-ट्या** वि. १. आळशी; सुस्त; मट्ठ; गमणारा; दिरंगाईने काम करणारा (मनुष्य); दीर्घसूत्री; रमतगमत काम करणारा. २. लांबणीवर पडलेले, भिजत पडलेले, रेंगाळत चाललेले (काम). ३. चिकट; लोचट; खणपटीस बसणारा : 'तरीही सोन्या चेंगटासारखा बसून राहिला.'- चक्र १२९.

**चेंगटाई** स्त्री. १. गमण्याची सवय; दिरंगाई; दीर्घसूत्रीपणा. २. त्रासदायक असा लोचटपणा.

**चेंगट्या** पहा : **चेंगट**

**चेंगठा** वि. चेंगट; चिवट; रेंगाळत काम करणारा; लोचट : 'सीताबाई बोले तू गोसावी चेंगठा'- जलोसा ३०९.

**चेंगरट** स्त्री. दाटी; गर्दी; भीड; अडचण; संकोच.

**चेंगर(ड)णे** उक्रि. १. चेंबटणे; चिरडेल अशा तऱ्हेने दाबणे; चेपणे. २. दाबले, चेपले जाणे; चेंदा होणे.

**चेंगरा(डा)चेंगर(ड)** स्त्री. १. चेंदाचेंदी; चेपाचेपी. २. चेंदाचेंदी, दाबादाबी होऊन झालेली, कुसकरलेली ठेचलेली स्थिती. [चेंगरणे द्वि.]

**चेंगोली** पैसे घेऊन केलेले काम.

**चेंच** स्त्री. ठेच. (गो.)
**चेंचकट, चेंचट, चेंचका** वि. खरडले गेलेले, अर्धवट झिजलेले (रुपया, मोहोर इ. नाणे).
**चेंचट** क्रि. १. खरडला गेलेला (रुपया व नाणे). २. ओबडधोबड रस्ता.
**चेंचणे, चेंचरणे** स.क्रि. १. ठेचणे; खूप दाबणे. २. एखाद्याला चोप, मार देणे. [ध्व.]
**चेंचवट** वि. कोडगा : 'वारंवार रागावून बोलले, शिक्षा केली तर मुले जास्त चेंचवट बनतात.'– कमीअमी ८६.
**चेंचा** पु. कोथिंबीर, मिरच्या इ. पदार्थ ठेचून करायचे तोंडी लावणे; ठेचा.
**चेंचूड** स्त्री. लाल मुंगी; चाचड. (गो.)
**चेंचे** न. खाद्यासाठी पक्ष्यांची चिवचिव. (वा.) ० **करणे** – १. एखाद्याची प्रार्थना करणे किंवा करुणा भाकणे. २. चोप, मार बसल्यामुळे किंचाळणे. ३. नाईलाज झाल्यामुळे तडफडत बसणे.
**चेंडकी** स्त्री. एक वाद्य.
**चेंडा** पु. (झाडाचा) शेंडा : 'मग पाय ठेऊनि खांदियेवरी। चेंडा झेंपावला हरी।'– निगा ४४.
**चेंडू** पु. १. खेळण्याकरिता केलेला रबराचा, चामड्याचा, प्लास्टिकचा वाटोळा गोळा. २. (ल.) ठेंगणा परंतु वाटोळा गरगरीत मनुष्य. ३. रांगोळीचा एक प्रकार. [सं. कंदुक] (वा.) ० **बनून राहणे** – कुणीही लाथाडावे, ठोकर मारावी अशा अवस्थेत राहणे : '(नवबौद्ध) गावाच्या पायाशी 'चेंडू' बनून राहात नाहीत.'– अगाअवि ६३.
**चेंडूफळी** स्त्री. १. फळीने आणि चेंडूने खेळायचा एक खेळ : 'कृष्ण खेळे चेंडूफळी ग।'– मसाप २.३०. २. क्रिकेट.
**चेंडू(डो)ल, चेंदोल** पु. डोक्यावर तुरा असलेला पक्षी; चंडोल.
**चेंढळमेंढळ** स्त्री. मुले; पोरेबाळे; कारटी.
**चेंडायनी** स्त्री. चाळा; नाद; छंद. (व.)
**चेंद** स्त्री. १. दाटी; गर्दी; खेचाखेच; गोंधळ. २. (पाणी सांडल्यामुळे, पाऊस पडल्यामुळे होणारी) चिडचिड; रेंदाड; चिखल; निसरडे. ३. गिळगिळीत, बिलबिलीत, चिघळणाऱ्या, पाघळणाऱ्या (खरबुजे, आंबे, गूळ इ.) पदार्थांची रास.
**चेंदणे** सक्रि. १. चुरडणे; दाबणे; चेचणे; ठेचणे; चेंगरला जाईपर्यंत दाबणे. २. (एखादा पदार्थ) ठासून भरणे; कोंबणे.
**चेंदरड** पहा : **चेंद** २, ३
**चेंदरणे, चेंदाटणे** सक्रि. चुरडणे; कुसकरणे; दाबणे; ठेचणे.
**चेंदा** पु १. पहा : **चेंद** २. (बऱ्याच लोकांची आजारामुळे झालेली) अशक्तावस्था; ग्लानी; उठवण; दुर्बलावस्था. (क्रि. वळणे.) ३. (क्व.) भक्ष्य पदार्थाचा, अन्नाचा घास.
**चेंदाड** स्त्री. रेबड; राड.
**चेंदाडा** पहा : **चेंडू** १,२.
**चेंदा(दु)मेंदा–दु** (क्रि. करणे.) पहा : **चेंगरा(डा)चेंगरी–डी** २.
**चेंदेपोइ** वि. केवळ भिक्षांचा चेंदा खाउन राहणारे : 'जोगु नासला: जोगाचे पार कव्हणी नेणे : जोगु महनु : हे अवघे चेंदेपोइ :'– लीचउ २७०.
**चेंधा** पु. रगाडा : 'सर्व कामकाजांचा चेंधा उपसून...'– जोफुसग्रं २४१.

**चेंब(म)टचिंब** वि. १. ओलसर; दमट; आंबटओले (कापड, कपडा इ.). २. चिवट (लाकूड इ.) ३. सुरकुतलेले, चिमटलेले आणि आक्रसलेले.
**चेंबटणे, चेमटणे** सक्रि. (शरीराचा अवयव इ.) दाबणे; चेपणे; चिरडणे; पिळणे; चेंगरणे.
**चेंबणे** पहा : **चेंबटणे**
**चेंबर** न. न्यायाधिशाची न्यायमंदिरातील व्यक्तिगत खोली : 'कोर्ट आले होते, पण अजून चेंबरमध्येच होते.'– मिरास २१२. [इं.]
**चेंबरी, चेमरी** स्त्री. कोंडके आणि एले यांच्या जोडीला किंवा नुसत्या एल्यालाही लावायचा शब्द. (प्रा.) पहा : **कोंडके, एले.** दार, खिडकी इत्यादी बंद करावयाची योजना.
**चेंबले** न. तळाला गोल व वर उभट आकाराचे पाणी प्यायचे भांडे : चेंबल्यातनं आच्छेर दूध आणून...भाईर ठेवलंतं'– रैत ३.
**चॅट करणे** बनवणे; फजीत करणे : 'एखादा समानधर्मा मिळाला आणि त्याने सवालाला जबाब देऊन चॅट केले म्हणजे रहाळकर मनापासून हसत असत.'– दिअहो ८३.
**चॅट पडणे** तोशीस पोहोचणे; झळ लागणे; चाट करणे : 'ते खरं ! पण तुमच्या खिशाला काय चॅट पडत नव्हती ना?'– आपा ११३.
**चॅटमॅट** न. (होडी चालवताना) बांबू मारण्याचा एक प्रकार. (गो.)
**चॅम्पीयन** पु. (क्रीडा) निपुण; (क्रीडा) पटू; पहिल्या प्रतीचा खेळाडू : '...कॅरमचा तर तो चॅम्पीयन...'– अचावा ७९.
**चैत** पु. चैत्र महिना. [सं. चैत्र]
**चैतन्य** न. १. जीव; प्राण; शरीरातील चालक, प्रवर्तक शक्ती; आत्मा : 'जैसें गतायुषी शरीरीं। चैतन्य वासु न करी।'– ज्ञा ३.१०९. २. ज्ञानकला; ग्रहणशक्ती, आकलनशक्ती, विषयवेदनशक्ती. ३. चित्त; मन : 'इयावरी तो पंडूचा। कुमरू सद्भावो जीवींचा। पुसल तो चैतन्याचा। कानीं ऐका।'– ज्ञा १६.४७०. ४. जीवमात्रांना प्रवर्तक, चालक, चेतना देणारी देवता; शक्ती; तत्त्व; परमात्मा; जीवमात्रांत, भूतमात्रांत व्यापून असणारे तत्त्व; ईश्वर : 'जड पदार्थ चेतवितें तें। म्हणौनि चैतन्य बोलिजेतें।'– दास २०.२.२१. [सं.]
**चैतन्यगाभा–चैतन्य ज्योति–ती चैतन्यमूर्ति–र्ती–चैतन्यमूस, चैतन्यस्वरूप, चैतन्यरूप** पु. स्त्री. न. चैतन्याचा गाभा, ज्योती, मूर्ती इ. असा परमेश्वर; विश्वाला चैतन्य देणारा परमात्मा.
**चैतन्यवाद** पहा : **चिद्वाद**
**चैतन्यविद्या** स्त्री. मायेची विद्या : 'संजयो महाणवीचें प्रथम करण : द्रोणासि शाक्तेयाचें प्रथम करण : शुकाची ते चैतन्यविद्या :'– लीचअ २७.
**चैतन्यशक्ति–क्ती** स्त्री. चिच्छक्ती; सर्व विश्वाला प्रवर्तक अशी शक्ती; जीवनक्रिया : 'शास्त्रज्ञाचें असें मत होतें कीं... चैतन्यशक्तीच्या साहाय्यानेंच सेंद्रिय पदार्थ बनतात, आणि त्यास कृत्रिमरित्या तयार करतां येणार नाहीं.'– सेंर १.२. [सं.]
**चैतन्यहीनता** स्त्री. चैतन्याचा अभाव; निस्तेज; निर्जीव असणे : '...त्यांची ती चैतन्यहीनता माझ्या हळव्या कुतूहलाचा चोळामोळा करून टाकते.'– लोक्षि १६१.

**चैतन्यारोप** पु. (सास.) अचेतन वस्तूवर मानवी भावनांचा आरोप करणे.
**चैतान** वि.क्रिवि. उत्तान; उत्तेजित, चेतवलेला : 'शिवशंकर चैतान झाला हात भिलणीवर टाकला...'– घाश्रलो २८.
न. चित्त; मन; मेंदू. (अहि.)
**चैताळणे** अक्रि. हंबरणे : 'गाई चैताळताती हर्षे। तैसेचि पाडे व्रज गोप।'– निगा ५०.
**चैती** स्त्री. एक उत्तर भारतीय संगीत प्रकार : '...होरी...चैती इत्यादिकांचा स्वतंत्र विचार येथे केलेला नाही.'– संसों १११.
**चैत्य** वि. अंतर्यामा संबंधाचा.
**चैत्य** न. १. पिंपळ. २. वृक्षाभोवती बांधलेला पार. ३. बौद्धांनी कोरलेल्या लेण्यातील मोठे दालन; यात स्तूप असतो. [सं.]
**चैत्य** वि. चिंतनीय (विषय) : 'ते चित्त चैत्यत्यागें। मातेंचि भजे।'– ज्ञा १८.१२६७. [सं.चैत्]
**चैत्य** न. चित्ताचा चंचलपणा. (प्रा.)
**चैत्यद्रुम** पु. पिंपळाचे झाड; गावातील मोठा वृक्ष. [सं.]
**चैत्र** पु. हिंदूंच्या शालिवाहन शकाच्या वर्षाचा पहिला महिना. हा मार्च-एप्रिलच्या सुमारास असतो.
**चैत्रशिंपणे** न. चैत्राच्या महिन्यात भुरभुर पडणारा पाऊस.
**चैत्र** पु. बुद्ध भिक्षु.
**चैत्र(त्रा)गौर–री** स्त्री. १. चैत्र महिन्यात हिंदू स्त्रिया पार्वतीच्या प्रतिमेची पूजा करतात ती प्रतिमा. २. चैत्र महिन्यात एखाद्या शुभ दिवशी पार्वतीची प्रतिमा मांडून स्त्रिया सुवासिनींना हळदकुंकू देण्याचा जो समारंभ करतात तो. चैत्रगौर, चैत्रडोल्हारा बसविणे – दोन्हीकडे दोन खांब व मध्ये झोपाळा व त्याच्यावर देवी, अशा लाकडी, पितळी चौकटीत अन्नपूर्णा देवी बसवून चैत्र शुद्ध तृतीयेपासून वैशाख शुद्ध तृतीयेपर्यंत त्या देवीची, शेजारी सुपारी व लेकुरवाळे हळकुंड ठेवून पूजा करणे.
**चैत्रपालवी–पल्लव** स्त्री. पु. चैत्र महिन्यात (वसंत ऋतूमुळे) झाडांना फुटणारी नवी पालवी.
**चैत्ररथ–थ्य** न. कुबेराचा बाग.
**चैत्रा–त्री** वि. चैत्राच्या महिन्यातील; चैत्र महिन्यासंबंधी.
**चैत्रावळ** स्त्री. चैत्र महिन्यातील उत्सव. हा चैत्र शुद्ध पौर्णिमेस असतो.
**चैत्रांगण** न. चैत्रात पार्वतीच्या पूजनानिमित्त अंगणात काढलेल्या रांगोळ्या.
**चैत्री** स्त्री. १. चैत्रातील पौर्णिमा. २. चैत्रात भरणारी देवीची यात्रा.
**चै (देणे)** स्त्री. (मुलास दिलेली) ठो; टक्कर; ढुशी.
**चैन** स्त्री. १. आराम; सुख; विश्राम; विसावा; स्वस्थता; मजा; आनंद.
२. ऐषआरामाचा, सुखविलासाचा जिन्नस, गोष्ट; खोटया गरजा भागविण्यासाठी, गोष्टींसाठी केलेला खर्च : 'चैन ही व्यक्तीला घातक व समाजाला मारक आहे.'– मज्ञा २०२. (वा.) [हिं.]
**चैन(नी)गडी** पु. मजा मारणारा, चैन करणारा मनुष्य.
**चैनचमन** स्त्री. डामडौल; चंगळ : 'भांडवलदारांची चैनचमन...ही सर्व रोखली पाहिजे कीं तशींच चालूं ठेविलीं पाहिजेत?'– आआआ ६४.
**चैनबाज–जी** वि. सुखाभिलाषी; गुलहौशी; विलासी; ऐषआरामी; रंगेल.
**चैनी** वि. चैन करणारा; मजा मारणारा.
**चैल** न. वस्त्र; कापड; कपडा. पहा : **चेल** [सं.]
वि. वस्त्रासंबंधी.
**चैली** स्त्री. धलपी; ढलपी; सालपट. [हिं. चला]
**चो** पु. आंब्याच्या किसाचे लोणचे. (व.)
**चो** पु. चिंध्या. (व.)
**चोइटी** स्त्री. चुई. पहा : **चुइटी** : 'नाना साली भक्षिल्या। अथवा चोइट्या चोखिल्या।'– दास ६.२.४.
**चोक** पु. चौक. [गु.]
**चोक** पु. (विअ.) विद्युतप्रवाह नियंत्रित करण्याचे साधन. याने विजेतील शक्ती खर्च न होता प्रवाह नियंत्रित करता येतो. [इं.]
**चोकटाई** स्त्री. स्वच्छता.
**चोक कुंडल** (विअ.) ए.सी. विद्युतप्रवाहाला अडथळा आणण्यासाठी वापरले जाणारे प्रवेशक कुंडल.
**चोकडिया** क्रिवि. चोहीकडे : 'तऱ्हतऱ्हेचे बैठक अयने लावियले चोकडिया।'– देप ५८.
**चोकडी** स्त्री. मोरी. [गु.]
**चोकशी** पहा : **चौकशी**
**चोक्शी** पु. सोने व चांदी पारखणारी एक जात; पारखी. [गु.]
**चोकस** वि. चोख; पारखून घेतलेली : 'माघारे देशास येतसमयीं बातमी बरी चोकस राखोन बहुत खबऱ्यानें सावधपणें यावयाचा विचार केला पाहिजे.'– ऐको ३८६.
**चोका** पु. सापाची एक जात. (झाडी)
**चोकोट** पहा : **चकोट** : 'तेका मी चोकोट सांबाळीन...'– तोरण ३६.
**चोख–खी** न. स्त्री. शुद्धपणा; निर्मळपणा; पांढरेपणा; शुभ्रपणा; स्वच्छता : 'मग नचलतें कलंकेवीण। शशिबिंब जैसें परिपूर्ण। तैसें चोखी शृंगारपण। मनाचें जें।'– ज्ञा १७.२३०. [सं. चोक्ष]
**चोख–खा** वि. १. शुद्ध; निर्मळ; निष्कलंक; चांगले; अस्सल; स्वच्छ; निर्भेळ : 'तें निजज्ञानही चोख। जाणता मीचि।'– ज्ञा ५.४३६. २. उत्तम; उत्कृष्ट; धीर; श्रेष्ठ. ३. प्रामाणिक. [सं. चोक्ष]
**चोख(खा)कीड** वि. शुद्ध आणि अशुद्ध : 'परिसाचा वारकळी। नाही चोखाकीडाची बोली'– ज्ञा १७.४०४. [सं.]
**चोखट** वि. चांगला; उत्तम; शुद्ध; सुंदर; चखोट : 'ऐसा महिमा घनवट। गंगा तैसी चोखट।'– ज्ञा २.२१३.
**चोखटचार** पु. न. उत्तम पक्वान्ने; जेवणातील उत्तम प्रकार : 'हे पाहा, आपल्याला ते चोखटचार काही समजत नाहीत.'– आआशे ५८.
**चोखटा–टी–टे–डा–डी–डे** वि. चांगला; शुद्ध; दृढ; निष्काम; निर्मळ; चखोट : 'तैसें श्रद्धेचें दळवाडें। आगें कीर चोखडें। परी प्राणियांच्या पडे। विभागी जै।'– ज्ञा १७.५५.
**चोखटाई** स्त्री. चांगुलपणा; शुद्धता; चोखटपणा; कुशलता; उत्कृष्टता; सच्चेपणा; प्रामाणिकपणा; निर्लेपता.
**चोखटीव** स्त्री. चांगुलपणा; शुद्धपणा; निर्मळता : 'चोखाटिवा आपुलिया। पुढिला उगाणा घेयावया। तया दर्पणाचीचि परी धनंजया। केली आम्हां।'– ज्ञा १५.५७०.

**चोखटे** वि. चांगले. (प्रां.)
**चोखटेल** न. करडई, तीळ, खुरासनी, जवस इ. तेल; गोडे तेल.
**चोखड** वि. अप्रतिम. पहा : **चोखट**
**चोखडे** वि. खरे; यथार्थ; शुद्ध; सुंदर; नीटनीटके. पहा : **चोखट**
**चोखणी** स्त्री. उटी; उटणे; शरीर, केश स्वच्छ करण्याकरिता लावायचे शिकेकाई इ. मसाल्याचे सुगंधी मिश्रण : 'मग ते सुगंध चोखणी। श्रीमंत कुंतला लाउनी।'– वेसीस्व ८.१५.
**चोखणी** स्त्री. १. लहान मुलास चोखण्यासाठी द्यावयाचे रिंगणे; चोखणे. २. चोखण्याची क्रिया. [सं. बुद्ध]
**चोखणे** सक्रि. चुंपणे; शोषणे, ओठांनी दाबून (आंब्यातील रस, स्तनातील दूध इ.) तोंडात ओढून घेणे. [सं. चुष्](वा.) **चोखत राहणे**– वाट पाहत बसणे.
**चोखणे** अक्रि. चोपडणे; उटणे; चोळून स्वच्छ करणे : 'बाइसें श्रीमुगुटु चोखीति : श्रीमुर्ति प्रक्षाळीति :'– लीचपू ४८०.
**चोखन(ने)ळ, चोखंदळ** वि. १. बारकाईने खोड काढणारा; चिकित्सेखोर. २. मळमळ सुटलेला.
**चोखलण–न** न. अंग घासणे, चोळणे, स्वच्छ करणे इ. : 'यशोदा माता घालीते पाणी। चोखलण वेळावेळां करीती।'– स्त्रीगीत २०.
**चोखलणी** स्त्री. चोखलण्याची क्रिया.
**चोखल(ळ)णे** पहा : **चोखाळणे**
**चोखळ** वि. शुद्ध; निष्कलंक; उत्कृष्ट : 'तैशी भाषा माझी चोखळ।'– क्रिपु १.१.१२२.
**चोखळा** पु. तुकडा : 'कां केळीचा गाभा मोडला। चोखळा असुडला आकाशाचा।'– अमृता ७.६९.
**चोखंड** वि. पाव; चौथा हिस्सा;. एकचतुर्थांश भाग; चतकोर. (खा.व.)
**चोखंदळ, चोखन(ने)ळ** वि. नाजूक; टापटिपीचा; खाण्याच्या बाबतीत मिजासखोर; चिकित्सेखोर; जिभेचा चटोर : 'चोखंदळ संपादकाचें संपादन-कौशल्य।'– निअसा १३०. पहा : **चोखन(ने)ळ**
**चोखा** पु. १. तांदूळ. २. देवाचारासंबंधी उघड्या हवेत, अंगणात वगैरे शिजवलेला भात. (कु.)
**चोखा** पु. चाखून पाहणारा; श्रीमंतांच्या घरी प्रथम पदार्थ चाखून पाहणारा.
**चोखा** स्त्री. चांगला; उत्तम.
**चोखारी** वि. चोखनळ; (जेवण्याच्या बाबतीत) चिकित्सेखोर. [सं. चोक्ष]
**चोखाळ–ळी** वि. १. स्वच्छ; शुद्ध; निर्मळ; सोज्वळ : 'सत्वेचि येणें चोखाळें। करी यज्ञादिकें सकळें।'– ज्ञा १७.३१८. २. निष्कलंक; पवित्र; निर्दोष : 'कीं चोखाळ वाटे जी क्षिती। तिजवर चालती सकळ याती।'– भवि २३.४४. ३. पहा : **चोख**
**चोखाळ–ळा** वि. चोखनळ; चिकित्सा करून जेवणारा; खाण्याच्या बाबतीत सूक्ष्म आवडीनिवडी असणारा : 'पण बकरें इतकें चोखाळ आहे तरी मेंढरू शिवणार नाहीं असें काहीं खाणें बकरें खातें.'– मतिपु १३ (१८७३).
**चोखाळणे** सक्रि. (एखादा मार्ग) अवलंबणे : 'असे मार्ग त्यांना एकदम चोखाळता येत नाहीत.'– पवा १५४.
**चोखाळणे** सक्रि. १. गवत आणि तण काढून (जागा, जमीन) साफ करणे. २. (झाडांच्या बारीक बारीक फाजील फांद्या व पाने) छाटणे; खडसणे. ३. (दात) कोरणे; कोरून साफ करणे. ४. पायातून काटा काढून पाय मोकळा करणे. ५. (रस्ता, कपडा) धुऊन, पुसून, घासून साफ करणे. ६. खराब दाणे वेचणे; निवडणे.
**चोखाळणे** उक्रि. स्वच्छ करणे; शुद्ध करणे; शुद्ध होणे : 'तैसे यमनियमीं कडसले। जे तपोज्ञानीं चोखाळले।'– ज्ञा ४.६५.
**चोखाळणे** सक्रि. तेलाने (लहान मुलांची टाळू) भरणे; माखणे.
**चोखाळणे** सक्रि. धुंडाळणे; बारकाईने शोधणे; झाडा घेणे; नग्न, नागवा करणे; नागविणे.
**चोखाळत–ता** वि. निर्मळ; शुद्ध. पहा : **चोखाळ** : 'जेणें चोखाळत दिसे न्याय। तो व्यवसायांत व्यवसाय।'– ज्ञा १०.२८६.
**चोखाळपण–णा** पु.न. १. नीटनेटकेपणा; स्वच्छपणा; शुद्धपणा : 'वरि पंच घारगारी। आळंगी चोखाळपणें।'– ऋव १. २. निर्मळपणा; निर्दोषता : 'चोखाळपणें झळकती। पल्लवसडका।'– ज्ञा १.९; 'तैसे हरिकथाश्रवणेंवीण। जीवां कांई चोखाळेंपण।'– वच्छह १२.
**चोखाळा** पु. (चोखाळणे पासून नाम) १. पूर्णपणे साफसूफ स्वच्छ करणे. २. शोधणे; धुंडाळणे, बारीक रीतीने तपासणे; पाहणे; निरीक्षण करणे इ. (क्रि. घेणे.)
**चोखी** स्त्री. चांगुलपणा : 'विवंचूं जातां चोख। चोखीं बोलीं।'– ज्ञा १८.७६८.
**चोखी** स्त्री. निर्मळपणा; शुभ्रपणा; स्वच्छपणा : 'कालिमा सांडील कोळसा। वरी चोखी होईल वायसा ।'– ज्ञा १६.२८५.
**चोखु(खो)ट** वि. सुरेख; चांगले; चखोट; चोखट. पहा : **चोखी** : 'वडे केले चोखुट।'– मसाप २३.
**चोखोट** वि. पूर्ण : 'चोखोट बरी होईल.'– पेसाआप १६०.
**चोखौळ** न. चांगले फूल : 'स्वकर्माच्या चोखौळीं। मज पूजा करुनि भली।'– ज्ञा १८.१२४७.
**चोख्या** वि. फुकट्या.
**चोगला** पु. (प्र.) चौगुला, चौघला. पहा : **चौघुला**
**चोगा** पु. एक पायघोळ अंगरखा : 'आम्हीं धट्याकट्या पुरुषांनी काश्मिरी चोगे घालावे...'– आलेसं २८५. [क. चोगे]
**चोच** स्त्री. १. पक्ष्याच्या तोंडाचा अग्रभाग; चंचू; पक्ष्याचे तोंड. २. (ल.) पागोट्याची, पगडीची कोकी; कोचकी; राघू. ३. चाकू, कातर इ. शस्त्रांची टोकदार अणी, शेंडा. [सं. चंचु]
**चोच** स्त्री. कपाळावरील कडांना त्रिकोणाकृती देऊन केलेली, चोचीच्या आकाराची हजामत. (क्रि. करणे, ठेवणे.) [सं. चंचु]
**चोचण** न. १. नारळ, सुपारी इत्यादिकांच्या भोवतालच्या तंतुमय वेष्टणाचा पुंजका; नारळाची शेंडी. २. (फार ठोकलेल्या खिळ्याच्या, खुंटीच्या माथ्याची अथवा फार वापरलेल्या लेखणीच्या टोकाची) नारळाच्या शेंडीसारखी अवस्था; खडबडीतपणा; चोचण्यामुळे बनलेला गुच्छ.
**चोचणे** पहा : **चोचावणे**
**चोचर, चोचरट** न. आंबा इ. फळांतील रेषा, तंतू.
**चोचरा** वि. अडखळत बोलणारा; तोतरा; चाचरणारा. (राजा.)

**चोच(चे)ला** पु. १. (लावण्यातून रूढ) स्तन; जोबन. २. प्राणनाथ; प्रियकर; जिवलग (स्त्रीने पतीस किंवा प्रियकरास उद्देशून वापरावयाचा शब्द). ३. हावभाव; डौल; नखरा; छिचोरपणा. ४. इष्कबाजी; विलास; लीला; कामचेष्टा; थट्टा. [सं. चंचु]

**चोच(चे)ला** पु. कोड; कौतुक; लाड. 'यांपैकी कुणाचेच चोचले मला पुरवता आले नाहीत.'– एल्गार ६.

**चोचा** पु. १. तुंबडी, रोंबी लावण्यापूर्वी वस्तरा इत्यादिकांनी मारलेली फासणी. २. औषधाकरिता दिलेली डागणी : 'आणि मुलाच्या पोटावर शंभर चोचे मारतात.'– स्मृतिचित्रे १२७. ३. डाग दिल्याने कातडीवर पडलेली खूण; डाग; गूल. सामान्यतः अनेकवचनी प्रयोग. उदा. चोचे देणे, मारणे. ४. हत्याराने वृक्ष इ. वर केलेले क्षत.

**चोचावणे** अक्रि. (धनुष्यापासून सुटलेल्या बाणाचे गोफणीने फेकलेल्या दगडाचे) सूंसूं करणे; गोंगणे; सणसणणे.

**चोचाव(वि)णे** सक्रि. १. चोच मारणे; अणकुचीदार हत्याराने टोचे मारणे; कुरतडणे. २. (आवळे, आंबे इ. शस्त्राने) टोचे मारणे; टोचून टोचून बारीक बारीक छिद्रे पाडणे; चोचणे; (मुळा, काकडी इ. विळीवर उभी फिरवून फिरवून कोशिंबिरीकरता) बारीक बारीक चिंधोट्या, कुचा, खुरच्या करणे. ३. खांडणे; खापलणे; तुकडे करणे.

**चोचो** पु. भोपळ्याच्या वर्गातील एक वेल. याच्या फळांचा मोरंबा करतात.

**चोचोवणीधोधोवणी** न. बेचव जेवण : 'आईने कसाहि स्वयंपाक केला तरी चोचोवणीधोधोवणी केलंस असे म्हणून ते आईच्या अंगावर ओरडत असत.'– आआशे १९५.

**चोज** न. १. नवल; आश्चर्यकारक गोष्ट; चमत्कार : 'अहो पाहता कीर प्रतिभासे। एथ नवलावो काय असे। परि न पाहतां ही दिसे। चोज आइका।'– ज्ञा ११.२२९. २. कौतुक; लाड : 'नातरी बालक बोबडा बोलीं। कां वाकुडा विचुका पाउलीं। ते चोज करूनि माउली। रिझे जेवीं।'– ज्ञा ९.६. ३. प्रेम; प्रीती : 'पाहा पां नवल कैसें चोज। कें उपदेशु केउतें झुंज।'– ज्ञा ६.१२३. ४. करामत : 'भीमा दाखवी आपले चोज।'– मुविरा ५.९१. ५. नखरा; चेष्टा; चाळा; गंमत; मजा (अनेकवचनी प्रयोग). (क्रि. करणे.) [सं. चुद्–चोद्य]

**चोजणे** अक्रि. समजून, कळून येणे; कल्पनेस नवलाईप्रमाणे दिसून येणे, वाटणे; मनास कौतुकास्पद भासणे : 'कां काळा राहे काळावखा। तो आपणा ना आणिकां। न चोजवे तरि असिकां। हा मी बाणे।'– अमृता ४.३६.

**चोजबावळा** वि. चमत्कारिक; विलक्षण; तऱ्हेवाईक; खुळचट; अर्धवट वेडसर (बोलणे, भाषण).

**चोजले** पु. अव. कोडकौतुक; सोपस्कार : 'शरीराचे किती चोजले पुरवावयाचे?'– पुत्र ७९.

**चोजव(वि)णे** अक्रि. १. कौतुकास्पद असणे, वाटणे, होणे. २. समजणे; जाणवणे; कळून येणे. ३. आवडणे; कौतुक वाटणे : 'ब्रह्मांड नायक चोजवेना। हें बरें नव्हे।'– दास ६.१.१३. ४. संतोषणे; प्रसन्न होणे : 'सद्‌गुरूचे कृपें चोजवतां देव।'– दावि २२३.
सक्रि. १. आश्चर्यचकित करणे; नवल वाटावयास लावणे; विस्मित करणे. २. कौतुक करणे : 'चोजवित घरा येती। ज्यांचा देखती शुद्ध भाव।'– निगा १६४. ३. शोधणे; तपास करणे : 'कांद्याचा खाणार चोजवी कस्तूरी। आपण भिकारी अर्थ नेणें।'– तुगा ८९२.

**चोजंबिनी** स्त्री. आनंद, कौतुक, आश्चर्य वाटणारी गोष्ट : 'तरी त्यास चोजंबिनी फार झाली।'– कृको ४७.

**चोजावणे** अक्रि. चोजणे; कौतुक वाटणे; विस्मित होणे : 'राय चोजावला वचनीं।'– मुआदि १८.३३.

**चोट** स्त्री. १. तडाखा; घाव; दुखापत; शस्त्राने, मुष्टीने केलेला प्रहार; बुक्की; गुद्दा. २. (ल.) हल्ला; धाड. (व.) ३. (ल.) (व्यापारातील, धंद्यातील) धस; तोटा; नुकसान; दुर्दैवाचा घाला. (क्रि. लागणे.) : 'जब कमाई न होय। चोट साहे धनकी रे।'– तुगा ४२९. ४. दैवयोगाने झालेला अकल्पित लाभ; अनपेक्षित रीतीने झालेला फायदा; लाभ. (क्रि. साधणे, लागणे, लावणे.) ५. गारुडी व गावगुंड यांच्या खेळात परस्परांवर डाव लागू झाल्यामुळे होणारी वेदना. ६. (सामा.) जखम; व्यथा : 'इष्काची काळजामध्ये लागली चोट जी जी।'– प्रला १९३. [हिं.] (वा.) ० चालविणे – हल्ला करणे, घाव घालणे, जखम करणे. : 'पर्वतीस पंतप्रधानांनी वाघावर हत्ती घालून सेर केले. येके हातीने वाघावर चोट चालऊन जाया केले.'– ऐको ३८६.

**चोट** स्त्री. १. शर्यत. (क्रि. खेळणे.) २. शर्यतीत लावलेला पण. उदा. पैसा चोट खेळू. (व.)

**चोट, चोटला** पु. (अश्लील) पुरुषाचे जननेंद्रिय; शिस्न. [सं.चुद्]

**चोटकुली–ले** स्त्री. न. लहान मुलाचे शिस्न.

**चोटणे** अक्रि. चिकटणे. [गु.]

**चोटफेट** स्त्री. झटापट; मारामारी : 'अबदालीचे आगाडीचे लोकासी व राजश्री दत्ताजी सिंदे यांच्या आगाडीचे लोकासी नजर नजर चोटफेटहि जाली.'– पेद २.१०९.

**चोटली** स्त्री. (लहान मुलाचे) शिस्न; लिंग; बुल्ली.

**चोट(टा)ळणे** सक्रि. १. फसवणे; ठकविणे, (व्यवहारात) नाडणे; लुबाडणे. २. कस्पटाप्रमाणे मानणे; अगदी तुच्छ लेखणे.

**चोटाळ** वि. बाहेरख्याली; रंडीबाज. (व.)

**चोटिया, चोट्या** घोड्याच्या आयाळीच्या शोभेसाठी घातलेल्या वेण्या.

**चोटी** स्त्री. शेंडी. (व.) [हिं.]

**चोटी, चोटीचुरमा** पहा : **चुटियाचुरमा** : 'चोटीचुरमा मालपुवे अति।'– अमृत ६२.

**चोटीभोवरी** स्त्री. घोड्याच्या (कपाळावरील) शेंडीखालचा भोवरा; घेरा.

**चोट्टा** वि. (निंदार्थी) चोरी करणारा; चोरटा. (ना.)

**चोट्टी** स्त्री. चौपदरी; झोळी. (गो.)

**चोट्टेपोट्टे** पु. अव. चोरपोर; वाटेल ते लोक : 'माझ्या मालावर चोट्टेपोट्टे मजा करतात...'– बाविबु २३.

**चोड** न. १. नारळावरील सुकलेले, तंतुमय वेष्टण, साल : 'फळाच्या (जायफळाच्या) वरची साल नारळाच्या चोडासारखी जाड असते.'– मतिपु २४ (१८७३). कवच; आवरण; काथ्या; चवड. २. नारळावरील काथ्याची पीठ इ. गोळा करण्यासाठी केलेली कुंचली, कुंचा. ३. पिळून

काढलेल्या उसाचे चिपाड. (को.) [सं. चूडा]

**चोडचौनवा** वि. चौरस्त्यावर चारी बाजूने मोकळा.

**चोडशी** स्त्री. मातीचा साचा; मूस.

**चोढाल-ळा चोढाळ्या, चोढळ(व)णे** पहा : **चौडा(ढा)ळ**

**चोढोळी** स्त्री. विटाळ.

**चोणकेपणा** वि. लुडबूड; चोंबडेपणा. (व.)

**चोणक्या** वि. लुडबूड, उठाठेव करणारा; चोंबडा. (ना.)

**चोत(थ)री, चोथड** पु. चोथा; (पदार्थ, ऊस इ.) चोखल्यानंतर, चावल्यानंतर, चघळल्यानंतर अवशिष्ट राहिलेला टाकाऊ अंश, भाग. 'नीतिरूपी इक्षुदंडाचा आस्वाद न घेता... त्याची नुसती चोतरी हातीं देण्यात तुम्हाला काय पुरुषार्थ वाटतो कोणास ठाऊक?' – नीशाप्र २४२.

**चोथडी** स्त्री. १. चिथडी; सुडके; ठिगळ; घासणी. २. नासक्या दुधाची गुठळी; दह्याची कवडी. ३. पदार्थ चावून रसहीन झालेला, थुंकून टाकायचा चोथट भाग; चोथा.

**चोथल(ळ)णे** सक्रि. १. चोथ्याने, घासणीने, चिंधीने पुसणे, घासणे. २. (शरीर, भांडे वगैरेंना तेल, माती, राख इ.) फासणे; लावणे; चोपडणे; चोळणे; माखणे.
अक्रि. (दही, दूध इ.) चोथापाणी होणे.

**चोथवा, चो(चौ)था** पु. एक माप; चोध्याचा चतुर्थांश किंवा एक पायली : 'भसक चोथवा करून त्यावर शिक्का सरकारी.' –पला ७०. [क.; सं. चतुर्थ]

**चोथवा** पु. पोकळ नळा; तोटा : 'दारू वीस मण सांपडली व बाणाचे चोथवे कांहीं सांपडले.' – पेद २५.१५९.

**चोथा** पु. १. सत्त्व काढून घेतल्यानंतर राहिलेला पदार्थाचा त्याज्य भाग; चोथड. २. (भांडी घासण्याकरिता, भोकाला दट्ट्या देण्याकरता उपयोगी) गवताची गुंडाळी, चिंधीचा बोळा, घासणी इ. ३. नासक्या दह्याचा, दुधाचा गोळा, घट्ट भाग; चिथडी. [सं. चुस्त]

**चोथा** पु. १. भाताचे रोप. २. एका चिमटीत राहील इतकी भाताच्या रोपांची गड्डी.

**चोथों** वि. १. बाईलबुद्धीचा. २. चोंबडा. (गो.)

**चोदणे** सक्रि. (ग्राम्य.) समागम; मैथुन करणे; संभोगणे; उपभोगणे. [सं. चुद्]

**चोदना** स्त्री. प्रेरणा; अंत:स्फूर्ती. [सं.]

**चोदबावळा** वि. लबाडीने, लुच्चेगिरीने, बावळी मुद्रा धारण करणारा; वेडाचे सोंग पांघरणारा; ढोंगी.

**चोदलणे** सक्रि. १. पायांनी तुडविणे. २. पाण्यात चालून ते गढूळ करणे.

**चोदीचा, चोदिच्चा** वि. (अपशब्द) एक शिवी. बटकीचा; रांडेचा; हलकट.

**चोदू, चोदूनंदन, चोद्या** पु. एक शिवी; रंडीबाज; इष्कबाज; जारकर्मी.

**चोन** पु. १. तडाखा. पहा : **चोट**. २. (ल.) विलास; चैन; रंग : 'आग लागो तुझ्या चोन्याला।' – ऐपो ५२.

**चोनका** वि. बेकार; बेकाम; मधे मधे करणारा.

**चोप** पु. १. ठोक; मार. (क्रि. घेणे, देणे, बसणे.) २. चोपणीने जमीन इ. ठोकण्याची, टणक करण्याची क्रिया; चोपणी. ३. विणकराच्या फणीचा शेवटचा भाग, बाजू. या ठिकाणी दात बारीक व जवळजवळ असतात. ४. दंड, काठी. पहा : **चोब**

**चोप** पु. स्त्री. १. (ल.) जरब; दाब; नियमन; नियंत्रण; निग्रह; शासन. (क्रि. करणे, देणे, बसणे.) २. अभ्यासामुळे, प्रावीण्यामुळे मनाला लागलेली सवय; परिपाठ; राबता. (क्रि. लागणे.) : 'चोप लाऊन मनाप्रति वेगें। सर्व नीट पढली अनुरागें।' – शशिसेना ७२. ३. काळजी, चिंता, खबरदारी. (व.) [फा. चोब्]

**चोप** स्त्री. १. (ताड, माड, सुरमाड इत्यादिकांच्या सोटाची) उभी चिरफळी; सोपट; लांब फाळी; याचा कापून केलेला पाण्याचा पन्हळ. २. चौघडा वाजवायची बारीक व लहान काठी; ढोलके, नगारा वाजवण्याचे टिपरे, टिपरी. (व.)

**चोप** स्त्री. (घाम इत्यादीचा) ओलावा.

**चोप** स्त्री. कांद्याचे रोप. (झाडी)

**चोपई** स्त्री. सापसुरळी; सरड्याची एक जात.

**चोपकारणे** सक्रि. दम देणे; खडसावणे : 'एकदा द्वारकीला चोपकारलं–' वानगी १०४.

**चोपकारने** क्रि. कुरवाळणे.

**चोपचिनी** स्त्री. एक औषधी वनस्पती. पहा : **चोवचिनी**

**चोपट** न. १. सोपट; चोप : 'सरस उंस घालिजे घाणां। रस पिळूनि भरे मांदणा। रिता चोपटीं करकरी घाणा। ते गती जाणा याज्ञिकां।' – एभा १०.४६८. २. ताड, माड, सुरमाड इ.च्या खोडाची उभी चिरफळी. (को.)

**चोपट** वि. चौकोनी; चतुरस्र; घन (लाकूड).

**चोपट** वि. तेलकट; गुळगुळीत; (सामा.) चोपड; ओशट; बुळबुळीत.

**चोपटणे** सक्रि. १. (जमीन, गच्ची इ. चोपणीने) ठोकून सपाट व गुळगुळीत करणे; ठोकून खाली बसविणे, टणक करणे. २. मारणे; ठोकणे; पिटणे; बडवणे. (वा.) **चोपट करणे** – नष्ट करणे; पार सपाट, साफ करणे.

**चोपटणे** अक्रि. १. (शरीर) झडणे; बारीक होणे. २. (जमीन, गच्ची इ.) दबणे; खचणे; खाली बसणे.

**चोपटणे** अक्रि. बुळबुळीत, तुळतुळीत, ओशट होणे. (प्रां.)

**चोपड** वि. तेल चोपडलेले; बुळबुळीत; तुळतुळीत; ओशट.

**चोपड** वि. चौदा : 'उधानु काटीवरी चोपडूची आस। नवरा राजस मिरवतसे।' – तुगा ४४५९. (नंद.)

**चोपड** पु. १. चौपट; एक खेळ. हा लांब फाशांनी खेळतात : 'गंजीफा, सतरंज चोपड नवें तें नदही सांग जे।' – सारुह ३.४६. २. सोंगट्या.

**चोपड** घोड्याच्या अंगास लावावयाचा औषधी लेप : 'येणेप्रमाणे कुटून वस्त्रगाळ करून धयांत कालवून चोपड घोड्याच्या अंगास लावावें' – ऐलेसं ८४१४.

**चोपड, चोपडण** न. (तेल, तूप, चरबी इ.) स्निग्ध (पदार्थ); ओशाट.

**चोपड-डा, चोपडण** पु.न. १. अंग, केस याला लावायचे तेल इ. : 'नीटचि युक्ति पहातां हें कीं मी कृष्णवारू चोपड तें।' – मोअनु ७.४४. २. केसांना तेल इ. चोपडण्याची क्रिया. ३. शरीराच्या दुखावलेल्या अवयवाला, थकलेल्या जनावराला तेलात औषधे कालवून करायचे मालिश; चिखल किंवा चिंचेची पाने बकरीच्या रक्तात भिजवून द्यायचा लेप. ४. वरील लेप लावण्याची, मालिश करण्याची क्रिया. ५. वरील

प्रकारे मालिश केलेली, लेप लावलेली स्थिती.

**चोपडण** न. १. पहा : **चोपड-डा**. २. गलबतास तेल किंवा रंग लावण्याची क्रिया. (क्रि. करणे.) (हेट.) ३. गलबताच्या पाण्यात बुडणाऱ्या भागास लावण्याचा तेलचुन्याचा रंग.

**चोपडणे** उक्रि. (तेल, तूप इत्यादिकांनी) माखणे; लेपणे; चोपडून नरम, गुळगुळीत करणे; चोपडण करणे. [सं. चतुर्+पत्र]

**चोपडवना** पु. खुशामत. (झाडी)

**चोपडा** पु. १. पहा : **चोपड**. २. वनस्पतींना होणारा एक रोग. यासच मेकाड असे म्हणतात.

**चोपडा** पु. उडदाच्या डाळीचा वडा.

**चोपडा** वि. १. गुळगुळीत; बुळबुळीत; चिकण; मऊ आणि सपाट. २. तेलकट; तुपकट; चिकट. ३. चटचटीत गुळगुळीत; तकतकीत; पॉलिश केलेला; उजळ; चकचकीत; लखलखीत.

**चोपडा** पु. १. हौदा. २. हौद : 'तेथे पाण्याचा चोपडा म्हणजे हौद होता.' – भाप्र ५३. [फा.]

**चोपडा देवदार** (ल.) वरपांगी भलेपणा दाखविणारा; साळसूद (मनुष्य). (व.)

**चोपडा दोडका** १. घोसाळे. (ना.) २. गिलके. (खा.)

**चोपडा लाख** वडीची लाख. (प्र.) चपडा लाख.

**चोपडी-डे** स्त्री. न. १. एका आकाराचे अनेक कागद एकत्र करून लिहावयासाठी केलेली वही. शिवलेले, बांधलेले पुस्तक, वही; लहानसे पुस्तक. २. हिशेबाचे पुस्तक; जमाखर्चाची वही. ३. (ल.) लहानसे किंवा भिकार पुस्तक : 'प्रसिद्ध करण्यात आलेली चोपडी...' – निअसा २७२. [गु. चोपडी; हिं. चौपत्री]

**चोपडू** पु. चोपडलेला पदार्थ.

**चोपडे** न. पीतांबर; कोणतेही रेशमी वस्त्र.

**चोपडेपणा** पु. गुळगुळीतपणा : 'कापडनिर्मितीमध्ये पांढरेपणा व चोपडेपणा आणण्यासाठी...' – भाख.

**चोपण** वि. चिकण (जमीन, माती). (प्रां.)

स्त्री. राड; चिखलवट जागा. (व.)

**चोपण-णी-णे** स्त्री. न. १. (जमीन इ.) चोपण्याची, ठोकण्याची क्रिया (चोपणेपासून नाम). २. गवंड्याचे जमीन थोपण्याचे लाकडी हत्यार. हे हात दीड हात लांब, वीतभर रुंद व चार पाच बोटे जाड असून, याला हातात धरण्यासाठी मागे एक मूठ असते. [का. चप्पटे पेट्टणि; फा. चोब]

**चोपण-णी-णे** स्त्री. न. लहान मुलांचे रिंगणे; चोखणी.

**चोपणमाती** स्त्री. एक प्रकारची चिकण माती.

**चोपणे** सक्रि. १. चोपटणे; (जमीन इ.) चोपणीने ठोकून सपाट, साफ, टणक, गुळगुळीत करणे. २. (ल.) मारणे; बडवणे; ठोकणे; पिटणे. अक्रि. १. (जमीन, भुई इ.) खचून, खाली बसून सपाट दिसणे. २. रोड, अशक्त होणे; कृश होणे; वाळणे : 'जनीं वनीं तुजसाठीं मनीं झुरतां मी चोपलें।' – होबाला ९४.

**चोपणे** उक्रि. (सामा.) चुंफणे; चोखणे.

**चोपणे** सक्रि. ठोठावणे : 'फांसपारध्यात १०० रुपयांचे खाली लग्न होत नाहीं, आणि १२५ रुपयेपर्यंत पंच दंड चोपतात.' – गांवगाडा.

**चोपदार** पु. वेत्रधारी; हातात अधिकारदर्शक दंड किंवा काठी असलेला सेवक. [फा. चोब्दार.]

**चोपन** पु. दलदलीची जागा, जमीन. (व.)

**चोपनाई** वि. पाणथळ. (झाडी) [फा. चोबा]

**चोपनी** स्त्री. पहा : **चोपण-णी २**

**चोपय** स्त्री. चोपई; सरड्याच्या जातीचा एक प्राणी, सापसुरळी.

**चोपरू** वि. चौदा. (नंद.) पहा : **चोपड** [क.]

**चोपलेले** वि. रोडावलेले; कृश; हाडकुळे : 'एक लांबोळें चोपलेलें कुत्रे त्याच्या शेजारीं दोन पाय पुढें पसरून दीनवाणेपणे त्याच्या तोंडाकडे पाहत बसले.' – उअं.

**चोपाचोट** क्रि. ठोकून जमीन सपाट करण्याची क्रिया.

**चोपाचोप** स्त्री. १. (जमीन, भुई इ.) चोपण्याने, सारखी ठोकण्याची क्रिया. २. (ल.) याला चोप, त्याला चोप अशा रीतीने मार देण्याची, चोप देण्याची क्रिया; मारामारी; ठोकाठोकी; कुंदी काढणे. [चोपणे द्वि.]

**चोपाटणे** अक्रि. थकणे, कृश होणे. (राजा.)

**चोपाडणे** सक्रि. चोपडणे, फासणे; तेल इ. लावून बुळबुळीत करणे. (राजा.)

**चोपाय** पु. पक्ष्याचा पंजा. (गो.)

**चोपा(फा)ळा** पु. १. झोपाळा; झोपा; दोला; आंदोला. २. फळ्यांची चार खुरांची खाट, चोपाळा. (कु.) [सं. चौ+फलक]

**चोपाळा** पु. विश्रांतीची व पाणपोईची जागा : 'मौजे मजकुरी आमचे वडिलांची थडी (समाध्या किंवा वृंदावनें) व चोपाळे आहेत.' – ऐको ३८६.

**चोपि-पी** (वस्त्राची) घडी : 'इहीं बोधाची चोपि लूसिली' – राज्ञा ३.२४९.

**चोपिव** पहा : **चोपूनचापून** : 'कटीला निरि चोपिव ना फुटे' – मला १५०.

**चोपूनचापून** क्रिवि. १. (जमीन, भुई इ.) चांगल्या रीतीने ठोकून; सपाट, साफ, गुळगुळीत करून. २. (धोतर, उपरणे, फेटा, पटका इ.) चांगल्या रीतीने दाबून; चेपून; योग्य रीतीने वस्त्र इ. धारण करून. [चोपून द्वि.]

**चोफाळ** पु. पातळ पासोडी; चादर. [सं. चतुर+पल्लव किंवा चौ+पालव]

**चोब** स्त्री. फाळ लावण्याची जागा. (झाडी)

**चोब** १. काठी. २. कार्यालयीन कर्मचारी.

**चोबकणे** क्रि. जनावरास टोचणे. (झाडी)

**चोबडे** वि. चोपडे; गुळगुळीत; लाडिकपणाचे; गौरवाचे.

**चोबणे** सक्रि. खुंटी, बोळा इ.नी भोक वगैरे बंद करणे.

**चोबदार** पहा : **चोपदार** [फा.]

**चोबर** शअ. परिपूर्ण; बंबाळ. (झाडी)

**चो(चों)बळणे** पहा : **चोबाळणे**

**चोबा-भा** पु. कानाच्या खालचा गोल भाग; कानाची पाळ : 'कानाचे चोबे आणि नाकाचा शेंडा गारठून दुखत होते.' – गागो २०३.

**चोबा** पु. भात वगैरे धान्य वाहून नेण्याकरिता केलेला भाताच्या पेंढ्यांचा कणगा. (को.) पहा : **मुडा**

**चोबा-भा** पु. सोळा पायल्यांच्या मणाचा चवथा हिस्सा; चार पायल्यांचे माप : 'काहीं चणे होआवे : मग तेही चोभे दोनि चणे दीधले :' –लीचउ २८८.

**चोबा-भा, चौबा** पु. १. गंगापुत्र; उपाध्याय; क्षेत्रोपाध्याय (विशेषतः

मथुरेचे) : 'आम्हा मथुरेच्या चोभ्यासारखा सुखी प्राणी पृथ्वीच्या पाठीवर कोणी तरी असेल काय?'– तोबं. २. क्षेत्राच्या ठिकाणी यजमानांकरता धार्मिक कृत्ये करणारा ब्राह्मण : 'असेल कोणी तरी यजमान धुंडीत फिरणारा चोबा।'– स्वस्था २७३. [सं. चतुर्वेदी; हिं.]

**चोबारा** पु. चवाठा; चौक. [हिं. चौबारा]

**चोबाळणी** स्त्री. १. उपद्व्याप. २. व्यवहार. ३. भानगड. (गो.)

**चो(चों)बाळणे** उक्रि. १. (मुलाला, जनावराला) थोपटणे; गोंजारणे; शांत करणे; राग शमवणे. २.(ल.) गोड गोड बोलून; थापा देऊन फसवणे; एखाद्याच्या तोंडावरून हात फिरविणे. [सं. चीभ्]

**चोबाळा** पु. खोटा बडेजाव, भूलथापा :'...हातगुणांचा चोबाळा करीत डॉक्टरीणबाई आल्या... .'– माचू १३७.

**चोबी** वि. लाकडी :'नबाबाचे खैम व चोबी बंगला जाऊन उभा राहिला.'– मइसा ७.९८. [फा.]

**चोबीना** पु. १. लाकडे. २. लाकूडकाम. [फा.]

**चोभा** पु. उसाचे कांडे; उसाचे बाडे.

**चोमक** वि. कंजूष. (झाडी) [सं. चुंबक]

**चोमडा** पु. मोठे वेटोळे, गुंडाळी. (गो.)

**चोमडेपणा** पहा : **चोंबडेपणा** :'बिंदुताई, लागलीस चोमडेपणा करायला !'– भावं १७६.

**चोमण–णे** न. (अश्लील) पुरुषांचे जननेंद्रिय.

**चोमणी** स्त्री. (अश्लील) लहान मुलाचे जननेंद्रिय; बुल्ली; नुंगी.

**चोमळ** स्त्री. चुंबळ : 'आयरीखाली पायरी, पायरीखाली झिरा, उठा उठा xx पाटील घागर तरी भरा, नायत चोमळ तरी करा'– लोसाको.

**चोय** न. उसाचे गुऱ्हाळ. (कु.)

**चोय** स्त्री. पहा : **चुई**. नारळ किंवा त्यासारख्या झाडावर असणारा फुलांचा झुबका; गुच्छ. (कु.)

**चोयकाडी** स्त्री. बांबूची पातळ पण टिकाऊ काडी. ह्यांचा उदबत्त्या करण्याकडे उपयोग होतो.

**चोयटी** स्त्री. चावून राहिलेला चोथा :'ऊस खाऊन टाकलेल्या चोयट्याचे ढिगारेही दोन तीन ठिकाणी पडलेले होते.'– शिदोरी ३९.

**चोयोबोयो** स्त्री. तापवून विरजलेले दूध. (गो.)

**चोर** पु. १. चोरी करणारा, दुसऱ्याची वस्तू त्याला नकळत पळवणारा माणूस : 'चोर भांडारी करावा। घसरतांच सांभाळावा।'– दास १९.९.९. २. (एखाद्यापासून काही गोष्ट, वस्तू इ.) छपवून, लपवून ठेवणारा; (एखादी गोष्ट स्वत:पाशीच) दाबून ठेवणारा, दडपून टाकणारा. ३. (समासात) प्रच्छन्न; गुप्त; लपविलेला; छपविलेला; राखून ठेवलेला; खाजगी; आड; बाजूचा; कोपऱ्याचा इ. उदा. चोरअडसर, चोरखीळ इ. ४. (स्वत:स) मागे राखणारा; चोरून ठेवणारा; अंग काढते घेणारा; चुकविणारा; चुकार या अर्थी पुढे चोर शब्द लावून अनेक सामासिक शब्द होतात. उदा. कलमचोर, खांदचोर, पाठचोर, अंगचोर, कामचोर, विद्याचोर इ. [सं. चुर्] (वा.) **चोराआधी मोट उचलणे** – एखादी गोष्ट भलत्याच्या हाती जाण्यापूर्वीच आपल्या अंकित करणे किंवा हस्तगत करणे : 'ते कशाकरतांही कां येतना, आपण आपली चोराआधी मोट उचलावी...'– मोचन ४६. **चोराचे चोटाने विंचू मारणे** – दुसऱ्यास खर्ची घालून आपले काम साधणे : 'दरबारचे मुदसदी चोराचे चोटानें विंचू मारणार ! खर्चाखालीं मात्र आम्हीं यावें.'– ऐको ३८७. **चोरांची दावण देणे** – चोरांची दावण बांधून त्यांची डोकी सडकणे. चाबकाने बडवणे.

**चोर** पु. केळफुलाच्या फणीच्या दात्यांतील पसरट माथ्याची काडी; कावळा.

**चोर** पु. (गंजिफा, पत्ते इ. खेळांत) हुकमाच्या पानांखेरीज इतर पान.

**चोरअंक–ख, चोरआंख** पु. १. कापडाच्या गाठीवर, कापडावर, विक्रीच्या वस्तूवर घातलेला, खरी किंमत दाखवणारा, अत्यंत बारीक आकडा. हा आकडा दुकानदाराच्या स्वत:च्या उपयोगाकरिता असतो. हा गिऱ्हाइकाला कळवायचा नसतो. गिऱ्हाइकाकरिता किंमतीचा दुसरा मोठा आकडा दिलेला असतो. २. हस्तलिखित पुस्तकाच्या पानावर घातलेला अनुक्रमाचा बारीक आकडा. ३. (सामा.) गुप्त आकडा.

**चोरओटी** स्त्री. दिसण्यात लहान पण फार दूध देणारी (गाईची, म्हशीची) ओटी, कास. (वा.) ० **भरणे**– स्त्रीच्या प्रथम गर्भारपणाच्या तिसऱ्या किंवा चवथ्या महिन्यात खासगी रीतीने (गरोदर स्त्रीला शिंक्याखाली बसवून) ओटी भरणे. तीन महिनेपर्यंत स्त्री गर्भार आहे हे निश्चित कळू शकत नाही. यावरून या समारंभाला चोरओटी म्हणतात. पहा : **ओटीभरण**

**चोरक** न. एक वनस्पती; शंखिनी; चोरपुष्पी; केशिनी.

**चोरकाटा** पु. तापाची बारीक कसर; थंडीचा बारीक काटा; चोरटा ताप. (क्रि. येणे, लागणे, भरणे, वाटणे.)

**चोरकाटा–चोरताजवा** पु. खोटा तराजू.

**चोरकाठी** स्त्री. (शिकार) जनावर माणसाळण्याची एक युक्ती. चारपाच माणसे समोरून पन्नास फुटावरून घोंगडी पांघरून एकदम ओरडत पळत येऊन जनावराच्या पायाजवळ व तोंडाजवळ येऊन पडतात, लोळतात व तोंड उघडून त्यास गोंजारतात.

**चोरकाम** न. १. कितीही केले तरी दुसऱ्याच्या डोळ्यांत न भरणारे काम. २. पार पडल्यावर ज्याचे फारच थोडे अवशेष राहतात असे काम.

**चोरकुळ** न. चोरांचा समूह : 'गांवघेणी करतिल चोरकुळें इंद्रियाची'– मुप्र २८८४.

**चोरक्रांत–ति–ती** स्त्री. चोरांची पुंडाई; चोरांनी केलेली लुटालूट, नासधूस, धूळधाण.

**चोरखडी** स्त्री. कोंदणात बसवलेले लहान रत्न : 'लेईला अलंकार भूषणें परवडी दिव्य रत्नें चोरखडी खेवणें तयां।'– निगा १२४.

**चोरखण** पु. १. (पेटीतील, कपाटातील) गुप्त कप्पा, खण, पूड. २. घरातील बिनमहत्त्वाची, बारीक खोली, भाग.

**चोरखाई** स्त्री. प्रवाशांवर हल्ला करण्यासाठी लपून बसण्याचे, सोयीचे, दऱ्याखोऱ्यातील खबदाड, अरुंद खिंड.

**चोरखिडकी** स्त्री. १. एकांतात बसावयाची लहान खिडकी. २. (ल.) (लेखातील, भाषणातील) पळवाट, सोडवण; (लेखातून, भाषणातून) निसटण्यासाठी केलेली संदिग्ध वाक्यरचना. ३. प्रसंगविशेषी निसटून, पळून जाण्यासाठी केलेली लहान व गुप्त खिडकी.

**चोरखिंड** स्त्री. प्रवाशांना लुटण्यासाठी सोयीची असलेली दोन डोंगरांतील अरुंद वाट. पहा : **चोरखाई**

**चोरगल्ली** स्त्री. १. मुलांचा एक खेळ. २. या खेळात पाडावयाची गल्ली, खड्डा. ३. (चोरांना लपण्यास सोयीची) आडगल्ली, बोळ.

**चोरगस्त** स्त्री. रात्री दुसऱ्याला कळू न देता पोलीस लोक मुकाट्याने जी फेरी घालतात ती; गुप्तपणे घातलेला रस्त्यावरील फिरता पहारा; मुकी गस्त; वाद्याशिवाय गुपचुप घातलेली गस्त.

**चोरघडी** स्त्री. अपुरी, लहान घडी; गिऱ्हाईक कापड विकत घेताना त्याची लांबी घड्यांवरून, सळांवरून ठरवतात. म्हणून त्यांना फसविण्यासाठी व्यापाऱ्याने एका घडीच्या पोटात घातलेली दुसरी लहान अपुरी घडी .

**चोरघंटी** स्त्री. चोर किंवा अनाहूत व्यक्ती यांची चाहूल लागताच सूचना देणारी घंटी.

**चोरघाई** स्त्री. १. चोर आले असता उडणारी धांदल, घाई. २. (ल.) अतिशय धावपळ; धांदल.

**चोरचाबड** वि. चोर; लबाड; अप्रामाणिक; ठक :'परंतु निर्मळ भली लबाड चोरचबाड नसती तरी ठेवणें.' –पेद २७.२५८. [चोर द्वि.]

**चोरचाहूल** स्त्री. गुप्तपणे ऐकून, पाहून लागलेली एखाद्या माणसाच्या, जनावराच्या अस्तित्वाची, हालचालीची चाहूल, कानोसा.

**चोरचांदणी** स्त्री. पहाटे उगवणारी चांदणी : 'उद्या चोरचांदणी उगवण्याच्या सुमारास पुढचा रस्ता सुधरावयाचा.' – केस्व ५२.

**चोरचिर(ल)(ल्ल)ट** पु. चोर वगैरे : 'हल्लीं चोराचिलटांचा इथे फार त्रास आहे.– भाबं ५२; 'वेळप्रसंग पडल्यास चोराचिरट्यांपासून संरक्षण करायला उपयोगी पडतील असे शिपाई प्यादे... वगैरे प्रकारचे लोक त्याजपाशी फारच थोडे होतें.' – विंध्याचल १११.

**चोरचुंबा** पु. १. गुप्तपणे दिलेला बोळा, दट्ट्या इ. २. (ल.) लाच. (क्रि. पडणे, देणे.)

**चोरछपी** पु. चोरून, लपूनछपून येणारे; हेर : 'चोरछपी जे आणखी कोणी खाली त्याचे येतील ते मारावे.'– ऐको ३८७.

**चोरजासूद** पु. गुप्त हेर, चार, टेहळ्या. गुप्तपणे शत्रुपक्षातील बातम्या काढणारा.

**चोरटा** पु. चोर.

वि. १. अप्रामाणिक; लुच्चा. २. गुप्त; लोकांना नकळत करायचा (धंदा, व्यापार इ.) : 'चोरट्या पापामुळे मन जितके भित्रें होतें तितकें भित्रें दुसऱ्या कशानें होत नाहीं.' – वाब ४.१. ३. वरून न दिसणारा (ताप इ.). (वा.) **चोरट्यासारखे होणे** – संकोच वाटणे; काहीतरी अपराध, चूक केल्याप्रमाणे वाटणे : 'बाळू व सुनंदा यांना अगदींच चोरट्यासारखें झालें होतें.'– सुदे ८.

**चोरटा माल** सरकारी कर चुकवून व लपून छपून आणलेला माल, जिन्नस : 'चोरटा माल नेण्याआणण्याचा दृष्टीने...'– स्मदु २२.

**चोरटावा** पु. चोरटेपणा; चोरवड; चोरी करण्याची प्रवृत्ती :'कामगारात टंगळमंगळ व चोरटावा माजून राहिला आहे.' – गांवगाडा १५३.

**चोरटावे–ई** (सामा.) चोरावे, चोरवडा. पहा : **चोरवण**

**चोरटा व्यापार** बंदी असलेला किंवा जकात भरावा लागणारा माल चोरून परदेशी पाठवणे किंवा देशात आणणे.

**चोरटी** स्त्री. चोरीमुळे होणारे नुकसान : 'वेठ, बिगार चंदीदाणा, चोरटी, वर्णी.' – खेया २२.

**चोरटी आयात** मालाची गुप्तपणे केलेली आयात; बिनापरवाना देशात आणलेला माल.

**चोरटे** न. चोरांचा उपद्रव.

**चोरटेपणा** न. चौर्य; चोराची कृती; चोरून, ओशाळवाणेपणाने केलेली गोष्ट : 'मी रविवारी ते काम करीत असे, तेहि – एकप्रकारे चोरटेपणानेच.' – पवा ३६६.

**चोरटे पाणी** गुप्त स्नान. मुंबईजवळच्या काही शेतकरी लोकांत विवाहापूर्वी मुलगी ऋतुमती झाल्यास तिला चौथ्या दिवशी गुप्तपणे घातले जाणारे स्नान.

**चोरटे पीक** कणसात चांगले भरलेले पण काडांच्या आखुडपणामुळे उठावदार न दिसणारे, वरून भिकार दिसणारे पीक.

**चोरणे** उक्रि. १. दुसऱ्याच्या वस्तूचा अपहार करणे; दुसऱ्याची वस्तू त्याला नकळत लांबविणे. २. गुप्त ठेवणे; दाबून दडपून टाकणे (एखादी गोष्ट, माहिती इ.); (सामा.) लपविणे; छपविणे : 'दृश्यास बाह्य संचलें। परी तें विश्वास चोरलें।'– दास ९.२.५. ३. (एखादी गोष्ट) चोरून गुप्तपणे करणे. चोरणे हा शब्द पुढे जोडून अनेक वाक्प्रचार होतात. उदा. अंग चोरणे = कुचराई करणे; फार श्रम न घेता काम करणे; दिरंगाईने काम करणे. अंग–हात–पाय–डोळे चोरणे = हात, पाय इत्यादी अवयव संकुचित, आखूड करणे, ओढून घेणे. पान्हा चोरणे = पान्हा न सोडणे; पान्हून स्तनात उरलेल्या दुधाचे वर आकर्षण करणे (गाय, म्हैस इत्यादींनी). [सं. चुर्]

**चोरताप** पु. हातास न लागणारा परंतु शरीरात असणारा बारीक ताप; हाडीज्वर; तापाची सतत असलेली बारीक लक्षणे. पहा : **चोरकाटा**

**चोरथरा** पु. खोटे नाणे. पहा : **चोरमोळा** : 'टाकु पाडिला चोरथरा। ब्रह्मविद्येचा।'– उगी ६३५.

**चोरधाड–डा** स्त्री. पु. चोरांनी केलेला आकस्मिक घाला, हल्ला; दरवडा; डाका.

**चोरनजर** स्त्री. १. (दुसऱ्याला) नकळत पाहणे; डोकावून पाहणे; गुप्तपणे टेहळणी करण्याकरिता टाकलेली नजर; चोरून पाहणे; चोरटी दृष्टी : 'घरांतील बायका चोरनजरेनें जावयाकडे पाहतात.' – मोरएल २४. २. चोरासारखी मुद्रा, चर्या, दृष्टी.

**चोरपडदा** पु. १. आतील गुप्त पडदा. २. शरीराच्या आतील पडदा; अंतस्त्वचा.

**चोरपण** न. (बायकी) मुलींच्या खेळात येणारी चोर होण्याची पाळी. ज्या मुलीवर डाव असतो, ती जर डाव न देता जाऊ लागली तर इतर मुली तिला आपले चोरपण दुसरीस देऊन जाण्यास सांगतात.

**चोरपाऊल, चोरपाय** न. पु. आवाज न करता टाकलेले पाऊल. पावलांचा शब्द न करता चालणे; चोरटे चालणे; चोरचाहूल.

**चोर(रे)पाणी** न. दुखण्यातून नुकत्याच उठलेल्या आजाऱ्यास स्नान घालण्याकरिता तयार केलेले औषधीयुक्त गरम पाणी.

**चोरपान्हा** पु. १. धार काढते वेळी गाय किंवा म्हैस मुद्दाम कासेचा संकोच करून दुधाचा काही अंश वासरासाठी राखून ठेवते तो. २. असे राखून ठेवलेले दूध बळजबरीने काढतात ते; गाईने, म्हशीने नाखुषीने दिलेले थोडे दूध. ३. (ल.) लघवी केल्यानंतर पुन्हा थोडथोडी होणारी लघवी; नकळत लघवीला होणे : 'तेज सांडूनि नयना। टाळी पडोनि ठाती काना। मुततां लागे चोरपान्हा। तरी देहाभिमाना वाढवी।' – एभा २२.५२८.

**चोरपाळत** स्त्री. आपण दृष्टीस न पडता दुसऱ्यांची बातमी युक्तीने काढण्याचा प्रकार; गुप्त रीतीने ठेवलेली पाळत. पहा : **पाळती**

**चोरपेठ** स्त्री. जिथे खोटी वजने वापरतात व चोरटा धंदा चालतो अशी पेठ; चोरबाजार.

**चोरपोर** न. (समुच्चयार्थी) चोर; उचल्या; भामट्या; लहान–सहान चोऱ्या करणारी पोरें; उचल्ये इ.

**चोरबाजार** ज्या ठिकाणी जुना माल विकला जातो असे ठिकाण, बाजार .

**चोरभूक** स्त्री १. थोडी शिल्लक राहिलेली, पूर्णपणे न शमलेली भूक. २. थोडेसे खाऊन शांत होणारी भूक; किंचित भूक.

**चोरमहाल** पु. १. गुप्त जागा, खोली. २. रखेल्या ठेवलेली जागा; दासीमहाल.

**चोरम(मु) ळ्या** क्रिवि. लपून छपून; गुप्तपणे (टेहळणे); पाळत ठेवून; गुपचूप.

**चोरमूठ** स्त्री. पकडलेल्या जनावराला तीन दिवस एका जागेवर पडू देणे.

**चोरमोळ** वि. खोटे;नकली; बनावट : 'पुन: चोरमोळी म्हणोनि रसिकी वाहिली वरदळाची' – रुस्व ५२०. [सं.चोरमुद्रा]

**चोरमोळा** पु. चोरांचा शिक्का; खोटे नाणे : 'हा चोरमोळा असिका।प्रपंचाचां ठसा लटका। जो प्रवृत्ति पडिला लोकां।अज्ञानांचा।'– ज्ञाप्रबो ५४९. पहा : **चोरथरा**

**चोरलक्षण** न. चोरटेपणाचा स्वभाव दाखविणारी मुद्रा, नजर, चेहऱ्याचे वळण, चालण्याची धाटी इ.; (पाहिलेला मनुष्य) चोर आहे असे दर्शविणारे लक्षण; चोरटेपणाची छाप.

**चोरवड–डा, चोराव (वा)ण, चोरणे** स्त्री. पु. न. चोरांनी केलेला उत्पात, धुमाकूळ, अनर्थ, नासाडी, लुटालूट; चोर फार माजल्यामुळे उत्पन्न झालेली दुर्दशा. (क्रि. सुटणे,मातणे, होणे, माजणे, उठणे, मोडणे, दाबणे, दबणे.) : 'मुलखात चोरवडा फार माजला होता.' – स्वप ८५.

**चोरवाडा** पु. १. चोरांचा अड्डा; चोरांची वस्ती. २. ज्या घरातील सर्वच माणसे चोराप्रमाणे वागतात ते घर.

**चोरविद्या** स्त्री १. गूढ, अज्ञात शास्त्र, कला. २.गुप्त विद्या. ३. जारणमारणाची, जडीबुटीची विद्या.

**चोरवेळ, चोरळी** स्त्री. १. दिवसाच्या किंवा रात्रीच्या तीस घटकांचे प्रत्येकी तीन पूर्णांक तीन चतुर्थांश घटकेचे असे आठ भाग कल्पिलेले आहेत. त्यास अमृतवेळ, काळवेळ, शुभवेळ इ. नावे आहेत. त्या आठ भागांपैकी एका वेळेस चोरवेळ किंवा चंचलवेळ असे म्हणतात. पहा : **वेळ**. २.ज्या वेळेस चोरांची विशेष भीती असते ती वेळ.

**चोरशिपाई** पु. मुलांचा एक लपाछपीचा खेळ : 'ती(मुले) गुरे संभाळीत चोर – शिपाई व साखळीचा खेळ खेळत असतात.' – गार ७४.

**चोरशी** स्त्री. पटाशी; किंकरे.

**चोरसा** पु. चौकोनी तुकडा : 'साबणाचे लहानमोठे चोरसेहि सर्वत्र मिळतात.' – त्रिकाळ १५.१०.१९३९.

**चोरस्नान** न. पहा : **चोरपाणी**

**चोरहट्टी–चोऱ्हाटी** स्त्री. चोरवाडा; चोरांचा अड्डा; चोरांची वस्ती.

**चोरहरकारा** पु. गुप्त दूत.

**चोरा** पु. १. बिबा तापवून दुखऱ्या भागावर दिलेला चटका, चरका. (कु.) २. (सामा.) डाग. (को.)

**चोरा** पु. १. मोठा ओटा. २. देवडी. ३. पोलीसचौकी; फरासखाना : 'तेव्हां त्यास खोळण्यासाठीं ती निघाली आणि चोऱ्यावर आली.' – मौज २.६.३०. [गु.; सं.चतुर]

**चोराड–डी** स्त्री. चोरवडी; चोरावे. पहा : **चोरवण**

**चोरापो(मो)री, चोरामोरा चोरवा** क्रिवि. चोरांनी आणि चोरट्या उनाड पोरांनी; चोर भामटे इत्यादीकांकडून ( चोरून नेलेला इ.) : 'रक्ताच पाणी करून त्यानं पिकवलेलं धन असं चोरामोरी का जावं ?' – गागो ७९.

**चोरामारा** क्रिवि. चोरट्या मुद्रेने; चोरटेपणाने; चोरूनमारून : 'असा चोरामोरा किती दिवस वहिवाटणार.' – सूर्यग्र १२९.

**चोरावा** पु. चोरीची कृत्ये; चोऱ्यामाऱ्या : 'प्रांतात दंगा आहे. रामोशी चहूंकडून उठले आहेत. चोरावे भारी जाहले आहेत.' – ऐको ३८८.

**चोरावे–वा** न. पु. १. (चोरांचे) चोरीच्या धंद्यासाठी फिरतीवर किंवा चोर दरोडेखोराच्या दंगलीत असणे. २. पहा : **चोरवड–ण**

**चोरी** स्त्री. १. चोरण्याची क्रिया; चोरांचे कर्म; (कायदा) दुसऱ्याला नकळत चीजवस्तू लांबविणे; मालकाच्या परवानगीवाचून त्याच्या ताब्यातून जंगम माल अप्रामाणिकपणे नेणे. २. गुप्तपणाने केलेले (भलतेच) कर्म; चोरटे कर्म, वृत्ती; लपूनछपून केलेली गोष्ट; छपावणी. ३. (एखादी गोष्ट) दाबणे; दडपून ठेवणे; गुप्त ठेवणे; बाजूस ठेवणे. ४. अपराध : 'अशी काय केली ईश्वरा तुझ्या घरिं चोरी।' – प्रला १६४. [सं.चौरिका]

**चोरी** स्त्री. मनाई; आडकाठी; प्रतिबंध; न करण्याची, न बोलण्याची, दडपून टाकण्याची जरुरी, आवश्यकता; संयमन. (क्रि. होणे, असणे) : 'श्रीमंतांना जवळ पैसा व लत्ताकपडा असून त्याचा उपभोग घेण्याची चोरी झाली होती.' – गुइ.

**चोरी** स्त्री. चोळी. (झाडी) [सं. चोली]

**चोरीचकारी–पाटी** स्त्री. चोरी; दरोडा; उचलेगिरी; सोदेगिरी; बदनामी.

**चोरीची बाब** १. चोरून आणलेली वस्तू; चोरीशी संबंध असलेली गोष्ट; २. काळीबेरी गोष्ट; काळेबेरे; ज्या गोष्टीबद्दल उघड बोलता येत नाही अशी गोष्ट; संशयास्पद कृत्य. ३. ज्याचे खरे स्वरूप आपणास कळालेले नाही असा व्यवहार, बाब इ.; गुप्त गोष्ट.

**चोरीमा(मो)री** स्त्री. चोरणे, मारणे,लुटणे, ठोकणे इ.कृत्ये; दरोडेखोरी; ठकबाजी; चोरीचपाटी : 'चोऱ्यामोऱ्या करण्यापर्यंतही याची मजल जाई.' – काआ ४७.

**चोरीलपी** स्त्री. चोरून केलेला व्यवहार : 'त्याच मन कुठेतरी हातभट्टीच्या किंवा चोरीलपीच्या धंद्यात गुंतलेलं असायच.' – प्रतिनिधी १३२.

**चोरीव** वि. चोरलेला; चोरून आणलेला.

**चोरूनमारून** क्रिवि. १. दुराचरणाने; चोरीमारीने, बेकायदेशीर कृत्ये करून २. गुप्तपणे; लोकांस नकळत; चोरटेपणाने. पहा : **चोरणे**

**चोरोव, चरोव** पु. चारा. (गो.)

**चोल** न. एक भाजी.

पु. तंजावर व भोवतालचा प्रदेश.

**चोलखंड** पु. एक चोळी होईल एवढा तुकडा : 'चोलखंड खइनी।' – प्रामको ८.

**चोलणे** पहा : **चोळणे**

**चोला–ळा** पु. उरोभाग आच्छादित करणारा एक प्रकारचा अंगरखा; छाती, पोट व पाठ आच्छादणारे वस्त्र.

**चोली** स्त्री. चोळी.

**चोली** स्त्री. १. पूजेची उपकरणे ठेवण्याचा पेटारा; संबळी; लहानशी बुरडी. २. विड्याची पाने ठेवण्याची टोपली; ३. लहानसा बुरडी पेटारा.

**चोलीकुचाली** वि. उपद्व्यापी; दंगेखोर; उचापती करणारे: फितुरी: 'इकडे मुरारराव वगैरे चोलीकुचाली फार आहेत. स्नेहानें सर्व आपले करून आपलें कार्य होईल.' – पुद ३३४. [कुचाली द्वि.]

**चोली दामन (मैत्री किंवा तह)** पक्का; घनिष्ठ; दृढ. (चोली=चोळी, दामन=पदर) चोळीवर जसा पदर हटकून असावयाचाच, बिलकूल ढळावयाचा नाही, त्याप्रमाणे एकमेकांस न सोडणारी मैत्री: 'त्यात तुमचा व त्याचा (निजामाचा) चोळी दामनचा लेखा, लिहिले पुसले आहेत !' – ऐको ३८८. [हिं.]

**चोल्हार** वि. सामान्य. मानहीन.

**चोव** पु. १. ओल्या खोबऱ्याचा कीस; खरवण; खवलेले ओले खोबरे. २. दूध काढून घेतल्यावर राहिलेला खोबऱ्याचा चोथा. पहा : **चव**

**चोवडा** पु. एक खाद्यविशेष; उडदाची डाळ भिजवून व वाटून तीत खारेकोहळ्याचा कीस घालून तेलात तळून केलेला वडा; किसाचा वडा. (व.) [सं.चो]

**चोवडी** स्त्री. चोयटी; चुयटी; रस चोखून घेतल्यावर (ऊस इत्यादिकांचा) राहिलेला चोथा : 'नाना भूस आणि कण। येकाचि म्हणणे अप्रमाण। रस चोवडिया कोण। शाहाणा सेवी।' – दास १८.५.३०. [सं.सीव्]

**चोवना** क्रि. १. दिसणे. २. चारपदरी कर्दोडा; बायकांच्या कमरेचा चांदीचा अलंकार. (झाडी) [सं.]

**चोवा** पु. १. चंदनापासून केलेला एक पदार्थ; चंदनाची उटी. पहा : **चुवा :** 'चोवा कस्तुरी बुका सधर। अर्पूनि पुष्पांजळी संभार।' – एभा २७.३३०. २.अगरुसार. [हिं.]

**चोवा** वि. शुष्क; सुकलेला; निस्तेज.

**चोवा** लापशी; अर्धद्रव.

**चोवाऱ्हा** न. चंदनापासून केलेला एक पदार्थ; अगरूसार. [हिं. चोवा]

**चोवीस** वि. १. २४ ही संख्या; वीस आणि चार मिळून होणारी संख्या. २. अठरा पुराणे व सहा शास्त्रे : 'वेदश्रुति तुज नेणती कोणी। चोवीस ठेंगणी धांडोळिता।' – तुगा ८७०. [सं. चतुर्विंशति]

**चोशी** क्रिवि. चारी बाजूंनी. (गो.)

**चोषक** वि. वर ओढून, आकर्षून घेणारा (बंब, पंप इ.); शोषक : 'ह्या बंबाने पाण्याचें चोषण करता येतें व तें वर चढवता येतें म्हणून यास चोषख व उच्चालक असे म्हणावे.' – मसपु ९८. [सं.]

**चोषण** न. (पंप इत्यादींनी पाणी) ओढून घेणे, खेचून घेणे. (सामा.) चोखणे; शोषणे : 'चोषणाच्या योगाने बंबांत पाणी वर चढते अशी लोकांची समजूत आहे.' – मसपु ९७. [सं.]

**चोष्य** वि. चोखण्याचा; चोखायला योग्य; चोखण्याजोगा. [सं.]

**चोहट** वि. उत्तम; सुरेख; चोखय उत्कृष्ट : 'नातरी सहोदरा चोहटा। वेव्हारु लाविसी।' – कापु १४.६६.

**चोह(हा–हो)ट–टा** पु. १. बाजारचौक; चार रस्ते जेथे येऊन मिळतात ती जागा. (प्र.) पहा : **चवाठा** : 'उकलू विषयांचा पेटा। होत मनाचा चोहटा।'–ज्ञा ८.१८४. २.चौकी : 'परी वाटेमधिं चोहाटे बांधिले।'– अमृत २३.. [सं. चतुर्+हाट]

**चोह(हो)टी** स्त्री. चुइटी. पहा : **चुई**

**चोहरीया** वि. चोखट; उत्तम : 'मग सर्वज्ञें म्हणीतलें : उततीया चोहरीया : बखीया भेओ जाणां :'–लीचउ ४२१.

**चोहा** पु. मिरचीचे किंवा तंबाखूचे रोप लावल्यानंतर पाउस न आल्यास त्या रोपाला देतात ते विहिरीचे पाणी. (क्रि. घालणे.) (व.) [हिं.]

**चोहा** पु. लहान विहीर.

**चोही (हो) कडे, बाजूंना** क्रिवि. चहूकडे; चारी बाजूंना. पहा : **चहूकडे**

**चोहोकोन–नी** क्रिवि. चारी बाजूंनी : 'चोहोकोनी गंगोदक पाटी न्हाणिती।' – वसागा २१.

**चोहुनी** क्रिवि. १. चिंध्या होऊन; तुकडे होऊन. २. चारी बाजूंनी : 'खांडीयाचे धारेऐसीं वृक्षाची पानें : देवता हातीं पाइ धरूनि तयावरी घालिती : चोहूनि खालि पडति :' – लीचउ १२१.

**चोहोचा आकडा** पु. १. चाराचा आकडा २.(ल.) प्रशस्त घातलेली मांडी; आसनमांडी. ती चार या आकड्यासारखी दिसते म्हणून . (क्रि. घालणे.)

**चोहोत्रा** पु. चबुतरा; चौथरा : 'दर्याचे खालील चोहोत्र्याचे काम' – घाको ३७.

**चोळ** स्त्री. १. (गाडीत भरून, बैलावर गोण्यातून नेलेल्या धान्याचे कण एकमेकांवर ) चोळले, घासले गेल्यामुळे, फुटून, चिरडून गेल्यामुळे मूळच्या मापात येणारा तुटवडा. २. वापरल्याने झालेली एखाद्या वस्तूची झीज, घासाघास, फुटतूट, वजनात कमीपणा इ. ३. (उभ्या पिकाची, शेताची गुरांनी केलेली) तुडवातुडव; वर्दळ. ४.(धान्याची) नासधूस, चोळामोळ, तुडवातुडव झालेली स्थिती.

**चोळ** स्त्री. (जखम, गळू इ.) चोळले, घासले गेल्यामुळे होणारा विकोप, वाढ; अधिक विकृती. (क्रि. भरणे.)

**चोळ** स्त्री. १. (रस्ता, जमीन, शहर, इ.ची) रहदारीची, वर्दळीची स्थिती; वर्दळीमुळे धुराळ्याने युक्त झालेली जमीन, रस्ता. २. खोरें; लहानशा खोऱ्यातील उतरणीची जमीन; दोन उंचवट्याकडून उतरती होत आलेली जमीन : 'काळी मळी पांढरी चोळ। परि ते केवळ वसुधाची।'– एभा ४.२६४. ३. खोऱ्यातील सुपीक जमीन. (माण. व.)

**चोळ** पु. सोगा : 'रुक्मिनी मनीती विठ्ठल कोठं नाही। धोतराचे चोळ खवी

जनीसंगं शेन लावी।'-लोसाको.

**चोळकट** न. (अल्पार्थी) चोळी.

**चोळकी** पु. खणांचा क्वचित लुगड्यांचा व्यापार करणारा.

**चोळको** पु. केळीच्या पानाचा लहानसा तुकडा, फाळका. (गो.)

**चोळखण–खंड** पु. चोळीचा खण; एक चोळी होण्यासारखा कापडाचा तुकडा : 'चोळखण हे नित्य प्रचारातील उपायन आहे.'-भात्रै १०.३.१२६.

**चोळखणे** सक्रि. चोळणे; दाबणे : 'मनगट चोळखत चोळखत सखाराम अंगणात आला.' – वानगी १८२.

**चोळखा** पु. तुकडा. पहा : **चोखळा**

**चोळखा** पु. सुरकुती.

**चोळचाळ** स्त्री. लहान खोऱ्यातील उतरणीची जमीन : 'काळीच्या चोळचाळ जमिनीचं... एक ठीक.' – गांधारी ७८.

**चोळटणे** पहा: **चोळवटणे**

**चोळण** स्त्री. १. (गुरांच्या वर्दळीने होणारी शेताची, पिकाची) तुडवातुडव; चोळ; चोळाचोळ; वर्दळीमुळे, रहदारीमुळे (शेत इ.स) होणारा उपद्रव. २. चिंधीचोळा; नाश : 'कुलाबासंस्थान आपलेच आहे. स्वार व गाडदी जावयाचा इतका अट्टाहास कशास पाहिजे ? रयतेची चोळण होईल.'-ऐको ३८८.

**चोळणा** पु. गुडघ्यापर्यंतची आखूड विजार; मांडचोळणा; चड्डी; लांडी पाटलोण, तुमान : 'चोळण्यात विंचू, उंदीर, सरडे घालून तो अपराध्याला शिक्षा म्हणून नेसवीत.'-मइसा १६.१२.[क. चल्लण = वेगवेगळ्या लांबीची चड्डी]

**चोळणी** स्त्री. १. (शरीर इ.) चोळण्याची, रगडण्याची क्रिया; मर्दन; संवाहन; चंपी. २. गुरांच्या पायाखाली कणसे चोळून, मळून (धान्याचे) दाणे निराळे करणे. ३.(ल.) सेवा; संवाहन; लाच देण्याचा एक प्रकार : 'कोर्ट कचेऱ्या आणि बंगले उंबरठे झिजवून हातदाबणी, पायचंपी, विनवणी, चोळणी इ. प्रकार करण्याचे अपूर्व प्रसंग जुन्या लोकांच्या परिचयाचे नव्हते. '– खेया २८. ४. चोळवटलेली स्थिती; खराबा; नास.

**चोळणीम(मो) ळणी** स्त्री. पहा : **चोळणी** २

**चोळणे** उक्रि. १. धान्य मळण्याकरिता, त्यावरून जोराने हात फिरविणे; रगडणे; भांडी स्वच्छ करण्यासाठी घासणे; माखणे. २. शरीराच्या शिरा सैल करण्यसाठी मर्दन करणे; (शरीरात) तेल मर्दन करून जिरवणे; चंपी करणे; मळणे. [सं.चुल्]

अक्रि. चुटपुटणे; एखाद्या गोष्टीबद्दल हळहळणे; पश्चात्ताप होणे.[सं.]

**चोळणे, चोळो** न. पु. विजारीसह असलेला एक प्रकारचा सदरा; चोळणा; झगा; अंगरखा. (गो.)

**चोळणे मळणे** उक्रि. चोळणे. [चोळणे द्वि.]

**चोळपडणे** सक्रि. मळणे. (धान्य इ.)

**चोळमालीश–स** स्त्री. (घोड्याचे) अंग चेपणे, त्याला मालिश, खरारा करणे इत्यादी काम.

**चोळलाग** पु. चोळीचा लाग, सांधा; ढुशीखाली (चोळीतील बगलेच्या त्रिकोणी तुकड्याखाली) लावलेला, असलेला (कापडाचा) तुकडा, सांधा. पहा : **लाग**

**चोळवटणी** स्त्री. जोराने घासण्याची, चोळवटण्याची क्रिया.

**चोळवटणे** अक्रि. १. (वस्त्र इ.) घासले, चोळले जाणे. २. चुरगळणे; चुरडणे; (वस्त्र इत्यादीची) फार वापरल्याने तकाकी, ताठरपणा नष्ट होणे; सुरकुतणे. ३. कुसकरणे; आवळणे.

सक्रि. (वस्त्र इ.) ओबडधोबडपणाने चोळणे; कुसकरणे; चिवडणे; (पदार्थाची) खराबी होईल अशा रीतीने (तो) वापरणे; नासधूस करणे, 'हळूच ठेव भाऊराया पोथ्या चोळवटतील बरे.' – बाळमित्र २.१२४.

**चोळा** स्त्री. अळसुंदा. पहा : **चवळी** [गु.]

**चोळा** पु. काठापदराशिवाय वस्त्राचा बाकी भाग. पहा : **चोला**[सं.चोल]

**चोळा** पु. चोळेचा रंग; पुट (क्रि. देणे) : 'ईश्वर ध्यानाचिया चोळा। मना काले दिजती वेळांवेळां।' – उगी ६८६.

**चोळाखा** पु. हाल; हालअपेष्टा.

**चोळाखा** पु. १. चोळीचा खण; चोळखण. २. अंगरखा; तुकडा : 'तुवां परम पुरुषें। याजिचे शरिराचे चोळाखे।' –ऋव ५०. ३. सांगाडा; शरीराचा मध्य भाग : 'चोळाखा न फुटे या कलेवराचा।' –उगी १४७.

**चोळाचो(मो)ळा** स्त्री. पु. १. गुरांनी पिकांची केलेली तुडवातुडव. २. (सामा.) चुरण्याची, चेंगरण्याची, गुधडण्याची, कुसकरण्याची क्रिया; चोळून, चुरडून, कुसकरून, चेंगरून झालेली दुर्दशा. ३. नाश; खराबी : 'त्याचा होइल चोळामोळा।' – केक ८८. [चोळणे द्वि.]

**चोळी** स्त्री. १. स्त्रियांचा उरोभाग व बाहू झाकणारे शिवलेले वस्त्र. (कंचुकीची – काचोळीची गाठ ही मागे असते व चोळीला पुढे गाठ देतात) : 'तेवीं वरौती पार्खी उचलिलीं। चोळियांचीं।' – शिव ५५९. २. कपड्याचे अंग; अंगरख्याचा छातीभोवतालचा भाग; चोळा. ३. (ल.) स्त्रीला इनाम दिलेली जमीन. द्वंद्व व समाहार द्वंद्व खेरीज समासात चोळीबद्दल चोळ होते. उदा. चोळकट, चोळखण, चोळलाग इ. [सं. चोल] (वा.) ० **लुगड्याला लागणे** – संसाराला लागणे : 'पोरगी चोळी लुगड्याला कशी लागते.' – लपव ७३.

**चोळीचिंधी, चोळीचिरगूट** स्त्री. न. कपडेलत्ते; वस्त्रप्रावरण; विशेषतः स्त्रियांचा कपडालत्ता; दागदागिने वगैरे.

**चोळीबांगडी** स्त्री. १. (व्यापक) स्त्रियांचा कपडालत्ता, दागदागिने इ. २.स्त्रियांसाठी घ्यायची वस्त्रे. ३. स्त्रियांचा (वेणीफणी, लुगडे नेसणे इ.) वेशभूषेचा विधी; वेणीफणीचे साहित्य; शृंगारसाज.४. (बायकी) सौभाग्यवती स्त्रियांना देणगी म्हणून ज्या वस्तू देतात त्यांना समुच्चयाने चोळीबांगडी म्हणतात. सुवासिनीला चोळी व बांगडी ही कमीत कमी देणगी होय. ५. माहेरपण. (क्रि. करणे.) ६. ज्याचे पती सरकारी कामात मृत्युमुखी पडले त्या स्त्रियांना सरकारातून मिळणारी पोटगी; इनाम उत्पन्न. ७. इनाम (सौभाग्यवती स्त्रीला). ८. बहीण मानून दिलेला आहेर वगैरे; (उपहासार्थी) जामानिमा. (व.)

**चोळे** न. चौल; जावळ काढून शेंडी राखण्याचा संस्कार; चूडाकर्म : 'भरली अडीच वर्षे चोळेंकरिती।' – वसागा १०. [सं. चौल]

**चोंग(गा)ई** स्त्री. पुरुषाचे जननेंद्रिय. [हिं.चोंगा]

**चोंगा** पु. रोटासारखा एक खाद्यपदार्थ (मुसलमानात रूढ) : 'आता ती (शानो) चपात्यांचे चोंगे बनवत होती.'- अंअ ११५. (कर.)

**चोंगा-गी, धा** पु. १. चार बोटे रुंदीचे माप; हाताच्या पंजाच्या रुंदीचे माप; चोंगा. २. दोन पंजाच्या रुंदीइतक्या काठीचे माप; आठ अंगुले. (को.)

**चोंगे** न. चिलीम; चुट्टा. [क.]

**चोंट(ड)के** न. गोंधळी, शाहीर इत्यादिकांचे एका तारेचे तंतुवाद्य; एकतारी; तुणतुणे : 'आम्ही दैवाचे शेतकरी रे या गाण्यात आलेले चोण्डके त्या दृष्टीने उल्लेखनीय आहे.' -प्रका ११६ पहा : **चौंडके**

**चोंडक** पु. तुणतुणेवाला.

**चोंडके** न. तोंड.

**चोंडण** न. सोडण; नारळावरील तंतुमय आवरण. पहा: **चोड १**

**चोंडा** पु. भाताच्या रोपांची जुडी, झुपका. (को.) पहा : **चोंढा**

**चोंडा** पु. गवताचा पेंढा आत भरून केलेली प्रतिकृती, पुतळा : 'एथें एका रायाचे नवघट द्रव्या असति : चोंडा रायाची वरी बैसली : तेंये एथचि पुरिली :' - लीचपू २.३१६.

**चोंढ-ढा-ढी-ढे** पु.स्त्री. न. १. बांध घातलेले भाताचे खाचर. २. खाच; खळगा : 'जयजय देवी श्रीदुंढे। क्षणें घालिशी विश्व चोंढें।'- स्वादि १.४.१६. ३. पाण्याचा डोह; गर्ता; खोल पाणी : 'चोढिये पाथरु गेला। तैसेनि जो बुडाला।' - ज्ञा १३.५४९.

**चोंढणे** सक्रि. चिकटवणे.

**चोंढी** स्त्री. जेथे मोट बुडते अशी विहिरीतील खोल जागा : 'गोपाळ चोंढीए लपवणें' -लीचपू ५३ ( शीर्षक).

**चोंढोळी** स्त्री. विटाळ, हस्तस्पर्श इ. दोष; चबढब. (व.)

**चोंद** स्त्री. जखम; व्रण. (व.) [सं.चुद्]

**चोंदडणे** सक्रि. खुपसणे; जोराने शिरकावणे.

**चोंदणी** स्त्री. चोंदण्याची क्रिया.

**चोंदणे, चोंदडणे** उक्रि. १. कोंदणे; कोंदून जाणे.२. ठासणे; ठासून भरणे. ३. (चिंध्यांनी, बोळ्यांनी) बुजविणे; बंद करणे; बुजणे; बंद होणे. [सं.चोदन]

**चोंदणे** सक्रि. बंद होणे; अडथळा करणे; साकळणे; कोंदणे.

**चोंदळणे** सक्रि. १. पायाखाली तुडवणे; मळणे. २. पायांनी तुडवून पाणी गढूळ करणे; ढवळणे; गाळ करणे.

**चोंदा-दी** पु. स्त्री. १. भोक बुजविण्यासाठी उपयोग केलेल्या चिंध्यांचा, चिरगुटांचा बोळा, दट्ट्या; बंदुकीत ठासलेल्या चिंध्यांचा गोळा. २. बंदुकीत चिंध्या ठासण्याची, भोकात चिंध्यांचा दट्ट्या बसवण्याची क्रिया. ३. (ल.) कोंडमारा : 'सगळ्याकडून आमची चोंदी.' - रथचक्र. (वा.) **चोंदी घालणे, देणे, बसणे, बसवणे** - चिंध्या इत्यादिकांचा दट्ट्या देऊन बंद करणे; (तोंडात) बोळा कोंबणे.

**चोंदाट(ड)णे** पहा : **चोंदणे**

**चोंदान** स्त्री. व्रण, जखम.

**चोंदी** स्त्री. फसवणूक; लुबाडणे. (क्रि. देणे, बसणे.) (वा.) **० देऊन जाणे** - (ल.) (एखाद्याला लुच्चेगिरीने) फसवून पळून जाणे; मुंडणे; डोक्यावर हात फिरवून जाणे.

**चोंधळा** वि. डोळ्याने अधू; मिचक्या, मिचमिच्या डोळ्यांचा. [हिं.चोधला]

**चोंबट(ड)पणा** पहा: **चोंबडेपणा**

**चोंबडकी, चोंबडे चाळे** स्त्री. १. लांडा कारभार; लुडबुडेपणा. २. सांगोसांगी; लुतरेपणा; इकडची गोष्ट तिकडे करणे. ३. चहाडी; चुगली; निंदा.

**चोंबडचोतरेपणा** पु. चहाडखोरपणा; लुडबुडेपणा; चुगलखोरपणा.

**चोंबडा** वि. १. लावालावी करणारा; चुगलखोर; चहाडखोर; इकडचे तिकडे आणि तिकडचे इकडे करणारा. २. उगाच लुडबुड करणारा; लुब्रा; लांडा कारभार करणारा. ३.कोडगा. [सं.चुब]

**चोंबडाचाटू** वि. १. लाळघोट्या; थुंकी झेलणारा; हांजी हांजीखोर; नाचरा. २. लुडबुड्या; लांडा कारभारी. ३. चुगलखोर; चहाडखोर.

**चोंबडेपणा** पु. १.चुगलखोरपणा; चहाडखोरपणा; लुडबुड. २. संबंध नसता बोलणे; इकडचे तिकडे जाऊन सांगणे. ३. मध्येच बोलणे; चहाडी करणे.

**चोंबणे** उक्रि. (छिद्रात) बोळा देणे; दट्ट्या बसवणे; चोंदणे. [सं.चुंब]

**चोंब(बा)ळणे, चोंभळणे** उक्रि. (शरीर, भांडे इ.) तेलाने माखणे; चोळणे; तेलाने मर्दन करणे; कुरवाळणे.

**चोंबळाचोंबळ** स्त्री. परस्पर, सार्वत्रिक फसवाफसवी; फुसलावणी; घुलावणी.

**चोंबा** पु. १. तोंड बंद करण्याकरिता तोंडात कोंबलेली वस्तू, बोळा; एखाद्या भोकात दट्ट्याप्रमाणे कोंबलेला चिंध्यांचा गोळा. (क्रि. देणे, घालणे, बसविणे.) २. गाठ, गुच्छ, झुबका, जुडी; केस, पाने, गवत इ. वस्तूंचा ( खोगीर इत्यादिकात घालण्याकरिता केलेला) गड्डा, गट्ठा.

**चोंबारा** पु. चवाठा.

**चोंबी** पहा : **चोंदी**

**चोंभय** स्त्री. चुंबळ : 'सोनानी घागर मोतीनी चोंभय जनीनी पहिली खेप नामदेवानी अंघोय'- जलोसा ६०४. (अहि.)

**चोंभा** पहा : **चोबा-भा**

**चोंभाळणे** पहा : **चोबाळणे**

**चोंवा** वि. शुष्क, निस्तेज.

**चॉकलेट** न. कॅकाओ या वृक्षाच्या बिया भाजून त्यांच्या भुकटीपासून तयार करण्यात येणाऱ्या गोड वड्या, मिठाई इ. : '१९४१ साली एका भारतीय कंपनीने ... चॉकलेट व कोकोबटर बनवण्याचा पहिला कारखाना सुरू केला.' - मिखा १६.

**चॉळ** न. अनपेक्षित लाभ. (कु.)

**चाँच** न. १. आंब्याच्या बाठीस किंवा सालीस असणारे बारीक तंतू. २. सुंगटाच्या अंगावरील खवले. (कु.)

**चौ** वि. १. चार. या शब्दाचा उपयोग समासातच अधिक करतात : 'जेवीं मदोन्मत्त हत्ती। चौ दंतांचें।'- कक १.१३.९५. २. (सांकेतिक) चार वेद : 'तो हा पंढरीचा राजा। पुसा सहा चौ अठरां जणां।' - तुगा २५३९. [सं.चतुर्]

**चौ चा आंकडा** आसनमांडी.

**चौक** पु. १. चौकोनी अंगण, जागा. २. चौसोपी वाडा; घराचा, मंदिराचा चौकोनी मध्यभाग; देवळांतील गाभाऱ्याच्या समोरील सभामंडपातील खांबांमधील चौकोनी जागा. ३. चवाठा; चार रस्ते येऊन मिळतात अशी शहरातील चौकोनी जागा. उदा. मोतीचौक, टिळकचौक; शहरातील मोठी पण मोकळी उघडी जागा (या ठिकाणी बाजार भरतो, चावडी असते). ४. लग्नादी मंगलसमारंभात पाटपासोड्यावर गहू, तांदूळ यांनी काढलेला चौकोन : 'चौक भरियेला आसनीं। पाचारिली कुळस्वामिनी।'– तुगा २८२. ५. चौकोनी कापड; रुमाल : 'मेणकापडाचे चौक.'– प्रसूतिकृत्यादर्श ११.[सं.चतुष्क] (वा.) ० भरणे – पहा : **चौकपासोडा. सातव्या चौकात बसणे** – १. (घराच्या) अतिशय आतल्या भागात, खोलीत बसणे. २. भेट, दर्शन अगदी दुर्लभ होईल अशा प्रकारे राहणे.

**चौक** अ. चौकोनी तलाव.

**चौक** पु. १. चारी पाय उचलून भरधाव पळण्याची घोड्याची चाल : 'जरा घोड्यावाणी चौक टाक.' – चंग्र ९१. २. चांगला घोडा. [सं.चोस्क]

**चौक** पु. लावणीतील अंतरा; पोवाड्यातील कडवे, एक भाग; एक छंद. [सं.चतुष्क]

**चौक** पु. फाशावरील चार ठिपक्यांची संख्या; चारांचे दान. [सं.चतुष्क]

**चौक** पु. रांगोळीचा एक प्रकार; नानाविध रंगांनी काढलेली वेलींची मालिका : 'सदैवीं जेथ अपुलां हातीं। चौक भरिले निगुती।'– ऋव ७३. [सं.चतुष्क]

**चौक** पु. (मनुष्याच्या) कमरेवरचा पाठीचा भाग; (पशूंचे) ढुंगण. [सं.चतुष्क]

**चौक** पु. १. चौकडा; मुलांच्या कानातील एक दागिना. २. (सोनारी) ठुशीचा एक भाग; चार पदरी मोत्यांची माळ : 'मुक्ती साम्राजीं सेश चौकु : कवणा भरीला ?'– भाउगी १९. (बे.) [सं. चतुष्क]

**चौक** पु. शिमग्यातील रात्रीचा जलसा. (बे.) [सं.चतुष्क]

**चौक** पु. चौकट. (कु.) [सं.चतुष्क]

**चौक** अ. चोक; संख्येची चौपट दर्शविणारा शब्द. उदा. तीन चौक (चोक) बारा. [सं. चतुःकृत्वा; सं. चतुष्क]

**चौक** पु. (आट्यापाट्या) दोन पाट्यांचा अर्धा भाग व सूर यांनी मर्यादित भाग.

**चौक** स्त्री. संबळ वाजविण्याची काठी.

**चौकचाकर** पु. सोंगट्याच्या खेळातील एक पारिभाषिक शब्द.

**चौकचारी** पु. चौघाचारी; समाईक हक्क : 'त्यातील वहिवाट गुरवाहाती करून उत्पन्न होईल ते चौकचारी वडलाचे वडीली मुलगांवकरांचे विद्यमानें श्री कडे खर्चवेंच करून उस्तवारी करीत असावे.'– ऐको ३८९.

**चौकट** स्त्री. १. चार लाकडे चांगली तासून टोकांशी काटकोनात सांधून, जखडून बनवलेला चौकोन. उदा. दाराची, खिडकीची, तसबिरीची चौकट. (सामा.) चार तुकडे जोडून जोडून सांधून केलेली चौकोनाकृती; चार कडा, बाजू असलेली वस्तू. २. मोट ज्याला बांधलेली असते तो चार लोखंडी पट्ट्यांचा सांगाडा. ३. चौकोनी मोकळी जागा; चव्हाटा; देवळातील, घरातील चौक इ. ४. लक्ष वेधावे म्हणून चौकटीत दिलेला मजकूर. [क. चौकट्ट]

**चौकट** स्त्री. १.मारका, जखीण, कलखंबा व समंध या भुतांचा जमाव, चौकडी. २. चार दुष्ट माणसांचे टोळके. [सं.चतुष्क]

**चौकट** स्त्री. चौकोनी लाल रंगाचे ठिपके असलेले पत्त्याचे पान.

**चौकट** स्त्री. बाजू; संबंध; अर्थबंध; परिमाण : 'आपल्या कथावस्तूंभोवती ते संदर्भाच्या निरनिराळ्या चौकटी (कॉन्टेक्स्ट्) निर्माण करतात.'– खपा २७८.

**चौकट आकाशग** (विअ.) वातावरणातून येणारी प्रारणे किंवा विद्युत्चुंबकीय लहरी ग्रहण करणारा चौकटीच्या आकाराचा वाहक.

**चौकट नक्षी** (स्था.) दरवाजा अथवा खिडकीच्या सभोवती चौकट व भिंत यांतील सांधा झाकण्यासाठी केलेली उठावाची नक्षी.

**चौकट पांढरी** (विणकाम) लुगड्यातील एक प्रकार; फणीची तीन घरे काळा ताणा व एकघर पांढरा ताणा अशी उभार व आडवणही त्याचप्रमाणे विणून केलेले लुगडे.

**चौकटा** पु. १. हत्तीवरील एक प्रकारचा हौदा : 'श्रीमंत राजपुत्र स्वारींत जात असल्यास त्यांच्याकरितां शिकारी चौकट्यासह हत्ती... पाठवावा.'– डुशि १५. २. चौकडीची गाडी.

**चौकटी** दरवाजाची चौकट.

**चौकटीचे मरण** (मारका, जखीण, तळखंबा व समंध या) चार भुतांनी पछाडल्यामुळे ओढवलेले मरण.

**चौकड** स्त्री. चौकट. घाण्याच्या तोंडावर बसवायची चौकट. हिच्यावर घाणा हाकणारा बसतो व घाण्यात गळित सारणे, लाटीवर पाणी शिंपणे, बैल हाकणे इ. कामे करतो. (राजा.)

**चौकड** स्त्री. चार घरे एकत्र येऊन होते ती; एकमेकांना, परस्परांना लागून असलेल्या घरांचा समूह : 'मी लहान असतांना आमचे घर व चौकड...भरलेली असे'– माजीया ९.

**चौकडणे** अक्रि. उड्या मारणे : 'पुढा चौकडत कस्तुरी मृग।' – नरुस्व ७४५.

**चौकडा** पु. १. पुरुषांचे एक कर्णभूषण; चार कुडक्यांचा समुदाय. २. नथेतील किंवा डुलातील चार सारख्या मोत्यांचा समुदाय. [का. चौकळि]

**चौकडा** पु. घोड्याचे चारी पाय उचलून भरधाव धावणे.

**चौकडा–डी** पु. कापडांचा आठ नगांचा समुदाय; चोवीस मुट्टे किंवा तोबे. (कर.)

**चौकडा–चौकडी** पु. स्त्री. चार वस्तूंचा समुदाय (चार कागद, नाणी, मोती इ.). एकमतांच्या चार मनुष्यांचा समुदाय. उदा. चांडाळचौकडी. कापडावरील, लुगड्यावरील चौकट; आडव्या-उभ्या रेषा; चतुरस्र चिन्ह. दोन जासूद जोडे एकदम पाठविले म्हणजे त्याला चौकडा म्हणत : 'सतरा सफरची आज्ञापत्रे पाटिलबाबांचे चौकड्याबरोबर डिगेच्या मुक्कामी पावली.' – मशियाका ४६९. (वा.) ० **भुलणे, गुंग होणे** – मोहून, भुलून जाणे; भांबावून जाणे; बावचळणे; गोंधळणे.

**चौकडी** स्त्री. हरिणांचे बागडणे; हरिणाची उडी.

**चौकडी** स्त्री. चार युगांचा समुदाय; कृत, त्रेता, द्वापार व कली या युगांचा मिळून होणारा काल. उदा. चौदा चौकड्यांचे राज्य.

**चौकडी** स्त्री. संगीतातील चीज : 'असे शिष्य एके ठिकाणी जमले म्हणजे एकेक रागाच्या 'चौकड्या' कोणाला किती येतात याची एकमेकांत पूसतपास होई.' – अस्ताई ३८.

**चौकडीची गाडी** चार घोड्यांची गाडी, बग्गी, रथ : 'स्वारीबरोबर पिछाडीस एक चौकडीची गाडी ठेविणें' – ऐरापु ५१०.

**चौकडे–डो** क्रिवि. चोहोबाजूंना; चहूकडे. पहा : **चोहोकडे** : 'चौघे चौंकडे वोढिती। येक ते झोंकून पाडिती।' – दास ३.८.२४.

**चौकडे** न. संबळ वाजविण्याची वाकडी काठी. (राजा.)

**चौकणी, चौकणी चिरा** पहा: **चौकोनी**

**चौकणे** अक्रि. (घोडा इ.ने) चौक टाकीत चालणे, नाचणे, बागडणे.

**चौकनहाण** न. लग्नसमारंभात विहिणीला, वराच्या आईला, मखरात बसवून थाटाने घातलेले स्नान.

**चौकपासोडा** पु. १. मंगलकार्यात चौरंगावर, पाटावर शाल इ. घालून त्यावर गहू, तांदूळ यांचा चौकोन काढून बटूला, वराला, वधूला, त्यांच्या आईवडिलांना बसण्याकरिता केलेले आसन. पहा : **चौक** ४. २. मुलींचा एक खेळ; पासोडी पांघरलेल्या मुलीला आवाजावरून ओळखणे. (कऱ्हाड).

**चौकफेर** पु. आट्यापाट्यांच्या खेळात खेळणाऱ्या गड्यांनी एका अर्ध भागातून दुसऱ्या अर्धभागात जाणे.

**चौकला** पु. चार मात्रांचा समूह : '... चार चार मात्रांच्या चार चौकलांपैकी.'– मसं ११२.

**चौकशी–सी** स्त्री. १. काळजीपूर्वक विचारपूस; निर्णयाविषयी पुरतेपणी विचार, परामर्श. २. शोध; तपास; छडा, पत्ता लावणे; पडताळा पाहणे. ३. न्यायालयात होणारे गुन्ह्याबाबतचे कामकाज. [हिं.] (वा.) ० **ठेवणे** – १. देखरेख असणे; व्यवस्था पाहणे. २. काळजी घेणे; तपासणी करणे.

**चौकशीस बट्टा** टाकसाळीत खरी खोटी नाणी तपासून घेणारा अधिकारी तो 'चवकशी'. अशा अधिकाऱ्यानेच आपले काम करताना पुन्हा त्यात आपला बट्टा म्हणून काही निराळी घेतलेली लाच.

**चौकशी समिति** (शाव्य.) एखाद्या प्रकरणाची शहानिशा, तपासणी करण्यासाठी नेमलेली समिती.

**चौकस** वि. १. तरतरीत; चाणाक्ष; चतुर; धोरणी. २. विचक्षण; चौकशी करण्यात कुशल; शोधक; जिज्ञासू : 'सारा असारा निवडूनि चौकस द्विजांत जे निर्मळ मानसौकस।' – मोकृष्ण ६९.३३ [का. चौकिसु, हिं] ३. सावध; दक्ष. ४. स्पष्ट; निश्चित : 'जुन्या कारकीर्दीत कारखान्याचे चौकस विभाग झालेले नसल्यामुळे त्यांच्या हकीकतीची ' – ऐरा प्रस्ता ३.

**चौकसणे** उक्रि. १. शोधणे; तपासणे; छानणे. २. परीक्षणे; पारखणे; कसाला लावणे.

**चौकसदार** वि. १. धूर्त; शहाणा; शोधकबुद्धीचा; धोरणी; चतुर; विचक्षण. २. चौकशी, तपास, शोध करण्यास नेमलेला, लावलेला (मनुष्य, चाकर). ३. तपासनीस; पाहणी करणारा; देखरेख ठेवणारा.

**चौकसनीस** १. वि. तपासनीस; २. पहारा करणारा; देखरेख करणारा. [हिं.]

**चौकसभावली** स्त्री. नको त्या चौकशा करणारी : 'काय काय पद्येनं तुला सांगितलं ? पद्मा बरीच चौकसभावली दिसते !' – रूरा २४.

**चौक(का)ळ** स्त्री. रेलचेल; सुकाळ; चंगळ; विपुलता. (कुण.) वि. विपुल; पुरून उरण्याइतका; भरपूर. पहा : **चेकळ**

**चौका** पु. स्वयंपाकासाठी साफ केलेली व सारवलेली चौकोनी जागा : 'आपला आमचा चौका निराळा, सगळें निराळें.' – सूर्यग्र ११३.

**चौका** पु. जरब; धाक; अंमल: 'तीनशे हबशी व्यंकाजीपंतीं मारिले. घोडे पाडाव केले... असा चौका बसवून आलें.'– छशिब ६४.[हिं.चौक]

**चौका** ठाणे, बस्तान (क्रि. बसविणे).

**चौकाटणे** न. उभ्या फुलीच्या आकाराचे लाकडी चिन्ह; क्रॉस.

**चौकाबासन** न. स्वयंपाकपाणी. पहा: **चौका**

**चौकार** पु. (क्रिकेट) जोराचा फटका मारून चेंडू सीमापार गेल्यामुळे न धावताही फलंदाजाला मिळणाऱ्या चार धावा : 'त्याने एकदम चौकारच हाणला.'– वावारू ४३.

**चौकी** स्त्री. तन्मण्याचा मधला रत्नजडित भाग : 'चार अंगुळें चौकि पाचुची.' – मला १४७.

**चौकी** स्त्री. १. शहराच्या, रस्त्याच्या विशिष्ट भागात चोर, भामटे इत्यादिकांच्या बंदोबस्तासाठी ठेवलेली शिपायांची तुकडी : 'हे स्वयंपाक करून जेवतात तो चौकी आली.'–स्वप १४९. २. पहाऱ्याकरिता, बंदोबस्ताकरिता ठेवलेल्या पोलिसांचे ठाणे; गेट; नाके. ३. पहारा; राखण : 'तयाभोंवती चौकी बळकट।' – दावि ३९१. ४. देवडी; आल्यागेल्याची चौकशी, वर्दी जेथे होते ती जागा; पहारा. ५. मांड; ठाणे; बैठक : 'जव माणकोबांनीं चौकी मांडुनी। सभोंवतीं भावें रंग भरूनी।' – दावि ७८६. [सं.चतुष्किका](वा.) ० **देणे** – पहारा करणे; राखण करणे. ० **बसविणे** – अंमल बसविणे; पहारा ठेवणे : 'तुम्ही विशाळगडाखालीं चौकी बसविली आहे म्हणून वर्तमान आइकोन स्वामी संतोषी जाले.' – शारो १.१८.

**चौकी** पहा : **चोक**

**चौकी** स्त्री. (वीणा इ. तंतुवाद्यांतील) घोडी; तारदान; अट.

**चौकी** स्त्री. १. चौरंग; घडवंची; देव वगैरे ठेवण्यासाठी केलेली लाकडी, चौकोनी बैठक; आसंदी; खुर्ची; चारपाई; तक्त : 'मुकुट काढुनी मस्तकिं वरले। चंदनचौकीवरि विस्तारिले।' – अमृत ३१. २. घराची ओसरी. ३. घरातील चारी बाजूंनी पडव्या असलेला चौक : 'तेया-ते दोनी चौकीया होतीया' – लीचपू १७६.२. ४. बिऱ्हाड : 'तिघां भाउवांचिया तीन चौकीया : एकचि जोतें '– गोप्रच ३०३ [सं.चतुष्किका]

**चौकी** स्त्री. चार ध्रुपदांचा समुदाय.

**चौकी** स्त्री. (बायकी) प्रकार; विधी; संस्कार : 'चवथ्या दिवशीं चवथी चौकी। बाळबाळंतिणिचीं न्हाणी हो होती।' – पाळणे ३.

**चौकी** स्त्री. (माणसाचे, मुलाचे) दुधाचे दात; पुढले दात; पदार्थ फोडण्याच्या उपयोगी चौकडीचे दात. हे प्रत्येक जाभाडात चार असे एकंदर आठ असतात : 'कर्णी कुंडले तळपती लघुदंत चौकीचे

झळकती।' - हरी वि ४.१७२.

**चौकीदार** पु. पहारेकरी; रखवालदार; चौकीवरील शिपाई : 'नजीबखान रोहिला याणे चौकीदारांचा शिरच्छेद केला'- भाब २९.

**चौकीदारी** स्त्री. १. पहारा ठेवण्याचे रखवालदाराचे काम. २. पहारा ठेवण्याबद्दलचे वेतन. ३. चौकीदारासाठी गावकऱ्यांवर बसविलेला कर.

**चौकीप(पा) हारा, चौकीपाहरा** पु. राखण; रखवाली; बंदोबस्त. (क्रि. असणे, होणे, करणे.)

**चौकूट** न. नेहमी एकत्र असणारा चार ठरावीक लोकांचा समूह :

**चौकेर** स्त्री. वाड्यातील चौक : 'पुढची ओसरी व एक खोली ओलांडून आत जावे तर समोर चौक; राजांगण. याला गोव्यात चौकी किंवा काही चौकेर म्हणतात.'- अहागो २४६.

**चौकोण-न** पु. चार बाजू असलेली सरळरेषाकृती; चार कोनांनी युक्त अशी आकृती. [सं.चतुष्कोण]

**चौकोन-नी-ण-णी, चौकून- नी** वि. चार कोन, कोपरे असलेला (दगड, जमिनीचा भाग, आकृती इ.).

**चौकोनांवचे** सक्रि. पदार्थ चौकोनी करणे. (गो.)

**चौख** पु. भिंतीत बसविलेले कपाट. (गो.)

**चौख** वि. परीक्षक; तज्ज्ञ : 'वरील टीकाकार यांस मराठी भाषेचे चौख कोणी नेमले हेंही आम्हांस कळत नाहीं.'- नि ९१८.

**चौखई** स्त्री. सागरगोटे खेळातली एक खेळी; चार खडे एकदम झेलणे: 'त्याचा खडा पडला म्हणजे चौखईवर जरी डाव आला असला तरी तो सर्व डाव देवाला देऊन पुन्हा पहिल्यापासून डावाला आरंभ करी'- स्मृतिचित्रे ७.

**चौखडें** वि. शुद्ध; स्वच्छ; उत्तम : 'सोने होए सगीर चौखडें'- मूप्र ५२८. [सं.चोक्ष]

**चौखणी** वि. १. चार मजली (इमारत इ.). २. चार खण, भाग असलेले (घर); चार खणांचे घर.

**चौखर** पु. १. सोंगट्यांचा पट. २. चौरस्त्याची जागा; चौक. (व.)

**चौख(खु)रणे** सक्रि. जखडून बांधणे; चारी बाजूंनी ताणून बांधणे. पहा : **चौखारणे** : 'पार्था तें गा तम। रचूनि ऐसें वर्म। चौरी देहात्म। मानियातें।'- ज्ञा १४.१७७.

**चौखंड** वि. चतकोर; पाव. (व.)

**चौखंड** पु. सुपारीच्या घडाला वेष्टणाऱ्या सालीचा केलेला द्रोण; फागोट्याचा किंवा विरीचा द्रोण. (गो.)

**चौखंदा** पहा : **चौखुंदा**

**चौखाणी** स्त्री. अंडज, जारज, स्वेदज, उद्‌भिज : 'चौखाणीचे प्राणी असती... असंख्यात।।' - दास १५.९.१

**चौखार** पहा : **चौखुरी**

**चौखारणे** उक्रि. घट्ट आवळणे; ताणणे; ओढणे (विशेष जोर आणण्याकरिता इतर क्रियापदासह योजतात. उदा. चौकारून बांधणे, कसणे, आवळणे, ओढणे इ.).

**चौखांबा** पु. देवासमोर उभे राहून शपथ घेण्याची जागा. (राजा.)

**चौखांबी** वि. १. चारच खांबावर आधारलेली २. देवळाचा गाभारा (हा बहुधा चार खांबांचा असतो). (राजा.) ३. मूर्ती असलेल्या गाभाऱ्याच्या पुढील जागा; सभामंडप; मंडपी.

**चौखि** स्त्री. देवडी : 'कुमराचें रूपडें केलें। द्वार चौखियांतु स्थापिलें।' - क्रिपु ८८

**चौखी** स्त्री. अंगणाच्या चारी बाजूंना असलेली छपराखालची जागा : 'राज अंगण असलेली चौखी.'- अआमागो १९.

**चौखी** ओटा : 'माझी आई ओट्यावर (चौखी) उभ्याने -'- प्रिस्मृग्रं ११.

**चौखुरणे** अक्रि. (वासरू, शिंगरू) चार पांढऱ्या खुरांनी युक्त असे जन्मणे.

**चौखुरी** स्त्री. बाज; खाट.

वि. चतुष्पाद; चार पाय, खूर असलेला (प्राणी, पशू).

क्रिवि. १.चार खुरांच्या बाबतीत, विषयी; चार पांढऱ्या खुरांनी (युक्त जन्मणे). (क्रि. उतरणे.) २. चारी पाय उचलून.

**चौखुरे** न. खावयास योग्य असा चार पायांचा प्राणी; चतुष्पाद खाद्य प्राणी. उदा. बकरा इ. (कु.)

**चौखुंट** क्रिवि. चारी दिशांना व्यापून (जहागीर इत्यादी); चोहोकडे; सर्वत्र. पहा : **चारखुंट**

**चौखुंटी** स्त्री. बाळंतपणाच्या चौथ्या दिवशी करावयाचा विधी.

**चौखुंटीमार** पु. एखाद्या माणसास पालथे पाडून, चार खुंटास हातपाय बांधून पाठीवर दिलेला मार (चोर, दरोडेखोर पैसे काढण्यासाठी असला मार देतात).

**चौखुंदा** पु. (कापड, कागद, जमीन इत्यादिकांचा) चौकोनी तुकडा : 'वर्तुळाकार क्षेत्रासी पाही। मध्ये चौखुंदा लवलाही।' - पैमा.

वि. रुंद; प्रशस्त; मोठा; ऐसपैस. उदा. चौखुंदा रस्ता, चौखुंदा मार्ग, चौखुंदा चिरा, चौखुंदी छाती इत्यादी.

**चौखूर** क्रिवि. एकदम चारी पाय उचलून (उडी मारणे, पळणे इत्यादी); चौखुरी (क्रि. उडणे, धावणे, उडी मारणे, टाकणे.) : 'चौखुर निघे त्वेषाची। घोड दौड संताजीची।'- मसंगी १६. [सं.चतुर+क्षुर] (वा.)

० **दूध काढणे** - गाई म्हशीच्या चारी सडांतील दूध काढणे.

**चौगण** स्त्री. ठाईच्या, स्थिरतालाच्या चवथ्या हिश्श्याइतका काल. मूळ तालाच्या चौपट जलद ताल : '(पखवाजीस) सर्व तंतुवाद्यांची आणि नाचणाराचीहि साथ तोडा, दुगण, चौगण सुद्धा करता आली पाहिजे.'- कखा १९.

**चौगर्द-र्दा** क्रिवि. चोहीकडून; सर्व बाजूंस; चोहोबाजूंनी (पाऊस इ. येणे).

**चौग(गु)ला, चौगु(घु)ला** पु. एक गाव कामगार; वतनदार अधिकारी; गावाच्या बारा बलुत्यांपैकी एक; गावपाटलाच्या हाताखालील एक कामगार. : 'साधारणतः पाटील...चौगुला... सनगर... डौऱ्या... घुडसी... तराल किंवा कोरबु... वगैरेंना अठरा नारु किंवा आलुतदार म्हणतात.'- गांवगाडा १०.

**चौग(घ)ला** ग्रामनेता; चौगुला. [हिं.]

**चौगस्त** न. चार वर्षामागील वर्ष.

**चौ(ग)गान** न. मैदान; पटांगण : 'तेणें घोडा फिरविला चौगानांत।' -

शमा ९६. [हिं.]

**चौगाना** स्त्री. एक अलंकार : 'हातीं चौगाना बर्वी। रत्नजडीत सुहावीं।'- चेंडुफळी १९.

**चौगी(गि)र्द** क्रिवि. चारी बाजूंनी : 'एकाएकीं उडी घालूं नये. दुरूनच चौगीर्द घेऊन भांडियांचा मार देत असावें'- मराजा ३६. (वा.) ० **करणे** - चारी बाजूंनी वेढणे. 'सर्व सरदार येऊन हैदरास घेऊन चौगिर्द केले.'-ऐलेसं १७९७

**चौगुण** वि. १. चौपट; चतुर्गुण. २. चौथा गुण जो शुद्ध सत्त्व गुण त्याने युक्त असा : 'येती पाणीया मिळोनि जगजेठी। चेंडु चौगुणा खेळता वाळवंटी।' - तुगा १३५. ३. चार पदरी किंवा चव्हेरी (वस्त्र) : 'मग दुणें केलें : चौगुणें केलें : मग या श्रीचरणावरि ठेविलें :' - लीचउ १५. [सं.चतुर+गुण]

**चौगुणित-चौगुणी** वि. चार पटीने; चौपट; चतुर्गुणित.

**चौघडा** पु. १. देवालयांतून, राजवाड्यातून नित्य चार, चार घटकांनी वाजविण्याकरिता काल्, नगारे, नौबती, सूर, सनई इत्यादी वाद्यांचा संच. प्रत्येकी दोन याप्रमाणे दोन मनुष्यांनी वाजवावयाच्या चार नगाऱ्यांचा समुदाय. यांपैकी दोन नगारे व दोन टिमक्याझिला असतात. यावरून नौबती, सूर, सनई इत्यादी वाद्यांच्या समुदायासही हाच शब्द लावतात: 'झडतो नामाचा चौघडा।'- भज ६३. २. एक मान (चौघडा बाळगण्याचा). हा मराठी राज्यात विजयी सरदारास मिळे, त्याबद्दल सरकारातून त्यास सालीना १२०० रु. ची नेमणूक मिळे. [सं.चतुर + घटि] (वा.) ० **आखर होणे** - अखेरचा चौघडा वाजणे. तळावरून कूच व्हावयाच्या दिवशी अंतराअंतराने तीन चौघडे वाजत. शेवटचा चौघडा वाजल्यानंतर तळावर कोणीही असता कामा नये असा रिवाज असे. ० **वाजणे** - (कर्त्यांची षष्ठी). (ल.) एखाद्याची बदनामी होणे.

**चौघडा, चौघड्याची अवटी** पु. सोन्याचांदीच्या पत्र्यावर ठसे उमटवण्याचे सोनाराचे एक साधन.

**चौघडी** स्त्री. पातळ, लुगडे इत्यादींची चौपदरी घडी : 'रंगुआजी पुढल्या सोप्यात चौघडीवर अंग टाकीत.'- हपा १०३.

**चौघडी-ड्या** वि. चौघड्यातील नगारा व झील वाजविणारा.

**चौघाचार** पु. लोकांच्या तळतळाटाचा, अभिशापाचा भोवणारा परिणाम; (लहान मुलाला लागणारी) लोकांची दृष्ट. (क्रि. बाधणे.)

**चौघाचार** पु. (एखाद्या वस्तूवरील) पुष्कळांची मालकी; सामाईक हक्क; सार्वजनिक सत्ता.

**चौघाचार** पु. १. सामान्य व्यवहार, आचार; लोकरीती. २. चौघांनी केलेला न्याय; पंचाईत; निवाडा : 'राखिला हा होता बहु चौघाचार। साक्षीनें वेव्हार निवडिला।' - तुगा १२१७.

**चौघुलपणा, चौघुलकी** पु. स्त्री. चौगुल्याचे काम, अधिकार.

**चौघे-घी** वि. पु. अव. १. चारजण; चार आणि चौघे या दोहोंच्या अर्थात थोडासा फरक आहे. चार शब्द सर्वांसाठी वापरतात परंतु चौघे हा शब्द सजीव प्राण्यास उद्देशून - विशेषत: मनुष्यांस उद्देशून वापरतात. २. थोडे; तिघे-चौघे; तीन-चार. ३. जग; जनता; समाज; लोक; जन. उदा. चौघांचा विचार, बुद्धी, रीत. ४. (सांकेतिक) चार वेद : 'न मनी चौघांचीं उत्तरें। उपवासें नावरे।' - ऋव ४४. ५. चार देह; सूक्ष्म, स्थूल, कारण व महाकारण देह; शरीर: 'राजस विठाबाई माझें ध्यान तुझे पायीं वो। त्यजूनियां चौघांसी लावी आपुलिये सोई वो।'-तुगा २८९. ६. चार मुक्ती : 'चौघी जणी तटस्थ पाहती। स्वरूपस्थिती न वर्णवे।' - हरिवि ३.२. ७. चार वाचा (परा, पश्यंति, मध्यमा, वैखरी) : 'कृष्ण वर्णुनिया श्रेष्ठ। चौघे गर्जताती भाट।'- एरुस्व ६७६. [सं.चतुर्] (वा.) **चौघात बसणे** - लोकात, समाजात वावरणे, वागणे; लौकिक राखणे. **चौघांवर तान घेणे** - १. लोकमत झुगारून देणे; जनतेचा, समाजाचा निर्णय धाब्यावर बसविणे; लोकांवर ताण करणे. २. अधिक उंच तान, लकेर घेणे.

**चौघेरा** वि. (विणकाम) दोन फणीच्या दोन तारा घेऊन दाट विणलेले.

**चौचक** न. कवाड; दाराच्या फळ्या; झडपा : 'नवद्वारांचिया चौचकीं। बाणूनि संयतीची आडवंकी।' - ज्ञा १२.५२.

**चौचाकी** स्त्री. चारचाकी गाडा : 'जेजुरकर सुतार चौचाकी नीट करावयासी आले. त्यास तिवट १ रु. १३३ बाभळा खरेदी केल्या. चौचाकीस व तर्फास खाणीवर ४२.' - पेद ३१.११८.

**चौचाकी पांढर** १. गाव; गावकरी; गाववस्ती; गावचे गरीब, सुखवस्तू इ. सर्व लोक. (क्रि. मिळणे, जमणे, गोळा होणे.) २.चौचाकी यातील चार चाकांच्या अर्थासंबंधी बराच मतभेद आहे. काहींच्या मते ही चौचाके म्हणजे देशमुख, देशपांडे, पाटील व कुलकर्णी ही (चार चाके) होत. काही लोक सूर्याचे, कुंभाराचे, तेल्याचे व गाड्याचे अशी (गावाची) चार चाके मानतात. कोणी पहिले सरकार, दुसरे पाटील, कुळकर्णी, देशपांडे, देशमुख; तिसरे मिरासदार, शेतकरी इ. समुच्चयाने व चौथे बलुतेदार अशी चार चाके मानतात. ३. काही लोक असे म्हणतात की खेडेगावचे लोक जो कोणी नेता भेटेल त्याच्या तंत्राने वेळेनुसार वागणारे, प्रसंग पाहून पुढेमागे, उजवीकडे, डावीकडे वळणारे व अस्थिर बुद्धीचे असतात त्यावरून हा वाक्प्रचार रूढ झाला आहे.

**चौचाल** वि. १. चवचाल; प्रत्येक नव्या कल्पनेने, चालीने, मोहून जाऊन तीप्रमाणे वागणारा. २. लहरी; स्वेच्छाचारी; स्वच्छंदी. ३. नाना कुलंगडी, लफडी करणारा. ४. भटक्या; भणंग; बडबड्या; चहाडखोर; गप्पीदास; वाचाळ (हा अर्थ स्त्रियांच्या संबंधी विशेष रूढ आहे). ५. स्वेच्छाचारी; दु:शील; नाचरी; नटवी (स्त्री).

**चौचिंथी** स्त्री. अंदाधुंदी; बंडाळी : 'नानाफडणीस याच्या मृत्युनंतर पुणे दरबारांतील जी चौचिंथी माजली.'- सअस ६०.

**चौजारे** न. चातुर्थिक ज्वर; दर चौथ्या दिवशी येणारा थंडीताप.

**चौटके** पु. चार टाकांचे परिमाण; छटाक; शेराच्या सोळाव्या भागाचे माप, वजन; चवटके.

**चौटाकी** वि. चार टाक्यांचा (द्रोण).

**चौडचाल** स्त्री. (घोड्याचे) पुढील पाय जलद उचलून झपाट्याने चालणे. पहा : **चवडचाल**

**चौडाळ** पहा : **चौढाळ** : 'काय गोड बोलणें भुजवर चालणे मुरवत चौडाळ्याची।' - सला ३९.

**चौडाळणे** अक्रि. (गाय, म्हैस यांची कास) प्रसूतीची वेळ जवळ आली असता विस्तृत होणे. [हिं.चौडा]

**चौडुका** पु. चोडके; एक चर्मवाद्य : 'गोंदकापुढे चौडुका वाजे'–लीचपू २०४.

**चौढाळ** न. १. जातिधर्मविरहित आचरण. २. घोटाळा : 'हाटाचे चौढाळे कोण जाणे।'– नवनीत १५१.

**चौढाळ** वि. चार उतरत्या बाजू असलेले (छप्पर, छावणी).

**चौढाळ–ळा–ळ्या** वि. १. चौंढळ; चहाटळ; पाचकळ. २. हरएक कामात ढवळाढवळ घोटाळा करणारा, कामात गोंधळ घालणारा.

**चौढाळणे** उक्रि. जातिनिर्बंध, विवाहबंधन तोडून सबगोलंकार होईल अशा तऱ्हेने वागणे; कामुकतेचा अतिरेक करणे; ताळतंत्र सोडून संभोग करणे; चौंडाळणे.

सक्रि. १. घालमेल; हलवाहलव करून गोंधळ करणे; बिघाड करणे; विचका करणे; अनेकांनी मिळून एखाद्या कार्याचा विचका करणे. २. बाटविणे : 'चौढाळिलें गोकुळ सर्व येणे:'– सारुह १.६९. [सं.च्यु]

**चौढाळे** न. गर्दी; दाटी.

**चौणा** पहा : **चवणा**

**चौत, चौतक(को)र** पु. (फळ, कंद, भाकरी इत्यादिकांचा) चवथा भाग, हिस्सा; पहा : **चतकोर**

**चौत** स्त्री. चतुर्थी तिथी. पहा : **चौथ**

**चौतरा** पु. चबुतरा; ओटा: 'चौतरेयावरी लंबोधरापुढे उतरामुख आसन'– गोप्रच १६५. [सं. चतुर्]

**चौतरा** पु. १. चव्हाटा. २. कोतवालाची कचेरी : 'जागा स्वसंतोषे देऊन खरेदीपत्र करून दिल्हे ते तुम्ही चौतरा आणून दाखविले.'– ऐको ३९१.

**चौतर्फ–र्फा–र्फी** वि. चार राजे मालक असलेला देश, राज्य.

क्रिवि. चोहोकडे; चोहोकडून; सर्व बाजूला; सर्व बाजूंनी; चौगर्दी.

**चौताल–ला** पु. वादनातील एक ताल, ठेका. चार टाळांचे ठोके लागणारा धृपद इ. [सं.चतुस्ताल]

**चौताळ** एकाचवेळी जन्मलेल्या चार अपत्यांचा समूह.

**चौताळ** क्रिवि. चौखूर; चारी पायांनी उड्या मारीत : 'निळा म्हणे फुंपात उठी। चौताळ लागे पाठीं।'– निगा २४.

**चौताळणे** अक्रि. पहा : **चवताळणे**. १. पिसाळणे; क्षोभणे : 'मज लक्षितां मन आकळे। मज विसरतां तें चौताळे।'– एभा १६.१७०. २. धावून येणे; भरधाव पळत सुटणे: 'चौताळती गगनपंथे। ऐसे वारू चारशतें।' – मुसभा १२.१९२. ३. वेगाने जाणे : 'वेगें सारथ्यातें म्हणत। चपळ चौताळी दे रथ। कृष्णनाथ जेथें असे।' – एरुस्व १२.६९. ४. विस्तार पावणे; पसरणे : 'माहां बळी होऊन गेले। पृथ्वीवरी चौताळले।'– दास १६.३.२६. [सं.चौ+ ताल]

**चौतीस** वि. ३४ संख्या; तीस अधिक चार. [सं.चतुस्त्रिंशत्]

**चौतुकडा** वि. चार तुकड्यांनी बनवलेला; चार तुकड्यांचा.

**चौतुकी, चौतूक** वि. चार कडवी, विभाग असलेले; अस्ताई, अंतरा व आभोग यांनी युक्त असे (ध्रुपद).

**चौतू** पहा : **चौतारी**

**चौतोंडा** पु. चार तोंडाचा, चतुर्मुख ब्रह्मा; ब्रह्मदेव : 'चौतोंडा ब्राह्मणु आला: तो नेणो काई आळोचुनि गेला' – उगी ६२.[सं.चतुः+तुण्ड]

**चौत्य** पु. चतुर्थांश, पाव.

**चौत्रा** पु. पहा : **चौथरा**

**चौत्रा** पु. नाके; बसण्याची जागा; स्थान; पीठ : 'आपणांस मोगलाई अमल चौत्रे यावर रोज व जमीन इनाम बिघे व इनामगांव आहेत.'– बाबारो २.११७.

**चौथ** स्त्री. १. चतुर्थी तिथी. २. धान्य मोजण्याचे विशिष्ट परिमाण. ३. चतुर्थांश. ४. चौथाई; मुसलमानांच्या अमलाखालील प्रांतातून सरकारी वसुलाच्या एक चतुर्थांश इतकी मराठे वसूल करत ती खंडणी. वि. चतकोर (भाकरी).[सं. चतुर्थ] (वा.) **चौथीचा चंद्र, चांद पाहणे** – काही तरी आळ, किटाळ येणे; गणेश चतुर्थीचा चंद्र पाहिला असता चोरीचा आळ येतो असा समज आहे : 'चौथीचा चांद पाहिलांत याचा हा परिणाम बरे का?' – नामदेव ८६.

**चौथकर, चौथकोर** पहा : **चतकोर**

**चौथभरणी** स्त्री. १. भाद्रपद वद्यात भरणी नक्षत्री चंद्र असतो असा (तृतीयेचा, चतुर्थीचा, पंचमीचा) दिवस. २. मागील बारा महिन्यांत मेलेल्या माणसांचे या दिवशी केलेले श्राद्ध; भरणी श्राद्ध.

**चौथरा** पु. घर इ. बांधण्यासाठी बांधलेला चौकोनी ओटा; जोते; चबुतरा; घराखालचा चौकोनी उंच ओटा. [फा.]

**चौथरा** पु. चवथ्या दिवशी म्हणजे मध्ये दोन दिवस सोडून येणारा ताप.

**चौथरा–ल** पु. स्त्री. १. शेतातील एकूण उत्पन्नाचा चौथा हिस्सा. २. शेत खंडाने देण्याचा एक प्रकार. यात शेताचा मालक स्वामित्वाबद्दल शेताच्या उत्पन्नापैकी चतुर्थांश स्वतःला ठेवून बाकी कुळाला देतो.

**चौथरी** स्त्री. चौघडी: 'तीं वस्त्रांचीयां चौथरीयां साटि आसु देति :' – गोप्रच ९६–९७. [सं.चतुर्धरी]

**चौथा** पु. एक माप. (खा.)

**चौथा** वि. पहिला, दुसरा या अनुक्रमांतील तिसऱ्याच्या पुढचा व पाचव्याच्या मागचा; चार ही संख्या ज्याने पूर्ण होते तो. [सं.चतुर्थ]

**चौथाई** स्त्री. १. चौथा हिस्सा; चतुर्थांश. २. खंडणी; कर; हक्क. [हिं.]

**चौथाई अंमल** चौथाई वसूल करण्याचा हक्क.

**चौथान्न** न. विवाहसमयी वधूचे नाव ठेवण्याच्या आधीचा विधी. (कु.)

**चौथी** स्त्री. चतुर्थी तिथी : 'चौथीच्या वेळी घरोघरी फुगड्या खेळतांना चवळीसारखे अंग लवे.' – मकथा ६०–५.

**चौथी भक्ती** स्त्री. ज्ञानभक्ती.

**चौथे** न. चार अधोली धान्य; एक परिमाण. (अहि.)

**चौथेली** स्त्री. चौथल; शेताच्या उत्पन्नाचा चौथा हिस्सा. पहा : **चौथरा**

**चौदस** स्त्री. चतुर्दशी तिथी. [सं.चतुर्दशी]

**चौदंडी** वि. कुस्तीतील एक डाव.

**चौदंती** वि. १. चार दात ज्याला आहेत असा (हत्ती) : 'जेवीं मदोन्मत्त हस्तीं। चौदंतांचे।' –कक १.१३.९५. २. ऐरावताचे विशेषण; चतुर्दंत = ऐरावत : 'ते चौदंते चोखडे। क्षीरसागरीचे।।' – शिव ९४१.[सं.]

**चौदा** स्त्री. चौदा विद्या : 'चौदाज्णींची ठेव। नचले स्वरूप वर्णावया।' – हरिवि ३.३.
वि. १४ ही संख्या; दहा अधिक चार. [सं.चतुर्दश]

**चौदा** पु. एक वनस्पती : 'मयुर पित्तेंसी रसेले: चौदेयाचे पत्र लेपिले : – रकौ १०७.

**चौदा कॅरट** सोन्याच्या शुद्धतेचे परिमाण. शंभर नंबरी सोने म्हणजे २४ कॅरट बरोबर समजले जाते : 'चौदा कॅरटवाले सोने म्हणजे काय हे सोन्याच्या व्यापाऱ्यांना... जेवढे समजेल... तेवढे ते इतरांना जाणवणे शक्य नाही.' – भाइमू ५८.

**चौदा चौकड्यांचे राज्य** न. कृत, त्रेता, द्वापार व कली ही चार युगे मिळून एक चौकडी होते. अशा चौदा चौकड्या होईपर्यंत केलेले राज्य; अतिशय दीर्घकाल केलेले राज्य; रावणाचे राज्य : 'सर्व देवांना बंदीत टाकणारा व चौदा चौकड्या राज्य करणारा रावण स्वत:च्या प्रतापासंबंधाच्या चुकीच्या कल्पनेला बळी पडला.'– कीव.

**चौदा नारु** पु. अव. चौदा अलुतेदार.

**चौदानी** क्रिवि. चार प्रकारच्या दानांनी : 'गोसावीयांसि आसन जालें : चौदानि जुं पडत असे :' – लीचपू २८.

**चौदावे रत्न** १. (चुकीने) चाबूक. (चौदा रत्ने वर्णन करणाऱ्या 'लक्ष्मी: कौस्तुभ पारिजातक.' श्लोकातील 'शंखोऽमृतं चांबुधे:.' या तिसऱ्या पादाच्या शेवटी 'चांबुधे:.' बद्दल चुकीने चाबूक असे वाचल्याने चौदावे रत्न म्हणजे चाबूक असा अर्थ. २.(ल.) खरपूस मार (चौदावे रत्न (अमृत) निघाल्यावर दैत्यांना बसलेल्या मारावरून शिक्षा). ३. भाबड्या माणसाची केलेली खोडी, फसवणूक. (वा.) ० **दाखविणे** – चाबकाने मारणे, खरपूस समाचार घेणे.

**चौदिवाली–री** स्त्री. चारी बाजूंनी भिंती असलेले, चौकोनी अंगण; पटांगण; चौक.

**चौदिसा** क्रिवि. चार दिवसांपूर्वी : 'अमई ! निरखिली म्यां चोरटी चौदिसां गे।' – आकं १८.

**चौधरी** पु. १. गावचा एक सरकारी अधिकारी; पाटलाचा मदतनीस; काही प्रांतांत यालाच सरदेशमुख आणि सर्वसामान्यपणे चौगुला म्हणतात : 'सेट्या ना चौधरी। पांडेपण वाहे शिरीं।' – तुगा ३०५९. २. श्रेष्ठ; मुख्य मनुष्य; पुढारी : 'अवघ्या शिंदळांचा चौधरी। नवाजी आणिल बायका।' – अमृत १२९. ३. एखाद्या समाजातील, जातीतील, धंद्यातील मुख्य मनुष्य; वजनदार माणूस; पुढारी. ४. बैलगाडी हाकणारा कामगार, बैलांवरील अधिकारी : 'स्वारीत कोतल चालण्यास नेण्याकरितां... एक बैलजोडी ... द्यावी आणि... चौधऱ्याचीहि नेमणूक करावी.'– ऐरापुप्र ९.५११. [हिं.]

**चौधार–रा–री** वि. चार धारा, बाजू, कडा असलेले; चौधारी : 'शतयोजनें रुंद लांब। चौधार रत्नमणीचे खांब। आटोनिया शातकुंभ।' – मुसभा ४.१२.

**चौधारा** पु. चार धारांचे शस्त्र : 'एका चौधारे दिधले:' –उह १०८१.[सं.]

**चौनट** वि. पहा : **चवनट, चावनट.** १. (खाण्यापिण्याच्या बाबतीत) चोखनळ; चिकित्सेखोर. २. चावट; चहाटळ; फाजील; विचकट.

**चौपई–य** स्त्री. सापसुरळी. पहा : **चोपई**

**चौपट** स्त्री. १. सोंगट्यांचा खेळ : 'रंगीत चौपट तुशी खेळाया पठे पठेन जान गडे।' – पला १०८. २. सोंगट्या खेळावयाचा (घरे आखलेला) पट. [सं.चतुर्+पट]
वि. चारपट; चारांनी गुणलेले; चतुर्गुणित, चौरसाकार.(वा.) ० **करणे**- लाकूड तासून चारी बाजूंनी साफ करणे; चौरस करणे; चौपाट.

**चौपट्टा** पु. १.चौकोनी, सपाट व विस्तृत मैदान, जागा. २. रुंद व सपाट प्रदेश.
वि. चौकोनी, सपाट व विस्तृत (मैदान).

**चौपड** पु. एक खेळ. पहा : **चोपड**

**चौपदरा, चौपद्रा** वि. १. झोळीसारखा; चार पदर एके ठिकाणी बांधलेला : 'हातीं पायीं धरिला। मग तो चौपद्रा केला। काळांचां हातीं पडला। लागले मारूं।'– गीतार्णव २.२३८०. २. चौपदरी; चारपदरी (बे.) (वा.) ० **पसरणे** – चौपदरी गळा काढणे; रडणे; भेकणे.

**चौपदरी** स्त्री. चौकोनी फडक्याची चार टोके एकत्र धरून भिक्षेसाठी बनविलेली झोळी; मधुकरीचे फडके : 'अन्नसत्रवाल्यास जसा चौपदरीचा योग यावा त्याप्रमाणे या भरतभूमिवासी जडभरताची आजला हालहवाल होऊन गेली आहे.'– के.
वि. १. चार पदरांचा, पेडांचा (दोर इत्यादी). २. चार पापुद्रे असलेल्या, दोन घड्या घालून केलेल्या (पोळ्या). ३. चौघडी; चार पदर होतील अशा रीतीने घडी घातलेले (लुगडे, धोतर इत्यादी). (वा.) ० **गळा काढणे** – मोठ्याने ओरडणे, रडणे. **(हाती)** ० **घेणे, येणे** – भिक्षा मागण्याचा धंदा आरंभिणे; भीक मागणे; अतिशय गरिबी येणे.

**चौपदरीचा जहागिरदार** पु. (उप.) भिकारी.

**चौपदी** स्त्री. चार चरणांचे काव्य : 'चक्रधरांची ही चौपदी ऐकून सारे भक्तजन त्यांच्या चरणी लागले.' – मसंत ५०.

**चौपन** घट्ट, चिखलाची, चिकणमातीची जमीन.

**चौपन्न** वि. ५४ ही संख्या; पन्नास अधिक चार.

**चौपा(पां)खी** वि. चार पाख्यांचे (घर); चार उतरत्या बाजवांची ज्याची छावणी आहे असे (घर, इमारत); चार छपरांनी आच्छादिलेले (घर इत्यादी).

**चौपाट** वि. चौरस, चौकोनी केलेला (इमारती लाकडाचा तुकडा).

**चौपाट** क्रिवि. भरधाव; चौखूर. (क्रि. काढणे, पळणे, धावणे, निघणे.) पहा : **चौपाठी**

**चौपाटणे** सक्रि. (लाकूड इत्यादी) तासून चौकोनी, चौपट करणे.

**चौपाटी** स्त्री. पुळण; समुद्रालगतचा भाग; सार्वजनिक ठिकाण : 'आपल्यापुढे कोण्या चोरबाजारांतील किंवा चौपाटीवरील बाजारू भाषा काढण्याचा प्रश्न नाही.' – मसासंअभा ४२७.

**चौपाटी** स्त्री. चार रस्ते जेथे एकत्र मिळतात अशी जागा. [सं.चतु:पट]

**चौपाठी** क्रिवि. चौपाट; भरधाव; चौखूर : 'मोनजाती उचलोनि माथें धांवती चौपाठी।' – क्रिपु १.५.११.

**चौपानी** स्त्री. पाण्यात वाढणारी एक चार पानांची वनस्पती, भाजी.

**चौपाय** पु. अव. चार पाय. विशिष्ट वाक्प्रचारात येतो.

**चौपायी** क्रिवि. १. चारी पायांच्या ठिकाणी, बाबतीत. २. भरधाव; चौखूर; चौपाठी; चार पायांवर. (वा.) ० **उगवणे, उजवणे** – १. (घोडा इत्यादी) चारी पायांत चांगला आणि सर्व लक्षणांत बरोबर आणि चांगला निघणे. २. (उप.) सर्व लाज टाकणे; उच्छृंखल होणे; चोरी, शिंदळकी, चहाडी, लबाडी इत्यादींमध्ये अट्टल, तरबेज बनणे. ० **उतरणे** – १. ( वासरू, शिंगरू इत्यादी) चारी पांढऱ्या खुरांनी जन्माला येणे; जन्मकाली पायांचे चारी खूर पांढरे असणे. पहा : **उतरणे**. २. चारी पायांत भोपळेपणा येणे; थकल्यामुळे पाय जड होणे; पायात गोळे येणे. ० **काढणे** – ( घोडा इत्यादी) भरधाव फेकणे. ० **धावणे, पळणे, उडणे, सुटणे, निघणे** – (घोडा इत्यादी) भरधाव पळणे.

**चौपायी** स्त्री. (प्र.) चौपाई; चार पायी; खाट. [सं.चतुष्पदी]
वि. चार पायांचा; चतुष्पाद.

**चौपायी** स्त्री. हिंदी पदरचनेतील एक प्रकार : 'निरनिराळ्या रागांतील व तालांतील चौपाया.' – गाविदि ६०.

**चौपार** वि. चार पार असलेला : 'पूर्वी इथे चौपारीचा वाडा होता...' – वावारू ३६.

**चौपारी** क्रिवि. चाऱ्ही बाजूंनी; सगळीकडून; पहा : **चौपाशी** : 'जैसा तडाग भरला विशाळ। त्याचें चौपारीं फुटलें जळ।' – पांप्र ५०.११३.

**चौपालवी** स्त्री. चौपदरी; भिक्षेची झोळी : 'चौपालवी बांधोनि करीं। भीक मागावी दारोदारीं।' – एभा ३.४९४.

**चौपाशी–स–सी** क्रिवि. चारी बाजूंना; चोहोकडे; सर्व बाजूंना; सर्वत्र : 'महाभयाचीं भूतें चौपाशीं। अहर्निशीं झोंबती।' – एभा २.२८०.

**चौपाळा** पु. कडीपाटाचा झोपाळा : 'देसाई चौपाळ्यावर कपाळाला बुक्का लावून बसला होता.'–अगोचर ८.

**चौपाळे** न. एकाच वेळी चार मुलांस जन्म देणे. उदा. जुळे, तिळे याप्रमाणे.

**चौपुटी** स्त्री. (सामा.) चौपदरी; भिक्षा मागण्याची झोळी. (वा.) ० **घेणे** – भिक्षा मागण्याचा धंदा आरंभणे.
वि. १. पहा : **चौपुडी**. २. चौकोनी : 'आसन सोरठा उर्णपटीं। पुढां मांचंळी चौपुटी।' – ऋव ८०.

**चौपुडी** वि. चार पुडे, खण, कप्पे असलेली (पेटी, करंडा).

**चौपेट** स्त्री. १. एखाद्या इमारतीच्या चारी बाजूंनी, अंगांनी वेष्टिलेले चौकोनी अंगण, जागा; चौकी : '(घराच्या) चौकीभोवतालच्या जागेला इथे चौपेट म्हणतात.' – अहागो २४६. २. चौसोपा. (गो.)

**चौफल–ळ** वि. १. चौकोनी; चतुष्कोणाकृती : 'घटाकारें वेटाळें। तेथ नभ गमे वाटोळें। मठीं तरी चौफळें। आये दिसे।' – ज्ञा १३.८९७. २. चौपट; चारपट : 'मोठें चौफळ। अंगीं उच्छिष्टाचें बळ।' – तुगा २३५८. [सं.चतुर+फल – फलक]

**चौफळणे** सक्रि. चौरंग, चोपाळा करणे : 'आतां हृदय हें आपुलें। चौफळूनियां भलें। वरी बैसऊं पाउलें। श्रीगुरुचीं।' – ज्ञा १५.१. [सं.चतुष्फलक]

**चौफ(फा)ळा** पु. चौरंग; चौपाळा; जिचा खाटेप्रमाणे, चौपाळ्याप्रमाणे उपयोग करतात अशी पायासहित किंवा पायाशिवाय असलेली फळ्यांची चौकट : 'आनंदरावांनी ओटीवरच्या चौफळ्यावरून ढेकणा फोडला.'– अगोचर ५. (राजा.)

**चौफळा** पु. (विणकाम) (लुगड्याचे, खणाचे) सर्व सळ एक जागी जमवून त्याची घातलेली घडी.

**चौफुला** पु. १. लवंग, वेलदोडे, जायपत्री इ. विड्याच्या मसाल्याचे पदार्थ निरनिराळे ठेवण्याकरिता फुलाच्या आकाराचा, चार किंवा सहा, सात पुडांचा डबा; पानसुपारीचा डबा; कचोळे : 'खुशालित वर बसावया बांधुन दिधला झुला। रुपेरी तस्त तबक चौफुला।' – प्रला २१५. २. सराफाची वजने ठेवण्याची वाटोळी पिशवी, बटवा. ३. एक पितळी, घनाकृती, पाच लहान मोठे खळगे असलेले, सोनाराचे उपकरण, याच्यावर सोन्याचांदीचे पत्रे हातोड्याने बडवून मंगळसूत्र इत्यादिकांत ओवण्याच्या मण्यांच्या वाट्या बनवतात. ४. पत्रावळीचा एक प्रकार. यात मधल्या पानाभोवती चार पाने लावलेली असतात.(को.)

**चौफुली** स्त्री. १. नक्षत्राच्या आकाराची फुली (कापड इत्यादिकांवर काढतात तशी); चांदणी. २. उभ्या रेघेवर बरोबर मध्यावर तिच्या इतकीच लांब आडवी रेघ दिली असता होणारी आकृती; फुली. ३. चार मोती असलेला (कानांत घालण्याचा) लहान दागिना. ४. रांगोळीतील चार ठिपक्यांची चौकट.

**चौफेर–री** क्रिवि. चारी बाजूंनी; चहूकडून; जिकडेतिकडे; चौगर्द : 'तंव पावले ऋषेश्वर। देवीं दाटलें अंबर। अग्नि लाविला चौफेर। परशुरामें।' – कक २.१३.१०७. (वा.) ० **उडणे** – १. (ल.) बोलण्यात, भलतीकडे वाहवणे; विसंगत विधाने करणे. २. चारी दिशांना उधळणे. ० **काढणे** – (घोडा इ.) भरधाव पळवणे; चौखूर दामटणे. ० **निघणे,उडणे,जाणे** – चौखूर, भरधाव पळू लागणे.

**चौबक** स्त्री. विटीदांडूच्या खेळातील एक पारिभाषिक शब्द. विटी खाली पडू न देता वरचेवर दांडूने चार वेळा लागोपाठ उडवण्याची क्रिया.

**चौबळा** वि. चौकोनी.

**चौबंदी** स्त्री. १. गावठी कागदाचा ताव, प्रत्येकाचे दोन वर्ख (पाने) असे याचे दुमडून चार बंद केलेले असतात. २. (कागद इत्यादिकांची) चार घड्या पाडलेली स्थिती, गुण. ३. घोड्याच्या चारी पायांना नालबंदी करण्याची क्रिया; नव्याने नालबंदी करणे.
वि. चारांचा बनलेला. १. चार बंद, वर्ख ज्यास आहे तो (गावठी कागदाचा ताव). २. चारी पायांना मारलेले (घोड्याचे नाल). ३. चार बंदांनी गाठलेले (कुंपण इ.). ४. चतुर्गुणी; चारपट; चारांनी संबद्ध. [हिं.]

**चौबार–रा–री** पु. स्त्री. १. चव्हाटा; नगरातील चार रस्ते ज्या ठिकाणी मिळतात तो चौक : 'म्हणौनि वाचेचा चौबारा। घातलिया धर्माचा पसारा।' – ज्ञा १६.२२३; 'तपोवृत्ताचिया चिंध्या। गुंडाळोनि देहनाम बाहुलिया। वाचेच्या चौबारिया। ज्ञान देती पोसणें।' – मुआदि १.६२. २. (घरासमोरील) चौक; अंगण: 'रिठेमाळ अति बरवी। करीं घेऊनिया सादावी। नंद चौबारा जाऊनि।' – निगा ११. ३. चौबारी;

दिवाणखाना; मंदिर : 'हाट चौहोटे तीथरी। मढ मंडप चौबारी। देखे धर्मसाळां।' – ऋव २०.

क्रिवि. चोहोंकडून; सर्वबाजूंनी : 'उगवला दिनराज बाण आले चौबारा :' – बगाथा ६०५.

**चौबारी** स्त्री. सोंगट्यांच्या खेळातील परिभाषिक शब्द. चार एकरंगी सोंगट्या मेल्याने होणारा, येणारा डाव, बाजू; चौसष्टी.

**चौबारी** वि. एकामागून एक असे चार बार करणारा (फटाका).

**चौबारे** न. चारी बाजूंनी बांधून काढलेली चौकोनी विहीर : 'वेसी आंतु चौबारें' – स्थानपोथी २५.

**चौबुरजी** स्त्री. १. चार बुरुज असलेली गढी, कोट, लहानसा किल्ला. २. शत्रूपासून बचावाचे ठिकाण; लहान दुर्ग. ३. एक प्रकारचा लाकडी किल्ला. असा किल्ला संरक्षणाकरिता करीत असत व ह्यातून तोफांचा मारा करता यावा म्हणून भिंतीत भोके ठेवलेली असत. ४. अस्मानी महाल; उंचावरील तटबंदी केलेला महाल, वाडा इ. [फा.]

वि. चार बुरुज ज्याला आहेत असा (किल्ला इ.).

**चौभय** पु. चुंबळ : 'मोतीनी चौभय' – जलोसा ६०४.

**चौभास** वि. १. चार भाषा जाणणारा. २. (ल.) हुशार; चलाख; तरतरीत; जाणता; चौकस. [सं. चतुर्भाषी]

क्रिवि. (चार भाषांच्या प्रांतांत) चोहोकडे; चारी बाजूला; सर्वत्र : 'उदीम वाढला चौभास। बावन्नवर्णा सारिखा।' – मुआदि २५.५३.

**चौमुळी** पहा : **चौमोळी**

**चौमेखणे** उक्रि. हात पाठीमागे बांधणे; मुसक्या बांधणे; चतुर्भुज करणे. (वा.) **चौमेखी करणे** – दोन हात व दोन पाय चारी बाजूस चार मेखा ठोकून त्यास दोरीने बांधून ठेवणे : 'उभयता मारेकरी यांच्या पायात बेड्या घालून चौमेखी करून पहाऱ्यात ठेवले.' – नाग २.७७.

**चौमेर** स्त्री. पु. चवाठा.

**चौमेर–री–रे** क्रिवि. (शेताच्या) चारी बाजूंनी, मेरांनी, कडांनी; चौफेर; चहूकडून : 'ना तरी रणीं शव सांडिजे। तें चौमेरी गिधीं विदारिजे।' –ज्ञा २.२००.

**चौमोळी** वि. चार पाखी असलेले; चौपाखी (घर इ.).

**चौर** पहा : **चवर, चवरगोंडा, चवरी**

**चौर** पु. जमीन मोजण्याचे एक परिमाण. पहा : **चाहूर**

**चौरकानी रेघ, ओळ** दुमडलेल्या कागदाच्या चार रकान्यांतून जाणारी रेघ, ओळ; मुलांना, विद्यार्थ्यांना, आश्रितांना पत्र लिहिताना अशी (चार रकान्यांतून जाणारी) ओळ काढतात. (क्रि. काढणे, ओढणे.)

**चौरडोल–ली** पु.स्त्री. अंबारी. पहा : **चवरडोल** : 'काम सुनेरी बहुत मुलायम चौरडोल हलकडिया।' – देप ५८.

**चौरपंचक** न. (ज्यो.) चोरपंचक, पाच अशुभ मुहूर्तांपैकी एक. अग्निपंचक, मृत्युपंचक, राजपंचक व हानिपंचक ही इतर चार अशुभ पंचकें होत. या मुहूर्तावर प्रवासाला निघाल्यास चोर, दरोडेखोर यांपासून त्रास होतो. पहा : **अग्निपंचक, पंचक**

**चौरली** स्त्री. चोरवेळ. पहा : **चोरळी**

**चौरशी** स्त्री. एक प्रकारचा सामता; सुताराचे छिद्र पाडण्याचे एक हत्यार; किकरे. पहा : **चोरशी**

**चौरस** पु. सर्व बाजू समान व सर्व कोन काटकोन असलेला चौकोन; समचतुष्कोन.

वि. १. चौकोनी (शेत इ.). २. साफ तासून चौकोनी केलेला (इमारती लाकडाचा तुकडा, खांब इ.). ३. (ल.) चतुर; हुशार; हरएक कामात प्रवीण.

**चौरस आहार** समतोल आहार; पोषक द्रव्ये असलेला आहार : 'चौरस आहाराच्या दृष्टीने अन्नाचे घटक.' – पाकसिद्धी ९. [सं. चतुर् + अस्र]

**चौरसपण** न. प्रमाणबद्धता; कोनांचा प्रमाणशीरपणा : 'परि ते भारु कैसे। देवाचेनि कृपावसे। दोन्ही मांडले सरिसे। चौरसुपणें।' –ऋव ७१.

**चौरसमान** न. चौरस माप, प्रमाण; क्षेत्रमान; जमीन इत्यादिकांचे क्षेत्र लिहिण्याची, सांगण्याची पद्धती. उदा. शंभर चौरस यार्ड; चारशे चौरस फूट.

**चौरस सारणी** (ग.) ज्या सारणीमधील पंक्ती आणि स्तंभ यांची संख्या समान असते अशी सारणी.

**चौरसी घंटा** घुंगूर लावलेली झूल.

**चौरस्ता** पु. चार रस्ते मिळतात ती जागा; चौक : 'दिवसातून दहा वेळा पानासाठी गड्याला चौरस्त्यावर पिटाळणे.' – परिपूर्ती ६२.

**चौरस्ता** क्रिवि. चारी, अनेक रस्त्यांवर, रस्त्यांतून; चारी रस्त्यांच्या बाजूंनी, चारी बाजूंनी, चोहोकडून; चौफेर.

**चौरस्ती** वि. चार रस्ते असलेला : 'बगीच्यांतील चौरस्ती मार्ग स्फटिकमय, एकसारखे समान असून.' – मंजुघोषा २.

**चौरंग** पु. १. चार पाय असलेली, स्नान इ. करताना बसायला घेण्यासाठी केलेली लाकडी चौकी; लाकडाचे चौकोनी, चार पायांचे आसन, बैठक. २. (ल.) हातापायाने विरहित असा; पंगू: 'त्या परतोनि राजकन्येसी सांगती। कीं चौरंगा केला जो निश्चितीं। तो तस्कर तेलियाच्या गृहाप्रती। घाणा हांकीत बैसला।' – शमा ६६.(क्रि.करणे) [सं.चतुर+अंग] (वा.) ० **होणे, हातापायांचा चौरंग होणे** – १. (थंडीने, दुखण्याने) शरीर आखडणे; बसण्याचा एक प्रकार : 'करून चौरंग चौरंग देहाचा।' – भपसं ५४. २. (चोर इ.) हातपाय जखडून बांधला जाणे.

**चौरंगणे** (एखाद्याचे) हातपाय छाटून पंगू करणे; चौरंग बनविणे.

**चौरंगवायु–यू** पु. घोड्याचा एक रोग; 'याने घोड्याचे चारी पाय सुजतात.' – अश्वप २.१८०.

**चौरंगी** पु. वड्याचा एक प्रकार.

**चौरंगी घाव** चहू बाजूंनी मारा करणे : 'हाणा हाणा : ना एका : ऐसें म्हणौनि गोसावीं तेयांसि चौरंगी घाओ केला :' – लीचपू २९९.

**चौरंगी विद्या** चौरंगीनाथाला प्राप्त झालेली शरीरावयव पुन्हा निर्माण करणारी सिद्धी : 'सारंगपंडीतीं गोसावीयांतें पुसिलें : जी जी : चौरंगीची वीद्या कवणी ठाइं आति ?' – लीचउ ४२५.

**चौराशी** स्त्री. एक सुतारी हत्यार, चोरशी. (को.) पहा : **चौरशी**

**चौरी** स्त्री. मोर्चेल. पहा: **चवरी** : 'बसूनशानी दाजी फडके वर चौरी उडवीत।' – विज्ञावि ८.४.८०. [सं. चामर]

**चौरीदार** पु. चवरीने वारा घालणारे नोकर : 'चौरीदार चौऱ्या ढाळत होते.' - राऊ ११०.

**चौरीय** न. चोरी : 'चौरीय करिता गायन बजावे' - पंचो १५५.३. [सं. चौर्य]

**चौरीयेरत** पु. चोरून व्यभिचार करणारा : 'इतके चौरीयेरत जिया कामिनी तिया तृणसमान लघु मानिती' - पंचो १८.१८. [सं.चौर्यरत]

**चौरीबर्दार, चौरीबारदार** पु. चवरी ढाळणारा. पहा : **चवरीबरदार**

**चौरेचा(ता)ळ, चौरेचा(ता)ळीस** वि. ४४ ही संख्या; चाळीस अधिक चार; चव्वेचाळीस पहा : **चवरेचाळी**[सं.चतुश्चत्वारिंशत्]

**चौरे(ऱ्या)हत्तर** वि. ७४ ही संख्या; सत्तर अधिक चार. [सं.चतु:सप्तति]

**चौरे हिंव** दर चार दिवसांनी शरीरात भरणारी थंडी; हिवतापाचा एक प्रकार : 'हा एकाएकी चौऱ्या हिवाने आजारी झाला.' - वाकि ५४.

**चौराँ पडणे** एकाच वस्तूला फार मागणी असणे. (कु.)

**चौर्य** न. चोरणे; चोरण्याची क्रिया. [सं.]

**चौर्य-उन्माद** पु. (मानस.) चोरी करण्याची अनिवार्य पुनरावर्ती इच्छा.

**चौर्यकामुकता** स्त्री. (मानस.) चोरी करण्यातून लैंगिक उत्तेजन अनुभवणे.

**चौऱ्याण्णव** वि. ९४ ही संख्या; नव्वद अधिक चार. [सं.चतुर्नवति]

**चौऱ्यायशी, चौऱ्याशी** वि. १. ८४ ही संख्या; ऐशी अधिक चार. २. (ल.) चौऱ्यांशी लक्ष योनी; जीवाला प्राप्त होणारे अनेक जन्म : 'उत्तम तनु जाइल मग फेरे चौऱ्याशी फिरसी।' -देप ६८. [सं.चतुरशीति]

**चौऱ्यायशी, चौऱ्याशी जन्मयातना चौऱ्यायशी लक्षयोनी, लक्षजीवयोनी** १. चौऱ्यायशी लक्ष योनींतून जन्ममरणांच्या भ्रमणाचे दु:ख : 'न चुकली जन्म चौऱ्यांयशी यातना।' - निगा ३२४. २. जारज, अंडज, स्वेदज व उद्भिज या चार खाणींतून प्रत्येकी निरनिराळ्या एकवीस लक्ष योनी मिळून चौऱ्यांशी लक्ष योनी होतात किंवा २० लक्ष वृक्षादी स्थावर योनी, ११ लक्ष कीटकयोनी, ९ लक्ष जलचर योनी, पक्ष्यांच्या १० लक्ष योनी, ३० लक्ष पशुयोनी व ४ लक्ष मनुष्ययोनी मिळून ८४ लक्ष योनी होतात : 'प्राप्त चौऱ्याशीलक्ष योनी।' - देप २६.

**चौऱ्यायशीचा फेरा, गरका** १. चौऱ्यायशी लक्ष योनीतून पुन: पुन्हा जन्मणे-मरणे असे ८४ लक्ष वेळा होणे; जीवाला चौऱ्यायशी लक्ष निरनिराळ्या देहांतून, रूपांतून भ्रमण केल्यानंतर मोक्ष मिळतो ही हिंदूंची समजूत आहे : 'तुका म्हणे शहाणा होइरे गव्हारा। चौऱ्याशीचा फेरा फिरों नको।' - तुगा ३०१८. २. (ल.) पुनर्जन्म; संसारयातना. ३. (ल.) अत्यंत गुंतागुंतीची स्थिती; न उकलता येणारा घोटाळ्याचा प्रसंग.

**चौऱ्याहत्तर** वि. ७४ ही संख्या. सत्तर अधिक चार. पहा : **चौरेहत्तर**

**चौर्योन्माद** पु. (शि.)कोणतीही आर्थिक हतबलता नसताना, उलट आर्थिक सुबत्ता असतानाही वस्तू चोरण्याची अनिवार्य वृत्ती किंवा ऊर्मी; एक विकृती. [सं.]

**चौल** न. लहान मुलाची शेंडी राखण्याचा विधी; चूडाकर्म; चोळे : 'चौल तें कुमारावस्था जाण। ब्राह्मणपण उपनयनें।' - एभा २१.२५१.[सं.]

**चौल-ली** स्त्री. चवली पाव भार : 'अर्धी आसु नपुरे : मग चौलेया साटी आउसांची वाटी वीकीली:' - लीचउ ३९८.

**चौली** स्त्री. दोन आणे किमतीचे (चांदीचे) नाणे; दुणेली. पहा : **चवल, चवली**

**चौवणी** स्त्री. एक खाद्यपदार्थ : 'तांदुळ वेळिले: चौवणी एकवाट वेळिली:' - लीचउ २२४.

**चौवर** न. चवरे, वाखाचा गोंडा, सणावारी गाईगुरांच्या शिंगाला बांधतात तो : 'दिन दिन दिवाळी, गाया म्हशी ववाळी। गाया म्हशी चौवरं, शिंग भाई नव्वर।' - लोसाको.

**चौवरआढी चौचा अंक** - प्रशस्त मांडी घालणे.

**चौवा** पु. १. चव्वा; गंजिफातील, पत्त्यांतील कोणत्याही रंगाचे चार ठिपक्यांचे पान. पहा : **चव्वा**. २. फाशांच्या खेळातील चारांचे दान.

**चौविशी** स्त्री. चोविसांचा समुदाय.

वि. चोवीस भाग ज्याच्या पोटात आहेत असा (शेर इ.).

**चौवीस** वि. २४ ही संख्या; वीस अधिक चार; चोवीस. [सं.चतुर्विंशति]

**चौवेचा(ता)ळ, चौवेचा(ता)ळीस** वि. ४४ ही संख्या; चाळीस अधिक चार. पहा : **चौरेचाळ**

**चौशाला** पु. शेल्यासारखे एक वस्त्र : 'अंगावरील चौशाला दोन जोडिया होत्या.' - पेद १८.८८.

**चौशी-श्या** क्रिवि. चारी बाजूंनी; चहूकडून. (गो.)

**चौशेरी** स्त्री. चार शेरांचे माप,वजन.

वि. चार शेरांचे बनलेले (माप, वजन).

**चौस** पु. खाजणाचा भाग. (गो.)

**चौसर** पहा : **चौसार** : 'लहानपणापासून जडलेली शतरंज व चौसर यांच्या जुगारांची सवय उफाळून आली.' - गालिब १४.

**चौसष्ट-चौसट** वि. ६४ ही संख्या; साठ अधिक चार. [सं.चतु:षष्टि]

**चौसष्ट पिंपळी** चौसष्ट प्रहर खलून औषधाकरिता तयार केलेली पिंपळी.

**चौसष्टी** स्त्री. एकाच जातीच्या चौसष्ट वस्तूंचा समुदाय.

**चौसष्टी** स्त्री. (एका पक्षाच्या) एकाच रंगाच्या चार सोंगट्या मारल्या गेल्याने अंगावर येणारी बाजू, (सोंगट्यातील) चौवारी.

**चौसष्टी** स्त्री चौसष्ट कला : 'शिणल्या बहुत चौसष्टी। स्वरूप तुझे वर्णितां।' - हरिवि ३.४.

**चौसा** वि. खालच्या व वरच्या दाढा आलेला (बैल इत्यादी) : 'तो (सर्जा बैल) आता चौसा झाला होता.' - भेटी ९१.

**चौसार, चौसारखेळ** पु. १. सोंगट्या, बुद्धिबळांचा खेळ. २. बुद्धिबळाचा, सोंगट्याचा पट.

वि. १. चार सोंगट्या-सारांसंबंधी; बुद्धिबळाच्या खेळातील एक पारिभाषिक शब्द. २. चौकोनी. (प्रा.) [सं. चतुर्+सार]

**चौसा(सं)रणी** स्त्री. चौथ्यांदा (नांगरण्याची, वाचण्याची, आवृत्ती करण्याची) क्रिया करणे; चौथी पाळी.

क्रिवि. चौथ्याने; चौथ्यांदा.

**चौसा(स)रणे** उक्रि. (नांगरणे, वाचणे, उजळणी करणे इ. क्रिया) चौथ्यांदा करणे; चवथी पाळी करणे.

**चौसीम** स्त्री. चौथ्या प्रकारची हलकी जमीन.

**चौसोपी** स्त्री. १. चार सोप्यांची जागा; वाड्याचा एक भाग; चौक: 'मानकरी, सरदार वगैरेची तजवीज चौसोपीत लावावी.' - डुशि २.

२. चार सोप्यांचा समुदाय.

वि. चार सोप्यांची (इमारत, घर इत्यादी).

**चौह(हा)टा** पहा : **चोहृटा** : 'मग म्लेंछांचे वसौटे। दांगाणें हन कैकाटें। कां शिबिरें चौहटे। नगरींचे ते।' – माज्ञा १७.२९४.

**चौहद्द** स्त्री. चतु:सीमा दाखविणारा तक्ता, नकाशा.

**चौहाशी** वि. चारी बाजूंना नक्षीदार काठ असलेली (शाल इत्यादी).

**चौहो(हा)ट** पु. चौकाकृती दुकाने; चौकातील चतुर्वाही दुकाने. पहा : **चोहट–टा चव्हाठा** : 'रचनाविशेषें विचित्री। हाट चौहोटे तीथरी।' – ऋव २०.

**चौळा–ळी** पहा : **चवळा–ळी**

**चौंगा** पु. १. चार बोटे रुंदी; चार बोटांच्या प्रमाणेच (लांबीचे, रुंदीचे) माप; चार अंगुले; हाताच्या चार बोटांच्या मुळाशी दिलेला दोऱ्याचा वेढा. २. पंजा; तळहात : 'चौंगेयावरी चौंगा ठेविला' – अली ८९.

**चौंचे** उक्रि. १. पाहणे. (गो.) २. चालणे.

**चौंटके** पहा : **चोंडके**

**चौंडक** वि. ज्याला चार डंक्याचा मान मिळाला आहे असा.

**चौंडका–की–के, चौंटके** पु. स्त्री. न. चवंडके. पहा : **चोंडके** : 'आणि सहस्रार्जुन सपरिवारीं मारिला। त्याचिया धडाचा चौंडका केला।' – स्वादि १.६.७७; 'गोमुखी चळका चौंडकी दुटाळ।' – हरिवि २३.२७; 'एक मरणाचेनि धाकें काखे लोभाचें चौंडके।' – एरुस्व ११.६०. [क.]

**चौंडका** पु. तुणतुणे.

**चौंडाळणे** सक्रि. संकर करणे; बिघडवणे. पहा : **चौढाळणे** : 'गोवळीजन विटाळिला। चौंडाळिला व्यभिचारें।' – मुसभा ११.२६.

**चौंढळ** पहा : **चौढाळ**

**चौंधा** पु. १. चव्हाटा. २. चार गावची हद्द जेथे मिळते ती जागा : 'चौ गांवीचा चौंधा दक्षिणेस सुपे.' – मइसा १८.४.

**च्यकम्च्यकम्** उद्गा. तंबाखू वगैरे चघळताना होणारा आवाज : 'आपटेने जर्दाची चिमूट फक्कन तोंडात टाकली आणि हात झाडीत च्यकम्च्यकम् करू लागला.' – मकथा ६०.

**च्यक्** उद्गा. घोडा, बैल हाकताना उच्चारावयाचा शब्द : 'टांगेवाल्यानं घोड्याला ट्रक्, च्यक्, हाइद्, वगैरे करावं तसं तिचं चाललं होतं.' – अगं १०७.

**च्यवणे** अक्रि. १. घसरणे; ढळणे; पडणे : 'जननीकुक्षींतूनि क्रोधें च्यवला म्हणोनि तो च्यवन।' – मोआदि ३.१२. २. (ल.) पतन पावणे; भ्रष्ट होणे; नीतिमत्तेपासून ढळणे; चळणे: 'पिंडोदक क्रियालोपें च्यवती सर्व पूर्वज।' – गीस १.४१. [सं.च्यवन]

**च्यवन** न. १. घसरणे; पडणे; दूर होणे; च्युती. २. पाझरणे; स्रवणे; गळणे. [सं.]

**च्यवन** स्त्री. कलावंतीण; नायकीण. (गो.)

**च्याऊम्याऊ, च्यावच्याव** स्त्री. १. लहान मुलांचा एक खेळ. यात मुले एकमेकांचे कान धरून गाणे म्हणतात. २. (ल) भित्रेपणाने कच खाणे, माघार घेणे; काचरणे.

**च्याच्या** स्त्री. १. पकडलेल्या, दुखावलेल्या किंवा दुरावलेल्या पक्ष्यांचा आवाज, किंचाळी; चावचाव. २. (ल.) पिरपिर करणे; रडगाणे सांगणे; गयावया करणे. (क्रि. करणे.)

क्रिवि. १. गयावया करीत, पिरपिर करीत, च्याच्या आवाज करीत. [ध्व.]

**च्यान** प्रत्यय. पासून या अर्थी. उदा. कालच्यान = कालपासून. (देवाच्यान, गळ्याच्यान यातील च्यान शब्द शपथवाचक 'ची आण' असा आहे.) (कुण.गो.)

**च्याप्या** स्त्री. १.मोठ्या कुटुंबातील चिल्यापिल्यांचा एकत्रित गोंगाट. २. (ल.) पोरेबाळे; चिलीपिली. [ध्व.]

**च्यामारी** उद्गा. निषेधात्मक उद्‌गार : 'च्यामारी ! ते माझ्या लक्षातच नव्हतं.' –उकथा ११८.

**च्यायभले** उद्गा. आश्चर्योद्गार : 'च्यायभले ! म्हणजे आम्हीच मूर्ख !' – लव्हाळी १२५.

**च्यायला** उद्गा. निरर्थक उद्गार : 'लिहितानासुद्धा, च्यायला ! आमची भाषेची कसरत.' – लव्हाळी ११६–११७.

**च्यारी** वि. चारही : 'ऐसे च्यारी आत्मे।' – दास ८.७.४५.

**च्यावच्याव** स्त्री. च्याच्या; चिवचिव; ओरड; कटकट; गोंगाट.

**च्युत** वि. भ्रष्ट झालेला; पडलेला; गळालेला; घसरलेला; गळित. (समासात) पदच्युत; स्थानच्युत; अधिकारच्युत; बंधच्युत इ. [सं.]

**च्युतपंचम** वि. (संगीत) कमी उंचीचा पंचम : 'या पंचमाला च्युतपंचम असे नाव दिलेले आहे.' – मागोवा १७.

**च्युति–ती** स्त्री. १. घसरलेली, खालावलेली स्थिती, अवस्था; भ्रष्ट अवस्था; उतरती कळा; ऱ्हास. २. (शाप.) मार्ग सोडणे; सरणे; सरकणे. [सं.]

**च्युतिकोण** पु. जहाजावरच्या लोखंडाच्या आकर्षणाने 'ख' बिंदूमधून जाणाऱ्या वर्तुळाशी होकायंत्राच्या सुईने केलेला कोन. [सं.]

**च्युतिमंत** वि. पतनशील, ज्यामुळे पतन होते अशी : 'सर्वज्ञें म्हणीतलें : एक तें अच्युत पद : आन्यकें च्युतिमंतें पदें :' – लीचउ ४८४.

**च्यूइंग गम** चघळण्याच्या गोळ्या : 'चॉकलेट किंवा च्यूइंग गम.' – खर्डेघाशी ४८.

**च्येल** न. तांबडा व जाड कपडा. (गो.) [सं.चेल]





**छ** मराठी वर्णमालेतील बाविसावे अक्षर आणि सातवे व्यंजन.

**छ** उद्गा. नापसंती किंवा तिरस्कार दाखविणारे अव्यय. जसे : – छि: छि : इ.

**छ** १. जुन्या कागदपत्रात मुसलमानी तारखेसाठी चिन्ह म्हणून योजिले जात असे. उदा. छ५ मोहरम = मोहरमची पाचवी तारीख. २. पोथीच्या अखेरीस समाप्तिदर्शक चिन्ह म्हणूनही याचा वापर करतात.

**छई** स्त्री. मानमोडीचा गुरांचा रोग. [हिं.]

**छक** पु. (लोहारी) वस्तू पकडण्यासाठी जबड्याच्या आकृतीसारखी पकड; चक.

**छक(क्क)ड** स्त्री. १. थप्पड; चपराक. (क्रि. मारणे.) २. (ल.) दुर्दैवाचा फेरा; तोटा (व्यापारात). (क्रि. बसणे, येणे.) ३. लुच्चेगिरी ; कपट; फसवणूक. (क्रि. देणे.) ४. वादविवाद; झगडा; झोंबी; तंटा. 'शास्त्रीय पद्धतीतील हेत्वानुमानांची केवळ बुद्धिग्राह्य नीरस छक्कड सुटल्याचे कोणासही... वाईट वाटणार नाही.' – गीर ४६२. ५. पैशाचा तगादा. (क्रि. बसणे.) [सं.चक्]

**छक(क्क)ड** स्त्री. गाण्याचा एक प्रकार; लावणी : 'डफावर थाप मारून छकड म्हणतो.' – नाकरु ३.७४.

**छक(क्क)डभेद** पु. अव. युक्त्या; कपट; डावपेच. [सं. शकटभेद; हिं.]

**छकडा–डी** पु.स्त्री. १. एकबैली गाडी (दारुगोळा, खजिना, तंबू, डेरे वगैरे न्यावयाची). २. तट्ट्या घातलेली गाडी. ३. रेंगीपेक्षा किंचित मोठी गाडी; रेडू; पायटांगी; रेकला; एक्का. (व.) [सं.शकट]

**छकडी** वि. मोहक; नखरेल : 'एवढ्या सुंदर छकड्या पोरींना.' – गजरा २९.

**छकडी** स्त्री. सहांचे माप किंवा गट; समुदाय (कागद, फाशावरील सहा ठिपके, आंबे, रुपये इ.); तिफाशी सोंगट्यांतील सहाचे दान. [सं.षट्क]

**छकडे** न. लहान मुलाचे लाडके नाव; छबुकडे : 'तंव लहान मुलें आले छकडे ।' – दावि ३८०.

**छकणे** उक्रि. १. खोडणे; रेघ मारणे (व्यापाऱ्याच्या वहीमधील बाब). २. फसणे; ठकणे. ३. आश्चर्यचकित होणे; गोंधळून जाणे; दिपणे. [सं.चक्=प्रतिघात करणे]

**छक(क्क)ल–ली** न. स्त्री. तुकडा; खाप; फाक; फोड. [सं. शकल]

**छक(का)वणी** स्त्री. फसवणूक; हुलकावणी. (क्रि. दाखविणे.)

**छकवाछकवी** स्त्री. १. खोडणे; रेघ मारणे; बदलणे; शुद्ध करणे. २. फसविणे; मूर्ख बनविणे; धाब्यावर बसविणे.

**छकाछकी** स्त्री. १. चकमक; झटापट. २. थाटाची मेजवानी. (व.)

**छकुडी** स्त्री. मुलीला लाडिकपणाने दिलेले नाव.

**छक्क** वि. १. आश्चर्यचकित, आश्चर्यभरित; विस्मित; भ्रांत. २. अतिशय अशक्त. (व.) [सं. चकित]

**छक्कडधापडी** स्त्री. आंधळी कोशिंबीर (खेळ).

**छक्का** पु. हिजडा : 'छक्क्याचा तांडा नाचताना पाहून काशीरामच्या दारासमोर गर्दी जमली.' – माखा ५५.

**छक्का** पु. १. पत्त्यांतील सहा ठिपक्यांचा पत्ता. २. फाशांतील सहा हे दान. ३. सहांचा समुदाय. [सं.षट्क]

**छक्कापंजा** पु. पत्त्यांचा एक खेळ.

**छक्कित** न. ठकविणे; फसवणूक. [सं.छप्]

**छक्केपंजे** पु. अव. १. लबाडी; कपट; युक्ती; डावपेच; लपंडाव : 'दुसऱ्या महारांसारखे छक्केपंजे त्याला माहीत नव्हते.' – व्यंमाक १०. २. कूट; श्लेष, अंतर्लापिका. ३. बनावटपणा; नकलीपणा; पाल्हाळ. (पंजाच्या ठिकाणी हातचलाखीने छक्क्या किंवा छक्क्याच्या ठिकाणी पंजा आणतात. त्यावरून वरील लाक्षणिक अर्थ बनले आहेत). (क्रि. करणे, ओळखणे.)

**छगमग** वि. तगमग करणारा, तल्खली करणारा: 'गरभीन बाईला उन्हाळा छगमग । हौशा कान्तानं लाविली दारी केवड्याची बाग ।।' – लोसाको.

**छगल** पाण्यासाठी वापरण्याची चामड्याची झारी. [फा.]

**छचोर–रा** वि. रंगेल; छटेल; चटोर; बदफैली; नटवीः हलकट : 'सिंधूचे काम करणारी नटी जरा छचोर दिसली.' – ननाना १०७. [सं.छित्वर]

**छचोरी, छिछोरी** स्त्री. छचोरपणा; रंगढंग.

**छट** उद्गा. छे; नाही. [ध्व.]

**छ(छा)ट** वि. १. लुच्चा; सोदा; कपटी; फसव्या : 'पण तो कसला छट, त्याने मुळीदेखील दाद लागू दिली नाही.' – पलकोघे १४१. २.कृपण; चिक्कू. [सं.शठ]

**छटका** पु. १. धपली; तुकडा. (क्रि. उडणे, उडविणे.) २. पुष्पगुच्छ. ३. (ल.) शेवटास गोंडा असलेला लहानसा चाबूक. [ध्व.]

**छटकारा** पु. (सोनारी) रेगोतळीने दागिन्यावर काढलेली रेघ. [ध्व.]

**छटणी** स्त्री. काटछाट; छाटणी; कामावर असलेले लोक कमी करणे : 'औद्योगिक कलह कायद्यानुसार... छटणीच्या वेळी थोडा भत्ता मिळतो.' – अम ५४.

**छटन** स्त्री. बंडी : 'त्याच्या अंगातली अर्धी छटन भुजेवर ठिगळ दिलेली दिसत होती.' – बाब १०८.

**छटपटणे** उक्रि. तडफडणे; निंदा, टवाळी करणे; पंख आपटणे : 'माझे मन छटपटते.' – माताजी ११९.

**छटफट** स्त्री. टवाळी; निंदा; छी-थू. (क्रि. करणे, लावणे, मांडणे, चालविणे.)

क्रिवि. निंदा करून; टवाळी करून. [ध्व.]

**छटा** स्त्री. रंग; छाया; पद्धत; लकब (बोलणे, विचार करणे इ.ची).

पु. कवडसा; छाया; झाक : 'तिचे अंगावर सूर्याच्या कोमल किरणांचे छटे वृक्षांच्या पानांमधून पडल्यामुळे पातळावर कलाबतूचे बूटच काढले आहेत कीं काय अशी शोभा दिसत होती.' – रत्नप्रभा २. [सं.] (वा.) **० मारणे** – भाष्य करणे; टीकाटिप्पणी करणे : 'मधूनमधून प्रचलित राजकारणावरही ते छटा मारीत होते.' –धाधो ३८६.

**छटा** स्त्री. चव; लज्जत; लकेरी.

**छटा–टी** पु. १.छट्टा; टप्पा; मर्यादा; आटोका; पल्ला; अंतर. 'श्रीमंतांचा मुक्काम तीन कोसांच्या छटीनें सुप्यावर होता.' – ऐको ३९२. २. शैली. [हिं.]

**छटाक** पु. शेराचा सोळावा भाग (वजनी, मापी). [सं.षट्+टंक]

**छटाकी** स्त्री. १. छटाक भाराचे वजन किंवा माप. २.(ल.) सुग्रास जेवणास कुत्सितार्थी म्हणतात.

**छटाकी** स्त्री. छटेल, नखरेबाज, कलावंत स्त्री : 'सुगीच्या बाजारांत छटाक्यांची व कोल्हाटणींची गर्दी उडे.' - पाणकळा.

**छटाछट-टा** क्रिवि. खपाखप, सटासट अशा त्वरेने कापताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन. [ध्व.]

**छटादार** वि. झोकदार; शैलीदार : 'सभ्य गृहस्थाला छटादार भाषणही करता आले पाहिजे.' - मसप्र ४९.

**छटेल-ला** वि. १. बदफैली; छचोर; छाकटा; दुर्व्यसनी; नटरंगी: 'या छटेल पोरीशी गुरूचं लग्न.' - ऑक्टोपस ४५. २. झिंगलेला; मत्त.

**छट्टा** पु. टप्पा; अंतर; पल्ला. पहा : **छटा-टी**

**छट्टा** पु. डाग : ' जुन्या ओल्या रंगावर छट्टे पडले असतील...'- तप २४. [हिं.]

**छड** पु. सळ (खणाचा); घडीमुळे पडलेली रेघ.(काशी)

**छडणी, छडणूक** स्त्री. १. छळणूक; त्रास; यातना. २. (ल.) बारीक तपास; कसून तपासणे.

**छडणे** उक्रि. १. त्रास देणे; छळणूक करणे; गांजणे : 'यैसे बहुता... छडून काईल केले.' - पेद ६.५५. २.(ल.) कसून, खोदूनखोदून विचारणे; छेडणे ; तपासणी करणे. [हिं.छेडना, सं.शट्.]

**छडणे** उक्रि. १. सूर लावणे (गाण्याचा); रागदारीत म्हणणे. जसे :- ताल छेडणे; राग छेडणे. २. सतार, बीन, वीणा वाजविणे. [हिं. छेडना]

**छडा** पु. १. रेशमाचा गोफ किंवा सोन्याची साखळी (जिच्यामध्ये हातातील किंवा गळ्यातील दागिना ओवलेला असतो). २. खिशातील घड्याळाची साखळी. ३. गाठ किंवा पीळ असलेला दागिन्याचा दोरा, धागा.

**छडा** तोफा.

**छडा** पु.बारीक तपास; चौकशी; पत्ता; माग. (क्रि. लावणे, लागणे.): 'अद्यापि याचा मूळ छडा नीटसा लागला नाहीं.'- स्वप २६२. (वा.) ० **लावणे** - तपास करणे; शोधून काढणे : 'त्याच्या मनात आहे तरी काय ह्याचा छडा लावण्यासाठी मी म्हणालो.' - पिंपेर २२.

**छडाछड** स्त्री. १. बारीक चौकशी, तपास : 'त्यास सरकारचे आरमार करी यांणीं छडाछड करूं नये.' - समारो ४.३१५.

**छडाछड** क्रिवि. सपासप, छडीने किंवा फटक्याने मारले असता होणाऱ्या आवाजाप्रमाणे. [ध्व.]

**छडी** स्त्री. १. वेताची चमकी; बारीक लांब काठी. २. चोबदाराच्या हातातील चांदी-सोन्याची काठी. ३. वस्त्रातील विशिष्ट रंगाची रेघ, ओळ, पट्टी : 'छडी जुन्नरी रंग नाना तरंगी '- किंद्रौव ७९. [हिं.]

**छडीकाव** शिडकाव : 'जुने हशे लालहिरवे सोनेरी छडीकाव असे तसबिरांचें एकवीस फरदच राहिले.' - मदरूती : १७७.

**छडी टांग** १. उभ्याने करावयाचा कुस्तीतील एक डाव. (क्रि. लावणे). २. (ल.) प्रतिपक्षावर चटपट मात करणे : 'कशी? नुसती छडी टांक लावायची !' - वळीव १००.

**छडीदार, छडीबरदार** पु. चोबदार : 'राजेसाहेब एका छडीदाराच्या ललकारीत...' हाचिं १६९.

वि. छडीसारखे उभे पट्टे असलेले (कापड).

**छडीपट्टा** पु. दांडपट्ट्यासारखा काठी आणि फरीचा खेळ.

**छडू** पु. दंड.(वा.) ० **मारणे** - दंड थोपटणे (कुस्तीपूर्वी). [हिं.]

**छणकण-कन-कर-दिनी-दिशी** क्रिवि. विशिष्ट आवाजासह; ठणकन, ठणदिशी; रुपये मोजताना होणाऱ्या आवाजासारखा आवाज करून. [ध्व.]

**छणछण-णा** क्रिवि. १. ठणकन, ठणदिशी; सामान्यतः रोख, सरळ, मुक्त हस्ताने पैसा देणे या अर्थी. २. पायांतील चाळांच्या किंवा घुंगुरांच्या होणाऱ्या आवाजासारखा ध्वनी होऊन. [ध्व.]

**छणछणणे, छणाणणे** सक्रि. रुपये, ताशा इत्यादींचा छणछण असा आवाज होणे.

**छणछणाट** पु. १. छणछण असा मोठा आवाज. २. (ल.) दुष्काळाची मोठी हाकाटी; खणखणाट. ३. जोराची चावाचाव (माशा, डास यांनी केलेली).

**छणी** स्त्री. छिणी; दगड तासण्याचे, कोरण्याचे एक टोकदार लोखंडी हत्यार. (बे) [सं.छिद्]

**छत** न. १. पटई, कडेपाट, आढे, तख्तपोशी; अभ्रा; आच्छादन; चांदणी; चांदण, चांदवा. (कापड, फळ्या, चुन्याचा गिलावा यांची) : 'महालीं जरीचा छत चिरवीला।'- पला ४.३.(क्रि. बांधणे, भरणे.).२. गच्ची. (काशी) [सं.छत्र] (वा.) ० **उठवणे, बांधणे, भरणे** - पराकाष्ठेची बहार आणणे; रंग आणणे; शोभा आणणे: 'छोटूसिंगाने बोलण्याचें असे छत उठवून दिले, आणि अशी मिठ्ठास लावली कीं, फरुक्शार अगदीं गारेगार होऊन गेला.'- रूरा १३०.

**छत** स्त्री. तेज; चकचकाट.

**छत-कटोरी, छत-वाटी** स्त्री. (विअ.) विद्युतविरोधक पदार्थापासून (प्लॅस्टिक, बॅकेलाइट इ.) बनविलेली छताला टांगावयाची टोपी. या टोपीच्या तळाशी असलेल्या भोकामधून विजेची आच्छादित लवचीक तार बाहेर काढलेली असते.

**छतार** स्त्री. सहा तारांचे एक तंतुवाद्य ; सतार. [सं.षट् + तारा]

**छताविणे** उक्रि. छत लावणे; चांदवा लावणे.

**छ तीन नऊ** पु. अव. (तीन फाशांचा खेळ) फाशांवरील नऊ संख्येचे दान (जसे एका फाशावरील ६, एकावरील २ व एकावर १).

**छत्ता** पु. छत्री. (ना.) [सं.छत्र]

**छत्तिशी** स्त्री. १. छत्तीस परिमाणाचे वजन (तोळा, शेर, मण इ.चे). २. छत्तिसांचा समुदाय (माणसे, गुरे इत्यादींचा). ३.छत्तीस माणसांची आवश्यकता असणारे काम किंवा वजन. (को.) ४.(वैद्) छत्तीस औषधांचा समुदाय.

**छत्तिसा** वि. कावेबाज; धूर्त. (व.)

**छत्तिसाचा आकडा** (ल.) दावा; वितुष्ट. ३६ या आकड्यात एकमेकांची तोंडे विरुद्ध दिशेला असतात त्यावरून ज्यांचे कधी पटत नाही असे वैर.

**छत्तीस भार्या** (संगीत) छत्तीस रागिणी : 'तेणें साही राग छत्तीस भार्या। चौसष्टी मूर्च्छना दावूनियां । अनेक उपरागांच्या क्रिया । गाइल्या तेव्हा रिसानें ।'– हरिवि २५.११९.

**छत्र** न. (स्था.) घुमटी छप्पर; आवरण.

**छत्र** न. १. राजचिन्हाची छत्री (विशेषत: पांढऱ्या रंगाची). २.देवमूर्तीच्या डोक्यावर बसविलेली चांदीची, सोन्याची छत्री. ३.(ल.) आश्रय; संरक्षण : 'रडे गोपिकाबाई एकटी छत्र दिसेना नयनीं ।'–ऐपो १३५. ४. छत्री (पावसाळ्यात वापरण्याची). [सं.] (वा.) ० **धरणे** – स्वारीत असताना राजावर छत्री धरणे. सावली करणे; आच्छादित होणे. उदा. मेघांनी छत्र धरिले = आकाश मेघाच्छादित झाले.

**छत्र** न. अन्नसत्र; अन्नछत्र : 'आउसें नाथोकोरोचां छत्रासि गेली :'– लीचउ ९९.

**छत्रक** न. ज्योतिषशास्त्रातील एक शुभ योग : '१) आनंद, २) कालदंड ... ११. छत्रक असे २८ योग वार नक्षत्रानुसारी आहेत.' –सुज्यो ३४६, ३४७.

**छत्रचामर** न. राजचिन्हे; राज्याधिकारदर्शक वस्तू. [सं.]

**छत्रधारी** वि. पु. राजावर छत्री धरणारा. [सं.]

**छत्रपति–ती** पु. १. सार्वभौम राजा. २. श्री शिवाजी महाराजांनी 'श्री शिवराज छत्रपती' अशा अक्षरांचे पाडलेले तांब्याचे नाणे. यावर असलेल्या दोन उभ्या–आडव्या रेघांमुळे रूढ झालेले नाव दुदं(दां)डी.

**छत्रपति–ती** पु. अन्नछत्रात जेवणारा.

**छत्रबंध** पु. चित्रकाव्याचा एक प्रकार.

**छत्रभवरी** स्त्री. नृत्यातील एक आविर्भाव : 'देतां छत्रभवरीं अलग–भवरी.'– उगी ७०.

**छत्रभंग** पु. वडील माणसाचा मृत्यू. मृताच्या आप्तेष्टांकडे समाचारास गेले असता (मृत मनुष्य वडील असेल तर) छत्र नाहीसे झाले असे म्हणतात.

**छत्रभूत (होणे)** सर्वांवरील अधिकारी (होणे) : 'आपण छत्रभूत होऊन आले उपरांतिक सर्वत्रास धीर भरवसा आला आहे.'– ऐको ३९३.

**छत्रसिंहासन** पहा : **छत्तचामर**

**छत्राक** न. अळंबे; कुत्र्याचे मूत. एक वनस्पती. याचा देठ आणि पाने छत्रीसारखी असतात. [सं.छत्र]

**छत्री** पु. १. उन्ह किंवा पाऊस लागू नये म्हणून मेघडंबरी आकाराचे डोक्यावर धरावयाचे साधन; छत्ता; आतपत्र. २. समाधी व तीवर बांधलेली इमारत. [सं.छत्र]

**छत्रीधारी** पु. अवकाशात उघडणाऱ्या विशिष्ट हवाई छत्रीच्या साहाय्याने विमानातून उडी घेणारे सैनिक.

**छत्र्या** वि. राजाच्या मस्तकावर छत्री हे राजचिन्ह धरणारा दरबारी नोकर.

**छदाम** पु. १. पैशाचा एक चतुर्थांश (नाणे); दोन दमड्या; सहा दाम. २. (ल.) अल्प अंश; किंचित भाग; जवळजवळ अभाव : 'त्याच्याजवळ छदामही शिल्लक नसतो.'– सामा १८२. [सं.षट् + द्रम्म]

**छ दोन आठ** पु. (तिफाशी खेळ) फाशावरील आठ हे दान (एकावर सहा व दोहोंवर एक एक असे).

**छद्म** न. १. कपट; लबाडी लुच्चेगिरी; कपटाचा वेष. समासांत छद्मकृती, छद्मभाषण. छद्मवाक्य, छद्मवेश, छद्मव्यवहार : 'छद्में कल्याण नसे ऐकावें प्रथम हें सदुक्तपण ।'–मोसभा ६.१०३. २. उपरोधिक भाषण किंवा त्यातील खोच; वर्म. ३. इंगित; मतलब; गर्भितार्थ (कविता, वाक्य यांचा). [सं.]

**छद्म** न. १. व्यंग; दोष. २. सबब. ३. रहस्य, गूढ, अभिप्राय. [सं.]

**छद्म** न. (सास.) व्याजस्तुती; व्याजनिंदा; उपरोधिक भाषण. [सं.]

**छद्मनाम** न. (सास.) लेखनासाठी पौराणिक किंवा ऐतिहासिक व्यक्तीचे धारण केलेले नाव. उदा. रामशास्त्री, द्रोणाचार्य. [सं.]

**छद्मभेद** पु. वर्मावर बोट ठेवणे; रहस्य उघडकीस आणणे: 'प्रसंगच पडला तर उपहास आणि छद्मभेद या साधनांचा भरपूर उपयोग तात्यासाहेब करीत असत.'– विश ४८. [सं.]

**छद्मवेष** पु. (सास.) कपटवेष; खरे स्वरूप लपविणे. [सं.]

**छद्मावरण** न. (राज्य.) आपली शस्त्रे, साहित्य, रस्ते इत्यादी गोष्टी शत्रूला दिसू नयेत म्हणून नैसर्गिक वातावरणाचा उपयोग करून शत्रूला फसविणे. [सं.]

**छद्मी** वि. १. कपटी; खोडकर; मतलबी : 'आम्ही छद्मीपणे हसत होतो.'– पुत्र५१. २. मर्मभेदक; तिरसट.

**छन** पहा : **छिनी**

**छनछनाट** पु. ध्वनिसूचक शब्द : 'छनछनाट, किणकिणाट .' – अआमागो १४.

**छनणे** उक्रि. गाळणे; चाळणे : 'सखाराम भैय्याकडे भंग छनण्याचे काम असे.'– काम्हाएम्हा १४.

**छनापन** स्त्री. झटापट ; चढाओढ : 'भेट झाली पाहिली हानीपानं । दोघांची लागली छनापन । जैतून वाटं मारिला जपून : '– ऐको ३९३.

**छन्न** वि. झाकलेले; आच्छादित. [सं.]

**छन्नमार्ग** पु. विविध कक्षांना, भागांना जोडणारा मार्ग; सज्जा; आच्छादित मार्ग : 'आम्हाला बराच वेळ छन्नमार्गामध्येच तिष्ठत'– असा १५५.[सं.]

**छन्नस्मृति–ती** स्त्री. (मानस.) अबोधावस्थेतील सुप्त आठवणी. [सं.]

**छन्नी** स्त्री. दगड छिलण्याचे, भोक पाडण्याचे, तोडण्याचे एक पोलादी हत्यार : 'अश्मयुगातील दगडाच्या छन्नीपासून... ॲटमबॉम्बपर्यंत.'– सशा ६३. [सं.छिद्]

**छपखून** पु. १. पहा : **शब्खून**. २. रात्रीचा हल्ला; रातघाला : 'राजश्री गोपाळराव गणेश याणी राजश्री आपाजी गणेश याचे फौजेवरी दगा करून छपखून करून काही लोक लुटिले व बाकीचे पलोन गेले.'– पेद ३७.१०४.

**छपणे** अक्रि. लपून बसणे; दडणे; गुप्त राहणे. [सं.क्षिप्]

**छपरमैना** स्त्री. सॅपर व मायनर याचा अपभ्रंश. पलटणीतील रस्ते वगैरे करणाऱ्या लोकांची तुकडी. [इं. सॅपर्स अँड मायनर्स]

**छपरी** स्त्री. १. लहान झोपडी; खोपटी. २. पडवी; ओसरी.(व.) ३. छत : 'काळ्या ढगांची छपरी पूर्वेकडे सरकू लागली.'– श्रीयो ३२५.

**छपरी मिशा** ओठ झाकले जातील अशा सोडलेल्या मिशा : 'त्यांचा...

उग्र चेहरा, भरघोस छपरी मिशा सर्व कसे अजून डोळ्यांपुढे येते.'– विरंगुळा १२०.

**छप(पा)वणी, छपवणूक** स्त्री. लपविण्याची क्रिया; पांघरूण घालणे.

**छपवाछपवी** स्त्री. छपवणी; लपवालपवी; उडवाउडवी.

**छप(पा)विणे** सक्रि. लपविणे; दडविणे. [सं.छप्]

**छपाई** स्त्री. १.छापण्याची क्रिया. २. छापण्याची मजुरी.

**छपाछप** पहा : **छटाछट**

**छपाटी** स्त्री. छडीने दिलेला मार : 'जनावरांना छपाट्या मारीत ते (जत्रेकरी) चालले होते.' – व्यंमाक ७७.

**छपेली** स्त्री. १. वाड्यापुढील चुनेगच्ची. २. आगाशी; तटाच्या वरील गच्ची; सफेली. [फा.सिफाली]

**छपेलू** वि. सहा पैलू असलेला : 'पांच मदनाईक छपेलु.'– समारो ३.७१.

**छप्पन्न** वि. ५६ ही संख्या; पन्नास अधिक सहा. अनेक देश, भाषा, व्यक्ती इत्यादींचा उल्लेख करताना या आकड्याचा वापर करतात. उदा. छप्पन्न देश; 'तुझ्यासारखे छप्पन्न पाहिले आहेत.' वगैरे : 'छप्पन्न देश अनुतापें नाचताती तेधवा ।' – हरिवि ५.७८ [सं.षट्पंचाशत्.]

**छप्पन्न दिवाळ्या** वि. सदोदित दिवाळे काढणारा.

**छप्पन्नवेळ, छप्पन्नहजार** क्रिवि. अनेक वार; अनेक वेळा.

**छप्पन्नी–न्या** वि. १. अनेक देश हिंडून, अनेक भाषा शिकून आलेला (माणूस); त्यावरून. २. (ल.) लुच्चा; धूर्त; फसव्या.

**छप्पर** न. १.घरावरचे आच्छादन; कौलार. २. ताटी; चौकट (घराची पाखी झाडण्यासाठी, सावलीसाठी, वाटेल तेथे उभी करता येण्यासारखी). ३. पलंगावरचे छत. ४. झोपडी; खोपट. ५. (ल.) डोकीवरील वाढलेले केस. ६. (चर्म). चपलेच्या खालच्या तळावरील वरचे तळ. (क्रि. कापणे.) [सं.क्षिप्]

**छप्परपलंग, छप्रपलंग** पु. छत असलेला पलंग किंवा खाट : 'निजण्याचा छप्परपलंग वगैरे गोष्टी आणल्या होत्या.'– दौलत १२०.

**छप्परबंद** पु. १. शाकारणी करणारा माणूस. २. खोटी नाणी पाडणारी एक गुन्हेगार जात.

**छप्परबंदी** स्त्री. १. शाकारणी. २. तात्पुरत्या झोपड्या बांधणे; बांधलेल्या झोपड्यांची रांग.

वि. छप्पर असलेले ; छपरी.

**छप्परमैना** स्त्री. बुरूज, किल्ले, बंधारे , खंदक, भुयारे इ. स्थापत्याची कामे करणारे कारागीर.

**छप्पा** पु. सहा चरणाचे वृत्त : 'हे वाचून मला अपार आनंद झाला, शामकभट्टाचा छप्पा आठवला.'– मसप्र ६७.

**छप्पा** पु. १. शिक्का; उठाव; मोहोर. (क्रि. मारणे.) २. कपाळावरील गंधाचा टिका. (क्रि. लावणे.) पहा : **सप्का** [सं.क्षिप्]

**छप्पा** पु. शत्रूवर अचानक केलेला हल्ला. (क्रि.घालणे.) (वा.)० **वळणे** – १. शत्रूवर जोराचा हल्ला करणे. २. पुष्कळ नाश होणे.

**छप्पाछप्पी** स्त्री. कापाकापी ;सपासपी. पहा : **छटाछट**

**छप्पापाणी** न. मुलींचा एक खेळ; हा खेळ पुष्कळ मुली एकत्र येऊन खेळतात. यात एकीवर शिवण्याची पाळी येते व तिने कोणत्याही एका मुलीस शिवून डाव फेडावयाचा असतो. (क्रि. घालणे.) : 'फुगडी संपली की छप्पापाणी सुरू होत असे.'– पालखी ५८.

**छप्पी** स्त्री. छडी. (क्रि. खाणे.) (कर.)

**छब** स्त्री. १.आकार; ठेवण; आकृती; घडण; रूप (विशेषत: प्रिय). २. नेटकेपणा; सौंदर्य; बोलण्याचालण्याची ढब; मुद्रा; नूर. [सं.छवि]

**छबकडा–डी** वि. सुंदर; मोहक; गोजिरवाणा; गोंडस : 'रांगायला लागलेली दोन छबकडी – मुलं.'– इन्साफ २७५.

**छ(छा)बडी** स्त्री. फळे किंवा मिठाई ठेवण्याकरिता केलेली बांबूची करंडी.

**छबडे** न. गोजिरवाणे मूल : '...व पांचचार छबडीं पोरें पैदा केलीं'– माता ६२.

**छब(बी)दार** वि. १. सुंदर; सुरेख आकाराचा. २. मनाला आवडणारा; मोहक (काम, आकार, रूप).

**छबना–न्या** वि. गोंडस; सुरेख; नीटनेटका; मोहक; विशेषत: पोकळ व दिखाऊ माणसाबद्दल योजतात.

**छबिना** पु. देव किंवा राजाची मिरवणूक, पालखी : 'ऐतबार सोन्याचा ऐतबार सोन्याचा । छबिना तिथे धन्याचा कैराचा हिंगूळ ।।'–लोसाको.

**छबि(बी)ना** पु. १. घोडदळाचा पहारा; रातपहारा (लष्कर किंवा किल्ला यांच्या भोवतालचा तसेच राजा, देव यांच्या मिरवणुकीबरोबर असणारा): 'शनिवारवाड्याच्या त्या उत्तराभिमुख प्रवेशद्वारावर छबिन्याचे शिपाई शिस्तीत उभे होते.'– स्वामी ३. २. स्वारीमध्ये असणारे घोडदळ किंवा पायदळ. ३. आरमारातील पहारा करणारे जहाज किंवा काफिला. ४. आबकारी खात्याची पहाऱ्यावर असलेली जलद जाणारी होडी; सरकारी प्रवासी गलबत. [फा.शबीना]

**छबि(बे)ला** वि. गोजिरवाणा, सुरेख. पहा : **छबदार** [सं.छवि.]

**छबी** स्त्री. पाणी ; तेज : '... बरोबरीला तमाम फौजेची छबी पळाली.'– भाव ८३.

**छबी** स्त्री. तसबीर; चित्र. [सं.छवि]

**छबीना** पु. चणे वगैरे खाद्य : 'प्रत्येकाला रोज अर्धा आणा छबिन्याकरितां म्हणजे चण्याकरिता देण्याचें ठरलें.'–चिज जुलै १९४०. पहा : **चबिणा**

**छबेली** वि. गोंडस; मोहक : '... छबेली नार'– मला १५४.

**छब्बा** पु. १.( संकेताने) रुपाया. २. सुंदर, सुरेख, हुशार मुलगा.

**छमकणे** अक्रि. १. पहा: **छणछणणे**. २. (स्त्रीचे) ठुमकत चालणे.[ध्व.]

**छमकर–कन–दिनी–दिशी** क्रिवि. दागिन्यांचा, छडीच्या माराचा छमछम आवाज, पैशांचा आवाज, यासारखा आवाज होऊन.[ध्व.]

**छमकावणे** सक्रि. छम् असा आवाज करून मारणे : 'पोरांच्या हातावर छडी छमकावायला त्यांनी कमी केले नाहीं.' – दुर्दम्य १४२.

**छमकाविणे** उक्रि. सढळ हाताने खर्च करणे.

**छमछम– मा** क्रिवि. छम्कन. पहा : **छणछण–णा** [ध्व.]

**छमछमाट, छमछमी** पु. नृत्यातील नुपूर, अलंकार इ.चा मोठा आवाज.

**छर** स्त्री. लहर; हुक्की; झटका : 'असेही काही पुरुष... वैराग्याच्या छरीत सांगतात.'– अहिल्या १४.

**छरा** पु. (गवंडी) वाळू व सिमेंट यांच्या मिश्रणाचा भिंतीवर सडकून मारावयाचा लेप. [सं.क्षर]

**छर्दी** स्त्री. ओकारी; उलटी. [सं.छर्द]

**छर्रा** पु. १. बंदुकीची बारीक गोळी. २. लोखंडाचे बारीक तुकडे, कण, गोळ्या वगैरेचा तोफेतील बार; खुर्दा : 'सुरा पाठींत, छर्रा उरीं।' – मर्ढेकर [सं.क्षर] (वा.) **छर्रे उडविणे** – जोरदार आणि आवेशपूर्ण भाषण करणे.

**छल** पु. नैयायिकांनी केलेला एक दोषप्रकार. चर्चेत होत जाणाऱ्या दोषांचे नैयायिकांनी तीन वर्ग केलेले आहेत. या तीन वर्गास त्यांनी 'छल', 'जाति' व 'निग्रहस्थान' अशी नावे दिलेली आहेत. [सं.]

**छल–ळ** पु. १. कपटवेष, रूप, सोंग, २. ढोंग; बतावणी. ३. कपट, लुच्चेगिरी : 'धर्म म्हणे छळ करिसी मर्यादा त्यजुनि ढाळिसी फासे।' – मोसभा ४.५. [सं.]

**छल–ळ** पु. त्रास; सतावणी; जाच. [सं.]

**छल(ळ)क** वि. छल करणारा; त्रास देणारा, कपटीः 'राजे गुमानासिंग बहुत कृत्रिम, बहुत छलक; सरकारात लक्ष थोडे.' – ऐले पा. म्यु. प्र – १५३ [सं.]

**छल(ळ)कट** वि. उंच आणि सडपातळ. (कों.)

**छलकपट** पहा : **छल–ळ** : 'याने आजवर छलकपट करून अनेकांना छळले आहे.' – लोसंक्षि १४१.

**छलछिद्र** न. कपट; छापा : 'पूर्वी हायदर नाईकही छलछिद्रें अशीं बहुत करीत होता. परंतु श्रीमंतांचे प्रतापे फौजा टिपूचें पारपत्यच करीत गेल्या आहेत.' – ऐको ३९४. (क्रि. करणे, घालणे)

**छलना** स्त्री. त्रास.

**छल बेछल** वि. विस्कळीत; विखुरलेले; उसकटलेले.

**छलांग** स्त्री. उडी; एका ढांगेचे अंतर : 'अवघ्या पाचसहा छलांगांत वाघ पुन्हा आडवळणानें येऊन उभा राहिला.' – मनोरं जुलै १९३८.

**छलांग तान** (सं.) एक प्रकारची तान : 'बिजलीकडक तान, छलांग तान असले प्रकार बालगंधर्वांनी केलेच नाहीत.' – विशा ३२५.

**छलित** वि. शृंगारिक : 'छलित काव्ये म्हणजे शृंगारिक काव्ये...' – लोसारू ८५.

**छल्ला** पु. १. हाताच्या बोटांत घालावयाची सोन्याची अष्टपैलू अंगठी; सल्ला. २. सामान्यत : स्त्रियांच्या कमरेस अडकविला जाणारा चांदीचा दागिना. यास चांदीचे कडे असून त्यात महत्त्वाच्या किल्ल्या अडकविण्याची व्यवस्था असते.

**छल्ला** वि. शेवटचा.

**छल्ला** पु. मठ; अड्डा : 'या दावलमलिकचे छल्ले ठिकठिकाणी पसरलेले असून --' – सूसं १००.

**छल्लाटा** वि. शेलाटा, उंच व सडपातळ : 'धाकला माझा दीर गोरा छल्लाटा नाकयेला। किती धाक मी लावू त्येला ।' – लोसाको.

**छल्ली** वि. छचोर; छाकटा. (व.)

**छवडी** स्त्री. फोकांची विणलेली लहान टोपली : 'आईनं सांदन टुपन करायचं, छवड्या, कुडुकी द्यायचं.' – उपरा ६.

**छवि–वी** स्त्री. १. प्रकाश; कांती; तेज; लावण्य; सौंदर्य; शोभाः 'तेवीं निंदोपाधी आंतगर्वी। मंद जाहली प्रज्ञा छवी।' – एभा ५.१७५. २. प्रतिकृती; छाया ; छायाचित्र. [सं.]

**छळ** पु. १. त्रास; पीडा; शारीरिक वा मानसिक इजा पोचवणे; दुःख देणे; अत्याचार; जुलूम. २. कपट.

**छळ** पु. अभिमान; ईर्ष्याः 'देवा : प्रतापछळें चालिजे : पुरुषार्थपणें भीमकीतें प्रणीजे ' – रुस्व १२४४.

**छळकी** स्त्री. नादबद्धता : 'चिपळ्यांच्या छळकीवर महाराज गात होते.' – श्रीयो १३७.

**छळछद्म** पु. सोंगढोंग, कपटकारस्थान : 'जो छळछद्म बोलत नाही.' – एवाका १२९.

**छळछावणी** स्त्री. (राज्य.) राजकीय विरोधकांचा छळ करून, त्यांना सक्तीने काम करायला लावून आणि इतर विविध मार्गांनी यातना देण्यासाठी लोकवस्तीपासून दूर स्थापन केलेल्या छावण्या.

**छळण–णी, छळणूक** स्त्री. त्रास; सतावणे; गांजणूक.

**छळणा** स्त्री. सतावणी; त्रास; पीडा : 'माझी नाना तऱ्हेनें छळणा व हेळणा करून.' – मंजुघोषा १०१.

**छळणे** उक्रि. १. त्रास देणे; गांजणे; सतावणे. २. भयभीत होणे. [सं.छलयति]

**छळणे** अक्रि. कपट करणे; ठकविणे; फसविणे : 'तो प्रमदामदें वेधवोन। नगरा आणावा छळून।' – भाराबाल १.१००. [सं.छल = कपट]

**छळणोक्ती** स्त्री. कपटवचन : 'मिथ्याजल्प, छळणोक्ती, वक्रोक्ती.' – एवाका १२९.

**छळवाद** पु. १.सतावणी; गांजणूक : 'चीनने ब्रम्ही सरकारचाही कायम छळवाद चालविला होता.' – मालआ ७३. २. त्रासदायक स्वभाव.(राजा.)

**छळवादी** वि. सतावणारा; गांजणारा; कजाग.

**छळविभ्रम** पु. (मानस.) संभ्रांती (संशयग्रस्तता) आणि दुर्मनस्क (चित्तविकृत) रुग्णांमध्ये आढळणारे प्रमुख लक्षण. कोणत्याही दोन व्यक्ती बोलताना दिसल्यास त्या (आपल्या विरुद्ध) कट कारस्थान करीत आहेत असे वाटणे.

**छंगीफंगी** वि. व्यसनी; दुर्गुणी; छंदीफदी : 'छंगीफंगी दोस्तांच्या नादी लागून.' – माजीगा ३७०.

**छंद** वि. गुप्त; झाकलेले. [सं.छन्न]

**छंद** पु. १. ध्यास; ओढा; आवड (चांगल्या-वाईट गोष्टींची). (क्रि. घेणे, धरणे, लागणे.) २. उत्कट इच्छा; आग्रह; हट्ट; नाद; सोस : 'ऐसा नाथिला छंदु अन्तःकरणें। घेऊनि ठाके।' – ज्ञा ६.७४. ३. मर्जी; इच्छा; खुषी. ४. खोड्या; उनाडपणाचे वर्तन; ख्याली खुशाली. [सं.] (वा.) **छंदांस लागणे, भरणे** – नादी लागणे; मोहून जाणे : 'लागले तुझ्या छंदा। सोडून कामधंदा।' – पेंगौग्रं ११९.

**छंद** पु. १. शब्दांची लयबद्ध गानयोग्य रचना : 'गायत्री छंद जे म्हणिजे।' – ज्ञा १०.२८२. २. वेदाचे एक अंग; छंदःशास्त्राचा ग्रंथ.

**छंद–दू** पु. १. वर रंगीबेरंगी लाखेची नक्षी असलेली बांगडी. २. पायात घालावयाचे नक्षीदार पैंजण. ३.स्त्रियांचा एक दागिना : 'नागबंद छंद पाठीवर । सूर्याची शोभती कोर चंद्रकोर ।'– ऐपोकेखं २.१९७.

**छंदखोर, छंदवाईक** वि. छंदिष्ट; लहरी; नादी.

**छंदफंद** पु. अव. रंगढंग; छांदिष्टपणा; नखरे; व्यसन : 'तोच त्यांचा उच्छृंखल छंदफंद होय.' – अंया ७.

**छंदफंद, छंदविच्छंद** पु. अव. बाष्कळपणा; खोड्या; ढंग; धुमाकूळ; नखरे. (क्रि. करणे, मांडणे, लागणे.) : 'अजुनि किती दाखवसील छंद फंदडें ।' – होला ८९.

**छंदफंदडा** पु. नखरा : 'देऊन आम्हां भुलथाप आतां किती दाखविसी छंदफंदडे ' – मला १४१.

**छंदबंद** पु. एक अलंकार : 'छंदबंद बंगले सुशोभित.'– मंजुघोषा ४६.

**छंदमरण** न. इच्छामरण : 'छंदमरण अति दुर्जय अमरांत नसे असी महामरता ।' – मोमीष्म ११.१५४.

**छंदलग** वि. ज्याचा छंद लागला आहे असा : 'तें हें चतुर्भुज कृष्णरूपें खेळे । माजिं त्या गोपाळें छंदलग ।' – निगा ७८.

**छंद:शास्त्र, छंदरचनाशास्त्र** न. वृत्ताविषयीचें शास्त्र; पद्यरचनेची मूलतत्त्वे सांगणारे शास्त्र. [सं.]

**छंदानुरोध** पु. दुसऱ्याच्या कलाने जाणे, आर्जव; खुशामत.

**छंदी** वि. नादी; एकाच गोष्टीचा ध्यास असलेला : 'अशा प्रकारचे छंदी, लहरी वर्तन.'– वज्राघात ३७.

**छंदीफंदी** वि. वाईट चालीचा, सवयीचा; छंदखोर; व्यसनी; चंगीभंगी.

**छंदेछंदे** क्रिवि. हळूहळू; मंदगतीने; संथपणे : 'छंदें छंदें वेणु वाजे ।' – मागा २३४.

**छंदोबद्ध** वि. पद्यरूप; कविताबद्ध;नियमित.

**छंदोभंग** पु. गणांच्या नियमांचे उल्लंघन; वृत्तनियमांचे उल्लंघन; गण मोजण्यातील चूक : 'कोठे (काव्यात) छंदोभंग झालेला असतो.'– भ्रपने ३१.

**छंदोवती** स्त्री. (संगीत) चौथ्या श्रुतीचे नाव.

**छाआ** स्त्री. छाया; सावली: 'तुवां माझी छाआ बिघडिली ।' – श्रीकृच १८ (१).

**छाउ** पु. आश्रय; सावली. [सं.छाया]

**छाक** स्त्री. झाक.

**छाक** उद्गा. मुळीच, अजिबात; छायामात्र.

**छाकटा** वि. पहा : **छटेल.** छानछोकी करणारा; नखरेबाज; अक्कडबाज धूर्त; चतुर; छचोर; धुंद : 'छाकट्या' वडील सभ्य माणसासारखी शिवी देऊन म्हणाले.'–पोपट ७५. [सं.शठ]

**छाकटेपण** न. नीचपणाची वागणूक; हलकटपणा. [सं.शाक्त]

**छाकटेपणा** पु. छटेलपणा : छचोरपणा : 'मुंबईचे लोक बूट – पाटलोणी घालून छाकटेपणा करतात.' – गआचा ६६.

**छाकणे** अक्रि. झिंगणे; नशा करणे.

**छाग, छागल** पु. बोकड. [सं.]

**छाग, छागल** पु. कातड्याचा पोहरा; कातड्याची पाणपिशवी : 'गडावरच्या राजरस्त्यावर छागल, पखाल, मषकधारी पाणी शिंपीत होते.'–श्रीयो २.१८२. [सं.]

**छागमेध** पु. ज्यात बोकडाला बळी देत असा यज्ञ : 'छागमेधही बंद झाले.' – भासं १८३.

**छागवस्त्र** न. लोकरीचे कापड : 'तिळ कृष्णाजिन छागवस्त्रे ।' – गुच ३७.६.

**छाछू** अंगारेधुपारे, मंत्रतंत्र, जादूटोणा (करणे) : 'तिचा सासराबी बसल्या बसल्या छाछू करून पोटापुरते मिळवतो.' – मळणी २. [सं.]

**छाट** पु. १. खाप; तुकडा; धांदोटी. २. तोडावयाचा किंवा तोडलेला भाग (पाहिजे असलेला आकार यावा म्हणून). ३. खाली उरलेला गाळसाळ; निवडून टाकलेला भाग. ४. वर्गीकरण; निवड. [हिं. छटना]

**छाट** वि. लबाड; धूर्त. (ना.)

**छाट** वि. हुशार : 'बरं नि माठ मन्ह हिरदमां छाट । भाऊतले दिखिसन मन करस मोठं ।' – जामो ३३६ (आदि.)

**छाटकलम** न. (वन.) जिवंत खोड अथवा फांदी यांचा कापून काढलेला तुकडा; मूळच्या वनस्पतीपासून तशीच नवीन वनस्पती बनवण्याकरिता हा तुकडा (कलम) उपयुक्त असतो. उदा. गुलाब, जास्वंद, कण्हेर.

**छाटकं** वि. पोषाखी. पहा : **छाकटा** : 'माणूस लय छाटकं निघालंय! कपड्यावरनं हा माणूस महार हाय का मराठी हाय, काय कळंना.'– तअं ३७६.

**छाटका** वि. थापेबाज; ढंग करणारा. [सं.शठ]

**छाटछूट** क्रिवि. आटोपशीर : 'छाटछूट करायचं.' – कलंदर ३४३.

**छाटछूट** स्त्री. १. खाप; तुकडा. २. कापणे (ढलपा). ३. (ल.) छाटणी.

**छाटण–णी** स्त्री. कॉलर छाटलेला आखूड सदरा : 'अंगात पातळ मलमलीचा छाटण घालून तो (भैय्या) पाटावर बसलेला असतो.'– व्यंमाक २३९.

**छाटणी** स्त्री. १. कापणी; तोडण्याची क्रिया. २. कपात : 'नोकरांची अगर कामगारांची छाटणी करणे.' – वक्तृत्व १३४. पहा: **छाट**

**छाटणे** सक्रि. १. कापणे; तोडणे; भादरणे; कातरणे. २. खुडणे. ३. वर्गवारी लावणे; निवडणे. ४. झटकन कापणे. ५. कपात करणे (पगार, खर्च यांत). ६. कत्तल करणे (सैन्याची). ७. प्रवाहातील पाण्याची धार हाताने तोडीत पोहोणे. [सं.छर्द]

**छाटणे** सक्रि. १. भट्टीत न घालता वस्त्र चुबकून धुणे. २. हलक्या हाताने मळ काढून टाकणे.

**छाटणे** सक्रि. १. (पाणी वगैरे) शिंपडणे. २. (गप्पा) मारणे; (वादविवाद) करणे. ३. श्वास, दम कोंडून धरणे.

**छाटन** स्त्री. कंबरेभोवती गुंडाळण्याचे वस्त्र : 'दुरून वळखिते चाली माझ्या पठानाची । माझ्या विठ्ठल हरीची घुंगरं वाजती छाटनाची ।'– लोसाको.

**छाटा** पु. १. एक थेंब; शिंतोडा; तुषार. (क्रि. मारणे, उडविणे, उडणे, येणे.) २. डाग; ठिपका (रत्नातील एक दोष.).

**छाटा** पु. टप्पा; पहा : **छट्टा** : 'तो तेथून गिलच्यास सोळा कोसांचा छाटा होता.' – भाब ६८.

**छाटाछाट** स्त्री. १. कापाकापी. २. (ल.) कपात (पगारात, खर्चात) : 'पगारांचे मान बदलतानाही इष्ट तेवढी छाटाछाट एकदम केली जाणार नाही.' – धरागाले ९.

**छाटी** स्त्री. १. संन्याशाचे अंगावरचे वस्त्र; कफनी. २. हातरुमाल : 'देवस्थानसाठी ज्या छाट्या (कफनी) वापरल्या' – गाविदि ९४. [सं.शाटी]

**छाटीव** वि. १. कापलेला; छाटलेला. २. वेचक; निवडक. पहा : **छाटणे**

**छाड** पु. गुरांचा एक रोग; घटसर्प.

**छाडाछेड** स्त्री. छळ; तसदी; त्रास : 'रयतेस छाडाछेड केली.' – मज्ञात १४३. [छेडणे द्वि.]

**छाण** स्त्री. परीक्षा; छाननी; तपासणी; निवड. [सं. शान्]

**छाता** पु. छत्री. [हिं]

**छाता** पु. मधमाशांचे पोळे. [सं. छत्र]

**छाताड** न. छाती. (उपहासाने किंवा आश्चर्याने रुंद छातीस म्हणतात).

**छाती** स्त्री. १. वक्षःस्थळ; उरोभाग. २. स्त्रियांचे स्तन. ३. (ल.) धैर्य; धाडस; हिंमत; साहस. पहा :**ऊर**. [सं.वक्षस् + स्थिति] (वा.) ० **असणे** – हिंमत होणे; धीर होणे. ० **करणे, काढणे** – धैर्य दाखवणे. ० **धडधडणे** – धडकी भरणे; भीती वाटणे. ० **पिटणे** – दुःखाने छाती बडवणे. ० **फाटणे, फुटणे**– दुःखाने अंतःकरण विदीर्ण होणे. ० **भरून येणे** – दुःखाचा उमाळा येणे ; दुःखाने हृदय दाटणे. **छातीचे सहाने होणे** – छाती आत जाणे; कमालीचे अशक्त, कमजोर होणे. **छातीचा कोट करणे**– अतिशय धाडसीपणा दाखविणे. एखाद्याच्या रक्षणासाठी स्वतः धाडसाने उभे रहाणे. ० **ला हात लावून म्हणणे, सांगणे** – खात्रीपूर्वक, न कचरता सांगणे. ० **वर काढून चालणे** – ऐटीत चालणे. ० **वर दगड ठेवणे** – (ल.) १. छातीचा कोट करणे; संकटात ढकलणे, पाडणे. २. मन घट्ट करणे. ० **होणे** – धीर होणे; हिंमत होणे. ० **छातीस लावणे** – आलिंगन देणे.

**छातीखोर** वि. हिंमतबाज; धीराचा.

**छातीचा, छातीदार** वि. धाडसी, धैर्यवान.

**छाती–ठाव** पु. छातीइतके खोल पाणी.

**छातीठोक, छातीठोकपणे** क्रिवि. सडेतोड; धैर्याने; निर्भयपणे; निश्चित; खात्रीने : 'आम्ही छातीठोकपणे समजू शकत होतो.' – पुत्र २.

**छातीपूर** वि. १. रुंद आणि भरदार छातीचा. २. धीट; धाडसी; धैर्यवान.

**छातीफोड** पहा : **उरस्फोड**

**छात्र** पु. शिष्य; विद्यार्थी. [सं.]

**छात्रक** न. घोड्याची चौकी चाल. [सं.]

**छात्रकेंद्री अध्यापन** (शिक्षण.) विद्यार्थ्यांचे वय, अभिरुची, बुद्धिमत्ता, क्षमता, गरजा यांसारख्या गोष्टी लक्षात घेऊन अभ्यासक्रम व अध्यापनपद्धती यांचे केलेले नियोजन व कार्यवाही.

**छात्रकेंद्री पद्धती** (शिक्षण.) विद्यार्थी हाच केंद्र मानून स्वीकारलेली अध्ययन अध्यापन पद्धती.

**छात्र तासिका** (शिक्षण.) शालेय अध्यापनाच्या संदर्भात विद्यार्थ्यांच्या दृष्टीने ठरविण्यात आलेली अध्यापनाची वेळ.

**छात्रवृत्ति–त्ती** स्त्री. (शिक्षण.) विद्यार्थ्यास मिळणारी ठरावीक आर्थिक मदत; शिष्यवृत्ती : 'विद्यार्थ्यांना दरमहा रु. ४५ छात्रवृत्ती दिली जावी.' – भाप्र २५२.

**छात्रसुरक्षा पथक** (शिक्षण.) रस्त्यावरील वाहतूक सुरक्षितपणे होण्यासाठी तसेच पादचाऱ्यांच्या सुरक्षेसाठी आवश्यक अशा नियमांचे प्रात्यक्षिकांसह प्रशिक्षण घेतलेल्या विद्यार्थ्यांचे पथक.

**छात्रसेना** स्त्री. सैनिकी प्रशिक्षण दिलेले विद्यालयीन व महाविद्यालयीन विद्यार्थ्यांचे दल : 'शांततेच्या काळात कायदा, न्याय यांचे पालन करणारा उत्कृष्ट नागरिक व परचक्राच्या काळात एक शिस्तबद्ध, प्रशिक्षित असा सैनिक तयार करणे असे या छात्रसेनेचे दुहेरी ध्येय सांगता येईल.' – युद्धशास्त्र २२९.

**छात्रसैनिक** पु. सैनिकाचे शिक्षण घेणारा विद्यार्थी : 'तेव्हाच्या छात्रसैनिकांच्या शिक्षणक्रमाचे नाव बदलून ते एकदम 'अधिकारी शिक्षण' झाले.' – युजि २४.

**छात्राध्यापक** पु. (शिक्षण.) शिक्षक या नात्याने आवश्यक असणारी शैक्षणिक व व्यावसायिक पात्रता अधिकृतपणे मिळविण्यासाठी शिक्षक प्रशिक्षण संस्थेमध्ये अध्ययन करणारा प्रशिक्षणार्थी.

**छात्रालय** न. विद्यार्थी वसतिगृह. : 'पुसद येथे हरिजन छात्रालय होते.' – साअ २४.

**छादन** न. (वन.) आच्छादन; आवरण. [सं.]

**छान** स्त्री. १. ऐट; नट्टापट्टा; झकपक. २. डामडौल; सौंदर्य; टवटवीतपणा (घर, बाग, कपडे यांचा). ३.चांगुलपणा; उत्तमपणा; लज्जत; खुमारी (सेवन करण्याच्या जिनसाबद्दल).[अर. शान] (वा.) ० **उतरणे, उडणे** – चांगले होणे; सुशोभित होणे. ० **मारणे** – थाटमाट करणे; प्रावीण्य दाखविणे.

**छान** वि. सुरेख; उत्तम; ऐटबाज; झळकफळक (वस्तू).

क्रिवि. चांगला; सुरेख. [अर.शान]

**छान** स्त्री. १ टीका. २. उजळा : 'आमच्या प्रतिपक्ष्यांची वरील शब्दत्रयावर उडविलेली छान होय.' – नि ५११. [अर.शान]

**छान** स्त्री. चाळणी; शोध; तपास; विचार; वजन. (मराठीत याचा उपयोग मुख्यतः लाक्षणिक करतात.) [सं.चालन]

**छानछु(छो)की** वि. ऐटबाज; भपकेबाज; डामडौली; दिमाखदार.

स्त्री. ऐटबाजपणा; भपका : 'पुण्यातील छानछुकी त्यांच्या अंगवळणी पडली नव्हती.' – दुर्दम्य ५५. [अर.शान–उ–शौकत]

**छानछू(छो)क** स्त्री. थाटमाट; डामडौल; नोकझोक : 'या लोकांची आज प्रसिद्धी म्हटली म्हणजे मिजास, छानछूक... या गुणांनीच फार करून आहे.' – चिले २२२. [अर.शान–उ–शौकत]

**छानणे** अक्रि. १. गाळणे. २. चाळणे : 'सूर्यतापाने मूर्च्छा आल्यास हा

(उसाचा) डोळा अथवा अंकूर वाटून पाण्यात छानून पाजावा.' – फचि ४९. ३. (ल.) बारीक तपास करणे, चौकशी करणे. ४. (ल.) निवडून काढणे. [सं.]

**छानदार** वि. १. सुरेख; डौलदार; भपकेबाज. २. पहा : **छानछूक–छोक** [फा.शानदार]

**छानदारी** स्त्री. भपका; डामडौल; सुरेखपणा : 'त्यांचा स्वभाव छानदारीचा आहे.' – काप्रइसा ५३.

**छाननी** स्त्री. बारीक तपास; ऊहापोह; विश्लेषण; चीरफाड : 'या निर्णायक महत्त्वाच्या प्रश्नाची छाननी करण्यास आपण आता सुरुवात करू.' – भादा ३२.

**छानपिछान** स्त्री. निवडानिवड; ओळख : 'तुरुंगांत बंदीवान बहुत जाले आहेत. एक वेळ छानपिछान जाल्यास कांहीं कमी होतील.' – ऐको ३९४.

**छानबाज** वि. नीटनेटकी; व्यवस्थित; आकर्षक : 'गांजाची अढीहि वस्तीवर छानबाज लावून ठेवलेली आहे.' – मिरास २८३.

**छानमोड** पु. अपमान; अप्रतिष्ठा; पाणउतारा.

**छाना** पु. गाळून, पाणी काढून टाकलेला जिन्नस, वस्तू : 'पहिले दोन्ही भाग नासवून छाना करावा.' – पाकसिद्धी ८८.

**छानी** स्त्री. भांगेच्या पाण्यात केलेला घोटा.

**छानी** स्त्री. १.ऐट; गौरव : 'किंवा हेहि तितकें पसंतीस न पडून याहूनहि छानी करण्याचें मनांत आणल्यास.' – नि ११२. २. भपका; दिखाऊपणा; सुंदरपणा : 'त्यातहि छानीपेक्षा भक्कमपणाच पाहून तें (लुगडें) घेतले असावे.' –मस्थि ९३.

**छानीचा** वि. सुंदर; छानदार; थाटामाटाचा.

**छानीबानी** स्त्री. रंगेलपणा; शौक; चैन.

**छानुला** वि. छानदार; गोंडस; गोजिरवाणा : 'तिने दाखविलेला सिंह खरेच छानुला होता.' – कोउ ७१.

**छाप** पु. १. ठसा; खिळा; छापण्याचे अक्षर; टाईप. २. ठसा; छापण्याचे साधन. ३. (ल.) वृत्तपत्र : 'मोठ्या डौलाने तसे केल्याचे छापात नाव देऊन छापतात.'– ससावा ३.६२९–३०. ४. थाप (तबला, मृदंग यावरील).४. कागदावर किंवा नाण्यावर असलेला सरकारी शिक्का; ५. वजन–मापांवर त्यांचा अचूकपणा दाखण्यासाठी केलेली खूण. ६. जकात भरल्याचा मालावर मारलेला शिक्का.

स्त्री. (ल.) वर्चस्व; दाब.[सं.चप्] (वा.) ० **टाकणे** – डामडौल करणे; प्रभाव पाडणे. ० **ठेवून असणे** – वजन, प्रभाव असणे; वर्चस्व राखणे : 'या नव्या ढंगामुळे मी त्यांच्यावर आपली छाप ठेवून होतो.'– अस्ताई १०४. ० **देणे** – भूलथाप देणे.

**छाप** स्त्री. १. परिपूर्णता; पूर्ण कौशल्य; नैपुण्य. २. (पोहण्यात) हात टाकणे. (क्रि. टाकणे.) [सं.चप्]

**छाप** स्त्री. न. १. खोगिराखालचे बुरणूस; घामोळे; नमदा. [सं.चप्]

**छाप** पु. शिक्का. [सं.चप्]

**छापक** पु. छापणारा; मुद्रक : 'अशांचे साहाय्य गेल्या तीस–चाळीस वर्षांत छापकांनी व प्रकाशकांनी घेतले होते.'– रालेसं २३३.

**छापकागद** पु. टिपकागद.

**छापकार, छापारी** वि. शिक्के छापणारा, करणारा.(गो.)

**छापखाना** पु. छापण्याचा कारखाना; मुद्रणालय. २. टांकसाळ.

**छापछूप** स्त्री. १. डागडुजी; साफसफाई. (क्रि. करणे.) २. (ल.) थापाथापी; हुलकावणी; धाब्यावर बसविणे. (क्रि.करणे.)

**छापडी** स्त्री. छापलेला कागद : 'छापडीनं वारा घेत बसलेल्या बर्‍यांनाही ती सूचना पटली.' – शिदोरी ४२.

**छापणावळ** स्त्री. छपाईखर्च; छापण्याची मजुरी.

**छापणी** स्त्री. छपाई; ठसे मारणे; कापडावर रंग चढविणे.

**छापणे** सक्रि. १. मुद्रित करणे; ठसा उमटविणे; एकसारख्या प्रती काढणे. २. लिंपणे (भिंत वगैरे). ३. शाई टिपणे. (कु.) [सं.चप्]

**छापा** पु. ठसा; छापण्याचे अक्षर.

**छापा** पु. (समाज.) धाड. मुख्यत: कर चुकविणाऱ्याच्या घरावर, पेढीवर अचानक घातलेली धाड.

**छापा** पु. वर्तमानपत्र : 'आत्ताचीं पोरां छपो वाचायला लागलीत. गावात धा छापे येतात.' – इंधन ८.

**छापाखालचा गृहस्थ** वर्चस्वाखालील माणूस; ताबेदार.

**छापारी** पु. छापणारा; कपड्यांवर निरनिराळ्या प्रकारची नक्षी उठविणारा; रंगारी लोकांची एक जात.

**छापी** स्त्री. हातोटी; कसब; हुकमत; प्रभुत्व. [सं.चप्]

**छापी** स्त्री. चिलमीला गुंडाळावयाचे फडके : 'जमिनीवर ठेवलेली चिलीम, छापी, चकमक उचलून त्याने ...' – बनग १९. [अर. साफी]

**छापी** वि. १. ठसा मारलेले; छापलेले. २. राजाचा छाप असलेला (कागद). ३. विशेष प्रकारचा छाप असलेला (रुपया).

**छापी** नाक पुसायचे फडके.

**छापीखोगीर** पु. बुरणुसाच्या बाजू असलेले खोगीर.

**छापील–व** वि. विशेष प्रकारचा छाप असलेला; मुद्रित; छापलेला.

**छापीसुलाखी** वि. १. छाप आणि सुलाख असलेले (रुपया खरा की खोटा आहे हे पाहण्यासाठी विशिष्ट प्रकारचा ठसा त्यावर आहे की नाही हे व भोक पाडून त्यात हिणकस धातू आहे का हे पहात असत.). २. पुष्कळ ठसे मारलेला (रुपया – यामुळे याचे वजन कमी भरते.).

**छापेकरी** नाण्यावर किंवा कचेरीत शिक्के मारणारा अधिकारी.

**छापेखाली** क्रिवि. एखाद्याच्या वजनाखाली, दाबाखाली (क्रि. असणे, चालणे, वागणे, निभणे.).

**छापो** पहा : **छप्पापाणी**

**छाया** स्त्री. १.सावली. २. प्रतिबिंब. ३. आच्छादन; आश्रय; पडदा; रक्षण : 'निवारोनी जाय माया । ऐसी छाया जयाची।'– तुगा ७. ४. अंधुक प्रतिमा; किंचित दर्शन; प्रतिबिंब; मुद्रा; चर्या; अर्धवट पडछाया. ५. थोडेसे साम्य. ६. स्वरूप; कांती; सर्वसाधारण देखावा; टवटवी; शोभा. [सं.] (वा) ० **धरणे** – (पाऊस, मेघ, आभाळ यांनी) छायेने, अंधाराने भरून टाकणे.

**छाया** स्त्री.१. लक्षण; चिन्ह (रोग, मनोविकार यांचे). २. भास.
**छाया** स्त्री. १.(संस्कृत नाटकात) प्राकृत भाषेची अर्थबोधक व्याख्या.
**छाया** स्त्री. रूपांतर; प्रतिकृती; भाषांतर : 'पण यास भाषांतर ही संज्ञा नसून छाया हे नाव आजपर्यंत चालत आले आहे.'– नि १८३.
**छाया** स्त्री. सूर्याची बायको.
**छाया, छायाकल्प** स्त्री. पु. (सूर्यावरील) डागांचा मध्यभाग फार काळा दिसतो. त्याला 'छाया' म्हणतात. डागासभोवती काळसर जागा दिसते. तिला 'छायाकल्प' असे म्हणतात. – सुज्यो ३२५.
**छायाकिंमत** स्त्री. (अर्थ.) उत्पादित वस्तूची उद्योगसंयोजनासाठी गृहीत धरलेली किमान किंमत.
**छायाकृति–ती** स्त्री. (सास.) छायारूप चित्र. [सं.]
**छायाग्रह** पु. सावलीने प्राण्यास खाली ओढून घेणारा मासा किंवा इतर प्राणी.
**छायाघटक** पु. भूप्रदेशाच्या उंच–सखलपणामुळे प्रक्षेपणात विद्युत्–चुंबकीय संदेशाची कमी–जास्त होणारी तीव्रता.
**छायाघड्याळ** न. सूर्यप्रकाशाच्या आधारे वेळ दाखविणारे यंत्र.
**छायाचित्र** न. १. पडद्यावर पाडलेली चित्राची छाया : 'स्वमायेचे आडवस्त्र । लावूनि एकला खेळवी सूत्र । बाहेरी नटी छायाचित्र ।' – ज्ञा १८.१३०३. २. प्रकाशाच्या साहाय्याने काढलेले चित्र; फोटो.
**छायाचित्रकार** पु. प्रकाशाच्या साहाय्याने छायाचित्रे काढणारा; फोटो काढणारा : 'कोणाही... छायाचित्रकाराला हे अद्भुत सौंदर्य पकडता येणेच शक्य नाही.' – जाजपू १९१.
**छायाचित्रपेटिका** स्त्री. भिंग व आरशाच्या साहाय्याने पदार्थांची चित्रे काढण्यास मदत करणारी एक पेटी; कॅमेरा.
**छायातिलक** पु. (संगीत) हा एक जोड राग आहे. छायानट व तिलक कामोद या दोन रागांच्या मिश्रणाने झालेला हा राग आहे. आरोहात, पूर्वाधात छायानट व उत्तरार्धात तिलककामोद असतो. अवरोहाच्या पूर्वाधात छायानट व उत्तरार्धात तिलक कामोद असतो. [सं.]
**छायानट** पु. १. परमेश्वर. २. (राग) गायन शास्त्रातील एक राग. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर. [सं.]
**छायानाटक** न. (सास.) बाहुल्यांच्या किंवा नटनटींच्या सावल्या पडद्यावर पाडून सादर करण्यात येणारे नाटक, करमणुकीचा कार्यक्रम: 'छायानाटकाचे तंत्र अजून तयार व्हावयाचे आहे.'– ननाना ८४. [सं.]
**छायानायक** पु. सूर्य : 'छायानायकसा निदाघ समयीं छाया करी तो विधू' – र. ७.
**छायानिधि–धी** पु. एक पक्षी. याची सावली ज्याच्यावर पडेल तो श्रीमंत होतो असा समज आहे.
**छायानुछाया** स्त्री. अनेक छटा, अनेक झांकी; अभिप्रायातून निघणारे दुसरे अभिप्राय : 'तिच्या विविध छायानुछायानिशी शब्दमंडित केली तरी...'– अंया २४.
**छायानुहरण** न. ढोबळ भाषांतर; अनुकरण.
**छायापुरुख** पु. १. आपल्या सावलीच्या रूपाने प्रगट होणारा मृत पुरुषः 'सर्वज्ञें म्हणीतलें : हा छायापुरुखू गा: ' – लीचपू १८६. २. उन्हात किंवा चांदण्यात उभे राहून आपल्या छायेकडे सतत पाहत असता एकाएकी सूर्य, चंद्र यांजकडे पाहिले म्हणजे जो पुरुष दिसतो तो; स्वरशास्त्रात हा प्रसिद्ध आहे : 'तेथ छायापुरुष दाखविणे ।' – स्थापो २७.
**छायाप्रत** स्त्री. पुस्तकातील मजकुराची काढलेली फोटोप्रत; झेरॉक्स.
**छायाप्रदेश** पु. (भूशा.) भूकंपाच्या उगमकेंद्रापासून सर्वत्र पसरणारे भूकंप तरंग जेव्हा पृथ्वीच्या अंतर्भागात शिरून प्रवास करतात त्या वेळी पृथ्वीच्या मध्याशी असणाऱ्या गाभ्यामुळे त्यांचे वक्रीभवन होऊन पृथ्वीच्या पृष्ठभागी एका विशिष्ट पट्ट्यात ते पोचू शकत नाहीत. या पट्ट्याला छाया प्रदेश म्हणतात.
**छायाभाग** पु. ज्यावर प्रकाश पडत नाही, सावलीत असणारा भाग.
**छायामंडप** पु. १.पहा: **छायाचित्र** १ : 'छाया मंडपीची सेना। सृष्टिसारिखीच रचना' – दास ८.१.३६. २. जादूच्या दिव्यांचा खेळ.
**छायामंडपी** पु. वि. छायाचित्रांचा खेळ खेळणारा.
**छायायंत्र** न. (भौ.) सावलीवरून वेळ दाखवणारे घड्याळ; मधोमध खांब रोवून व भोवती आकडे लिहून सावली ज्या आकड्यावर पडेल त्याप्रमाणे वेळ दाखवणारे घड्याळ; खांबाचे घड्याळ.
**छायारंग** पु. सूर्य.
**छायार्क** पु. मध्यान्हकाली विवक्षित उंचीच्या पदार्थांची सूर्याच्या उन्हामुळे पडणारी छाया. [सं.]
**छायालग राग** दुसऱ्या एखाद्या रागाच्या साहाय्याने रंजनकारी होणारा राग.
**छायालाभदर** (अर्थ.) उद्योगात गृहीत धरलेला काही किमान लाभदर. या दराने हा व्यवहार केला जातो.
**छायाविखार** पु. जिची सावली पडली असता मनुष्यास मृत्यू येतो अशी मण्यार (साप). (को.)
**छाया व्याजदर** (वाणिज्य.) गुंतवणुकीमध्ये गृहीत धरलेला काही किमान व्याजदर. या दराने व्यवहार केला जातो.
**छायाळ** वि. छाया देणाऱ्या : 'प्रचंड बुंधा, लांब पसरलेल्या अनेक छायाळ शाखा.' – प्रका १५२.
**छाव** स्त्री. छाया. [हिं.]
**छावड–डे** न. लहान मुलाचे लाडके नाव; छबुकडे. [सं.शावक]
**छावणी–नी** स्त्री. १. लष्करासाठी तात्पुरते बांधलेले छप्पर किंवा इमारत. २. (घरावरचे) छप्पर व त्याची शाकारणी. ३. खिडकीवरील किंवा दरवाजावरील विटांच्या कामाखालील फळी; ४. जमिनीखालच्या नळावरील दगडी छप्पर किंवा कमान. [सं.छादनी]
**छावणी** स्त्री. (राज्य.) लष्कराचा तळ.
**छावणीचा दगड** पु. आच्छादनाचा दगड.
**छावणीपाणी** स्त्री. छावणी; छावणीचा मुक्काम : 'फौज आहे ते राहू द्यावी. छावणीपाणी त्याच प्रांतीं होईल. तर सावध असावें.' – वेठे दप्तर १.३६.
**छावणे** सक्रि. शाकारणे (घर). (ना.)
**छावा** पु. १. सिंहाचे, हत्तीचे पिलू. २.(ल.) सुंदर व शूर मनुष्य, मूल इ.:

'जो होळकराचा छावा.' – विक १४. ३. कोणत्याही प्राण्याचे लहान पोर. [सं.शावक]

**छांदस** वि. वृत्तासंबंधी; छंदासंबंधी.

**छांदस** पु. वेदशास्त्रसंपन्न पुरोहित, कर्मठ वेदान्ती; उपाध्याय: 'तें छांदस पानीबुडीयाचें वाक्य म्हणा पां :' –लीचउ ४७३.

**छांदस** वि. छांदिष्ट; नादी; तऱ्हेवाईक; लहरी : 'दोघां अद्यापि नाही भेटी । महाहटी छांदस ।' – एभा १२.३२५. [सं. छंदस्]

**छांदसवाडा** पु. छांदिष्टपणा.

**छांदसवृत्ति–त्ती, छांदिष्ट, छांदीस, छांदसी** वि. नादी; खोडकर; टवाळ; नादिष्ट; तऱ्हेवाईक; लहरी : 'छांदसी म्हणती हा मुळाहुनि ।' – दावि ३२.

**छांदिष्टपणा** पु. विक्षिप्तपणा; खूळ; वेड. [सं. छंदस्]

**छि, छिछि** उद्गा. तिरस्कार, तुच्छता, नापसंतीदर्शक अव्यय.

**छिक्का** स्त्री. शिंक; शिंकणे. (क्रि. करणे.) [सं.]

**छिचडी** स्त्री. मांसाचा टाकाऊ भाग. नेहमी अनेकवचनी (छिचड्या असा) वापरण्यात येतो.

**छिचोर** वि. रंगेल; चटोर; बदफैली. पहा: **छचोर** : 'शिवाजी बालवयात असले छिचोर कपडे अंगावर घालीत....'–नाता ६७.

**छिचोर–री, छिछोर–री** पहा : **छचोर**

**छिटकणी** स्त्री. १. पडणे; शिंपडणे. २. सडा.

**छिट(ड)काव** पु. सडा, शिंपण; शिंतोडे टाकणे. [हिं.]

**छिटझर्दा** न. जर भरलेले चीट.

**छिटणे, छिटाऊ–ण, छिटाऊबंदर, छिटावणे** पहा: **शिटणे, शिटाऊ**

**छिटपि(फि)ट** स्त्री. तिरस्काराने नाकारणे; हिडिसफिडिस करणे; कमी लेखणे. (क्रि. करणे, लावणे.) [ध्व.]

**छिटपि(फि)ट** वि. खोडलेले; खरडलेले; गिचमिड.

**छिटा–ट्टा** पु. उडविलेला शिंतोडा, डाग; मोत्यावरील किंवा फळावरील डाग : 'हा लखोटा म्हणजे एक सोनेरी छिटे असलेला... होता.' – केस्व ५१. [सं.क्षिप्त]

**छिटी** वि. चिटाचे केलेले.

**छिड(ट)कणे** स्त्री. रंगविणे; रंगाचा शिडकाव देणे. [सं.क्षिप्]

**छिणणे** सक्रि. तोडणे; कापणे; मोडणे; तुकडे करणे. [सं. छिद्ः]

**छिणी(नी)क** स्त्री. शिळक; वाताची कळ; वेदना; सणक.(क्रि. भरणे, निघणे, मारणे, येणे, होणे.)

**छिद्र** न. १. भोक; छेद; पोकळी; दर; बीळ : 'छिद्राचा आश्रय उंदिर कुळवाडी ।'–तुगा १९८३. २.(ल.) उणीव; न्यूनता; दोष. ३. (ल.)प्रवेश; बीळ; मार्ग; गुप्त दोष; कमीपणा; गुह्य; अपूर्णता: मर्म; मर्माची जागा. ४. गुप्त मार्ग (किल्ला); चोर खिडकी; पळवाट.[सं.छिद्रम्] (वा.)० **पाडणे** – प्रवेशमार्ग शोधणे. ० **पाहणे** – न्यून, दोष पाहणे. **छिद्रात निघणे** – हलके होणे, नमणे.

**छिद्रक** पु. न. भोके किंवा छिद्रे पाडणारे अवजार, हत्यार : 'मुख्यत्वेकरून खुरपणी, वेधणी आणि रंधक किंवा छिद्रक या तीन प्रकारची हत्यारे तेथे दिसून येतात.'–अम १०. [सं.छिद्]

**छिद्रणक्रिया** स्त्री. (यंअ.) भोके पाडण्याची क्रिया.

**छिद्रदर्शी, छिद्रदृष्टि–ष्टी** वि. (ल.) दुसऱ्याचे दोष, न्यून पाहणारा.

**छिद्र पोगर** (यंअ.) भोक पाडण्याचे अवजार.

**छिद्रान्वेषक, छिद्रान्वेषी** वि. दोष पाहणारा; दोषैकदृष्टी असलेला; खोडसाळ; चिकित्साखोर.

**छिद्रान्वेषण** न. न्यून पाहणे; दोष पाहणे.

**छिद्रांकित** वि. अनेक दोष, न्यूने असलेला : 'आपला समाजदेह अशा रीतीने छिद्रांकित झालेला आहे' – आआआ १३४.

**छिद्रित पत्र** (शिक्षण.) संगणकामध्ये संग्रहित करावयाच्या माहितीवर यंत्राच्या साहाय्याने प्रक्रिया करता यावी म्हणून विशिष्ट अंतरावर, विशिष्ट आकारमानाची भोके पाडून तयार केलेले कार्ड किंवा पत्र.

**छिद्रिष्ट** वि. छिद्रे असलेला; पाणी शोषण करण्यासारखा.

**छिनणे** सक्रि. पळवणे; हिसकावून आणणे : 'मग ते तुझ्या शस्त्रागारात सापडो वा ह्या नवीनांच्या शस्त्रागारांतून छिनता येवो !' – ससावा ३.३७५. [हिं.]

**छिनणे** अक्रि. १. एकेक कण वेचणें. २. कापणे, तासणे. [सं.छिद्]

**छिनाल** वि. व्यभिचारी; बदफैली; जारकर्मी (स्त्री). [सं.छिन्ना+नारी; हिं.]

**छिनालचोदीचा** वि. व्यभिचारोत्पन्न; व्यभिचारातून झालेला.

**छिनाला–ली** वि. १. शिंदळकी करणारा (पुरुष, स्त्री). २.शिंदळकी.

**छिनाव(वि)णे** सक्रि. हिसकावून घेणे; बळजबरीने घेणे : 'प्रजेची चीजवस्तू त्याने छिनावून घेतली.' – श्रीयो २.४४८. [सं.छिन्न]

**छिनी** स्त्री. सुरूच्या पानासारखी पाने असलेले झाड.

**छिन्न** न. १. तासलेला पृष्ठभाग. २. ओबडधोबड तुकडा किंवा ढलपा. वि. तोडलेले; कापलेले; विभागलेले. [सं.]

**छिन्नकटि–टी** न. नृत्यात एका पायावर उभे राहून दुसरा पाय ताठ ठेऊन पुढे मागे हालवीत राहण्याने कंबरेची पुढे मागे हलत राहण्याची स्थिती; फार व्यायामाने थकणे, घाबरणे वगैरे दाखविण्याच्या वेळी हा अभिनय करतात.

**छिन्नभिन्न** वि. तुकडे तुकडे केलेले; फोडलेले; फाडलेले.

**छिन्नमनस्कता** स्त्री. (मानस.) चित्तविकृती या गंभीर मनोविकृतीचा एक प्रमुख उपप्रकार. या विकाराने पछाडलेली व्यक्ती मिथ्या भास, भ्रम, भावनिक अस्थिरता. यात स्वतःला टाकते व वास्तव जगापासून स्वतःला दूर करते.

**छिन्नविच्छिन्न** वि. फाटलेले, फाडलेले; तुकडेतुकडे केलेले; अस्ताव्यस्त फोडलेले : 'पावसाने छिन्नविच्छिन्न झालेली छत्री.'– बंप १५५.

**छिन्नावयव** पु. ज्याचा एखादा अवयव कापून टाकला आहे असा, अंगच्छेदन केलेला मनुष्य.

**छिन्नी** पहा : **छन्नी** [सं.]

**छिपटी** स्त्री. शिपटी; चमकी; छडी.

**छिपयिता** वि. पु. शिळेवर लेख कोरणारा; कोरक्या: 'सासन छिपयिता

रामु।'-कलवार शिलालेख १.२७.

**छिलका-टा-पा** पु. १.ढलपा, चीप; कपचा; झिलपी; टरफल: 'सफाईदार रीतीने याचे (दगडाचे) छिलके काढून पाती बनवणे '-अम ५. २. कातडे; साल. [हिं.]

**छिलछिलीत** वि. रोडका; उंच व सडपातळ : 'कृष्णाजी भास्कर छिलछिलीत अंगलटीचे...होते.'- श्रीयो २२७.

**छिलणे** सक्रि. तासणे; चोळणे; रंधणे; साल काढणे. [सं.छिद्]

**छिलपाट** न. पातळ साल; फोलपट : 'पातळ छिलपाट निघू लागली.'- जैरजै १२.

**छिलवा, छिलवागजरा** पु. दांडे एकमेकांत गुंतवून केलेली फुलांची माळ; डेखे खोडून केलेला पुष्पगुच्छ : 'आणवा लाहान छिलवा।'- सला ७.

**छिलाई-जुडाई** स्त्री. (यंअ.) वस्तूंची समपातळीवर जोडणी.

**छिलाक** वि. चलाख; चपळ; नाजूक : 'सोन्याची अंगईठी गोऱ्यापनांत दिसईना: तान्या छिलाक बाळाला दिस्ट झाल्याली सोसईना ।।' - लोसाको.

**छिली-ले** स्त्री. न. दरवाजाच्या दुहेरी चौकटीची खालची जोडलेली दोन लाकडे. वरच्या लाकडांना घोडा किंवा मेंधला म्हणतात.

**छिंद** स्त्री. कापलेली वस्तू, तुकडा, शकल.
वि. छाटलेले; कापलेले. खच्ची केलेले; तोडलेले. [सं.छिन्न]

**छिंदणे** सक्रि. १. कापणे; तोडणे; छिन्नभिन्न करणे. २. भिडणे; स्पर्श करणे; थांबविणे, अडथळा करणे.(ना.)[सं.छिद्](वा.) **छिंदी छिंदी उडवणे** - तुकडे तुकडे करणे.

**छीट** न. चीट; रंगविलेले, छाप मारलेले सुती अथवा तागाचे कापड; चित्रवस्त्र : 'छीट नावाचे कापड मुलतानला तयार होत असे.'- मसंधवि ३०१. [पोर्तु. चीट]

**छीट** स्त्री. १. शीट, पक्ष्याची विष्ठा. २. डाग; ठिपका; छिटका.[सं.क्षिप्त]

**छीन** स्त्री. १. छिनणे; काढून घेणे. २. लाठी हातातून पाडणे; काढून घेणे.

**छीपा** वि. कपडे छापणारा; रंगारी; खडी काढणारा.(माळवी)

**छील** स्त्री. (सोनारी) चांदी, सोने इ. धातूच्या सुताची गोल कडी.

**छीलछद्म** न. कपटाचरण; लबाडी : 'तह पडत होता परंतु करणारांनी छीलछद्म करून उभयतांमध्ये बिघाड पाडून... इतके प्रकार केले.' - मइसा १४.६५.

**छीवणे, छियणे** क्रि. संग करणे.

**छी: थू:** उद्गा. बेअब्रू; बदनामी; फजिती; हुर्यो; हुरेवडी; अपकीर्ती : 'एकदा का ती (लुच्चेगिरी) बाहेर पडली म्हणजे मग त्यांच्या छी: थू: ला काही पारावार नाहीसा झाला म्हणून समजावं.' - पलकोघे ४०३.

**छुक्-त्** उद्गा. मांजराला हाकलण्याचा शब्द. [ध्व.]

**छुटी जोडी** डाकेच्या जासुदाखेरीज दुसरे जासूद वेळप्रसंगी उपयोगात आणीत अशी जासूद जोडी : 'पूर्वी डांक उज्जनी पावेतो होती. उज्जनीहून इकडे छुटी जोडी येई.'- ऐको ३९५.

**छुटे कासीद** डाकेत नसणारी पण स्वतंत्रपणे पाठविण्यात येणारी 'कासीद' (म्हणजे पत्रे) पोहचविणारे लोक.

**छुट्टा** पु. गोंडी बायकांची काचेच्या मण्यांची गळसरी. (गोंड.)

**छुट्टी** स्त्री. सुट्टी. [हिं.]

**छुणछुणणे** अक्रि. ठुसठुसणे; चुणचुणणे; तिडीक येणे.

**छुणछुणाट** पु. जास्त जोराची तिडीक, ठुसठुस.

**छुणछुणी** स्त्री. तिडीक; धडपड; चुणचुण, ठसठस. [ध्व.]

**छुनछुन** स्त्री. नाण्यांचा, पैंजणांचा होणारा आवाज : 'त्यांना नाण्यांची छुनछुन कळते.'- अदेशी ११९.

**छुपा** वि. आडून, दडून केलेला; चोरटा : 'ख्रिस्ती प्रचारकांचे उघड व छुपे हल्ले चालू झाल्यामुळे हिंदूंमध्येहि जागृति उत्पन्न होऊन.'-मसवि ७४.

**छुपा** वि. गुप्त; न दिसणारा; लपविलेला; झाकलेला.

**छुपा (पो) रुस्तुम** आपले खरे गुणदोष, कळा लपवणारा मनुष्य: 'अरे, तू तर छुपो रुस्तुम निघालोस; लोक बोलतात, तुला कशाशी पंच्यातच नाय. आनी तू लक्ष्मीची चौकशी करायला लागलोस?'- इंधन ७९.

**छुपी बेकारी** ( अर्थ.) नोकरी नसलेल्या व्यक्तींची खरी आकडेवारी न सांगणे. बेकारांच्या वस्तुस्थितीसंबंधी चुकीची माहिती देणे.

**छुमछुम-मा** क्रिवि. पैंजणांचा, घागऱ्यांचा नादमधुर ध्वनी होऊन : 'बहू रुचिर नूपुरें छुमछुमा तदा वाजती ।' - कमं २.७५. [ध्व.]

**छुरिका, छुरी** स्त्री. १. सुरी. २. वांझोटी गाय. [सं.]

**छुरिकाबंध** पु. ब्राह्मणातील गुंजीसारखा शूद्रात करावयाचा एक विधी.

**छुंकार** पु. छुमछुम असा आवाज :'... मी तुझ्या पैंजणांचा छुंकार ऐकला'- वेज ७९.

**छु: छू** उद्गा. १. कुत्र्याला हुकूम, इशारा करण्याचा शब्द. १. कुत्र्याला हुकूम, इशारा करण्याचा शब्द.(क्रि. करणे, म्हणणे.) २.(ल.) (भांडण करण्यास) चिथावणे; उत्तेजन देणे : 'मोठ्या मुलांनी आम्हाला छू केलें आमची कुस्ती लावली.'- दीअहो ५१. [क.छू बिडु] (वा.) **छु: छुक म्हणणे, करणे** - शांत राहण्यास सांगणे.

**छूट** स्त्री. छटा; चकाकी; तेज (रत्नाचे).

**छूट** स्त्री. मोकळीक.

**छूटफूट** क्रिवि. सहज; विनासायास : 'छूटफूट नोकऱ्या मिळतात.' - एगाएपा १५५.

**छूरिकाबंध** पु. शूद्रास मुंजीचे ऐवजी करावयाचा संस्कार.

**छे, छेछे** उद्गा. नापसंती, तिरस्कारदर्शक शब्द. [ध्व.]

**छेक** पु. खोडून टाकणे.
वि. साफ; पूर्णपणे; निपटून : 'जो गांव छेक उजाड आहे, त्याची तरतूद होत नसल्यास पढ्यानें गाव द्यावा.'- पेद २४.२६६.

**छेक** वि. चतुर. [सं.]

**छेकणे** पहा : **छळणे**

**छेकत** मंत्र; गुप्त खलबत; मसलत.

**छेका** पु. काट; रेघ (खोडून काढण्यासाठी ओढलेली). [सं.]

**छेका** पु. टुमणे; छडाछड.

**छेकानुप्रास** पु. दोन अथवा अधिक वर्णाची पुनरावृत्ती; वृत्त्यनुप्रासाहून

विरुद्ध, गुणभिन्न : 'नखहि नको ज्या कार्या त्या काढावा कशास करवाल.'- मोकाव्य.

**छेकापन्हुति-ती** स्त्री. एक अर्थालंकार. यात वाक्याचा अर्थ फिरविण्यासाठी श्रोत्यांच्या सहज लक्षात न येणाऱ्या अर्थाचा एखादा श्लेषात्मक शब्द-द्व्यर्थी शब्द - योजलेला असतो. उदा. 'अंबरगतपरि पयोधरातें रगडुनि पळतो दुरी । काय हा धीट म्हणावा तरी । तो नंदाचा मूल काय गे सांग कन्हय्याहरी । नव्हे गे मारूत मेघोदरीं ।'- राला ३५.

**छेकोक्ति-क्ती** स्त्री. वक्रोक्ती; वाकडे, दुटप्पी, उपरोधिक भाषण. पहा : छेकापन्हुती

**छेजा** स्त्री. सज्जा; गच्ची : 'कबालाचे गायन यैकिल्यावरी बंगल्यांवरील छेज्यावर जाऊन पुण्याचे आबादी वगैरेची सयर केली.'- ऐको ३९६.

**छेटा-डा** पहा : **छटा, छडा** (वा.) **छेडखानी करणे** - त्रास देणे; खोडी करणे; कुचेष्टा करणे. **छेडी जाणे** - त्रास देणे वगैरे. (ना.) **छेड काढणे** - सतावणे; असभ्य वर्तन करणे.

**छेडणे** सक्रि. वाजविणे. उदा. सतार छेडणे; सतारीच्या तारा छेडणे.

**छेडणे** सक्रि. १. बारीक तपास करणे : 'मला स्वत:ला त्यांनी एकूण पाच वेळा छेडले.'- असा ९५.२. सतावणे; कुचेष्टा करणे; अशिष्ट वर्तन करणे. [सं.शिट्]

**छेडा** पु. पहा : **छडा** २.

**छेडाछेड** स्त्री. १. कटकट ; दंगा; फिसाद; बंडाळी : 'त्या मार्गास छेडाछेड वाट चालो देत नाहींत.'- पेद २४.८१. २. उपद्रव; त्रास.

**छेडाछेड** स्त्री. बारीक तपास; खोदूनखोदून विचारणे; परीक्षा.

**छेडी फौज** तोफा, डेरे दांडे, किंवा बाजार वगैरे बरोबर नसलेली फौज : 'स्वामींनीं या कार्यात मन घालून तूर्त पांच हजार छेडी फौज जलद रवाना करावी.'- ऐको ३९६.

**छेद** पु. १. लहान छिद्र ; भोक. पहा : **छिद्र**. २. चीरं ; फट, भेग. ३. कापणे; दोन करणे; तोडणे. ४. जड पदार्थ उभा-आडवा कापला असता त्यावर पडलेली चीर. [सं.छिद्](वा.) ० **साधणे** - मध्यबिंदू गाठणे : 'हल्लीच्या काळातील फसफसणारं प्रेम आणि दोन पिढ्या अगोदरचं अबोल प्रेम यांना योग्य छेद साधणारा प्रेमदर्शनाचा मार्ग आमच्या कुटुंबांतून अजून अस्तित्वात यायचा आहे.'- एल्गार २६,२७.

**छेद** पु. अंतर.

**छेद** पु. १. (ग.) अंशस्थानीय आकड्यास ज्या अंकाने भागावयाचे तो अंक; मुख्य वस्तूचे किती भाग करावयाचे ते दाखवणारा अंक. उदा. एक चतुर्थांश. २.भाजक. [सं.]

**छेदक** पु. विभाग पाडणारा.

**छेदक** पु. परिच्छेद : '... शब्द, वाक्ये, छेदक यांची भयंकर उलटापालट... १ '- मसासंअभा ४०४.

**छेदछेदक** वि. १. तोडणारा; कापणारा; भाग करणारा. २. (ग.) भाजक. [सं.]

**छेदछेदक** पु. नक्षत्रांचे स्थान आणि गती दाखविण्याकरिता काढलेले चित्र. [सं.]

**छेदणे** सक्रि. १. कापणे; छाटणे; तोडणे; चिरणे; भाग करणे.२. मोत्याला वेज पाडणे. ३. दुभागणे. ४. नाश करणे; तोडणे; कापणे. [सं. छिद्]

**छेदन** न. काटणे; छाटणे; कापणे; तोडणे.

**छेदन** न. छेद; कापण्याची क्रिया.

**छेदन कोन** (ग.) दोन वक्र एकमेकांस ज्या बिंदूत छेदतात त्या बिंदूपाशी असलेल्या त्यांच्या स्पर्शरेषांतील कोनास त्या वक्रामधील छेदन कोन म्हणतात.

**छेदनबिंदु-दू** पु. (भूमिती) ज्या ठिकाणी दोन रेषा किंवा वर्तुळे एकमेकांस छेदतात तो बिंदू.

**छेदनरेघ-षा** स्त्री. जिच्या योगाने दुसरी रेषा कापली जाते ती रेषा.

**छेदनीय** वि. छेदावयास योग्य; भाग करण्याजोगा.

**छेदबिंदु-दू** पु. (ग.) दोन रेषा किंवा दोन वक्र किंवा एक रेषा आणि वक्र यांच्यातील सामाईक बिंदू.

**छेदभेद** पु. नाश; हिंसा; तोडमोड : 'किंबहुना सांडावे । छेद भेद ।'- ज्ञा १७.२१२.

**छेदा** स्त्री. (ग.) दिलेली संख्या मिळविण्यासाठी विशिष्ट संख्येला तिनेच कितीदा गुणावे लागेल हे सांगणारा अंक. [सं. छिद्]

**छेदामापश्रेणी** स्त्री. (ग.) छेद मोजण्याची श्रेणी.

**छेदामाला** स्त्री. छेद पंक्ती.

**छेदिका** स्त्री. (ग.) दोन किंवा अधिक रेषांना छेदणारी (निराळी) रेषा.

**छेदित** वि. कापलेला; भाग केलेला.

**छेद्य** पहा : **छेदनीय**

**छेमीना** पु. शामियाना : 'तैसेच वाडांत गेले, जाऊन मागती माघारे छेमीन्याखाले येऊन बसले.'- ऐको ३९६.

**छेलकाठी** वि. सडसडीत; शेलाटी : '...चमनची अंगकाठी शेवरीच्या झाडासारखी उंच आणि छेलकाठी होती.'- व्यंमाक ११३.

**छेलछबि(बे)ला** पु. लाडका; गुलजार; आनंदी; चैनी, पहा : **छालछबीला** : 'नको मला अंतर देऊ छेलछबेल्या रे.'- प्रला १७९.

**छेलछबेली** वि. लाडकी; सुंदर; मोहक : 'छेलछबेली रंगीबेरंगी फुले.'- अआमागो २०.

**छेलणें** सक्रि. कापणे. [सं.क्ष्विल]

**छेलबटाऊ** वि. नटरंगी; नटवा; ऐटबाज : 'शेवटच्या पायरीवर निवांत बसलेल्या मिसेस गुप्त्यांच्या अंगावर छेलबटाऊ रघ्या सपशेल कोसळला होता.'- पोपट २९.

**छेला** पु. नखरेबाज माणूस; अकडबाज माणूस.

**छेळणे** न. अणकुचीदार लोखंडी गज, पहार, सळई. सक्रि. पहारेने ठोकणे; छिद्र पाडणे.

**छेंदणे** अक्रि. अडकणे; लावणे; आपटणे. (व.)

**छोकरा-री** पु. स्त्री. पोरगा; पोरगी : 'समोरच्या हॉटेलातील छोकरा कर्कश आवाजात दोन इसम तीन आणे...वगैरे ओरडून.'- संबा १८६. [त. शोक्न][सं.शावक+रा]

**छोटा** वि. लहान. [सं.क्षुद्र]

**छोटा सातभाई** एक पक्षिविशेष : 'छोटे सातभाई म्हणून पक्षी आहेत. त्यांच्या घरट्यात चातकी अंडी घालते.'– पद ३३.

**छोटी** स्त्री. लहान : 'वीणी काली । न छोटी न मोटी ।'–राजमती ३.

**छोटी** पु. गुरांचा एक रोग : घटसर्प.

**छोटी हजेरी** स्त्री. सकाळची न्याहारी ( हा शब्द युरोपियन लोकांच्या बटली भाषेत रूढ आहे).

**छोटेखानी** वि. १. लहान; छोटेसे : 'याच वेळेस ग्रीसमधील लढाईला जोर चढला होता आणि त्या छोटेखानी राष्ट्राला वाचविण्यासाठी जनरल मेटलँडची तिकडे रवानगी करण्यात आली.' – दुमयु १२४. २.सरासरीचा; मध्यम; दुय्यम दर्जाचा.

**छोनछडी** स्त्री. कसबीण स्त्री. (माण).

**छोर** वि. लहान : 'तुम्ही माल पर्वताकार । आम्हि बाळकें छोर।'– श्रीकृष्णच १९.४८.

**छोल** पु. (सुतारी) रंधा.

**छोलदार** पु. सोलदाद; सोल्जरचा अपभ्रंश : 'इंग्रजांच्या पलटणापैकी दस्तारबंद व छोलदार व तुरुपस्वार वगैरे यांच्या तपशिलाची याद पाठविली आहे.' – ऐको ३९७.

**छोलदारी** पु. तिकोनी तंबू किंवा पाल.

**छोला** पु. मोठ्या आकाराचे पांढरे हरभरे : 'राधेला छोले घेऊन दिले.'– तूंमातूंमो १२५.





**ज** मराठी अक्षरमालेतील तेविसावे अक्षर व व्यंजनमालेतील आठवे व्यंजन. याचा उच्चार मराठीत दोन प्रकारे होतो. १. तालव्य-जल, जप इ. २. दंततालव्य-जरा, जवळ इ. असे दोन प्रकारचे उच्चार होतात.

**ज** वि. (संस्कृत शब्दापुढे जोडल्यावर) उत्पन्न झालेला; जन्मलेला. उदा. पंकज, गोत्रज इ. [सं.]

**जइ पासून सुरू होणारे शब्द इथे न आढळल्यास जै मध्ये पहा.**

**जइत** न. जय. (गो.) [सं.जी=जिंकणे]

**जइंती** स्त्री. जयंती, वाढदिवस : 'तेयांतें आधिली दिसीं जइंती जाली होती ।' - लीचपू ४९३. [सं.जयंती]

**जई,जै** स्त्री. १. जेथे भिंत छपरास मिळते त्या ठिकाणी आतील बाजूस राहिलेली जागा; येथे काही वस्तू ठेवता येतात; तसेच कित्येकदा विटांचा थर बाहेरील बाजूस काढून अशी जागा मुद्दाम केलेली असते. २. विहीर पडू नये म्हणून धर लागेपर्यंत खणलेली जमीन (बे.) : 'लाटा नव्यानं जईवर येऊन फुटू लागल्या.' - भेटीगाठी १२. [सं.जाति]

**जईक** वि. कष्टी; क्षीण.

**जईनच, जईनम(स)ईन** वि. क्रिवि. १.(अशिष्ट) कारणापुरते; बेताचे. २. पुष्कळ; विपुल; भरपूर.

**जईपट्टी** स्त्री. (सोनारी) तगडावरील (धातूच्या पत्र्यावरील) बाजूची उभी पट्टी. (बे.)

**जई(य)फ, जैफ** वि. वृद्ध; कष्टी; क्षीण; अशक्त : 'आम्हीं जईफ झालों आहों बहुत दिवस वांचत नाही.'-मइसा १.२८. [अर.]

**जईभ,जैभ** चिलखताचा एक प्रकार.

**जईं-इं** क्रिवि. जेव्हा, ज्यावेळी : 'कृपा करूनि धाडिला जइं मदीय बंधु स्वये ।' - मोकृष्ण ५८.५. [सं.यदा]

**जउ-ऊ पासून सुरुवात होणारे शब्द जो किंवा जौ मध्ये पहा: जोळी, जौळी.**

**जक** पु. पराभव; धक्का; थप्पड; तंबी : 'एवढी जक खडर्यावर हजरतीस बसली.' - मइसा ५.१६. [अर.दक्क]

**जक** पु. (नाविक) एखाद्या लाकडास फूट गेल्यास मजबुतीसाठी दिलेले दोरीचे चार-सहा फेरे.

**जक(ख)ड** स्त्री. १. ताण, ओढ. (क्रि.ताणणे, आवळणे.) २. गारठ्याने आखडणे. (हा शब्द बांधणे, टाकणे, धरणे, राखणे या शब्दाशी जोडून योजतात).

**जकरीरा** पु. पहा : **जकिरा**. माल; सामान: 'ठाणीं दावतीं असतील तीं जकरीरासुद्धा यांचे हवालीं करावीं.' - दुबारो ५.१६८.[अर.जकीरा]

**जकला** वि. (अशिष्ट) सगळे; संपूर्ण; सर्व.

**जकात** स्त्री. १. धर्माप्रमाणे प्रत्येक मुसलमानाने दानधर्मासाठी द्यावयाचा आपल्या प्राप्तीचा ठरावीक भाग (क्रि. देणे); धर्मादाय कर; धार्मिक उत्सवासाठी गावकऱ्यांनी गोळा केलेली वर्गणी : 'प्रत्येक मुसलमानाने दरसाल आपल्या संपत्तीचा $\frac{१}{४०}$ वा भाग अथवा अडीच टक्के, गोरगरिबांना दानधर्म म्हणून दिला पाहिजे. याला जकात असे म्हणतात.' - भामु १५. २. कर; दस्तुरी; करोडगिरी; स्थलांतरित (आयात व निर्यात) व्यापारी जिनसावरील कर. [अर.]

**जकातदार** पु. जकात वसूल करणारा अधिकारी : 'जकातदारहि तसेच करतात ना' - खिथसा ३०.

**जकातनाके** न. १. जकात वसूल करण्याची जागा, ठाणे. २.(ल.) ज्यावर जाता येता कपाळ आपटते असा ठेंगणा दरवाजा.

**जकात्या** वि. १. जकातदार. २. एक पक्षी. हा ज्या पक्ष्याला जिंकतो त्याचे एक पीस उपटतो म्हणून त्यास म्हणतात.

**जकि(के)रा** पु. १. अडगळ; सामानसुमान; जुना गळाठा; रास (पुस्तके, कापड, कागद इत्यादींची). २. कोठार; संचय: 'ठाण्यात दारू व तोफेचे गोळे, बाण वगैरे जकिरा पोक्ता आहे.' - ऐलेसं ९.४५०३. [अर.]

**जकिरी** वि. दारूगोळ्यांचे : 'त्याजवर सामान जकिरी पूर्वीलप्रमाणें राखावें.' - चिथोशा ३२.

**जकीरखाना** पु. कोठार; गंजीखाना; अठरा कारखान्यांतील एक. अडगळ ठेवण्याची जागा.

**जकेरिया** साठवण : 'याकरितां तैसे जागां जकेरियाचें पाणी म्हणोन दोन-चार तळीं टाकीं बांधून ठेऊन...'- आज्ञापत्र १०९.

**जक्कड** पहा: **जखडबंद**

**जख** स्त्री. नुकसान : 'खावंदाचे दौलतीस जख किती बसली हे खावंदाचे ध्यानांत आहेच!' - ऐको ३९८.(वा.) ० **खाणे** - गोता खाणे; नुकसानी होणे; नाश होणे : 'कमजोर झाल्यावर कोणास तरी आपले करून ठेवावें. यांत माणूस जख खात नाहीं, असे सिद्धांत आहेत.' - ऐको ३९८.

**जखड-ल -ळ** वि. बुड्ढा; वृद्ध; अशक्त; क्षीण.

**जखडण** न. आवळणे; गुंतागुंत; घट्ट बांधणे: 'स्वप्नासाठी किती जिवांची जखडण केली.' - श्रीयो ५१४.

**जखडणे** सक्रि. घट्ट बांधणे; ताणून, आवळून बांधणे; इकडे तिकडे हालचाल करता येणार नाही अशा तऱ्हेने बांधणे. पहा : **जक(ख)ड.** [सं.योक्तृ] (वा.) **जखडून टाकणे** - गच्च, घट्ट बांधणे; घट्ट; बंदिस्त करणे : 'सारी संस्कृती 'शिवू नको' या दोन शब्दांत जखडून टाकली...' - एल्गार ५२.

**जखडणे** अक्रि. गुंतणे; अडकणे : 'सायंकाळी ६ पर्यंत जखडला जाणार असेन...' - जटापा १३१.

**जखडबंद** पु. एक पेच. प्रतिपक्षाच्या पाठीवर असल्यास त्याच्या हातांवरून आपल्या हाताचा विळखा घालणे.

**जखडबंदी** स्त्री. १. बांधणे (जनावर खुंट्याला). (क्रि.करणे.) २. (ल.) भाग पाडणे; उपकृत करणे. ३. बंधन; बद्ध स्थिती. (क्रि. करणे.): 'जातिगत जखडबंदी होती त्या काळात ती कशी होती याबद्दल... विचार करावयाचा आहे.' - दोहस ७८. ४. प्रतिबंध; नियंत्रण. ५. गुंडाळण्याची क्रिया. ६. गठ्ठा बांधणे.

**जखडाजखडी** स्त्री. बांधणे व आवळणे; घट्ट आवळणी. (क्रि.करणे, होणे, चालणे.)

**जखडीन** पहा: **जखीण**

**जखम** स्त्री. १. दुखापत: घाव; वण; आघात (शस्त्रादिकाने झालेला).

२. जोखीम या अर्थाने चुकीचा उपयोग; व्यापारात तोटा, धक्का. (क्रि. बसणे.) ३. उणीव. [फा.जख्म] (वा.) ० **भरणे** – जखम बरी होणे. ० **शेजेस येणे** – जखम बरी होऊ लागणे : 'दोन दिवशीं जखम शेजेस येतांच कोन्हेरराव कूच करून करवीराकडे जाणार आहेत.'– ऐको ३९८.

**जखमेवर मीठ घालणे** – दुःखावर डाग देणे; दुःखाची तीव्रता वाढवणे.

**जखमपट्टी, जखमा(मी)ना** स्त्री. पु. १. जखमेवरील मलमपट्टी. २. एखाद्यास सरकारी कामामध्ये इजा झाल्यास उपाय करण्याकरिता देण्यात येणारी देणगी : 'मुलाच्या समाचारास पाठवून जखमपट्टीकरिता तीन हजार रुपये देवविले.' – मइसा ५.३०.

**जखमी** वि. १. घायाळ. २. दुखावलेले; जखम झालेले.

**जखली** स्त्री. आक्षेप; ओढ : 'मुलकाची गोष्ट श्रीमंतांनी आज्ञापिली ते समयीं आम्हीहि जखली घेतली होती.'– पेद ४०.४९.

**जखात(द)दार** पहा : **जकातदार**

**जखि(खी–खे)रा** पहा : **जीकरा**

**ज(जं)खीण–न** १. बाळंतिणीचे पिशाच. २. एक क्षुद्र देवता : 'जखिणी देवी म्हणे जो सर्वकर्तारा !' – श्रीसप्र ५.१०. पहा : **डंखीण**. ३.(ल.) भांडकुदळ, कजाग, द्वाड स्त्री. [सं.यक्षिणी]

**जख्ख,जख्खड–ल** वि. अतिशय म्हातारा आणि अशक्त; थकलेला (म्हातारा शब्दांशी योजून); जखूड. (माण.) [क.जक्किसु]

**जग** न.१. स्थावरजंगमरूप अखिल सृष्टी; विश्व; पृथ्वी; दुनिया. २. ब्रह्मांड; माणसांचे वसतिस्थान; मनुष्य जात; लोक. [सं.जगत्] (वा.) **जगातून उठणे** – १. लोकाचाराविरुद्ध वागणे. २. (वैधव्यामुळे, आपत्तीमुळे) सर्वस्वी बुडणे. **जगातून उठविणे** – सर्वनाश करणे; सर्वस्वी बुडविणे: 'मीच त्याला बनवासी केला. जगातून उठविला.' – पहहाब्र २४. **जगामुलखाने सोडलेला**– जातीवेगळा टाकलेला; साऱ्या गावाने ओवाळून टाकलेला.

**जग** पु. १. जोगतिणीच्या डोक्यावरील परडी. या परडीत देवीचा मुखवटा असतो आणि त्या मुखवट्याच्या दोन्ही बाजूंना मोरपिसांचे झुपके असतात. २. पाणी वाढण्याचे भांडे.

**जगजुग** न. (ल.) १. मोठी आपत्ती; जगावर आकाश कोसळणे : 'औचितें जगजुग पडिले : सनकादिकावरी' – उगी १६. २. विश्व; ब्रह्मांड.

**जगजूट** पु. सुव्यवस्था.

**जगजेठी** पु. १. जगात मोठा, श्रेष्ठ (ईश्वर): 'स्वयें निघाला जगजेठी' – एभा २.१४४. २. जगातील बलवान पुरुष, मल्ल. [सं.जगत्+श्रेष्ठ]

**जगज्जीवन** न. १. जगाचे जीवन; जीवन सृष्टीचे जगण्याचे साधन (पाऊसपाणी, अन्न इ.). २. सजीव प्राण्यांचे अस्तित्व. वि. जगाचे धारण–पोषण करणारा (ईश्वर).

**जगझंप–पू** पु. वि. १. जग जिंकणारा; जगाला झोडणारा : 'उधटेआ देवां जगझंपु'– शिव १५४. २. जगाला झाकून टाकणारे : 'डोलताति जगझंप टळे : कुंचे दंड हेलावताति नेटके' – रुस्व २१५४.

**जगझोडी** स्त्री. बटीक; दासी : 'लाज धरी भांडे । जगझोडी रांडे ।'– तुगा २६०.

**जगडंबर** न. १. अवडंबर ; अवाढव्य पण निरर्थक थाटमाट; धामधूम; आव (विद्या, पैसा यांचा). (क्रि. घालणे.) २. अफाट जगास आश्चर्याने म्हणतात; विश्वविस्तार; एखादी अवाढव्य, विस्तीर्ण वस्तू: 'तो हा जगडंबरू !'– ज्ञा १५.४७.

**जगडी** स्त्री. झगरी; शेकोटी. ही बारा मास दिवसरात्र पेटलेली असते. (ठाकरी)

**जगड्वा(व्या)ळ** वि. प्रचंड; अवाढव्य (इमारत, अरण्य): 'फिलाडेल्फिया येथील जगड्व्याळ प्रदर्शनातही त्यांचा अपूर्व गौरव झाला.'–शिफ २९. [सं.जगत्+व्याल]

**जगढाल–ळ** पु. ध्वज; झेंडा. [सं.जगत्+ढाल]

**जगणूक** स्त्री. निर्वाह; जगण्याची क्रिया; जीवन.

**जगणे** अक्रि. जिवंत राहणे; अस्तित्वात असणे; आयुष्य कंठणे वाचणे; निभावणे; रक्षण होणे. [सं.जीव्] (वा.) **जगायला जाणे** – गुजराणीसाठी गाव सोडून जाणे : 'ती माणसं जगायला चालली आहेत !' – एगाएपा ३६.

**जगत** पहा : **जग** १,२

**जगतापंथ** पु. १. आपत्तीतून वर येणे; भयंकर दुखण्यातून बरे होण्याची स्थिती. (क्रि. (जगत्या पंथास)लागणे, लावणे.) २. (ल.) बुडीत झाल्यानंतर पुन्हा धंदा सावरणे, उभारणे. (क्रि. जगत्या पंथास लागणे, लावणे.)

**जगती** स्त्री. एक वैदिक छंद. याचे चार चरण असून प्रत्येक चरणात १२ अक्षरे असतात. [सं.]

**जगती** स्त्री. भिंत; आवाराचे कूस; तट : 'चांगदेवी जगती आंतु मठीं अवस्थान दीस सात.' – लीचउ ६५.

**जगती** स्त्री. १. पहा : **जग १,२**. २. मठ : 'पूर्वाभिमुख जगती असे ।' – ऋव १०६.

**जगत्कारण** न. जग उत्पन्न करणारी शक्ती. हा शब्द निरनिराळे पंथ, ईश्वर, माया, परमाणू या निरनिराळ्या संकल्पनांना, वस्तूंना लावतात. [सं.]

**जगत्त्रय** न. स्वर्ग, मृत्यू, पाताळ हे तिन्ही लोक. [सं.]

**जगत्प्राण** पु. हवा, वायू. [सं.]

**जगत्लीला** स्त्री. १. जगरीत, समजूत इ. २. आधिभौतिक मोह, माया; खोट्या जगाचा खऱ्याप्रमाणे भास. [सं.]

**जगत्शेट** पु. १. फार श्रीमंत. २. (ल.) निर्धन माणूस.

**जगत्शेटीचा नातू** पु. निर्धन मनुष्य.

**जगद(दा)ळ** वि. १. जगाला भरडणारा : 'दापीतेआं देवांचा जगदाळा।' – शिव १५५. २. (बायकी) जगाशी भांडणारा.

**जगदानिया** पु. उदार; उद्धारक.

**जगदाभास** पु. जडरूप माया; बाह्य सृष्टी. [सं.]

**जगद्बंधु–धू** पु. विश्वबंधू; सर्व सृष्टीवर प्रेम करणारा. [सं.]

**जगद्विलक्षण** वि. १. सर्व जगाहून निराळा, विलक्षण. २. वाह्यात; चमत्कारिक; तऱ्हेवाईक. [सं.]

**जगधाम, जगन्निवास** वि. सगळे जग व्यापून राहणारा; परमेश्वर; सर्व जग हे ज्याचे घर आहे असा. [सं.]

**जगनाड** पहा : **जगदळ, जगदाळ**

**जगनाल** पु. परशूचा एक प्रकार.

**जगन्नाथाचा रथ** ज्याला सर्वांचा हातभार असावा लागतो असा (गाडा, प्रकल्प, योजना इ.); सर्वांच्या प्रयत्नांनी होणारे काम : 'शासनाच्या जगन्नाथाच्या रथाखाली भरडून जाऊ नये याकरिता...' – अम ४०.

**जगन्नाथी** पु. एक प्रकारचा पंचा; जाड वस्त्र.

वि. जगन्नाथ शहरासंबंधी (धातूची भांडी, हरक).

**जगन्नियंता** वि. जगाच्या हालचालीवर नियंत्रण ठेवणारा, परमेश्वर. [सं.]

**जगन्माता** स्त्री. १. जगाची आई; जगदंबा. २.(ल.) मातृतुल्य स्त्री. [सं]

**जगन्मोहना** स्त्री. जगाला भुलविणारी स्त्री. [सं.]

**जगबोळ** पु. जगाला पारखा होणे : 'त्यागा जगबोळ जाहाला ।' –उगी ९१.

**जगबोळ** पु. १. सर्वनाश : 'यादवांचा जगबोळु केला'– श्रीच २(१),२०. २. कडू कातबोळ : 'नारदा होतुसे जगबोळाचे मानु ।' – उगी ६३. [सं.जगत्+क. बोळ]

**जगभांड** पहा: **जगदळ**

**जगर–रे** पहा : **झगरे**

**जगरहाटी** स्त्री. जगाची पद्धत, रूढी : 'ही जगरहाटी आहे.' – जाजपू २०४.

**जगराण** वि. जंगी, मोठे : 'ताजबावडी दोरीला हिरीवर झाकाण जगराण । होय बाबा सापाचं नाही वाट जायाला ।' – लोसाको.

**जगरे, जग्रे** न. पु. गोवऱ्यांचा धगधगीत विस्तव; झगरे : 'भाजभाजुं खा : हो कां नी : मग वीसी देओ आणिवीला : जगरें घालवीले : ' – लीचउ २७३.

**जग(गा)ल** स्त्री. नांगराचा फाळ. (गो.कु.)

**जगलावचे** अक्रि. वीज चमकणे. (गो.)

**जगलीला, जगत्लीला** स्त्री. १. जगाची रीत; सर्वसामान्य लोकांची वागणूक, पद्धती, समजूत वगैरे. २.आधिभौतिक मोह, माया; खोट्या जगाचा खऱ्या जगाप्रमाणे भास.

**जगवण** स्त्री. **नांदवणूक** पहा : **जगणूक**

**जगवणूक** स्त्री. निर्वाह; जगविण्याची, राखण्याची, जिवंत ठेवण्याची क्रिया.

**जगवून–तगवून** क्रिवि. काटकसरीने; हात राखून (खाद्य पदार्थ खर्चणे); सोपस्काराने, काळजी घेऊन.

**जगस** न. दक्षिण कोकणातील एक आंबट गोड, रक्तवर्णी आवळ्याएवढे फळ : 'कोपऱ्यावर तो, अनंता आणि बाळा... जगसे वाटून घेत.' – शेलूक १०६.

**जगुमला** वि. लाडकी, अतिशय प्रिय : 'उभ्या वाटेनं चालली पहा माही जगुमला । पळे बाहेर खेळाला चेंडू चांदणीनं नेला ।' – लोसाको.

**ज(जो)गूल** न. वीज. (गो.)

**जग्नी** स्त्री. एक तेल बी. (झाडी)

**जग्रा** पु. व्यर्थ पसारा. (झाडी)

**जघन** पु. १. बस्तिप्रदेश; जांघ; जांघाड. २. ढुंगण; मांडी; कंबर : 'धरिला जघन द्वयकरीं ।' – निगा १२१. [सं.]

**जघनचपला** स्त्री. १. नर्तकी स्त्री. २. जारिणी; व्यभिचारिणी.

**जघन्य** वि. १. हलके, नीच. २. शेवटचा; पाठीमागचा. [सं.]

स्त्री. अपकिर्तो.

**जघन्य** वि. जगजाहीर : 'हें शून्यवादि यांचें मत जघन्य' –कक ६.११.९०. [सं. जगत्] (वा.) **जघन्यात होणे** – जगजाहीर होणे. (मूर्खपणाचे किंवा वाईट कृत्य) 'कीर्ति जघन्यांत झाली ।'–अफला ५१.

**जघन्यवृत्ति–त्ती** स्त्री. अप्रशस्त, हलकट, मनोवृत्ती; नीच चाल.

**जचणे** अक्रि. मेहनत घेणे; फार श्रम करणे : 'कीं नैरा बापाचेया पुत्र जचे ।' – ज्ञा १३.५४२. पहा : **जाचणे** [सं.यत्]

**जंचणे** अक्रि. मनात जळणे : 'प्राणीया बहुत दीस जचतु असे : तरि काइ बाइ :'– लीचपू २०३.

**जचना** क्रि. उचित वाटणे. (झाडी)

**जजबात** स्त्री. भावना. (अहि.)

**जझि(झी)या** पु. (मूळ अर्थ संरक्षणाकरिता बदला पैसा) मुस्लीम शासकांनी मुसलमानेतर प्रजेवर लादलेली डोईपट्टी, कर : 'न्यायाचे मार्गानें पाहता जजिया पट्टीचा कायदा केवळ गैर.' – सनदा १५०. [अर.जिझिया]

**ज(जं)जिरा** पु. १.पाण्यातील किल्ला; जलदुर्ग : 'आरमाराला भक्कम जंजिरा नव्हता.'– श्रीयो १.३८३. २. कुलाबा जिल्ह्यातील एक संस्थान व किल्ला. [अर.झजिरा,जंजरिह]

**जजू** पु. (उप.) यजुर्वेदी लोक. [सं.यजुस्]

**जट** पु. पोटातील कृमी. (झाडी) [सं.जंतु]

**जट** स्त्री. १.पेड वळलेले केस (शंकर किंवा साधू लोक यांचे); न विंचरल्यामुळे, तेल वगैरे न लावल्यामुळे एकास एक चिकटलेल्या गुंतलेल्या केसांच्या कपाळावर व पाठीवर लोंबत राहणाऱ्या बटा, वळ्या; जटा. २. संघ; जूट; जमाव. [सं.जट्]

**जटणे** अक्रि. एकत्र होणे; जुगणे; गुंतणे. [सं.जट्]

**जटदाट** वि. बळकट; सुरक्षित : 'जटदाट ओवारे, जेतागावसि ताहि'– ताम्र १.२५.

**जटल्ली** स्त्री. थाप; बात. ( व.)

**जटर** वि. १.टणक. २. जून (क्रि. होणे).(झाडी) [सं.जठर]

**जटा** स्त्री. १. पहा : **जट** १. २. केसांची गुंतागुंत : 'केसांची नुसती जटा झाली होती.' – तोरण १९. ३. वैदिक वाङ्मयातील पठणविषयक एक विकृती. संहितेच्या दोन पदांचा संधी करून म्हणणे. त्यास क्रम म्हणतात व त्या दोन पदांच्या पुढील पद त्यास जोडून त्या तीन पदांची संहिता करून ती तीन पदे उलट म्हणणे. उदा. अग्निमीळे ईळेग्निमग्निमीळे । ईळे पुरोहितं पुरोहितमीळ ईळे पुरोहितं । – इ. [सं.]

**जटागौर** स्त्री. एक औषधी वनस्पती. हिच्यावर शेवाळ्यासारख्या रेषा असतात. ही गौरीला वाहतात.

**जटाजूट** पु. केसांचा समूह. डोक्यावरचे वाढलेले केस. पहा : **जटा** : 'जटाजूट एका मुगुट माथा शिरी ।' –तुगा २०५०.

**जटापाठ** पु. वेदाच्या ऋचा म्हणण्याची एक विशिष्ट पध्दती. उदा. 'गुरूंना वंदावे' हे शब्द 'गुरूंना वंदावे वंदावे गुरूना गुरूंना वंदावे' – अशा पद्धतीने म्हणण्याची पद्धत.

**जटामांसी, जटामावशी** स्त्री. केस काळे करण्याकरिता जे तेल तयार करतात त्यासाठी उपयुक्त अशी एक सुगंधी वनस्पती.

**जटित** वि. जडित : 'कंठीं माळा मुखीं पट्टा। जटित सूत्रीं।' - गीतार्णव १.४८२.

**जटिल** वि. १. कठीण; क्लिष्ट ; गुंतागुंतीचा; किचकट : 'बऱ्याच जटिल बाबींच्याकडे आपले लक्ष वेधावे लागले.' - मागोवा ३०. २. जटिलासंबंधी. पहा : **जटाधारी** [सं.]

पु. १. तपस्वी. २. ब्रह्मचारी.

**जटिल-ळ वेखंड** न. काळे वेखंड.

**जटिल सारणीयन** गुंतागुंतीची कोष्टके तयार करणे.

**जटिल क्षार** (रसा.) दोन किंवा अधिक साध्या क्षारांपासून बनलेला मिश्र क्षार.

**जटिली क्रिया** १. यौगिक क्रिया. २. औषधी रसायने वगैरे करण्याची एक पद्धती.

**जट्याळ** वि. जटा धारण करणारा : 'जट्याळ गाट्याळ मिळती राशी। केवीं साधुत्व त्यासी मानूं आम्ही।' -एभा ५.१७९.

**जठर** न. पोट; उदर; पिचंड. [सं.]

**जठरग्रंथि-थी** स्त्री. जठररस उत्पन्न करणाऱ्या जठराच्या आंतरत्वचेतील सूक्ष्म ग्रंथी. [सं.]

**जठरज्वाला** स्त्री. पोटशूळ.

**जठररस** पु. (जीव.) जठरात पाझरणारा पाचक रस, द्रवपदार्थ. [सं.]

**जठरहीनता** स्त्री. (वैद्यक) काही मानवी देहांत जठर हा अवयवच नसण्याची स्थिती.

**जठराग्नि-ग्नी, जठरानल** पु. पोटातील अग्नी; पचनशक्ती. [सं.]

**जठरामय** पु. जलोदर.

**जठरांत्रदाह** पु. सूक्ष्मजंतूमुळे पचनसंस्थेचा होणारा रोग. दूषित खाद्यपदार्थ व पेये यांमुळे हा उद्भवतो: 'जठरांत्रदाह (गॅस्ट्रो एन्ट्रायटिस) ह्या विकारात उलट्या व जुलाब सुरू होतात.' - आआआ १६४. [सं.]

**जठरांत्रशोथ** पोट व आतडी यांचा (लाली व सूज असलेला) दाह. [सं.]

**जठी** अ. जेथे; ज्या ठिकाणी.

**जड** स्त्री. १. मूळ; आधार. २.(ल.) स्थान; जोर; बैठक: 'शत्रूशी जड कमी होईल.' - समारो ४.३१३.३. (ल.) धन; पैसा; मालमत्ता. [सं. जट](वा.) ० **दाबणे**-एखाद्या झाडाची फांदी मध्येच जमिनीत पुरल्यावर त्या फांदीस मुळ्या फुटून त्या फांदीचे नवीन कलम करणे. ० **बळावणे** - बळ वाढणे; साथीदार वाढणे : 'आईसाहेबाची जड बळावत चालली ... तरी तुम्ही आपले जागा खबरदार राहून...' - ऐको ४०२.

**जड** वि. १. मोठेपणाचा; मानाचा. २. भारी किमतीचा; मौल्यवान. ३. गंभीर; विद्वत्ताप्रचुर; परिपूर्ण (टीका, वाद, विषय). ४. भयंकर; जबर (रोग); जिवावरचे; असाध्य (दुखणे). (वा) ० **धरणे** - मोठा समजणे.

**जड** वि. १. अचेतन; भौतिक. २. (वेदान्त) धन; द्रव, वायुरूप नव्हे असे. ३. (ल.) थकलेला; झोपाळू; त्रासलेला. [सं.]

**जड** वि. १. द्वित्त. २. कठोर (अक्षर).

**जड** वि. १. दुःखी, दुःख देणारे. २. त्रासदायक; कठीण; महत्त्वाचे (काम): 'मदुद्धरण मात्र कां जड तुम्हां दिसे वारिती।' - केका १९.(वा.) [सं.] (वा.) ० **जाणे** - कठीण होणे; अवघड होणे; त्रासदायक होणे: 'त्यांच्या वाटेला जाल तर ते तुम्हांला जड जाईल.' - स्वश्री १९७. ० **वाटणे** - कठीण, दुःखदायक, त्रासदायक असणे. ० **होणे** - १. कठीण जाणे; आर्थिकदृष्ट्या न परवडणे : 'खरें म्हणजे माझें राहणें बाहेरील मित्रांना जडच होऊं लागलें असावें.' - काभि ६५. २. प्रतिष्ठेमुळे एखाद्यास गर्व चढणे.

**जड** पु.स्त्री. न. १. जमाव; समुदाय. २. संस्था. ३. मदत; मदतगार.

**जड** वि. १. भारी; वजनदार; उचलावयास कठीण. २.(ल.) मंद; आळशी; मूर्ख : 'मी अत्यंत जड असे।' - ज्ञा ३.१८. ३. पचनाला कठीण (अन्न, पाणी). [सं.] (वा.) ० **सांगणे** - (रोग, अडचण) अधिकाधिक वाढत जाणे. (बूड) शेवटी जबरदस्त होणे.

**जड अवघड** कठीण संकट आणि अडचण यांना व्यापक संज्ञा.

**जडकाई** स्त्री. आळस. (झाडी)

**जडकाम** न. जोडण्याचे काम ; सांधकाम.

**जडकावणे** अक्रि. १. रोग, पाऊस इ. पहिल्यापेक्षा अधिक होणे; वाढणे; बळावणे. २. जड पडणे; दुखू लागणे (अंग). (ना.) पहा : **जडावणे**

**जड खनिज** सामान्यपणे २.८ पेक्षा अधिक विशिष्ट गुरुत्व असणारी खनिजे.

**जडगिरी** वि. कागदाचा एक प्रकार.

**जडगीर** न. अवजड सामानसुमान : 'येथे भारी तोफा वगैरे सरंजाम भारी जडगीर असेल ते ठेवून आम्ही मोगलांचे शहावरी जात असों' - ऐलेसं २७२.

वि. (लुटीच्या भाराने) भारावलेले; लादलेले : 'तेथोन कूच करोन निघोन जावें, तर लश्कर जडगीर जाहले होते.' -ऐको ४०२.

**जडग्रंथि-थी** पु. (वेदांत) आत्म्याचा भौतिक पदार्थांशी संबंध. [सं]

**जडचिदैक्य** न. जड व चैतन्य यांचे ऐक्य; मन आणि दृश्य पदार्थ यांचे ऐक्य. [सं.]

**जडचिंब** न. भातातील ज्या दाण्यांत फार सत्त्वांश नसतो परंतु जे पोलापेक्षा थोडे जड असतात त्यांना जडचिंब म्हणतात. (को.) पहा : **जडपळिंज**

**जडजखमी** वि. भारी, अतिशय जखमी : 'रामाप्पा घोरपडा आमचा जडजखमी आहे. रामजीपंत भाचा वाचतां दिसत नाहीं.' - ऐको ४०२.

**जड(र)जवाहीर** न. सोने, रत्ने वगैरेंना व्यापक संज्ञा : 'सर्व जिनस अज्नास जरजवाहेर नागपुरास घेऊन जाऊन...' - मइसा ७. [फा.]

**जडजंबाल** न. दुर्बोध गोष्ट; किचकटपणा : '...वाचकांना गणिताच्या जडजंबालामध्ये अडकवून ठेवण्यासारखे होईल...' - कहीग १६४.

**जडजा** पु. न्यायाधीश : 'गाव नासिकाच्या वाटे सावली सडकेला । आता सखा माझा जडजा जातो कोरटाला ।' - लोसाको. [इं.जज्ज.]

**जडजीववाद** पु. सर्व आधिभौतिक व मानसिक चैतन्य जड प्रकृतीपासून झाले असे प्रतिपादणारे कोणतेही तत्त्वज्ञानमत.

**जडजूग** न. ओझे आणि भार (धंद्याचा, काळजीचा).

**जडजोखीम** न. संभवनीय आपत्ती, अनर्थ (सर्व आपत्ती किंवा एखादी आपत्ती); पेलण्यास कठीण असे काम, जबाबदारी.

**जड डोसके, डोकसे** हजामत करावयास कठीण असे राठ केस. न्हावी लोकांत म्हणतात.

**जडण** स्त्री. १. जडकाम; सांधकाम. २. (ल.) आत बसविणे, जडविणे; (रत्न इ. सोन्याच्या कोंदणात) खोवणे. ३. जोड; सांधा. ४. जोडणावळ; जोडण्याची मजुरी. ५. संगम; संघटन; जाळे.

**जडणघडण** स्त्री. १. तयार होण्याची, बनण्याची क्रिया; घडत जाणारे स्वरूप; उत्क्रांत स्वरूप : 'त्या देवतांची जडणघडण करणाऱ्या लोकमानसाची आंतरक्रिया उलगडत जाते.' – लोसंक्षि ६०. २. उभारणी.

**जडणावळ** स्त्री. १. जोडण्याची मजुरी. २. जोडण्यामधील कौशल्य, चातुर्य.

**जडणी** स्त्री. १. जडकाम; सांधकाम. पहा : **जडण** १. २.पायतणाची शिवणावळ. (कु.)

**जडणे, जडविणे** उक्रि. १. सांधणे; एकत्र होणे. २.(ल.) कोंदणात बसविणे (रत्न वगैरे). ३.(ल.) ठाम बसणे; नोकरीवर कायम होणे. ४. चिकटणे; धरणे; बांधणे: 'एवं वासना जडल्या हरिरूपाशीं।' – एभा २.६८८. [सं.युज]

**जडता** स्त्री. मंदपणा; सुस्ती; स्थितिशीलता.

**जडतार–री** पहा : **जरतार, जरतारी**

**जडत्व** न. १. वजन, २. सुस्ती. ३. आळस; मरगळ.

**जडत्व** न. सर्व पदार्थांमध्ये असणारा एक गुणधर्म; (शा.प.) प्रेरणारूप कारणावाचून आपली स्थिरावस्था अथवा सरळ रेषेतील समचलनावस्था न बदलण्याचा धर्म. [सं.]

**जडत्व बल** (भौ.) निसर्गतःच प्रत्येक वस्तूत असणारे हे बल त्या वस्तूच्या होणाऱ्या स्थित्यंतरास अगर तिला गती मिळण्यास विरोध करते.

**जडत्वाकर्षण** न. गुरुत्वाकर्षण. [सं.]

**जड द्रव्य** जागा व्यापणारा, वजन असलेला, इंद्रियांना कळणारा पदार्थ; भौतिक वस्तू.

**जड धरण** (स्था.) स्वतःच्या वजनामुळे स्थिर राहून साठलेल्या पाण्याचा दाब सहन करणारे धरण.

**जड धातू** ज्याची सापेक्ष घनता ४ पेक्षा जास्त असते असा धातू.

**जडप** न. १. जडकाम; सांधकाम. २. पहा: **जडण** २. ३. (निरनिराळ्या जबान्यांची) एकवाक्यता; मिलाफ; मेळा; जुळणी (अजमास, कूटप्रश्न, कोडे यांमधील). (क्रि. बसविणे, बसणे.)

**जडप–ब** वि. १. कठीण; त्रासदायक (काम, धंदा). २. भयंकर (दुखणे). ३. जास्त मोलाचा (पदार्थ, वस्तू). [अर.जर्ब]

**जडपलिंज** न. पोलापेक्षा थोडे जड भात. पहा : **जडचिंब**

**जड पाणी** ड्युटेरिअम ऑक्साइड ; साध्या पाण्यात हैड्रोजनचे अणू असतात त्याऐवजी ह्यात ड्युटेरिअमचे अणू असतात. रैणव भार २०. या जड पाण्याचा उपयोग अणुभट्टीमध्ये न्यूट्रान्सची गती कमी करण्यासाठी होतो.

**जड, जडब पारडे** १. सुबत्ता; भरभराट (तराजूच्या ज्या पारड्यात वजन जास्त असते ते पारडे खाली जाते व कमी वजनाचे वर जाते). २. समृद्ध माणूस.

**जड, जडब पारडे** त्रासदायक काम. (क्रि. उचलणे, वाहणे, उरकणे, सोसणे.)

**जड बुडाचा** (ल.) श्रीमंत आणि प्रतिष्ठित, वजनदार (मनुष्य).

**जडबुद्धि(द्धी)–मति(ती)** स्त्री. १. बुद्धीचा जडपणा; बुद्धिमांद्य. वि. १. मूर्ख; अडाणी. २. (मानस.) मतिमंदत्वाच्या तीन प्रकारांपैकी हा सर्वात गंभीर प्रकार होय. सामान्यतः अशा व्यक्तीचा बुद्धिगुणांक २० पेक्षाही कमी असतो. [सं.]

**जडबोका** पु. वि. स्थूल (माणूस, प्राणी, वस्तू).

**जडभरत** पु. १. एक ऋषी. २. (ल.) आळशी, सुस्त माणूस.

**जडभरतपणा** पु. आळस; सुस्ती : 'शतकानुशतकांचा हा जडभरतपणा दूर फेकून द्या.' – भास्मृग्रं १६७.

**जडभारी** न. संकट; आपत्ती. (वा.) ० **असणे** – बरे वाटत नसणे; संकटात असणे; आपत्तीत असणे: 'गावात कुणाच्या जिवाला जडभारी असले की त्याला भेटायला जाण्यात आई फार तत्पर असे.' –वाटा ७०.

वि. कठीण; डोईजड; त्रासदायक : 'माझिये जीवीचे कांही जडभारी।' – तुगा ८५८.

**जडभारी** न. अवजड सामान : 'हत्ती व कारखाना व जडभारी यादवाडास ठेविले आहे' – ऐलेसं २७९९.

**जडभ्रम** पु. आधिभौतिक पदार्थाचे चुकीचे ज्ञान; सृष्टी शाश्वत असल्याचा चुकीचा समज.

**जडवस्तु–स्तू** स्त्री. (तत्त्व. तर्क.)अवकाश व्यापणारी व पंचेंद्रियांनी जाणता येऊ शकेल अशी (निर्जीव) वस्तू; भौतिक वस्तू.

**जडवळी–णी** स्त्री. जुळणी; जोडणी; सांधकाम.

**जडवाद** पु. जडवस्तू हेच सत्य असून मन, भावना इ. त्याचीच परिणत रूपे आहेत असे मानणारी विचारसरणी. सर्व मानसिक क्रियांचा खुलासा आधिभौतिक व रासायनिक फरकांनी होतो हे मत. सर्व वस्तुजाताच्या मुळाशी दैवी शक्ती आहे हे नाकारणारी प्रणाली : 'त्या काळचा भौतिकवाद म्हणजे चार्वाकाचा जडवाद, सुखवाद, भोगवाद' – संवासाफ ५०.

**जडवादी** वि. निरीश्वरवादी.

**जडवामन** पु. (मानस.) कंठस्थ ग्रंथींच्या जन्मजात अवक्रियेमुळे निर्माण होणारा मानसिक मंदनाचा एक चिकित्सात्मक प्रकार. अशा व्यक्तीचा शारीरिक विकास विकृत स्वरूपाचा, शारीरिक क्रिया सीमित व दोषपूर्ण असतात.

**जडविणे** सक्रि. कोंदणात बसविणे. [कान. जडायुसि]

**जडशील–ल** वि. जड; भारी वजनाचा; अवजड : 'काही वेळा जुने–पुराणे गडू मिळतात. जडशीळ आणि नक्षीकाम केलेले.' – वाटा ५५.

**जड हाताचा** कंजूष : 'मी जड हाताचा हाय हे खरं हो... पन गावाची पट्टी खर्चायला माझ्या बाचं काय जातंय हो.' – गुशि ४८.

**जडा** स्त्री. पु. परमेश्वराच्या शक्तींचा एक विभाग : 'जडाचेतना शक्तीसी चक्रधरू : मूर्त्त जाला' – मूप्र ८३७.

**जडाई** स्त्री. १. जडावांचे काम. २. जडावकामाची मजुरी.

**जडाजड** स्त्री. एक करण्याची क्रिया; सांधकाम; गुंफण; रचाई (भिंती, वस्तू इत्यादींची, अनेक माणसांकडून व्यवस्थितपणे केलेली).

**जडात्मकता** स्त्री. सुस्तपणा; बुद्धिमांद्य; मंदपणा; उदासीनता. [सं.]

**जडाद्वैत** न. एका जड प्रकृतीतच सर्व गोष्टींचा समावेश करणारे अद्वैत; सृष्टीचे मूळ. [सं.]

**जडान्न** न. पचायला कठीण असे अन्न. [सं.]

**जडाव** पु. १. जडणी; कोंदणात बसविण्याचे काम, बसविलेली स्थिती. २. रचना; तरतूद: 'त्याप्रमाणे मोर्चेबंदीचा जमावाचा जडाव नाला – तोफा देखील देऊन' – पेद ३.११६. ३.हुद्द्यावर कायमची नेमणूक. ४. जमाव. ५. साहित्य.

**जडावकार** पु. जडावांचे काम करणारा; मीनागार; कोरून काढणारा.

**जडावजोह(हा)र, जडावांचे दागिने** न. पु. अव. सोन्याच्या कोंदणात रत्ने वगैरे बसवून केलेले अलंकार, दागिने.

**जडावणे** अक्रि. १. (पाऊस, वारा, रोग इत्यादींचा) जोर वाढणे: 'तेव्हा ती (जखम) जडावून राजास मृत्यूचीं चिन्हे होऊ लागलीं.' – इंदेव ११९. २.(बसलेला व्यापार) भरभराटीस येणे. ३. संपन्न होणे; श्रीमंत होणे. पहा : **जडकावणे**

**जडावणे** अक्रि. (त्रासदायक ओझे) जड, भारी होणे; भरून येणे : 'जपान सोडताना जीव जडावला.' – जजदि १७४.

**जडावणे** अक्रि. (शरीर) सुस्त, बधिर होणे.

**जडावस्था, जडिमा** स्त्री. अत्यल्प आंशिक जाणिवेची आणि मानसिक प्रतिक्रियाशीलता खूप कमी झालेली अवस्था.

**जडावी गिलावा** (स्था.) घडीव दगडाचा आभास निर्माण करण्यासाठी केलेले गिलावा काम.

**जडांश** पु. आधिभौतिक पदार्थ. [सं.]

**जडि(डी)त** न. रत्नखचित अलंकार : 'त्याली जडिताचे भूषण।'-ऐपो ७.

**जडित जोहार** पहा : **जडावजोहर**

**जडिव** वि. जडित; (रत्न) खचित : 'घ्या ग घ्या ग चुडा बायांनो जडिवाचं लेणं'-लोसाको.

**जडी** स्त्री. वर्षभर जगणाऱ्या कपाशीची एक जात.

**जडी** स्त्री. मूळ; औषधी; पाळे. [सं.जट] (वा.) ० **रुतणे** – १. मूळ धरणे. २.(ल.) कायम, बळकट होणे. ३. आपत्काळासाठी राखून ठेवलेला पैसा.

**जडी** स्त्री. १. बळ; चिकाटी. २. जमाव : 'हैदराच्या हातास गेल्यावरी त्याची जडी भारी, सावनूर, बंकापूर दोन्ही स्थळें त्याच्या हातीं लागलींशी होतात.'-ऐको ४०३.

**जडीप** वि. भारी; डोईजड; भयंकर; त्रासदायक: 'सावकारांना द्यावे लागणारे जडीप व्याज वांचून त्यांचा पुष्कळ फायदा होईल.' – गांवगाडा १३३.

**जडीप** वि. जडप; जास्त मोलाचे, अर्थात निवडक : नामांकित; 'जासूदास व पागेचे जडीप आढळाचे बारगीर, त्यास महीने बांधून दिल्हे ते दरमहा दिल्हेच पाहिजेत.'-ऐको ४०३.

**जडीप-ब** पहा: **जडप-ब**

**जडीबुटी-ट्टी** स्त्री. १. औषधी गुण असलेले झाडाचे मूळ २. काष्ठौषधी : 'डॉक्टर जंगली जडीबुटी विकतो.'-मिख ९१.

**जडीबुटी-ट्टी** स्त्री. १. आपत्कालासाठी साठवून ठेवलेला पैसा किंवा दागिने. (ल) २. अद्भुत रीतीने कार्य घडवून आणणारी वस्तु; ताईत, गंडा, दोरा वगैरे.

**जडीव** न. तुकड्यातुकड्यांचा जोडून केलेला पदार्थ.
वि. १. सांधलेले; शिवलेले (मुख्य वस्तूला दुसरी वस्तू). २. जोडलेले; ठिगळ मारलेले; तुकडे तुकडे एकत्र केलेले. ३. चिकटवलेले. ४. कोंदणात बसविलेले.

**जडु** न. आजार; रोग. (बे.) [क.जड्डु]

**जड्या** पु. (अव.जेडे) पच्चीकाम, जडितकाम करणारा; पंचीगर: 'जडे लोक त्याच्या (हिऱ्याच्या) योगाने रत्ने कापितात.'-मसपु ११४.
वि. मूळचा एखाद्या ठिकाणचा नसून बाहेरून येऊन स्थायिक झालेला.

**जड्या गणपति-ती** निरनिराळे हात-पायादी सुटे अवयव जोडलेला गणपती. याच्या उलट डका किंवा छापाचा गणपती.

**जड्या भाऊ** पु. लटपटी करून काम, मुद्दा साधणारा माणूस.

**जण-णी-णे** पु.न. (अव.) माणूस; व्यक्ती; असामी; लोक. या शब्दाच्या मागे संख्यावाचक शब्द लावतात. जसे: – दोन –तीन – चार जण: 'ऐसे तिघे जण प्रबुद्ध थोर जाले।'-पंचतंत्र १.२. दोघे-तिघे-चौघे जण किंवा व्यक्ती हा शब्द फक्त माणसांनाच लावतात. पहा : **जन** [सं.जन] (वा.) ० **हाराचे, चोराचे** – काही लोक चोराच्या बाजूला, काही लोक धन्याच्या बाजूला असतात अशांना उद्देशून. **जणाचे हाती दोन धोंडे**– कोणत्याही तऱ्हेने वागले तरी लोक खूष राहत नाहीत या अर्थी. **जणात मिसळून राहणे, असणे** – लोकांत मिळून मिसळून राहणे, असणे.

**जणकथा-चाल-लज्जा-वाढ, जणजाहीर-मर्यादा** पहा: **जन**

**जणदाता** पु. ज्ञान देणारा : 'तुजासारिखा जणदाता : मजसारिखा मागता' – ऋभ १६९.

**जणू-णो** अ. जसे काय; जसे काही; जणू काय; मला वाटते; दर्शनी. [सं. जाने]

**जत** स्त्री. संघ; जूट; संयोग; एकविचार. [सं.युति]

**जत-ती** स्त्री. १. गीत; गाणे; पद : 'श्रीमंत मार्सेकर देसायांची जत, भोसल्याची जत इ.'– ब्राह्मण (मा.) २. पद्याचा एक प्रकार : 'उपनिषेधाचे रहस्य : जत पदीं बांधोनि गाइलें :'– लीचपू १३३.

**जत** पहा: **जंत**

**जत** वि. जड. (खा.)

**जतकारणी-णे** पहा : **जतावणी, जताविणे**

**जतकी** स्त्री. बैलाच्या गळ्यातील पट्टे. (वे.) [क.जत्तिगि]

**जतणूक** स्त्री. सांभाळ; जगवणे; उदरनिर्वाह : 'गुराढोरांची व आपली जतणुक'-जोफुसग्रं २२८.

**जतन-ना, जतनाई** स्त्री. निगा; जपणूक; तत्परता; सांभाळ; काळजीपूर्वक रक्षण; संरक्षण; संगोपन; प्रतिपाल : 'हे आता जतन करी नाम।' – तुगा १६४८.[सं.यत्] (वा.) **जतनेस, जतनाईस असणे, घालणे, ठेवणे** – काळजी घेण्यासाठी एखाद्याच्या स्वाधीन करणे, असणे.

**जतन–ने** क्रिवि. काळजीने ठेवलेले. (क्रि.करणे, ठेवणे, राखणे, असणे.)

**जतनामा** पु. वंशावळ; वंशवृक्ष.

**जतनाय** स्त्री. संचय; साठा.(गो.) [सं.यत्]

**जतनाविणे** सक्रि. काळजी घेणे; रक्षण करणे; शुश्रूषा करणे; सुरक्षित राखणे : 'जन्मभर जतनावून ठेवलेली पिंजर '– तोरण १२९.

**जतनीनं** क्रिवि. काळजीपूर्वक; जपून : 'अरे, ते आंब्याचं झाड! किती जतनीनं ते आबासाहेबांनी लावलं.'–वास्तु ८.

**जतने, जतनेऊन** क्रिवि. सांभाळून; जपून; सावधगिरीने. काळजीपूर्वक; निगा राखून. (कु.)

**जतमत** स्त्री. एकविचार; एकमतः 'वाद्ये कोठे वाजवितात, कोठे बंद ठेवतात याचा वास्तविक निकाल म्हटला म्हणजे (१) वहिवाटीप्रमाणे अगर (२) एकमेकांच्या जतीमतीने व्हावयास पाहिजे.'– टिकेले ३२७.

**जता** पहा : **जथा**

**जतावणी** स्त्री. सूचना; इशारा; ताकीद.

**जताव(वि)णे** सक्रि. बजावणे; सूचना देणे; सक्तीने मना करणे : 'ड्रायव्हरने ती (दारे) बंद करण्याचा प्रयत्न केला तेव्हा दादांनी त्याला जतावले.'– आआं १२१. [सं.यत्]

**जति** स्त्री. गेय गीत : ' मग तेहीं जति केली : श्रुतीकार सरिसे केले'– लीचपू ४१८.

**जती, जतिपद** पु. १. जैन लोकांतील संन्याशी; साधू; यती. २. योगी : 'माझा तू अपमान केलास, तर आता मी जती होतो'– मृच्छक २९. [सं.यति] (वा.) **जत्या म्हणणे** – जती (यती) चे पवित्र लेख (स्तोत्र पाठ) वाचणे या वरून (ल.). गप्पा छाटणे, मारणे.

**जती** स्त्री. जत्रा; यात्रा : 'पुढे येत देवी। तिची जती चालों द्यावी।'–तुगा २८४.

**जतीमती, जथामथी** स्त्री. १. एकजूट; एकविचार; संयोग; एकमतः 'आपण जतीमतीनं शेती करू'– आआशे २७५. २. (कायदा) एकाची सर्वांबद्दल किंवा प्रत्येकाची पृथकपणे स्वतःबद्दल आणि सर्वांबद्दलची जबाबदारी. पहा : **एकजती, एकमती**

**जतीर** न. १. कुंभाराचे चाक.(कु.) २. कापसाची सरकी काढण्याचे यंत्र; कापूस लोढण्याचा रहाट. (खा.) [सं.यंत्र]

**जतो–थो–त्ता** पु. लग्नात नवरानवरीला लागणारे कापड; आहेराचे कापड. (के, राजा, गो.)

**जत्र** क्रिवि. जेथे : 'जत्र जीव तत्र शिव हें तों न ये माझिया मनासी।'– ज्ञागा २९६. [सं.यत्र]

**जत्रा** स्त्री. १. (देवांच्या उत्सवाप्रीत्यर्थ) यात्रा; मेळा. २. यात्रेकरूंचा मेळा. ३.यात्रेचे ठिकाण; क्षेत्र.[सं.यात्रा] (वा.) ० **करणे** – १. क्षुद्र देवतांना बकरे, कोंबडे इ. बळी देणे. २. भूतबाधा होऊ नये म्हणून कोंबडे किंवा बकरे मारणे (कर.). ० **फुटणे** – पांगापांग होणे : 'येथील जत्रा फुटून गोपाळकाला होत आहे.'–ऐको ४०३.

**जत्रा** स्त्री. जत्रेमध्ये करावयाचा एक नाट्यप्रकार. हा दक्षिण कोकणात प्रचलित होता. जत्रा करणाऱ्यांना देवळी म्हणतात.

**जत्रु–त्रू** न. गळ्याजवळील हासळीचे (सरीचे) हाड. [सं.]

**जत्रेकरी–रू** पु. यात्रेकरू.

**जथ** स्त्री. जूट; जमाव; समुदाय. [सं.यूथिका–हिं. जथा]

**जथचे** अक्रि. जुळून येणे, साचणे. (गो.)

**जथणे** सक्रि. १. एके ठिकाणी जमणे; (रक्कम) युक्त्या-प्रयुक्त्या करून एकत्र जमविणे, गोळा करणे; (इमारत)तयार करणे, बांधणे; एका रांगेत जमणे, उठणे, चालीस लागणे; आरंभ करणे. २. (पुस्तक) तयार करणे; मांडणे; रचणे. ३. जोडणे; जुळविणे: 'कोणती कशी गोष्ट मी जथूं।'– कसुच १६. [सं. यूथिका]

अक्रि. जुंपणे; भांडणे; लढणे.

**जथनामा** पु. वंशवृक्ष; वंशवेल; कुळकट : 'गावचा पोंक्षे कुलाचा जथनामा आमचेपाशी असलेला पाठविला आहे.'– ऐको ४०४.

**जथपत–थ** स्त्री. पूर्व तयारी; जुळवाजुळव; मांडामांड.

**जथवणे** सक्रि. पहा : **जताविणे**. बजावणे; निक्षून सांगणे : 'रणादित्य यानेंहि पुढे पश्चात्ताप होईल असे जथविले.'– रात ७.

**जथविणे** सक्रि. जमविणे; गोळा करणे; एकत्र आणणे; घडवून आणणे.

**जथा** पु. १. समूह; थवा; तुकडी; तांडा; घोळका; समुदाय; मंडळी : 'दातेसाहेबांनी आमचा हा जथा चक्क एका मजुराच्या घरीच उतरविला होता'– गणगोत २०६. २. कुटुंब; वंश; जात; कुळ; पिढी; टोळी; 'सूर्यवंशी जथा निका।'– वेसीस्व ६.५२. ३. घाणा; एका कृतीसाठी लागणाऱ्या मालाचे प्रमाण. [हिं.; सं.यूथिका]

**जथाजथ–पत, जथाथ** स्त्री. १. समूह; ढीग; एकत्र जमाव; युक्तिप्रयुक्तीने केलेला (पैशांचा) संचय. २. एकत्र आणणे, सर्व बाजूंनी गोळा करणे. ३. धंदा किंवा काम यांच्यासाठी केलेली सर्व तऱ्हेची उपाययोजना.

**जथाड न.** गाठोडे.

**जथाबंद–ध** वि. सामुदायिक; समूहाने; गटशः 'जथाबंद पद्धतीने...'– असा १८९.

**जथावळ** स्त्री. १. कुटुंब; वंश; जात; कूळ. २. (रोग, दुर्गुण इत्यादींची) आनुवंशिकता दाखविताना उपयोग करतात.

**जथेकरी** पु. अव. शेतकऱ्यांच्या टोळ्या.

**जथेदार** पु. शिखातील पुरोहित; पुजारीः 'शीखसमाज अजूनही पुराणमतवादी अंधश्रद्धा जथेदारांच्या व मास्टरांच्या अधीन आहे.' – इशा २८२.

**जथेवार** क्रिवि. कुळवार.

**जथो** पु. ज्या वधूवरांचे लग्न व्हावयाचे त्यांचे आई वडील, धाकटी भावंडे, इत्यादींचा समूह. (लग्न जुळविण्यापूर्वी पाहण्याचे एक आवश्यक काम.) (चि.)

**जथ्था** पु. टोळी; समूह; जमाव : 'छोट्या जथ्थ्यासह तिबेटाच्या'–कती २१.

**जदनामा** पु. वंशावळ : 'गोखल्यांच्या एका जदनाम्याची नकल मागविली.'– गोराघ ९८,

**जदी** बकरा.

**जदीद** वि. १. नवीन (शिपाई, चाकर). २. अलीकडचा : 'जदीद करार झाला'– ऐलेसं ७.३५७०. [अर.]

**जद्द** पु. आजा. [अर.]

**जधय** अ. जेव्हा; एकदा. 'चांदीना गड्या याले रुपाली घसनी। भाऊ पेटो पानी जधय रामना दुकानी।।' – लोसाको. (अहि.) [सं.यदा]

**जधी** क्रिवि. जेव्हा; ज्या दिवशी : 'जधीपासून हरि जन्मला आनंद चित्तीं।' – पला २४. [सं.यदा]

**जन** पु. सोबत करणारा सेवक : 'मी मागां राहिलीं : जनु होता तो बैलु घेऊनि पळाला:' – लीचपू ३००.

**जन** पु. १. माणूस. (व्यक्तिशः व एकत्र) : 'तुज नको जन कोण म्हणे असे।' – रक ४७. २. लोक ; जनता. (समासात) मनुष्यजन= मनुष्यजात; खजन = कुत्र्याची जात. ३. जग : 'जैसा जनामाजी खेचरू।' – ज्ञा ५.९९. [सं.जन:]

**जनक** पु. पिता; बाप: 'करुनि जनक मागा धांवतां वेग गांठी।' – मुरामा ६.२९९.

वि. उत्पन्न करणारा; कारक. समासात – हास्यजनक, क्रोधजनक इ. [सं]

**जनकत्व** न. (समाज.) पूर्वजपरंपरा; पितृत्व.

**जनकथा** स्त्री. दंतकथा; गोष्ट; परंपरागत हकीकत; आख्यायिका. [सं.]

**जनकबोली** स्त्री. बोलीमध्ये परिवर्तन आणि विघटन होऊन उत्तरकाळात इतर काही बोली उत्पन्न झाल्या असे मानता येते अशी बोली.

**जनकसूत्र** न. (भाषा.) अंत:स्तरीय रचनेचे पृष्ठस्तरीय रचनेमध्ये परिवर्तन करणारी सूत्रे. [सं.]

**जनगणना** स्त्री. देशातील लोकसंख्या मोजणे; खानेसुमारी : 'जनगणनेच्या वेळी सातारा जिल्हा...सर्व जिल्ह्यांत आघाडीवर नोंदला गेला पाहिजे.' – श्रीग्रामा ६.

**जनचर्चा** स्त्री. लोकचर्चा; बोलवा; अफवा.

**जनजनावर** न. सापकिरडु :' ते म्हणाले, तुम्ही और दिसतां. जनजनावर कांहीं वेळकाळ ?' – कोसला १७७.

**जनजाति–ती** स्त्री. समान कुळी, प्रदेश, संस्कृती असलेला सामान्यत: आदिम जनसमूह.

**जनजातिपरिषद** स्त्री. (समाज.) वन्य जमातींची कायदेकानून करणारी सभा, मंडळ; त्यांच्या विकासाचा विचार करणारे मंडळ.

**जनणे** अक्रि. प्रसवणे; विणे; जन्म देणे. [सं.जन्=जन्मणे]

**जनता** स्त्री. लोकसमूह; समाज : 'शतयोजनें तदाश्रित जनता ती सर्व दु:ख निस्तीर्णा।' – मोसमा १.२३. [सं.]

**जनताकौल** पु. जनमत; एखाद्या प्रश्नावर निरनिराळ्या सामाजिक घटकांची मते अजमावून काढलेला निष्कर्ष; एखाद्या प्रश्नावर विशिष्ट लोकांना भेटून केलेले सर्वसाधारण अनुमान; मर्यादित मतदान : 'आपण आपल्या चाळीपुरता जनताकौल लावू.' – वावारु २९.

**जनता जनार्दन, जनी जनार्दन** पु. सर्व लोक हेच देवस्वरूप ही कल्पना: 'सर्वांनी आपले आयुष्य जनताजनार्दनाच्या चरणी समर्पण करून टाकले.' – ममामम ८१.

**जनतासंपर्क, जनसंपर्क** पु. लोकांना सर्व गोष्टींची माहिती पुरवून त्यांच्याशी संबंध ठेवून त्यांचा सद्भाव मिळविणे : 'सर्वात महत्त्वाची तयारी जनतासंपर्काची' – पालखी ६. [सं.]

**जनन** न. जन्म; उत्पत्ती. [सं.]

**जननकामुकता, जननेंद्रियवर्ती अवस्था** स्त्री. (मानस.) सिग्मंड फ्राईडने सांगितलेल्या मनोलैंगिक विकासाच्या तीन प्रमुख अवस्थांमधील ही शेवटची अवस्था होय. ही अवस्था १२ ते २० या वयोगटातील मुलांमध्ये असते. या अवधीत व्यक्तिमत्त्वाचा पूर्ण विकास होतो. या अवस्थेचे वैशिष्ट्य म्हणजे या कालावधीत बालकामुकतेचे पुनरुस्थापन होते. या अवस्थेची प्रगती दोन टप्प्यांत होते. (१)१२ ते १५ वर्षांच्या वयात समलैंगिकता. (२) १५ वर्षांनंतर विषमलैंगिकता. [सं.]

**जननक्रियाविज्ञान** न.(शाप.) प्रजोत्पादन क्रियेची माहिती देणारे शास्त्र.

**जननग्रंथि–थी** स्त्री.(जीव.) (स्त्री-पुरुषांमध्ये) जननपेशी निर्माण करणाऱ्या ग्रंथी. [सं.]

**जननग्रंथिहीनता** स्त्री. शरीरात जननग्रंथी नसणे ही अवस्था. [सं.]

**जननद्रव्य** न. (जीव.) जननपेशीतील, बीजपेशीतील द्रव्य. [सं.]

**जनन–पेशी** (जीव.) पुनरुत्पादनाची क्षमता असलेली पेशी; फलित होणारी पेशी. [सं.]

**जननप्रमाण** न. बालकांच्या जन्माचे त्या भागातील लोकसंख्येशी असलेले प्रमाण. हे सामान्यत: दर हजारी मोजले जाते. [सं.]

**जननशास्त्र** न. प्राण्यांच्या उत्पत्तीचे शास्त्र. [सं.]

**जननशांति–ती** स्त्री. अनिष्ट ग्रहावर जन्म झाल्यास दोषनिवारणार्थ करावयाचा धार्मिक विधी, करावयाची शांती. [सं.]

**जननसंस्था** स्त्री. (जीव.) पुनरुत्पादनाचे अवयव असलेली व पुनरुत्पादनाचे कार्य करणारी इंद्रियसंस्था. [सं.]

**जननक्षमता** स्त्री. प्रसवशक्ती; जन्म देण्याची कुवत; उत्पादकता; फलनक्षमता. [सं.]

**जननाशौच** न. सोयर; वृद्धी. [सं.]

**जननी** स्त्री. जन्म देणारी; आई; माता. [सं.]

**जननेंद्रिय** न. प्रजोत्पादनाचे लैंगिक अवयव. [सं.]

**जनपद** पु. देश; प्रांत; खेड्यांचा प्रदेश ; ग्रामीण विभाग : 'शाहिरांना जनपदाचे वावडें होतें असे नाहीं. परंतु ते नगरांतच जास्त रमलेले होते.' – मला १२. [सं.]

**जनपदधर्म** पु. लोकनीती; सामान्य ग्रामीण लोकांच्या धर्मसमजुती व चालीरीती. [सं.]

**जनपदभाषा** स्त्री. देशी भाषा : 'गीर्वाण शब्द पुष्कळ जनपद भाषाचि देखता थोडी।' – मोमंरा १७. [सं.]

**जनप्रवाद** पु. बाजारगप्प; कंडी. [सं.]

**जनंमत अभ्यास, अध्ययन** (समाज.) लोकांच्या चालीरीती, त्यांची मतमतांतरे इत्यादींसंबंधी केलेली अभ्यासपूर्ण पाहणी.

**जनमतचाचणी** स्त्री. (राज्य.) एखाद्या विशिष्ट हेतूने लोकांचे मत जाणून घेण्यासाठी केलेली निवडक पाहणी.

**जनमतदर्शन** न. (राज्य.) एखाद्या सार्वजनिक विषयावर मतदान घेऊन लोकमत अजमावणे.

**जनमर्यादा** स्त्री. लोकरूढी; लोकरीत.

**जनमानस** न. लोकमत; लोकांचा अभिप्राय; मनाचा कल : 'ज्वलंत प्रश्नावर जनमानस काय आहे'– टेअं ५९ [सं.]

**जनरव** पु. १. गोंगाट (लोकांचा). २. बाजारगप्प; कंडी. [सं.]

**जनरी** स्त्री. घुंगुर (वाळे) : 'पायाक सलमुदी त्यावैर जनरी वाळे त्यानी वोळखिल्या गे'– लोसाको.(को.)

**जनरूढी** स्त्री. (समाज.) लोकांत प्रचलित असणाऱ्या चाली किंवा प्रथा. लोकांची चालचलणूक, वागण्याची पद्धती. [सं.]

**जनलोक** पु. १. प्रत्येक मनुष्य. २. सप्तलोकांपैकी पाचवा लोक. पहा : **लोक**

**जनवाक्यजनार्दन** पु. सर्व लोकांचे म्हणणे ते देवाचेच हा समज; पांचामुखी परमेश्वर.

**जनवाढ** स्त्री. दिढी; दुढी; हंगामात सर्व लोकांनी योग्य अशी ठरविलेली (अगाऊ दिलेल्या धान्याची) वाढ.

**जनवाद–वार्ता–जनश्रुति–ती** पहा: **जनप्रवाद**

**जनविक्षोभ** पु. (राज्य.) सार्वजनिक अशांतता निर्माण होईल असे कृत्य करणे.

**जनव्यवहार, जनशिरस्ता** पहा : **जनरूढी, जनरीत**

**जनश्रुति–ती** स्त्री. परंपरेने चालत आलेली समजूत; ऐकीव माहिती : 'ही मशीद औरंगजेबाने बांधल्याच्या जनश्रुतीला पुरावा मिळतो.'– मसं १५९.

**जनसत्ता** स्त्री. (राज्य.) लोकांचे राज्य; लोकांचे, लोकांकडून, लोकांसाठी असलेले राज्य.

**जनसंख्याशास्त्र** न. (भू.) लोकसंख्येचा सांख्यिकी दृष्टिकोनातून केलेला अभ्यास, या मध्ये लोकसंख्येत कालानुरूप होणारा बदलही अभ्यासला जातो.

**जनसंपर्क** पु. लोकमानसात आपली चांगली प्रतिमा असावी यासाठी संबंधित संस्थांनी प्रचार, प्रसार, प्रसिद्धी यांसारख्या गोष्टींचा केलेला अवलंब. [सं.]

**जनसंपर्क साधन, माध्यम** (राज्य.) फार मोठ्या प्रदेशातील लोकसंख्येपर्यंत जलद गतीने पोहोचणारे प्रसाराचे माध्यम, साधन. उदा. वृत्तपत्रे, मासिके, आकाशवाणी, दूरदर्शन इ.

**जनसंमर्द** पु. लोकांची गर्दी : 'जनसंमर्दाच्या गजबजाटापासून दूर झाल्याचा तुम्हाला प्रत्यय येईल.'–पउ ९२. [सं.]

**जनसंमोही नेतृत्व** (राज्य.)अलौकिक, अद्भुत, जणू ईश्वरी देणगीच्या प्रभावानेच प्राप्त झालेले नेतेपण; जनमानसावर पगडा गाजवणारे प्रभावी नेतृत्व. [सं.]

**जनसंज्ञापन** न. (समाज.) समाजाला, लोकांना माहिती पुरविण्याची यंत्रणा, पद्धती. [सं.]

**जनस्वी** वि. पु. लोकसमुदायाबरोबर जाणारा; लोकांसारखा वागणारा : 'माहायोगी आणि जनस्वी । जनासारिखे ।' – दास १.८.११.[सं.]

**जनाकाडी** स्त्री. व्यभिचार. (झाडी.)

**जनाकीर्ण** वि. माणसांनी गजबजलेला : 'त्या जनाकीर्ण राजपथातून जात असता'– सासिं ६१६. [सं.]

**जनाचार** पु. लोकरीत; जनरीत. [सं.]

**जनाजा** वि. मानेवर केसांचे चार भोवरे असणारा (घोडा).

**जनाजा** पु. प्रेत; शवपेटी; मुसलमानांची तिरडी : 'बावनखणीत त्या गायिका त्याच्या जनाज्यापुढे चालल्या होत्या'–गणगोत १२६. [अर.]

**जनात** स्त्री. (नाविक) जास्त मजबुतीसाठी काठाच्या खाली लावलेली जाडी फळी. ही जनात सर्वच गलबतांस असत नाही. जनातीची फळी घडण्याच्या फळीपेक्षा जाड असते.

**जनाधिप** पु. राजा.

**जनानखाना, जनाना, जनेदारखाना** पु. अंतःपुर; गोषा; राणीवसा : 'राजेलोक मोठमोठे जनानखाने बाळगीत.'– स्त्रिकावा ७.[फा. झनान]

**जनानी** वि. १. बायकांसाठी केलेले; बायकांना योग्य असे (वस्त्र, पदार्थ). २. बायकी गळ्याला शोभणारे (गाणे, पेहराव). ३. बायकी (वागणूक, हावभाव, विचार, आवाज). ४. बायकी; नेभळेपणाचे; नामर्दपणाचे. ५. हिजडा; नपुंसक. [फा.]

**जनापवाद** पु. दोषारोप; ठपका : 'शर सह्य पार जातां हृदयीचे जनापवादशर थारे ।'– भोवन ९.५०.

**जनाब** पु. महाशय; श्रीयुत; महाराज; साहेब: 'जनाब सिंधमधील आमील जातीचे होते.' – दिअहो १७२. [अर.]

**जनाब** पु. १. उंबरठा. २. अंगण; बाजू : 'खावंदाचे जनाबांत सेवक लोकांनी हजर असावें.' – मइसा ३.७३. [अर.]

**जनाबआली** पु. महाराज; बहुमानदर्शक संबोधन.

**जनाबआली** पु. उंच उंबरा.

**जनाबा–वा** पु. मुलाबाळांचा खटला; पसारा. (व.)

**जनार्दनी ऊद** पिवळसर आणि चांगल्या जातीचा ऊद.

**जनावर** न. १. पशू; चतुष्पाद प्राणी. २. (ल.) साप. [फा.जानवर] (वा.) ० **उखळणे** – पायाचे मूळ सुटणे; सांधा निखळणे.(माण.) ० **ठिपणे** – मारलेल्या दगडाने जनावराचा पाय दुखावला जाणे. ० **तक्कटणे** – जनावर गवत खाऊन खूप फुगणे. ० **बुरट असणे** – दुभते जनावर थोडे दूध देणारे असणे. ० **वांगरल्यासारखे दिसणे** – दुखणे असल्यासारखे दिसणे.

**जनाह** १. पंख; २. हात.

**जनांतिक** वि. गुप्त; इतरांस ऐकू न येणारेः 'कांहीं तरी महत्त्वाचा ऊहापोह दिसतो शिवाय जनान्तिक असावे.' – पुरुषार्थ मार्च १९३९. [सं.]

**जनि–नी** स्त्री. जनन; जन्म. [सं.जन]

**जनित** वि. जन्मलेला; उत्पन्न झालेला; तयार केलेला. (समासात) गर्वजनित, क्रोधजनित, शोकजनित इ. [सं.]

**जनित(करण)** न. (नृत्य) एक हात वक्षःस्थळावर ठेवणे व दुसरा हात लोंबत सोडणे व चवड्यावर उभे राहणे.

**जनित भौमिचारी** (नृत्य) एक हात मुष्टिहस्त करून छातीवर ठेवणे व त्याच बाजूचा पाय अग्रतलसंचर करणे. [सं.]

**जनिता** पु. निर्माणकर्ता; बाप; पिता. [सं.]

**जनि(त्रि)त्र** न. (भौ.) ऊर्जा निर्माण करणारे यंत्र : 'वीज पैदा होते ती वाफेवर चालणाऱ्या ज़नित्रात'–अअं ३३६. [सं.]

**जनिष्यमाण** वि. ज्याचा जन्म व्हावयाचा आहे असा; पुढे जन्मास

यावयाचा. [सं.]

**जनी, जनीचे पान** स्त्री. एक प्रकारची नागवेल ; तिचे पान. हे लहान, काळे, सुवासिक, तिखट, दोन्ही बाजूला खोच असलेले असते.

**जनुक, जीन** पु. संततीत पिढ्यानपिढ्या उतरणाऱ्या लक्षणांबद्दल जबाबदार असा गुणसूत्रांतील जटिल घटक.

**जनुबा, जनूब** स्त्री. दक्षिण दिशा. [फा.]

**जनू** पु. जन्म: 'घेतां नांव जिचें अनंत जनुचें जें पाप देहीं असे।'– नवनीत ४७५.

**जनेदारखाना** पु. जनानखाना.

**जनॅल** खिडकी.(गो.) [पो.जनेला]

**जनोई** न. १. जानवे. २. लाठीतील एक वार; खांद्यावरून खाली तिरपा जानव्याप्रमाणे केलेला वार. ३. मुंज : 'काही मुलांची जनोई' –तीम ६७ [सिंधी]

**जनोपा** पु. व्याप; पाश.

**जनोबा** पु. षंढ.

**जनोबाभट्टी** वि. जनोबा नावाच्या लेखकावरून वापरात आणलेली मोडी अक्षर लिहिण्याची एक घाटी पद्धत; बिवलकरी वळणापेक्षा सरस.

**जन्नत–आरामगाह** वि. स्वर्गवासी. [फा.]

**जन्नत–नशीन** वि. स्वर्गवासी. [फा.]

**जन्म** पु. १. उत्पत्ती; प्रसव. २. आयुष्यमान. ३. (समासात) जन्मापासून, एकंदर आयुष्यभर. जसे :- जन्मखूण, जन्मखोड, जन्मगाठ इ. [सं.] (वा.) **जन्म घालणारास रडणे** – जन्मदात्याच्या नावाने खडे फोडणे. ० **घेणे** – अस्तित्वात येणे. ० **जाणे** – (आळसामध्ये) आयुष्य खर्च होणे. ० **देखणे, पाहणे, येणे** – (ल.) ऋतुस्नात होणे; न्हाण येणे. ० **देणे** – बाळंत होणे; प्रसूत होणे. ० **वेचणे** – आयुष्य घालवणे, खर्च करणे : 'कसाहि शेतकरी असला तरी... रुपयाऐवजी सताराआणे कुठून मिळतील ह्या नादांत जन्म वेंचतो.' – कोसला १६३. **जन्माचा पत्कर घेणे** – एखाद्याच्या पालनपोषणाची जबाबदारी जन्मभर अंगावर घेणे. **जन्माचा पाटा –वरवंटा घेणे** – एखाद्यास जन्मभर पोसणे, त्याच्यासाठी श्रम घेणे. **जन्माचा वीट करणे** – नाश करणे: 'असें असून एक लाख रुपयाच्या लोभानें तिने माझ्या जन्माचा वीट करण्याचें मनांत आणिलें आहे.'– रत्नप्रभा १७. **जन्माची आठवण राहणे** – १. जन्मभर स्मरण ठेवणे; कधीही विस्मृती न होणे. २. पक्की अद्दल घडणे. **जन्माची धन** – कायमचा सोबती; कायमची कमाई : 'भुईवरची ती खोक आता जन्माची धन होऊन बसली आहे.' – एल्गार १६. **जन्माचे कर्मी** – आयुष्यात एकदा होणारी, वारंवार न होणारी गोष्ट, कृत्य. **जन्मातून उठणे** – कायमची बदनामी होणे; बेअब्रू होणे : 'एक दागिना गहाळ झाल्याने पेशव्यांचा जवाहिरखाना रिकामा होणार नाहीं; पण माझ्यासारखा सामान्य माणूस जन्मांतून उठेल.' –स्वामी ८. **जन्मातून जाणे** – निरुपयोगी होणे (कर्तव्यशून्य माणसासंबंधी योजतात). **जन्मास घालणे** – अस्तित्वात आणणे. **जन्मास येणे** – अस्तित्वात येणे. **नवा जन्म होणे** – एखाद्या भयंकर अपघातातून किंवा रोगातून उठणे.

**जन्मआघात, जन्माभिघात पु.** (मानस) गर्भाशयात अन्न, ऊब, शांतता व प्राणवायू भरपूर असतो, तो सोडून भूक, थंडी, कोलाहल व श्वसनाच्या अडचणी भरपूर असलेल्या ठिकाणी अर्भकाला प्रवेश करावा लागतो, ह्या एकदम बदलणाऱ्या परिस्थितीचा मनावर होणारा आघात. मनोविश्लेषणवादी तत्त्वांनुसार कोणताही आघात व्यक्तीच्या मनावर खूण करतो. परिणामी व्यक्तीमध्ये दीर्घकालीन चिंता निर्माण होते.

**जन्मकरंटा** वि. जन्मापासून दरिद्री; दुर्दैवी.

**जन्मकर्म** न. १. आयुष्यातील विशेष काम; आश्रमधर्म. २. उत्पत्ती आणि कार्य; आयुष्यातील एकंदर हकीकत.

**जन्मकाल** पु. १. जन्माची वेळ. २.जन्मपत्रिका. ३. सर्व आयुष्य.

**जन्मकुटाळ, जन्माचा कुटाळ** वि. नेहमी कुचेष्टा करणारा; नेहमी कुटाळी करणारा.

**जन्मकुऱ्हाड** स्त्री. (ल.) नेहमीचा, सतत त्रास देणारा; गावकुटाळ.

**जन्मकुंडली** स्त्री. (ज्यो.) ज्या लग्नावर जन्म होतो त्या लग्नकाळच्या ग्रहांच्या स्थितीचे कोष्टक.

**जन्मखतावणी** स्त्री. जन्म झालेल्या दिवसाची व वेळेची नोंद करणारे नोंदणीपुस्तक : 'याशिवाय माझं नाव आहे ते सर्टिफिकेटांत आणि म्युनिसिपालिटीच्या जन्मखतावणीत.'– आर्फियस३४.

**जन्मखुंट** पु. खोखोच्या खेळात खुंट म्हणून दोन टोकावर बसवलेले गडी.

**जन्मखूण** स्त्री. तीळ किंवा मस यांसारखा शरीरावर जन्मापासून असलेला डाग किंवा खूण.

**जन्मखोड** स्त्री. जन्मापासून लागलेला किंवा हाडी मासी खिळलेला दुर्गुण.

**जन्मगाठ** स्त्री. १. जन्मभर टिकणारा संबंध. २. वाढदिवस. [सं. जन्म + ग्रंथी]

**जन्मगुण** पु. मुलाचा स्वाभाविक गुणधर्म.

**जन्मचुडे(ढे)ल** स्त्री. (निंदार्थी) भांडखोर, कजाग स्त्री.

**जन्मजडता** स्त्री. जन्मापासून असलेले बुद्धिमांद्य.

**जन्मजन्मांतरी; जन्म(न्मो)जन्मी** क्रिवि. पूर्वीपासून झालेल्या सर्व जन्मांमध्ये आणि ह्या जन्मात; अनेक जन्मात.

**जन्मजात** वि. १. जन्मापासून असलेले; बाह्यपरिस्थितीमुळे प्राप्त न झालेले; उपजत; स्वाभाविक. उदा. शारीरिक फरक, भेद. २. जननद्रव्यी (जननद्रव्यासंबंधी). [सं.]

**जन्मजात–सिद्ध** वि. (तर्क.) जन्माला येण्याच्या प्रक्रियेतून प्राप्त झालेला.

**जन्मजुगाक** क्रिवि. आजन्म; प्राण असेपर्यंत. (गो.)

**जन्मजूग** वि. जन्मभर पुरेल असे : 'जन्मजूग हातांत। विभूतिचा गोळा।'–अमृतक १२८.

**जन्मजोड** स्त्री. जन्मभर पुरेल इतका साठा.

**जन्मजोडा** पु. पहा : **जन्मगाठ** १

**जन्मठेप** स्त्री. (न्याय.) आजीव कारावास; आयुष्यभराची कैद; सामान्यत: चौदा वर्षे कैदेची शिक्षा.

**जन्मणे** अक्रि. १. उत्पन्न होणे; जन्मास येणे; निपजणे ; उपजणे. २. जन्म देणे.

**जन्मत:** क्रिवि. १. जन्मापासून; जन्मामध्ये. २. स्वाभाविक; स्वभावत:

**जन्मदिनप्रमाणपत्र** न. (शाव्य.) अमुक तारखेला जन्म झाल्याबद्दलचा

पुरावा देणारा दाखला; पालिका कार्यालयाने दिलेले जन्माचे प्रमाणपत्र. [सं.]

**जन्मनाम-व** न. जन्मनक्षत्राच्या संबंधाने अवकहडा चक्रावरून (बारशाच्या दिवशी) ठेवलेले नाव.

**जन्मपत्र-त्री, जन्मपंत्ती-पत्रिका** न. स्त्री. जन्माच्या वेळचे वर्ष, तिथी, राशी, कुंडली इ. लिहिलेला कागद व त्यावरून घडणाऱ्या गोष्टींचे तयार केलेले कोष्टक; जन्मटिपण.

**जन्मपाश** पु. आयुष्य संपेपर्यंत मागे लागलेले संकट, लचांड. [सं.]

**जन्मपूर्व** वि. गर्भधारणेपासून मूल जन्माला येईपर्यंत.

**जन्मप्रथा** स्त्री. (समाज.) बालकाच्या जन्माच्या वेळी परंपरेने पाळावयाचे रीतिरिवाज. [सं.]

**जन्मभोए** स्त्री. जन्मभूमी (भोए = भूमी, जमीन, माती) : 'आणि कर्माची जन्मभोए । ये प्रकृती जे कांही आहे ।।' – राज्ञा १८.१२५७.

**जन्ममरणाचा प्रश्न** पु. ज्यावर आयुष्य अवलंबून आहे अशी गोष्ट.

**जन्ममर्याद** क्रिवि. मृत्यू येईपर्यंत; सर्व जन्मभर; आजीव.

**जन्मयोग** पु. जन्मकालीन ग्रहांची शुभाशुभ फलसूचक स्थिती. [सं.]

**जन्मराशि-शी-स** स्त्री. ज्या राशीवर जन्म झाला ती; जन्मकाली चंद्र ज्या राशीत असेल ती रास. [सं.]

**जन्मरुदन** न. (मानस.) जन्म होताच अर्भकाच्या स्वरयंत्रातून हवा आत जाऊन श्वसन व फुप्फुसे यांच्या कार्यास प्रथमच सुरुवात होते. परिणामी अर्भकाच्या रडण्याची क्रिया घडून येते. ही संपूर्णतः प्रतिक्षिप्त प्रतिक्रिया असते. [सं.].

**जन्मरोग** पु. जन्मापासून जडलेला रोग.

**जन्मरोगी** वि. कायम आजारी; नेहमीचा दुखणेकरी.

**जन्मलग्न** न. जन्मकाली जी राशी उदय पावत असेल ती. [सं.]

**जन्मलांच्छन** न. जन्माला कमीपणा आणणारी गोष्ट; कलंक : 'स्वतःच्या जन्मलांच्छनाशी तुलना करता–' केतका २३. [सं.]

**जन्मलिखित** पहा : **जन्मपत्र.** विधिलिखित; जन्मकाळी विधीने दैवात (कपाळात) लिहिलेल्या बऱ्यावाईट गोष्टी.

**जन्मवर, जन्मभर** क्रिवि. आयुष्यभर : 'जन्मवरी स्वार्थ केला।' – दास ३.५.५०.

**जन्मविता** वि. जन्म देणारा.

**जन्मवेर** क्रिवि. जन्मभर : 'जन्मवेरी ताबेदारी' – ख्रिकावा १.

**जन्मव्रती** वि. जन्मभर व्रत घेणारा, आचरणारा.

**जन्मशताब्दि-ब्दी** स्त्री. एखादी व्यक्ती, संस्था यांच्या जन्माला शंभर वर्षे पुरी झाल्यावर करण्यात येणारा सोहळा : 'गांधीजींची यंदा जन्मशताब्दी आहे.'– लोबा १११.

**जन्मसवाशीण, जन्मसौभाग्यवती** स्त्री. १. अहेवपणी मरणारी स्त्री. २.(ल.) वेश्या.

**जन्मसळ** वि. जन्मापासून खोडकर ; त्रासदायक (मूल).

**जन्मसंस्कार** पु. (समाज.) बालकाच्या जन्मानंतर करावयाचे धार्मिक विधी. [सं.]

**जन्मसावित्री** स्त्री. १. (आशीर्वाद देताना) आजन्म सौभाग्यवती; जन्मसवाशीण: 'तूं जन्मसावित्री होसी । चंद्रार्कवरी राहसी।' –कक १.२.१७०. २. (ल.) जे कधी धुतले जात नाही असे पांघरण्याचे किंवा नेसावयाचे वस्त्र.

**जन्मसांड** स्त्री. जन्मापासून एखाद्या गोष्टीपासून पराङ्मुखता. (क्रि.देणे, करणे.)

**जन्मसिद्ध अधिकार, हक्क** (राज्य.) उपजत अधिकार; नैसर्गिक हक्क; स्वाभाविक अधिकार; प्रत्येक व्यक्तीला न्यायाने व नीतीने मिळाल्या पाहिजेत अशा गोष्टी.

**जन्मसोवळा** वि. कधीही धुतले न जाणारे वस्त्र नेसणारा.

**जन्मसौभाग्य** न. जन्मापासून चांगले नशीब. [सं.]

**जन्मस्थान** न. १. जन्मभूमी. २.जन्मलग्न. [सं.] (वा.) **जन्मस्थानी लघुशंका करणे** – १. मातृगमन; मात्रागमन. २.(ल.) उपकार करणाऱ्यावर अपकार करणे; कृतघ्नता.

**जन्मस्वभाव** पु. जन्मापासूनची वागण्याची तऱ्हा. [सं.]

**जन्माचा** १. जन्मप्रभृति; जन्मापासून. जसे : – जन्माचा रोग = वंशपरंपरेचा, जन्मापासून असलेला रोग. जन्माचा रोगी = जन्मापासून आजारी. २. जन्मभर टिकणारे; जसे – जन्माचा जोडा, सोबती = अत्यंत ऋणानुबंधी मित्र; पतिपत्निसंबंध.

**जन्माची गाठ** विवाहासारखा कधी न तुटणारा संबंध.

**जन्माची जोड** १. पहा : **जन्मजोड.** २. पतिपत्नी, बाप – लेकसंबंध.

**जन्माची भाकरी, बेगमी** जन्मभर टिकणारे पोटापाण्याचे साधन.

**जन्माची साट–ठ** पहा : **जन्माची भाकर**

**जन्मादारभ्य** क्रिवि. जन्मापासून(आतापर्यंत) : 'व्यक्तीचे जन्मादारभ्य संपूर्ण '–अंया १५३.

**जन्मार्थ** पु. दरवर्षी दर एक हजार जनसंख्येत नवीन जन्मास येणाऱ्या मुलांच्या संख्येचा दर; जन्मदर.

**जन्मावर** क्रिवि. वंशपरंपरा : 'दिला अमळें गांव ठिकाणा दादा करून जन्मावर ।।'–ऐपो १३२.

**जन्माष्टमी** स्त्री. गोकुळ अष्टमी; श्रावण वद्य अष्टमी.

**जन्माक्षर** न. पंचांगामध्ये अवकहडा चक्रात जन्मनक्षत्राला जे अक्षर असते ते.

**जन्मांतर** न. नशीब; दैव. (वा.) ० **उपटणे** – चांगले अथवा वाईट नशीब अनुभवास येणे. ० **फुटणे** – नशीब फुटणे; दुर्दैव ओढवणे.

**जन्मांतर** न. दुसरा जन्म (मागचा किंवा पुढचा).(वा.) ० **आठवणे** – लहानपणचे दिवस आठवणे. ० **काढणे, सापडणे, मिळणे, हातास लागणे** – जन्माबद्दलचा अस्सल दस्तऐवज मिळणे. **जन्मांतरी न घडणे, होणे** – सबंध जन्मात न होणे. ० **पाहणे, शोधणे, तपासणे** – जन्मपत्रिका पाहणे; संसारातील कामकाज पाहणे.

**जन्मांतर कथा, गोष्ट, हकीकत** मागच्या आयुष्यातील गोष्ट किंवा वाईट कृत्य.

**जन्मांतर(री)चा वैरी, दुष्मन, दावेदार** मागील जन्मातील शत्रू. जन्मांतरीचा द्वेष, जन्मांतरीचा ऋणानुबंध इ.

**जन्मांतर(री)चे ज्ञान** लहान मूल किंवा प्राणी यांच्यामधे दिसून येणारी उपजत बुद्धी.

**जन्मांतरयोग** पु. मागच्या जन्मी केलेल्या चांगल्या कृत्यामुळे या जन्मी सुख मिळते ही कल्पना.

**जन्मोत्तरी, जन्मोत्री** पहा : **जन्मपत्रिका** : 'वरिष्ठे वर्तविली जन्मोत्री। यासी दोन पुत्र आणि एक स्त्री ।'– कक ३.३.७१.

**जन्य** न. युद्ध : 'नृपभगदत्तादि नरवरा जन्य ।' – मोभीष्म ११.७६.[सं.]

**जन्य** वि. १. जन्मलेला; उत्पन्न झालेला; तयार केलेला. (समासात) पित्तजन्य, अज्ञानजन्य इ. २. जन्मास यावयाचा. [सं.]

**जन्यजनकभाव** वि. उत्पन्न होणारा व करणारा यांचा जो परस्पर संबंध तो; पुत्रपिता संबंध; कार्य-कर्तृ संबंध. [सं.]

**जन्यराग** पु. (संगीत) थाटामध्ये वर्गीकृत केलेला राग. विशिष्ट थाटावरून तयार झालेला राग.

**जन्यू** पु. १. जीन; जनुक; संतानात आनुवंशिक गुण संक्रान्त करणारा घटक : 'या २४ रंगसूत्रांतील एकेक जन्यू (जीन) एकेका गुणाचा वाहक असतो.' –शोभा ३२. २. शुक्रजंतू (पशूंचा); रेतजंतू. [सं.]

**जन्ह** वि. तरबेज : 'मिसनवालाबी हाये की. लई जन्ह शिवनारा हाये म्हनतेत.' –पाचोळा ६.

**जप** पु. १. वेदऋचा, गायत्री इ. मंत्र इत्यादींचे पुन: पुन्हा पठन करणे; देवांचे नाव इ. मनातल्या मनात म्हणणे. २. मंत्र म्हणत जपाची माळ ओढणे. ३. (ल.) निदिध्यास. [सं.] (वा.) ० **घेणे** – मंत्र म्हणत माळेचे मणी ओढणे.

**जप** स्त्री. निद्रा; झोप.

**जपजाप्य** न. जप व त्यासारखे इतर धार्मिक कृत्य: 'त्यांचे प्रदीर्घ जपजाप्य सुरू झाले.' – कॉग्ज ३२. [सं.]

**जपजी** पु. शिखांचा एक पवित्र धर्मग्रंथ : 'कुराण ... जपजी या धर्मग्रंथाशी त्यांची जीवश्च कंठश्च मैत्री आहे.' – आप्रदि १७३.

**जपण–णी, जपणूक** स्त्री. १.जतन; सांभाळ; राखण. २. वाट पाहत बसणे; पाळत. (क्रि. करणे, जपणीस बसणे, लागणे.) ३. लक्ष लावणे : 'निजपणी जपणी जड दाविना ।'– वानृद ८१.(वा.) ० **घालणे** – टपून बसणे : 'वरकडांसही धरावयाकरितां जपणी घातले आहेत. तमाम सुंदर बाइका बारा वाटा पळून गेले ! बाइका धरावयास कारण टिपूचे पालक लेक आहेत, त्यांस स्त्रिया करून देणेस नेतात.'– ऐको ४०५–६. **जपणीस लागणे** – टपून बसणे; संधी शोधीत राहणे : 'कान्होजी नायकाच्या पुत्रांनी जपणीस लागोन वरसा सा महिन्यांनीं आनसावा, तिची कुणबीण व कुणबिणीचे पोर ऐसी तिघेजण मारली.' – ऐको ४०६.

**जपणे** अक्रि. १. पुन्हा पुन्हा उच्चारणे; वारंवार म्हणणे; जप करणे. २.(ल.) सारखी कुरकुर करणे; रडगाणे गाणे[सं.जप्=मनात म्हणणे]

**जपणे** अक्रि. १. सांभाळ, जतन करणे. २. लक्षपूर्वक पाहणे. ३. सावधानपणाने, काळजीपूर्वक वाट पाहणे; टपणे; टपून बसणे. [सं.गुप]

**जपमाला–ळ–ळा** स्त्री. जपाची संख्या मोजावयाची मण्यांची माळ. [सं.]

**जपयज्ञ** पु. नामसस्मरणरूपी यज्ञ, सतत नामस्मरण करणे. [सं.]

**जपा** स्त्री. जास्वंद (झाड व त्याचे फूल). [सं.]

**जपानना** क्रि. १. गाडणे. २. लुबाडणे. (झाडी)

**जपाळ** पु. जेपाळ. पहा: **जयपाळ** (एक औषधी)

**जपून, जप्पीना** क्रिवि. काळजीपूर्वक. (झाडी)

**जप्त** पु. नियंत्रण; दबाव : 'असे लोकावर जप्त का राहील?'– मइसा ५.५२. [अर.]

**जप्त** वि. (न्याय.) कायदेशीर हुकुमाने ताब्यात घेतलेला; टाच आणलेला. सरकारजमा. [अर.]

**जप्त(फ्त) रप्त(फ्त)** पु. बंदोबस्त; व्यवस्था: 'करारवाके जफ्त – रफ्त करू.' – मइसा ६.६१२. [फा.]

**जप्ती** स्त्री. १. जप्त करण्याची क्रिया; हरण; नागवणूक; अम्मल; ताबा; - जप्त केलेला माल सरकारजमा करणे. जप्त केलेला गाव. यावरून पडलेले गावाचे नाव. २. (कायदा) मिळकतीवर खाजगी ताब्याऐवजी न्यायालयाचा ताबा सुरू करणे. ३. (ल.) नजरकैद : 'तुझे घरी तुजवर जप्ती केली सखे सर्वत्रांही ।' – होबाला १०३. ४. डिक्री. [अर.झबत]

**जप्तीदार–वाला** पु. बेलीफ. जप्ती करणारा अंमलदार.

**जप्या, जपी** वि. जप करणारा.

**जप्रा** वि. झोपाळू. (झाडी)

**जप्री** स्त्री. रातवा पक्षी. (झाडी)

**जफर** पु. विजय. [फा.]

**जफा** वि. फाजील; जास्त. (कु.) पहा: **जाफा**

**जफारखाना** पु. रुग्णालय : 'या सोयीव्यतिरिक्त एक जफारखाना आहे.' –हिप्र २१३. [फा.]

**जफ्त** पु. व्यवस्था; बंदोबस्त : 'वरघाट जफ्तकरिता त्यास आणून.' – आंपव्य ५.

**जब–बा–बे** स्त्री. विधिपूर्वक हत्या; वध; ठार करणे : 'पुढे गाय जब केली।'–ऐपो ११. (क्रि.करणे.) [अर.जब्ह] (वा.) **जबे करणे** – ठार मारणे; हत्या करणे:' 'सवय नानाकडील कारकून व भालदार जाऊन घोडा पाहून आले, नंतर जबे करणेंची आज्ञा जाली. त्याप्रमाणे जबे जाली.' –ऐपो ४०८.

**जबजब** क्रिवि. तिळतिळ; कणकण; थोडे थोडे : 'जबजब नूतन संपादावें व बळकट व्हावें.'– ऐको ४०६.

**जबडा** पु. तोंड; जाभाड; दाभाड; वासलेले तोंड. [क. दवडे; हिं. सं. जृभ = जृम्भ]

**जबड्याची तान** (संगीत) कंठातून निघणारी तान. जबड्याच्या साहाय्याने घेतली जाणारी तान. ही तान घेणे अवघड असते. पुरुष गायकांना ती शोभते.

**जबतब** क्रिवि. कसेतरी; जेमतेम. [हिं.]

**जबर** स्त्री. पहा : **जरब**. धाक; शासन: 'त्यांजकडील लोक असतील ते तमाम जबर पोचवून.' – शारो १.११६.

**जबर–रा** स्त्री. दरारा; वरचढपणा : 'जबर त्यांची सबसे ज्यादा गादीवर दवलतराव शिंदा।'–ऐपो १५२.

वि. १. श्रेष्ठ; ताकदवान (माणूस, पशू). २. जोराचा, सोसाट्याचा

(पाऊस, वारा). ३. कठीण; त्रासदायक (काम, ओझे). ४.जंगी, मोठे (घर, नदी, झाड). ५. उभट, कठीण (चढ, चढण). ६. देण्यास कठीण; फार अवाढव्य (किंमत, दर). ७. दुर्घट, त्रासदायक (रोग). ८. लांबलचक; कंटाळवाणा (रस्ता, मार्ग, प्रवास). ९. अगडबंब, अवजड (दागिना). (प्रमाणराहित्य आणि प्रचंडपणा दाखविण्यासाठी योजतात.) [फा. जब्र]

**जबर** पु. (पत्त्यांचा खेळ) डाव्या हातचा भिडू, खेळणारा.

**जबरजंग** पु. लहान तोफ.
वि. शूर; जवानमर्द; लढवय्या. [फा.]

**जबरदस्त** वि. १. जुलमी; अन्यायी; दडप्या. २. श्रेष्ठ; मजबूत; बळकट; मोठ्या योग्यतेचा. [फा.]

**जबरदस्ती** स्त्री. १. जुलूम; जोर; अन्याय; बलपूर्वक केलेले कृत्य : 'इंग्रजांची जबरदस्ती सर्वांवर पडली असें वाटतें.'-ऐलेसं ११.६०.३० २. आवेशाचे कृत्य, यत्न; श्रम.

**जबरा** पु. (छापखाना) मोठा टाईप; मजकुरातील स्थलनामे व व्यक्तिनामे या टाईपात घेण्याची पद्धत आहे.

**जबराई** पहा : **जबरदस्ती** (झाडी)

**जबरानजोत** स्त्री. अतिक्रमण. (झाडी)

**जबरी** वि. स्त्री. पहा : **जबरदस्ती** १. 'पादशाही जबरीनें घेईल.'-चिशिमब ३४. [फा.]

**जबरीची चोरी** (कायदा) दरोडा; बळाचा वापर करून केलेली लूट.

**जबरी संभोग** (न्याय.) बलात्कार; स्त्रीच्या इच्छेविरुद्ध तिच्याशी लैंगिक व्यवहार करणे, संग करणे.

**जबर्ज(द)स्त** पहा : **जबर**

**जबा** पु. चिलखताचा एक प्रकार.

**जबा** पहा: **जबान** : 'सारांश गोष्ट आम्ही सर्वांस ज़बा देऊन आपले दयेवर इतरांस भरोसा देऊन हे पत्र लिहिलें आहे.'-ऐको ४०७.

**जबा** पु. बाणांचा भाता. [अर.]

**जबान** स्त्री. १. जीभ. २. वाणी; वचन. (क्रि. येणे, पालटणे.) [फा.]

**जबानी** स्त्री. साक्ष; साक्षीदारांचे लेखी, तोंडी म्हणणे, हकीगत : 'कुणब्यांच्या पोलिसाकडे खेपा. भावाच्या, त्यांच्या बरोबरीच्या गड्यांच्या जबान्या.' -इंधन ५४. [फा. झबानबंदी=साक्ष] [फा.]
वि. मौखिक; तोंडी.

**जबाब** पु. १. उत्तर ; प्रत्युत्तर; काही एका प्रश्नास दिलेला जाब. २. हुंडीबरोबरचे पत्र. ३. (कायदा) प्रतिज्ञा. [अर.]

**जबाब** पु. तोंड : 'वाऱ्याचे भोक केवढे आहे व त्याचा जबाब कोठे आहे.' - सूर्योदय १०९. [अर.]

**जबाबकार्ड** न. जोडचिठ्ठी; उत्तर देण्याकरिता कार्डास जोडलेले कार्ड.

**जबाबणे** क्रि. उत्तर देणे.

**जबाबदार** वि. उत्तरदायी; ज्याच्यावर जबाबदारी आहे असा; जिम्मेदार; जोखीम घेणारा; भरवशाचा. [फा.]

**जबाबदारी** स्त्री. जिम्मा; दायित्व; जोखीम; कर्तव्य भार. [फा.]

**जबाबनिशी** स्त्री. जबाबनीस याचे काम व हुद्दा.

**जबाबनीस** पु. १. अर्जांना उत्तर देणारा कामदार. २. (चुकीने) शिरस्तेदार, चिटणीस

**जबाबसवाल,जाबसाल** पु. बोलणे, उत्तर प्रत्युत्तर : 'आम्ही जबाब सवाल केला जे.'-तंरा ८१.

**जबाबी** वि. १. उत्तरे देण्यात तयार; हुशार.२.(कायदा) शपथ प्रमाण करून न्यायासनापुढे सांगितलेली (हकीकत, दिलेले उत्तर). ३. मामलेदाराच्या हाताखालचा जबाब लिहून घेणारा (कारकून). (को.) [फा.]

**जबाबी** वि. तासाचे ठोके देणारे (घड्याळ): 'एक घड्याळ जबाबी.'-मइसा १२.६८.

**जबाबीहुंडी** स्त्री. पेढीवर पैसे भरून ज्याला पैसे पाठवावयाचे असतील त्याच्या नावाची पेढीवाल्याकडून घेतलेली पावती.

**जबु(बू)न** वि. १. वाईट; घाण; खराब : 'जबुन हें कर्नाटकचें जळ।'-ऐपो ७४. २. दरिद्री; गरीब; भ्याड: 'वऱ्हाडचे महाल जबून म्हणतात.' - मइसा १.११७ [अर.]

**जबेतराश–स** वि. हजरजबाबी; उत्तर देण्यास तत्पर; बोलण्यात हुशार. [फा.जबान्+तराश]

**जबेतराशी** स्त्री. हजरजबाबीपणा.

**जबेफरास** वि. वक्तृत्व गुण अंगी असलेला. [फा.जबान् + फराश]

**जम** पु. १. व्यवस्था; मेळ; जोड; जमाव; मिलाफ; बनाव; जुळवाजुळव; संबद्धता (वाद्य, पदार्थ, नानाप्रकारचे स्वभाव इत्यादींची). २. मिलाफ; जुळणी; एकी ( बोलणे, भाषण, हिशोब यांत). (क्रि. पडणे, बसणे.): 'नव्या कल्पना आणि जुने अभिमान यांचा जम कसाबसा बसवत आपण पुढे चाललो असतो'- पवा ७७. ३. प्रभुत्व. (झाडी) ४. यम: 'हा काळदंडे जमु'-गारा १४८.[सं.यम] (वा.) ० **असणे** – व्यवस्था, मेळ, जुळणी असणे; भरभराटीस येणे :' मुलाखतीस जे वठेल त्यावर जम आहे.' - वक्तृत्व १४४. ० **बसणे** – स्थैर्य येणे ; चालू लागणे, मेळ बसणे : ' फाउंड्रीचा जम उत्तम प्रकारे'-निअसा ३१. ० **राहणे** – मेळ बसणे; जुळणे; एकमत होणे : 'त्याची शाळा बुडते आणि शिकण्याचा जम राहत नाहीं यासाठींच त्याला नेलें.'-पलको ३८. **जमेत नसणे** – खिजगणतीत नसणे : '... आणि हाच काशिराम महिन्यापूर्वी कोणाच्या जमेंतहि नव्हता.'-एल्गार ११६.

**जमई** स्त्री. एक शस्त्र. : 'हत्यार जमई जमदाड माड़ु घेऊन हाती ।' - ऐपो १०९. पहा : **जमदाड**

**जमका(खा)न** न. जाजम; मोठी सतरंजी: 'तो जीन काढ, जमकान काढ... मी हांथरूण करते दादांचे'- परेपा ३४. [फा. जमखाना; क. जंखाने= सतरंजी]

**जमखट्टा** पु. जमाव; गर्दी; अड्डा. (व.)

**जमखाक** स्त्री. कट्यारीचा एक प्रकार.

**जमघट्टा** पु. बैठक; अड्डा : 'कारण तो केशवरावाच्या 'जमघट्ट्या' तला आहे.'- गणगोत ८१.

**जमचे** अक्रि. जमणे. (गो.)

**जमजमा** पु. (संगीत) एकच खटका एकसारखा द्रुतगतीत म्हणत किंवा वाजवीत जाण्याच्या क्रियेला जमजमा म्हणतात. मुख्यत: सतारीत हा

प्रकार वाजवितात. जेव्हा दोन स्वर जलद-जलद, एकानंतर लगेच दुसरा असा वाजविला जातो तेव्हा त्याला जमजमा म्हणतात.

**जमजूट** पहा : **जंगजोड**

**जमजूत** पु. यमदूत : 'खांदावरि मुद्गल : ऐसे जमजूत आले : मग म्हणीत:'- लीचपू १०९.

**जमणे** अक्रि. १. एकत्र येणे; एकवटणे. २. घट्ट होणे; गोठणे; थिजणे. ३. दृढ आणि बळकट होणे (शरीर). ४. साचणे; चांगला होणे; फलास येणे (भाजीपाला, उद्योग). ५.भरभराटीला येणे (उद्योग). ६. मिलाफ होणे; सांगड असणे; मेळ बसणे; जुळणे; पटणे; एकमत होणे (नाना प्रकारचे स्वभाव, घटकावयव). सख्य होणे पहा : **जम**. ७. मंजूळ होणे; कानास गोड लागणे (गाणे). ८. श्रीमंत होणे. ९. इष्टपरिणामकारक; व्यवस्थित होणे. १०. उठावदार होणे. [हिं. जमना; सं.यम्-याम्यते]

**जमदग्नि-ग्नी** पु. १. एक ऋषी. २. (ल.) शीघ्रकोपी माणूस. [सं.]

**जमदड, जमदाड-डा-ढा** स्त्री. पु. लांब पल्ल्याची तलवार : 'जमदाड माडु घेऊन हातीं।' -ऐपो १०९.

वि. (ल.) लठ्ठ; धटिंगण; अगडबंब. [सं.यमदंष्ट्रा]

**जमधर** स्त्री. १. तलवारीचा एक प्रकार. २. यमगृह.

**जमधाढ** न. दोन पात्यांचे एक शस्त्र; यमदाढ.

**जमन, जमनबिलावर** पहा : **यमन, यमनबिलावर**

**जमनिका** स्त्री. पहा : **जवनिका**

**जमनीव** स्त्री. वधूवरांतील अंतरपाट, पडदा. [सं.जवनिका]

**जमनीस** पु. १. एक वसुली अधिकारी. २.फरासखान्यावरील एक अधिकारी. [फा. जमनवीस]

**जमपथ** पु. यमाची दिशा; मरणवाट : 'आम्ही जात असों जमपथा: माद्यौतीं न यों सर्वथा'-भाऊगी ३८.३२३.

**जमयेत** स्त्री. मंडळी. पहा : **जमात** [अर.जमाअत]

**जमरूद** पु. पेरूचे झाड आणि फळ. [फा.जमरुंद]

**जमरूद** पु. पाच (जवाहीर) : ' जमरूद पाचेचा जोड एक.'- महसा ७. [फा.जमरुंद]

**जमवणी** स्त्री. जमवाजमव : 'राजांच्या रोहिडेश्वराच्या खेपा, मावळ्यांची जमवणी.'- श्रीयो ८२.

**जमवाजमव** स्त्री. १. निरनिराळ्या ठिकाणांहून वस्तू एकत्र करणे. २. जमविणे; मेळ घालणे.

**जमविणे** सक्री. १. एकत्र करणे; गोळा करणे. २. गोठविणे; थिजविणे; दाट करणे (द्रव पदार्थ). ३. पटविणे ; मिलाफ घालणे. पहा: **जमणे**

**जमसेरी** वि. होनाचा एक प्रकार : 'एकंदर किंमत २७ होन जमसेरीं लिहिलें आहेत.' - ऐको ४१०.

**जमा** स्त्री. १. आय; संग्रह; नफा; उत्पन्न (जमीन, दुसऱ्याकडून रोख अगर अन्य रूपाने आलेली रक्कम, गावे यांचे); प्राप्ती; मिळकत.२. (ल.) गणना; अंतर्भाव. ३. एकूण रक्कम; बेरीज. ४. गुमध्चेन. (झाडी)

वि. एके ठिकाणी जमविलेले; गोळा केलेले.[अर. जमअ] (वा.) ० **करणे, धरणे** - १. जमाखर्चाच्या वहीत रक्कम जमेच्या बाजूला लिहिणे. २. गोळा करणे; एकत्र जमविणे: 'उच्छिष्ट फळे जमा करी।'-ददासंभा ६६७. **जमेत न खर्चात** - मुळीच महत्त्वाचे नसणे.

**जमाईतदार** पु. टोळीचा नायक : 'सर्व जमाईतदार मिळाले ।।'- मव ६७. [फा.]

**जमाई तारू** तारवाचा एक प्रकार.

**जमाऊन** स्त्री. गुळाची राब; काकवी. (झाडी)

**जमाकदीम** पु. जुन्या काळापासून पूर्वापार चालत आलेला सारा.

**जमाकामा(मि)ल** पु. पुरापुरा, कायमचा, शेवटचा सारा.

**जमाखर्च** पु. १. आय-व्यय. २. हिशोब; व्यक्ती किंवा संस्था यांनी चालविलेल्या उद्योगधंद्यासंबंधी होणाऱ्या देवघेवीची व्यवस्थित रीतीने ठेवलेली नोंद.[अर.] (वा.) ० **बरोबर असणे** - नफातोटा बरोबर असणे; शिल्लक बाकी पूज्य. ० **नसणे** - महत्त्वाचे नसणे.

**जमाखर्ची उगवणे** - १. जमाखर्चात दाखल करणे, मांडणे. २. कोणत्याही कामाला, नोकरीला योग्य करणे.

**जमाखर्च विवरण** (वाणिज्य) जमाखर्चाचा गोषवारा, संक्षेप, सार.

**जमाखर्ची** वि. १. हिशोबासंबंधी. २. शिल्लक कमी जास्त न होता, देणे घेणे चढते किंवा कमी होते ती. ३. जमाखर्च लिहिण्यात हुशार.

**जमाखाती नोंद** (वाणिज्य) बँकेतील ठेवीच्या जमेकडे मांडणे.

**जमाचिठ्ठी** स्त्री. (वाणिज्य) खात्यामध्ये रक्कम भरल्याबद्दलची अधिकृत पावती.

**जमाजम** स्त्री. १. एकत्र जमणे; गोळा होणे. २. पुष्कळ लोकांचा जमाव. (क्रि. जमणे.)

**जमात** स्त्री. १. जात; गोत; तुकडी; विशिष्ट जातीची एकत्र जमलेली मंडळी : ' प्रत्येक जमात आपल्या मानाला प्रसंगीं रक्ताचं मोल देऊन जपते.'- एल्गार २०. २. जमाव : 'पाहुनी गोधनाची जमात।'- नवनीत १३.५९. ३. सभा; मंडळी; थवा; सैन्याची तुकडी; एकत्र जमलेली मंडळी; पंचायत. (समासात) पायदळजमात = पायदळाची तुकडी; स्वारजमात = घोडदळाची तुकडी. [अर.जमाअत]

**जमातखाना, जमायतखाना** पु. मशीदीचे तिन्ही बाजूंस जमातीस बसण्यासाठी बांधलेला दुमजली अगर तिमजली सोपा.

**जमातजीवन** न. (समाज.) वन्य जमातींची जीवनपद्धती.

**जमात(ती)दार, जमाद्दार** पु. सैन्याच्या तुकडीचा नायक; जमादार. [अर. जमअ+फा. दार.]

**जमातपरिषद** स्त्री. (समाज.) वन्य जमातींच्या समस्यांची सोडवणूक करणारी, नियम करणारी सभा.

**जमातबंद** वि. जमातीच्या, टोळीच्या जोखडाखाली बद्ध असलेला (समाज) : 'अफ्रिकेतील समाजांना एकमुखी व एकावयवी नेतृत्वाची सवय जमातबंद समाज रचनेमुळे'- आआआ १२२.

**जमातवाद** पु. जातीस केंद्रस्थानी धरून विचार करणे; टोळी करून राहण्याची वृत्ती : 'एका दृष्टीने तो जमातवादी अथवा टोळीवादी होता.' - डाली १७.

**जमाती** वि. सैन्याविषयी. जसे : - जमाती खर्च, जमाती दरमहा, जमाती मोहजबा, जमाती शिल्लक, जमाती हिशेब. इत्यादी.

**जमाती** महसूलाची रक्कम पूर्ण वसूल होण्यासाठी लावलेली जादा जकात.

**जमा(मि)दार** पु. १. पहा : **जमात(ती)दार.** २. झाडूवाला.
**जमादारी** स्त्री. जमादाराचे काम आणि हुद्दा.
**जमादारीन** स्त्री. झाडूवाली (झाडी).
**जमादिलाखर, जमादिसानी** पु. मुसलमानी वर्षाचा सहावा महिना. [अर.]
**जमादिला(लो)वर–वल** पु. मुसलमानी वर्षातील पाचवा महिना. [अर.]
**जमान** पु. जबाबदार; हमीदार; जामीन; प्रतिभू : 'ऐसा तह करून जमान घेऊन.' – मइसा १५.२४ [अर.]
**जमानकतबा** पु. जामीनपत्र; हमीपत्र; मुचलका.
**जमानगत** स्त्री. जामिनकी; जामीनगत; हमी : 'सखो महादेवाबद्दल जमानगतीचें रुपये आपानीं पुण्यांत घेतले.'–ऐको ४०९.
**जमान(ना)त** स्त्री. जामिनकी; जबाबदारी (क्रि. घेणे.): 'राजकारणाची चर्चा करणारे पत्र असल्यास जमानत मागितली जाई.'– जुआ ४९.(वा.) **जमानतीवर सोडणे** – जामीनावर मुक्त करणे. हमीदार मिळाल्यास अपराध्यास कैद न करता मोकळे असू देणे.
**जमानतदार, जमानदार** पु. (न्याय.) जामीन; हमी घेणारी व्यक्ती; हमीदार, [अर.]
**जमानतपत्र** न. (न्याय.) जामीनावर सुटलेल्या कैद्याने स्वत: दिलेले किंवा सुनावणीच्या वेळी कैदी हजर राहील अशी हमी त्याच्यावतीने इतरांनी दिलेले पत्र.
**जमानती आदेशिका** जामीन घेऊन सोडण्याचा हुकूम.
**जमानसाखळी** स्त्री. परस्परांस जामीन राहण्याची क्रिया, जामीनदारांचा गट : 'तेथे जे मराठे लोक भेटले असतील त्यांचा बहुता प्रकारें दिलासा करून जमानसाखली करून घेऊन तेच स्वामी कार्यावर सादर होत तो अर्थ करणे.'–मइसा ६.८.
**जमानसाज** वि. काळाप्रमाणे वर्तणूक करणारे; संधिसाधू.
**जमानसाजी** स्त्री. जामीनकी; हमी : 'त्यानी जमानसाजीवरी द्रिष्टी दिल्ही आहे.' – वेद २८.७३.
**जमाना** पु. १. हंगाम; ऋतू. २. काळ; वेळ; युग : 'आजी जमाना एक प्रकारचा आला आहे'– ऐलेसं ११.१८३. [अर.]
**जमानोंद** स्त्री. (वाणिज्य) खातेदाराच्या खात्यात रक्कम जमा केल्याची नोंद.
**जमापंचोत्र** न. बाहेरून येणाऱ्या मालावरील जकात.
**जमाबंदी** स्त्री. १. शेतसारा; दरवर्षी द्यावयाचा आकार; जमिनीची पाहणी करून ठरविलेला आकार. २. नियमित जमा व वसूल; सामान्य कर. ३. शेतसाऱ्यांचा जमाखर्च.
**जमाबंदी** स्त्री. सैन्याची भरती; सैन्याची टोळी; समुदाय : 'अशी जमाबंदी करून.' – ऐपो १०७. पहा : **जमा**
**जमाबंदी आयोग** (शाव्य.) शेतसारा, जमीनधारणा, जमीनधारकांची सूची, जमिनीची मालकी, महसूल यांसारखी सर्व कामे पाहणारा आयोग.
**जमाबंदी जमा** जमीन मोजणीच्या वेळेस अधिकाऱ्याने ठरवलेली जमाबंदी किंवा वसूल.
**जमाबंदीपट्टी** स्त्री. जिल्हाधिकाऱ्याने गावच्या पाटलाला तयार करून दिलेले पुढील वर्षातील गावच्या जमाबंदीचे पत्रक.

**जमाबाकी** स्त्री. (वाणिज्य) खात्यातील शिल्लक रक्कम; वसूल कर आणि उरलेली बाकी.
**जमालगोटा** पु. १. जयपाळचे बी. याने शौचास साफ होते : 'जयपाळ या वासनाला 'जमालगोटा' असेही म्हणतात.' – वसू ८१६.२. (ल.) कडक शब्दांत हजेरी घेणे; निर्भर्त्सना करणे. (क्रि. देणे.)(व.)[फा.]
**जमाव** पु. १. पहा : **जमात**. २. अनेक वस्तूंचा संग्रह. ३. फौज. ४. जमाव या शब्दाचा, जम या शब्दाचे जे निरनिराळे अर्थ आहेत त्याप्रमाणेही उपयोग करतात. ५. परिवार, कुटुंबकबिला. [अर.] (वा.) ० **पडणे** – कायम करून घेणे (धंदा, हुद्दा); दृढ, स्थिर, भरभराटीचा, चांगला होणे.
**जमावट** स्त्री. संग्रह; गोळा करणे: 'शस्त्रास्त्रांची जमावट'– नकावा १३५.
**जमावबंदी** स्त्री. शांतता व सुव्यवस्था राखण्यासाठी शासकीय आदेशाद्वारे लोकांना एकत्र येण्यास केलेली मनाई : 'कमिशनरनं सभा आणि जमावबंदीचा हुकूम जारी केला होता.'–साहेब ४२८.
**जमावर्दी** स्त्री. पराक्रम; बहादुरी. [फा. जवाँ +मर्दी]
**जमाववर्तन** न. (समाज.) समुदायाचे वागणे. हे व्यक्तीच्या वागण्यापेक्षा अधिक भावनाप्रधान व कमी विवेकप्रधान असते हे या वर्तनाचे वैशिष्ट्य होय.
**जमावसूल** पु. सरकारी वसुलाची रक्कम.
**जमावानसी** क्रिवि. जमाव, गट करून टोळीने (केलेली चोरी); मंडळीनिशी; मंडळीने (केलेले कृत्य).
**जमाविणे** स्त्री. एकत्र जमणे; गोळा करणे.
**जमिनीलोक** पु. स्त्री. इनामदारवर्ग.
**जमियत** स्त्री. मंडळी; सैन्य. पहा : **जमात** [अर.]
**जमिया** पु. जंबिया : ' शिद्दीकरंज यांने आपला जमिया एकदम म्यानांतून काढून शिद्दी समूलखानाच्या मस्तकांत मारला.'–ऐको ४१०.
**जमी** स्त्री. १. जमीन. २. भुईकोट किल्ला. [अर. जमीन]
**जमीदारी, जमीदोज** वि. भुईवरचे; भुईकोट : 'गुंडी बंडे, हंप समुद्र वगैरे किल्ले पहाडी व जमीदारी कुल बापूजी गुंडो याच्या हवालीं करून कबज घेतले.'– ऐको ४१०. २. जमिनीशी खिळलेला; जमीनदोस्त.
**जमीन** स्त्री. १. भूमी; धरणी; भुई; नद्या, समुद्र आणि वातावरण यांखेरीजची जागा. २. पृथ्वीचा पृष्ठभाग; अंतर; जागा. ३. शेत; लागवडीची जागा. ४. गच्ची; मजल्यावरची भुई अथवा पेंडाची तयार केलेली भुई. ५. मूळ आधार. पहा : **भुई** [फा.](वा.) ० **अस्मान एक होणे** – १. सपाटून पाऊस पडणे; धुरळा, धुकेयांनी दिशा धुंद होणे. २. (ल.) अतिशय गर्विष्ठ होणे. ० **अस्मानाचे अंतर** – फार मोठे अंतर, तफावत. ० **उकरणे** – आंगठ्यांनी भुई उकरणे (संकटग्रस्त, भीतिग्रस्त होऊन घोडा टापेने जमीन उकरतो तसे).० **ओढणे** – जमीन लागवडीस आणणे. ० **कोरणे** – हळूहळू बळकावणे; खरडणे: ' बाबूरावने पाट काढताना बेगर्स होमच्या जमिनी कोरल्या आहेत.'–अगाआवे ४९. ० **धरणे** – १. आजारीपणामुळे अंथरुणाला खिळणे : 'आखवा महिना झाला, म्हातारीनं जमीन धरली होती... म्हातारी आता उठणार नव्हती.'– नागीण ११४. २. रागाला वश होणे. ० **माडी ठेवणे** – बागाईत पिकाकरिता जमीन रिकामी ठेवून उरलेल्या जमिनीत एकच पीक काढणे. ० **वाफेला येणे** – वाफसा होणे;

पेरणीसाठी योग्य होणे. ० **सोडणे** – १. जमिनीतून वर येणे, दिसणे (पीक).२.(ल.) दुखणे, दारिद्र्य इत्यादीतून वर येणे, उठणे. **जमिनीवर पाय नसणे** – चपळ घोडा, जलद पळणारा, गडबड्या माणूस यासंबंधी योजितात.**जमिनीस पाठ (अंग) लागणे, जमिनीवर पडणे** – दुखण्याने किंवा अतिशय दारिद्र्याने पिडणे. **जमिनीस पाय लागणे** – रोगमुक्त होणे. **जमिनीस मिळणे** – सर्वस्वी नाश होणे (अक्षरश: आणि लक्षणेने).

**जमीन** स्त्री. चित्राची पार्श्वभूमी. [फा.]

**जमीन** स्त्री. वस्त्राच्या काठांमधील अंग; तवा. [फा.]

**जमीनउत्पन्न** न. १. जमिनीचे उत्पन्न. २. सारा किंवा वसूल.

**जमीनजुमला** पु. खेडेगावातील सगळी जमीन, घरदार, वतनवाडी, कुरणे यांस व्यापक अर्थाने म्हणतात. [फा.]

**जमीनझाडा** पु. जमिनी, गाव, खेडे यांची एक विस्तृत यादी : '... दुसरा असाच झाडा असावयाचा पण त्यांत जमिनीस प्राधान्य दिलेले व तो जमीन झाडा.' – अमराअ १४९.

**जमीनदार** पु. वंशपरंपरेने सरकारी वतनदार, कामदार, जसे : – देशमुख-देशपांडे, (कोठेकोठे) पाटील, कुलकर्णी.

**जमीनदार, जमीदार** पु. १. सनदी सरंजामी माणसे.(व.) २. स्वत:साठी मेहनताना म्हणून काही टक्के वसूल कापून घेऊन बाकीचा वसूल सरकारात पाठविणारा ; वतनदार. [फा.]

**जमीनदार व कुळे** बऱ्याच जमिनी स्वत:च्या मालकीच्या असलेला सधन मनुष्य. जमिनीची लागवड करणाऱ्यांकडून तो खंड वसूल करतो. अशा व्यवहारात जमिनीच्या मालकास जमीनदार व जमीन करणाऱ्यास कूळ अशी संज्ञा आहे.

**जमीनदारी** स्त्री. १. जमीनदाराचा हक्क, हुद्दा, धंदा; जमीनखंड इ. २. (ल.) लुच्चेगिरी; छक्केपंजे.

**जमीनदोस्त** वि. १. (कुस्ती) जमिनीला खिळविलेला; लोळविलेला; चीत. २. सर्वस्वी नाश झालेला; फन्ना झालेला : 'सिकंदर लोदीच्या आक्रमणापुढे ते जमीनदोस्त झाले.' – अहीदि २१०. [फा. झमीनदोझ]

**जमीनधारणा** स्त्री. जमीन धारण करणे, जमिनीवर ताबा असणे.

**जमीनधारा** स्त्री. जमिनीचा कर; शेतसारा.

**जमीननीस, जमीननवीस** पु. १. शेत, जमीन, पिके इत्यादींची पाहणी करून सारा ठरविणारा अधिकारी. २. दप्तरवार.(कर.) [फा.]

**जमीनबाब** स्त्री. सारा; कर.

**जमीनमहसूल** पु. जमीनबाब; शेतसारा; जमिनीपासून कराच्या रूपाने होणारे सरकारी उत्पन्न: '... शेती उत्पन्नावरील प्राप्तिकर व जमीनमहसूल मिळून' – अहीदि ५४.

**जमीनमोजणी** स्त्री. जमिनीचे क्षेत्र मोजून जमाबंदी करणे.

**जमीनशिरस्ता** पु. जमिनीची पाहणी करून, प्रत लावून ठरविलेला सरकार सारा.

**जमीनसांड** क्रिवि. जमिनीपासून निराळे (उचललेले ओझे). (राजा.)

**जमीनसुधार** पु. (शाव्य.) बांधबंदिस्ती, खते, भराव इ. मार्गांनी जमीन सुपीक करणे.

**जमीन सुधारणा** (शाव्य.) जमीनदारी नष्ट करणे, कसणाऱ्याला, कुळाला जमीन देणे यासारख्या जमीनमालकीच्या संदर्भातील सुधारणा.

**जमीयत** स्त्री. मंडळी; सैन्य. [अर. जमात]

**जमीये, जमे** वि. सर्व; एकंदर : 'जमीये दोस्तांस मुबारक लाये.' – पया ४८२. [फा.]

**जमीर** पु. स्त्री. सदसद्विवेकबुद्धी; मन.

**जमीव** वि. १. जमविलेले; एकत्र केलेले. २. गोठलेले; थिजलेले. पहा : **जमणे**. ३. वस्तू घेऊन तयार केलेले (पत्ते, चिखलाची भिंत).

**जमुला** पु. लहान प्याला. (झाडी)

**जमे(म्या)त, जमेदार–री–यत** पहा : **जमातदार–री** : 'ते व आपली जमेत चालून पुढे आले.' –चिधोशा ३२.

**जमेदारी पेशा** साज, सरंजाम असणे; मोठा कुटुंब कबिला असणे; पै पाहुणा यांची वर्दळ असणे : ' पाटील – कुलकर्ण्यांना चारचौघांप्रमाणे प्रपंच चालवायचा असून आतिथ्याच्या कामांत जमेदारी पेशा राखावयाचा असतो.' – गावगाडा ५९.

**जमेनीस** पु. एक मुलकी कामगार; जमाबंदीकडील कारकून : ' सदाशिव कानो जमेनीस पाठविले आहेत. ' – बाबारो ३.२५

**जमौचे** सक्रि. जमविणे; एकत्र करणे. (गो.)

**जम्मत** स्त्री. (लहान मुलांच्या भाषेत) गम्मत.

**जम्मन** वि. भला मोठा ; जंगी. (व.)

**जय** पु. १. यश; सिद्धी; विजय; फत्ते; जयोत्सव, सरशी. २. देवाला नमन करताना त्याच्या नावाच्या पूर्वी लावतात. [सं.] (वा.) ० **करणे** – जिंकणे; यशस्वी होणे. **जयास जाणे** – भरभराटीस येणे (यत्न, उपाय, आयुष्य); सफल होणे: 'ईश्वरप्रार्थना जयास गेली कीं, महाराजांचे आगमन झाले.'– ऐको ४११.१२.

**जयघंटा** स्त्री. जय झाल्यावर वाजविण्याची घंटा.

**जयघोष** पु. विजय झाल्यावर तो सर्वांना कळावा म्हणून केलेला हर्षध्वनी.

**जयजय, जयजयकार** पु. स्तुतिकीर्तन; जयघोष. अव. लाड करणे; थोपटणे; कुरवाळणे. उद्गा. – भले शाबास, भले पठ्ठे इ. उद्गार; जयगीत; जयाचे गाणे.

**जयजयवंती** स्त्री. ( राग) गायनशास्त्रातील एक राग. गानसमय – रात्रीच्या दुसऱ्या प्रहराचा शेवट.

**जयजया** उद्गा. जयनाद.

**जयढाक** पु. जय झाला असता वाजवावयाचा नगारा; ढोलके.

**जयत** पु. (संगीत) एक राग. गानसमय सायंकाळ.

**जयतन** न. सरपण; जळण; जळवण. (व.)

**जयतवादी** वि. विजयी : 'जयतवादी होऊनि श्रीकृष्णचक्रवती चालिले' – श्रीच ५५.

**जयतिस्म** वि. भरभराटलेले (राज्य).

**जयतीर** पु. वेंगुर्ल्याकडील दसऱ्याची जत्रा. (कु.) [सं.जैत्र]

**जयत्कल्याण** पु. (संगीत) एक राग. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर.

**जयदनामा** पु. वंशवृक्ष : 'पेडांबेकरामध्ये कागदाची वाटाघाट चालू होतीच. सहा फूट लांब व तीन फूट रुंदीचा एक मोठा जयदनामा मला

दाखविण्यांत आला.' – ऐको ४११.

**जयदुंदुभि–बी** पु. जय झाल्यावर वाजवावयाचा नगारा; त्या नगाऱ्याचा आवाज.

**जयध्वनि–नी** पु. १. जयघोष. २. (ल.) कोणताही मंगलसूचक शब्द.

**जयपताका** स्त्री. जयाचे निशाण.

**जयपत्र** न. ज्याचा पराभव झाला त्याने लिहून दिलेले जयाचे पत्र; लेखी कबुली, कागद (कुस्ती, पंडितांतील वाद, फिर्याद अर्याद यांतील).

**जयपाळ** पु. एक औषधी वनस्पती; तिचे बी. [सं.]

**जयफळ** न. १. जय. २. (चुकीने) जायफळ.

**जयमंगळ** वि. कैऱ्या डोळ्याचा (घोडा); डोके, कपाळ, मान, छाती, ओठ, बेंबी या प्रत्येकावर एकएक केसाचा भोवरा आणि पोटावर दोन व कुशीवर (पुठ्ठ्यावर) एकएक भोवरा असलेला (घोडा). हे याचे शुभलक्षण होय.– अश्वप १.९२.

**जयमुहूर्त** पु. ज्या विशिष्ट वेळी काम आरंभले असता यश मिळते अशी वेळ.

**जयर** न. १. जहर; विष. २. (ल.) अतितीव्र (ऊन): 'उन कसं जयरावानी पडलं हाये?' – माणूस ३७४.(ग्रा.)

**जयवाद्य, जयतुरी** न. जय झाला असता वाजवावयाचे वाद्य; तुतारी: 'जयवाद्य नित्य वाजती ।' – ऐपो ३१८.

**जयशब्द** पु. जयाचा ध्वनी, शब्द.

**जयश्री** स्त्री. जयाने आलेली शोभा; तेज.

**जयस्तंभ** पु. जय मिळालेल्या ठिकाणी जयाचे स्मारक म्हणून उभारलेला खांब (दगडी, लाकडी); रणस्तंभ.

**जयस्वी** वि. नेहमी विजय पावणारा (अंती स्वी असणाऱ्या संस्कृत शब्दांचे अनुकरण).

**जयंती** स्त्री. देवाचा, अवतारी पुरुषाचा किंवा थोर पुरुषाचा जन्मदिवस व त्या दिवसाचा उत्सव; वाढदिवस : 'जयंत्या उपोषणें नाना साधनें ।'– दास ४.१.३२. [सं.]

**जयंती** स्त्री. एक वृक्ष व त्याचे फळ.

**जया** स्त्री. (ज्यो.) तृतीया, अष्टमी किंवा त्रयोदशी या तिथी. [सं.]

**जया** स्त्री. यश.(झाडी)

**जया** स्त्री. भांग.

**जया–ये** सर्व. ज्या; ज्याला; ज्याने: 'जया राहे पाठांतर'– दास २.७.८०; 'जये संगतीने मती राम सोडी ।'– मश्लो ४५.

**जयिष्णु–ष्णू** वि. जय मिळविण्याची इच्छा असलेला : 'पराभूत वांछा, जयिष्णू ईर्षा'– अंया ११८.

**जयी** नवरात्रात पेरलेल्या धान्याचे अंकूर, पाती दसऱ्याला एकमेक

**जयी** वि. विजयी; जय झालेला; जय मिळविलेला. [सं.जयिन्]

**जयेजणे** अक्रि. जिंकणे; जिंकता येणे : 'तुका म्हणे पदोपदीं कान्हो वनमाळी । जयेजत मग सेवटिला एक वेळीं'– तुगा ३३५.[सं.जि.]

**जयेद** जायजाद; सैन्याच्या खर्चास लावून दिलेले महाल.

**जय्यत–द** वि. १. पूर्ण; अगदी; अवघा; सर्वतोपरी : 'त्यांतील पलटण जयद बर्बाद जाली.'– होकै ११६. २. सिद्ध. [अर.झाइद]

**जर** उअ. संकेतबोधक अव्यय; अमुक गोष्ट घडली तर अशा अर्थी पूर्वीची अट, निर्बंध, वस्तुस्थिती दाखविणारे अव्यय. हा शब्द पुढील शब्दांशी जोडूनही वापरतात – का, करिता, काय, करून, होऊन. जसे :– जर का तो आला तर मी देईन. [सं.यत्]

**जर** पु. स्त्री. १. कलाबतूचे वस्त्र; सोन्यारुप्याची तार; कलाबतू. २. सोने; पैसा: 'जर पदरी जर नसला तर तो नर संसारी येऊन बैल.'–पला [फा.]

**जर** पु. १. ताप, ज्वर. २. तापाच्या पुटकुळ्या, पुरळ. [सं.ज्वर] (वा.) ० **उतणे** – (ताप गेल्यानंतर) अंगावर, तोंडावर पुरळ उठणे. ० **जाणे** – दुखणे येणे; रोग उत्पन्न होणे. (शाप म्हणून योजतात). ० **बांधणे** – ताप नाहीसा होण्यासाठी मंतरलेला दोरा, गंडा, ताईत हातात, मनगटात बांधणे. ० **भरणे, होणे** – १. अंगात ताप भरणे. २.(ल.) अशक्त, अयोग्य, असमर्थ होणे (प्राणी, आणि वस्तू यासंबंधाने नकारार्थी अथवा प्रश्नार्थी योजतात).

**जरकडी** स्त्री. (कलाबतू काम) धाग्यांना पीळ देण्यासाठी जिच्यामधून चालीवरून दोरे घेतात ती कडी. [फा.]

**जरकबरक** वि. लखलखीत; चकाकित; तेजस्वी; तजेलदार; उजळपाजळ. [अर. बर्क द्वि.]

**जरकमर** पु. सुवर्णकटिबंध; कटिसूत्र. [फा.]

**जरकमळ** न. स्त्रियांचा एक जुना दागिना : 'सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धात महाराष्ट्रीय स्त्रियांना कोणकोणते दागदागिने आवडत ते या काव्यावरून लक्षात येते. सीसपूल...जरकमळ...इत्यादी.'– मजीस्थि ८८.

**जरकरिता** उद्गा. जरी (एखादे वेळी); जरी (एखाद्या रीतीने); जरी (यद्यपि, अथापि).

**जरकरी** वि. ताप आलेला माणूस.

**जरखाना** पु. सुवर्णशाळा; सोने ठेवण्याची जागा. [फा.]

**जरगुडी** वि. रेषाळ; तंतुमय; दोऱ्याचा.

**जरगूड** न. १. आंब्याच्या कोईभोवतीच्या रेघा. केसरपुंज. २. आंबाडी, काथ्या, पिंपळाच्या मुळ्या इत्यादींच्या तंतूंचा गड्डा; जाळे; जुडी; तंतुसमूह.

**जरजरीयान** न. सोने आणि सोन्याच्या वस्तू; द्रव्य आणि अलंकार; कलाबतू आणि त्याचे काम; कशिदा. (समुदायार्थी प्रयोग). [फा.]

**जरठ, जरंड** वि. १. निबर; म्हातारा; जीर्ण. २. थकलेला; अशक्त; कमजोर : 'एकादा जखख जरठ उभा आहे'–एवाका.[सं. जरा + स्थ]

**जरठोद्वाह** पु. म्हाताऱ्याचे लहान मुलीशी लग्न; जरठकुमारी विवाह : 'बालविवाह, जरठोद्वाह... वगैरे अनेक सामाजिक विषय'–सको १५६.

**जरड** स्त्री.दोर; रेषा; दोराळपणा; तंतुमयता (निबर भाजीपाल्याची).

**जरड** वि. निबर; राठ; म्हातारा: 'दुसऱ्यापनात पोट्टीच्या मानानं जरड होइन रे!' – वानगी २३३. [सं. जरठ]

**जरडा** पु. जर; ज्वर.(वा.) ० **भरणे, जरंडा भरणे** – ताप भरणे: 'उन्हाळी जरंडा पावसाळी विजालवती ।' – वसागा २०.

**जर(रं)डी** स्त्री. म्हातारी स्त्री; विशेषत: सुवासिनी स्त्री. : 'जरंडी घोलाणा गंडमाळा या नाव आध्यात्मिक' – दास. ३.६.३७. [सं. जरठ, जरा]

**जरडेल** वि. तंतुमय; रेषाळ. पहा : **जरगुडी**

**जरण** स्त्री. पचन : 'अन्नांत स्टार्च मिसळला म्हणजे अन्नाचे जरण चांगले होते.'– विज्ञावि २.२५.८. [सं.जॄ–जीर्ण]

**जरतर** अ. संकेतबोधक अव्यय. अट; कार्यकारणभावी बोलणे.

**जरतार** स्त्री. न. १. कलाबतू. २. हलक्या धातूवर सोने, रुपे, चांदी चढवून त्या धातूची तार काढून ती रेशमी अगर सुती धाग्यावर गुंडाळणे. हलक्या धातूवर सोने, चांदी चढवून तार काढून केलेल्या जरतारीस खोटी जर व चांदीवर सोने चढवून काढलेल्या तारेच्या जरतारीस खरी जर म्हणतात.

**जरतारी** वि. कलाबतूचे; जरतार असलेले (पीतांबर, पागोटे इ.).

**जरतारी** वि. १. दिखाऊ; वरचेवर २. जर-तरनी युक्त; गुळगुळीत; ठामपणा नसलेले (विधान): 'सुभाषबाबूंचा गुळगुळीत जरतारी नकार.'- विविध २६.५.१९४०.

**जरत्कारु-रू** वि. १. एक ऋषी. हा फार अशक्त होता (यावरून) २. (ल.) फार अशक्त, रोडका; सुदामदेव; कृश : 'पण तो काही या... जरत्कारू खोतासारखा असायचा नाही.'- गआचा ५२.[सं.]

**जरदा, जरदाइत** वि. पिवळा; पिवळ्या रंगाचा (घोडा):'... जरद्या घोड्यावर स्वार झालेले सेनापती'- श्रीयो १२७. [फा.जर्द]

**जरदा भात** शेवईभात.

**जरदार** वि. धनाढ्य; श्रीमंत : 'हैदर अलीखान जरदार खजानेजेपूर स्वारांस नालबंदी पेशगी तलब देईल.'-ऐको ४१४. [फा.]

**जरदाळू** पु. एक फळझाड व त्याचे फळ. [फा. जर्दालू]

**जरदोज** पु. कलाबतूचे काम करणारा. [फा.]

**जरदोजी** स्त्री. कलाबतूचे काम.
वि. भरजरी; जरीचा : 'खाशा स्वारीकरता भरगची लोड गाशा किंवा जरदोजी गादीलोड लाविणे.'- ऐरा २७.

**जरप** न. पाऊस पडल्यानंतर खणून पेरणी करावयाचे शेत.(गो.)

**जरफडणे** अक्रि. तडफडणे : 'न संपडे जालें भूमिगत धन । जरफडी मन तयापरी ।।' - तुगा ३६५.

**जरब** स्त्री. १. धाक; भीती वाटावी असे तेज; वजन; छाप. २. दरारा; दटावणी.( क्रि. देणे, दाखविणे.) ३. भीती; धास्ती; वचक. (क्रि. खाणे, धरणे, पावणे, घेणे.) ४. शिक्षा; मार : 'ज्यांनी मग्रूरी केली त्यांचे प्रांतांस व त्यांस जरब दिली.'- चिथोशा ४७. [अर. जर्ब]
(वा) **० खाणे** - भीती बाळगणे. **० पिणे** - भीती घेणे.

**जरब** स्त्री. नाणी पाडणे; छाप; शिक्का:'अलीगोहराचा शिक्का दिल्लीत पडला...पातशहाची जरब मोडून यांचें नावें करणें.' - मइसा १.३६३.

**जरब** स्त्री.तोफ : 'मोठमोठ्या पल्ल्याच्या जरबा।'-ऐपो २१६.

**जरब, जरबदार** वि. १. अतिशय मोठे, प्रचंड (ओझे, माप). २. फार जड; भारी; जबर (किंमत,दर). ३. त्रासदायक; जुलमी; कठीण (नोकरी, धंदा). ४. थकवा आणणारे; राक्षसी (ओझे). (अतिशयपणा, विस्तृतपणा, भारीपणा किंवा त्रासदायकपणा दाखविण्यासाठी या शब्दांचा उपयोग करितात.)

**जरबणे** अक्रि. भिणे; भय पावणे; धास्तावणे: 'जरबला जरा. बसला मुकाट्या.'- पाचोळा ४४.

**जरबरी** स्त्री. दमदाटी; धाक; दरारा : 'धाक दाखविण्याच्या हेतूने असले जरबरीचे खलिते'- वज्राघात २८३.

**जरबवान** वि. १. दराऱ्याचा. २. कर्तृत्ववानः 'जरबवान पुरुष आहे, त्याचे तोंडात दौलत आहे.' - होकै १०९.

**जरबंद** पु. ताप बंद करावयाचा मंत्र.

**जरबंद** पु. घोड्याचे पिछडे; (घोड्याचा) चामडी पट्टा. पहा : **जेरबंद**

**जरबाब-फ्त** वि. कलाबतूने विणलेले जरतारी; भरजरी. पहा: **जरदोजी** [फा.]

**जरबी** वि. १. अरेरावी; वचक, धास्ती बसविणारा. २. भयंकर; जुलमी; त्रासदायक; भयोत्पादकः 'सैन्यांत अरब वगैरे जरबी लोकांचे वर्चस्व झाले.'-मइं १४५. ३. तीक्ष्ण; प्रखर (शस्त्र, पशू).

**जरबी शिक्षा** (राज्य.) कठोर, जरब बसेल अशी शिक्षा.

**जरबेरा** न. एक फुलझाड.

**जरमजरत** स्त्री. सुशोभित आसन; भरजरी बैठक.

**जरमिना** पु. भरजरी मौल्यवान वस्तू; जर्मीना : 'जरमिना जरबाब... आदिकरून अशेष वस्तुजात यांचा उदीम चालवावा.' - मराआ २१.

**जरमॅनिक** वि. (भाषा.) भारोपीय भाषाकुलाची एक शाखा. ही शाखा आपल्या ध्वनिपरिवर्तनासाठी प्रसिद्ध आहे.

**जरयान** न. पहा : **जरजरियान**

**जररोजीगत** क्रिवि. दररोजप्रमाणे : 'जररोजीगत धुणं भिजवून ती आली'-रैत ५३.

**जरलगी** स्त्री. न. जरीचे निशाण; जरीपटका : 'बाबा फडके मुहूर्तेकरून निघाले. जरलगी व अंबारी व ३००० फौज बरोबर आहे.' - ऐको ४१५.

**जरलपेट** स्त्री. तापाची साथ.

**जरस** न. बारीक ओव्यासारखे बी. पोटदुखीवरील एक औषध; जिरकरण.

**जरंगा** पु. मासे पकडण्याचे जाळे : 'आतां वृद्धाप्याच्या तरंगा-। माजी मतिभ्रंशाचा जरंगा ।'-ज्ञा ७.८६

**जरंबा** पु. एक अगदी आंबट आंब्याची जात. (राजा.)

**जरा** स्त्री. म्हातारपण; वयस्कता : 'कृतांतकटकामलध्वज जरा दिसों लागली ।' - केका ४६. २. शिथिलता; अशक्तपणा; दौर्बल्य. [सं.]

**जरा** पु. ज्वर; ताप : 'मदाचा तंव जरा अंगी चढत'-ज्ञा १६.३२३.

**जरा** क्रिवि. १. तिळमात्र; किंचित; थोडेसे; थोड्या प्रमाणाने. २. अमळसा; थोडा वेळ : 'राहोनी जवळी नयेसि कधिही मत्दृष्टिपातीं जरा।' - कमं २.५४. [अर. झर्रा]

**जराई** स्त्री. शेती : 'तरी उतार वगैरे जराई बट्टापटी बाब.'- बाबारो ३.३ [अर. झरह]

**जराक-सा** क्रिवि. थोडेसे; किंचितसे. पहा: **जरा** : 'त्या कृष्णसारथिपुढे होशिल मूक न जराक बकशील' - मोद्रोण १७.४१.

**जराकांडा** पु. एका वृक्षाचे नाव : '(पुण्यात) इतर रस्त्यांच्या काठी गुलमोहोर... जराकांडा... आहेत.' - वसृ ९२६.

**जराजीर्ण** वि. वृद्धत्वामुळे शारीरिक व मानसिक दुर्बलता आलेला.

**जराबजरा** पु. कणन् कण : 'इनामाचे जराबजरा पावते कीजे.' - ऐको ४१५.
वि. ईषन्मात्र; किंचित्. [अर.]

**जरायु-यू** १. (प्रसूतीनंतरची) वार; गर्भकोश; गर्भवेष्टण; खोळ; गर्भाशय. २. सापाची कात. [सं.]

**जरायुज** वि. गर्भाशयापासून उत्पन्न झालेला (मनुष्य, पशू). जीवांच्या प्रकारांपैकी एक. पहा : **अंडज, स्वेदज, उद्भिज**

**जरार-रा** पु. उग्रपणा; रानटीपणा; क्रूरपणा; तापटपणा. [अर.जरीर]

**जरारा** वि. ओसाड; चीजवस्तू हलवलेला : 'शत्रू हावभरी जाहला. याजकरितां गांव जरारा करावा म्हणून लिहिलें आहे.'- ऐको ४१५.

**जरारा-री, जरिदा** वि. १. एकटा; सडा; फटिंग; ज्याला बायकापोरे, नोकरचाकर नाहीत असा : 'जरारा राहिला आहे.' -पेद २.१६६६; 'जरिदा होऊन बऱ्हाणपुरचे पारिपत्यास येणार.'- मइसा १.२७. २. फरारी; पळून गेलेला; बेपत्ता असलेला. [अर.जरीदा]

**जराल** पु. फिरंगी सेनापती. [पोर्तु.]

**जराविज्ञान** न. (मानस.) वृद्धावस्थेतील लोकांच्या सर्व प्रकारच्या प्रश्नांचा अभ्यास करणारे शास्त्र.

**जराशाने** क्रिवि. थोडक्या वेळाने : 'जराशाने आमच्या सेनापतीसाहेबांच्या महालात जाऊन तू तें पत्र दे.'- बाबं २.२.

**जराशास्त्र** न. (जीव.) वृद्धत्वाची कारणे आणि वृद्धत्वाला कारणीभूत असणाऱ्या क्रिया - प्रक्रियांचा अभ्यास करणारी ज्ञानशाखा. [सं.]

**जरासा** वि. थोडासा.

**जरियान** न. १. सोनेरी भरजरी कापड, कशिदा. २. सोन्याचांदीचे दागिने; जडजवाहीर. [फा.]

**जरि(री)ला** स्त्री. कापसाची एक जात : 'खानदेश भागात जरिला, विरनार या (कापसाच्या) जाती लावाव्यात.'-सभा ११८.

**जरी-रीं** उअ. १.यद्यपि; तरीदेखील. २. जर. [सं. यर्हि]

**जरी** स्त्री. तापाची साथ. [सं.ज्वर]

**जरी** स्त्री. सोन्यारुप्याच्या तारा.

वि. जरीच्या, सोन्यारुप्याच्या तारांनी विणलेला : 'जरी सामान.' - सभाशिब ६८. [फा.]

**जरीजरतार** स्त्री. न. जुनी जर; जुन्या वस्त्राची जर; जुना कलाबतू, काठ, झाला, सोनेरी पक्षी इत्यादिकांचे तुकडे इ. (जरीपुराणेवाले ओरडताना हा शब्दप्रयोग करतात.)

**जरीटोप** पु. जर लावलेले राजाचे शिरस्त्राण : 'जरीटोप, अंगरखा...' - श्रीयो ३१.

**जरीटोपी** स्त्री. एक शिरोभूषण : 'जरीटोपीस पिंपळपान।'- मध्वक २५.

**जरीद** भाला.

**जरीदा** वि. पहा : **जरारा-री जरिदा**

**जरीपटका** पु. १. मराठ्यांचे मुख्य निशाण: 'जरीपटका म्हणजे ... इंद्रध्वजच. इंद्राच्या ध्वजाला जर्झर म्हणून संस्कृत नाव असे. पटका म्हणजे कापडाचा तुकडा. जर्झरीकपटक = जरीपटका.' - रालेसं २३. २. जरीचा कमरबंद; काच्या. मोहिमेवर जाणाऱ्या सेनापतींना हा मिळे.

**जरीपटका रुपया, जरीपटकी(क्या)चा रुपया** जरीपटक्याचे चिन्ह असलेला अंकुशी रुपया.

**जरीपदरी** वि. जरीचा पदर असलेले (पागोटे, शेला).

**जरीपुराणेवाला** पु. जुन्या वस्तूंचा व्यवहार करणारा मनुष्य : 'एकदा हा मुलगा कसला तरी जुना जिन्नस घेऊन... त्या जरीपुराणेवाल्याकडे गेला.' - हखेमओ ४९.

**जरीफतू** स्त्री. जरीचे कुडते, कोपरी : 'अंगरख्याच्या आत घातलेली जरीफतू अंगरख्यातून दिसत होती.'- श्रीयो ३३६.

**जरीब** पु. १. जमीन मोजण्याचे माप, दोरी किंवा साखळी. २.(अव.) जमिनीची मोजणी, पाहणी : 'बिघेवार सेत पाडून जरीबाचे रुईने पायमाली... घेईन.' - पेद २०.२१५. पहा: **जरबदार.** [अर.]

**जरीबखरडा, जरीबखर्डा** पु.जमीन मोजणीचा तक्ता.

**जरीबख्तर** न. लोखंडी जाळीचे चिलखत : 'जिरेटोप तुटून, आतले जरीबख्तर...'- श्रीयो २४४.

**जरीबदार** पु. जमीन मोजणारा.

**जरीबादली** वि. जरीच्या, कलाबतूच्या उभ्या काड्या असलेले (कापड): 'जरी बादले खांब चांदवे सोगा झाला चौफेर.'-ऐपो १७७.

**जरीबाना** पु. जमीन मोजण्याची दस्तुरी : 'नाकेदारी जरीबाना व नजराणा.' -बाबारो ३.४९. पहा : **जरीब**

**जरीबाब** (प्र.) पहा : **जरबाब**

**जरीबी** वि. तब्बल; पुरे; पक्के मोजून : 'दुसरे दिवशीं जरीबी ७।। कोस अंतर तोडून निलंग्यापासून एक कोसावर मुक्काम झाला.' -ऐपो २.६. [फा.]

**जरीबुटी-ट्टी** स्त्री. १. पहा : **जरीजरतार.** २. जुनी जर (जरीबुटी) गाळली असता तीतून निघणारी चांदी. ३. जरतारी बुट्टी, ठिपके. ४. (ल.) गुप्त ठेवा ; राखून ठेवलेले दागदागिने, पैसा.

**जरीबुंदी** वि. जरीबुट्टी; जरतारी ठिपक्यांचा : 'राजांनी अंगात जरीबुंदीचा पांढरा शुभ्र अंगरखा पेहेनला होता.'- श्रीयो ४१८.

**जरीमरी** स्त्री. रोगाची साथ (विशेषत: पटकीची); कॉलरा ; देवी. (सामा.) पटकी, वाखा.(क्रि. उठणे)

**जरु(रू)राती** वि. कामचलाऊ; जरूरीपुरते; हंगामी: 'काही लोक लागल्यास जरूराती ठेवणे व दंगा वारलियावर दूर करणे.' - समारो १.२०.

**जरून** उअ. जर; यद्यपी.

**जरूर** स्त्री. अपरिहार्य कारण; गरज; आवश्यकता; जरूरत.

क्रिवि. १. अवश्य; कसेही, काहीही करून; अगत्य; काही असले तरी. २. कष्टाने; क्वचित; विरळा. ३. जलद; ताबडतोब; लवकर; त्वरित.[फा.]

**जरूर(रा)त, जरूरी** स्त्री. जरुरी; पर्वा; आवश्यकता: 'कोणास बक्षीस काय द्यावे याची जरूरात तुमचे विचारे असेल त्याची याद पाठविणे.' - ऐलेसं ८.४२००. [फा.]

**जरूरे** वि. एकटे; सडे: 'मुत्सदी शहरास रवाना करून आपण जरूरे होऊन नर्मदा तीरास गेले.'- ऐको ४१७.

**जरेणे** अक्रि. ज्वराने युक्त होणे; ताप येणे, भरणे. (राजा.) [सं.ज्वर]

**जर्गा** पु. मंडळ; वेढा: 'सर्वांनी जर्गा एकच केल्यास काम तमाम होऊन नफे फार होतील.'- मइसा १९.३७. [फा.]

**जर्गार** पु. सोनार. [फा.जर्गर]

**जर्जर, जर्जरीत** वि. १. वार्धक्यामुळे थकलेला; क्षीण झालेला: 'जर्जर झाल्या निंदक हे अवघे होती।'-नवनीत ४४४. २. पीडित;

पछाडलेला : 'तैसा तो धनुर्धरु । अत्यंत दुःखे जर्जरू ।' – ज्ञा १.२७२. [सं.]

**जर्जरा, जरजरा** वि. अणू अणू, बारीकसारीक : 'हकरि यांनी जर्जरा तिलतिल खबर घेऊन आपुले पादशाहासी सांगितलें.' – ऐको ४१२.

**जर्तारी** वि. कलाबतूचे.

**जर्द** वि. सोनेरी; पिवळा: 'नबाब जर्दा अंबारीत.' – पया ५४.

अ. पिवळा आणि लाल या शब्दाचे गुणाधिक्य दाखविण्यासाठी जर्द हा शब्द त्यास जोडतात. उदा. पिवळाजर्द, लालजर्द इ. [फा. झर्द]

**जर्दा** पु. प्रक्रिया केलेली खाण्याची तंबाखू [फा. झर्द]

**जर्दोजी, जरदोजी** वि. जर्तारी : 'खानपोश जर्दोजी जवाहरजडित, मोत्याची झालरचे आणून ठेविले.' – ऐको ४१२.

**जर्नल** पु. १. एखाद्या विद्यापीठाने, संस्थेने काढलेला नियतकालिकाचा अंक : 'मेडिकल जर्नल चाळीत बसली.' –अयेवाफु ६७. २. शिक्षण संस्थांतून शिक्षण घेताना दैनंदिन अभ्यासाची – विशेषतः विविध शास्त्रीय प्रयोगांच्या कृति – निष्कर्षांची – सविस्तर लेखी नोंद विद्यार्थ्यांनी ज्या पुस्तिकेतून केलेली असते अशी पुस्तिका. [इं.]

**जर्नाया** वि. मत्सरी.(झाडी)

**जर्ब** पहा : **जरब**

वि. ठार. [फा.]

**जर्बजान** स्त्री. तोफेचा एक प्रकार.

**जर्बाबी** वि. भरजरी. पहा : **जरीबाब** : 'खुर्शा मखमल जर्बाबी मढोन मांडिल्या होत्या.' – मइसा १.४२

**जर्मन बाया** देवीचा रोग : 'जर्मन मीसल्स वरून या रोगाला हे नाव मिळाले असावे. देवीच्या रोगाला 'जर्मन बाया' असे नाव दिले गेले होते.' –रोपा ८२.

**जर्मन सिल्व्हर** (रसा.) निकेल, तांबे आणि जस्त असलेला एक मिश्रधातू. [इं.]

**जर्मल** न. 'जर्मनसिल्व्हर' या मिश्रधातूचे अपभ्रष्ट रूप : 'भट्टीवाल्यानं... जर्मलचं भांड मांडलं' – माणूस ५.

**जर्मेनिअम** न. (रसा.) आणव क्रमांक ३२ ; आणव भार ७२.६० असलेले दुर्मिळ, धातुरूप मूलद्रव्य. [इं.]

**जऱ्यामऱ्यानं** क्रिवि. जरा वेळाने : 'जऱ्यामऱ्यानं डॉक्टर स्त्रियांच्या खोलीत आले.' – अगतिका ३४.

**जर्वर** स्त्री. (अप.) जरूर : 'भुकेलेल्यांना पळायची 'जर्वर' नव्हती.'– उअं २१.

**जर्सी** स्त्री. अंगाबरोबर बसणारा लोकरीचा स्वेटर : ' जर्सी व जाकीटे यांचाहि शक्य तितका पुरवठा केला.' – निप्रश्न ३५. [सं.]

**जऱ्ही** उअ. जर. पहा: **जरी** : 'असो जऱ्हि कृष्ण – हृदिस्थ ।'– राप २.७८.

**जऱ्है** अ. जरी, जरीही : 'कां युग चि हें बुडालें । जऱ्है एथ ।।' – राज्ञा २.१८१.

**जल** न. पाणी; उदक; तोय; अंबू; नीर. [सं.]

**जल** न. वैभव; झकाकी. [अर.जल्ल]

**जल अवशोषण** (कृषि.) पाणी जिरणे (जमिनीत).

**जल अंतर्ग्रहण** (कृषि.) वनस्पतींनी शोषून घेतलेले पाणी.

**जल– आकाशयान** न. पाण्यात व आकाशात संचार करणारे यान : 'या जल – आकाशयानातील यंत्रज्ञानाची ... काहीही माहिती नव्हती.' – वैगूक १२३.

**जलआलेख** पु. पाण्याची पातळी, वेग, बाहेर पडणारे पाणी इ. दाखवणारा आलेख.

**जल उपचार** पु. (मानस.) पाण्याच्या साहाय्याने केलेला कोणताही उपचार. सर्वसाधारणपणे बराच वेळ शीत वा उष्ण पाण्याने विशिष्ट प्रकारच्या टबमध्ये बसून स्नान करतात; काही मनोविकारांमध्ये अतिउत्तेजित रुग्णाला शांत करण्यासाठी अथवा अतिविषण्ण रुग्णाला उत्तेजित करण्यासाठी याचा उपयोग केला जातो.

**जलकपाली** स्त्री. (मानस.) मानसिक मंदनाचा हा चिकित्सात्मक प्रकार आहे. प्रमस्तिष्क मज्जारज्जू द्रवाचा संचय मेंदूच्या खोलगट भागात किंवा मेंदू आणि कवटी यामधील मोकळ्या भागात होतो. त्यामुळे अशा व्यक्तीचे डोके सामान्य व्यक्तीपेक्षा मोठे आणि चेहरा विस्तृत दिसतो. तिच्या लिहिण्या-वाचण्यात खूप दोष आढळतात.

**जलकुक्कड** पु. १. पाणकोंबडा २. (ल.) कूपमंडूक : 'कचेरीतल्या जलकुक्कडांना असा धक्का बसला म्हणता.'– सरहद्द ३४.

**जलकुक्कुट** पु. पाणकोंबडा.

**जलकुलूप** न. उंच व सखल असे जलमार्ग एकमेकांशी जोडण्याचे साधन; ज्यामधील पाणी आपल्या इच्छेप्रमाणे खालच्या किंवा वरच्या पातळीत दुसऱ्या जलाशयापाशी समपातळीत आणता येते अशी रचना; कोंडी.

**जलकुंड** न. (ख्रि.) बाप्तिस्म्यांकरिता ज्यात पाणी ठेवतात ते पात्र किंवा कुंड : 'बाळकांस घेऊन आलेल्या लोकांनी... प्रार्थनेतील दुसरा पाठ झाल्यावर लागलेच जलकुंडाजवळ यावें.'– साप्रा ९०.१०५. [सं.]

**जलकुंभी** स्त्री. एक रानझाड: 'जलकुंभीचे (तिच्या पानाचे) किंवा उंडीचे प्रतिकुंचित –' वसृ ३७.

**जलकृषि–षी** स्त्री. (वन.) पाण्यात विरणाऱ्या पोषक द्रव्यांच्या साहाय्याने वनस्पतींची कृत्रिम पद्धतीने वाढ (संवर्धन) करण्याची पद्धती (प्रकार). [सं.]

**जलकेलि–ली, जलक्रीडा** स्त्री. १. विषयी पुरुषांचा स्त्रियांसह जलाशयातील विलास. २. पाण्यामधील खेळ; नावा वल्हविण्याची, पोहण्याची शर्यत : 'क्षीरधितीर विहारी जलकेलि करूं नदींत गगनीच्या ।' –मोकर्ण २८२५. ३. नदी – समुद्रपर्यटन. [सं.]

**जलक्रिया** स्त्री. १. पितरांचे तर्पण. २. पाण्याचे कार्य; धुणे वगैरे. [सं.]

**जलखोकड** पु. एक मासा.

**जलगतिशास्त्र** पु. (शाप.) पदार्थांच्या पाण्यातील गतीसंबंधी नियम दाखविणारे शास्त्र.

**जलग्रहणक्षेत्र** न. नदीच्या पाणलोटाचे क्षेत्र, प्रदेश.

**जलचक्र** न. (भूशा.) सागरातील पाण्याची सूर्याच्या उष्णतेने वाफ होऊन पर्जन्य– हिमवर्षाव – नद्या – भूजल इत्यादी मार्गे ते पुन्हा सागरात कसे परत येते याचा अभ्यास.

**जलचर** न. पु. १. पाण्यातील प्राणी : 'जैसे जळचरा जळसांडे । आणि तत्क्षणीं मरण मांडे ।' – ज्ञा ३.११७. २. (संकेताने) समुद्रापलीकडून आलेला परकीय माणूस. ३. युरोपियन लोक; इंग्रज लोक : 'जलचर तयार झाले.' –मइसा १०.१७५. [सं.]

**जलचिकित्सा, जलोपचार** स्त्री. पु. पाण्याच्या माध्यमातून रोगांवर उपचार करणारी पद्धती : 'त्याचा क्यूनीच्या जलचिकित्सेवरही विश्वास होता.' – मसप्र २५२.

**जलचिन्ह** न. कागद प्रकाशाच्या दिशेने धरल्यावर त्यावर दिसणारे ओळखचिन्ह; पाणखूण.

**जलचुना** पु. (स्था.) पाण्याच्या संसर्गामुळे कडक होणारा चुना.

**जलज** वि. पाण्यापासून उत्पन्न झालेला, पाण्यात जन्म पावलेला (मेघ, कमळ इ.) [सं.]

**जलजलाट** पु. भरभराट; उत्कर्ष.(व.) [हिं.]

**जलजंतु–तू** पु.जलचर; जलसंचारी प्राणी; जलामध्ये उत्पन्न होणारे जंतू (प्रत्येकी). [सं.]

**जलजीवपात्र, जलजीवालय** न. (वन.) सदैव पाण्यात असणाऱ्या वनस्पती व प्राणी यांना नैसर्गिक परिस्थिती प्राप्त करून देणारी व त्यांची वाढ व प्रजोत्पादन यांना मदत करणारी कृत्रिम पेटी (पात्र). अशा पेट्यांतून मोठ्या प्रमाणावर वनस्पती व प्राणी ठेवून त्यांचा अभ्यास व प्रदर्शन करण्याची सोय असलेली संस्था (जलजीवालय). [सं.]

**जलतरणविद्या** पाण्यातील खेळ, क्रीडा, पोहण्याची कला.

**जलतरणिका** स्त्री. पोहण्याचा तलाव.

**जलतरंग** पु. १. पाण्याची लाट, लहर. २. एक वाद्य; चिनीमातीच्या पेल्यांत पाणी घालून दोन बारीक छड्यांच्या साहाय्याने वाजवले जाणारे वाद्य. [सं.]

**जलतस्कर** पु. चाचा; समुद्रावरील लुटारू. [सं.]

**जलताडन** न. (पाण्यास कितीही मारले तरी ते दुभंग होत नाही यावरून).(ल.) निष्फळ श्रम, प्रयत्न : 'ही बाब जलताडणासारखी व्यर्थ होती.'–केसासं २.९३. [सं.]

**जलद, जलधर** पु. पाणी देणारा; मेघ; ढग: 'लाविति ते जलदा निज माना ।'–नदस्व १४. [सं.]

**जलद** क्रिवि. शीघ्र; लवकर; त्वरेने.

वि. १. चपळ; हुशार; झपाट्याने लिहिणारा. २. लवकर काम करणारे, गुण देणारे (औषध). ३. भडकणारा; लवकर उडणारा; ज्वालाग्राही (स्वभाव, बंदुकीची दारू). [अर.जल्द]

**जलदजालपटल** न. अभ्रपटल; आभाळ; ढगांनी व्याप्त आकाश.[सं.]

**जलदतिताला** (ताल) पहा : **तिलवाडा**

**जलदाई** स्त्री. चपळता; घाई.

**जलदी** स्त्री. त्वरा; घाई; गडबड; लगबग; चपलता : 'जलदीस आता किंमत आहे.' – मइसा १९.५२.

क्रिवि. त्वरेने; जलद. [फा.]

**जलदुर्भीति–ती** स्त्री. (मानस.) तलाव, जळातील वाहते पाणी, पाण्याचे झरे इ. विषयीची अतार्किक, असामान्य निरर्थक व स्थायी स्वरूपाची भीती वाटणे. दुर्भीती हा मानसविकृतीचा एक प्रकार आहे.

**जलदेवता** स्त्री. पाण्यातील देवता ; अप्सरा; आसरा. [सं.]

**जलद्वेष** पु. (जीव.) पिसाळलेले कुत्रे चावल्यामुळे वाटणारी पाण्याची भीती; शिसारी. [सं.]

**जलधर** पु. (भूशा.) ज्याच्यात पाणी साचून राहू शकते असा थर अथवा खडक.

**जलधर केदार** (संगीत) एक राग. गान समय रात्रीचा पहिला प्रहर.

**जलधि–धी, जलनिधि–धी** पु. पाण्याचा संचय; समुद्र. [सं.]

**जलधि–धी, जलनिधि–धी** पु. (अंकगणित) दहा शंकू. एकावर चौदा पूज्ये इतकी संख्या. [सं.]

**जलधौत संडास** पाणलोटाने स्वच्छ धुतला जाणारा शौचकूप; उद्धावनी, एकदम जोराने बाहेर येणाऱ्या पाण्याने धुतला जाणारा संडास.

**जलनाडी** स्त्री. जमिनीच्या पोटातून जाणारी पाण्याची शीर; पृथ्वीच्या पोटातील पाण्याचा मार्ग.

**जलनिष्कासन** न. (स्था.) पाणी बाहेर काढून टाकण्याची क्रिया.

**जलनिस्सारण** न. गटारातून पाणी वाहून नेण्याची व्यवस्था.

**जलपाई** स्त्री. एक औषधी वनस्पती.

**जलपादचारी** वि. पाण्यातून पायांनी चालणारा एक पक्षिवर्ग. यांचे पाय लांब व उघडे असतात.

**जलपान** न. १. पाणी पिणे. २. फराळ. [हिं.] [सं.]

**जलप्फा** पु. त्रास. (व.)

**जलप्रदाय क्षेत्र** (शाव्य.) कालव्याखाली येणारे क्षेत्र; पाणी मिळणारी जमीन.

**जलप्रपात** पु. उंचावरून खाली पडणाऱ्या पाण्याचा स्रोत; धबधबा.

**जलप्रलय** पु. पूर्ण पृथ्वी पाण्याखाली बुडून जाणे; जगबूडी. [सं.]

**जलप्रलय सिद्धान्त** (भू.) एका मोठ्या जलप्रलयामुळे हजारो वर्षांपूर्वी पृथ्वीचा पृष्ठभाग पाण्याने थोड्या कालावधीसाठी व्यापलेला होता अशी कल्पना मांडणारी प्रणाली.

**जलप्रवाह** पु. १. पाण्याचा ओघ; गंगाप्रवाह. २. (थोर पुरुषांची रक्षा, अस्थी, देवाचे निर्माल्य इ.) नदीमध्ये सोडावयाची क्रिया.

**जलप्राय** वि. जलपूरित; पाण्याची समृद्धी असलेला (देश). [सं.]

**जलबुदबुद** पु. न. १.पाण्यावरचा बुडबुडा. २.(ल.) क्षणभंगुरता, क्षणिकत्व दाखविणारी गोष्ट. पहा : **पाण्यावरचा बुडबुडा**

**जलभी** स्त्री. पिसाळलेला कुत्रा चावल्यामुळे वाटणारी पाण्याची भीती.

**जलभूशास्त्र** न. (भूशा.) भूजलाचा संचय, आढळ, शोधपद्धती इत्यादीविषयक भूशास्त्र.

**जलभोगाधिकार** पु. पाणी वापरण्याबद्दलचा हक्क.

**जलमजुग** क्रिवि. मरेपर्यंत; जन्मभर.

**जलमज्जनी** स्त्री. (रसा.) जलकुंड; वस्तूंना उष्णता देण्यासाठी वापरले जाणारे गरम पाणी असलेले पात्र.

**जलमय** न. सर्वत्र पाणीच पाणी होणे; भोवताली पाण्यावाचून काहीच नाही अशी अवस्था. [सं.]

वि. १. जलपूर्ण. पहा : **जलप्राय**. (देश, जागा, फळ). २. पाण्याने

झालेले (बर्फ, गार). ३. पाण्यात बुडलेले (गाव, देश).

**जलमंदिर** न. नदी, सरोवर यांच्या पाण्यात बांधलेले घर (उन्हाळ्यासाठी); जलाशयातील क्रीडागृह; धारागृह. [सं.]

**जलमापकयंत्र, जलमापी** न. पाणी किती वाहते किंवा खर्च होते हे अजमावणारे यंत्र; पाणी मोजणारे मीटर : 'मोजके पाणी जावे म्हणून जलमापकयंत्र (मीटर्स) सर्वत्र लावलेली होती.'-भिव्यका ४४.

**जलमार्ग** पु. १. गलबते वगैरे जाण्याचा पाण्यामधील मार्ग. २. समुद्रावरील कर; आयातनिर्यात मालावरील पट्टी. याच्या विरुद्ध जकात, ही जमिनीवर असते. [सं.]

**जलमेंढा** पु. खालून वर पाणी नेण्याचे एक यंत्र. [सं. जलमेष]

**जलयंत्र** न. १. कारंजे : 'उठेत जेथें जलयंत्र धारा।' – सारुह ५.१७. २. रहाट, पाणचक्की, लाट इ. पाण्याची यंत्रे. ३. जलशक्तीने चालणारे यंत्र.

**जलयात्रा** स्त्री. जलप्रवास; (जलमार्गाने) परदेशगमन.

**जलयान** न. होडी, नाव, गलबत, तरांडे इ.; पाण्यातील प्रवासाचे वाहन.

**जलरक्तता** स्त्री. (वैद्यक.) रक्तामध्ये पाण्याचे प्रमाण जास्त होणे.

**जलरक्षित** वि. (विअ.) १. पाण्यापासून अपाय होऊ शकणार नाही असे. २. ज्यात पाणी शिरू शकत नाही असे.

**जलरंग** न. पाण्याचे माध्यम वापरलेला रंग : 'ते...जलरंगातील चित्र'– क्रेबु ४५.

**जलराज** पु. (शाप.) ज्यामध्ये सोने विरघळते असे अम्ल.

**जलरेषा** स्त्री. १. पाणी जिथपर्यंत पोचले ती पातळी दाखविणारी रेषा; पाणरेखा. २. जहाज पाण्यात असताना जिथपर्यंत बुडेल तो भाग दाखविणारी रेषा.

**जलरोध** पु. (विअ.) पाण्याचा त्यामधील हालचालीस होणारा विरोध; पाण्याचा त्यामधून वाहणाऱ्या विद्युत्प्रवाहास होणारा रोध.

**जलरोधक** वि. पाण्याचा प्रवेश रोखणारे; पाणी शिरू न देणारे.

**जलल** पु. उणीव; कमतरता : 'कोण्हेविषयीं त्यावरी जलल अथवा त्यांचा अपमान होऊ न द्यावा.' – आज्ञापत्र ८९. [अर.]

**जलवास** पु. काही काल बेंबीपर्यंत पाण्यात उभे राहण्याची तपश्चर्या (साधूची). [सं.]

**जलवासी, जलचर, जलीय** वि. (वन.) सदैव पाण्यात असणारे. उदा. शेवले, मासे इत्यादी.

**जलवाहिका** स्त्री. गलबत; नौका; नाव; होडी. [सं.]

**जलविद्या** स्त्री. (भूशा.) भूजलाविषयीचा तसेच पृथ्वीवरील पाण्याचे वहन, साठे इत्यादींचा अभ्यास. [सं.]

**जलविद्युत** स्त्री. (भौ.) पाण्याच्या शक्तीचा उपयोग करून निर्माण केलेली वीज : 'येथे जलविद्युत्‌निर्मितीचा एक जंगी कारखाना... उभारण्यात येत आहे.' –मई १७१. [सं.]

**जलविद्युतगृह** (स्था.) जेथे पाण्यापासून वीज निर्माण करण्यात येते ते ठिकाण, गृह. [सं.]

**जलविद्युतसंयंत्र** न. (विअ.) पाण्यातील स्थितिज आणि यांत्रिक ऊर्जा वापरून त्यायोगे जनित्र (चक्र) फिरवून वीजनिर्मिती करणारी यंत्रसामुग्री (संयंत्र). [सं.]

**जलविभाजक** पु. १. (स्था.) पुलाच्या खांबाचा प्रवाहाच्या बाजूचा त्रिकोणी भाग. २. (कृषि.) दोन नद्यांना, कालव्यांना विभागणारा बांध. दोन नद्यांच्या खोऱ्यांना विभागणारा उंचवट्याचा प्रदेश. [सं.]

**जलविज्ञान** न. पाण्याचे गुणधर्म व प्रयोग याविषयीचे शास्त्र : 'भारताने जलविज्ञान (हैड्रालिक्स) कालवे व पाटबंधारे ह्या बाबतीत फारच मोठी प्रगती केली असून'– भाख १९. [सं.]

**जलवेगभंजक** पु. (स्था.) पाण्याचा वेग मोडून काढणारा बंधारा. [सं.]

**जलव्यवस्थाकेंद्र न.** पाण्याचा साठा, शुद्धीकरण व वितरण करणारी यंत्रणा.

**जलव्याल** पु. पाणसाप.

**जलशाक** स्त्री. (ल.) मासे; पाणशेंगा: 'बंगाली बाबूस ताजी जलशाक व महाराष्ट्रीय ब्राह्मणांस लोणकढे तूप.' – टिकेले १.३७४. [सं.]

**जलशास** पु. वरुण; पाण्याची देवता : ' जलशास महाजलशालि'– नदस्व २३४. [सं.]

**जलशास्त्र** न. पृथ्वीच्या पोटातील पाण्याच्या प्रवाहाचे ज्ञान देणारे शास्त्र. [सं.]

**जलशास्त्री** पु. पाण्याचे गुणधर्म जाणणारा : ' झऱ्याचें पाणी... पूर्वीच्या जागी परत येत नाही असा अनुभव जलशास्त्री सांगतात.'– कावढा १७६.

**जलशैवाल** न. पाण्यावर, खडकावर येणारे शेवाळ : 'जीवाणूंच्या वरची पायरी जलशैवालांची (अल्गा) होय. (जलशैवाले नांवाप्रमाणेच बव्हंशी पाण्यात अगर अतिशय दमट जमिनीवर म्हणजेच चिखलावर व पाण्यानें कायम भिजणाऱ्या दगडांवर उगवतात.)'–वकाप ४.[सं.]

**जलशोधक** न. पाणी शुद्ध करणारे यंत्र अथवा पात्र. [सं.]

**जलशोष** पु. १.तहानेने घसा कोरडा होणे; रुक्षता; कोरड. २. दुष्काळ; अनावृष्टी; अवर्षण. [सं.]

**जलशोषक** वि. पाणी शोषून, ओढून घेणारे, हवेतील आर्द्रता दाखविणारे (यंत्र). [सं.]

**जलश्वासेंद्रियपुट** न. माशास श्वासोच्छ्‌वास करण्यास साहाय्य करणारी शरीरातील एक पिशवी; गळचुटी.

**जलसत्र** न. पाणपोई. पहा : **जळछत्र**

**जलसमाधि–धी** स्त्री. १. पाण्यात बुडून मरणे. २. संन्याशाने पाण्यात उतरून स्वत:स बुडवून घेणे; फक्त संन्याशानेच प्रयाग येथे जलसमाधी घ्यावी असा शास्त्रनिर्बंध आहे. [सं.]

**जलसंकल्प** पु. एखाद्या व्यक्तिबरोबर करार करणे किंवा काही वचन देणे यासाठी त्याच्या हातावर पाणी सोडून त्याचा उच्चार करणे.

**जलसंघनित्र** न. थंड पाण्याचा उपयोग करून बाष्परूपातील पदार्थांचे द्रवरूपात अथवा घनरूपात रूपांतर करण्याचे यंत्र. [सं.]

**जलसंचयक्षेत्र** न. जलग्रहणक्षेत्र; तलावामध्ये ज्या प्रदेशातील पाणी येते तो प्रदेश. [सं.]

**जलसंधारण** न. (कृषि.) पाणी साठवून धरणे; पाणी टिकविण्याच्या दृष्टीने संरक्षित करणे; पाण्याची साठवण करणे. [सं.]

**जलसंपत्ति–त्ती** स्त्री. पाण्याचे सर्व साधनस्रोत मिळून उपलब्ध होणारा पाण्याचा साठा. [सं.]

**जलसंवर्धन** न. पाण्यावर शुद्धतेची क्रिया करणे; पाण्यातील पोषक गुण

वाढविणे. [सं.]

**जलसा** पहा : **जल्सा** : 'निवृत्त झाल्यापासून भजने, जलसे आणि फुटकळ कामे करून.' – व्यक्तिरेखा १२१. [अर.]

**जलसिंचन** न. पिकांना पाटाद्वारे पाणी देणे. [सं.]

**जलसिंचनक्षेत्र** (कृषि.) पावसाच्या पाण्याखेरीज इतर मार्गांनी भिजणाऱ्या जमिनीचा प्रदेश.

**जलसेतु–तू** पु. (स्था.) एखाद्या नदीवरून किंवा दरीवरून पाण्याचा नळ नेण्यासाठी बांधलेला पूल.

**जलसेबाज** वि. छानछुकीत, गाण्याबजावण्यात रमणारा : 'आपण उथळ, थिल्लर, जलसेबाज आहोत असे भासवण्याचा' – दिअहो ८३

**जलस्तंभ** पु. पाण्यावरून जाणाऱ्या चक्री वादळामुळे पाण्याचा पृष्ठभाग व आभाळ यामध्ये उभा राहणारा पाणी व तुषारांचा खांब.

**जलस्थलचर** न. जमीन व पाणी या दोन्ही ठिकाणी राहणारे प्राणी. [सं.]

**जलस्थलवासी, जलस्थलीय** वि. (वन.) पाण्यात व जमिनीवर जगणारे (जीव). उदा. दलदलीत वाढणारी वनस्पती; कमळ, पाणकणीस. वनस्पतींच्या बाबतीत मॉस, लिव्हरवर्ट व काही नेचे जातींना उभयचर ही संज्ञा वापरतात. [सं.]

**जलस्थितिशास्त्र, जलस्थैतिकी** न. पाण्यामध्ये पदार्थ स्थिर राहण्यासंबंधीचे नियम व गुणधर्म सांगणारे शास्त्र; पाण्याच्या दाबासंबंधीचे व शक्तीसंबंधीचे शास्त्र. 'जलस्थैतिकीमधील पहिला नियम आर्किमिडीजला सापडला होता.' – कहीग ३६.

**जलाघात** पु. (भौ.) पाणघण; जलघप्प; नळातील पाणी एकदम वाहण्याचे बंद झाल्याने होणारा मोठा आवाज.

**जलाजल** पु. घोड्याच्या वक्ष:स्थलावर बांधण्यात येणारा घुंगुरांचा गुच्छ किंवा माळ.

**जलाद** पु. फाशी देणारा मांग.

वि. (ल.) कठोर; जुलमी: 'अम्मलदार हमदानी जलाद' – ऐटि ५१०. [अर.जल्लाद]

**जलादत** स्त्री. मोठेपणा; श्रेष्ठता; सामर्थ्य; चापल्य. [अर.]

**जलाधिकार** पु. उघड्या समुद्रावर, किनाऱ्यापासून विशिष्ट मर्यादेपर्यंत असलेला त्या देशाचा मालकी हक्क. [सं.]

**जलाधिवासन** न. १. एखाद्या देवतेच्या मूर्तीची मंदिरात कायमची स्थापना करण्यापूर्वी एक रात्रभर ती मूर्ती पाण्यात ठेवण्याचा विधी. २. (सामा.) मूर्तीची मिरवणूक काढण्याच्या पूर्वरात्री वरीलप्रमाणे करावयाची क्रिया. [सं.]

**जलानुवर्तित्व** न.(वानस.) पाण्याच्या चेतनाने होणारी वनस्पतीच्या अवयवांची हालचाल. [सं.]

**जलाबंब** वि. पाण्याने भरपूर, तुडुंब. (ना.)

**जलाभेद्य** वि.(विअ.) ज्यात पाणी प्रवेश करू शकणार नाही असे. [सं.]

**जलाल** पु. मान. [अर.]

**जला(ले)ल** वि. १.तीक्ष्ण; तिखट. २. उग्र; तापट; कडक; जालीम (स्वभाव). ३. रखरखीत; जाज्वल्य; तीव्र (आग, उष्णता). ४. झोंबणारी, कापविणारी (थंडी). ५. तीव्र; जहाल ; जळत जाणारे (औषध, विष.). ६. तीक्ष्ण धारेचे (शस्त्र). ७.भेदक. [अर.जलाल]

**जलाल** पु. जुलूम; जबरदस्ती. पहा : **जलेल** : 'रयतेवर जलाल होऊन रयत पीडा पावते.' – मराआ २४.

**जलाली** स्त्री. उग्रपणा.

**जला–वतन** न. हद्दपारी; वतनापासून दूर करणे; वतन काढून घेणे. (क्रि.करणे.) : 'हांडे याचे पारपत्य जला–वतन करणे.' – सनदा ७०. [अर.]

**जलावतरण** न. (शाव्य.) नवीन बांधलेली बोट प्रथमत: समुद्रात हाकारणे; पाण्यात सोडणे. [सं.]

**जलावना** क्रि.घसरण होणे. (झाडी)

**जलावला** वि. घसरण झालेला. (झाडी)

**जलाशय** पु. पाण्याचा साठा, स्थान (समुद्र, तळी, डबके, तलाव इ.): 'शेल कक्षांची कुहरे । जलाशय परिसरे ।' –ज्ञा १३.६१२ [सं.]

**जलांज(जु)ली** स्त्री. मृताच्या दहाव्या दिवशी अश्म्यावर मृताच्या नावाने तिळमिश्रित पाणी सोडणे; तिलांजली देणे, सोडणे.(क्रि.सोडणे, देणे.) : 'देऊनि जलांजली स्वप्रियसुत बंधूंसि म्हणुनि हा रडत। ' – मोसमा ७.७२. [सं.जल + अंजली]

**जलांतर** वि. पाण्याखालून जाणारी : 'त्याला अपवाद फक्त जलांतर नौकांचा तेवढा म्हणता येईल.' – सैस्वा ३९.

**जलांश** पु. (स्था.) ओल्या मातीत असलेला पाण्याचा अंश.

**जलांशहीनता** स्त्री. शरीरातील पाण्याचा अंश कमी होणे; शरीरातील पेशीजालांमध्ये द्रवाची कमतरता होणे.

**जलीत** न. भुर्दंड. पहा : **जळीत**

**जलीय** वि. १.पाण्यासंबंधी, पाणीविषयक. २. (वन.) पाणी असलेले; पाण्यात केलेले (विद्रव, द्रावण).

**जलीय तरंग–चिन्हे** (भू.) जलाशयांच्या आणि सागराच्या किनारी वाळूवर लाटांच्या आणि जलप्रवाहाच्या परिणामामुळे निर्माण होणाऱ्या तरंगाकृती.

**जलील** वि. १. प्रकाशमान. २. वैभवसंपन्न : 'नबाबाची दौलत बहुत जलील झालियास आणखी जल देणे अथवा रोनक आणणे हा यख्तियार तुम्हाकडे आहे.' –मइसा ५.७६. [अर.]

**जलू(लौ)का** स्त्री. जळू. [सं.जलोका]

**जलूशी** वि. राज्यारोहणापासून मोजण्यात आलेला (सन). [अर.जुलूसी]

**जलूस–ष–श** पु. १. सिंहासनारूढ होणे ; राज्य करणे. २. वर्चस्व, हितसंबंध. ३. समारंभ : 'मोठा जलूस जाहला' – ऐटि १.६५. ४. कीर्ती; प्रख्याती : 'माधवरावसाहेब यांचे जरबेचा जलूश मोठा.' – होकै ४२. [अर.जुलूस]

**जलेल–ली** स्त्री. जुलूम, अन्याय. [अर.जलाला]

**जलेहखाना** पु. समारंभाचे स्थान. पहा : **जिलौखाना**

**जलॅक** न. कोट. (गो.)

**जलोढ, जलौढीय** वि. प्रवाहाबरोबर वाहत आलेला गाळ साठून तयार झालेली (जमीन).

**जलोढ त्रिभुज** (भूशा.) वाहून आलेला गाळ नाले उपनदी यांचा मुख्य नदीशी जो संगम होतो त्या ठिकाणी साचल्याने होणारा त्रिकोणाकृती

पंख्यासारखा भराव.

**जलोढन** न. (भूशा.) निरुंद आणि जास्त उताराच्या दरीतून मोकळ्या मैदानी क्षेत्रात येणाऱ्या नदीमुळे, तसेच उपनदी मुख्य नदीस मिळते त्या जागी उपनदीचा वेग कमी झाल्यामुळे साचलेला गाळ.

**जलोढ मृदा** (कृषि.) पुरामुळे खळमळ साठून तयार झालेली जमीन; नदीच्या गाळाची माती.

**जलोत्सर्गक** न. पाणढोसळी; फ्लशिंग पॉट.

**जलोत्सारण** न. गाळ, रेंदा इत्यादींनी भरलेले घाण पाणी वाहून जाणे; मोऱ्या किंवा गटारे यांतून पाणी वाहून जाणे. [सं.]

**जलोदर** पु. पोटात पाणी साठल्यामुळे होणारा रोग : 'अदूरदर्शी मनुष्याने वरुणाच्या या न्यायनिष्ठेचा अनादर केला, तर वरुण त्याला जलोदरानें पीडित करतो.'–जीली २९९.

**जलोद्धरण उपयंत्र** पाणी उपसण्याची साधनसामग्री.

**जलोद्यान** न. जमिनीऐवजी पाण्यावर वाढणारी बाग.

**जलोपचार** पु. वेगळ्या पद्धतीने पाण्याचा उपयोग करून रुग्णांवर उपचार करण्याची पद्धत.

**जल्प, जल्पना** पु. स्त्री. बडबड; वल्गना; बरळणे; मूर्खपणाच्या गप्पा; बढाईचे, प्रौढीचे भाषण: 'मातला हस्ती क्षोभला सर्पु । भ्रष्टला ब्राह्मण पेटला द्वीपु । अमर्याद स्त्रियांचा जल्पु । आवरू न शके विधाता ।'– मुआदि १६.१६९. [सं.]

**जल्पक** वि. बडबड्या; निंदक : 'आतित्याई जल्पक ।'– दास २.३.२६.

**जल्पणे** अक्रि. १. प्रौढी सांगणे; गर्व वाहणे. २. बडबडणे; पोकळ बढाया मारणे.
सक्रि. बोलणे; उच्चार करणे. [सं.जल्प]

**जल्पनोन्माद** पु. (मानस.) आत्यंतिक, अनावर किंवा असंबद्ध बडबड. हे वर्तन सातत्याने आढळल्यास गंभीर मनोविकृतीचे लक्षण ठरते.

**जल्पवाद** पु. बडबड; जल्पना : 'अहं ममतेचिया जल्पवादी ।' – ज्ञा ७.०६.

**जल्मा** पु. शेतातील देवकृत्ये करणारा माणूस.(गो.)

**जल्याकाटवा** पु. एक अंगठ्याएवढा मासा. (झाडी)

**जल्ल** वि. मोठा; श्रेष्ठ. [अर.]

**जल्लोश** पु. गोंधळ; आरडाओरड; आनंदोत्सव : 'मंडळी जल्लोश करायला लागली. शिट्या काय नि आरडाओरडा काय !' – पडघ २२७.

**जल्लॉ** पु. झुरळ.(गो.)

**जल्सा** पु. १. संमेलन. २. गाण्या बजावण्याची मैफल. ३. तमाशा.

**जव** पु. १. यव, सातू. हे झाड दोन तीन फूट उंच वाढते; जवाच्या भाकरी करतात व जनावरांना चंदी म्हणून घालतात. धार्मिक विधीत याचा उपयोग करतात. २. या धान्याच्या लांबीचे माप; एक लांबी मोजण्याचे माप (सहा मोहऱ्यां इतके). ३. अंगठ्याच्या दुसऱ्या पेऱ्यावरील यवाकृती रेषा. ४. कंकणात, माळेत घालण्याचा जवाच्या आकाराचा सोन्याचा मणी. पहा: **जवा** [सं.यव]

**जव** पु. बायकांच्या हातातील एक प्रकारचे काकण. [सं.यव]

**जव** पु. वेग; गती : 'आज्ञा घेऊनी दारूकात्मज हय प्रेरी जवें आगळे ।'– मोकृष्ण ७७.१. [सं.]

**जव आगळी** गहूभर अधिक, थोडासा जास्त.

**जवईक** क्रिवि. जवळ, जवळीक : 'पंढरपुरामंदी वास सुटला केवईक । महाद्वार ओलांडुनी जाले राऊळा जवईक ।।'– लोसाको.

**जवकणे** पहा : **जवणे**

**जवका** स्त्री. शिंग; शृंग; ऱ्हस्वांग; जीवक. [सं.]

**जवखार** पु. जवाचा पेंढा जाळून केलेला खार; औषधी खार; सोरा : 'कमरखमधून जवखार देण्याने'– फची ५२.

**जवखेळ** वि. एकत्र केलेले; गोळा, जमा केलेले.

**जवजव** क्रिवि. जो जो.

**जवजाळ** पु. त्रास; यातायात; जंजाळ; संसारपाश: 'घडंना तुझी सेवा गुंतले जवजाळा.'–जलोसा २००.

**जवजे** स्त्री. बायको; पत्नी. पहा : **कोम.** कागदपत्रामध्ये नवऱ्याच्या नावाच्या मागे हा शब्द लावतात. जसे :– मधुबाई जवजे कृष्णा. [अर.जोजा]

**जवट** पु. १. जोड; जोडी : 'तेयांचेया खांदावरि हातु घालुनि : हातीं सुणे यांचा जवटु' – लीचपू २०१. २. समूह : 'ऐसा रणसमुद्र डहुळला : तारुवाचा जवटु पूरिला' – रुस्व २२६६. ३. जोर : 'घेऊनि कनकाचे धोटे : सिंपती एके जवटे' – शिव ६६८.

**जवटणे** अक्रि. जवळ करणे. पहा : **जवकणे** : 'तृष्णेतें निवटी क्षमेस जवटी गर्यादिकांते पिटी ।'–नीश.

**जवटु** न. १. वजनदार घोस; झुबका. २.जोडपे; जुळे : 'कानी कुंडलांचा जवटु'– एरुस्व २२.

**जवणे, जवकणे, जवखारणे** १. एकत्र जोडणे, एकमेकांत गच्च बसविणे; सांधणे. २. एकत्र गोळा करणे. ३. घट्ट, गच्च बांधणे. ४. बांधणे; जखडणे (खुंट्याला पशू). ५. गाठ घालणे, बांधणे. [सं.युज्]

**जवत** वि. १. जास्त; जादा. २. व्यर्थ. (कुलाबा, को.)

**जवन** वि. वेगवान : 'धृतराष्ट्रार्थ वराया गांधारी तें नदीसुतें जवन । त्या गांधारपतिकडे पाठविला दूतवर जसा पवन ।'– मोआदि १४.८९.

**जवनिक** स्त्री. सट्टकातील एक अंक.

**जवनि(नी)क–का** स्त्री. १. पडदा; कनात: 'तंव महाभूतांची जवनिक फिटे।' –ज्ञा ६.१०६. २.वस्त्र ; आडपडदा: 'फेडुनी जन्माची जवनीक।' – उगी ६०४. ३. नाटकाचा पडदा. [सं.यवनिका]

**जवपर्यंत** क्रिवि. जोपर्यंत : 'जवपर्यंत सुखदुःख, मी – तू हे विचार तुमच्या मनांतून गेले नाहींत तवपर्यंत व्यवहारामध्ये असले वेदांत व्यर्थ आहेत.'– मोचन ९१.

**जवमाळ** स्त्री. अंगठ्यावरील यवाकृती रेषा. सामुद्रिक ही पाहतात : 'जवमाळ करी झळाळ. '–मला १६४.

**जवरक, जव्हरलोक** उअ. जेव्हा; जोपर्यंत. (व.)

**जवरा** पु. १. स्मशानातील पिशाच्च; काळ; मृत्यू; यम. २.गोमाजी; मसणा; कुत्रा इ. ज्याचा काही संबंध नाही अशा कल्पित व्यक्तीचा बोध करण्याकरिता योजितात. काही एक कार्य मनात नसता कोणीसुद्धा करणार नाही या अर्थी याचा उपयोग करतात.

**जवरी** क्रिवि. जोपर्यंत : 'जवरी मायबाप तवरी येनंजानं ।भाऊ भावजया

राजी जुनं मोडून नवं ठानं ।।'- लोसाको.

**जवलसाटा** क्रिवि. जवळपास; पंचक्रोशीत; अवतीभोवती : 'सुतारकामाच्या बाबतीत तुमचा हात धर्नारा जवलसाट्यात दुसरा कोन हाय.'-अउआ ६०.

**जवशी–स** अळशी; एक तृण धान्य. याचे तेल काढतात, गळू वगैरेवर बांधण्यासाठी पोटीस करतात, चटणी करतात. तेलाचा उपयोग वऱ्हाडात स्वयंपाकात करतात. याच्या वाख्याच्या तंतूचा केलेला कपडा मौल्यवान व टिकाऊ असतो. [सं.अतसी]

**जवळ** अ. १.सन्निध; निकट; पाशी (स्थलवाचक, कालवाचक, गोष्टी, पदार्थांचे, मनुष्याचे सादृश्य किंवा नात्याचे निकटवर्तित्व दाखविण्यासाठी व्यापकपणे हा शब्द योजितात). २. बरोबर; स्वाधीन; ताब्यात. ३. स, ला, ते या विभक्तिप्रत्ययाऐवजी योजतात. उदा. 'त्याजवळ दे', 'त्याजवळ सांग.' इत्यादी.

वि. १. नजीकचा; निकटचा. २. नात्याचा; आप्त. [सं.युत] (वा.) **० करणे** – १. घरातल्या माणसांत सामील करणे; विश्वासात घेणे; सांभाळ करणे ; काळजी घेणे : 'पुरुषोत्तमरावांना राघोबादादांनी जवळ केले.'- इंप ९. २. एखादी वस्तू निकट आणणे, सन्निध आणणे. **० उभा करणे** – आपल्या समोर येऊ, राहू देणे; जवळ करणे; संबंध ठेवणे (नकारार्थी प्रयोग). **० घेऊन** – जवळ आणून ; प्रीतीने ; दयेने; ममतेने. **० जाणे** – १. समीप जाणे. २. संभोग करणे ; गमन करणे; उपभोगणे. **० धरणे** – आपल्या चाकरामध्ये गणना करणे. पहा : **० करणे**

**जवळ** वि. जुळे. [सं.युगल]

**जवळ** १. वादळ. २. वादळी ढग; मेघजाल; अभ्र. (को.) [हिं. जौलान]

**जवळ** पु. दक्षिण कोकणातील ब्राह्मणांतील एक पोटजात व तींमधील व्यक्ती. यांना खोत असेही म्हणतात. हे जवळात म्हणजे वादळात किंवा भटकत आले म्हणून ही संज्ञा मिळाली असे म्हणतात.

**जवळचा–ला, जवळील** वि. निकटसंबंधी; निकटवर्ती (जागा, वेळ, नाते या अनुरोधाने).

**जवळजवळ** क्रिवि. १. बहुतेक; बहुतांशी. २. शेजारीशेजारी; खेटून.

**जवळ नाते** न. १. जवळचा नात्याचा संबंध; आप्तपणा. २. निकट संबंध; संलग्नता.

**जवळपास** क्रिवि. पहा : **जवळ जवळ**

**जवळस(सा)र** क्रिवि. शेजारी; जवळपास.

**जवळिके** क्रिवि. जवळ; सन्निध : 'ऐसे बोलोनि सुरासुरगण पाचारिले जवळिके ।' - मुआदि ४.१५६.

**जवळी** पहा : **जवळीक**

**जवळी** वि. १. वादळाला योग्य; वादळातून पार पडण्याजोगे; जवळातून चालायाजोगी (मोठी गलबते). २. वादळाचा (वारा). [हिं.जौलान]

**जवळी** स्त्री. लग्नानंतर प्रथम द्यावयाची साडीचोळी; वस्त्रे.

**जवळी** स्त्री. कोणत्याही औतास द्यावयाचा जोड. (बे.)

**जवळी** स्त्री. शेतात पाणी खेळवण्यासाठी केलेला लहान पाट. (गो.)

**जवळी** स्त्री. लांबट सोन्याचा मणी. (गो.)

**जवळीक** स्त्री. १. सान्निध्य; निकटता; शेजार : 'बीज जळाची जवळीक लाहे ।' – ज्ञा ९.१०९. २. निकट संबंध; जवळची सोयरीक; दाट परिचय; घरोबा आप्तपणा. ३. सलगी; मैत्री.

वि. १. जवळ असणारे; जवळचे : 'जे श्रीकृष्णाचीआं जवळिकां ।'- वच्छह १२२. २. अनुचर; सेवक.

**जवळीक** स्त्री. सिद्धी; लाभ : 'परी पुत्रप्राप्तीची जवळीक । न लाभेचि तेणे ऐश्वर्य सुख । परम दुःख त्या वाटे ।' – मुसभा ६.९.

**जवळीका** स्त्री. सान्निध्य; निकटता; शेजार : 'चंदनाचिया जवळीका आरी : बोरी : टाकळी'–दृपा १४.

पु. सेवक : 'मग दोघी संप्रधारु केला: जवळिकासि' - रुस्व ३७५.

**जवळून** क्रिवि. १. पासून (गती दाखवून). २. शेजारून; बाजूने. ३. च्यापासून घेऊन, काढून. ४. कडून; मार्फत. ५. पैकी; आतून; आसमंतातून; सान्निध्यामुळे.

**जवंजार–ळ** पु. त्रास ; यातायात. पहा: **जंजाळ**

**जवा** पु. १. स्त्रियांच्या हातांतील एक प्रकारचे सोन्याचे काकण; यात जवाच्या आकाराच्या कळ्या बसविलेल्या असतात. २. त्या काकणातील एक जवाची कळी, दाणा, अवयव. [सं.यव]

**जवा** पु. १. जोड; सांधा; कळाशी (दोन लाकडांच्या तुकड्यांचा). (क्रि. बसणे, मिळणे.) २. (ल.) मिलाफ ; मेळ (माणसांचा) : 'कसा ब्रह्मदेव प्रारंभीं चुकला जवा। मुळीं संग न करतां जगीं जाहला गवगवा।'–प्रला २००. ३. रचनेची जोड; जम; जुळणी; बस. ४. ताळा ; मेळ; संगती (हिशेब, अजमास, युक्ती यांची). [सं.यम् = जमणे]

**जवा** पु. सरोद वगैरे वाद्ये वाजविण्याची इंचभर लांबीची हस्तिदंती काडी.

**जवा आगळा** जवभर जास्त; थोडासा जास्त.

**जवाद** वि. मोठे; जादा; जास्त; अधिक (संख्या, प्रमाण, विस्तृतता यांत). [अर.जियादा]

**जवादी** स्त्री. न. कस्तुरी मांजराचे अंड ; अंडातील कस्तुरी : 'अंगी जवादी चर्चिली ।'- वसागा ३. (को.) [अर.जवाद]

**जवादीपेर** न.लिहिण्याचा काळा बोरू (जवादी मांजराच्या रंगावरून).

**जवादी मांजर, बिडाळ, बिडाळक** न.पु. गंधमार्जार, ज्याच्या अंडास सुवास येत असतो असे एक मांजर; कस्तुरी मार्जार : 'जवादी बिडाळाचें वृषण । मस्तकीं खोविती श्रीमंतजन । रासभाचे लंबायमान (कर्ण) । कोणी हातें नातळे ।' – मुसभा ५.६०.

**जवादे** न. घोरपड.(कु.) [अर.जवाद]

**जवाद्या** पु. वलवी नावाचे जनावर. पहा : **जवादी**

**जवान** पु. १. ज्वानीतील तरुण; युवक. २. पुरुष व्यक्ती (म्हातारपणापर्यंत); तरणाताठा माणूस. ३. शिपाई गडी : 'तेथे ... सेनादलातले जवान नि अधिकारी गेलेले नव्हते.' – मालआ १३. ४. सोबती; मित्र. (खा.)

वि. तरुण; तरणा बांड. [सं.युवन्; फा. जवान]

**जवानकट्टा–पठ्ठा, जवानजमान** पु. धट्टाकट्टा; तरुण; तरणाबांड; तगडा.

**जवानमर्द, जवामर्द** १. तरुण आणि शूर; धाडसी; साहसी. २. जवानकट्टा; चलाख. [फा.]

**जवानमर्दी, जवाँमर्दी** स्त्री. १. शौर्य; पराक्रम; धाडस. २. शौर्याची कृत्ये : 'कांहीं किल्ले ठाणे पादशाहींत गेलीं तीं जवामर्दीनें घेतलीं.'- चिथोशा ७४३. ३. औदार्य; दिलदारी.

**जवानिल** पु. झंझावात; वादळ.

**जवानी** स्त्री. १.तारुण्य; तारुण्यावस्था. २. तारुण्यातील जोम. [फा.]

**जवाबी** वि. ज्याला उत्तराची गरज आहे असा; ज्यापासून किंवा ज्याच्या उत्तराची जरूर असते असा. (समासात) जवाबी पत्र. [फा.]

**जवाय** पु. (आदि.) जावई : 'जवाय आहे किऱ्यानष्ट शिवी देतो आईवर ।।' -लोसाको. [सं.जामात]

**जवार** न. १. पहा : **जवाहीर.** (गो.) २. जवाहिऱ्याचा धंदा : 'जवार कैसे तरी फिटेना ।' - दास १९.७.२०. [अर.जोहर]

**जवार-रा** पु. जावळ.(झाडी)

**जवार-री** स्त्री. एक धान्य; जोंधळा; ज्वारी. [सं.यव + नाल]

**जवा(व्हा)र-री** न. स्त्री. १. मोठ्या शहराशेजारची खेडी. २. लहान पेठ. [अर.जुवार]

**जवारी** वि. बैलाची एक जात. ही जात तुलनेने धीमी, मंद असते; देशी : 'येनाळाचं कामच असं होतं - जवारी बैलागत'.-टारफुला ४०.

**जवारीचा, जवारी** वि. गावरानी; खेड्यात उत्पन्न, तयार झालेले (तूप, वस्त्र इ.).

**जवारीदार** वि. (संगीत) स्वरांचे गुंजन ठेवून झारदार रीतीने घेतलेली (तान).

**जवाऱ्या** वि. जुळा. (झाडी)

**जवाली** स्त्री. बैलाचे जोत; जुपणी; जू बांधण्याचा पट्टा. पहा: **जुवाली**

**जवाशी-सा-सी** स्त्री. एक वनस्पती; तांबडा धमासा. [सं.यवास्]

**जवासा** पु. जवादी मांजराचे अंड.

**जवाह(ही)र** न. १. रत्न; मौल्यवान मणी. २. रत्नांचे दागिने : 'तेथे जवाहीर घेऊन जाऊन.'- स्फुगो. ३. भारी, रत्नजडित मुठीची उत्तम कारागिरीची तरवार. [अर.]

**जवाह(हि)री** पु. जवाहिराचा व्यापारी, जव्हेरी; जोहरी; रत्नपारखी. वि. रत्नासंबंधी.

**जवाळी** स्त्री. माळ; हार; खारका, बदाम वगैरेंचा हार : 'नवरीचे गळ्यांत जवाळी मुचीची (चांभाराची)केलेली न घालावी.' - पेकाम ४०२.

**जवी** वि. जलद; चपळ; वेगवान. [सं.जव]

**जवेची माळ** लांबट जवाच्या आकाराच्या कळ्या बसवलेली सोन्याची माळ : 'गळ्यांत टिका...जवेची माळ...'- गेतेदि २८.

**जव्हय** क्रिवि. जेव्हा. (खा.)

**जव्हर** न. विशेष गुण. [अर.]

**जव्ह(व्हा-व्हे)र-री** पहा : **जवाहीर, जवाहिरी**

**जव्हारदार** वि. (मूळ संगीतात सुरेल या अर्थी) उत्कृष्ट; सुंदर : 'बोगनविलाची निळी जव्हारदार आभा.'- अयेवाफु ४.

**जव्हारी** स्त्री. १. तंबोऱ्याच्या तारांचा ध्वनी गोड निघावा म्हणून घोडीवर ज्या ठिकाणी तारा टेकतात त्या खाली थोडा कापूस अथवा सूत घालून तारेचा ध्वनी खुलविण्याची जागा. २. सतारीची तार घोडीवर ज्या ठिकाणी टेकते ती जागा. [हिं.जुवारी]

**जव्हारी** स्त्री. खेड्यापाड्यातले लोक; गावरानी; खेडूत; शहराजवळची लहान लहान गावे : 'पंढरीचा विठू नाही कुणाच्या देव्हारी । त्याच्या दर्शनाला सारी लुटली जव्हारी ।' - लोसाको.

**जव्हारीदार** वि. सुरेल; सुंदर; सुस्वर : 'त्यांचा स्वर... भरदार, भारदस्त व जव्हारीदार बनला होता.' - थोसं १७५.

**जव्हेर** न. तरवारीवर चढविलेले विष; जहर.

**जव्हेरी** पु. सराफ; रत्नपारखी : '... त्यांच्याकडे चांदणी चौकातील गंजिफाशौकीन जव्हेऱ्यांची मुलें येऊं लागली...'- गालिब १७.

**जशद** न. (शाप.) एक खनिज धातू; जस्त. [सं.यशद]

**जशदगंधकिद** न. जशद व गंधक यांच्या संयोगापासून बनलेला खनिज पदार्थ.

**जशन** पु. समारंभ; उत्सव. [फा.जश्न]

**जशा(शे-सा)चा** तसा जसा तो होता तसाच; अगदी तोच; जसा विशिष्ट वेळी होता तसाच; मुळीच फरक न झालेला; न बदललेला; जसा एक तसा दुसरा; सारख्याला सारखा; तोडीस तोड.

**जस** न. यश; जय; उत्कर्ष. (कुण.) [सं.यश]

**जसन** न. विनोद; मनोरंजक गोष्टी. [फा. जश्न]

**जसला** वि. ज्या प्रकारचा, आकाराचा, तऱ्हेचा. तसला - याच्या पूर्वी हा शब्द जोडतात.

**जसा** वि. ज्यासारखा, ज्या प्रकारचा, चालीचा.

क्रिवि. १. ज्याप्रमाणे; ज्या मानाने. २. जो, ज्या वेळी. ३. जेव्हा: 'दिव्य श्रीमंडित तो राम जसा दंडका वना गेला । पुजुनि मुनि म्हणती तुज्या पदें विसावा दिलाचि गंगेला ।'-मोमंरा [सं.यादृश]

**जसातसा, जसे तसे करून, जैसे तैसेपरी** क्रिवि. १. कसेतरी; कोणत्या तरी (भल्याबुऱ्या) साधनांनी. २. काही तरी (क्रियेची हयगय, अनिश्चय, शैथिल्य दर्शविण्याकडे उपयोग) ३. मोठ्या कष्टाने, श्रमाने (दीर्घ प्रयत्न, प्रयास दर्शविताना).

**ज(जै)से** क्रिवि. ज्याप्रकारे; ज्याप्रमाणे.

**जस्टिफाय** सक्रि. १. मजकुराची एक ओळ जुळवून झाली म्हणजे स्टिकेच्या रुंदीप्रमाणे ओळीची लांबी धरून प्रत्येक शब्दात सारखे अंतर पडण्यासाठी कमी जास्त स्पेस घालून ओळ सारखी करणे. २. एकाच ओळीत वेगवेगळ्या जाडीचे टाईप असल्यास सर्वांत जाड टाईप असेल त्या बरोबर सर्व टाईपांची जाडी (लहान टाईपास भर देऊन) सारखी करणे. [इं.]

**जस्त** न. (रसा.) आणव क्रमांक ३०, आणव भार ६५.३८ असलेले धातुरूप मूलद्रव्य ; एक हलका धातू. [सं.यशद]

**जस्तफूल** न. जस्त तापून फुगले म्हणजे होणारा पांढरा पदार्थ.

**जस्त सफेदा** शुभ्र पांढऱ्या रंगाची, मुख्यत्वे जस्ताचे ऑक्साइड असलेली भुकटी.

**जस्तीबीड** जस्त वितळवून लोखंडाचे कढईत ओतल्यानंतर व निवल्यानंतर तांब्याच्या तपेलीने खलले असता होणारा वाळूसारखा चूर.

**जहत्स्वार्थ लक्षण-णा** पहा : **जहल्लक्षण**

**जहत्स्वार्थवृत्ति-त्ती** स्त्री. सामासिक शब्दांचा एक वर्ग. ह्यात

शब्दांचा मूळचा धात्वर्थ सोडून लाक्षणिक अर्थ घेतला जातो. उदा. देवानां प्रिय = अशोक. [सं.]

**जहदजहल्लक्षण-णा** स्त्री. न. जिच्या शब्दार्थाचा काही भाग ग्राह्य असतो व काही भाग त्याज्य असतो अशी व्याख्या किंवा वर्ग. जसे :- तो हा मनुष्य; अथवा काल जो मनुष्य आला होता तो हाच पुढे उभा आहे = तो मनुष्य हा आहे, तो पूर्वी गेलेला मनुष्य हा जवळ हजर आहे. ह्या ठिकाणी वर्तमानकाल व भूतकाल ह्यांच्या मधील भेदाचा विचार त्याज्य केला आहे (जहत्), परंतु दोन्ही काळी असणारा माणूस ग्राह्य धरला आहे (अजहत्). पहा : **जहल्लक्षणा, अजहल्लक्षणा** : 'उपाधि दोनी टाकणे । अधिष्ठान दोहींचे उखणे । हीस म्हणती शास्त्रनिपुण । जहदजहल्लक्षणा ।' - वानिगम ७.७९. [सं.]

**जह(हा)न** न. १. पृथ्वी. २. जन; लोक; मनुष्यजात. पहा : **जहान** [फा.]

**जहननशीन** वि. श्रुत; माहीत : 'मेहेरबानास जहननशीन व्हावी म्हणोन तपशिल कलमी केले असे.' - ऐलेसं ७.३५७४.[फा.जहन + नशीन]

**जहन्नम** पु. नरक : 'दुनिया गेली जहन्नमेमे !'- पुत्र ६०. [फा.]

**जहमत** स्त्री. श्रम; कष्ट; वेदना; दुःख.

वि. कष्टी : 'राजा जहमत जहाला आहे.' - सभाशिब ४२. [अर.]

**जहर** न. विख; गर; विष.

क्रिवि. विषाइतका कडू, अप्रिय. अतिशय कडू म्हणून सांगताना कडू शब्दाबरोबर योजितात. उदा. 'कुटकी कडूकडू जहर आहे.' [क.]

**जहरबंद** पु. एक रोग. याने जनावरांच्या पोटाखाली किंवा अंडावर फोड येतात.-अश्वप २.१५.

**जहर-री मोहरा** १. गर्द हिरव्या रंगाचा दगड. हा सापाचे विष उतरवतो असे समजतात. २. (ल.) जलाल, जहाल शिपाई.

**जहरी** वि. १. विषारी (प्राणी, वनस्पती, पदार्थ). २. (ल.) प्रतिपक्षास झोंबणारे : 'जहरी फर्डे इंग्रजी लिहिणारा' - व्यक्तिरेखा १६६.

**जहरी** बाल्हीक (पंजाब) देशातील घोडा. [अर.]

**जहरी कुचला** एक प्रकारची औषधी.

**जहरी नारळ** नारळाची एक जात. यांचे खोबरे कडू पण औषधोपयोगी असते.

**जहरी सोनटक्का** अलुमंदार नावाची वेल.

**जहल्लक्षण-णा** स्त्री. न. जिचा शब्दशः किंवा वास्तविक अर्थ न घेता केवळ लक्षणेने अर्थ लावावयाचा असतो अशी शब्दरचना. जसे :- पाण्यावर गाव म्हणजे पाण्याच्या काठावरचे गाव (पाण्याच्या सपाटीवर नव्हे), आपल्या पानावर बैस = पानाच्यावर नव्हे तर पानाजवळ : 'जहल्लक्षणा जे म्हणिजे । ते त्यागलक्षणा जाणिजे।' - गीतार्णव १३.२९१. [सं.जहत् +लक्षणा]

**जहा** स्त्री. नजर : 'नेत्रांची करडी जहा ।' - प्रला ११८.

**जहागिरदार, जहागि(गी)र-री** पहा: **जाहगीर, जाहगीरदार**

**जहाज** न. १. तारू; गलबत; जलयान. २. (ल.) अगडबंब, थलथलीत मनुष्य; आडमाप माणूस; धूड. [अर.] (वा.) ० **लागणे** - विहीर खोदीत असता तळाशी एक प्रकारचा कातळ लागणे. अशा तऱ्हेचा कातळ लागल्यास विपुल पाणी लागते.

**जहाजम** न. जाजम; सुताडा.

**जहाजा** (क्रि. करणे.) टोचून, लागट बोलणे. (व.)

**जहाती** क्रिवि. निमित्ताने; कारणाने : 'जहाती भंडारा.' - मइसा १५.१५३. [फा.जिहात]

**जहान** न. १. पृथ्वी; जगत् (माणसांनी वसलेले). २. मनुष्यजात; लोक; विश्व. ३. (ल.) थवा; जमाव.(क्रि. जमणे, लोटणे.) ४. फौज; सैन्य : 'तीन लाख मिळाली जहान पेशवेशाई ।' - ऐपो २३३.[फा.]

**जहामर्द** वि. शूर; धाडसी: 'पैगंबराचे जहामर्द शिष्य' - जोफुसग्रं २०१. [फा.जवामर्द]

**जहार** पहा : **जोहार**

**जहाल** वि. १. कडक; उग्र; तीक्ष्ण. २. तिखट; जळजळीत. ३. कजाग; तापट; रागीट; मवाळ नसणारा.[फा.] (वा.) ० **जाणे** - एखाद्यावर कावणे ; आग पाखडणे.

**ज(जा)हालत** स्त्री. पशुत्व; अज्ञान; मूर्खपणा: 'आता गुढी बलावली जाहालात न करावी.' - पेद ३८.९५. [अर.]

**जहाल(ली)म** वि. जालीम; निकराचा : 'याची त्याची सरमिसळ होऊन जहालीम तरवार चालिल्या.' - मदरु २.३. [फा. जालीम]

**जहालमतवादी** वि. १. राजकारणात कडवी व टोकाची मते असणारी; तडजोडीच्या, मध्यममार्गाच्या विरोधी असलेली व्यक्ती. २. (राज्य.) मुळापासूनच सुधारणेचा आग्रह धरणारा; मूलगामी परिवर्तन घडविण्याचे ध्येय असलेला.

**जहाल मानवतावाद** (राज्य.) मानवाला केंद्रीभूत मानून, मुळापासून विचार करणारे किंवा मुळापर्यंत पोचणारे तत्त्वज्ञान; मूलगामी परिणाम आणि परिवर्तन घडविण्याचे ध्येय मानणारा मानवतावादी विचार.

**जहाली** स्त्री. उग्रता, तापटपणा; भयंकरपणा; तिखटपणा. (मनुष्य, स्वभाव, मिर्ची, औषध यांचा.)

**जहां** स्त्री. जग. [फा.]

**जहांदारी** स्त्री. जगाचा प्रतिपाळ; पादशाही. [फा.]

**जहांदीद** वि. जग पाहिलेला, अनुभविक : 'उमदा सरदार व जहांदीद होते.' - मइसा २२.२५. [फा.]

**जहांपन्हा** पु. १. राजा. २. (सरकारी कागदपत्रांतून) एखादा मोठा अधिकारी. [फा.]

**जहांबाज** वि. १. पक्का; वस्ताद. २. शूर. ३. कैदाशीण; कृत्या : 'एक होती जहांबाज बाई.' - एहोरा ४१. [फा. जांबाज]

**जहांबाजी** स्त्री. जिवावर उदार होऊन केलेला पराक्रम; शौर्य : 'राघोपंत सुभेदारास धरावें, इतक्यांत त्याणें जहांबाजी करून किल्ल्यांत पळून गेले.'-ऐको ४२२. [फा. जांबाज]

**जहां(हा)मर्द-र्दी** पहा : **जवानमर्द, जवानमर्दी** : 'जहामर्द तरवारकरांचे।'-ऐपो २१८. 'जहामर्दी संसार दाविते करून तुम्हांला बघा।' - पला ८५.

**जहुर** पु. भरती; उधाण : 'चिखोल बहूत; जहुराचे पाणी बहुत येते.' - पेद १६.१४५. [अर.]

**जहूर** पु. प्रसिद्धी; जाहिरी : 'सरकारचे वचनाची कायमी कर्शी हें आइंदे

जहुरांत येईल.' - मइसा १०.१६६. [अर.जुहूर]

**जळ** न. १. पाणी; उदक. २. (ल.) इंग्रज. (जळचर = इंग्रज) : 'होळकराने जळाचा समग्र फडशा केला.' - ऐको ४२३. [सं. जल]

**जळ** स्त्री. १. (धातू, लोणी, मेण इ.) तापल्या - कढविल्या - वितळविल्यावेळी गेलेला भाग ; जळालेला, वाया गेलेला भाग; जळून, तापून, कमी झालेला भाग. २. भांड्याच्या बुडाची मस, करप.

पु. १. राग; संताप; रोष. २. आवेश (वाईट अर्थी); ताठरपणा; रग; दुराग्रह; जिद्द. ३. जळफळाट; अढी.

**जळ** स्त्री. पटईमधील दोन फळ्यांच्या सांध्यावरील तुकडा; रीप. पहा : **जंती**

**जळकट, जळका** वि. थोडासा जळलेला; होरपळलेला; करपलेला.

**जळका** पु. १.फार उष्णता; लाही ( शरीराची). २. जोराची खाज; कंडू. (क्रि. सुटणे, होणे.) ३. पित्तापासून घशात जळजळणे; खवखवणे; पोटात डाचणे; आग होणे. ४. (ल.) हेवा; मत्सर; जळफळाट; जळ. (क्रि. येणे.) (नाशिक)

**जळकी-गी** स्त्री. मासळी; खारवलेले मासे. (कु.कर.)

**जळके** भातशेतीस होणारा एक रोग. (राजा.)

वि. जळकट.

**जळगणे** अक्रि. १. (भात, नागली इ. पीक) उन्हाने किंवा इतर कारणाने करपणे. २. किंचित भाजणे, जळणे, करपणे.(को.)

**जळगार** स्त्री. गोठलेला जलबिंदू; गार: 'जळीं जळगार दिसे' - नागा ३२९.

**जळग्रह** पु. मेघ; ढग: 'येरू म्हणे तूं जळग्रहो । कमट होसी कपटिया ।।' - मुआदि ५.९६.

**जळघाणी** स्त्री. पाण्यात वस्त्र धुतल्याने आलेला मातकट रंग : 'मळघाणी फेडिजे जळघाणी लाविजे' ।। ७४ -सूपा २४.

**जळचेटूक** न. पाण्यातला स्तिमित करणारा खेळ (जादूसारखा) : 'सगळेच जण चेडोचं हे जळचेटूक पाहत होते.' - किरिस्तांव ९७.

**जळछत्र** न. पाणपोई.

**जळजळ** स्त्री. १. अंतर्दाह, वेदना (पित्ताने, तिखटाने); आग; खवखव (क्रि. सुटणे.) २. जुलूम; जबरदस्ती. ३.क्रोधयुक्त मत्सर; मनात जळणे; पोटात राग. (क्रि. सुटणे.) ४. प्रेमाची, मायेची आच; अतिशय प्रीती; कळकळ.

**जळजळणे** अक्रि. १. घशात किंवा पोटात दाह होणे (उन्ह, तिखट अन्नापासून किंवा पित्तापासून). (अकर्तृक प्रयोग) जसे - 'पोटात - उरात - घशात - जळजळते. २. (क.) (वर या शब्दाबरोबर प्रयोग) तडफडणे; रागाने जळणे; जळफळणे. ३. तापाने काहिली होणे.

**जळजळाट** पु. १. (जळजळचा अतिशय) कडक आग; उष्णता; पोळणे; भाजणे; दाह: अतिशय जळजळ (गळा, डोके, पोट, घसा या ठिकाणी). २. रागाचे कृत्य; उपद्रव; भयंकर जुलूम; अत्याचार (क्रि. करणे, मांडणे, चालविणे, बसविणे.). ३.निष्ठुरपणा; अतिशय कडकपणा. ४. दरारा; धाक: 'कोणी अंमलदार या देशाचा असला, म्हणजे तो फार जळजळाट करतो.'-लोश ३२०.

**जळजळीत** वि. १. अतिशय उष्ण; कढत; उकळणारे (पाणी, वस्तू). २. तिखट; तीक्ष्ण; कडक (मसाला, मद्य) ३. जहाल; तापट.

**जळजळीत** वि. स्वच्छ; लखलखीत (रुपया, द्रव्य).

क्रिवि. भरपूर; घळघळीत ; पूर्णपणे.

**जळण** न. १. सरपण; गोवऱ्या, लाकडे इ. इंधन. २. (ल.) निरुपयोगी, कुचकामाचा माणूस (फक्त जळण्यास योग्य). [सं.ज्वलन]

**जळणूक** स्त्री. गांजणूक; त्रास; जाच; जुलूम; छळणे.

**जळणे** अक्रि. १. पेटणे; पोळणे; भाजणे; अग्निसंयोगाने दग्ध होणे. २. ज्वाला येणे, निघणे; प्रज्वलित होणे (आग, दिवा). ३. होरपळणे; करपणे; नष्ट होणे (कडक थंडीने अथवा उन्हाने पीक). ४. आग होणे (अंगाची); जळफळणे; जळजळणे; दाह होणे (ताप, पित्त इत्यादींच्या वेळी). ५.(ल.) संतापणे; जळफळणे; तडफडणे (त्वेष, राग इत्यादींनी). [सं.ज्वलन] (वा.) **जळो, जळोजळो, जळ्ळे** - जाळ ते; मरू दे (रागाने किंवा तिरस्काराने काढलेला उद्गार) : 'जळो जळो तयाचा जप । व्यर्थ काय कोरडा प्रताप'. **न जळणे** - आगीनेसुद्धा जळण्यासारखे नसणे; अतिशय समृद्ध, भरपूर असणे (पीक, पैसा, मालमत्ता).

**जळणे** अक्रि. (पत्त्यांचा खेळ) खर्ची होणे; निरुपयोगी होणे (वास्तविक पत्ता टाकावयाचा असता टाकला नाही म्हणून किंवा मोठ्या पानाबरोबर, किंवा दुसऱ्या रंगाच्या हातात टाकल्याने).

**जळत** वि. कढत; उष्ण; आगीसारखे ऊन; उकळते; धगधगीत. पहा : **जळजळीत.** (वा.) **जळता खांब (खांद्यावर) घेणे** - दुसऱ्याचे बिनफायद्याचे काम करणे; लष्करच्या भाकरी भाजणे; विकतचे श्राद्ध. **जळता निखारा पदरात बांधणे** - अतिशय धोक्याची गोष्ट : 'अहो, जळता निखारा पदरांत कुणी बांधून घ्यावा ?' - आग्रोकी १३. **जळता पाय जाळणारा** - आपला नाश होत असताही हट्ट न सोडणारा; जाणून बुजून संकट ओढवून घेणारा.

**जळतण** न. सरपण. पहा : **जळण** (व.)

**जळतस्कर** पु. चांचे : 'कांबे काठे कंकमखर । जळतस्कर मांसाशी ।।' - मुझादि २९१.

**जळताड** वि. हेवा करणारा. (व.)

**जळतारक** वि. पाणबुडे; पाण्यातून तरून नेणारे नावाडी वगैरे : 'मणिकार रजक । जळतारक निघाले ।' - भावाअयो १२.५८ [सं.तृ]

**जळती** स्त्री. (अपचनामुळे घशात होणारी) जळजळ. (क्रि. लागणे.) (ना.)

**जळते घर** अतिशय धोक्याचे किंवा बिनफायद्याचे काम, वस्तू (विकत घेतलेली, मिळालेली, पत्करलेली); विकतचे श्राद्ध; नसता उपद्व्याप; भांडण (भाड्याने घेणे याबरोबर योजतात.). (वा.) **जळत्या घरचा वासा, पळता वासा** - दिवाळखोराच्या मालमत्तेतून जे काय हाती लागेल ते; चोराच्या हातची लंगोटी या अर्थी.

**जळतोंड्या** वि. १. दुर्दैवी; कमनशिबाचा ( माणूस). २. दुर्लौकिक झालेला; काळतोंड्या.

**जळत्या** वि. १. आगलाव्या (घर, मालमत्ता यांना); घर जाळणारा. २.(ल.) दोष काढणारा; निंदक; आळ घेणारा.

**जळनिक्षेप** पु. (मृतास) जलसमाधी; विसर्जन; नदीच्या पाण्यात प्रेत

टाकून केलेला अंत्यसंस्कार : 'तेयाची मोट बांधा : तांदुळा घाला : तयासि जळनीक्षेपु करा : ' – लीचउ ३०५.

**जळप** स्त्री. एक वसूल पद्धती; पूर्वी सावकार भिल्ल लोकांकडून सर्व पीक एकतृतीयांश किंवा निम्मे किंमतीत घेत.

**जळ(ळं)प** पु. १.दाह; प्रखर उष्णता. २. क्रोधाचा आवेश; अतिशय संताप. स्त्री. जळ; धातूचा रस केल्यावर, तापविल्यावर निघालेला मळ, वाया गेलेला, जळलेला भाग.

**जळ(ळं)प** पु. ज्या व्यवहाराचा दृढ अभ्यास झाला असेल त्याचे स्वप्न पडणे. (क्रि. पडणे.)

**जळपणे** अक्रि. रागाने बरळणे, भकणे; जळफळणे. [सं.जल्प]

**जळपिंपळी** स्त्री.पिंपळीची एक जात.

**जळफळ** स्त्री. तडफडाट; रागाने लाल होणे; मनात जळणे.

**जळफळणे** अक्रि. १. रागाने संतप्त होणे : 'अपमानानें जळफळुनी ।' – मसंगी ५०. २. तापाने शरीर ऊन होणे. [सं.]

**जळफळाट** पु. संताप. [जळणे द्वि.]

**जळफळीत** वि. १. उष्ण; आगीसारखे (ऊन); जळजळीत. २. क्रोधयुक्त; संतप्त.

**जळबंब** न. पाण्याचा भरपूरपणा, चंगळ; पाणी बाहेर सांडणे (नदी, तलाव, विहीर यांतील).
वि. पाण्याने भरपूर, तुडुंब; जलमय (नदी इ.).

**जळमट** न. १. घराच्या पाख्यावरचे किंवा भिंतीवरील कोळिष्टक, सुतेरा. २.पीठ, फळे, धान्य नासले असता त्यांमधून निघणारे दोरे, जाळे; कृमिजन्य तंतू, दोरे. ३. तोंडातून निघणारा कफ, शेंबूड, गोठलेले रक्त इत्यादिकांचे तंतू. पहा : **जळंवट** [सं.]

**जळमनुष्य–माणूस** पु. १. मत्स्यकन्या-मत्स्यपुत्र; पाण्यात राहणारी एक कल्पित मनुष्यजात. : 'गोपांनी जळमनुष्य मारिले।' – हरिवि १३.१६८. २. (ल.) कोळीजात; कोळी. ३. अतिशय लहान, खुजा माणूस.

**जळमळणे** अक्रि. पाण्याने काठोकाठ भरणे. [सं.जलमय]

**जळमळीत** वि. पाण्याने काठोकाठ भरलेले; तुडुंब.

**जळमंडप** पु. कळसूत्री बाहुल्यांचा खेळ.

**जळमंडपी** पु. १. जळमंडप खेळ दाखविणारा; खेळ्या. २. खेळातील बाहुली: 'को जळमंडपियांचे नाचणे जाण । कळसूत्राधीन असे की ।' – भवि ५७.२१३.

**जळमांडवी** स्त्री. पाण्यात वाढणारी एक वेल : 'सर्वज्ञें म्हणीतलें : कव्हणी एकु जळमांडवियेचें रोप पाणियां आंतु घाली।' – लीचपू ४४७.

**जळमांडवी** स्त्री. चांदवा; फिरताना डोक्यावर धरलेले कापडाचे छत्र : 'गोसावीयांवरी जळमांडवी धरिली : लोकु पुसे : राघवदेव हो : हें कवण :' – लीचपू १७६.

**जळमांडवी** स्त्री. जळक्रीडेची जागा; पुष्करिणी; बांधून काढलेला तलाव : 'गोसावी भीतरि बीजें करीति : बारवे जळमांडवीए श्रीमुख प्रक्षाळिती' : – लीचपू ७५.

**जळमुय** स्त्री. एक प्रकारची बारीक मुंगी. ही चावली असता फार आग होते. (गो.)

**जळवण** न. लाकडे; सरपण; जळण; इंधन.

**जळवण–णी** स्त्री. १. जाळणूक; गांजणूक. २. सत्तेच्या जोरावर दिलेला त्रास. (गो.)

**जळवणे** अक्रि. त्रास देणे. (बे.)

**जळवणों** वि. सत्तेच्या जोरावर त्रास देणारा.(गो.)

**जळवात** पहा: **जाळवात**; विपादिका : 'त्याच्या पायांच्या जळवाताच स्मरण तिला झालं' –रथचक्र १३६.

**जळवारधी** पु. कोळी : 'तंव गळु आसुडी । जळवारधी ।।' – राज्ञा १४.१४६.

**जळवेकरी** पु. जळवा विकणारा, लावणारा माणूस.

**जळवेत** पु. एक वृक्षप्रकार : 'बिबवा, कवठी... वेत, जळवेत हे वृक्ष...' –सभा १०१.

**जळवेल** स्त्री. (समुद्राच्या पोटातील) उष्ण प्रवाहाची लाट ; ('जळ' द्व्यर्थी घेऊन) जळाच्या पाण्याची लाट : 'अजब जळवेलींचा ओझरता अग्निस्पर्श' – अंया २२५.

**जळशयन** न. जलनिद्रा, जलमंदिर : 'मग गीतार्थुसागरीं । जळशयन जाले ।'– ज्ञा १०.२१.

**जळंब** पु. जळजळ, कफ, लाळ इ. : 'तेयाचिया तोंडा । येर जळंबाचा लोंढा ।' – राज्ञा १३.५६३.

**जळंबट** न. १. लाळ; कफ; खाकरा : 'तयाचि पाहे या तोंडा । येईल जळंबटाचा लोंढा ।'–ज्ञा १३.५६४. २.पहा : **जळमट** [सं.जाल]

**जळंबणे** अक्रि. भरून येणे; दाटणे: 'देखुनि माजें अंतकरण । जळंबलें दुखें ।।'–क्रिपु ३१.५२.

**जळा** स्त्री. अव. जळवा : 'सिरा तोडिती जळा लाविती । या नाव आदिभूतिक ।' – दास ३.७.३५.

**जळाऊ** वि. सरपणाजोगे; जाळण्यास योग्य.

**जळाऊपणे** क्रिवि. मनात जळून; जळफळून : 'जळाऊपणे माझी चौकशी करू लागले.' – लबोतोअ ८९.

**जळाधारी** स्त्री. पाण्याची झारी; पाण्याचे भांडे : 'या शिलेवर जळाधारींतून पाणी पडूं लागलें म्हणजे शिलेवरील पूजेची फुले आसपास विखुरली जातात.'– स्मया ३०५.

**जळापणे** पहा : **जळपणे** (कु.) [सं.जल्प]

**जळांत** वि. अथांग; अत्यंत खोल; अतिशय खोल ; ठाव लागत नाही असे (पाणी) : 'भक्तजनीं म्हणीतलें : जी जी : एथ काइसेन सांडोवा बांधवैल : हें जळांत पाणी : ' – लीचउ १.१६.

**जळीत** न.१. जळलेला, वाया गेलेला भाग. २. बुडालेले, वसूल न होणारे पैसे. ३. दाह; प्रखर उष्णता.
स्त्री.१. धातू तापविण्यात किंवा वितळविण्यात आलेले नुकसान. (क्रि.जाणे.) २. जळालेले घर, गंज, पीक इ. अग्नीने झालेले कोणतेही नुकसान. ३. जळिताबद्दल मिळणारी नुकसान भरपाई. ४. अन्यायाने लादलेला कर, दंड, ओझे. पहा : **भुर्दंड**. ५.गैरकारभारामुळे झालेल्या नुकसानीबद्दल केलेला दंड. ६. जाळण्याकरिता ठेवलेला पदार्थ (सरपण, गवत इ.).[सं.ज्वल] (वा.) ० **जाळणे** – अन्यायाने त्रास

देणे. (जे जळले आहे किंवा जळत आहे तेच पुन्हा जाळणे).

**जळीतखत** पु. १. कुळाकडून येणे असलेली बाकी आल्यानंतर त्या कर्जखतास किंवा दस्तऐवजास म्हणतात. २. सदर बाकी मिळत नाही असे दिसून आल्यावर त्या बाकीसंबंधी जवळ असलेले करारपत्रक; बुडीत रकमेचे खत.

**जळीतबाकी** स्त्री. १. बाकी राहिलेला, यावयाचा पैसा (रयत, कूळ यांच्याकडील). २. जी परत येण्याची आशा नाही अशी बाकी.

**जळीती** पु. आग लावणारा; जळित करणारा : 'एखादा जाबसाल बोलण्याचा पडला तर जळीती आपण नसावें. आग पडली ती विझविणें होणें कठीण.' – ऐको ४२३.

**जळीपळीची भांडणे** न. अव. घरास आग लावणे, दुसऱ्याची बायको काढून नेणे यांसारखी भांडणे : 'ह्यांनाच लोक 'जळीपळीचीं' भांडणे म्हणतात. '– गांवगाडा २२.

**जळीमळी** क्रिवि. जिकडेतिकडे.(कु.)

**जळू, जळूका** स्त्री. १. एक जलजंतू. रक्त शोषणारा प्राणी; शरीरातील अशुद्ध रक्त काढून टाकण्यासाठी जळवांचा उपयोग करतात. : 'गोवी जळवा अशुद्ध घेती।' – दास १.१०.५५. २. (लहान मुलाची) थोडे थोडे सारखे पिण्याची क्रिया. दूध पिताना आईचे स्तन लवकर न सोडणाऱ्या मुलास उद्देशून म्हणतात. [सं.जलौका]

**जळॅ(ळा)र** न. डास; मच्छर. (गो.)

**जळौचे** सक्रि. सत्तेच्या जोरावर लोकांस त्रास देणे. पहा : **जळवण**

**जळ्ळं, जळ्ळं मेलं** उद्गा. (बायकी) नापसंतीदर्शक किंवा त्रासदायक उद्गार ; जळो; आग लागो.

**जळ्ळ्या** उद्गा. नापसंती, राग इ. दर्शविणारे उद्गार; जळो ; आग लागो! : 'अगदी रविवारीसुद्धा तुम्हांला त्या जळ्ळ्या ऑफिसात काम असतंच थोडंतरी.' – अआगं २१.

**जंक** न. नावेचा एक प्रकार. [इं.]

**जंक्शन** वि. (ल.) पटाईत; उत्तम ; तरबेज : 'तो गडी ह्यातला अगदी जंक्शन माणूस हाय.' – मिरास १७७. [इं.]

**जंग** पु. १. गंज, कीट; (लोखंड, तांबे, पितळ यांवरील) तांबरा. (क्रि.चढणे.) २.(ल.) क्षीणता; जडता; मालिन्य; उपयोगात नसल्यामुळे येणारी ग्लानी. [फा.] (वा.) ० **देणे** – पुष्कळ दिवस टिकणे, राहणे (एखाद्या धंद्यात, कृत्यात माणूस किंवा वस्तू).

**जंग** न. तारवाचा प्रकार; गलबत; जहाज : 'नावा होडीं बेडिया जंगें विस्तीर्णे ।'– नरुस्व ७२०.

**जंग** पु. घाटसर; घुंगरांची माळ; घंटा वगैरे : 'बैलांच्या गळ्यांतील जंगांचा नाद.'–एशिआ २५१.

**जंग** पु. लांछन; दोष : 'आम्हापुढें तुम्ही पळता हा जंग तुम्हावर आहे याप्रमाणे बहुत लाजविलें.' – ऐको ३९९.

**जंग** वि. पुष्कळ : 'गर्जीति कवि (कैक) जंग'– (गंगु हैबती) मला ७५.

**जंग** पु. स्त्री. लढाई : 'तीन वर्षे सतत जंग...'– जोफुसग्रं १४३. [फा.] (वा.) **जंग जंग पछाडणे** – अतिशय श्रम करणे; प्रयत्नांची पराकाष्ठा करणे.

**जंगजू** वि. भांडखोर ; कलागतीखोर.

**जंगजोड–जूट** पु. स्त्री. १. भरपूर व चांगली स्थिती ; सुबत्ता. २. भरलेले घरदार ; संसार (पुष्कळ मुले–बाळे, चाकर – नोकर असलेला). ३. योग्य जोड; जम. ४. संजोग; जुळणी; साहित्य. (क्रि. घालणे, करणे.) ५. मैत्री : 'जंगजोड यासी करावा यैसा मनसबा घातला आहे.' – पेद २०.४५.

**जंगजोड** पु. युद्धाची व्यवस्था : 'जंगजोड बसेल.'– ऐलेसं १०.५३.४५.

**जंगट** वि. गंजलेले.

**जंगट** न. काशाचा तास देवापुढे आरती वगैरे म्हणताना वाजवावयाचे वाद्य; झेंगट. [ध्व.]

**जंगट खटला** त्रासदायक बाब; गोष्ट : 'त्यामुळे असल्या जंगट खटल्यांचा विचारसुद्धा माझ्या दरिद्री डोक्याला असह्य होता.' – संबा १६१.

**जंगड–डी** स्त्री. एकत्र जुंपलेल्या पशूंतील निकट संबंध; योग. यावरून दाट मैत्री. [सं.युज्]

**जंगणे** अक्रि. कीट चढणे.

**जंगम** पु.शिवाची उपासना करणारा एक पंथ; लिंगायत जात व व्यक्ती. लिंगायत लोकांचा गुरू : 'जंगमास रुद्र शिकविण्याचा अधिकार नसे.' – निबंधसंग्रह ११८.

**जंगम** वि. हलविता येण्यासारखे; चल : 'सरकारने त्याचा काही जंगम माल जप्त केला.' – विजी ६. [सं. गम्]

**जंगम** स्त्री. एक रानफळ व त्याचे झाड.(गो.)

**जंगमजिंदगी, जंगममाल, जंगममिळकत** पु. स्त्री. १. हलविता येणारी संपत्ती; भांडीकुंडी. २. (कायदा) जमीन व भूमीशी संलग्न असणाऱ्या वस्तू किंवा अशा संलग्न वस्तूंशी लगटून राहणाऱ्या वस्तू खेरीजकरून हरएक वस्तू.

**जंगम ढवळे** समारंभातील आचारविचारशून्यता.

**जंगमपट्टा** पु. १. जंगम लोकांच्या कपाळावरील लांबलचक भस्माचा पट्टा. त्यावरून २. (ल.) (उप.) याप्रमाणे एखाद्या बाईने लाविलेले कुंकू.

**जंगमविद्या** स्त्री. लिंगायतांची शास्त्रे इ.

**जंगमविष** न. प्राणिज विष.

**जंगम शेटाई** ओढूनताणून आणलेली प्रतिष्ठा. (को.)

**जंगमी** वि. जंगम लोकांसंबंधी.

**जंगम्या** पु. खरीपाच्या जोंधळ्यावरील रोग. याने ताटे वाळू लागतात व तांबडी दिसतात.

**जंगल–ला, जंगाल** पु. गंज; कळंक : 'नवसागर आणि जंगल यांचें चूर्ण दारूंत मिश्रण केल्यास त्यापासून हिरवी ज्वाला उत्पन्न होते.'–अक्री १५. वि. जंगेल; गंजलेले. [फा. जंग]

**जंगल** न. अरण्य; झाडी; उजाड, ओसाड, नापीक, मनुष्य वस्ती नसलेली जमीन, जागा.[सं.] (वा.) ० **फिरणे** – शौचास जाणे; झाड्यास जाणे.

**जंगल** वि. वार्धक्याने जीर्ण झालेला (मनुष्य, प्राणी).

**जंगलखरडा** पु. कापणी होण्यापूर्वीचे पिकाचे पाहणीपत्रक, आणेवारी; अंदाजपत्रक.

**जंगलगरक, जंगलगर्क** वि. झाडाझुडपांनी भरलेले (जमीन, शेत) :

'बागाईत जमीन जंगलगर्क पाणी पाटसुद्धा जाहली आहे.'-समारो २.२४४.

**जंगलचट्टी** स्त्री. जंगलातील प्रवाशांकरिता उतरण्याची जागा : 'उतरताना खाली जंगलचट्टी दिसली.'- भोवरा ३०.

**जंगल(ली)चिमणी** स्त्री. एक प्रकारची चिमणी (पक्षी); बोचा बिलबिली; ही साध्या चिमणीपेक्षा लहान असून हिचे पोट पिवळे व चोच आणि पाठ काळी असते.

**जंगलट** वि. जंगली; रानवट; खेडवळ; अडाणी.

**जंगलशाही** स्त्री. रानराज्य : 'त्या वेळी जंगलशाहीच्या बादशहाची सिंहगर्जना सुरू होऊन वरच्या अस्मानी सवालाला जमिनीचा जबाब मिळतो.'- रासं ५.

**जंगला** स्त्री. एक रागिणी.

**जंगला** पु. १. कठडा (माळवी). २. कळंक; गंज.

**जंगली** वि. १. पहा : **जंगलगरक.** २. रानटी; रायवळ; रानामधील (सर्व प्रकारची झाडे - शिशू, साग यांखेरीज). ३. मुद्दाम लागवड न केलेले (झाड). ४. न सुधारलेला; खेडवळ; अडाणी; बिन माणसाळलेला (पशू, माणूस, लोक). ५. जंगलात राहणारा. ६. जंगलासंबंधी. ७. (ल.) असभ्य : 'तेव्हाच्या जंगली वागण्याबद्दलचे आपले मत'- कोउ १४६.

**जंगलीजट** वि. खेडवळ.

**जंगली हिरडा** रानटी हिरडा. (हा हिरडा कोवळा घेऊन वाळविला म्हणजे त्याला बाळहिरडा (हरितकी) म्हणतात.)

**जंगली माठ** जंगलात वाढणारी एक शाकभाजी : 'ही वर्धायु किंवा चिरायु शाक असते.'- वसृ २६६.

**जंगली मुद्रिका** स्त्री. एक शाक वनस्पती: 'गुजरातेपासून काश्मीरापर्यंत उत्तर भारतात आढळणारे हे शाकवानस आहे.' - वसृ ९६९.

**जंगलोजड** वि. रानटी.

**जंगाट** वि. गंजलेले; जंगलेले.

**जंगाल** पहा : **जंग**

**जंगी** स्त्री. अंगडी; दाट मैत्री.

**जंगी** स्त्री. १. बंदुकीची गोळी मारण्यासाठी तटाला ठेवलेले भोक. २. लहान खिडकी : 'तटाच्या वरच्या बाजूला बंदुकीने मारा करायला उपयुक्त अशी छिद्रे (जंग्या) ठेवलेली आहेत.'-मसंधवि ३०६. (गो.)

**जंगी** वि. १. लढाईविषयी; लष्करी. २. मोठा; भयंकर : 'किल्ल्यांत फिरंगी रोहिला जंगी' - ऐपो १८२. ३. प्रचंड; अवाढव्य.

**जंगी ताबूत** तरवारी, ढाली वगैरे शस्त्रांचा केलेला ताबूत.

**जंगीपूर** न. रेशमाची एक जात.

**जंगी भोवरा** पु. भो, भो असा आवाज करणारा भोवरा.

**जंगुमला** वि. लाडकी; आवडती : 'उभ्या वाटेनं चालली। पाहा माही जंगुमला । पळे बाहेर खेळाला । चेंडु चांदणीनं नेला ।'- वलो ८१.(व.)

**जंघ-घा** स्त्री. १. मांडी; सबंध पाय. पहा : **जघन** २. पोटरी. [सं.]

**जंघ(घा)त्राण** न. मांडीचे किंवा पोटरीचे चिलखत.

**जंघ(घा)ल-ळ, जंघी** वि. वेगवान; चपल (घोडा) : 'जंघाल जो पवन -सं -गतिची सवे घे।' - रकाव्य ७; 'हे वामनेक पदभूमि नमोनि जंघी।' -रकाव्य ४.

**जंघी** वि. मांड्या असलेला :'.. नसोनि जंघी । एके दिनींच रविसूत नभास लंघी ।।'- नदस्व ३.

**जंजार** पु. १. ओझे. २. त्रास; प्रयत्नांची पराकाष्ठा. (क्रि. तोडणे.) [सं. जंज्]

**जंजाल-ळ** पु. १. त्रास; कष्ट; दगदग; चिंता; कटकटी; उपद्व्याप; गुंतागुंत; संसारातील अडचणी : 'जगज्जाळ जंजाळ हा सर्व तूटे ।' - दावि ८. २. आधिव्याधी; लोढणे; यातना; त्रास (माणसांच्या कामाचा). ३. शुक्लकाष्ठ. (वा.) ० **तोडणे** - अति त्रास, कष्ट सोसणे. ० **पछाडणे** - १. छळणे; यातना देणे. २. खूप प्रयत्न करणे; जोराचा प्रयत्न करणे.

**जंजाळ** स्त्री. जेजाला (तोफेचा एक प्रकार) : 'नाळे मार्गे नाळ । शतें सोडीत जंजाळ । जणो आगिया वेताळ । ऐसा बेटा भांडला ।'-ऐको ४००.

**जंजिरा** पु. पाण्यातील किल्ला : 'प्रत्येक खाडीच्या तोंडाशी बांधलेले जंजीरे.' - स्वप १२७.

**जंजिरी** स्त्री. १. लहान साखळी. २. कमान (घड्याळाची); शेडा. [फा.]

**जंजिरी** स्त्री. जंगी; गवाक्ष.

**जंजिरी** वि. तीक्ष्ण : 'भंवयकमाना ओढुन मारसी नेत्रबाण जंजिरी।'- प्रला १०६.

**जंजिरी गोळी** स्त्री. जोडगोळी.

**जंजीर** स्त्री. नग : 'एक जंजीर फील.' - पया ३८४.

**जंजीर** स्त्री. १. पहा : **जंजिरी** स्त्री १. २. बेडी : 'गळ्यात जंजीर तोफेची.'- चिथोशा ६६. [फा.] (वा.) ० **पटकणे** - पराकाष्ठेची खटपट करणे; धडपड करणे. (व.)

**जंजीरजामिनी** स्त्री. बंधपत्र; जामीनपत्र.

**जंजीरबंद** वि. १. भरभक्कम; संगीन (इमारत). २. अगदी बरोबर (हिशेब). ३. सुसंगत (भाषण, लेखन). [फा.जंजीर-साखळी]

**जंजेरिया** स्त्री. साखळ्या; पायांचा एक अलंकार. [फा.]

**जंज्याळ** स्त्री. पहा : **जेजाल.** लाकडी बैठक (दस्ता) असलेली मोठ्या तोंडाची बंदूक. हिच्या तोंडाचा व्यास १।। ते २ इंच असून नळीची लांबी ७ विती असते. [सं.जंज्]

**जंत** पु. पक्वाशयात उत्पन्न होणारे वाटोळे, चपटे, निळे, काळे कृमी. [सं.जंतु]

**जंतर** न. १. तार काढण्याचे यंत्र, पट्टी. २. यंत्र. ३. तीक्ष्ण तारेचे शस्त्र, आयुध. ४. धार लावण्याचा दगड. ५. कातण्याचे साधन (झाडी). [सं.यंत्र]

**जंतरपट्टी-पाटी, जंत्रपट्टी-जंत्रफळी** स्त्री. (सोनारी) एकापेक्षा एक बारीक अशी अनेक भोके पाडलेली लोखंडी जाड पट्टी. या भोकांतून तार ओढून आवश्यक तितकी बारीक करतात. जंतीर. (गो.)

**जंतरमंतर** पु. न. १.जादूटोणा; छाछू; छू मंतर ; थातूरमातूर. २. (दिल्ली) वेधशाळा (सवाई जयसिंगाने बांधलेली). [सं.यंत्र + मंत्र]

**जंतरी** स्त्री. लाकडाच्या घनफळाचे कोष्टक. (झाडी) [सं.यंत्र]

**जंतवाताळे** न. जंतामुळे फुगणारे पोट.

**जंती** स्त्री. (अव. जंत्या) कडीपाटाच्या कड्यांवर व किलाच्यांखाली बसविलेल्या गोलचीच्या लहान पट्ट्या.(बे.)

**जंतु-तू** पु. १. डोळ्यांना न दिसणारे सूक्ष्म जीव, कृमी. २. सजीव प्राणी विशेषतः सरपटणारा प्राणी किंवा कीटक. [सं.]

**जंतुघ्न** न. सडण्याची क्रिया करणाऱ्या जंतूंना प्रतिबंध करणारे औषधी द्रव्य ; जंतू नष्ट करणारे औषधी द्रव्य; जंतुनाशक.

**जंतुभयगंड** पु. (मानस.) प्रत्येक गोष्ट जंतुमय असण्याबाबतची अतार्किक, अवास्तव भीती.

**जंतुयुद्ध** न. (राज्य.) विषाणूंच्या साहाय्याने मानवसंहार करणारी युद्धपद्धती.

**जंतुरोधी** वि. (वैद्यक.) जंतूंच्या वाढीस प्रतिबंध करणारी (द्रव्ये किंवा औषधे).

**जंतुवादी** पु. (ल.) क्षुद्र गोष्टींना महत्त्व देणारा : 'गाडगीळ हे जंतुवादी आहेत.' - खपा १७३.

**जंतुवाहक** वि. ज्यांच्यामुळे जंतूंचा संसर्ग-प्रसार होऊ शकेल अशी व्यक्ती.

**जंतुशास्त्र** न. रोगकारक कृमींबद्दल विवेचन करणारे शास्त्र.

**जंत्र** न. १. यंत्र. २. पहा : **जंतरपट्टी.** ३. तोफ ; बंदूक. ४. लाकूड पोखरण्याचे साधन. (गो.)[सं.यंत्र] (वा.) **जंत्रातून ओढणे –** १. (ल.) कडक शिस्त लावणे (दांडग्या मुलास). २. कसोशीने पाहणी करणे; परीक्षा करणे (हिशोब, जबानीमध्ये). **जंत्री धरणे –** कडक रीतीने वागवून काम घेणे ; तरवारीच्या धारेवर धरणे.

**जंत्र** न. वाद्य : 'तव जंत्रे वाजिनली अनुहाते.' - एरुस्व ६७.

**जंत्रमंत्र** पहा : **जंतरमंतर**

**जंत्रातून ओढलेला**(वि.) अतिशय कृश झालेला; चरकातून काढलेला.

**जंत्री** स्त्री. १. क्रमवार यादी; सूचिपत्र; अनुक्रमणिका; कोष्टक; गोष्टी किंवा हकीकती यांची परंपरा, साखळी; शकावली; सनवार कोष्टक. २. यादी; सूची ; सारणी; कॅटलॉग : 'त्या ग्रंथातील चुकांची जंत्री धडाधड म्हणून दाखवीत.' - व्यक्तिरेखा १६६.

**जंत्री** वि. यंत्राने तयार केलेले. [सं.यंत्र]

**जंत्री** स्त्री. मूस; साचा. (व.) [सं.यंत्र]

**जंदना** क्रि. बाळंत होणे; जन्म देणे. [सं. जनक]

**जंद्री** स्त्री. पायात घालण्याची रुप्याची साखळी; तोडा. (अव.) जंद्रयो. (कु.गो.) [फा. जंजीर]

**जंपती** पु. दंपती; नवराबायको. [सं.दंपती]

**जंपर** पु. पोलक्याचा एक प्रकार : 'हिरवीगार साडी, पोपटी रंगाचे जंपर.'-सोबत १७.

**जंब** पु. प्याला. (झाडी)

**जंब-भ** पु. न. १. ढोंग; बतावणी.२. गर्व; अहंकार. [सं.दंभ]

**जंब(बि)या, जंज्या** पु. एक प्रकारची कट्यार ; जंजीर. [फा.]

**जंबात** वि. हुशार; कुशाग्रबुद्धीचा ; निष्णात. (गो.)

**जंबाळ** पु. १. चिखल; राड; रेंदा: 'तो तो फुगे कुगेहद्वारीं मूत्रेंहि जेवि जंबाळ ।'- मोकर्ण २८.१९. २. पाण्यात वाढणारे एक झाड. [सं.जंबाल]

**जंबीर** पु. न. १. लिंबू. २. लिंबाची एक जात. [सं.]

**जंबीराम्ल** न. लिंबापासून निघणारे अम्ल.

**जंबु-बू** न. स्त्री. जांभळाचे झाड आणि फळ.

**जंबु(बू)क** पु. कोल्हा. [सं.]

**जंबुद्वि(द्वी)प** न. १. हिंदुस्थान. २. काश्मीरचा जम्मू हा प्रांत. [सं.]

**जंबुरक, जंबूर-रा, जंबूरिया** पु. उंटावरील एक लहान तोफ : 'सूत्रबनाळी जंबुरे उंटावर रोखुन।' - ऐपो १०९. [फा. झंबूरक]

**जंबुरेदार** पु. उंटावरचा गोलंदाज; जंबुरा चालविणारा : 'एक हजार उंटावरचे जंबुरेदार होते.' - दुरं १७४.

**जंबुर्का** पु. जंबुरा; तोफेचा एक प्रकार : 'जाटाजवळ जंगी सामान भारी. तोफाची जंबुर्क्यांची मार फार यामुलें तोंड कोणाचे न लागे.' -ऐको ४०७.

**जंबुर्दी** वि. पाचूसारखा हिरवा रंग असलेले. [फा. झुमुर्रूद=पाच ]

**जंबुलातीत किरण, जंबूपार किरण** (भौ.) अतिनील किरण. सूर्यप्रकाशाच्या वर्णपटातील जांभळ्या पट्ट्याच्या पलीकडचा, साध्या डोळ्यांनी न दिसणारा पट्टा. याची तरंग लांबी सु. ४००० ॲगस्ट्रॉम एककापर्यंत असते.

**जंबुसरी** वि. परदेशी बियाचे (पीक).

**जंबू(बो)र** पु. खिळे उपटण्याचा मोठा चिमटा, मोठा अंबर : 'मिट्ठूनं जंबुरानं डब्याचं झाकण उखडून काढलं'- बाविबु २६२.

**जंबूशे(स)री** वि. परदेशी बी वापरून पिकविलेले (पीक); बी आणून पिकवलेले (भुईमूग) : 'आणि जंबूशेरी हाय!'- उअं २०.

**जंबेरी** स्त्री. कागदी लिंबाची गोड जात. पहा : **जंबीर**

**जंबोरा** पु. मोठा अंबर; खिळे उपटण्याचा चिमटा.

**जंभ** पु. (यंत्र) जबडा; दोन वस्तू अगर वस्तूंची दोन भागांनी पकड साधता यावी यासाठी केलेली रचना.

**जंभ बंधक** जंभ बसविलेला, वस्तूची पकड घेऊ शकणारा भाग.

**जंभोरा** वि. अतिशय आंबट (दही वगैरे). (ना.) [सं.जंबीर]

**जंव** क्रिवि. १. जोपर्यंत. २. पावेतो; पर्यंत. २. जो; त्याच वेळेस; तोच. ३. जेव्हा; जै : 'मुखासि जंव पातलीं श्रम अरण्य ऐशीं पदें।'- केका ८०. [सं.यदा, यावत्]

**जं(ज)वट** न. १. मंडळी; टोळी; जमाव; कंपू; समुदाय. २. जोडपे, जुळे : 'तैसी जाण जवटें । दोन्ही इये एकवटें ।'- ज्ञा १३.९६१.

**जंवबिंधु** पु. दंवबिंदू : 'अग्नि आणि स्फुलिंगा । जंवबिंधु आणि मेघा।... जितुला पाडु ।।'- श्रीकृष्णच १९.२४०.

**जंवर** क्रिवि. जोपर्यंत. पहा : **जववर** : 'करी स्मरण भूपती जंवर आठवोनी पदा ।'- नवनीत ४७५०

**जंववर, जंववरपर्यंत-पावेतो** क्रिवि. जोपर्यंत.

**जंवसर** क्रिवि. जोपर्यंत. (कु.)

**जंवळा** वि. जुळा : 'तेया याको इसाकाचेआ कुमरा । जंवळा बंधु होता दुसरा ।।'- क्रिपु ११४.

**जाइजणा** वि. जाणारा; नाहीसा होणारा; अशाश्वत : 'धन कण लक्ष्मी

सकळ । जाइजणे ।' - दास ३.१०.४७.[सं.या - यायिन् = जाणारा]

**जाइ(ई)त्री** पहा : **जायपत्री**

**जाइयांचे** वि. (उसने आणलेले परत द्यावयाचे असते त्यास अनुलक्षून) केव्हातरी जाणारे : 'आतां जाइयांचे जैसें लेणें । आंगावरि आहाच वाणें ।'-ज्ञा ९.४०८.

**जाइ(ई)ल** वि. केसाळ (कुत्रे) : 'बनकरीचे भाव जाइले गडे : ते चालती धनुवाडे ।' - रुस्व ७४६.

**जाइलेपण** न. १. जाईच्या फुलासारखे नाजूकपण : 'रूपाचेनि जाइलेपणे'- एरुस्व १९२. २. सर्वश्रेष्ठत्व.

**जाई** स्त्री. बायको : 'पतीच्या शापाने शिळा झाली अहिल्याबाई। रामाच्या स्पर्शाने उद्धरली गौतमाची जाई '- जलोसा २४४.[सं.जाया]

**जाई** स्त्री. एक फुलवेल व तिचे फूल ; मालती. [सं.जाति]

**जाई** स्त्री. भोवरा फिरवण्यासाठी त्याला गुंडाळायची दोरी. (अहि.)

**जाई** स्त्री. जाळी.

**जाईऊळ, जाऊळ** न. जाईचे फूल : 'फाकणे की सुकणे । जाउळाचे ।'- अमृता ४.८ [सं.जातुल]

**जाईदाद** स्त्री. मालमत्ता : 'आम्हांस जमेतिसुद्धा सोडावे आणि जाईदाद पहिल्यापासून आम्हाकडे आहे ती मात्र द्यावी असे जाबसाल.' - ऐको ४२३.

**जाईफळी** स्त्री. जायफळाचे झाड.

**जाउपे** न. १. पहा: **जायपे**. २. वत्स; लेकरू; मूल : 'क्षीरसागरांचे जाउपे ।' -वच्छह २८२. ३. जुळे मूल.

**जाऊ** स्त्री. नवऱ्याच्या भावाची, दिराची बायको. [सं.यातृ](वा.)

**० भाऊ नसणे** - धाक दाखविणारा, ताब्यात ठेवणारा कोणी नसणे. स्वतंत्र असणे.

**जाऊ(व)क** न. गाईचे किंवा म्हशीचे वासरू. पहा : **जाउपे, जावपे** (व.) [सं. जन् - जात]

**जाकव** पु. घोड्यास जीन तंग बांधला असता होणारा रोग. याने फोड उठतात. - अश्वप २.३०१

**जाकली** क्रिवि. जेव्हा; ज्या वेळी, ज्या काली.

**जाकसणे** अक्रि. गांजलेले असणे : 'आडले आकसले जाणावें... कोणी येकासी ।।' -दास १२.१०.६.

**जाकळणे** सक्रि. १. ग्रासणे : 'भ्रमें जाकळे लागल्या सर्प ।' - मुआदि ३२.७३. २. विव्हळ होणे; पोळणे; कळवळणे: 'शोकें जाकळे राजा धर्म ।'- मुआदि २९९.१३९. [सं.जक्ष्]

**जाकळणे** सक्रि. व्यापणे : 'दिठी जाकळोनि निघो पाहे ।' - ज्ञा ६.२६७. [ते.]

**जाकळणे** सक्रि. मोह पावणे.

**जाकि(की)ट** न. सदऱ्यावर घालावयाचा तोकडा कपडा; बिनबाह्यांची बंडी. [इं.जॅकेट]

**जाख** स्त्री. गवताच्या मुळांचे तंतू; तण : 'अळी खणून मुळ्या उघड्या कराव्या, जाखा छाटाव्या.'- मज्ञा २.२६. [सं.शाखा]

**जाखणे** पहा: **जोखणे**

**जाखणे** उक्रि. सांभाळणे.(व.)

**जाखीण** पहा : **जखीण**

**जाखी(खे)र** पु. यक्षवीर; जाखमाता; यक्षिणी; मंत्रतंत्र करणाऱ्या देवता: 'तवं एकी म्हणीतलें : जी जी : यातें जाखीराचा देव्हारा असे : सुपलीया : असति :'- लीचपू ५३९.

**जाग** पु. (अचानक मृत झाल्यास) मृताच्या दहाव्या किंवा बाराव्या रात्री केलेले जाग्रण. या वेळी चार देवझाडे मिळवून वाद्यादीपूर्वक समारंभ करतात.(को.) [सं.जागृ]

**जाग** स्त्री. १. जागृतावस्था; जागरण. (क्रि. होणे, येणे.) २. हालचाल; गडबड; गजबज. (घर, खेडेगाव यांतील) (राजा.) ३. गर्दी; गोंगाट (दाट वस्तीतील, जत्रेतील). ४. कोणत्याही प्राण्याची एखाद्या जागेतील सतत वस्ती; पहारा; वचक बसण्याजोगे अस्तित्व. ५. वस्ती : 'यवतेश्वराच्या डोंगरावर मनुष्याची जाग असल्यामुळे तो डोंगर न चढता.' - स्वप ३६४. ६.चाहूल. (गो.)[सं.जागृ](वा.)

**जागे करणे, होणे** - सावध करणे, हुशार करणे, होणे.

**जागचे जागी** क्रिवि. १. त्याच स्थळी; असलेल्या जागयावर. २. आपण होऊन; दुसऱ्याने न सांगता.

**जागजूग** स्त्री. हालचाल; जागेपण; चाहूल : '...बाहेरची झाडंमाडंही स्तब्ध होती. जागजूग नव्हती.' - राकाधाका ११.

**जागड** स्त्री. स्वास्थ्य.

**जागणा** वि. जागा; जागृत.

**जागणे** अक्रि. १. जागत राहणे; सावध राहणे; लक्ष ठेवणे. २. निजून उठणे; जागे होणे, असणे; झोप न घेणे. ३. पहारा करणे; सावधगिरी ठेवणे. ४. लक्ष देणे; दखल ठेवणे; काळजी घेणे (धंदा, नोकरी, इनाम, शपथ, वचन यांची). ५. ताजे असणे; आठवणे, स्मरणे (अभ्यासिलेले शास्त्र इ.). [सं.जागृ -जागरण]

**जागणे** सक्रि. पाळणे; सांभाळणे : '... पण वचनाला ते जागले नाहीत.'- राऊ ३६३.

**जागता** वि. १. जागरूक; सावध; दक्ष. २. तजेलदार; तेजस्वी; टवटवी असणारा; ज्याची सुधारणा आणि रक्षण काळजीपूर्वक होते असा; संस्कृतिसंपन्न ; सुस्थितीने युक्त (धर्म, विधी, चाल). ३. तरतरीत; जोमदार (मन, बुद्धी इ.). ४. ताजेतवाने; न गंजलेले; मलिन नसलेले (मिळविलेले ज्ञान). ५. लोकांच्या डोळ्यांपुढे असणारा व ज्याची लोकांना नेहमी आठवण होते असा; आठवणीत राहिलेला (मेलागेला माणूस, गोष्ट, वृत्तान्त, प्रसंग).

**जागता-ती** वि. शक्ती, गुण आणि सामर्थ्य यांनी युक्त; तत्काल फलदायी; उपासकाला पावणारी (देवाची मूर्ती, मंत्र-तंत्र, औषध); जागृत.

**जागतिक** वि. १. जगाची; जगासंबंधी: 'जागतिक शांततेला जो धक्का बसणार आहे.' - के १७.६.३०. २. विश्वव्यापी; सार्वत्रिक. [सं.जगत्]

**जागतिकीकरण** न. देशात खुला व्यापार, गुंतवणुकीसाठी मोकळी बाजारपेठ आणि तंत्रज्ञान व कुशल व्यावसायिकांना देशांतर करण्यास सुलभ कायदेकानून अशी जागतिक व्यवस्था.

**जागती** वि. जागृत (स्थान); उपासकाला पावते असा लौकिक असणारी

(देवता) : 'वाटेत एक ओढा लागे व त्या काठी एक जागती देवी असे.'– एपिआ २६६.

**जागती जो(ज्यो)त** पहा : **जागता.** कडक; सामर्थ्याने युक्त अशी देवी, देव, मंत्र, औषध; सद्यः परिणामी; तात्काल फलदायी गोष्ट; खडखडीत दैवत; रामबाण औषधः 'जागती जोती काढिली हनुमान रूपें।' –श्रीसप्र ३.४२.

**जागती झोप–निद्रा** १. गाढ नसलेली, सावध झोप; थोडीशी चाहूल लागताच जाग येते अशी झोप. २. डुलक्या घेणे; पेंगणे.

**जागती भाषा** प्रचलित भाषा; जिवंत भाषा.

**जागतेपणा** पु. उपासकाला पावणारे, जागृत दैवत : '(तडवळ्याच्या) साऱ्या महारांची मारुतीच्या जागतेपणावर श्रद्धा होती.' – व्यंमाक १३.

**जागमाग** स्त्री. लोकांचा वावर; वस्ती : 'जवळपास जागमाग नव्हती'. – माखा ४९.

**जागर** पु. जुगारातील दानाचा एक प्रकार : 'चौदानी जुं पडत असे : कडु जागरू : नादु : बेतीया : ' – लीचपू २८.

**जागर, जागरण** पु. न. १. जागेपणा, जागृतावस्था. २. निद्रा संयमन; देखरेख; पहारा. ३. देवतेप्रीत्यर्थ विवक्षित कालपर्यंत जागण्याचा प्रकार. ४. पुनरावृत्ती; उजळणी करणे; नवे, ताजे करणे (वेद – घोषाने मंत्र); मंत्रजागर : '... या गोंधळाला वाघ्यामुरळीचें 'जागरण' असेही म्हटले जाते.'– मसंधवि १४८. [सं.जागृ] (वा.) ० **घालणे** – खंडोबाच्या नावाने वाघ्यामुरळ्या आणून, त्यांची पूजा करून, त्यांना जेवावयाला घालून नाचविणे. (माण.) [सं.जागृ]

**जागर, जागरण** पु.न. पुरातन काळचे नाटक : 'जत्रेपूर्वी १५ दिवस जागर होत असतो. जागर म्हणजे गोव्याचे मूळ नाटक' – अहागो २३७.(गो.)

**जागर, जागरण** पु. न. नारळी पौर्णिमा.

**जागरण** न. (मानस.) मेंदूला क्रियाशीलतेच्या उच्च पातळीवर आणून सावध करणारी स्थिती; ही स्थिती जालमय उद्दीपन यंत्रणेकडून वर मेंदूकडे जाणाऱ्या संदेशांमुळे निर्माण होते.

**जागरा** वि. १. अतिशय जागणारा. २. जागा राहणारा; दक्ष; सावध.

**जागरूक** वि. १. सावध; दक्ष. २. जागरणशील. ३. उघड (पुरावा).

**जागरूकता** स्त्री. सावधपणा; दक्षता; सजगता : 'आपणाविरुद्ध कोणी हूं चूं करतें काय, हे पाहण्याची जागरूकता मात्र या राजेश्रींनी भरपूर दाखविली.'– शेले १५५.

**जागरे** न. जागृती; जागेपण : 'नीद मारूनि जागरे । नांदिजे जेवी।'– अमृता ४.१.

**जागल** स्त्री. १. पहारा; राखण; सावधानता. २. पहारेकऱ्याचा पगार. ३. जागरण; जागृतावस्था.

**जा(जां)गल** स्त्री. १. जांगड; सांगड; जोडणी. २. (गवंडी) एका दगडात खाचा घेऊन त्यात दुसरा दगड बसविणे; दोन दगडांना खाचा घेऊन ते लोखंडी बाराने सांधणे. [सं.युगु]

**जागलकी, जागली** स्त्री. जागल्याबद्दलची मजुरी, राखणावळ : 'गांवांत घोडें, गाडी मुक्कामाला राहिली तर महार जागले अर्धा आणा जागलकी घेतात.'– गांवगाडा ९७.

**जागल्या–ळ्या** पु. पहारेकरी; रखवालदार; प्रवाशांच्या सामानावर पहारा करणारा खेड्यातील महार; रामोशी; रात्री गावाची राखण करणारा, पहारा करणारा : 'जागले मात्र सर्वत्र आढळतात.'– गांवगाडा ३५.

**जागव(वि)णे** उक्रि. १. जागे, जागृत करणे, ठेवणे; जागे राहून काळ काढणे: 'आपला मोठेपणा जागवत ती अशीच आचरटपणे सोसत राहाते.' – अधो ९. २. पहारा करणे ; नजर ठेवणे. ३. (सामा.) राखणे; पाळणे; ठेवणे. वाक्यरचनेत याचा पुष्कळ शब्दांशी जोडून उपयोग करतात. जसे : – अब्रू – मान – नाव जागविणे – अब्रू, नाव सांभाळणे; शील राखणे. [सं.जागृ]

**जाग(गे)सुता, जागसूद** वि. १. चटकन जागा होणारा; झोप सावध असलेला; ज्याची झोप चटकन उघडते असा : 'कव्हणी एकु नीजेला जागसुता असे' – दृपा ५२. २. जागता; सावध : 'केरूची झोप 'जागसूद'...'–बाब ५८. [सं.जागृत]

**जागा** स्त्री. पु. १. स्थळ; स्थान. २. रिकामे स्थळ; अवकाश; वाव. ३. हुद्दा; नोकरी; अधिकाराचे ठिकाण; दर्जा. ४.बदली स्थळ. ५. पाया; आधार (प्रमाण, पुरावा, समर्थन यासाठी). ६. साधन; कारण; निमित्त; सवड (कृत्यासाठी). ७. उभे राहण्याचे ठिकाण; आधार; साधन; युक्ती; बल; सामर्थ्य. ८. किल्ला; ठाणे : 'तो जागा सुरुंगाने बुरूज उडवून घेतला.'– चिशिमब ८७. ९.पहारा. [फा.जाय् + गाह] (वा.) **(दोन) जागा करणे, होणे** –दोन भाग करणे; द्विभागणे. ० **घेणे** – रिकामी केलेली जागा स्वीकारणे; बदली येणे. ० **भरणे** – नेमणूक करणे; नेमणूक होणे.

**जागा** वि. १. जागृत; झोपेत नसलेला. २.(ल.) सावध; दक्ष; सावधान : 'तन्मत मान्य मला, कीं नय तच्चित्तीं असे सदा जागा।'– मोसभा ४.१०३. ३. ताळ्यावर, शुद्धीवर आलेले (मन, वृत्ती) : 'भरतजननि जागी होय रामप्रतापें।' – वाभभा ८९. ४. स्वस्थ. [सं. जागृ]

**जागा** पु. जागर; गस्त; पहारा : 'तवं तराळ जागे घालताति : तराळीं पाचारिलें : तुम्ही कोण गा : ' – लीचउ १.११.

**जागा–गी–गे** क्रिवि. ठिकाणी; ऐवजी; बद्दल.

**जागाईत** वि. रखवालदार. पहा : **जागल्या**

**जागाईत** स्त्री. समासफळी; कागदास रेघा आखावयाची फळी : 'सुऱ्या कातऱ्या जागाईत।' – दास १९.१.१५.

**जागाजु(पा)गा** स्त्री. स्थळ; जागा वगैरे: 'मुंबईस तिकडून पुढे जाऊन जागाजुगा सोय गैरसोय पाहून.'– पलकोघे ३०१. [जागा द्वि.]

**जागाबजागा** क्रिवि. जागोजागी; ठिकठिकाणी: 'तीन्ही सरदारांचे कमावीसदार जागाबजागा बसले.'– ऐको ४२५.

**जागि(घि)रदार, जागि(घि)री, जागीर** ही रूपे विशेष प्रचारात नाहीत. पहा : **जाहगीरदार, जाहगिरी, जहागीर**

**जागिरजात** व्यक्तिगत सेनेची आवश्यकता, व्यक्तिगत सेवेचा करार.

**जागीसुती** वि. स्त्री. जागत बसलेली : 'बाप रखुमादेवीवरू माझे मानसींचा होये । तयालागीं सये मी जागीसुती'– ज्ञागा २८६.

**जागृत** वि. १. जागा; सावध. २. शक्तिसामर्थ्ययुक्त, उपासकाला पावणारे (दैवत) : 'आमच्या घरामध्ये श्रीराघवेंद्रस्वामींचे जागृत वृंदावन

आहे.'– पुंडलिक. ३. (ल.) सावधचित्त ; दक्ष; तत्पर. [सं.]

**जागृत** वि. (विअ.) विद्युन्मय; विद्युत्‌भारित; विजेचा प्रवाह वाहत असणारे (टोक).

**जागृत ज्वालामुखी** (भू.) प्रत्यक्ष उद्रेक चालू असलेला तसेच पूर्वी उद्रेक झाल्याचे पुरावे असलेला ज्वालामुखी.

**जागृति–ती** स्त्री. १. जागेपणा; सावधपणा. २. (ल.) सावधानता; दक्षता. ३. खळबळ; चळवळ; जिवंतपणा : 'आमच्या देशांत असल्या उत्सवाने जागृति करण्याचा आमचा हेतू आहे.'– टिव्या.

**जागेकर** पहा: **जागल्या** : 'घिरट्या घालिती जागेकर.' – जैअ ६३.६६.

**जागेश्वर** पु. जागती ज्योत : 'वेद तो जागेश्वरू ।' –ज्ञा ६.४४६.

**जागोजाग** क्रिवि. सर्वत्र (झाडी).

**जागोवा** पु. जागरण : 'दिहा खोलणें रात्रीं जागोवा ।' – ज्ञा १६.३४०.

**जाग्वार** पु. व्याघ्रजातीतील एक हिंस्र प्राणी : 'काळे बिबळे, काळे जाग्वार, प्यूमा, ठिपकेवाला वाघ, सिंह.' – वाघसिंह १९२. [इं.]

**जाच** पु. १. त्रास; गांजणूक; छळणूक; यातना; जेरीस आणणे; बेजार करणे : 'जाळू याचे हे कर आम्हां हा सोसवेल जाच कसा ।'– मोसभा ५.३६. २. अशांतता; व्याधी; पीडा; उपाधी; अस्वास्थ्याचे मूळ.

**जाचक** वि. जाचणारा; जाचास कारणीभूत; त्रासदायक (उद्योग, धंदा).

**जाचजुलूम** पु. अतिशय जाच; छळ; त्रास; पीडा; जुलूम इ. उपद्रव. (क्रि. करणे, चालविणे.)

**जाचण–णी, जाचणूक** स्त्री. गांजणूक. पहा: **जाच** १ : 'एकूण आताशा तुमच्या पाठीमागे मोठी जाचणी आहे म्हणायची ! '– पलकोघे ३४९.

**जाचणे** सक्रि. त्रास देणे ; छळणे; गांजणे.

**जाचणे** अक्रि. १. घट्ट बसणे; चालण्यास कठीण वाटणे, जाणे; कष्टाने हलणे किंवा प्रवेश करणे; त्रास होईल असा दाब बसणे. २. बोचक, जाचक होणे; अवमानणे; पीडणे. ३. अर्थ करण्यास कठीण जाणे (कविता, वाक्य). ४. घडून येण्यास अशक्य, असंभवनीय होणे; असंभाव्य, अशक्य असणे. ५. अडणे; खुटणे (घोडा).

**जाचना** पु. यातना; त्रास; गांजणूक : 'येमपुरीची जाचना । भोगणारू असे॥'–क्रिपु १४.१५७.

**जाचवणे** सक्रि. जाच, छळ, गांजणूक करणे : 'पडसी यमा हातीं जाचविती चौऱ्यांशी ॥'– तुगा २.२५०६.

**जाचंद–दा, जाचोंद्रा** वि. त्रास देणारा; छळणारा (मूळ, जनावर, आजारी माणूस इ.). (कु.को.)

**जाचंद, जाचोंद्रा** वि. पिचक्या डोळ्याचा; पिचका. पहा : **आचोंद्रा**

**जाचंदे, जाचवंदी–वंदे** न. अव. आईवडील; मातापिता : 'तवें श्रावणें म्हणीतलें: मीं श्रावणु गा: जाचंदे तान्हेलीं : म्हणोनि पाणियांसि आलां:'– लीचअ १०७.

**जाचिन्नणे** अक्रि. दुःख पावणे : 'कोशकिटु जैसा जाचिन्नला पैं ।'–ज्ञा १६.२८२.

**जाजती, ज्यादती** वि. जास्त; अधिक; आणखी. [अर.झियादत्]

**जाजती, ज्यादती** स्त्री. १. बढती. २. जबरदस्ती : 'जाजतीनें पुढेंच होऊन देश आपले हातून गेला हा प्रकार.'–चिशिमब ३९. ३. आधिक्य. ४. जुलूम; पीडा; अधिकपणा : 'ठाणीं इकडील असतां ज्यादती करून टिपूनें घेतलीं.'–मइसा ७.२१. [अर.]

**जाजती, ज्यादती आजार** पु. जुलूम; पीडा.

**जाजती जलाल** जुलूम : 'यात्रेकरू आले आहेत यांस कोणी कज्या भांडण व जाजती जलाल करू नये.'– ऐलेसं ७.३७८६

**जाज(जी)म** न. बसावयाची बैठक; रंगविलेल्या चिटाचे खाली खारव्याचे अस्तर असलेले वस्त्र, बिछाईत : 'फरशीवरच्या जाजमावर कोलमडून.'– अयेवाफु ६५.[फा.](वा.) **जाजमे हंतरणे** – धरल्या जागेवरून किंवा बैठकीवरून बिलकूल न हलण्याचा निश्चय करणे : 'त्या पक्षीं सोक्षमोक्ष आजच व्हावा असा निश्चय करून जाजमे हंतरून जयपूरवाल्याशी लढाई घेतली.'– ऐको ४२६.

**जाजमी छीट** जाजमाच्या उपयोगाचे एक प्रकारचे चीट; छापलेली पासोडी.

**जाजरणे** अक्रि. गांगरून बोलणे. [सं.जर्ज्]

**जाजरू** न. शौचकूप; शेतखाना. [अर.]

**जाजावणी** स्त्री. त्रास; कातावणे; अंगावर येणे; त्रस्त होणे : 'सोनीचीं बोलणीं जीं ऐकू येत होती; ती दुसऱ्या कोणाच्या उत्तरावर प्रत्युत्तरे व जाजावणीं होती.'– यख १५१.

**जाजावणे** अक्रि. १. रागावणे; कातावणे; अंगावर येणे : 'जाजावला कुरुपती बहु मानसीं रे ।' – वाविरा ७.१७१. २. त्रासणे; त्रस्त होणे: 'माहापूरें जाजावला ।' – दास ३.६.४.

**जाजावणे** अक्रि. १. चुरडणे; चिरडणे. २. मरणे; मरण पावणे (अतिश्रमाने किंवा अपघाताने).
सक्रि. निर्भर्त्सना करणे. [सं.जर्ज्]

**जाजू–जू** स्त्री. १. आळ; संशय; आरोप : 'लटिकी जाजू घेऊं नये ।' – दास २.२.२१. २. भांडण ; वितंडवाद.

**जाजोरा** पु. पोळ्याचे दिवशी मुलांना मिळणारे पैसे.

**जाज्वल–ल्य** वि. १. तेजस्वी; प्रखर (सूर्य, अग्नी). २. चकचकीत; तकतकीत (धातू). ३. गुणकारी; वीर्यवान (औषध, मंत्र). ४. तापट; तल्लख; जहाल; चलाख; उत्साही (माणूस). ५. रागीट; भयंकर; जागृत (देवता). ६. कार्यक्षम; तीक्ष्ण; उच्च दर्जाची (बुद्धी) : 'त्यांची विचारशक्तीहि मोठी जाज्वल असावी.'– नि २०६. [सं.ज्वल्]

**जाज्वल्यमान** वि. १. चकचकीत; लखलखीत. २. प्रखर; तेजस्वी (अग्नी). [सं.ज्वल्]

**जाझ** न. पाश्चात्त्य संगीताचा एक प्रकार : '... किंवा जाझ संगीताप्रमाणे उत्स्फुर्ततेने स्वातंत्र्य घेतो.' – संआक ११.

**जाट** पु. रजपुतांतील एक जात व तीमधील व्यक्ती. [हिं.]

**जाटिल्य** न. तपस्या; तप : 'कोणी येक कार्य जें तें । जाटिल्याविण न कळे ।'–दास ९.४.३९. [सं.जटिल]

**जाटी** स्त्री. छाटी. – (तंजा.) [सं.शाटी]

**जाटी** स्त्री. चाबूक. – (तंजा.) [सं.जटा]

**जाठर** वि. पोटासंबंधी; उदरस्थ. [सं.]

**जाड** न. १. घन; ठोकळा. २. आडपडदा : 'हळू हळू त्यांचें पुण्य जालें वाड। वारलें हे जाड तिमिराचे।'-तुगा ४०. [सं.जड]

**जाड** न. पचंग; कासोटा : 'एकीं वयसेचें जाड बांधलें । मग मन्मथोचिथयें कासे लागे ।'- ज्ञा ७.८५. [ते.जाडी=वस्त्र]

**जाड** वि. १. स्थूल; जाडगा (फळी). २. जाडेभरडे; खरखरीत (कापड). ३. दाट; फार पातळ नसणारा (प्रवाही पदार्थ). ४. धट्टेकट्टे; कणखर (शरीर). ५. जड ; मोठे (ओझे). ६. भारदस्त; प्रौढ; घोर; कठीण : 'प्रबंध कविता जाड वचनें।' - दास ११.६.८. ७. मोठी; भव्य; प्रचंड : 'पुजा देखतां जाड जीवीं गळालो।'- रामदास करुणा. ८. लठ्ठ; दांडगा; स्थूल (माणूस, शरीर). ९. घट्ट. पहा : **जाडा.** [सं.जड]

**जाड** वि. हत्ती, डुक्कर इत्यादींची शिकार : 'सर्वज्ञें म्हणीतलें: जाडः वाडः कोडः कवतीक : जाड पारीध हस्तीचीः वाढ पारधिवाघाची'- लीचपू २१०.

**जाडकुळा** वि. लठ्ठ : 'अशीच ही जाडकुळ्याची नि काटकुळ्याची जोडी ठेवली.' - गोतावळा २६.

**जाडगा, जाडगेला** वि. जाड; लठ्ठ; धष्टपुष्ट; गबदुल (मनुष्य, प्राणी): 'लेले किंवा काणे यांच्यासारखा अंमळ जाडगेला असा मासा त्यांस गावतो.' - नि १०६९. [सं.]

**जाडबुडी** स्त्री. कोळी (एक जंतू). (बे.) [क. जाड = कोळी]

**जाडवी** न. अव. मंगलकार्यात पावलांवर काढावयाच्या कुंकवाच्या रेघा. (क्रि.काढणे.)

**जाडसर** वि. किंचित जाड.

**जाडसुती** वि. जाड्याभरड्या सुताचे, विणीचे (कापड).

**जाडा** वि. १. पहा : **जाड.** २. मोठा विद्वान; प्रतिभासंपन्न; भारदस्त (पंडित, कविता, कल्पना, कोटी, लेख इ.). ३. भरीव; अर्थपूर्ण; गहन.

**जाडाजोड** स्त्री. मांडामांड; व्यवस्था : 'सारी जाडाजोड तर अगोदरच करून झाली होती.'- वाळवण १४८.

**जाडाधोंगडा** वि. १.ओबडधोबड; खरखरीत (वस्त्र).२. भरड दळलेले; भरडलेले; भरभरीत (पीठ).

**जाडाबार** पु. मोठा फटाका : 'जाडे बारहि लाविती धडधडी त्यांचा उठे तो ध्वनी।' - केक १४१.

**जाडी** स्त्री. १. जाडपणा; घनता. २. स्थूलता; लठ्ठपणा. ३. दाटपणा. पहा : **जाड**

**जाडी** स्त्री. धुरीच्या पुढील चाव्हरीच्या बैलांचे जू; शिवळ.

**जाडी** स्त्री. बरणी; सुरई. [तंजा.]

**जाडी** स्त्री. १. कांबळे; पांघरण्याचे जाड वस्त्र : 'चोराची जाडी (कांबळे) राहिल्याचे पाहून चक्रधर म्हणाले.'- मसंत ४६. २. वस्त्र : 'एकी अंगी फेडा : आणि जाडी फेडा : जी जी : जाडि विण न गमे:' - लीचउ ७८.

**जाडी(डे)प्रकरण** न. (उप.) असामान्य माणूस; वजनदार, विद्वान, श्रीमंत माणूस; बडे धेंड : 'वरील दोघांहूनहि जाडी प्रकरण जे वरील महाविख्यात स्वामी त्यांच्याविषयीं कांहीं लिहून हा भाग आटपतो.'- नि ३३९.

**जाडे** न. फास नेण्याकरिता गाड्यावर केलेली चौकट.

**जाडेला** वि. १. जाडा; लठ्ठ. २. जाडसर. पहा : **जाडा** [सं.जड]

**जाड्य** न. थंडी; हिव : 'भटोबास जाड्ये आले असे ' - पूजावसर.

**जाड्य** न. १. वजन; जडत्व. २. मंदपणा; आळस; सुस्तपणा. (ल.) ३. अज्ञान; मूर्खपणा. ४. औदासीन्य; बेफिकीरपणा.

**जाड्य** न. १. जडपणा; अपाचकता; अन्नाचा पचन न होण्याचा धर्म. २. अपचनामुळे पोट जड होणे; अजीर्ण. [सं.जड]

**जाड्याल** न. तेलात पदार्थ तळल्यावर शिल्लक राहिलेले तेल.(कु.)

**जाण** स्त्री. १. ज्ञान; ओळख; समज. २. कृपा, दया यांची जाणीव, कृतज्ञता; प्रत्युपकारशील वृत्ती. (क्रि. असणे.) ३. नोकरीचा किंवा श्रमाचा गौरव; गुणज्ञता; गुणाचे चीज करणे; गुणग्राहकता. (क्रि. जाणणे.)

वि. १. जाणता; समजणारा; निपुण: 'तरी जाणां नेणां सकळां।' - ज्ञा ५.१६. २. ज्ञानवान; बुद्धिवान; विचारशील. ३. लक्ष घालणारा; मानणारा; काळजी घेणारा : 'नव्हे जगीं कोणी मुकियाचा जाण।'- तुगा १४८२. ४. कृतज्ञ; उपकाराची परतफेड करणारा. ५. सज्ञान; अज्ञान, अजाण नसणारा: 'साखरेचा इंद्रावण घडू । जाणा गोड नेणा कडू।'- एभा २८.४६७. ६. भोक्ता; रसिक : 'परि सौरभ्य नेलें तिहीं। भ्रमरीं जाणीं जे ।'- माज्ञा १५.५९४.[सं.ज्ञान](वा.) ० **असणे** - म्हशीला जसजसे खाणे घालावे तसतसे तिचे कासेस अधिक दूध येत असणे.

**जाण** स्त्री. जानोसा; जानवस घर; वधू किंवा वरपक्षाचे गावात एखाद्या जागी उतरणे : 'नवरदेवनी जाण उतरनी सूर्यातळी । अशी जमकनी बाशिंगनी कळी ।।'- लोसाको.

**जाणकार** वि. ज्ञानी; समजणारा; ओळखणारा; जाणकार; रसिक.

**जाणणे** उक्रि. १. समजणे; कळणे; ज्ञात असणे; उमजणे; खात्रीपूर्वक माहीत असणे. २. (ल.) ओळखणे; दयेने, मानाने, गौरवाने वागविणे (जुन्या ओळखीच्या दीन, गरीब माणसास). ३.जाणीव असणे; मान्य करणे; मानणे; प्रत्युपकाराची, मोबदला देण्याची बुद्धी असणे. (नोकरी, श्रम, उपकार याबद्दल). ४. गुणविशेष माहीत असणे. ५. लाभानुरूप वागणे. [सं. ज्ञा]

**जाणत, जाणतजाणत** क्रिवि. जाणूनबुजून; समजूनउमजून; जाणून.

**जाणतमूर्ख** वि. जाणत असून मूर्खपणाचे ढोंग करणारा; ढोंगी मूर्ख.

**जाणता** वि. १. शहाणा : 'भव बुडवी म्हणुनिच तव भजनीं सनकादि जाणता रमला।'-मोउद्यो ६.१. २. निपुण; तरबेज; हुशार (रोग बरा करण्यात, सूतिकाशास्त्रात)- पंचाक्षरी; मांत्रिक; वैद्य; पशुवैद्य. ३. (ल.) धूर्त; लुच्चा (जसे :- चोराचा माग लावणारा, पाण्याचा थांग लावणारा). ४. निवाडा करणारा; न्यायाधीश. ५. एखाद्या गोष्टीचा गौरव करणारा; गुणग्राहक; आश्रयदाता. ६. (श्रम, उपकार इ.) ओळखणारा; जाणणारा.७. परीक्षा करणारा; बऱ्यावाईटाची पारख करणारा. ८. वयात आलेला; सजाण. ९. वडीलधारा (माणूस). [सं. ज्ञा]

**जाणती** स्त्री. बुद्धी : 'धर्माधर्म रूपें जियें । तियें न चोजवितां जाये । जाणती जे कां ।' - ज्ञा १८.७२०. [सं.ज्ञा]

**जाणती** स्त्री. वयात आलेली स्त्री; सज्ञान. (वा.) ० **होणे** - ऋतुस्नात होणे; न्हातीधुती होणे.

**जाणती कळा** १. परिपक्व, पूर्ण ज्ञानाचे तेज. (जाणपणा आल्यावरचे); बुद्धीची चमक (क्रि. येणे.) २. अप्रत्यक्ष विषय दर्शन ; त्रिजगत आणि त्रिकाल यांमधील गूढ वस्तूंचे ज्ञान. ३. ज्याच्यामुळे भूतबाधा जाणली जाते असा एक मंत्र.

**जाणपण** न. १. ज्ञान; विद्वत्ता : 'संतापुढें जाणपण । सर्वथा आपण न मिरवावें ।' – एभा ३.३५७. २. जाणतेपण : 'जाणपणें न पिएति आंब ।' – शिव ८४. ३.अस्तित्व : 'तेवीं द्वंद्वांचें जाणपण जाणवी असे जें ज्ञान ।' – एभा ३.४११.

**जाणवणी** स्त्री. १. सूचना; इशारा. २. जाणीव : 'ऐसी होतां जाणवणी' – रापं १.१२९.

**जाणवणे** उक्रि. समजणे; कळणे; जाणणे; जाणीव होणे : 'ऐसा मानी विचारी । तव जाणवते मुरारी ।' – कक १.४.१०४.

**जाणवसा** पु. **वस्ती.** पहा : **जानवसा**

**जाणवाय** स्त्री. १. शहाणपणा. २. जाणीव. (गो.)
वि. फाजील प्रौढी बाळगणारा; चढेल. (गो.)

**जाणविणे** उक्रि. १. समजाविणे; जाणण्यास लावणे. २. समजावून, कळून देणे; आपले अस्तित्व भासविणे. ३. बाधणे; अपायकारक परिणाम करणे (औषधे, सराव नसणाऱ्या गोष्टी इ.). [सं.ज्ञापय]

**जाणस(सा)ळ** वि. चतुर; जाणणारा. पहा : **जाणता**
स्त्री. चातुर्य; नैपुण्य ; ओळख; माहिती.

**जाणस(सा)ळणे** अक्रि. जाणत असणे; चतुर असणे; निपुण असणे; अनुभव आणि व्यवहार असणे.
सक्रि. परीक्षा करणे; पारखणे; अनुभव पाहणे.

**जाणा** पु. १. प्रियकर; सखा. २. मंत्रविद्या जाणणारा : 'गांवोगांविचे गुणीए : जाणे : जोइसी : मंत्रवादी मातें फेडावया एति' – लीचपू ३५.

**जाणावे** न. ज्ञेयविषय; जाणण्याची गोष्ट : 'जाणता ना जाणणें । जाणावें उरे ।' – ज्ञा १८.५३३. [सं.ज्ञेय]

**जाणिजे** सक्रि. (आज्ञार्थ) जाणावे; समजावे की; जाहीर करितो की; ध्यानात आणावे (पत्रामध्ये हा शब्द नेहमी योजितात).

**जाणिवा** क्रिवि. जाणूनबुजून : 'जाणिवा आंब न पिया : तरि हे काइ होए ऐसें तुम्हीचि वीचारा पां :' – लीचउ ५४७.

**जाणी** वि. ज्ञानी; शहाणा : 'तिअें वांसुरुवें तरि जाणी ।' – वच्छह ३२६. [सं.ज्ञानी]

**जाणीतणे** सक्रि. जाणवणे : 'वृक्षच्छायेसि बैसतां मदन । जाणीतला मानसीं ।' – मुआदि १३.७७

**जाणीव** स्त्री. १. जाणण्याची शक्ती ; विषयग्रहणशक्ती; बुद्धी : 'नातरा जाणिवेच्या आयणी ।' – ज्ञा २.१२९. २. समज; समजूत; ज्ञान : 'म्हणोनि जाणीव स्फुरविसी ।' – परमा १.१३. ३. भावना.[सं. ज्ञा]

**जाणीवकळा** स्त्री. ज्ञान; आत्मशक्ती : 'प्राणी व्हावया मोकळा । आधी पाहिजे जाणीवकळा ।...सहज चि होये ।।' – दास ९.८.५०.

**जाणीवपूर्वक** क्रिवि. समजूनउमजून.

**जाणुपण** न. ज्ञान; जाणीव : 'परि एकेकासी थोर अभिमानु। जाणुपणाचां ।' – वच्छ १७१.

**जाणू–णो** जणू; जणूकाय; जसे काय ; यासारखे; माझ्या मते. [हिं. जाने]

**जाणून, जाणूनसमजून, जाणूनपुसून–बुजून,** क्रिवि. समजूनउमजून; विचारपूर्वक; बुद्धिपुरस्सर; उघड्या डोळ्यांनी : 'मुला, जाणून पुसूनच हा कागद मी तुला दिला.' – बाळमित्र २.६५.

**जाणे** अक्रि. १. गमन करणे; चालू लागणे; प्रवास करणे; पुढे सरणे; पूर्वस्थळ सोडणे. २. पूर्वस्थळ सोडून विवक्षित स्थळ गाठणे; स्थलांतर करणे. ३. निघून जाणे; नाहीसे होणे; नाश पावणे; हरवणे; हलविलेले असणे. ४.लोटणे ; क्रमणे (वेळ). ५. छिद्रादिकांत प्रवेश करणे; आत शिरणे; समाविष्ट करणे. ६. (विशेषतः भूतकालात उपयोग) वाया जाणे; नासणे; निरुपयोगी, टाकाऊ होणे; खराबणे. ७. घडून येणे; होणे (नजरचूक, गुन्हा, योग्य किंवा रूढ मार्गाचे उल्लंघन). ८. एखाद्याकडून चुकून होणे, घडून येणे (गफलतीने एखादी चुकीची गोष्ट). ९. वजा होणे; कमी होणे. १०. निर्बल होणे; शक्ती जाणे; गुण जाणे (इंद्रिये, औषधे यांचा ). ११. अनुसरणे; पाठीमागून जाणे; वैधणे; अभिलषित होणे ( मन, डोळे, कान, प्रीती इ.) (वर अथवा कडे शब्दाबरोबर प्रयोग). १२. दिले जाणे. (शब्द, वचन – भूतकाळी उपयोग). १३.विझणे (दिवा, प्रकाश, अग्नी). १४. ऱ्हास, नाश होणे. झिजणे (शरीर). १५. एखाद्या स्त्रीशी रत होणे; संभोग करणे. १६. एखादा पदार्थ विवक्षित कालपर्यंत टिकणे. कोणत्याही क्रियापदाच्या वर्तमानकालवाचक विशेषणाबरोबर ह्या क्रियापदाचा उपयोग केला असता त्याचा अर्थ क्रियासातत्य दर्शविण्याकडे होतो. उदा. १. जसा व्यापार वाढवाल तसा मी पैसा देत जाईन. २. सकर्मक क्रियापदाच्या पूर्णभूतकाळाबरोबर उपयोग केला असता कर्मकर्तरीचा अर्थ होतो. जसे :– तुला शिक्षा केली जाईल. ३. ऊनप्रत्ययान्त धातुसाधिताशी उपयोग केला असता याचा अर्थ क्रियापूर्णता दर्शविण्याकडे होतो. जसे :– तळ्यातील पाणी आटून गेले. ४. दुसऱ्या क्रियापदाच्या आज्ञार्थी रूपानंतर ह्या क्रियापदाच्या आज्ञार्थाचा उपयोग केला असता पहिल्या क्रियापदावर जोर दिला जाऊन, क्रियेचा जोरदारपणा सिद्ध होतो. जसे – आण जा; ठेव जा; दे जा; कर जा इ. [सं.या]
(वा.) **जाजा येये करणे** – निरर्थक पुनःपुनः जाणे येणे; खेपा. (क्रि. घालणे)

**जाणे** अक्रि. सती जाणे : 'परसोजी महाडिक मेले. बायको जात होती त्यास वराणजी मोहिते याही जाऊं दिल्ही नाहीं.' –ऐको ४२६.

**जाणेयाचा** वि. जगण्याचा : आजां भरंवसा जाला । जाणेयांचा ।।' – राज्ञा ११.६६१.

**जाणो** उअ. जणू; जणू काय; जसे काही : 'कांटाचि काढिला तो जाणों तव सूनुच्या मना मधिला ।' – मोकर्ण ४.१५. [सं.जाने]

**जाणोपरी** क्रिवि. पाहण्यात; देखत; जाणण्याच्या वेळेपासून; अनुभवाच्या, सज्ञानपणाच्या, जाणपणाच्या काळापासून.

**जात** न. बैलांची जोडी; जोते.(गो.) [सं.युति]

**जात** स्त्री. रजःकण; बिंदू; लवलेश (नकारार्थी उपयोग).

**जात** स्त्री. स्वतः : 'आतां मदार नाना यांचे जातीवर आहे.' – ऐटि १.२५.[अर.](वा.) **(आपले) जातीवर करणे, घेणे, देणे,**

**भांडणे** –स्वत:च्याच अकलेने, शक्तीने आणि साधनांनी कोणतेही कृत्य करणे.

**जात** न. समुदाय; जमाव; समूह; समुच्चय; संघ : 'तैसा विषय जातांचा गरा। वाजो नेदिजे इंद्रियद्वारा।' – ज्ञा १६.९०. नेहमी समासात उपयोग. याची उदाहरणे असंख्य आहेत. जसे :- वस्त्रजात = सर्व प्रकारची वस्त्रे; वस्त्रांतील सर्व प्रकार, नमुने. याचप्रमाणे धातुजात, शब्दजात, गुणजात, अर्थजात, द्रव्यजात इ. [सं.]

**जात** वि. उत्पन्न केलेला; विशेषत: समासात उपयोग. उदा. वृक्षजात, फलजात, जलजात, कमलजात. जेव्हा जा हे समाजामध्ये दुसरे पद असते तेव्हा त्याचा अर्थ – च्यापासून उत्पन्न झालेला, जन्मलेला असा होतो. परंतु जेव्हा पहिले पद असते तेव्हा – ला झालेला असा अर्थ होतो. जसे :– 'पक्षी जातपक्ष झाले म्हणजे आईला सोडतात.' याप्रमाणे जातक्रोध, जातकाम, जातलोभ = क्रोधाने, कामाने, लोभाने आविष्ट व क्रोधजात, कामजात, लोभजात = क्रोधापासून इ. झालेला. असे दोन्ही प्रकारचे समास वाटेल तितके होतात. जसे :– गर्भजात, संस्कारजात, आनंदजात, दु:खजात, सुखजात इ. [सं.]

**जात** क्रिवि. पूर्णपणे. गुणविशेषणाचे पूर्वी जोर येण्यासाठी एक या शब्दासह उपयोगात येतो. जसे :- एकजात पांढरा, एकजात पिवळा, एकजात मऊ = पूर्ण पांढरा, पूर्ण पिवळा, पूर्ण मऊ.

**जात** स्त्री. १. प्रकार; वर्ग; कूळ; वंश; परस्परांविषयी एकत्वाची आणि इतरांपासून भिन्नत्वाची भावना असलेला माणसाचा समूह. २. जन्मस्वभाव; मूळ स्वभाव; अंगचा गुण. ३. हिंदू धर्मातील ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे चार वर्ण. यातून व्यवसायपरत्वे, जन्मामुळे किंवा इतर कारणांनी निर्माण झालेले भिन्न जनसमूह. पहा : **जाती**. [सं. जाति] (वा.) **जातीवर जाणे, येणे** – मूळ स्वभावाप्रमाणे करणे; स्वभावात बदल न करणे: '... हे मुसलमान... जातीवर गेल्याशिवाय राह्यचे नाहीत.' – एल्गार ४९.

**जातइनाम** न. स्वत:च्या हयातीपुरते, वंशपरंपरेचे नव्हे असे इनाम.

**जातक** न.१. जन्मकाळच्या ग्रहांच्या स्थितीवरून माणसाच्या आयुष्यात घडणाऱ्या शुभाशुभ गोष्टीविषयीचे वर्णन करणारा ज्योतिषशास्त्राचा एक विषय, फलज्योतिष : 'नंदें जातक वर्तवून । बळिभद्र नाम ठेविलें।' – हरि ३.५३. २. कुंडली इत्यादीवरून भविष्य वर्तविणे. ३. विवाह जुळविण्यास लागणाऱ्या आठ गोष्टींपैकी एक. ४. पहा : **जातकर्म** [सं.]

**जातक** न. स्नेह, अनुरूपता.

**जातक** पु. भिक्षू.

**जातककथा** स्त्री. बुद्धधर्मातील कथा : 'जातककथांतून तो मानवप्रेमी'– गादे १२.

**जातकतबा** पु. (कायदा) जातमुचलका.

**जातकरी** पु. जातीतला माणूस; जातिबांधव.

**जातकर्म** न. पुत्रावण; नूतन जन्म पावलेल्या बालकाचा पित्याने करावयाचा संस्कार. हा संस्कार सोळा संस्कारांपैकी आहे : 'जातकर्म नामाभिधान । कटिसूत्र अन्नप्राशन ।' – भाराबाल ७.१२. [सं.]

**जातकशी** पु. स्वत: शेत नांगरणारा; स्वत: कसणारा.(गो.)

**जातकसबी** वि. पिढीजात एकच धंदा करणारा : 'शेतकरी, सुतार... वगैरे गावचे जातकसबी इत्यादिकांकडून ते (शिक्षण) देण्याची सोय झाली.'–गांवगाडा १८८.

**जातकु(कू)ळ–ळी** स्त्री. न. जात आणि वंश यासंबंधीची सर्व माहिती (लग्नाच्या वेळी ही शोधून काढून हिचा विचार होतो).

**जातखत** न. हमीपत्र; जामीनपत्र : 'ऐसियास पाटीलकी तुमची आणि आपले जातखत गुंतले यास्तव ३५०० शें रु. चे गावकरी यांचे खत घेतले.' – ऐको ४२७.

**जातखूद** क्रिवि. स्वत: होऊन; जातीने. [अर.]

**जातखेवो** क्रिवि. जाताक्षणीच : 'जैसें शंका जातखेवो लोपे । सापपण माळेचें ।' – ज्ञा ९.७३.

**जातगंगा, जातजमात** स्त्री. एकंदर सर्व जात; एकत्र जमलेली सर्व जात (जातीत घेणे, बाहेर टाकणे इ. प्रश्नांचा विचार करण्यासाठी).

**जातगोत** न. स्वत:ची जात आणि स्वत:च्या गोत्रातील माणसे याबद्दल समुच्चयार्थी; आपल्या जातीची व गोताची माणसे.

**जातचावडी** स्त्री. सरकारी गावचावडीखेरीज एखाद्या जातीने स्वतंत्रपणे बांधलेली निवाडा कचेरी : 'सार्वजनिक कामासाठीं गांवचावड्यांखेरीज स्वतंत्र जातचावड्या बांधल्या.' – गांवगाडा ५५.

**जातचौगुला** पु. जातीतल्या, जातपंचायतीतल्या अम्मलदारांतील प्रमुख.

**जातजेवण** न. सर्व जातीला दिलेले जेवण; जातीतील सर्व माणसांची पंगत; ज्ञातिभोजन.

**जातनिशी, जातनिसबत** क्रिवि. खास स्वत:; खुद्द आपण; जातीने.

**जातनी** स्त्री. १. ठाऊक असणे, होणे; वार्ता; गवगवा. २.(ल.) रिकामपणाच्या गप्पा.

**जातपत्र, जातमुचलका** न. पु. स्वत:च्या नावाने केलेला करार, करारनामा. स्वत:ची लेखी जबानी; स्वत:संबंधी करारपत्र.

**जातपरजात** पु. वंशपरंपरा.

**जातपंच** पु. जातीतील प्रमुख अधिकारी : 'वडर, कैकाडी, कोल्हाटी, कुंचेवाले वगैरे जातींत ब्राह्मणाला न बोलावता जातपंच लग्ने लावितात.' – गांवगाडा ११३.

**जातपंचायत** स्त्री. न्यायनिवाडा करणारी जातीतील प्रौढ व्यक्तींची समिती : 'प्रत्येक जातीला परंपरागत अशी एक विशिष्ट आचारपद्धती असते. ती पाळली जाते की नाही हे पाहण्याचे काम जातीतील वृद्ध व आदरणीय व्यक्तींच्या जातपंचायतीकडे असते.' – हिंसअन्व २५.

**जातपाटील** पु. जातीने नेमून दिलेला मुख्य अम्मलदार. पहा : **जातचौगुला**

**जातपात** स्त्री. १. जातीची, गोतांची वंशातील माणसे. पहा : **जातकुळी, जातगोत**. २. पहा : **जातगंगा**

**जातपूत, जातिपुती–पूत** स्त्री. जात आणि वंश. पहा : **जातगोत** [सं.जाति + पुत्र]

**जातपूतचा** वि. शुद्ध वंशाचा, बीजाचा; कुलीन.

**जातभाई–ऊ** पु. जातिबांधव; स्वजातीय माणूस: 'आपल्या जातभाईच्या

हिताकरिता सरकार त्या सवडीचा कसा दुरुपयोग करीते' - टिकेले १.५०२.

**जातमुखतार** वि. १. अगदी स्वतंत्र; बंधनापासून मुक्त. २. कुलमुखत्यार; कुलकारभारी. ३. जातचौगुला, जातपाटील.

**जातमुचलका** पु. (न्याय.) ठरलेल्या तारखेला न्यायालयात उपस्थित राहणे, कर्ज चुकते करणे यांसारख्या बाबी पूर्ण करण्याची हमी देणारे, न्यायालयात किंवा दंडाधिकाऱ्यापुढे केलेले बंधपत्र.

**जातमुबारक** स्त्री. खुद्द; श्रीमंत; राजा; स्वामी : 'सरकारचें जातमुबारकेचें लक्ष सोडून जे असतील त्यांचा बंदोबस्त मनोदयानुरुप केला जाईल.' - मइसा ७.२९. [अर.]

**जातलग** वि. १. मोठ्या कुळातील, जातीतील (जनावरे, फळे). २. स्वतःच्या जातीचा; जातीसंबंधीचा. (कर.)

**जातवेद** पु. अग्नी : 'सुटत शर धडाडी पेटिजे जातवेदें।' - मुरामायुद्ध २१८. [सं.]

**जातव्यवहार** पु. स्वत: व्यवहार करण्यास योग्य; पंधरा वर्षापुढील तरुण माणूस; सज्ञान.

**जातसरंजाम, जातजागीर** पु. लष्करी सेवेबद्दल स्वत:चा पगार म्हणून मिळालेली जागीर किंवा इनाम; उत्पन्नाचा जेवढा भाग शिलेदाराच्या, सरदाराच्या अगर मुत्सद्याच्या स्वत:च्या निर्वाहार्थ दिलेला असतो तो; जातीनिशी लष्करी चाकरी केली पाहिजे या करारावर दिलेला सरंजाम.

**जाता** न. पहा : **जाते**

**जातापाय-या** पु. ऱ्हास; क्षय; नाश; उतरती कळा. (क्रि. येणे, लागणे, होणे, सुचणे.)

**जाताबाकी** स्त्री. (कारकुनी) पगार देऊन किंवा खर्च करून राहिलेली बाकी; शिल्लक.

**जाति-ती** स्त्री. १. (संगीत) रागाचा आरोह व अवरोह ह्यामधील स्वरसंख्येवरून रागाचे जे प्रकार होतात ते प्रत्येकी. त्यांची संख्या ९ आहे. २. (संगीत) न्यास, अंश, ग्रह इत्यादी स्वर, तसेच ताल, कला, मार्ग हे ठरावीक असून अमुक एक रस उत्पन्न व्हावा अशी योजना ज्या एखाद्या नियमबद्ध स्वररचनेत असते तो. हिचे प्रकार दोन - शुद्ध जाती व विकृत जाती. ३. (संगीत) मात्रानियमावरून तालांचे झालेले प्रकार प्रत्येकी. [सं.]

**जाति-ती** स्त्री. १. जात; प्रकार; वर्ग. २. वंश; कूळ; बीज. ३. वर्ण. पहा: **जात** [सं.]

**जाति-ती** स्त्री. (सास.) १. एक अलंकार. २. छंदाचा एक वर्ग. [सं.]

**जाति-ती** स्त्री. अंश व छेदांचे एकीकरण. उदा. विशेष-शेष जाती. [सं.]

**जाति-ती** स्त्री. १. जाई; वेल व फूल : 'जैसे जातीचे मुकुल। कां तेज परी शीतल ।' - ज्ञा १६.११५. २. मालती; चमेली. [सं.]

**जाति-ती** स्त्री. वादातील दुसऱ्या प्रकारचा दोष. स्वत:वरही उलटण्यासारखे दुसऱ्याला दिलेले दूषण.

**जाति-ती** स्त्री. (तत्त्व, तर्क) नर-मादीत लैंगिक संबंध होऊन, प्रजोत्पादन होऊ शकते असा जैविक वर्गीकरणाचा प्रवर्ग.

**जातिअंध** पु. गरगर फिरवून भोवळ आणण्याचा एक खेळ : 'मग गोसावी उभे ठाकले : बाइ : या : एथौनि जातिअंधाचा खेळु दाखवीजैल : जातीअंधा बाहुबळ : ' - लीचउ ३५९.

**जातिगत पद्धती** (राज्य.) समाजातील एखाद्या संपूर्ण वर्गाशी किंवा समूहाशी संबंधित किंवा त्यांना लागू असलेली पद्धती.

**जातिगंड** पु. जातीबद्दलच्या अभिमानाने पछाडणे : 'तो प्रश्न म्हणजे जातिगंड' - केतका ७८.

**जातिजुती** स्त्री. जाईजुई : 'जातिजुती पानें पोफळें परिएळी' - मधउ ५४.

**जातिदंड** पु. १. जातीने लादलेला कर. २. जातिबहिष्कृत माणसाने शुद्ध झाल्यावर जातीला द्यावयाचा दंड.

**जातिनिहाय** वि. जातीप्रमाणे; जातवार : 'लोक जातिनिहाय मत देतात.' - दोहस ७२.

**जातिपक्ष** पु. सामुदायिकरीत्या जात (सबंध जात एक धरून विचार करताना).

**जातिपुती-पूत** स्त्री. वंश; कुळी. पहा : **जातपूत**

**जातिपुतीचा** वि. खानदानीचा; कुलीन.

**जातिप्रमाणपत्र** न. (समाज.) १. विशिष्ट जातीत जन्मल्याबद्दलचे अधिकृत पत्र. २. जातीचा दाखला.

**जातिप्रवृत्ति-त्ती** स्त्री. (समाज.) जातीच्या वर्तनाचा स्वाभाविक कल.

**जातिबहिष्कार** पु. (राज्य.) वाळीत टाकणे; आपल्याच जातीतून बहिष्कृत करणे.

**जातिभेद** पु. वंश, वर्ण अगर निरनिराळे उद्योग यावरून समाजाचे पडलेले वेगवेगळाले गट. जातीजातींत भिन्न आचार, रूढींमुळे जातिभेद उत्पन्न होतात. जातींमधील भिन्नत्व, असमानता. [सं.]

**जातिभ्रष्ट** वि. जातिबहिष्कृत ; जातिबाह्य; बाटगा.

**जातिभ्रंश** पु. जातिबहिष्कृत होणे; जातीस मुकणे.

**जातिमर्यादा** स्त्री. जातीचे नियम (चालचलणुकीचे); जातीने घालून दिलेले बंधन.

**जातिलक्षण** न. जातीचे विशेष किंवा सामान्य गुणधर्म. जातीची रीत, वर्तन.

**जातिवंत** वि. १. उच्च घराण्यातील, कुळातील; खानदानीचा; घरंदाज; कुलीन; उत्कृष्ट : 'किजविज करिताती जातिवंत पाखरे ।' - सला ४१. २. पहा : **जातलग**

**जातिवाचक** वि. १. (व्या.) वर्ग-प्रकार-भेददर्शक (संज्ञा). २. सामान्य, वर्गवाचक (नाम).

**जातिवाचक** वि. जातीचे नाव, उल्लेख असलेली. उदा. जातिवाचक शिवी इ.

**जातिविखय** पु. जातिवंत, उत्तम भोग : 'जें विखो त्रीवीध : एकु जातिविखो : एकु वैजात्यविखो : एकु ग्रामविखो: जयांमाजि जातिविखो तो उत्तमु :' - लीचउ ३५५.

**जातिवैर** न. जन्मत: असणारे शत्रुत्व; स्वाभाविक वैर.

**जातिव्यवस्था** स्त्री. (समाज.) समाजात निर्माण झालेल्या जातीनुसार केलेली समाजाची व्यवस्था यामध्ये रोटीबेटी व्यवहार उच्चनीचता, स्पृशास्पृशता यासंबंधीचे नियम येतात. [सं.]

**जातिव्यवहार, वेव्हार** पु. विशिष्ट समाजामध्ये प्रचलित असलेल्या चालीरीतींचे आचरण : 'कीं जातिवेव्हारा परौता ।' – ऋव १४.

**जातिसंस्था** स्त्री. अनेक जातीजमातींत विभागलेली समाजव्यवस्था.

**जातिसंहार** पु. एखाद्या विशिष्ट वांशिक किंवा राष्ट्रीय गटाचा हेतुपुरस्सर संहार करणे.

**जातिसूध** वि. जातिशुद्ध; शुद्ध जातीचा; उत्कृष्ट : 'ऐसा जातिसूध थोडा एकु आति :' –लीचपू ३१.

**जातिस्मर** न. पूर्वजन्मीचे स्मरण असलेला : 'ती जातिस्मर असतात.' – युगान्त १५९.

**जातिस्मृति–ती** स्त्री. पूर्वजन्मस्मरण : 'मग जाहली जातिस्मृती ।' – गुच ११.९२.

**जातिस्वभाव** पु. १. कुळाचा, जातीचा, वर्गाचा स्वभाव; जातिलक्षण. २. जन्मस्वभाव; प्रकृतिस्वभाव.

**जातीचा** वि. १. जातीने; जातीसंबंधाने. २. जन्मस्वभावाचा; जातिवंत; अस्सल : 'तुका म्हणे तेथें पाहिजे जातीचें । येरा गबाळाचे काम नोहे ।' –तुगा ३५८७. ३. खानदानीचा; मोठ्या कुळातला.

**जातीचा** वि. स्वतःचा : 'इंद्रोजी कदम... जातीचे घोड्यास चांदीचे नाल करून नालबंदी करीत होता.'–मदरू १२५.

**जातीचे आंगवण** स्वांगेकरून पराक्रम; स्वतःचा आवाका : 'गोहदकर जाट यांचा इरादा ग्वालेर घ्यावी हे. परंतु जातीचे आंगवण थोडे तथापि उद्योग करीतच होता. तो ग्वालेर श्रीमंतांनीं शिंद्यास दिली.' – ऐको ४२७.

**जातीचे लेकरू** ( ल.) लुच्चा, लबाड माणूस.

**जातीण** स्त्री. १. भात भरडण्याचे मोठे लाकडी जाते. २. जात्याच्या आकाराचे दारूचे झाड. ३. जात्याची पेड, तळी; जाते. (राजा.) पहा : **जातण** (को.)

**जातीने** क्रिवि. १. स्वभावतः ; जन्मस्वभावाने. २. स्वतः; खुद्द : 'लढाई घेऊ जातीने'– ऐपो ३९१.

**जातीपत्री** स्त्री. जायपत्री. [सं.]

**जातीफळ** न. जायफळ. [सं.]

**जातीयता** स्त्री. जातीजातीतील भिन्नत्व.

**जातीय निवाडा** (राज्य.) १. जातीजातींतील हक्कासंबंधी न्यायनिवाडा, फैसला. २. ब्रिटीश सरकारने ऑगस्ट १९३२ मध्ये भारतातील विविध धर्म व जाती यांचा राजकीय प्रश्न सोडवण्यासाठी जाहीर केलेला निर्णय. या निवाड्याप्रमाणे मुस्लीम, अस्पृश्य, शीख, अँग्लो इंडियन यांना स्वतंत्र मतदारसंघ देण्यात आले.

**जातीयवाद** पु. (राज्य.) राष्ट्र किंवा एकूण समाज यापेक्षा आपला धर्म किंवा जात यावर अधिक निष्ठा ठेवण्याची प्रवृत्ती.

**जातीस** सर्व. स्वतःस : 'जातीस जखम लागली व बसावयाच्या घोड्यास जखमा लागल्या, मोठी शर्त केली.' – ऐको ४२८.

**जाते** न. दळण्याचे साधन, यंत्र; धान्य दळून पीठ करण्याचे दगडी साधन. (क्रि. ओढणे. फिरवणे) घट्टी; घंटी; चक्की; जातीण: 'दळुनिया पीठ केलें । काळ बैल तेहि गिळी । ऐसें हें दुष्ट जातें । बहुतां जनांला छळी ।' – मध्वक ३८९. [सं.यंत्र]

**जाते** न. मुलींचा एक खेळ.

**जाते उकट्या** वि. टाकी लावणारा.

**जाते परते** वि. उपरे; तात्पुरते : 'वतनी चाकर जातेपरते नाही.' – पेद २.९२.

**जात्य, जात्यत्रिभुज** न. (भूमिती) काटकोन त्रिकोण. [सं.]

**जात्य युग्म** (उपकरण) (ग.) कंपासपेटीतील, एक कोन काटकोन असणारी त्रिकोणी आकाराची उपकरणे.

**जात्य समांतरपृष्ठक** (ग.) ज्याचे सर्व पृष्ठ समारंतरभुज चौकोन असतात असा बहुपृष्ठक.

**जात्यस्मरत्व** न. मागील जन्मातील स्मरण : 'त्यासि जात्यस्मरत्व जाले : मी अमुकी : ऐसी मागील अवघी वेवस्ता सांघीतली :' – लीचपू २८१.

**जात्यंध** वि. १. जन्मांध; उपजत आंधळा. २. (ल.) जातीच्या अहंतेमुळे ज्याची दृष्टी दूषित झाली आहे असा; जातीच्या फाजील अभिमानामुळे ज्याचा तोल गेला आहे असा. [सं.]

**जात्यंध क्रिडा** एक प्रकारचा खेळ : 'जात्यंध क्रिडे लघुत्व प्रगटीयें करणें:'– लीचउ ३५९ (शीर्षक)

**जात्या–त्यां** क्रिवि. १. स्वभावतः; प्रकृत्या. २. स्वतः; जातीने : 'अन्नदान करीत असतां आपण जात्या आपले स्वकर्मी उजू तवाजू करून'– भाब ५२.

**जात्रा** पहा : **जत्रा**

**जात्रेकार** वि. जत्रेला गेलेला, जाणारा; यात्रेकरू.

**जाथू** क्रिवि. कायम; सतत; नेहमी; नियमितपणाने (नोकरी, होणारा नफा, घडून येणारी गोष्ट).

वि. फार दिवसांची (जुनी, रूढ– चालरीत).

**जा(ज्या)दा** पु. १. अधिक; जास्त. २. विशेष; निराळे; स्वतंत्र. पहा : **जवाद** [अर.]

**जादा तलबी** स्त्री. फाजील मागणी, तगादा : 'स्वराज्याचा अंमल वाजवी मामूलप्रमाणे देत जावा, ज्यादा तलबी न करावी.' – खलप २.११३.

**जादू** स्त्री. १. माया; चेटूक; इंद्रजाल; पिशाच्चविद्या; जारणमारण; अभिचार; शाबरीमंत्र. २. या विद्येचा प्रयोग. [सं.यातु]

**जादूग(गा–गी)र** वि. १. जादू करणारा; चेटक्या. २. जादूविद्या जाणणारा. ३. कपटी ; हिकमती. [फा.]

**जादूग(गि)री** स्त्री. चेटूक; मोहिनी. पहा : **जादू** : 'जादूगिरी नजरबंदीनें दृष्टी फसते. पण कारकुनी कलमबंदीनें सृष्टी फसते.'– रासं १८.[फा.]

**जादूचा कंदील** पु. पडद्यावर चित्रे अगर देखावे दाखविण्याकरिता उपयोगात आणतात तो तीव्र प्रकाशाचा कंदील.

**जादूटोणा** पु. १. जादूविद्या; भुताटकी, मंत्रतंत्र, जादू यांना व्यापक संज्ञा : '... जादूटोण्याचा उपयोग करून निसर्गशक्तींना कह्यात आणण्याचा प्रयत्न' – मसं १३५. २.(ल.) मोहिनी. [फा.]

**जादह** पु. मार्ग मुधो [अरं.]

**जान** न. हानि; नुकसान.(व.) [फा.; सं.]

**जान** पु. स्त्री. १. जीव; आयुष्य. २. प्राण, आत्मा : 'वजीरखानासी बाण लागतां हौद्यांत जान सोडिली ।' – इपुस्रिपो २१४. ३. (ल.) प्रियकर; प्रिया. [फा.]

**जान** पु. लग्नाची वरात.

**जा(ज्या)न** पु. लोकरीचा गावठी गालीचा; बुरणूस.
**जानक-कों** पु. देवाला बळी द्यावयाचा रेडा.(गो.)
**जानकु(खो)ड** न. वखराच्या खोडावर पास बसविण्याकरिता लाविलेले उभे खुंटे; वखराचे दाते, पाय; जानोळे. (व.)
**जानगिरी** स्त्री. १. नुकसान; खराबी; संकट. २. खून : 'तेथे युद्धप्रसंग होऊन तुमची जानगिरी होईल.' - शारो ११४.
**जानगुदाझ** वि. प्राणघातक. [फा.]
**जानजवान, जानज(ब)मान** वि. तरणाताठा; जवान.
**जानतलग** वि. आजीव; हयातीपर्यंत; तहहयात : 'कंपनी सरकारकडून पेन्शन उभयता बायांस जानतलग दोन हजार चालवीत आहेत.' - ऐको ४२९.
**जानदार** वि. जेमतेम जिवंत; अतिशय आजारी; क्षीण (दुखणेकरी). (कों.) [फा.]
**जाननिसारी** स्त्री. प्राण ओवाळणे. [फा.]
**जानपछान - पहचान** पु. ओळखीचा माणूस; स्नेही.
स्त्री. परिचय; ओळख; ओळखदेख: '... एका वेटरशी आमची थोडी जानपछान झाली होती.' - गोप्र २०९. [सं.ज्ञान + प्रत्यभिज्ञान]
**जानपद** वि. खेड्यातला; खेडेगावचा; ग्रामीण.
पु. निवासी; मुल्की; रहिवासी.
**जानपदता** स्त्री. निवासाधिकार. [सं.]
**जानपदप्रतिरक्षा** स्त्री. मुलखाचे संरक्षण; असैनिक संरक्षण. [सं.]
**जानपर्वर्जी** स्त्री. जीवाचे पोषणास, जातीच्या खर्चास दिलेले उत्पन्न.
**जानफिशानी, ज्यांफिशानी** स्त्री. जिवावर उदार होणे; प्राणार्पण; आत्मयज्ञ : 'याजवर मी उत्तर केलें नोकर खाविंदाचे कामावर ज्यांफिशानी करून चाकरी करितों.' - मइसा ७.१५७. [फा.]
**जानमर्द** पहा : **जहामर्द**
**जान(नि)वस-सा, जानीवास जानोसा** न. पु. लग्नाच्या वऱ्हाडाला (वधू वा वराच्या) उतरण्यासाठी दिलेली जागा. वधू-वराचा तळ; बिऱ्हाड; वऱ्हाड, जानवसा. [सं. जनवास, जन्यवास]
**जानवळ-ळे, जानोळे** न. पहा : **जानकुड** : 'कुळवाचा पास बसविण्याचा खुंटा; हे दोन असतात.' - मसाप २.३.७७.
**जानवा** पु. जंबियाचा एक डाव. आपल्या हातातील जंबियाने आपल्या उजव्या बाजूला (अर्थात जोडीदाराच्या डाव्या बाजूला) जानवे असते त्या ठिकाणी बेंबीच्या डाव्या बाजूपासून वर बरगडीच्या शिंपीपर्यंत कापत जाणे. पहा : **जानवे सोडविणे, जानवे उतरणे**
**जानवाझ** पु. प्राणाशी खेळणारा. [फा.]
**जानवान** वि. जाणते; सुज्ञ; शहाणे : 'यासी अंतर परस्पेरें न करावे. आपण सर्व प्रकारे जानवान आहा. कितीयेक कजिये गावासंमधे आहेत, ते साहेबी नीट करावे.'-ऐको ४२९.
**जानवाळ** स्त्री. खरूज.
**जानवे** पु. नांगराचा फाळ व पान जोडणारा लोखंडी गोल तुकडा. [बे.]
**जानवे** न. १. मुंजीत विधिपूर्वक गळ्यात घालावयाचे तीनपदरी सूत्र; यज्ञोपवीत. २. (कुंभारी) मडके चाकावर बनत असता त्याच्या मध्यभागी चिकटवून ठेवतात ती सुंभाची दोरी. ३. लसण्या नावाच्या रत्नावर एखादे वेळी दिसणारी पांढरी रेघ. ४. गांडूळ. (व.) [सं.यज्ञोपवीत] (वा.) ० **तोडावयास उठणे, जानव्यास हात घालणे** – अतिशय रागावणे; चिडणे; जानवे तोडण्याचा धाक घालणे. (जानवे तोडले असता धर्म जाऊन अपवित्रपणा येतो). ० **धोतर फाडणे, टाकणे** – १. अतिशय रागावणे; डोक्यात राख घालणे. २. निर्लज्ज, बदफैली होणे; बेफाम उधळणे. ० **मोकळे, उत्ते करणे** – सुतकातून मोकळे होणे; क्रियाकर्म करून शुद्ध होणे; दुसरे शुद्ध जानवे घालणे. ० **सोडविणे, उतरणे** – जानव्याच्या जागी तरवारीचा वार करणे. पहा : **जानवा. जानव्या धोतराची गाठ घालणे** – १. अतिशय रागावणे; रागाने बेफाम होणे. २. दुसऱ्याच्या (जानव्याच्या) नाशाची धमकी देणे. **जानव्याची लाज धरणे, जानव्यास लाजणे** – (जानवे पवित्र म्हणून त्याचा मान राखणे). जानवे (धर्म) सांभाळण्यासाठी तरी दुराचरण न करणे. **जानव्याला जानवे मिळणे** – सजातीयांचे ऐक्य होणे, मिलाफ होणे, एक होणे; जात ओळखणे. **जानव्यास वस्त्र बांधणे** – (पूर्वी वादविवादात जिंकल्यास जयपत्र घेणे किंवा आपण पराजित झाल्यास वस्त्राने जानवे तोडणे असा क्रम असे) यावरून जिंकण्याची प्रतिज्ञा करणे.
**जानवे जोड** पाच जानव्यांचा संच किंवा लडी.
**जानी** पु. ज्ञाता; जाणता : 'ते वर्णितां जानी : अवधान दीजे' - शिव ६२०.
**जानी** वि. जीवश्चकंठश्च ; अति निकट; जिवलग (दोस्त). [फा.]
**जानी** स्त्री. १. खंडोबाच्या किंवा देवाच्या नावाने सोडलेली गाय, वासरू, किंवा मुलगी; देवगाय; मुरळी. २.(ल.) आडदांड मुलगी.
**जानी** स्त्री जवानी; तारुण्य : 'तुळसीबाई हिरवी तुझी जानी । भाळला तुजला गोविंद बाळपणी ।' - लोसाको.
**जानी (न) बैन** क्रिवि. दुतर्फा; दोन्ही बाजूंनी : 'जानी बैन जुदागी पट्टी.' - पया ४८४. [अर.]
**जानीवे** पु. घोड्याचा एक रोग. यात एका किंवा चारी पायांवर मांड्यांच्या आत गाठी येतात.- अप २.२८४. [सं. जानु]
**जानु-नू** पु. गुडघा. [सं.]
**जानुका, जानुमंडल** स्त्री. न. (वैद्यक) गुडघ्याची वाटी.
**जानुदघ्न** वि. उंच गुडघ्याइतके खोल (पाणी, खड्डा इ.).
**जानुबंध** न. गुडघ्यावर बांधायचे संरक्षक कवच. [सं.]
**जानुबंधन** न. (स्था.) छप्पर आणि लोखंडी स्तंभ यांच्या सांगाड्यातील ताण.
**जानुर्त** पु. गुडघ्यावर किंवा गुडघ्याच्याजवळ असणारा भोवरा. हे घोड्याचे अशुभलक्षण आहे.
**जानुशिरासन** न. एका पायाचा तळवा दुसऱ्या पायाच्या मांडीस लावून दोन्ही हातांच्या आंगठ्यांनी दुसऱ्या पायाचा अंगठा धरून डोके गुडघ्यावर लावणे. [सं.]
**जानू (उलटा)** पु. हातातील जंबियाने जोडीदाराच्या, आपल्या डाव्या बाजूच्या (अर्थात जोडीदाराच्या उजव्या बाजूच्या) गुडघ्याच्या बाहेरील डोळ्यावर जंबियाने मारणे.
**जानू(सीधा)**पु. जंबियाने जोडीदाराच्या डाव्या गुडघ्यावर मारणे. या

डावाला जानूसीधा म्हणतात.

**जानू, जान्हवे** पहा : **जानवे**

**जानेवारी** पु. इंग्रजी वर्षाचा पहिला महिना. [इं.]

**जानेवारी** वि. जोरदार; जोमदार; पाठपुरावा करणारा : 'ऐसा हरी जानेवारी उडी मारूनी किल्ली काढेली' –लोसाको.

**जानेंतानें** वि. जाणतेनेणते (मूल) : 'गीतामाउलीसि नसे । जानेंतानें ।'– ज्ञा १८.१५१८.

**जानोसे** न. ठिकाण; लग्नातील विश्राम करण्याचे परकुळातील स्थान, घर.

**जानोसे** न. कुळवाचा फास. कुळवास बसविण्याचा मधला दुवा.

**जान्हवी** स्त्री. श्राद्धाच्या वेळी काही जमाती गळ्यांत गुंडाळतात तो रेशमी दोरा.

**जाप** पु. १. जबाब; उत्तर; जाब. २. उच्चार. ३. देवाला केलेली विनंती, मागणे, नवस : 'पार्थाचिये विनंतीयेसि जाप दिधली.'– क्रिपु ६७६. (क्रि. लावणे.)

**जापक** वि. जप करणारा; जाप्यक : 'जे गायत्री मंत्र जापक। '– भाराकि ११.९१. [सं.]

**जा(जां)पने** सक्रि. सांगणे; म्हणणे. (मुंबई)

अक्रि. जाब देणे; रडून, काकुळतीने बोलणे, कबुली देणे (अपराध कबूल करताना किंवा पुढील चांगल्या वर्तनाची हमी देताना).

**जापसाल** पहा : **जाबसाल**

**जापाणणे** सक्रि. आच्छादणे.

**जापाणणे** सक्रि. आटोपणे : 'आता जापाणीं जापाणीं आपुले ।' – ज्ञा ११.३८१.

**जापाणणे** सक्रि. अपमान करणे; भ्रष्ट करणे : 'येक देव जापाणिला।' – दास ६.६.३५.

**जापारणे** अक्रि. उलटून बोलणे; प्रत्युत्तर करणे. (दांडगाईने, उद्दामपणाने, उद्धटपणाने).

**जापाळ** पहा : **जेपाळ**

**जापे, जावप** पु. १. वेत, वीण (गुरांची). २. वासरू. पहा : **जाउपे**

**जाप्ता** पु. पहारा. पहा : **जाबता** : 'सरकारी सामानावर जाप्ता ठेवणे.' – डुशिनि २१.

**जा(ज्या)फत, जियाफत, जाफ्ती** स्त्री. १. आतिथ्य; मेजवानी : 'सरदार–दरकदारांच्या घरीं जाफत झाली.' – वज्राघात १७४. २. नजर; भेट : 'पाचशें रुपये नवाबाने जियाफत मेजवानी पाठविली ते सेवकास दिधली.' –मइसा १.४३. [अर.जियाफत]

**जाफर** न. जाडेभरडे सुती कापड.

**जाफरखानी** वि. केशरी रंगाचे.

**जाफरणे** अक्रि. एखाद्यावर संतापणे; रागावणे; खेकसणे; उखडणे, तडफडणे, आदळआपट करणे. पहा : **डाफरणे**

**जाफरमाना–नी** वि. केशरी; केशरी रंगाचा : 'मागें जाफरमानी व केशरीबुटांचा पोशाख पाठविले होते.' – पेद १९. [अर.]

**जाफरा** पु. केशर. [अर.जाफरान]

**जाफराबादी** वि. जाफराबादची, जाफराबाद गावची (विशेषतः म्हैस, गाय) : ' हत्तीइतकी मोठी जाफराबादी म्हैस'– हाचिं ८७.

**जाफरी गुंडी** स्त्री. केसरी रंगाचे फूल; अबोलीचे फूल.

**जाफरी लुगडे** सुताडा; कमी किमतीचे हलके लुगडे.

**जाफा** वि. क्रिवि. बाजवीपेक्षा जास्ती; अधिक : 'फक्त तापाच्या साथींनीं ... माणसे जाफा मेलीं.' – आलेसं ३२४. [अर.इजाफा]

**जाफ्री** पु. ताट्याचे किंवा चिकाचे पडदे तयार करणारा.

**जा(ज्वा)ब** पु. १. उत्तर : 'कोणी कांहीं तरी दान पुण्य करा । जाब नेदा तरी जातो माघारा गा ।' – तुगा ३४७. २. हुंडीसंबंधीचे पत्र. पहा: **जबाब**. ३. बोलणे; बोलण्याचे चातुर्य. [फा. जबाब] (वा.)

० **विचारणे** – हडसून खडसून विचारणे; उत्तर मागणे; प्रश्नोत्तरे करणे; प्रत्युत्तर करणे : 'आम्ही जाब विचारायला आलो होतो.' – दुर्दम्य १६९.

**जाबकरी** पु. जासूद; निरोप्या : 'त्यांचेकडून उत्तर आल्यावरी जाबकरी रवाना करू म्हणोन लेहून पाठविले.' – ऐको ४३०.

**जाबछडा** पु. एखाद्या गोष्टीची चौकशी करण्यासाठी किंवा छडा लावण्यासाठी पाठविलेले प्रश्नपत्रक : 'या जाबछडाची पुरसीस करून सेरभर पीठ देखील घेतले असेल त्यासुद्धा चौकशी करून लेहून पाठवणें.' – ऐको ४३०.

**जा–बजा, जा–बज्या** क्रिवि. स्थळोस्थळी; ठिकठिकाणी : 'ऐशा ताकिदा जा–बजा पाठविल्या.' – ऐलेसं ७.३५.७५. [फा.]

**जाबड** पु. दाराच्या खालच्या बाजूस फळीला असलेला मोठा लोखंडी खिळा.(माण.)

**जाबडणे, जाबणे** अक्रि. १. झोपेत बोलणे. (कर.) २. वेड्यासारखी बडबड करणे; असंबद्ध भाषण करणे; बरळणे : 'झोपेत जाबडल्यासारखे मी बोललो' – व्यव २०१. (राजा.)

**जाबडा** पहा: **जबडा**

**जाब(बी)त** पु. अधिकारी; मुखत्यार : 'जोगेंद्रगीर मानभाऊ जाबती कमलनैन सेकीन संमत निंब'– मइसा १५.१७२. [अर.जाबित]

**जाबता** पु. १. कायदा; नियम. २. अधिकारपत्र; मुखत्यारपत्र; अधिकार; मान्यता; मंजुरी. ३. परवाना; पास. [अर.]

**जाबता** पु. १. सरंजाम किंवा इनाम यांच्या अधिकाराची कलमबंदी यादी. २. व्यापाऱ्याला पाठवलेली मालाची यादी; फेरिस्त : 'जातेसमयीं कुललष्करचे लहान थोर लोकांचे बिशादीचे जाबते करावे.' – सभाशिब. [अर.]

**जाबता** पु. १. अंमल; कडक शिस्त : 'लष्करचे लोकांनीं ताकीद न ऐकतां त्यांच्या गर्दना मारिल्या, जाबता बसविला.' – मदरू १.८५. २. देखरेख. [अर.]

**जाबता** पु. कैद. [अर.]

**जाबता** पु. मोजलेल्या जमिनीचा तुकडा. [अर.]

**जाबता** पु. पहारा; राखण; सोबत. [अर.]

**जाबनीस** पु. जाब किंवा खुलासा विचारणारा अधिकारी : 'प्रभू कारखानीस किंवा ब्राह्मण मुजुमदार व जाबनीस असे हुद्देदार नेमलेले असत.' – युद्धशास्त्र ९.

**जाबरी** स्त्री. कऱ्हा; दगडाचा कापलेला चिरा.

**जाबरी** स्त्री. नाचणीचा एक प्रकार.

**जाबसाल** पु. १. प्रश्नोत्तर; संभाषण; बोलणे : 'तेव्हा प्रसंगास सख्त जाबसाल कोणी न करीत.' – मइसा १३.१०. २. बोल; भाषण; उच्चार. ३. तह; : तहाचे बोलणे : 'गोविंदराव बापुंनीं जाऊनि जाबसाल लाविला ।'– ऐपो २८६. ४. जबाब; खुलासा. [फा. जवाब + सवाल] (वा.) ० **करणे** – तोंडी तपासणी करणे : 'बाहेरून येणाऱ्या लोकांवर पोलिसांची कडक नजर असे; पण त्यांचा जाबसाल करताना ते ताळतंत्र सोडीत.'–जीसे ३८७.

**जाबसाली** वि. १. हजरजबाबी; न अडखळणारा. २. प्रमाणभूत ; साध्य व्यवहारास उपयुक्त (कागद).

**जाबसाली कागद** पु. अव. कामाची पत्रे; उत्तर प्रत्युत्तराची पत्रे.

**जाबळी** स्त्री. मासे ठेवण्यासाठी केलेली जाळीदार परडी, टोपली. (कु.)

**जाबाला येणे** पाण्यातील माशांनी मधूनमधून वरची हवा घेण्यासाठी पाण्याच्या पृष्ठभागावर येणे.

**जाब(भ)ळॉ** पु. मोठ्या छिद्रांचे जाळे. (गो.)

**जाबाड–डे** पहा: **जाभाड–डे**

**जाबी, जाबी हुंडी** पहा : **जबाबी हुंडी**

**जा(जां)भाड–डे** न. जबडा; तोंडाचा खालचा वरचा भाग, विशेषत: खालचा : 'जळचरें पसरितां जाभाडे.'– मुआदि ३०.२३१. [सं.जंभास्थि]

**जाम** क्रिवि. पक्के; घट्ट; काही केले तरी (क्रि. बसणे.) : '... पण आई आणि बाबा जाम तयार होत नाहीत.'– ल्व्हाळी १७७. [इं.जॅम] (वा.) ० **होणे** – १. अडकून पडणे. २. खलास होणे : 'त्यानं धडपडून तोंड बाहेर काढलं. मी काठी ज्यास्त ज्यास्त दाबली, आणि जरा वेळानें तो जाम झाला.'– कोसला १७.

**जाम** पु. शहरातील रस्त्यांवर शोभेसाठी लावण्याचा वृक्ष. जांभळीच्या जातीतील एक झाड. त्याची फुले पांढरी व फळे पिवळसर असून मधुर व सुवासिक असतात.

**जाम** पु. एक प्रकारचे भांडे. पहा : **जांब** [फा.]

**जाम** वि. दुर्बल; अशक्त.

**जामगी** स्त्री. तोफ अथवा बंदुकीचा तोडा ; वात; काकडा; फटाक्याची वात; बत्ती : 'दोन जामग्या झाडाचे आड दृष्टीस पडल्या.' – चिथोशा ६०. [फा.] (वा.) ० **लावणे** – भांडण लावून देणे. त्रास देणे; छळ करणे. **जामग्यांनी भाजणे** –अतिशय जुलूम करणे; छळणे.

**जामजोड** पु. १.घोड्याच्या टाचेच्या खुरावर बांधावयाचा चामड्यांच्या पट्ट्यांचा जोड. २. दोन वस्तूंची जोडी ; दुक्कल.

**जामण–न–नू** वि. जामुन; ठेंगणा; बुटका; खुजा. पहा : **जामुन**

**जामणे** सक्रि. रागावणे; जरब बसेल असे करणे : 'त्याला आज चांगलाच जामला पाहिजे.'– मुंदि १३.

**जामदानी** स्त्री. १. ज्या कापडात विणून वेलपत्तीचा उठाव केला आहे असे कापड; एक प्रकारचे कापड; हे आंगरख्यास वापरीत. २. एक प्रकारची कातडी पिशवी; पेटी (कपड्याची); बॅग. [फा.]

**जामदार** पु. जामदारख्यान्यातील अधिकारी; जवाहिरखान्याचा व वस्त्रागारावरील मुख्य अधिकारी; खजानची; खजिनदार. दागिने, वस्त्रे सांभाळून लागेल त्यावेळी देणारा अधिकारी. [फा.]

**जामदारखाना** पु. १. सरकारी खजिना; जवाहिरखाना. २. वस्त्रागार; कपड्यांची कोठी : 'रजईचा मजकूर लिहिला तर प्रस्तुत जामदारखान्यांत शाल नाहीं.' –ब्रप ७१.

**जामदारी** स्त्री. १. जामदाराचे काम आणि हुद्दा. २. संरक्षण; जिम्मेदारी; रक्षण : 'जामदारांसहि स्वार घेतले होते. जामदारीचा पैका देऊन मुलुक लुटीत गेले.'– पेद २८.२४३.

**जामदारीण** स्त्री. १. सरकारी खजिनदाराची पत्नी. २.(ल.) फुकटचे दागिने घालून मिरवणारी स्त्री. ३. झाडूवाली; भंगीण.

**जामा** पु. एक प्रकारचा लांब, पायघोळ, अंगरखा. [फा.]

**जामात–ता** पु. जावई. [सं.जामातृ]

**जामानिमा** पु. १.(जामा व निमा) अंगात घालावयाची दोन वस्त्रे. २. जामानिमा घालून सजणे; सुंदर वस्त्रांनी नटणे. ३. सर्व पोषाख. (क्रि. करणे.)

**जामित्रदोष** पु. विवाहाला निषिद्ध असा लग्नकुंडलीतील दोष : 'इष्टकालीन लग्नकुंडलीत लग्नापासून किंवा चंद्रापासून सप्तमस्थानी कोणताही ग्रह असता त्या समयी विवाह करू नये. याला जामित्रदोष म्हणतात.'– सुज्यो ४०५.

**जामीन** पु. १. देण्याघेण्याच्या व्यवहारास जबाबदार राहिलेला माणूस. २. खात्री पटविणारा मध्यस्थ; हमीदार. ३. (ल.) पडू लागलेल्या खांब इत्यादीस खालून दिलेला आधारा; जोड तुकडा; आधारभूत वस्तू. [अर.]

**जामीन** पु. पतंगाची दोरी. ही आचका द्यावयासाठी असते. [अर.]

**जामीन** पु. (सोंगट्या) तिफाशी सोंगट्यांच्या डावातील एक विशिष्ट सोंगटी; पक्क्या रंगाची सोंगटी अडकून पडण्यासाठी काळ्या रंगाची जी सोंगटी मारतात ती. [अर.]

**जामीन** पु. विरजण. (रात्रीच्या वेळी नासणाऱ्या दुधाला विरजण. हे जामिनाप्रमाणे असते म्हणून). [अर.]

**जामीनकत(द)बा** पु. जामीनकीचा दस्तैवज; जामीनपत्र : 'राणोजीची सही जामीनकदब्यावर घेतली गेली.'–मई १३७. [अर.]

**जामीनकी** स्त्री. १. हमी; जबाबदारी. (दिलेली, कबूल केलेली) (क्रि. देणे, घालणे, करणे.). २. जामीन राहण्याबाबत दिलेला पैसा. ३. आरोपी करारास चुकल्यास जामिनाकडून घेतलेला दंड; जामिनाचा जप्त करावयाचा पैसा.

**जामीनखत** न. हमीपत्र.

**जामीनग–गरी** स्त्री. १. हमी; जामीनकी. (क्रि. देणे, घालणे, करणे.) २. (ल.) जामीन होऊन स्वत:ला बांधून घेणे.

**जामीनतलब** स्त्री. जामीनाची मागणी.

**जामीनदार** वि. हमीदार; हमी घेणारा. [अर.]

**जामीननामा** पु. जामीन राहण्याबद्दल लिहून दिलेला कागद; हमीपत्र : '... तो जामीननामा रामसिंगाने अमीनखानाच्या हाती दिला.'– श्रीयो ४८३.

**जामीनसाखळी** स्त्री. १. एक घराणे दुसऱ्या घराण्यास जामीन राहते,

तिसरे पहिल्यास आणि चौथे तिसऱ्यास याप्रमाणे गावातील सर्व कुटुंबांनी एकमेकांस जामीन राहण्याची क्रिया; गावच्या वसुलाबद्दल सर्व रयतेची संयुक्त जबाबदारी. २.(ल.) एकमेकांवर अवलंबून असणे; अन्योन्य – सापेक्षत्व; संबंधांची साखळी (कवितांचा भाग, नाटकांचे संविधानक यातील).

**जामु(मू)न–ण** पहा: **जामण.** खुजा; बुटका; ठेंगू : 'एक दातिरें राखोंडे फेंगडें । जामुन खुजें ।' – वच्छ २८६. [सं.वामन]

**जाय** स्त्री. जाई ; एक फुलझाड आणि तिचे फूल. पहा : **जाई** (गो.)

**जायजण–णा–जाणा–वळ** वि. १. प्रसंग साजरा करण्यासाठी उसनवार आणलेले; परत बोलीने आणलेले (कापड, दागिने इ.). २.(ल.) मुलगी (ती दुसऱ्याला द्यावयाची म्हणून). ३. जाणारे; क्षणभंगुर; अस्थिर; नाशवंत (शरीर) : 'कासया मी आतां वंचूं हें शरीर । आहें बारगीर जायजणें ।' – तुगा १७९१. [सं.]

**जायजम** पु. वेलबुटीची नाजूक सतरंजी. पहा : **जाज(जी)म**

**जायजिणे** वि. अशाश्वत.

**जायदाते** वि. सनदी. [फा. जायदाद्]

**जायदाद** स्त्री. १. सैन्याच्या खर्चास लावून दिलेली जहागीर. २. नेमणूक; उत्पन्न; मालमत्ता : 'नबाब नजबखाना यांनी मिर्जा सफ्रीखान यास मेरट वगैरे अकरा महाल जायदाद दिली.' – दिमरा १.१०१. इ. एखाद्या जिल्ह्याची महसूल देण्याची क्षमता. [फा.]

**जायदी खजूर** मोकळा, पेंड न बांधलेला खजूर.

**जायनी** स्त्री. गमाई; जावक.

**जायपत्री** स्त्री. जायफळावरची साल. ही औषधी असून विड्यांत खातात. [सं.जातीपत्र]

**जायपे** न. जावपे; गाई–म्हशीचे वासरू. (को.) पहा : **जाउपे**

**जायफळ** न. औषधोपयोगी सुवासिक फळ; जायपत्रीच्या झाडाचे फळ; जायफळाभोवती जायपत्री असते. जायफळ हे उत्तेजक, पाचक व वायुनाशक आहे. [क. जाजि; सं. जातिफल]

**जाय(या)बंदा–दी** वि. जखमी; दुखावलेला; इजा झालेला; घायाळ; निरुपयोगी झालेला (मोडणे, फुटणे इत्यादीमुळे): 'जायबंदी करण्याचे प्रयत्न केले.'–अआमागो १३. [अर.]

**जायमान** वि. अस्तित्वात येणारे; उत्पन्न होणारे; भावी. [सं.]

**जायलेणे** न. परत करावयाच्या बोलीने आणलेले दागिने.

**जायवळ** पहा : **जावळ**

**जायशिळी** स्त्री. जास्वंद : 'नाकाला जायशिळीची कळी आल्यागत दिसत हुतं' – गोतावळा २२.

**जायसर** क्रिवि. होईपर्यंत. उदा. 'जेवचे जायसर' = जेवण होईपर्यंत. (गो.)

**जायसाळ** न. जास्वंदीचे फूल किंवा झाड. फुललेल्या फुलांचे तोंड खाली वळलेले असते म्हणून मलूल चेहऱ्याला याची उपमा देतात : 'शारी जायसाळाच्या फुलागत मलूल दिसू लागली.' – वळीव २५.

**जाया–यां, जांयां** वि. क्रिवि. १. नष्ट. २. खराब; नादुरुस्त : 'नळ पाण्याचा जागा जागा जाया झाला आहे.'– समारो १.३४. ३. घायाळ; जखमी : 'परंतु कोणी जाया जखमी जालें नाहीं.' – ऐलेसं ८.४३९०. ४. निरुपयोगी : 'वांझेच्या मैथुनापरी गेले वायां। बांडेल्याचें जायां जालें पीक ।'– तुगा ३०४६.[अर.] (वा.) ० **देणे** – (गाय, दागिने, मालमत्ता इ.) आंदण देणे. (ही देणगी टाकून दिल्यासारखी असते म्हणून).

**जाया** स्त्री. बायको; भार्या; पत्नी : 'त्या दुष्टोक्तिश्रवणें धर्माची संकटी पडे जाया ।'–मोसभा ५.३. [सं.]

**जाया, जायास** क्रिवि. उसनवट ; उसने म्हणून.

**जायाचा–चे** वि. परत करावयाचा ; उसना घेतलेला. पहा : **जाणे, जायजणा** : 'आतां जायाचें जैसें लेणें । आंगावरी आहाचवाणें ।' – ज्ञा ९.४१२.

**जायाचा** वि. क्षणिक : 'भाव आणिकला जायाचा । मंत्र घेतला गुरुचा। शिष्य जाला दो दिसांचा । मंत्राकारणे ।। '– दास ५.३.७५.

**जायाचा दागिना, जायाची वस्तू** स्त्री. (ल.) मुलगी.

**जायिजणा** पहा : **जायजणा१**.

**जायी** स्त्री. मुलगी. (कातकरी) [सं.जात]

**जाये** स्त्री. १. उगाच ये जा करणे; जाणे व परतणे; पुढे मागे करणे; इकडेतिकडे व्यर्थ भटकणे; कंटाळवाणी पायपीट; निष्कारण येरझार. २. चुळबुळ; चळवळ. ३. उगाच जाऊन येणे. (क्रि. करणे, लावणे.)

**जायेपण** न. जन्म : 'आणिवेकु पांगुळा जायेपणी ।' – क्रिपु २५.६६.

**जायेल** वि. गेलेला; वाह्यात; अडाणी. (खा.)

**जार** पु. १.परस्त्रीशी संबंध करणारा; उपपती; धगंड. २. प्रियकर; दोस्त; यार (स्त्रीचा). ३.जारकर्म; व्यभिचार : 'ज्यांस न कळतां घडला जार । तिहीं रासमंडळीं खेळला यादवेंद्र ।' – हरिवि १८.१०. [सं.]

**जार** पु. १. प्रसूतीनंतर बाहेर पडलेली वार; गर्भवेष्टन : 'तुका म्हणे भार ज्याचा जार त्यासी'– तुगा १३३४. २. नुकत्याच जन्म झालेल्या मुलाच्या तोंडातून निघणारा फेस, ओठावरची कोमल त्वचा. [सं.जरायु] (वा.) **तोंडाचा जार वाळलेला नसणे** – प्रौढ नसणे; बालबुद्धी असणे.

**जार** पु. गलगल ; समुद्राच्या काठाला साचलेला पांढरा फेस.

**जा(ज्या)र** वि. १. बेजार; त्रस्त; जेर : 'तरी तोफेचे गोळे राहीना नबाब झाला मग जार ।' – ऐपो २५९. २.जखमी. [फा.]

**जारक** पु. प्राणायामाचा एक प्रकार.

**जारकर्म** न. व्यभिचार; बदफैलीपणा; विवाहित पुरुषाने अगर स्त्रीने अन्य स्त्रीशी अगर पुरुषाशी केलेला संग; परशय्या; परद्वार; व्यभिचार.

**जारज** वि.१. गर्भाशयापासून झालेला; जरायुज; पृथ्वीवरील जीवमात्राचा एक वर्ग; अंडज, स्वेदज, उद्भिज हे इतर वर्ग आहेत : 'परि आधीं तंव स्वेदज। जारज उद्भिज मणिज ।' – ज्ञा १५.१४८. २. अनौरस ; जारकर्मापासून झालेली (संतती). [सं.जरायुज]

**जारजूट** वि. व्रात्य; हट्टी.

**जारट** वि. कठीण; टणक (फळ, गळू) : 'येके मधुरें अलवणीं जारटें।' – स्वादि ६.४.४७. [सं.जरठ]

**जारट(ठ)णे** अक्रि. १. टणक, कठीण होणे; आक्रसणे (कडक उन्हाने किंवा अकाली पावसाने फळ इ.). २. दडस, टणक, कठीण होणे;

आखडणे; आक्रसणे (गळू). ३.(ल.) आजारीपणामुळे सुरकत्या पडणे, वाळणे. [सं. जरठ]

**जारटले वांगे** न. १. वाळून टणक झालेले वांगे. २. (ल.) वाढ खुरटलेला माणूस; खुजट; मोठ्या वयाचा पण लहान मुलासारखा दिसणारा माणूस.

**जारण** न. १. मंत्रविद्या; जादूटोणा. २. दुसऱ्याला अपाय करण्यासाठी केलेला मंत्रप्रयोग. ३. (वैद्यक) वनस्पती, धातू इत्यादींचे भस्म करणे. [सं.जॄ]

**जारण** न. लय; शेवट : 'मग पवन ठेलिया जारण । नीरींचे नीर ।'- सिसं ४.२१६. [सं.जॄ]

**जारण, मारण, उच्चाटण** हे मंत्रविद्येतील तीन प्रकार आहेत. शत्रूला अपाय व्हावा म्हणून केलेले जारण, मारण इत्यादींचे मंत्रप्रयोग; जादूटोणा यास व्यापक शब्द.

**जारणा** स्त्री. १. रेत स्तंभित करून ते जिरविण्याची क्रिया : 'सर्वज्ञें म्हणीतलें : उर्ध रेते होति : ते बींदुची जारणा जाणति :'- लीचपू २००. २. धातूचे भस्म करणे.

**जारत** स्त्री. यात्रा; पवित्रस्थानास भेट : 'दर्गाहास जारत करून.'- दिमरा १.११८. [अर. जियारत]

**जारस** वि. १. अद्याप रस गळत आहे अशा स्थितीतील. (को.) २.(सामा.) रसाळ; ज्यातून रस गळत असतो असा : 'एके जारसें कचकचितें ।' - एरुस्व १४.१७. ३. शेतात लावलेले भात पिकले असता त्याचा दाणा पुरतेपणी न वाळू देता कापतात ते (भात), तशा भाताचा काढलेला तांदूळ. [सं.जालरस]

**जारसंतति–ती** स्त्री. अनौरस संतती; विवाहबाह्य, बेकायदेशीर संतती.

**जारसेले** वि. रसाळ; ज्यातून रस गळतो असा : 'जारसेले वाळुक असे : तें खावोंचि न एः'- दृपा १५.

**जारिणी, जारीण** स्त्री. व्यभिचारिणी; छिनाल, जारकर्मी स्त्री.

**जारी** स्त्री. १. चालू असलेले, विद्यमान सरकार, कायदा. २.अधिकाराचा काल; सत्ता, अम्मल यांचे दिवस; चलती. (क्रि. करणे.)
वि.१. चालू; हयात; विद्यमान; इनाम, चाकरी, वर्षासन, सरंजाम इत्यादी शब्दांशी हा जोडतात. २. सुरू : 'त्याजकडे बोलणें चालणें ही जारी आहे.'- मइसा ५.१८९.[अर.] (वा.) ० **करणे** – सुरू, प्रचलित करणे : 'कंपनीच्या नावाचा नवा रुपया हिंदुस्थानांत जारी करण्यांत आला.' – सअसं १०६. १२. **जारीत आणणे** – प्रचारात आणणे.

**जारी** स्त्री. दुसऱ्या तिसऱ्याने लागवडीत आणलेली (जमीन).

**जारी** पहा : **ज्वारी**

**जारी चिठ्ठा** पु. जारी वसुलाचा हिशेब.

**जारीने** क्रिवि. १. जोराने; वेगाने. २. कसोशीने : 'दादाचा वकिलीचा अभ्यास जारीने सुरू झाला.' – पलको ५०३.

**जारीबन** पु. जालीम, खात्रीपूर्वक.

**जारीवधू** स्त्री. जारकर्मी स्त्री.

**जारी वसूल, बाकी, वहिवाट, हिशेब** सार्वजनिक पैशाचा चालू हिशेब.

**जार्णे** न. पावसाच्या सुरुवातीस पेरण्याचे शेत. (गो.)

**जार्वा** पु. जळमट, कोळीष्टक; रोपाखाली झालेली मुळांची जाळी. (झाडी)

**जाल** स्त्री. (विणकाम) मागच्या गारी (खड्ड्या)मध्ये असणारी लाकडी फळी, पावडी. धोटे इकडून तिकडे जाण्यासाठी, पेला पाडण्यासाठी हिचा उपयोग करतात. [सं.]

**जाल** पु. आरोप; आळ. (ना.) [सं.]

**जाल** न. १. मासे पकडण्याचे जाळे. २. अनेक वस्तूंचा एकत्र समूह, समुदाय. जसे :- शब्दजाल, मेघजाल, तंतुजाल. ३. (ल.) गुंतण्याचे साधन, यंत्र, सापळा; पाश. जसे :- मायाजाल, विषयजाल इ. ४. जाळीदार वस्त्र, दागिना. ५. खिडकी: गवाक्ष; झरोका. ६. पडदा, बुरखा, गोशा. [सं.]

**जाल** स्त्री. प्रलोभन (झाडी). [हिं.]

**जालक** न. (भौ.) जाळी; जाळीची चौकट.

**जालनी** वि. जालना शहरासंबंधी; जालन्याचे (कापड इ.).

**जालप** पु. जयपाल; एका जातीच्या झाडाच्या मुळाची भुकटी; ही रेचक म्हणून वापरली जाते.

**जाल(ळ)पाल** पु. जाळ्या किंवा जाळ्यांचे पडदे : 'पातशहाच्या स्त्रिया झरोकियांतून जाळपाळांतून राजा (शिवाजी) पाहतां बहुत थक जाहल्या.'- ऐको ४३४.

**जालमान्या** वि. लाचखोर. (झाडी).

**जालमी** स्त्री. जुलूम : 'याप्रमाणे जालमी व जलालीची चाल अलफखानची.' - मइसा ७.१५०. [फा.जालिमी]

**जालमुखी** स्त्री. दलदलीच्या प्रदेशात वाढणारी, चिकट स्राव द्रवणारी ड्रॉसेरा प्रजातीमधील कीटकभक्षक वनस्पती.

**जालव्यूह** पु. (विअ.) एकमेकांना जोडलेल्या घटकांनी होणारी प्रणाली.

**जालंदाज** वि.१. पाश टाकण्यात कुशल; युक्तीने शत्रूला जाळ्यात धरणारा. २. कपटी.

**जालंधर** पु. झरोका; जाळी.

**जालंध(द)र** पु. १. गोसाव्यांतील एक पंथ. २. नवनाथांपैकी एक. ३. योगशास्त्रोक्त बंधत्रयांतील कंठस्थानचा बंध : 'मग जालंधर सांडी' – ज्ञा ६.३०२. [सं.]

**जाली** स्त्री. बाभूळ.(बे.)

**जालीम, जालम** वि. १. तीक्ष्ण; जलाल; जोरदार; वीर्यवान (औषध, उपाय इ.). २. जुलमी; कडक (अम्मल, राज्य, कायदा); अघोरी; ३. वरचढ; चढेल; कडक; अतितामसी (माणूस) : 'दोघेही कर्ते नामी सिपाई जालम असे निवडले.'- भाअ १८३४.९२. [अर.]

**जाले** न. जन्म; उत्पत्ती; उत्पन्न होणे; संभव : 'जयाचें जालें बंधां । उरो नेदी ।' – ज्ञा १७.४१२. [सं.जात]

**जाले(लें)पण** न.१. पूर्णत्वाची खोटी जाणीव; अहंकार : कोण ठाओवेन्ही जालेपण !'– लीचउ ५१४. २. पूर्णत्व : 'हृदयीं नाही जालेपण ।' –ज्ञागा ८५९. ३.जीवित : 'नामा म्हणे त्याचे जळो जालेंपण ।' – नागा ६२१.

**जालौरी** वि. जालौरी नावाचे (खालवाड) एक बंदर आहे त्यासंबंधी; झालवाडसंबंधी : 'जालौरीचें केंकाणे थोरु ।'- शिव ९३७.

**जावई** पु. १. मुलीचा नवरा; जामात. २. (ल.) बोलाविल्या –

कळविल्याशिवाय दुसऱ्याच्या घरी जाऊन चैनीत राहणारा माणूस. (वैसं. जामेय; पूर्वी बहिणीचा मुलगा (जामेय) जावई करून घेत. (जामि = बहीण; जामेय = भाचा) [सं.जामातृ] (वा.) **जावयाचा बेटा** - १. जावयाचा मुलगा. हा बहुतकरून आपल्या कामाला निरुपयोगी असतो. कारण तो वेगळ्या कुळातला म्हणून त्याचे लक्ष आपल्याकडे लागणार नाही असा समज आहे. २. निरुपयोगी व आपल्याच तोऱ्यात असणारा आप्त. **जावयाची कीड** – नाजूकपणादर्शक थट्टेची संज्ञा. **जावयाची पंगत** – (जावयाच्या पंगतीला सासू साखर, तूप, पक्वान्ने इ. स्वतः भरपूर वाढते यावरून) (ल.) श्रीमंताची राहणी, जेवण.

**जावईआग्रह** पु.१. (जावयाला करतात त्याप्रमाणे) जेवणाखाण्याचा अतिशय आग्रह. २. वरवर केलेला, तोंड देखला आग्रह.

**जावईजेवण** न. (लग्नातील जावयाचे जेवण) थोडथोडे, नाजूकपणाचे खाणे; अल्पाहार.

**जावईडौल** पु. (जावयासारखा) फाजील ऐट, दिमाख; यथास्थित दुसऱ्याच्या घरी चैन करणे.

**जावईण** स्त्री. जावयाची बहीण; करवली.

**जावईपोशा(षा)क–ख** पु. अतिशय डामडौलाचा, प्रसंगाला न साजणारा असा, भपकेदार पोशाख.

**जावईशोध** पु मूळचे बरोबर असता त्यात ज्ञानाच्या घमेंडीने चुकीचा घातलेला शोध; शुद्धाचे अशुद्ध करण्याचा खटाटोप, अनावश्यक दुरुस्ती.

**जावक** वि. पाठवावयाचा, धाडावयाचा (कचेरीतून कागद, हुकूम, पत्र).

**जावकबारनिशी** स्त्री. जाणाऱ्या कागदपत्रांची विषयवार नोंद लिहिण्याची वही; नोंदवही; जावक पुस्तक.

**जावक बीजक** (वाणिज्य.) खरेदीदारास पाठविलेल्या मालाची यादी.

**जावडे** न. कुंकवाच्या रेषा, बोटे. पहा: **जाडवी** : 'पायीं मी तव अर्पितों अतिशयें आलक्तके जावडे' – निमाक १.१४.

**जावत, जावत्काल** क्रिवि. जोपर्यंत. पहा: **यावत, यावत्काल**

**जावत्री** स्त्री. जायपत्री. (खा.)

**जावपे** न. जोपे; पोर; गाईचे वासरू, म्हशीचे पारडू : 'मेंढराने लाडीस पुष्कळ जावपे दिली.' – वासारू १६.(को.)(वा.)**जावपेपेजाने वासरू पोसायास देणे** – वासरास जे प्रथम जावपे होईल त्यास पोसणाराने घ्यावे अशा बोलीने वासरू पोसण्यास देणे.

**जावपेकरीण** स्त्री. दुभती गाय किंवा म्हैस; पिणारे वासरू जिवंत असलेली गाय, म्हैस.

**जावपेशुद्ध** वि. चांगले वासरू, पारडी देणारी (म्हैस किंवा गाय).

**जावरदा–दे, जावर्दा** वि. १. बाहेर पाठवायचा माल; निर्यात; निर्गत. २. (क.) जावक; बाहेर पाठविण्याचा कागद, हुकूम इ.

**जावशी** स्त्री. दिराची बायको; जाऊ. (राजा.)

**जावळ** पु. १. लहान मुलाच्या डोक्यावरचे मूळचे केस. २. ते काढण्याचा विधी, चाल. [सं.जात + बाल, चाल]

वि. जुळे: 'हे दोघे भाउ जावळांचे' – लीचपू २५९.

**जावळ** न. लुगड्याचा विशिष्ट काठ. (कर.)

**जावळपान** न. जावळांत घालावयाचा पिंपळपानासारखा दागिना : 'घरीं मामाजी पुसती ! भासीला काय तानं । सोडिती जावळपानं !' – वलो ५६. (व.)

**जावळफळ** न. जुळे फळ; जोडफळ : 'परस्परे क्षेम कवळी । उभयतनू जाल्यामेळी । जावळफळापरी ।' – मुवन ८.१९४.

**जावळा, जावळारावळा** वि. १. जुळे ; एकाचवेळी एका गर्भातून उत्पन्न झालेली दोन मुले. २. जुळ्यांतील एक; जुळा भाऊ. [सं.युगल]

**जावळिया** पु. जोडीदार; सोबती; जुळा भाऊ : 'कां सिंहे न पाहिजे। जावळिया ।।' – राज्ञा १८.८५३. [सं.यमल]

**जावळी** पु. जोड; भावंड : 'ब्रिदांताचे जावळी । जें एकेक विश्वातें गीळी ।' – राज्ञा ११.३९१.

**जावळी** पु. बिनशिंगाचा मेंढा . (जुन्नरी)

**जावळी–जावळी** वि. जुळी; आवळीजावळी.

**जावळीभावळी** वि. १. भावांच्या बायकांसंबंधी. २. समाईक; सारखा; संयुक्त; समान (धंदा, प्रपंच इ. गोष्टी). (समासात) जावळीभावळी धंदा – जावळीभावळी संसार.

**जावळीहळद** स्त्री. पिवळी, मऊ, मोठ्या जातीची हळद.

**जावळे** न. जुंवळ ; जुळे मूल.

**जावायेवा** पु. १. जाणे येणे; खेपा; इकडून तिकडे प्रवास. दळणवळण; नेहमी संबंध; २.(ल.) आश्रय, वहिवाट.

**जावू** स्त्री. दिराची बायको. पहा : **जाऊ**

**जासन** क्रि. जाईल. (व.)

**जासपिती** स्त्री. व्यवस्था : 'जासपिती करून ठेवलीया की हुईल तेवढी.' – खळाळ १०५.

**जासलवट, जासवट** न. पळी; डाव; दर्वी : 'तो पाळणे यावरूनि पडिला : तें जासलवट रूपलें : तो डोला फुटला :' – लीचउ २७५.

**जासवंद–दी, जासुंद–दी, जास्वन; जास्वंद–दी** स्त्री.न. एक फुलझाड व त्यांचे फूल. फुलांचा रंगासाठी आणि औषधातही उपयोग होतो : 'शेंदुर चर्चिला मस्तकावरी । जास्वन सुमनाची पूजा शिरीं ।' – स्त्रीगीत ७. [सं.जपासुमन]

**जासवान** वि. जास्वंदी रंगाचे (वस्त्र).

**जासु(सू)द, जासूस** पु. १. निरोप्या; दूत; टपाल पोचविणारा; हरकारा; काशीद; बातमी पोहोचविणारा. २.(ल.) पतंगाच्या दोरीवरून पतंगाकडे जाण्यास सोडलेला कागदाचा तुकडा. [अर.जासूस]

**जासुदी** स्त्री. १. जासूदगिरी; जासुदाचे काम. २. जासुदाने आणलेली बातमी. ३. जासुदाची मजुरी, पगार.

वि. जासुदाविषयी, जासुदासंबंधी (चर्मी जोडा, चाळ इ.).

**जासुसी** स्त्री. टेहळणी; बातमी काढणे; हेरगिरी.

**जासूदकाठी** स्त्री. हरकाऱ्याची हातात धरण्याची, काळ्या बांबूची काठी.

**जासूदकी,जासूदगिरी** स्त्री. जासुदाचे काम, धंदा, हुद्दा : 'त्यामुळे टपालखात्याचें जाळें सर्व देशभर पसरल्यामुळे महारांची जासुदकी सुटली.' – गांवगाडा ६८.

**जासूदजोडी** स्त्री. दोन जासूद. बहुधा दोघे जासूद बरोबर मोहिमेवर जात.

**जासूदपट्टी** स्त्री. जासुदाच्या खर्चासाठी गावावर बसविलेला कर, पट्टी.

**जास्त–स्ती** वि. १. अधिक; पुष्कळ; अतिशय. २. फाजील; जादा; फालतू. [अर. झियाद]

**जास्तान** न. विशिष्ट ठिकाण; वस्तूचे ठरलेले ठिकाण : 'शिडी नेऊन होती तिथे जास्तानला ठेवून दिली.' – ऊन ७२.

**जास्तानी** वि. व्यवस्थित.

**जास्ती** स्त्री. जुलूम; जोर; जबरदस्ती. पहा : **जाजती.** [अर. झियादती]

**जास्तीकमती** क्रिवि. कमी अधिक; अधिकउणे : 'तू जर तिला जास्तीकमती बोलशील तर उगीच आणखी आचरटपणा बरीक होईल.' – पलकोघे ४३४.

**जास्तीजलाल** पु. जुलूम.

**जास्मिन** पु. (कृषि.) १. मोगरा. २. सुगंधी फूल.

**जाह(हा)गि(गी)र–री,जागीर** स्त्री. १. सरकारातून एखाद्या जमिनीची, गावाची अथवा वसुलाच्या हक्काची इनाम किंवा धर्मादाय म्हणून मिळालेली देणगी. ही सरकारी लष्कराच्या खर्चासाठी किंवा एखाद्या व्यक्तीच्या अथवा कुटुंबाच्या पोषणासाठी दिलेली असे. २.देवादिकांच्या नेमणुकीच्या खर्चाबद्दल दिलेले गाव. ३. (सामा.) पेन्शन; तनखा. ४. (ल.) खर्चिक. (झाडी) [फा.]

**जाहगीर अमल** मराठे व कोतवालाचा चौथ वजा झाल्यावर उरलेल्या जमेतील मुघल राज्यकर्त्यांचा हिस्सा.

**जाहज(जी)म, जाहजमी छीट** पहा : **जाजम**

**जाहर–री** न. वि. पहा : **जहर** [अर.झर्हर]

**जाहली** स्त्री. १. भयंकरपणा; कडकपणा; उग्रपणा. २. साहस; प्रखरता.

**जाह(हे)ली, जाहलीयत** स्त्री. अडाणीपणा; मूर्खपणा : 'इतक्याने दाबसलाबत मोठी होती ते मल्हारराव यांचे जाहेलीमुळें हे खराबी.' – मइसा ७. ; 'दर्बार न करिता जाहलीयत करावी हे वर्तणुक राजास युक्त नाहीं.' – जोयेरा १०६. [अर. जाहलियत्]

**जाहली** स्त्री. त्वरा; घाई. (कर.)

**जाहलीम** पहा : **जालीम**

**जाहंगीर** स्त्री. १. हातातील दागिना : 'गुजराथी कांकणे अगुस्तान न जाहंगिर' – अफला ५५. २. बोटात घालण्याची घुंगराची अंगठी.

**जाहं(हां)बाज–द** पु. वि. १. हुशार; पटाईत; कुशल. २. पक्का; वस्ताद. ३. शूर; धाडसी. ४. पुरुषी; कैदाशीण; कृत्या (स्त्री). [फा.जानबाज]

**जाहागिरी, जाहागीर, जाहाजम, जाहांबाज, जाहाली, जाहालीम हे शब्द 'जाह' मध्ये पहावेत.**

**जाहागीरअमल** पु. सरदेशमुखी आणि चौथाई वजा जाता बाकी राहिलेल्या वसुलावरील हक्क.

**जाहागीरदार** पु. जहागीर असलेला, मिळालेला इसम; इनामदार. [फा.]

**जाहाती** वि. जुलमी : 'नाहीं वेठी जेवा सारा । जाहाती नाहीं म्हणियारा ।' – तुगा ३६०. [फा. जाह]

**जा(ज)हांबाजी, जाहंबाजपणा** स्त्री. पु. १. शौर्य; जिवावर उदार होऊन केलेला पराक्रम : 'राघोपंत सुभेदारास धरावे इतक्यांत त्याणें जहांबाजी करून किल्ल्यात पळून गेले.' – ऐलेसं १५२. २. हुशारी; वस्तादगिरी : 'जाहंबाजीचे हुन्नरें गेलें राज्य साधावें' – चिथोरा ३०. ३. कैदाशीणपणा ; कजागपणा.

**जाहांमर्द** वि. शूर; पराक्रमी; कोणत्याही कामात पुढे उडी घालणारा; कधी न हटणारा; खंबीर. [फा. जवानमर्द]

**जाहिद** पु. कर्मठ; धर्मनिष्ठ : '...(तुम्हांला) कर्मठ जाहिदांची, धर्ममार्तंडांची थट्टामस्करी पाहिजे ?' – गालिब १७४. [अर.]

**जाहि(ही)र–रा** वि. १. सर्वश्रुत; प्रसिद्ध; सर्वांस कळविलेले; व्यक्त : 'ते खबर जाहीरा होऊन' – मइसा १५.२७४. २. सार्वजनिक रीतीने प्रख्यात. ३. विदित; माहीत : 'हे खबर च्यारो बादशाहासी जाहीर जाहाले.' – इमं १३. ४. छापील; प्रकाशित. [अर.]

**जाहिराणा, जाहिरी** पु. स्त्री. प्रसिद्धी; उघडीक; जहूर : 'ही गोष्ट आपणास कळावी म्हणून लिहिले आहे, जाहिराण्यात आणूं नये.' – ऐलेसं ८.३९२५.

क्रिवि. उघडपणे ; प्रगट रीतीने; लौकिकात : 'परंतु जाहिराणा तर यादीप्रमाणेंच कबूल करावें म्हणतील.' – मइसा १२.१२४.

**जाहिरात** स्त्री. १. स्वत: तयार केलेल्या अथवा आणविलेल्या मालाचा किंवा स्वत:च्या धंद्याचा वृत्तपत्रे, भित्तीपत्रके, माहितीपत्रके, कॅटलॉग वगैरे साधनांमार्फत केलेला प्रचार, प्रसिद्धी २. प्रसिद्धीपत्रक; जाहीरनामा; प्रसिद्धीचे साधन. ३. कळविणे; प्रसिद्धी देणे. (क्रि.देणे, करणे, लावणे.)

क्रिवि. उघडपणे : 'जाहिरात अगर अन्तरगती या गोष्टीस त्याचें अनुमत नसावें.' –मइसा १२.१२३. [अर.]

**जाहिरातफलक** पु. रस्त्याच्या कडेला जाहिरातीसाठी उभारलेला लाकडी फळा.

**जाहिरातबाजी** स्त्री. १. प्रसिद्धीची अतिरेकी हौस; अवाजवी प्रसिद्धी: 'अधिकारी जाहिरातबाजीच्या मागं धावताहेत.' – इन्साफ १४३. २. लोकांचे लक्ष वेधून घेण्यासाठी संपर्कमाध्यमाद्वारे स्वत:ची, स्वत:च्या मालाची केलेली अतिशयोक्त प्रशंसा.

**जाहिरी** स्त्री. प्रसिद्धी : 'यकसखुनीपणाची नेकी व खुबी सर्व टोपीकरांत जाहिरीस येई तें करणें वाजीव व लाजीम आहे.' – मइसा १०.२८०.

**जाहिरीत** क्रिवि. उघडपणे; बाह्यत: : 'जाहिरींत बहुत स्नेह दाखवून.' – दिमरा २.९४.

**जाहीरखबर** स्त्री. जाहिरात; नोटीस.

**जाहीरणे** १. प्रसिद्ध होणे. २. उघड होणे : 'अर्धवट खोटा जाहीरला.' – मइसा ८.४३.

**जाहीरदारी** स्त्री. १. प्रसिद्धी. २. बाह्य देखावा; बाह्यात्कार : 'जाहीरदारीने सफाई ठीक नाहीं, दिलापासून साफ व्हावें.' – मइसा ५.१६७. ३. बाह्य सलोखा; वरपांगी मैत्री : 'सरदारांची आपसांत चित्तशुद्धता नाहीं, जाहीरदारी मात्र परस्परें आहे.' – दिमरा १.३१८. ४. जाहिरी; प्रसिद्धी : 'अद्यापि मसलतीचे वर्तमान जाहीरदारीत आले नाही.' – दिमरा १.२०९.

**जाहीरनामा** पु. १. प्रसिद्धी; डांगोरा; दवंडी. २. जाहीर केलेला लेख;

सरकारचे प्रसिद्धीपत्रक; नोटीस. ३. राजकीय पक्षांनी निवडणुकीपूर्वी केलेले धोरणविषयक कथन, निवेदन.

**जाहीरसभा** स्त्री. जाहीर ठिकाणी भरलेली सभा; सर्वांना जेथे मुक्तद्वार आहे अशी सभा; प्रकट सभा.

**जाळ** पु. १. विस्तव; ज्वाळा. २. ताप; ज्वर. (क्रि. येणे.) : 'जरा वाईच जाळ आलाय...'–उअं १२३. ३. राग; संताप. ४. आग किंवा तिखट यांच्या स्पर्शाने शरीरास होणारी वेदना; जळजळ; काहिली : 'तळव्या जाळ सुटला ।'–वसागा ६१. [सं.ज्वाला] (वा.) ० **उठणे** – जळजळीत होणे; लाल होणे (डोळे, हात, पाय).

**जाळ** स्त्री. कोळप्याची (डवऱ्याची) जोडी. (व.)

**जाळ** पु. मळ, घाण (धातूतील).

**जाळ** स्त्री. लतागृह ; जाळी; कुंज; दाट झुडपे.

**जाळ** न. मासे पकडण्याचे जाळे. (गो.)

**जाळ** न. (समासात) समुदाय : 'बाणजाळ सोडिले ।' – एरुस्व १०.४८.

**जाळकट** स्त्री. गुंतागुंत : 'रेघोट्यांच्या त्या जाळकटीत एखादे फुलपाखरू ... एखादा जखमेचा व्रण सापडतो आहे असे वाटायचे.' – वेज २८.

**जाळखेपण** न. त्रास.

**जाळखॉ** वि. १. जळणारा; आग लावणारा. २.(ल.) त्रास देणारा. (गो.) पहा : **जाळगा**

**जाळगा** वि. दुराग्रही; हट्टी; छळवादी (मूल). (राजा.)

**जाळगी** स्त्री. भोवऱ्याला गुंडाळावयाची दोरी. (बे.) पहा : **जाळी** [सं. जालक]

**जाळगी** स्त्री. मिर्ची (तोंड भाजते यावरून). (कु.)

**जाळट** वि. घशात जळजळ उत्पन्न करणारा : 'त्या एकेक वस्तू जाळट...' – माताजी ३०.

**जाळण** न. स्त्री. सरपण; इंधन; जाळायची वस्तू. पहा : **जळण** (को.)

**जाळणी** स्त्री. १. कळकळ. (गो.) २. विचारपूस.

**जाळणूक, जाळणी** स्त्री. छळणूक; त्रास; जुलूम; यातना.

**जाळणे** सक्रि. १.आग लावणे; पेटविणे; जळेल असे करणे. २. (ल.) त्रास देणे; छळ करणे; यातना देणे; गांजणे. ३. केवळ जाळावयाच्या उपयोगी, निरुपयोगी किंवा अमंगळ असणे; करणे. ४. (ल.) नीच उपायांनी पोसणे, भरणे (पोट). [सं.ज्वल्] (वा.) **(पाणी) जाळणे** – दैव अनुकूल असल्यामुळे मनास येतील त्या गोष्टी करणे.

**जाळदोर** पु. (गुऱ्हाळ) उसाच्या चुलाणाचे जाळ घालण्याचे तोंड ; याच्यातून खराब हवा बाहेर येते.

**जाळप करणे** जमीन जाळणे; राब, दाढ करणे. (कु.)

**जाळपी** पु. (गुऱ्हाळ) जाळ टाकणारा, जळण लावणारा माणूस.

**जाळपुळी** स्त्री. एक त्वचारोग; आग होणारे व पसरणारे क्षत, व्रण. पहा : **चाळपुळी**

**जाळपोळ–ळी, जाळभाज** स्त्री. शेत भाजणे व तत्संबंधी इतर कृत्ये यांस व्यापक संज्ञा.

**जाळपोळ** स्त्री. समाजद्रोही घटकांकडून इमारती, घरे, वाहने इत्यादींना आगी लावण्याचे प्रकार.

**जाळमाळ** न. गूढ कृती, कारस्थान. [सं. जाल + माला]

**जाळवणी** स्त्री. १. चौकशी, विचारपूस. पहा : **जाळणी**. २. (ल.) उठाठेव. (कु.)

**जाळवंड** न. १. वेलींची जाळी : 'जाळवंड जरा झोडपावं म्हणजे काय असेल ते आपोआप बाहेर येईल.' – चंग्र २१. २. जनावर व्याल्यानंतर बाहेर पडणारा जार.(व.)

**जाळवा** पु. गुऱ्हाळातील चुलाण्यावरील कामकरी : 'चुलाणे सांभाळणारा जाळवा पण तयार करता आला असता.' – परेपा २९८.

**जाळवात** पु. स्त्री. हातापायांच्या तळव्याला घर्मावरोधामुळे होणारा रोग; जळवात. [सं.ज्वाला +वात]

**जाळव्या, जाळ्या** पहा : **जाळपी**

**जाळारख** न. जाळंधर; जाळीची खिडकी; झरोका : 'मागौता आला : ऐसें म्हणौनि जाळारखें पाहावेया राहिला : ' – लीचपू २९.

**जाळंधर** न. जाळी; झरोका; लहान खिडकी : 'जाळंधरे मुक्तांची ।' – वेसीस्व ३.५०. [सं.जाल]

**जाळी** स्त्री. १. जाळे; जाळीचे, जाळीदार, भोके असलेले काम; जाळीदार भोके पाडलेली वस्तू; कोणतेही नक्षीदार छिद्रयुक्त काम; पडदा; चाळणी; आडव्या-उभ्या पट्ट्या असणारे लाकडी काम इ. (क्रि. पाहणे, खोदणे, उकरणे, गुंफणे, घालणे.) २. पडदा; गोषा : 'असे मर्यादेने जाळीत ठेविली.' – चिसं. ३. लग्नात व इतर समारंभात मुलींच्या डोक्यावर घालावयाचा फुलांचा साज; फुलांचे कोणतेही जाळीदार काम; जाळीदांडा ४. (ल.) पाश, बंधन. ५. शेतात मेंढवाडा करावयाचा असला तर तट्ट्या वगैरेंच्या ऐवजी केलेला जाळीप्रमाणे आडोसा. ६. (खडीकाम) रंगाचा दाब कमी जास्त करण्यासाठी वापरावयाचा जाळीदार पडदा. ७. गॅसबत्तीचे मँटल. ८. मधमाशांचे पोळे. (कु.) [सं. जाल]

**जाळी** स्त्री. वेलीचे घर; कुंज; गुंफा; लतागृह; दाट झुडूप. [सं.जाल]

**जाळी** स्त्री. भोवऱ्याची दोरी.

**जाळी** स्त्री. १. मुसके (जनावराच्या तोंडास घालण्याचे).२.दावे; दोर (पशूंना बांधण्याचा). [सं.जाल]

**जाळी** स्त्री. १. कुरळ्या; दशा (धोतराच्या वगैरे). पदराच्या शेवटचे दोरे (विणल्यानंतर राहणारे). २. विणलेल्या कापडाच्या काठाची करवत; करवतीकाठ. [सं.जाल]

**जाळी** स्त्री. १. माळका; सांगड (एखाद्या कामास बैल वगैरेंची). २. बरोबरी; समानता (एका जोखडाखालील बैलांची). [सं.जाल]

**जाळी** स्त्री. १. अति दाट मैत्री; स्नेह; एकजूट. २. मंडळ; संघ. [सं.जाल]

**जाळी** स्त्री. खिडकी; झरोका. [सं.जाल]

**जाळीकार** पु. जाळीतून लिखित संदेश आणणारा; दूत : 'पातले जाळीकारु भीमकाचे' – मातृरुस्व ३४.

**जाळीचा मणी** पु. स्त्रियांच्या गळ्यातील माळेत घालावयाचा जाळीदार मणी; असा मणी मध्ये घातलेला एक दागिना.

**जाळीतें** न अव. ज्ञान.

**जाळीदार** वि. १. नक्षीचे केलेले; जाळ्या लाविलेले (मखर, देव्हारा इ.). २. जाळी खोदलेले.

**जाळीदांडा** पु. डोक्यातील फुलांची जाळी.

**जाळीव** वि. १. जळाऊ २. जाळलेली; भाजलेली (पेरणीसाठी, जमीन). ३. भाजलेल्या जमिनीमधील (पीक). ४. आतील घटकावयव भाजून तयार केलेले (औषध, रसायन). ५. जाळण्यास योग्य ; सरपणास योग्य.

**जाळे** न. १.दोऱ्यांनी केलेले अनेक छिद्रयुक्त साधन; गुंफणी; जाल; पाश. २. जाळीदार काम; नक्षीचे काम; विरविरीत वस्त्र; चाळणीचा तळ. ३.(ल.) आटोका; ताबा; काबू; कपटव्यूह : 'तो केवळ सेवेमुळे स्त्रीच्या जाळ्यात सापडणे शक्य तरी आहे काय?' – नाकरु ३.३३८. [सं.जाल](वा.) **०विणणे** – व्यूह रचणे; चातुर्यपूर्ण आखणी : 'वाकटकरांनी.... पुढचं जाळं विणायला सुरुवात केली.' – मुंपोचाक ७४.**जाळ्यात पकडणे** – काबूत आणणे; कैचीत धरणे.

**जाळे** न. कोळीष्टक; कोळ्याचे घर; जळमट. [सं.जाल]

**जाळे** न. कासाराची भट्टी.

**जाळे** न. मागावरच्या वस्त्राला जाळी (करवती काठ) करण्याचे साधन. हा गुलाडीचा एक भाग आहे. पहा : **गुलाडी**

**जाळे** न. रत्नात रेघा असण्याचा रत्नातील दोष. [सं.जाल]

**जां** शअ. जो. (राजा.)

**जांग** स्त्री. ओरखडा. (गो.)

**जांग** स्त्री. (विप्र) जांघ. १. मांडी. २. गुह्येंद्रिय प्रदेश; कटिसंधी.

**जांगट** न. झेंगट. पहा : **जंगट**

**जांगटी** स्त्री. भिक्षेकऱ्याची वाजविण्याची थाळी, तास : 'फुटकी जांगटी । मोडकी परडी ।' – एहोरा ९१.

**जांगड** न. १. (परत करावयाच्या बोलीने) दुकानातून मोघम आणलेला माल; पाहून पसंत करण्यासाठी आणलेला, घेतलेला माल. २. शिंपी किंवा कापडवाला यांच्याकडून विक्रीसाठी आणलेले कापड, कपडा. ३. वरील प्रकाराने घेतलेल्या मालाचा हिशेब किंवा हिशोबाची वही, जांगड वही. ४. लबाडीने मिळविलेले द्रव्य. (व.)

क्रिवि. कायम विक्रीच्या ठरावाशिवाय घेतलेला (दुकानातील माल).

**जांगड** न. १. (जनावरे) एकत्र बांधणे; दावण. २. जोड, सांगड घालणे. (क्रि. घालणे, करणे.) ३. सांगड; संगत; संबंध.

**जांगड** न. लबाडीने किंवा अन्य प्रकाराने मिळविलेले द्रव्य. (ना.)

**जांगला–ली–ळा–ळी** वि. रानटी. [सं.जंगल]

**जांगली–ळी** पु. गुराखी; गवळी : 'येकु भोडुवा सेघे आला । जांगलीयाचे दृष्टी पडला ' – क्रिपु ८.५४. (को.) [सं. जंगल]

**जांगवळ, जायंवळ** पु. जांघेस घेतलेला चिमटा. (गो.)

**जांगाड** न. (तिरस्कारार्थी) जांग; मांडी : 'तर माझ्या जांगाडातून पलीकडे मान काढून वासरू आईकडे आशाळभूत नजरेनं बघू लागले.' – वळीव १३३. [सं. जंघा]

**जांगिया** पु. (पहिलवानाची) चड्डी. (बडोदे) [सं. जंघा]

**जांगी** स्त्री. घाण्याभोवती फिरणारी दुबेळकी. ही जमिनीपासून थोड्या अंतरावर घाण्याच्या बाहेरून अडकविलेली असते. (तेली)

**जांगुलिक** पु. सर्पवैद्य; सर्पाच्या विषावर औषध देणारा वैद्य; विषघ्न औषधांचा व्यापारी; गारुडी. [सं. जांगुल = विष]

**जांघ** स्त्री. १. मांडी; कटिसंधी. पहा : **जांग** २. कमरेपासून जांघाडात मारलेला तिरकस वार. [सं.]

**जांघजोड** पहा : **जंगजोड**

**जांघ(घा)ड** न. (तिरस्कारार्थी) जांघ.

**जांघभोवरी** वि. मांडीवर भोवरा असणारा घोडा.

**जांघिव** पु. मुलगा : 'श्रीकृष्णाचां जांघिवां होईजे । तरि लावण्याचे पडप लाहिजे ।'–शिव ३७०.

वि. मांडीपासूनचा; मांडीवरचा (मुलगा).

**जांघी** स्त्री. अर्धी विजार : 'थंडीत प्रत्येक कैद्याला दोन जांघिया दिल्या जात होत्या.' – के १५.३.१९३८. [सं.]

**जांघोवा** पु. पुत्रत्व : 'तेणें म्हणीतलें : जी जी : मज तुझा जांघोवा होआवा :' – लीचश्रीच १३.

**जांतण–ली, जातणी** न. स्त्री. जाते; खेळातले जाते. (राजा.)

**जांपाण** न. आच्छादन; आवरण : 'आतां जांपाणीं जांपाणीं आपुलें। अस्तोव्यस्त हें ।' – राज्ञा ११.३७६.

**जांफिशानी** पहा : **जान फिशानी** [अर.]

**जांब–भ** पु. १. जांभळीच्या जातीतील एक झाड. २. जायजांभूळ, फळ व झाड. ३. पेरु, झाड आणि फळ. ४. काजू. (को.) ५. खरबुजाची एक जात. हे तांबूस रंगाचे व गोलाकार असते. पहा : **जाम** [सं. जंबु]

**जांब–भ** पु. जाम; एक प्रकारचे भांडे; पेला; खाली पेंदी असलेले फुलपात्र : 'जांबलोटी पाण्याशीं ।'– स्त्रीगीत ९६. [फा.जाम]

**जांब, जांब(बो)य** स्त्री. जांभई. (कु.गो.) [सं. जृंभा]

**जांब बांगडा** बांगडा माशांतील एक जात.

**जांबळी** स्त्री. जांभळ; जांभळाचे झाड; जांभूळ. [सं.जंबु]

**जांबा** पु. एक जंगली झाड. पहा : **जांभा**. जांभळाची फांदी.

**जांबा–भा** पु. दगडाचा एक प्रकार; जांभळट तांबूस रंगाचा ठिसूळ दगड : 'देवळाची मुकसाळ... पोवळ... जांब्या दगडाचे आहेत.' – डाली ७.

**जांबिण** स्त्री. कागदी लिंबू : जांभळीच्या जातीचे एक झाड : 'पोफळीवरून जांबिणीवर चढायचं.'– पक्षिणी ८.

**जांबीर** पु. न. कागदी लिंबू. (प्र.) पहा : **जंबीर**

**जांबुवंत** पु. १. श्रीरामाच्या वानरसेनेतील सर्वांत म्हातारा अस्वल. २. (ल.) शहाणा म्हातारा माणूस; वडीलधारा पुढारी.

**जांबूनद** न. १. सोने : 'जांबूनदाचा पिळिला रस'– वेसीस्व ७.३३. २. धोतऱ्याचे फळ. [सं.]

**जांबेथर** पहा : **जांभिथर, जांभीत्री**

**जांबोरी** स्त्री. बालवीरांचा मेळावा : '१९२७ च्या मुंबईच्या जांबोरीला मी पाचशे बालवीर घेऊन गेलो होतो.'– दिअहो ३९२.

**जांबोस** पु. माशांची एक जात. हे दिवाळीच्या सुमारास पकडतात.

**जांभ** पु. एक प्रकारचे भांडे, पेला; खाली पेंदी असलेले फुलपात्र : 'बाळ

ग माझं खेळू आलं बाई लांब । हातामध्ये जांभ दूध मागे ।' - लोसाको. [फा. जाम]

**जांभई-ळी, जांभाळी** स्त्री. निद्रा, आळस इत्यादींमुळे तोंड पसरून निघणारा दीर्घ श्वास. (क्रि. घेणे, देणे) [सं.जृंभा]

**जांभई** वि. (अहि.) जांभळ्या रंगाची : 'मामाजी मामाजी आंदन काय । देसूह बहिणी जांभई गाय ।' - लोसाको.

**जांभळा** वि. जांभळाच्या रंगाचा.

**जांभाड** न. तोंड; मुख.

**जां(बू)भूळ** स्त्री. न. जांभळीचे झाड आणि फळ. याचे लाकूड इमारतीच्या उपयोगी असून सालीचा उपयोग रंगासाठी करतात. फळाचा रस औषधी आहे. [त. शाम्बल् = जांभूळ]

**जांभेथर, जांभीत्री** वि. जांभळसर रंगाच्या दगडाचा थर असलेला (दगड, धोंडा). असल्या दगडांचा कोकणात इमारतीसाठी उपयोग करतात.

**जिअणे** अक्रि. जगणे; जिवंत राहणे : 'तनु जाली म्हातारी । जिआवें दिसु दोनि च्यारीं ।' - शिव १३७. [सं. जीव]

**जिआलें** न. जीवन; आयुष्य; जिणे : 'तुआं स्नेहो सांडिलें । तरी जळों हें जिआलें ।' - शिव १०१. [सं.जीव]

**जिउती-तिउती** क्रिवि. ज्या -त्या बाजूस; सर्वत्र: 'तैसी जिउतीति-उतीकडे । तुझी वक्त्रेंचि प्रचंडे ।' - ज्ञा ११.३३९.

**जिक** वि. त्रस्त : 'आमचें ही माणूस जिक जाहलें.' - मइसा ६.४९७. [अर.दिक्क]

**जिकजिक** वि. पहा : **जिगजिग** : 'जिक जिक जिक जिक दुःख पिकविले ।' - राला ७७. [फा.]

**जिकडणे-ने** पहा : **जिकडून**

**जिकडू(डो)न** क्रिवि. ज्या प्रदेशाकडून; ज्या बाजूकडून ; ज्या दिशेकडून.

**जिकडून-तिकडून, जिकडणे-तिकडणे** क्रिवि. सर्व बाजूंनी; चोहोकडून; सर्वत्र, सभोवती, सर्वकडे. पहा : **हून**

**जिकडे** क्रिवि. १. ज्या प्रदेशाकडे; ज्या जागेकडे, दिशेकडे. २. ज्या ठिकाणी; जेथे. [सं.यत् + कटम्]

**जिकडेतिकडे** क्रिवि. सर्व ठिकाणी; प्रत्येक स्थळी; प्रत्येक बाजूला; प्रत्येक दिशेला; चोहोकडे ; सर्वत्र.

**जिकनी** स्त्री. तोल सांभाळण्यासाठी खालून दिलेला आधार; धिरा. (व.)

**जिकर** पु. १. भानगडीची हकीकत; कर्मकहाणी. (व.) २. पहा : **जिकीर**

**जिकि(के)रा,** जिकीरखाना. पहा : **जकिरा, जकीरखाना**

**जिकिरी, जिकीरखोर** वि. जिकीर करणारा. पहा: **जिकीर**

**जिकिरीचा-ची** वि. त्रासदायक; कष्टप्रद; कष्टाचे.

**जिकीर** पु. स्त्री. १. कटकट; त्रासदायक प्रश्न, गोष्ट; भुणभुण; घासाघीस; गळी पडून विनवण्या करून तगादा लावणे. (क्रि. करणे, लावणे.) : 'लढाईची गोष्ट लढाईत राहिली त्याचा जिकीर आतां कशाला पाहिजे.'- मइसा ५.१२. २. छळ; त्रास; जिगजिग (त्रासिक किंवा आजारी माणसाची). (क्रि. देणे, करणे.). ३. असहाय स्थिती; मेटाकुटी. (वा.) **जिकीरीस येणे** - मेटाकुटीस येणे; टेकीस येणे; हैराण होणे. [अर. जिक्र; सं.जिघृक्षा]

**जिकूनतिकून** पहा : **जिकडून तिकडून**

**जिकूनपस** पु. दम खालीवर होणे. घोड्याचा एक रोग. - अप २.१८९.

**जिक्क** वि. त्रासलेला; कंटाळलेला; वीट आलेला.पहा : **जिक** [अर. दिक्क]

**जिक्र** स्त्री. बोलणे; हकीगत; उल्लेख. पहा : **जिकर** [अर.]

**जिग** स्त्री. (भूशा.) धातुक खनिजांच्या संस्करणात खनिजाची प्रत वाढविण्यासाठी वापरात असलेले एक यांत्रिक साधन.

**जिगजिग** स्त्री. १. कटकट; पिरपीर. पहा: **जिकीर** (क्रि. लावणे, मांडणे होणे.) २. श्रम व त्रास; निष्फळ प्रयत्न; मेटाकुटी; उटारेटा; जगण्याची धडपड. पहा : **जिकीर** [फा.जिकजिक] वि. १. पहा : **जिक**. २. जर्जर : 'शैनेयहि दृष्टिपुढे येतां केला पळांत जिगजिग जो' - मोभीष्म ६.३५.

**जिगजिग** स्त्री. चकचक; झगझग. (गो.)

**जिगजिगचे** अक्रि. चकाकणे. पहा : **झिगझिगणे** (गो.)

**जिगजिगावचे** सक्रि. १. प्रकाश पाडणे. २. (ल.) भेडसावणे; त्रास देणे. (गो.)

**जिगजिगों** पु. काजवा. (गो.)

**जिगट** वि. चिकट.

**जिगटा,जिगी** पु. चिकट पदार्थ. (बे.) [क.]

**जिगर** पु. १. हृदय. २. (ल.) प्राण : 'तुम्हाबरोबर आम्ही आपला जिगरच दिला आहे.'- मइसा ६.३८२. [फा.]

**जिगर** न. (विअ.) दोर आणि कप्पी यांच्या मदतीने पाण्याच्या दाबावर चालणारा पाळणा; अवजड वस्तू उचलण्याचे साधन.

**जिगरजान, जिगरदोस्त** वि. जीवश्चकंठश्च मित्र.

**जिगरी** वि. जिवलग; प्यारा.

**जिगळी** स्त्री. (शेतकी) कुरीची, पाभरीची जिभली.(बे.)

**जिगा** पु. पागोट्यावरील रत्नालंकार : 'हस्ती, जिगा, वस्त्रे, अस्व, सिरपाव जाला.' - पेद १५.५०.

**जिगाट** वि. चिकट : 'धोंड्यावर एका बाजूला जिगाट जिगाट पसरलं.' - गोतावळा ९६. [क.जिगटु]

**जिगिमिगी** स्त्री. झळाळी : 'ब्रह्मादिकांच्या आंगीं : आति देवपणाची जिगिमिगि : ' - आउगी ८५.६४४.

**जिगीषा** स्त्री. १. जिंकण्याची इच्छा. २. महत्त्वाकांक्षा; थोर इच्छा. ३. लढण्याची हौस; लष्करी बाणा; उत्साह. ४. स्पर्धा; ईर्षा; ईर.[सं.]

**जिगीषु-षू** वि. १. जिंकण्याची, पुढे, वर जाण्याची इच्छा करणारा. २. महत्त्वाकांक्षी; स्पर्धा करणारा

**जिग्या** पु. एक निरुपयोगी तृण : 'उसात जिग्या, टारफुला असलं तनकाट.'- रैत १२३.

**जिजी** स्त्री. १. मोठी बहीण. २. (बहुमानार्थी) कोणतीही वयाने मोठी स्त्री. ३. मावशी.

**जिजीविषा** स्त्री. जीवनेच्छा. [सं.]

**जिझिया** पु. मुसलमान बादशहांनी हिंदूंच्यावर लादलेला एक कर : पहा : **जजि(झी)या** : 'अकबरानं रद्द केलेला जिझिया कर बादशहानं पुन्हा लागू केला.' – शहेन ४४२.

**जिण(न)गाणी–नी, जिनगी** स्त्री. १. जगणे; जन्म; जीवित्व; अस्तित्व : 'थू त्येच्या जिनगानीवर.' – गआर्सिंगे. २. उपजीविका; उदरनिर्वाह. ३. मालमिळकत; इस्टेट; पुंजी; ऐवज (जमीनजुमला, वतनवाडी विरहित) : 'कवडी कवडी करून जमवलेल्या आपल्या जिनगीतील.'– सको ५९७. पहा : **जिंदगी** : 'एकदा दत्तविधान झालें म्हणजे झाडून साऱ्या जिनगाणीवर आपला कबजा बसलाच...'– नि ६४०. ४. अब्रू. [फा. जिंदगी]

**जिणजित्रब** न. जनावरे : 'माडाखाली दरयेक जिणजित्रब.'– आंपव्य ७०.

**जिणणे, जिणवणे** अक्रि. जिंकणे : 'जिणावेया तो विखाहारू । कैसा पाळिला आपुला फुडारू ।' –क्रिपु ५.१४०. [सं.जी]

**जिणणे** उक्रि. जन्मणे; जन्म देणे.

**जिणी** स्त्री. १. जीवन; जिणे. २. जन्माची सफलता : 'हो काना मनाची जिणी ।' – ज्ञा १३.११६१.

**जिणे** न. जगणे; जीवित; प्राण; अस्तित्व : 'अशा तुज न जो भजे मनुज धिक् तयाचें जिणें ।' – केका ११.

अक्रि. जिवंत राहणे; अस्तित्वात असणे, जगणे : 'विश्व सर्व जेणें जिये ।' –ज्ञा ८.८८. [सं.जीवन]

**जिणे, जिणणे** अक्रि. जिंकणे; जिंतणे : 'कळे कीर्तीसीं जिती ।' – ज्ञा १.११३; 'कन्यात्रय जिणोनि पैजा । अनुजालागीं करणें भाजा ।'– मुआदि २३.१०४. [सं.जि.]

**जिणे वाचणे** १. आपले बरे चालणे; मनाप्रमाणे दिवस काढणे. २. जिवंत राहणे व निभावणे; टिकणे; टिकाव धरणे.

**जित** वि. जिवंत.

**जि(जिं)त** वि. १. पराभव पावलेले; जिंकलेले. २. मिळविलेले; स्वाधीन करून घेतलेले; वश केलेले. (समासात) कामजित, क्रोधजित, कामक्रोध इत्यादींनी जिंकला गेला आहे असा. जेव्हा समासात प्रथमपदी हा शब्द येतो तेव्हा उलट अर्थ होतो. जसे – जितकाम, जितक्रोध, जितस्त्री = काम, क्रोध इत्यादी ज्याने जिंकले आहेत असा. [सं.]

**जितका, जितकाला, जितुला** वि. जेवढा. [सं.यावत्]

**जितक्यास तितका** जेवढा उपयोगी पडेल तेवढा; जेवढा योग्य असेल तेवढा; विवक्षित कार्यापुरता; फार नाही व थोडा नाही; बेताचा : '(तमाशात) अध्यात्म जितक्यास तितके असल्यास ते स्वाभाविक होते.' – मजीस्थि १६४.

**जितखोर** वि. हट्टी; दुराग्रही; भांडखोर. पहा : **जिद्दखोर**

**जि(जिं)तणे** उक्रि. जिंकणे : 'देवाचेनि देजे बहुवशें । अरिराजें जिंतिलें अनायासें ।' – शिव ७३५.[सं.जित] (वा.) **जितून उभे राहणे –** जिद्द खाऊन, पाय रोवून ईर्षेने उभे राहणे : 'आणि तीनी वरूणे चंदाचे फंदामध्ये (चंदासाहेबांचे) जितून उभा राहिला'–ऐको ४३८.

**जितनी पाणी** एका खेळाचे नाव : 'लहान मुले... गल पाडून 'जितनी पाणी' खेळतात.' – गार १४५.

**जितपत** वि. जेवढे; जितके; ज्या प्रमाणाचे; याच्या जोडीला तितपत.

**जितपत्र** न. पराभव झालेल्या पक्षाने दिलेले जयपत्र (कुस्ती, वाद यांतील).

**जितपर्यंत–पावेतो** क्रिवि. जेथपर्यंत; जोपर्यंत; जितका वेळपर्यंत; जितक्या दूरपर्यंत.

**जितर(रा)ब** न. १. जीवनाला आधार असे जमिनीचे उत्पन्न; पिकलेले उभे शेत. २. श्रम करणारा प्राणी; बागाईत व ते करणारी (घोडा, बैल, गाढव, गाय, रेडा, म्हैस इ.) जनावरे: 'जीव द्यावा त्यापेक्षा जितरब गेले तरी उत्तम म्हणोन घोडी सोडली.'– भाब ९१.[सं.जित्रप]

**जितराप** न. जनावर : 'लाख मोलाचं जितराप हाय ते.' – गोतावळा १३९.

**जित(तु)ला** वि. जेवढा. पहा : **जितका** [सं.यावत्]

**जितवण, जिताणे** न. १. औक्षण; निंबलोण; कुरवंडी; दृष्ट काढणे : 'जितवण करूनि जननी । वस्तू सांडिल्या वोवाळूनि ।' – मुआदि २९.१६५; 'दिवस लागलिया माता। कोपावें कीं जीविता । जिताणे कीजे ।' – ज्ञा १३.३३६. २. जीवन; जिवंतपणा : 'आतां जिताणें श्रीमूर्ती । जाहलें यियां ।' – ज्ञा ११.६६६.

**जि(जिं)तवणी** न. १. वाहते पाणी. २. (ल.) जीवन; जिव्हाळा : 'कर्माचे आहे जिंतवणी।' – ज्ञा १८.५१४.

**जिता** वि. १. जिवंत. २. (ल.) न विझलेला (विस्तव). ३. राख न झालेला (कोळसा, निखारा). ४. वाहते, झऱ्याचे (पाणी). ५. चालू प्रचारातील (भाषा, लिपी, चाल). ६. अगदी जिवंत; निःसंशय. पहा : **जिंत** ७. जागरूक. [सं.जीवन्तः] (वा.) **जित्या पंथास लागणे –** भयंकर दुखण्यातून उठणे, जगण्याच्या मार्गात असणे.

**जिता** वि. चंचळ; मारलेला – भस्म केलेला नव्हे असा (पारा इ. धातू).

**जिता** वि. फेडले जाईल असे; तरते; न बुडणारे (कर्ज).

**जिता कोळसा** पु. १. निखारे पाण्याने न विझविता जमिनीत पुरून तयार केलेला कोळसा. २. धगधगीत जळते निखारे. ३. लवकर पेट घेणारा कोळसा. हा काही विशिष्ट लाकडापासून करतात. ४. धगधगीत निखाऱ्याची पूड (जखमेत भरण्यासाठी).

**जिताजागता** वि. चांगला जिवंत असणारा; जागरूक; समर्थ असणारा; धडधडीत जिवंत.

**जिताजीव** पु. (जीव शब्दाला जोर आणण्यासाठी) जिवंत माणूस; सजीव प्राणी.

वि. जिवंत; चेतनायुक्त (प्राणी).

**जिताड** स्त्री. जळून गेलेल्या किंवा नाश पावलेल्या पिकामध्ये हिरवागार दिसणारा पिकाचा तुकडा. (को.)

**जिताडा–रा** पु. उन्हाळ्यात ओलाव्याच्या आश्रयाने उगवलेले हिरवे गवत (को.)

**जिताणे** १. निंबलोण; २. जीवन.

**जिनाष्टमी** स्त्री. नवरात्रीची दुर्गापूजा.

**जितासु–सू** वि. जिवंत; वाहते (पाणी). [सं.]

**जिती** स्त्री. १. वाढती अवस्था. २. चैतन्य : 'धैर्याचिया चांगचांगीं। चिंतवणी जिती आंगीं । वाहे जो कां ।' – ज्ञा १८.६३८. [सं.जिता]

**जितुल** वि. जितके : 'जितुले रथ तितुलेचि गज' –उह ६२५.

**जितेर** न. (सुतारी) दोन माणसांनी ओढावयाचा रंधा. पहा: **किसूळ** (गो.)
**जिते रहो** उद्गा. शाबास; वा रे पठ्ठे. [हिं.]
**जितेंद्रिय** वि. ज्याने आपली इंद्रिये जिंकली आहेत असा; संयमी : 'परी जितेंद्रियासीचि घडे । योग्यतावशे ।' – ज्ञा ४.१४३. [सं.]
**जित्तं** वि. जिवंत : 'कुणाला जित्तं सोडू नका.' – अगाअवि ७.
**जित्रा** वि. पाने गळालेले (झाड); झित्रा.
**जिथपर्यंत–पावेतो, जिथवर, जिथोर** क्रिवि. १. जेथपर्यंत; ज्या जागेपर्यंत, २. जोवरी; जितका वेळपर्यंत; ज्यावेळेपर्यंत.
**जिथाळणे** अक्रि. जिवंत होणे; कोंब फुटणे (झाड इत्यादीस). (व.)
**जिथे** क्रिवि. जेथे; ज्या जागेवर; ज्या ठिकाणी. [सं.यत्र]
**जिथेतिथे** क्रिवि. सर्व ठिकाणी; सर्वत्र.
**जिद–द्द** स्त्री. १. हट्ट; दुराग्रह; जिकीर; आडमुठेपणा. २. कसोशी. ३. निर्धार; आग्रह. ४. निकर; निकड : 'दुर्गकर हिमतीनें झुंजत आहेत परंतु हैदरखान जिद्दीस आला आहे.' – ऐलेसं ६.३०२९. ५. उगाच विरोध; हट्टाचा नकार. भांडण. [अर.]
**जिद्द(द्दी)खोर, जिद्दी** वि. १.हट्टी; हेकट; दुराग्रही. २. भांडखोर. ३. आग्रही; प्रतिकूल परिस्थितीत प्रयत्न करणारा. [फा.]
**जिन** न. कापूस वटविण्याचे यंत्र; कापसाच्या बोंडांतून सरक्या काढायचे यंत्र; कारखाना. [इं.]
**जिन–न्न** पु. समंध; राक्षस. पहा : **जिंद** [अर.जिन्न]
**जिन** पु. १. जैन पंथातील विशिष्ट वर्गातील व्यक्ती; तीर्थंकर; अर्हंत. २. बौद्ध पंथातील महान पुरुष; बुद्ध. [सं.]
वि. जितेंद्रिय. [सं.]
**जिन** पु. घोड्यावरील बैठकीचे सामान, बंद वगैरे. [फा.झीन्]
**जिन (जिबटा)** वि. धनलोभी. (माण.)
**जिनक(ग–गा)र** पु. (जीन करणारा) १. खोगीर, लगाम इ. कातडी सामान तयार करणारी जात व त्या जातीतील व्यक्ती : 'जिनकराला ताकीद केली.' – ऐपो ४३०. २. चित्रे, बाहुल्या इ. तयार करणारी जात. [फा.]
**जिनगरी** वि. १. जिनगराने तयार केलेले. २. जिनगरासंबंधी.
**जिनगानी, जिनगी** पहा : **जिंदगी** : 'काय उरली जिनगानी ।' – राला ४५. [फा. जिंदगानी]
**जिनजित्रब** न. शेतातील, बागेतील, उभी पिके.
**जिनतान** न. तोंडात ठेवण्याच्या सुगंधी बारीक गोळ्या : '(गाडी लागू लागली) आणि मग लिंबाच्या फोडी, जिनतानच्या गोळ्या... वगैरे प्रकारांनी देवघेव सुरू झाली.' – गोवे १५.
**जिनपैरा–रे** पु. न. शेतकीच्या कामासाठी शेजाऱ्याकडून मागून आणलेला मजूर; उसनवार मजूर. शेजाऱ्याची पाळी आली असता त्याला आपणही परत फेडीसाठी असाच मजूर द्यावा लागतो.
**जिनबंद** पु. खोगिराचा बंद. पहा: **जीन** (क्रि. करणे.)
**जिनबंदी** स्त्री. तयारी; सिद्धता : 'जिनबंदी करून बिनीवाले सरसावून आहेत.' –उक्रि ६६९.
**जिनबाजी** स्त्री. १. लढाईचे व्यसन. २. कूच करण्याची तयारी : 'कळो लागली जिनबाजी' – मला ८५.
**जिन(न्न)शी–सी** वि. १. मालाच्या वाहतुकीचे (जहाज). २. बारदान, भरताड भरलेले; जिन्नस भरून आलेले.
**जिनशी** स्त्री. कोठार; जिन्नसखाना : 'तीन तोफा व बारुदचे पेटारे बारा आणले होते ते जिनशींत दाखल करविले.' – मइसा ५.१९४.
**जिन(न्न)स** पु. स्त्री. १. वस्तू; पदार्थ; (विक्रीचा, खरेदीचा) माल; चीज. २. कोणतीही एखादी वस्तू; काही एक पदार्थ. ३.(ल.) डाग; दागिने. ४. जात; प्रकार. ५. क्षुद्र वस्तू; पदार्थः 'जिवबा बोले गर्जुन मोंगल काय आणिला जिन्नस ।' – ऐपो २५८. [अर.]
**जिनसमासला** पु. वस्तूचा नमुना, स्वरूप; पदार्थ : 'कोठें उगें कोठें अधीक । परंतु जिनसमासला येक। ... जाहिल्याविण नाहीं ।।' – दास १०.१.२५.
**जिनसाजिनसी** वि. हरतऱ्हेचे : 'जडिताचा शृंगार कोंदणें हिरे हरजिनसाजिनसी ।' – अफला ५४.
**जिनसाना** पु. प्रकार; प्रकृती; स्वभाव : 'ऐसा याचा जिनसाना। पाहातां कळों येतें मना ।' – दास १९.१०.२९.
**जिनसाना** पु. सामानसुमान; माल : 'हैदराबादेस आपणाकडील जिनसाना आहे. तो घ्यावयाकरितां ईदम्यासमीप जाऊन रहावें.' –ऐको ४४१.
**जिनसीवाले** पु.अव. तोफखान्याचे अधिकारी.
**जिनसी सामान** न. दारूगोळा; तोफखान्याचे सामान.
**जिनहार** क्रिवि. बिलकूल; सर्वथैव; हरगीज : 'करारास जिनहार कसूर येणार नाहीं.' – पया ४८४. [फा.]
**जिनं** न. जगणे, आयुष्य : 'रुकमीन बोलयीती काय तुळशी तुजं जिनं । उसाच्या वाड्यासंगं लागं वर्सा तुजं लगीन ।' – लोसाको.
**जिना** पु. दादर; पायऱ्यांची वाट ; सोपान. [फा. झीना]
**जिनार** पु. जिंकलेले द्रव्य : 'कवणांतें मागावा जिना : ब्रह्मसुखाचा?' – उगी १७(५)१३१.
**जिनी** स्त्री. जिवंतपणा; सजीवत्व : 'कीं मूर्तीसि आलिया जिनी : डोळेयाचिया :'–एरुस्व ७९.
**जिनोम** सजीवांच्या कोणत्याही प्रजातीतील यच्चयावत, आनुवंशिक गुणधर्माचे निर्देशन करणारा संपूर्ण जनुकसमूह.
**जिन्नतमकान** वि. स्वर्गवासी; पैगंबरवासी : 'जिन्नतमकान निजाम अल्लीखान हे लढाईचे इराद्याने फौजसुद्धां चाल्लून आले होते.' – ऐको ४३९.
**जिन्नस** पु. वस्तू. पहा : **जिनस**. [अर.] (वा.) ० **उडविणे** – खर्चून टाकणे.
**जिन्नस** पु. दुसऱ्या पदी येणारा शब्द. उदा. बाईमाणूस, पोरसोर याप्रमाणे : 'लेकरू जिन्नस हाय. व्हत असतो अन्येव.' – पाचोळा ३८.
**जिन्नस अजनास** स्त्री. पदार्थ; माल; वस्तू: 'मशार्निल्हे या जिन्नस अजनाशीच्या तलाशांत, शोधांत आहे.' – ऐटि ३.६५. [अर.]
**जिन्नसखाना** पु. कोठार; वखार; सामान साठविण्याची जागा [फा.]
**जिन्नसदार** वि. आत जिन्नस (पुरण) घालून तयार केलेली (रोटी).
**जिन्नसपानस** पु. १. अनेक प्रकारचा जिन्नस; सामानसुमान; हरजिन्नस. २. कोठारातील सामान.
**जिन्नसभाव** पु. बाजारभाव.

**जिन्नसवर्ताळा** पु. धारा धान्यरूपाने भरावयाचा असेल तेव्हा भारी जातीच्या धान्याच्या बदली हलक्या जातीचे धान्य जास्त प्रमाणात घेतात, ते जादा प्रमाण, माप; भारी धान्याचा मोबदला, वर्ताळा.

**जिन्नसवार** वि. १. निरनिराळ्या तऱ्हेचे; पुष्कळ जातीचे. २. सुबक; चित्रविचित्र; अतिशय चांगले; उत्कृष्ट; भारी दर्जाचे (माल, कापड).

**जिन्नसवार** वि. १. प्रत्येक मालागणिक ठेवलेला; वर जिनसाचा निर्देश केलेला (हिशेब, कागद). २. पिकांसंबंधी स्वतंत्र तक्ता.

**जिन्नसाना, जिन्नसजिन्नसाना, जिन्साना** वि. उच्च दर्जाचा; खरा. पहा : **जिन्नसवार** २

पु. माल; सामान; कोठारी माल : 'तेथे सरकारचा जिन्साना आहे त्याची मोजदाद त्यास देऊन पावती घेणे.' – मइसा १२.१३६.

**जिन्नसी गलबत, तारू** स्त्री. माल वाहावयाचे तारू–गलबत.

**जिन्योष** पु. गाशा; जिनावर घालावयाचे वस्त्र.

**जिप्सम** न. एक प्रकारचे खनिज. [इं.]

**जिप्सी** स्त्री युरोपातील एक भटकी जात व तीतील व्यक्ती. जिप्सी हे मूळचे हिंदी होत. (इजिप्शियनचा अपभ्रंश. हे इजिप्तमधून आले असे युरोपियन मानीत). [इं.इजिप्शियन]

**जिबट** वि. १. हलक्या जिभेचा. २. वक्ता. (गो.)

**जिबर** न. एक प्रकारची मासळी. (गो.)

**जिबरोहोकना** पु. १. चांदीची चापट पायली. २. जीभ घासण्याची पट्टी. (झाडी)

**जिबली** स्त्री. अर्धा कापलेला जोड्याचा तळ. पहा: **जिमली** (गो.)

**जिबली** स्त्री. इंजिनची झडप. (झाडी).

**जिबलीचा खेळ** पु. टिकरी; शिंडी : 'मुली जिबल्याचा खेळ खेळत आहेत.' – गार १०६.

**जिबी गोंडा** वेणीचा गोंडा : 'शेर सोनीयाचं । रुखमाबाईचं जिबी गोंड ।'– जलोसा ५२४.

**जिबू(भू)ड** स्त्री. न. एक वेल आणि तिचे फळ; पहा: **चिबूड**

**जिभई** स्त्री. १. मागावर कापड विणताना ते ताठ बसवावयाची पट्टी, कामटी (या पट्टीच्या टोकांना कापड दाबून त्यास हा ताठपणा आणतात.). २. (काही ठिकाणी) ज्या दोन दोऱ्यांनी मागाच्या वह्या आलटून पालटून उचलल्या जातात त्या दोन बाजूच्या दोऱ्या.

**जिभट–टू** वि. वाचाळ; बोलका : 'मग राया भेटविला किन्नरू जिभटु:' – एरुस्व १८.

**जिभली** स्त्री. १. जीभ (लडिवाळे अथवा तिरस्काराने योजतात). २. जीभ (साप, घोरपड, पोपट इत्यादींची ) दुभागलेली, चिरलेली जीभ (यावरून).(को.) ३. जिभेखालच्या दोन मुख्य शिरा. ४. (सामा.) लहान जीभ. ५. जीभ खरडण्याची बांगडी, कडी इ. [सं. जिव्हा] (वा.) **जिभल्या चाटणे –** तोंडाला पाणी सुटणे; प्राप्तीची इच्छा होणे.

**जिभली** स्त्री. झाड (विहिरीच्या बाहेरच्या बाजूला उगवणारे).

**जिभली कलम** मूळच्या खुंटात इच्छित वनस्पतींचे पाचरीसारखे कापलेले कलम बसविण्याची प्रक्रिया.

**जिभली काठी** वि. विशिष्ट प्रकारचे काठ असलेले धोतर.

**जिभ(भो)ळी** स्त्री. १. जीभ खरडण्याची काडी. २. पहा: **जिभली** ५. ३. ओष्ठप्रांत – भाग (क्रि. चाटणे.).

**जिभा** पु. (चर्मकार) जोड्याच्या तळाच्या वरचा चामड्याचा दुसरा भाग.

**जिभा(भो)ळी** स्त्री. खालची मऊ, नाजूक कातडी. पहा : **जिव्हाळी** १

**जिभांगे** न. (नाविक) वाऱ्याला रोखून धरणारा व जहाजाला गती देणारा शिडाला बांधावयाचा कापड वगैरेचा तुकडा.

**जिभी** स्त्री. जीभ खरडण्याची काडी. पहा : **जिभली** ६

**जिभी** स्त्री किल्ल्याचा पुढे आलेला भाग; किल्ल्याचा दूरवर पसरलेला भाग; किल्ल्याच्या प्रवेशद्वारापुढे बांधलेली भिंत: 'तुम्हास बेंगरुळ घेणें तर तोफा चार पांच पूर्वेचे दरवाजेस पेटत नेऊन जिभीवर मार च्यार दिवस करावा.'– पेद २८.२४३.

**जिभीची चौकी** स्त्री. किल्ल्याच्या दरवाजाच्या बाहेर असणारी पहिली चौकी. पहा : **जिभी**

**जिभेचे पाते** जिभेचे टोक; दाताच्या वरील बहिर्वक्र भागासमोरील भाग.

**जिमखाना** पु. व्यायामशाळा; तालीमखाना; क्लब.[इं. जिम्नॅस्टिक + हिं. खाना]

**जिमती** वि. जबाबदार; हमीदार: 'माझें नावें पत्र जिमती खातरजमेचे पाठवावे.' – मदवा २.३३ [अर.जिम्मा]

**जिमा** पु. ताबा; हवाला; स्वाधीन : 'असा करारमदार करून तोफ त्याचे जिमेस केली.'– भाव ४३.

**जिमीन** स्त्री. जमीन.

**जिमी बिघा** स्वाधीन असलेला, जिम्मेस असलेला बिघा; लागवड झालेली जमीन : 'आणी गढी कोट जिमी बिघा विरचा जागा तनखा वगैरे.' – बाबारो ३.२२.

**जिमेनीस, जम्नीस** पु. जमावसुलाचा एक अधिकारी : 'जिमेनीस याणीं पोते, जामदारखाना, याजवर दखलगिरी करावी.'– सनदा १२६. [अर.जम्+नीस]

**जिम्मा** पु. अंतर्भाव; गणती : ' त्यात आमचीही जिम्मा झाली का ?' – भाव ३०.

**जिम्मा** पु. जबाबदारी; हमी. [अर.](वा.) ० **उचलणे –** जबाबदारी घेणे : 'जिच्या संरक्षणाचा आपण जिम्मा उचलला.' – मी २४२.

**जिम्मापा(फा)रक** वि. जबाबदारीतून मोकळा केलेला; जिम्म्यातून मुक्त. [अर. झिम्मा + फारिघ]

**जिम्मेदार** वि. जामीन; जबाबदार; ज्याने आपल्या अंगावर जबाबदारी घेतली आहे असा. [अर.]

**जिम्मेदारी** स्त्री. जबाबदारी; हमी : 'ती जिम्मेदारी माझी.'– श्रीयो १.२०७.

**जिम्ह (दृष्टि)** स्त्री. (नृत्य) तिरकस दृष्टी करून पाहणे; पापण्या मिटवून आकुंचित करणे. हा अभिनय असूया, आळस, जाड्य हे भाव दर्शित करण्याकरिता केला जातो. [सं.]

**जियादा** पहा: **जादा**

**जियाफत** स्त्री. मेजवानी. पहा : **जाफत** [अर.]

**जियारत** स्त्री. प्रार्थना. पहा : **जारत** : 'वर्गात जाऊन जियारत केली.' –

मइसा १.१८३. [अर.]

**जियाला** पु. उत्कर्ष : 'वाणिया व्येव्हारा जियाला बहुवसु' – रुस्व ७०४.

**जिये** न. जीव : 'आर्ती लाल्हाति जियें ।' – ऋव २.

**जियेचे** अक्रि. वाचणे; जगणे. (गो.) [सं.जीव]

**जिरगा** पु. तांदुळाची एक जात; जिरेसाळ. [का. जीरिगे]

**जिरगा** पु. १. समूह; दल. २. पुढाऱ्यांची किंवा मतदारांची मोठी सभा. पहा : **जर्गा** [फा. जिर्गा]

**जिरजिरीत** वि. जर्जर; फाटके. पहा : **झिरझिरीत** (गो.) [सं.जर्जर]

**जिरणी** स्त्री. एक झुडूप.

**जिरणी** स्त्री. आत मुरणे. [सं.जृ] (वा.) **० पडणे,० खाली पडणे,** – १. कमी पडणे; हलके होणे; उतरणे (ताप). २. शरीरात भिनणे; गुणावह होणे (औषध). ३. सोसणे; पचणे; पचनी पडणे (खाण्याचा पदार्थ, औषध – नेहमी उपयोग केल्याने).

**जिरणे** अक्रि. १. शोषले जाणे; भिनणे; मुरणे. २. आतल्या आत नाहीसे होणे; बसणे (पित्तामुळे, गर्भारपणी पोटाचा मोठेपणा, स्तनाची पुष्टता इ.). ३. बाह्यात्कारी विकृती न होता कमी होणे, जाणे (घामाशिवाय ताप, पू झाल्याशिवाय गुल्म). ४. दबणे ; खाली होणे; आतल्याआत राहणे; शांत होणे (गर्व, राग, आनंद). [सं.जृ] (वा.) **कंडू, खय, खुमखुम, मोडशी जिरणे–** नाहीसे होणे; कमी होणे (सूड, द्वेष इत्यादींच्या तीव्र भावना).

**जिरणे** अक्रि. पचनी पडणे; काही एक परिणाम न होणे (औषध, विष यांचा) : 'सांगे हाळाहाळ जिरेल; सेविलिया काई ।' – ज्ञा ३.२०३. [सं.जृ]

**जिरणे** अक्रि. १. गिळणे; गट्ट करणे; आधाशासारखे खाणे; नासाडी करणे (पैसा, पदार्थ यांची). २. पचणे (अन्न). ३. (ल.) अंगी लागणे; पूर्ण उपभोग मिळणे (अन्यायाने मिळविलेल्या पैशाचा). ४. लबाडी, गुन्हा यातून शिक्षा झाल्याशिवाय सुटणे; जाचक न होणे; पचणे. ५.फजिती पावणे. ६. आत सामावणे, राहणे, खपणे. ७. साधनसामुग्री खपणे; लागणे. [सं.जृ]

**जिरमाणी** स्त्री. पचन. पहा : **जिरणी** [सं. जीर्यमाण] (वा.) **जिरमाणी, जिरमाणीस पडणे** –मानवणे; पचनी पडणे (सारखा उपयोग केल्याने एखादे अन्न, औषध).

**जिरमुला** पु. एक प्रकारचा कंद. पहा: **बिरंबोळा** (गो.)

**जिरले** न. झुरळ. (कु.) [क.]

**जिरवण** न. पाचक; भूक वाढवणारे औषध;अग्निवर्धक पदार्थ. स्त्री. पचन. (गो.) [सं.जृ]

**जिरवणी** न. १.जड अन्नाचे पचन होण्यासाठी घेतलेला द्रव पदार्थ. २.(ल.) हरामखोरांचे कृत्य जिरविण्यासाठी सांगितलेल्या काही तरी सबबी; सारवण.

**जिरवणी** पु. १. जिरून जाण्याची क्रिया; जिरवणीचा पाऊस. २. पहा : **जिरवणूक**

**जिरवणीचा पाऊस** भीजपाऊस; ज्याचे पाणी जमिनीत जिरून जाते असा पाऊस,

**जिरवणूक** स्त्री. १. शोषविणे; मुरविणे; पचविणे. २. पहा : **जिरवाजिरव**

**जिरवणे** उक्रि. १. शोषविणे; मुरविणे; पचविणे : 'तुझ्या जिरविले बहु प्रणलमंतु पोटे पण ।' – केका १८. २. दाबणे; कमी करणे. ३. बाहेर फुटू – पडू न देणे; छपविणे.४. (मस्ती, रग, गुर्मी) खोडकी मोडणे; शिक्षा करणे; फजिती करणे.

**जिरवाजिरव** स्त्री. बाहेर येऊ न देणे; छपवाछपवी; दाबादाब; निरवानिरव; सारवण.

**जिरवेल** स्त्री. भाताची एक जात. पहा : **जिरगा**

**जिरसपोट–टा** वि. लहान मूल पीत असता किंवा औषध घेत असता आई लडिवाळपणे म्हणते तो शब्द. [सं.जृ]

**जिरा** पु. लोखंडाचे कडे. [फा.]

**जिराई(य)त** न. १. कोरडवाहू शेतीला योग्य अशी जमीन. २. लागवडीतील जमीन. ३. धान्याची शेते; जमीन; ह्या जमिनीतील उत्पन्न; माळवे : 'ऐसे आमुचे बागाईत । वरकड तुमचें जिराईत ।'– मध्वक ४०२. ४. केवळ पावसावर पिकणारे शेत – पीक. [अर.]

**जिराई(य)त–ती,जिरात** वि. १. पावसावर पिकणारी; कोरडवाहू (जमीन, पीक) : 'जिराइतातील बाजरी हळूहळू वाढली.' –बनग ५९. २. लागवडीच्या जमिनीवर उत्पन्न केलेले. ३. शेतीच्या कामाची; शेतीला योग्य अशी (जमीन). ४. शेतातील पिकासंबंधी (सारा, पाहणी इ.). [अर.जिराअत्]

**जिराई(य)त–ती, जिरात** वि. उपऱ्या.

**जिराथखाना** पु. शस्त्रागार. [फा.जिराह+खाना]

**जिरानियम** न. लहान कुंडीत लावण्याजोगे एक शोभिवंत झाड.

**जिराफ** पु. आफ्रिकेतील उंच मानेचा प्राणी; उष्ट्र व्याघ्र; चित्रोष्ट्र. [फ्रें.]

**जिरायत, जिरात(द)खाना** पु. धान्याचे कोठार; सरकारी धान्याचे कोठार; अठरा कारखान्यांपैकी एक.

**जिराह** पु. चिलखत; कवच. [फा.]

**जिरी** पु. जिरे पिकवणारी माळ्याची जात. (व.)

**जिरीफूल** पु. एक पालेभाजी. (झाडी)

**जिरू** न. जिऱ्याचा दाणा.

**जिरूमिरू** न. जिरे व मिरे इ. मसाल्याच्या सामानाला व्यापक शब्द; किराणा जिन्नस.

**जिरे–री** न. एक प्रकारचे सुवासिक धान्य. याचा मसाल्यात उपयोग करतात. हे रक्तशोधक व दाहशामक आहे. [सं.जीर]

**जिरे–री** न. स्त्री. चिलखत. पहा : **जिराह** : 'जरीचे झगियाचे अंतर्भागीं नर्वरी बारीक कडियाची लोखंडी जिरे.' – चिशिमब ११२. [फा.]

**जिरे(री)गार जिरेहगर** पु. जिरेहगर; चिलखत तयार करणारा. [फा.]

**जिरे(री)टोप** पु. शिरस्त्राण : 'जिरेटोप पेट्या बांधून.' – भाव १०.; 'शिरीं जिरीटोप घातला ।'–ऐपो ३२.

**जिरेपाक** पु. जिरे वगैरे घातलेला एक प्रकारचा पौष्टिक पाक, औषध.

**जिरेसाळ** स्त्री. भाताचा एक प्रकार : 'जिरेसाळीचा भात वाढावा.'– डाली ५१.

**जिरेळ–ळी–ळे** स्त्री. केळीची एक जात. पहा : **जीर**

**जिरॅनियम** (कृषि) एक फुलझाड. [इं.]

**जिरौचे** अक्रि. पचविणे; जिरविणे. (गो.)

**जिलकाद** पु. मुसलमानी (अरबी) वर्षाचा अकरावा महिना. [अर.]

**जिलबी, जिलेबीच्या तोफा, जिलबी तोफखाना** नेहमीच्या स्वारीच्या परिवारातील बाळगता येण्यासारख्या तोफा.

**जिल(ली–ले)बी** स्त्री. एक मिष्ट पक्वान्न; हे मैद्याच्या पिठापासून करतात. [हिं.जिलेबी]

**जिलबीचा घोडा** पु. कोतवाली घोडा.

**जिलबीचे माणूस** परिवारातील माणूस : 'अलिजाबहाद्दर यांचे जिलबीचे माणसावर ब्राह्मण मारला हा आरोप आला' – ऐको ४४३ –४४.

**जिलबीभाती** वि. पायात घालण्याच्या तोड्याचा एक प्रकार : 'पायातील जिलबीभाती दुहेरी तोडे '– सांजवात २४.

**जिलही** स्त्री. भोवऱ्याच्या खेळात काढलेले लहानसे वर्तुळ.

**जिलागर** पु. चकाकी आणणारा; पॉलीश करणारा. [अर.जिला]

**जिलीद, जिल्दन** न. बांधीव पुस्तक; लेखबंध. [फा.]

**जिलीदपुस्त** न. पृष्ठभागाचे पान; वरचा कागद.

**जिली(ल)ब** स्त्री.१.खाशांचा परिवार; समुदाय; लवाजमा; इतमाम. २. स्वारी; मिरवणूक (राजा किंवा देव यांची. यात कोतवाली घोडे, ईटवाले, बोथाटीवाले, बंदुकवाले, भालाईत, सांगवाले आणि बाणाईत असे सहा प्रकारचे लोक असतात). [फा. जिलब]

**जिली(ल)बदार** पु. जिलीबमधील माणूस; नोकर; हुजऱ्या.

**जिली(ल)बहुद्दे** पु. अव. ईटवाले, बोथाटीवाले, बंदूकवाले, भालाईत, सांगवाले, बाणाईत इ. सहा प्रकारची शस्त्रे धारण करणारे हुद्देदार.

**जिलेटिन** न. (रसा.) प्राण्यांची हाडे व कातडी यांपासून तयार होणारा सरसासारखा पदार्थ. [इं.]

**जिलेबी** स्त्री. स्वारी; मिरवणूक : 'जिलेबीचे हत्तीच पन्नास होते.' – स्वामी १४५.

**जिलेवंत** वि. शोभिवंत : 'तक्तराव जिलेवंत नाचती सभांगना आनंदात।' – प्रला ४१.

**जिलोह** पु. १. लवाजमा : 'त्यास छत्राची व जिलोहाची तयारी जलदीने करून पाठवावी.' – दिमरा २.१५०. २. थाट; समारंभ. [फा.जिल्वा]

**जिलोहखाना, जिलोखाना** पु. दरबारचे दालन; सभास्थळ: 'नबाबांनीं हवेलीचे जलोहखान्यापुढे एक तोफ ठेविली.' – मइसा २.१२०.

**जिल्काद** पु. अरबी वर्षाचा अकरावा महिना. [अर.]

**जिल्दसाज** पु. ग्रंथबांधणीकार.

**जिल्ल** स्त्री. छाया.

**जिल्हइ, जिल्ह–ल्हे** स्त्री. १. चकाकी; उजळा; झळाळी. २. पदार्थ गुळगुळीत, चकचकीत करण्याची क्रिया; पॉलिश. ३. तेज. [अर.जिला]

**जिल्हईग(गा)र, जिल्ह(ल्हे)ग(गा)र** पु. उजळा देणारा.

**जिल्हईदार** वि. चकाकीत; चकचकीत : 'जिल्हइदार अपकरे वाटते आज चरकी धरिले.' – प्रला १.१९.

**जिल्हा** पु. १. देशविभाग; परगणा; प्रांत. (सामा.) भाग. पहा: **देश**. २. काही तालुक्यांचा मिळून झालेला राज्याचा एक भाग. [अर.जिला]

**जिल्हा** पु. कागदाच्या बंदाचा अर्धा भाग (कागदाला पाडलेल्या चार घड्यांपैकी दोन घड्यांची जागा).

**जिल्हा** पु. मिश्र राग : 'त्यांना शुद्ध रागापेक्षा जिल्हा पसंत पडेल.' – सको २५१.

**जिल्हादार** पु. १. जिल्ह्यावरचा अधिकारी. पहा: **सुभेदार**. मराठी राज्यात पेटा–तालुक्यांवरच्या अधिकाऱ्यालाही हा हुद्दा असे. २.(चुकीने) जेलर; तुरुंगाचा अधिकारी. [फा.]

**जिल्हाधिकारी** पु. (शाव्य.) जिल्ह्याचा मुख्य महसूल अधिकारी.

**जिल्हापरिषद** स्त्री. जिल्हा पातळीवर काम करणारी लोकनियुक्त संस्था.

**जिल्हे** न. मासे धरण्याचे लहान जाळे. (को.)

**जिल्हे इलाही** पु. परमेश्वराची छाया. (ल.) बादशहा.

**जिल्हेज** पु. मुसलमानी (अरबी) वर्षातील बारावा महिना. [अर.]

**जिल्हेवीत, जिल्हेवीतरेघ** न.स्त्री. बंदाच्या चार रकान्यांपैकी दोन रकान्यांमधून काढलेली रेघ.

**जिवट–स** वि. १. रगदार; पाणीदार; जोरदार; दमदार; काटक (मनुष्य, जनावर). २. बळकट; दृढ; कणखर : 'असा पुरुष नित ती एक भोगिल जिवट असेल रंडी ।' – प्रला १८८. [सं.जीव]

**जिवट–स** वि. १. योग्य; लायक; समर्थ; ऐपत, मालमत्ता वगैरे असणारा २. नफ्याचा; उत्पन्नाचा (धंदा, उद्योग). [सं.जीव]

**जिवटपणा** पु. चिवटपणा; चिकाटी; काटकपणा; तगून राहण्याची क्षमता : 'आमच्या लौकिक संस्थांत जितका जिवटपणा यावयास पाहिजे तितका अजून आला नाही.' – टिकेले ४७.

**जिवडा** पु. १. (सामा.) क्षुद्र जीव; जंतू. २. सरपटणारा प्राणी; उरोगामी (साप, किडा इ.) [सं.जीव]

**जिवडा** पु. प्रियपुत्रादिकांसाठी लडीवाळ नाव (कलिजा, हिरा याप्रमाणे).

**जिव(व्ह)णी** स्त्री. जेवणी; दोन ओठांमधील चीर, फट : 'त्या मुलांचे ओठ लाल असून जिवणी लहानसर होती.' – कोकि ४२९. [सं.जेमनी]

**जिवणे** अक्रि. जगणे; जिवंत असणे. [सं.जीवन]

**जिवती** स्त्री. १. मुलास दीर्घायुष्य मिळावे म्हणून श्रावण महिन्यात माता दर शुक्रवारी पूजतात ती देवता. २. मूल जन्मल्यानंतर सहावीच्या दिवशी पूजावयाची देवता; सटवीची मुलाच्या गळ्यात बांधतात ती लहान प्रतिमा. [सं. जीवंतिका]

**जिवती** स्त्री. आषाढ वद्य अमावास्या. (व.)

**जिवनळ** पु. देवनळ; एक प्रकारचे गवत; बोरू. (गो.)

**जिवलग** वि. जिव्हाळ्याचा; आवडता; प्रिय; जिवास आधारभूत (पती, मित्र, पुत्र, ईश्वर इ.) : 'देवाच्या सख्यत्वासाठी । पडाव्या जिवलगांसी तुटी ।' –दास ४.८०८ [सं.]

**जिवविणे** उक्रि. जिवंत करणे; जगविणे: 'अन्न जिववी परिमित आहारीं। अधिक झालिया तेंचि मारी ।' – मुआदि २०.८५.

**जिवसा** पहा : **जिवलग**

**जिवळणे** अक्रि. जिव्हारी लागणे : 'जिया मदन जिवळिला ऐसे निज लावण्य' – पंचो १०७.८.

**जिवंत** वि. प्राण असणारा; जिता. [सं.जीव]

**जिवंतपणा** पु. चैतन्य; प्राणशक्ती.

**जिवंत प्रवाह** वाहते पाणी; सतत चालू असलेला ओघ.

**जिवा** पहा : **जिता**

**जिवा** पु. (नाविक) दोरीचे दोन पेड वळून झाल्यानंतर त्यात मिसळावयाचा तिसरा पेड; शिडाच्या दोन पाखा ज्या जोडसुंभाच्या दोरीने जोडलेल्या असतात तो गोट.

**जिवा** पु. बारीक शेंग किंवा फळ.

**जि(जी)वा** अगोचर शक्तीच्या बाहेर.

**जिवा आगळा** वि. एखाद्याच्या काम करण्याच्या शक्तीच्या बाहेर.

**जिवाचा कलिजा** प्राणापेक्षाही प्रिय.

**जिवाचा सोबती** आयुष्याचा सोबती (नवराबायको, रोग).

**जिवाजड** वि. कुवतीबाहेरचे : 'शिर्के कितीही चांगले असले तरी तुमच्या जिवाजड हे लग्न मला कर्तव्य नाही.' – सांजवात ११४.

**जिवाजीपंत** पु. (विनोदाने) जीव; प्राण.

**जिवाजूक–ग** वि. जिवापाड; सामर्थ्याबाहेर : 'त्यांनीं जिवाजूक उचललेली कर्जाची धोंड पाहून मीनाच्या भावप्रवण मनाला किती क्लेश झाले.' – अडा २०.

**जिवाणू–णे** न. १.(सामा.) सर्पाच्या जातीचा प्राणी. २. क्षुद्र जीव; जंतु; किरडू : 'सदू जिवाण्यासारखा मनातून वळवळत होता.'– राकाघाका १७४.

**जिवाद** स्त्री. घोरपड; जवादे.(कु.)

**जिवानकल्ला** पु. जीवखडा; अश्मा.

**जिवापरता, जिवापलीकडे** क्रिवि. १. सहन करण्याच्या बाहेर (श्रम, आजार). २. प्राणापेक्षा (प्रिय.).

**जिवापाड–डे** क्रिवि. जिवाचे मोल देऊन, शक्तीबाहेर.

**जिवाभावाचा** पु. (सोबती, चाकर, पदार्थ, गोष्ट, काम) आपल्या स्वत:च्या संदर्भात लाडका, आवडता, मूल्यवान वगैरे.

**जिवाभावाला–स**, क्रिवि. स्वत:साठी; स्वत:ला; विशेष जरुरीकरता.

**जिवाभ्य** क्रिवि. जिवापाड; जिवापलीकडे : 'त्यानें पडेल तसें जिवाभ्य श्रम साहस करून स्वामीकार्य करावे.' – मराआ.

**जिवाभ्यास, जिवाभ्यासाने** क्रिवि. आपलेपणाच्या भावाने; अगदी मनापासून.

**जिवारा** वि. किड्याने खाल्लेला (पदार्थ).

**जिवावरचा ताप,ज्वर, रोग, जिवावरचे दुखणे** प्राणघातक ताप, आजार इ.

**जिवावर लाल** दुसऱ्याच्या मदतीवर चैन करणारा.

**जिवाविशेष** क्रिवि. स्वत:च्या शक्तीच्या पलीकडे.

**जिवासांड** वि. जिवाला धोका येण्याइतका (आजार, त्रास).

**जिवाळा** पु. झरा : 'बारमाही पाण्याचा जिवाळा.' – इन्साफ ४५.

**जिवाळा** पु. पहा: **जिव्हाळा.** १. देह. २. जिवंतपणा. (कु.) वि. सजीव : 'लवणाची मासोळी । जरी होय जिवाळी ।'– अमृता ७.३६.

**जिवाळी** स्त्री. आत्मा; सार; मुख्य तत्त्व; जिव्हाळा: 'आत्मेयांची जिवाळी : मिं कृपाकटाक्षे निहाळिं'– उगी १०६.७९४.

**जिवाळे** न. लहान कमळ : 'चौकावरि जिवाळीं । नवरत्नांची ।' – ऋव ७४.

**जिवीचा** वि. प्राणप्रिय; जिवलग.

**जिव्हा** स्त्री. (यंअ.) यांत्रिकी यारीचा वरखाली करता येणारा जमिनीशी समांतर राहणारा आडवा भाग.

**जिव्हा** स्त्री. १. जीभ; रसनेंद्रिय : 'जगामध्ये जगमित्र । जिव्हेपासीं आहे सूत्र ।' – दास १९.२.१९. २. (भाषा.) भाषेच्या उच्चारणातील सर्वात महत्त्वाचा अवयव. स्वर आणि व्यंजन यांच्या उच्चारणात तिचा उपयोग होतो. ३. (ल.) अग्नीची ज्वाळा. ४. जिभेच्या आकाराची वस्तू. [सं.] (वा.) ० **खाणे** – रागाने, त्वेषाने जीभ चावणे. ० **वाकडी पडणे** – १. गैरसावधपणाने बोलणे. २. अर्धांगवायूने जीभ लटकी पडणे. ० **विटाळणे** – १. जिव्हेचे रसज्ञान नष्ट करणे. २. शिव्या वगैरे देऊन जीभ भ्रष्ट करणे; जिभेने पाप करणे. ३. नालायक, वाईट मनुष्याची शिफारस करणे, मध्यस्थी करणे. ० **हाती धरणे** – १. फार शिवीगाळ करणे. २. अतिशय बरळणे. ३. अधाशीपणाने खाणे. **जिव्हेला आढावेढा असणे** – बोलण्याची मनाई, आडकाठी असणे; बोलण्याला आडपडदा असणे; **जिव्हेस टाचा देणे** – १. न खाणे. २. इंद्रियदमन करणे. ३. न बोलणे. इतर वाक्प्रचारासाठी पहा : **जीभ**

**जिव्हाग्र** न. १. जिभेचा शेंडा, टोक. २. (चुकीने) जिव्हार. (वा.) **जिव्हाग्री असणे** – तोंडपाठ असणे. [सं.]

**जिव्हाछेद** पु. जीभ कापणे (खरेपणा सिद्ध करण्यासाठी).

**जिव्हादंश** पु. (जिभेला झोंबणारे, चटका बसणारे ) तोंडी लावणे: 'आणि राखेहूनि कोरडे । आंत बाहेरी येके पाडें । तो जिव्हादंशु आवडे । बहुतया ।'– ज्ञा १७.१४४. [सं.]

**जिव्हादोष** पु. १. भाषणातील दोष. २. जिभेतील दोष; अडखळणे.

**जिव्हाप्रमाद** पु. बोलताना अनवधानाने झालेली चूक : 'विचारपरिप्लुतच्या ऐवजीं परिलुप्त म्हणाला होता तो जिव्हाप्रमाद.'– गोबे १०६.

**जिव्हामध्य** पु. (भाषा.) जिभेचा मधला भाग. मध्य स्वरांच्या उच्चारणात उपयोगी पडणारा अवयव. [सं.]

**जिव्हामल** पु. जिभेवरील राप : 'बाइसी जिव्हामळ सांडावेया लखुमींद्रभटा हाती दीधले' – लीचपू २२१.

**जिव्हार–री** न. स्त्री. १. हृदय; आत्मा; चेतनास्थान; काळीज; अंत:करण. २. (ल.) प्राणाप्रमाणे चैतन्योत्पादक गोष्ट, तत्त्व; मर्म; सत्त्व; जीवनकला. ३. जीव : 'शस्त्रांगीं जिव्हारें । आरोपुनी ।' – ज्ञा १.२२०. ४. जीवाची गुप्त गोष्ट, रहस्य; काळीज; मर्म : 'वेद जयालागीं झकविले । लक्ष्मीयेही परी राहविलें । जिव्हार जें ।'– ज्ञा ११.११८. ५. जिव्हाळा : 'ना तरी सकल धर्मांचें माहेर । सज्जनांचे जिव्हार ।'– ज्ञा १.३१. पहा : **जिव्हाळी** [सं.]

**जिव्हारी** क्रिवि. नाजूक भागात; मर्मस्थानी; अंत:करणात (जखम इ.): 'नरपति रमणी ते खोंचलीसे जिव्हारीं ।' – सारुह ३.५७. [सं.]

**जिव्हारूढ** वि. केव्हाही पाठ म्हणून दाखविता येणारा; जिव्हाग्री

असणारा; सदासिद्ध; अगदी तयार.

**जिव्हालौल्य** न. हाव.

**जिव्हास्तंभवात** पु. जिभेचा अवष्टंभ; जीभ लुळी पडणे.

**जिव्हाळ** पहा : **जिव्हाळी** २.

**जिव्हाळा** पु. १. कळवळा; काळजी; उत्कंठा; जीव लागणे; मन जडणे; आत्मीयता. २. माया; ममता; आप्तभाव. [सं.जीव + आलय]

**जिव्हाळा** पु. उगम; उत्पत्ती; मूळ ; झरा 'तयामध्ये जाणीवकळा । जगज्जोतीचा जिव्हाळा ।' – दास १०.९.५. [सं.जीव+आलय ]

**जिव्हाळा** पु. १. आत्मा; सार; मर्म; मुख्य तत्त्व : 'नेणती मुक्तीचा जिव्हाळा ।' – एरुस्व ७.४३. २. मर्मस्थल; वर्म. ३. जीवित; प्राण; चैतन्याचे उगमस्थान ; आधार : 'नामरूपा तूंचि जिव्हाळा ।' – एरुस्व १६.९२.

**जिव्हाळा** पु. १. (वीणा, तंतुवाद्ये) घोडी आणि तारा जेथे एकत्र होतात त्या बिंदूवर जो कापूस लावतात तो; झारा. २. वीणेचा झारा.

**जिव्हाळा** पु. पोहोच; आवाका ; धारणाशक्ती.

**जिव्हाळा** पु. लाभ : 'तेतुला जिव्हाळा । मानावा हा ।' – ज्ञा १३.१०८९.

**जिव्हाळी** स्त्री. १. एखादी मर्माची जागा; नाजूक, वर्माचा भाग (नखाच्या, शिंगाच्या खालचा किंवा कानाच्या मागचा). २. सचेतन मांसाचा भाग; मर्मस्थान. (क्रि. लावणे, लागणे.) ३. जिवंत; जीवयुक्त : 'लवणाची मासोळी । जरी होय जिव्हाळी ।।' – अमृता ७.३६.

**जिव्हाळी** स्त्री. १. शिंग, पिपाणी, पोघरे, अलगूज इत्यादींतून सूर निघण्यासाठी त्यांच्या तोंडात बसविलेला अर्धवर्तुळ किंवा चपटा तुकडा. २. यंत्रातील पडदा [सं.जिव्हा] (वा.) **० लागणे, लावणे; जिव्हाळीला लावणे, लागणे** – १. मर्मभेद होणे; (अक्षरशः व ल.) जिवाला लागून राहणे. २. नखाच्या मुळाशी जखम झाल्याने रक्तस्राव होणे.

**जिव्हाळ्याचा** वि. अत्यंत मैत्रीचा; जिवलग; मायेचा; काळजीचा; कळकळीचा : 'तो गाजुदीखान याच्या जिव्हाळ्याचा होता.' – भाब २०.

**जिव्हांकुर** पु. (मानस.) मानवी जिभेवरील लहान-लहान उंचवटे. आकारानुसार यांचे तीन प्रकार पडतात. प्रत्येक जिव्हांकुरात एक वा अधिक रुचिकलिका असून त्यांचा संबंध रुचिवेदनाशी असतो.

**जिव्हिका** स्त्री. ( जीव.) जीभ. [सं.]

**जिव्हेचा जड** १. स्पष्ट, पूर्ण शब्दोच्चार करावयास असमर्थ ; बोलण्यात खोड असणारा. २. अबोल्या; कमी बोलणारा.

**जिष्णु-ष्णू** वि. १. सदोदित विजयी; जयशाली; बलशाली. २. (समासात) जिंकणारा. [सं.]

**जिसाळी** स्त्री. (शेतकी) एक प्रकारचे औत.

**जि(जु)स्त** वि. बरोबर. (गो.) [इं.जस्ट]

**जिहलम्, झिलम्** पु. चिलखताचा एक प्रकार.

**जिहाद** न. (इस्लाम) धर्मयुद्ध. [अर.]

**जिळवाट** वि. चिकट : 'भोकराची जिळवाट बी येशाच्या डोसक्यात पडली.' – खळाळ ४.

**जिज्ञासा** स्त्री. ज्ञानाची इच्छा; कुतूहल; शोधक बुद्धी, औत्सुक्य [सं.]

**जिज्ञासाप्रवृत्ती** स्त्री. (माशा.) कुतूहल भावना.

**जिज्ञासु-सू** वि. १. ज्ञानाची इच्छा असणारा; शोधक; चौकस. २. विद्याव्यासंगी. ३. मुमुक्षु. [सं.]

**जिंकणाभानी, जिंकणूक** स्त्री. (कवड्यांचा खेळ) केवळ गमतीखातर न खेळता पण लावून खेळणे.

**जिंकणी, जिंकणूक** स्त्री. जय; विजय; यश; जिंकणे.

**जिंकणे** उक्रि. १. पराभव करणे; पादाक्रांत करणे; पाडाव करणे. २. जय मिळविणे; यशस्वी होणे (लढाई, खटला, खेळ यांत). ३. कह्यात ठेवणे; ताबा मिळविणे; सुटका करून घेणे; स्वाधीन ठेवणे (झोप, क्षुधा, तहान, रोग). ४. दडपणे; दाबून टाकणे. काही चालू न देणे (विकार, मनोवृत्ती, लोभ, इष्क, भोगेच्छा यांचे.). ५. चढ करणे; सरशी करणे; आपल्या गुणांनी इतर पदार्थ हलके करणे.६. सोडविणे; उलगडणे; फोड करणे; उत्तर देणे, काढणे; करणे (कोडे).७. न्यायतः मिळविणे; स्वत्व सिद्ध करणे (विवादास्पद किंवा इतर द्रव्य). ८. संकटातून मुक्त होणे; निभावून जाणे. [सं.जि] (वा.) (ऊब) **जिंकणे** – अनोळखीपणामुळे एखाद्याच्या श्रेष्ठतेबद्दल भय वाटत असता ते ओळखीमुळे नाहीसे होणे; भय वाटेनासे होणे; भीती जाणे.

**जिंकणे-ण्हे** अक्रि. पराभूत होणे; जित होणे. : 'संग्रामाते जिंकण्हारू' – गीतार्णव १.५३५. [सं.जि]

**जिंगी** स्त्री. माडीवरची खिडकी; पहा : **जंगी** : 'एका बाजूला दोन तीन बारीक जिंग्या भिंतीतून आरपार गेल्या असून.' – मोचन ६५.(कु.)

**जिंत** वि. १. जिवंत; सचेतन. २.(ल.) केवळ; निःसंशय (विशेषतः पिशाच्च, समंध, अवदसा अशा शब्दांशी जोडून). पहा : **पिशाच** २. जागरूक; सावध. (राजा.)

**जिंतरोटी** स्त्री. काडी मोडून दिलेल्या बायकोच्या उपजीविकेकरिता नवऱ्यास द्यावा लागणारा पैसा.

**जिंतवणी** न. जिवंत किंवा वाहते पाणी (पाट वगैरेचे). (राजा.)

**जिंताणे** न. मीठमोहऱ्यांनी दृष्ट काढणे : 'आंता जिंताणे श्रीमूर्ती । झालें इया' – ज्ञा ११.६५६.

**जिंतु** वि. जिवंत : 'तो जिंतु जाहाला ऐसा डोळा देखोनि । तुम्हीं साखिनादु दिधला ।।' – क्रिपु १.८३.

**जिंथणे** जगणे; जिवंत राहणे : 'एकें पवनुचि पिंथी । एके तृणेंतंब जिंथी ' – ज्ञा ७.३७.

**जिंद** पु. १. मेलेल्या मुसलमानाचे पिशाच. २.दुष्ट माणूस; कपटी मनुष्य; सैतान. ३.हट्टी मुलगा. (व.) [अर.जिन्न]

**जिंद** पहा : **जिद्द** : 'जिंद वाढविल्यास कामास येणार नाही.' – पाब १८.

**जिंदगी, जिंदगाणी-नी** १.आयुष्य; जीवन : 'त्याची आठवण मला जिंदगीभर राहिली आहे.' – वाघसिंह. २. संसार : 'उपरी कोणत्या सुखें जिंदगानी करावी.' – ऐलेसं १.१७८; 'काय उरली जिनगानी ।' – राला ४५. [फा.]

**जिंदान** पु. तुरुंग. [फा.]

**जिंदानवान** पु. तुरुंगाचा दरोगा; जेलर. [फा.]

**जिमा** स्त्री. (बायकी) गणती; जमा; अंतर्भाव.

**जिंमा, जिम्मा** स्त्री. पु. १. भार; पत्कर; हमी; जबाबदारी : 'ज्यांनी लोकांस मार्ग दाखवून काहीं प्रकारविशेषानें ज्ञानामृत पाजण्याचा जिंमा घेतला आहे.' – नि ८८७. [अर.]

**जिंमा,जिम्मा** १. विश्वास; जामीन (वस्तू, मनुष्य, कृत्य यांचा). २. ताबा; हवाला. ३. (कायदा) तिसऱ्या इसमाचे वचन, जबाबदारी किंवा देणे पुरे करण्याचा करार; जामीनकी. [अर.](वा.) **जिंमेस करणे** – स्वाधीन करणे; हवाली करणे: 'पन्नास हजार फौज व तीनशें तोफा तुझे जिंमेस करतो.' – भाब ४२.

**जी** सना. जो या सर्वनामाचे स्त्रीलिंगी एकवचनी रूप.

**जी** अ. १. नावाच्या पुढे आदरार्थी, बहुमानार्थी लावावयाचा प्रत्यय. जसे – गणपतरावजी, रामचंद्रजी, साहेबजी. २. हाक मारताना विशेष परिचयदर्शक असा योजावयाचा प्रत्यय. जसे :– 'अरे खंडूजी'. ३. प्रश्नार्थक संबोधन. (यात उत्तर गृहीतच असते): 'तिला स्वशिशुवंचनें अदयता शिवे काय जी ?' – केका १०६. ४. महाराज, स्वामी या अर्थाचे विनयदर्शक संबोधन : 'ॐ नमो जी । आद्या ।'–ज्ञा १.१. ५. व्यक्तीच्या विशेषनामास लावावयाचा सन्मानार्थी प्रत्यय. उदा. अप्पाजी, रघूजी, संभाजी इ. पंत किंवा वडिलांचे नाव जोडावयापूर्वी योजितात. जसे – कृष्णाजीपंत, बाळाजी विश्वनाथ. [सं.जयिन्]

**जी** अ. १. मान्यतादर्शक होकार म्हणून वापरला जाणारा शब्द.[ध्व.] (वा.) **जीजी करणे, म्हणणे** – हांजी हांजी करणे; खुषमस्करी करणे. २. पोवाडा, लावणी यांच्या कडव्यांच्या शेवटी साथ करताना उच्चारावयाचा शब्द.

**जी** न. जेवण.

**जीआली** वि. जिवंत : 'तीयें एणें वीण जीआली असति : आणि हें पुसत होतें : ऐसें सांघावें :'– लीचउ ६५४.

**जीउतीतिउती** क्रिवि. त्या त्या बाजूला.

**जीउली** स्त्री. लहान जीव : 'हां गा: तुमचे जीव : मग यांचीया काइ जीउलीया?' – लीचउ १०२.

**जीक** वि. श्रमित ; त्रस्त; क्षीण. पहा: **जिक्क**

**जीख** स्त्री. जय. (गो.)

**जीग** न. कलाबूत : 'जीगनं भरलेलीं 'सुस्वागतम्' ही अक्षरं विटलीं होती.' – कलंदर १४५.

**जीग** एकाच तऱ्हेच्या अनेक वस्तू तयार करण्यासाठी वापरायचा साचा.

**जीगरबाज** वि. बेडर; निधड्या छातीचा.

**जीगर** वि. (ल.) बिनधास्त; बेफिकीर: 'तो पैशानं मातला होता. जीगर झाला होता.' – हातभट्टी २१.

**जीगा** पु. पगडीचा तुरा : 'वकील मुतलख व अमीर उल उमरावची खिलत चारकुवा व जीगा व शिरपेंच व परिंदा.' – ऐको ४४५. [फा.]

**जीघटक** पु. (मानस.) स्पीअरमनने सुचवलेली बुद्धिमत्तेचा प्रधान घटक म्हणून मानली जाणारी कल्पित सर्वसामान्य क्षमता.

**जीणवति** वि. जिंकणारी : 'जीणवति गजघंटा.' – उगी २३.२३०.

**जीणस** पु. जिन्नस.

**जीणा** पु. जिंकलेले द्रव्य : 'प्रतदीनीं सारी जुं खेळति : जीतुका जीणा ए तीतुका दानासि देतिः' – लीचपू १८.

**जीणी** स्त्री. १. जिवंतपणा : 'मोअधर्मु कां जीणी । आला असे जेथ'– ज्ञा १८.१५१४.२. जीवन; आयुष्य : 'या आमुचीया जीणी जी' – लीचपू ७६... ३. जगण्याचे सार्थक : 'फिटो विवेकाची वाणी । काना मना जीणी'– ज्ञा १३.११५५.

**जीणे** न. १. जन्म; जगणे. पहा: **जिणे** : 'काय जीणे मारिलें दुष्ट भाजे।' – नवनीत २५१. २. जीवन. [सं.जीव]

**जीणे** अक्रि. जगणे : 'मागिल सा चक्रवर्तीचे या परि । जीणें देशाचां करभारीं । तैसा नव्हे रावा मुरारी । हा आपुलेचि दे।' – नरुस्व ७०६. [सं.जीवन]

**जीत** स्त्री. ज्योत : 'भाऊ करू याही पैसानं लावू पोतं। भाची करू सून जसं इव्रयनी जीत ।'– लोसाको. (अहि.)

**जीत** वि. जिवंत. पहा : **जिता** : 'जरी आप्तार्चे सार्थक न कीजे । जीत मेल्या सारिखे ।' – मुआदि २८.८०. पहा : **हरळीची मुळी.** [सं.जीवित] (वा.) **० हाडाला खिळणे** – सर्व जन्मभर एखाद्याला चिकटून राहणे.

**जीत** स्त्री. जय; सरशी (खेळ, पण, होड यांमधील). [सं. जि–जित]

**जीत** स्त्री. १. आग्रह; निकड. पहा ; **जीद** : 'हर्दम खावंदासी जीत करावी.' – पेद ६.७९. २. पैज; होड; ईर : 'तिने ताणून धरला पती। दोघीजणी पडल्या जीति ।' – पला ७७. (व.) [अर.जिद्द]

**जीतणे** अक्रि. जगणे; जिवंत राहणे : 'जीताति हे सकल जीवहि चापपाणी ।' – मुआभा.

**जीतवण –न** न. दृष्ट काढण्याची क्रिया : 'कुंती जीतवन करून । भूषणें टाकी ओवाळून ।' – पांप्र ८.१५९.

**जीतसती** स्त्री. मोठी पतिव्रता स्त्री.

**जीतहते(त्या)र** न. जे नेहमी हाताशी असते व ज्याचा उपयोग ताबडतोब करता येतो असे (तरवार, भाला, कट्यार यांसारखे) हत्यार.

**जीतु** क्रिवि. जिवंतपणीच : 'दरिद्रें जीतुचि प्रेत जाण ।' – मुआदि ८.३६.

**जीते** वि. जागृत : 'सर्वज्ञें म्हणीतलें : तुझें स्थळ जीतें असे मां ? तीही म्हणीतलें : जी जी : मीं वाचुं नेणें : ' – लीचपू ७२.

**जीद** स्त्री. निकड; हट्ट. पहा : **जिद्द** : 'राजे व व्यंकटराव मिळून करंडे याजकरवीं जीद धरविली.' – पेद २०.१०८. [अर.जिद्द]

**जीन** वि. म्हातारा; वृद्ध; जीर्ण : 'कैसा जिंकावा हो करूनि बळे आहवा युवा जीने ।' – मोभीष्म ४.९. [सं.जीर्ण]

**जीन** न. पु. खोगिराचा एक प्रकार. विशेषतः विलायती चामड्याचे खोगीर; पलाण : 'वर जीन घातलं होतं.' – फकिरा ७३. [फा.झीन]

**जीन** न. एक प्रकारचे सुती कापड.

**जीन** पु. (जीव.) आनुवंशिक गुणधर्म धारण करणारा गुणसूत्राचा लहानसा विशिष्ट भाग. [इं.]

**जीन** पु. भूत. पहा : **जिंद, जिन** : 'दिलीरखानाच्या अंगात कोणी जीन शिरून बोलत आहे.' – सूप्र ९०.

**जीन** स्त्री. विशेषतः स्त्रिया पितात असे एक प्रकारचे मद्य : 'तिनं जीन

घेतली.' - जॅकपॉट १९२.

**जीनखोड** न. खोगिरावर बसणाऱ्याच्या सुरक्षिततेसाठी केलेला टेका, आधार.

**जीनगर** पु. चामड्याचे काम करणारी एक जात व तीतील व्यक्ती. [फा.]
स्त्री. जिनगराचा धंदा, कसब.

**जीनणे** जाणणे.

**जीनतुकडा** पु. न्हाव्याच्या धोकटीतील वस्तरे ठेवण्याचा बुरणुसाचा तुकडा.

**जीनपाठक** वि. सर्व रंग एकसारखा व फक्त पाठ पांढरी असणारा घोडा. (हा अशुभ समजतात) - अश्वप १.१०१.

**जीनबडक** वि. चिक्कू; कृपण.

**जीनबंद** पु. जीन आवळण्याचा पट्टा.
वि. खोगीर वगैरे कसून तयार असलेला (घोडा).

**जीनबंदी, जीनबाजी** स्त्री. कूच करण्याची तयारी; खोगीर चढविणे; मुस्तेदी : 'शिंद्यांच्या लष्करांत आवई पडली त्याजवरून तेथे दोन प्रहरांत जीनबंदी जाहली.'- ऐलेसं ७.३४९८; 'शनवारांतून झुकत चालली केली हावद्यावर जीनबाजी ।' - पला ४.१३. [फा.]

**जीन वारंवारता** (वैद्यक) एकाच प्रकारचे जीन्स पुनः पुनः येणे. जननशास्त्रात होणारी घटना.

**जीनसी** स्त्री. तोफखाना.

**जीना** पु. जिंकलेली वस्तू; दान : 'कवणाते मागावा जीना।' - ऊगी १३१. [सं.जि]

**जीनी** स्त्री. १. जिवंतपणा : 'नवल जीनी जाली: वैराग्यासि ' - उगी ४४.२. २. मिळकत : 'तै तुडताळाचीया जीनी : पारुखलीया'- शिव ६३५.

**जीप** स्त्री. मोटारगाडीचा एक प्रकार : 'ध्वनिक्षेपक लावलेली एक जीप जमावात फिरविण्यात आली.' - मालआ ६६.

**जीभ** स्त्री. १. चव घेणे, अन्न घोळवणे चाटणे व गिळणे या कार्यांना मदत करणारा तोंडातील स्नायू; रसनेंद्रिय. २. (ल.) जिभेच्या आकाराची वस्तू, भाग. [सं. जिव्हा] (वा.) ० **आवरणे** - बोलण्यावर नियंत्रण ठेवणे : 'चंपे, जीभ आवर.' - गुशि १८१. ० **काढणे** - पदार्थ खाण्यासाठी आशाळभूतपणा करणे. ० **चावणे, चावलीशी करून बोलणे** - १. चूक लक्षात येणे. २. भिऊन, संकोचामुळे दबत दबत बोलणे. ० **चुरुचुरु चालणे** - अयोग्य, अप्रासंगिक, वेडेवाकडे बोलणे. ० **जड असणे, होणे** - १. लवकर पाठ करता न येणे. मंदबुद्धी होणे २. (अस्पष्टोच्चारामुळे) बोलता न येणे; चांगले शुद्ध बोलता न येणे. ० **झडणे** - (खोटे वगैरे बोलण्याने) वाचा नाहीशी होणे. ० **नरकात घालणे** - पोकळ वचनांनी रिकाम्या बढायांनी वगैरे जीभ विटाळणे; खोटे बोलणे. ० **पाघळणे** - गुप्त वार्ता फोडणे; न बोलावयाची गोष्ट, गुप्त गोष्ट बोलणे. ० **बधिर होणे** - जीभ जड होणे. ० **मोकळी सोडणे** - हवे तसे बोलणे, खाणे; बंधन, नियम न पाळणे. ० **मोडणे** - बोबडी वळणे; मुके बनणे; शब्द न फुटणे. ० **लवलव करणे** - चुरुचुरु बोलणे. ० **लालचावणे** - खाण्याला उत्सुक असणे; तोंडाला पाणी सुटणे. ० **लांब करून बोलणे** - वरिष्ठांशी अघळपघळ बोलणे; उर्मटपणाने बोलणे. ० **वळवळणे** - (लहान मुलाने) १. बोलण्याचा प्रयत्न करणे; बोलावयास लागणे. २. शिव्या देणे; अद्वातद्वा बोलणे ० **विटाळणे** - अपशब्द बोलणे; वेडेवाकडे बोलणे. ० **शिंदळ, निसरडी** - वाह्यात, ताब्यात नसलेली जीभ. ० **सैल सुटणे** - बडबड सुरू होणे : 'समुदाय मिळाल्यावर जीभ सैल सुटे.' - कलंदर २३७. ० **सोकणे, सोकावणे** - १. चटक लागणे. २. चव येणे (अन्नाची - सरावाने). ० **हाती धरणे** - मन मानेल तसे बोलणे, खाणे. **जिभा अवघडणे** - बोलायला सुचेनासे होणे : 'त्यांच्या पैशाला अशा चारीकडनं वाटा हैत. मग कशाचं गटळ करतोय? यावर दोघांचं बोलणं कुचमलं, जिभा अवघडल्या.' -वळीव ३६. ० **जिभेचा पट्टा** - अद्वातद्वा बोलणे; वाचाळता. ० **जिभेचा पालट** - खाण्यात बदल; रोजच्या खाण्याच्या पदार्थांऐवजी इतर पदार्थ खाणे. ० **जिभेचा लोळ-ळा** -अतिशय कढत पदार्थ खाल्ल्याने जीभ भाजून जाणे. **जिभेचे फुटाणे फुटणे** - फाडफाड बोलणे. ० **जिभेच्या टोकावर असणे** - बोलून टाकण्याच्या तयारीत असणे; तोंडपाठ असणे : 'आपल्या अगदी जिभेच्या टोकावर ते नांव आहेसे तुम्हांला वाटत राहतें नि असे असूनहि तुम्हांला तें आठवत नाहीं.' - हखेमओ ६१. **(एकाच) जिभेने साखर किंवा गू खाणे** - एकाच वेळी बरेवाईट म्हणणे; दोन्ही प्रकारे बोलणे. **जिभेला काटा लावणे** - एखादी गोष्ट गुप्त ठेवणे. **जिभेला चिमटा घेणे** - तोंड ताब्यात ठेवणे. **जिभेला-स टाचा देऊन (काही एक) ठेवणे** - आपण न खाता दुसऱ्यासाठी गोड पदार्थ राखून ठेवणे. **जिभेला डाग देणे** - जीभ ताब्यात ठेवणे; जिभेला नियंत्रण घालणे. **जिभेला लगाम घालणे** - बोलण्यावर नियंत्रण ठेवणे : 'थोडा जिभेला लगाम घाल.' - राऊ १६०. **जिभेवर असणे** - १. तोंडपाठ असणे. २. अगदी ताज्या आठवणीत असणे. ३. बोलून टाकण्याच्या तयारीत असणे. **जिभेस आडवा वेढा नसणे** - वाह्यात बडबड करणे; निरर्थक प्रलाप काढणे. **जिभेस हाड नसणे** - जीभ ताब्यात नसणे (खोटे बोलणे, शिवीगाळ करणे यात); खोटे, अपशब्द बोलण्याचे भय नसणे.

**जीभ** स्त्री. एक प्रकारचे शीड; फोगी.

**जीभ** स्त्री. रणगाडा किंवा पाळणा याची खालची बाजू. (व.)

**जीभट** पु. वि. वाचाळ.

**जीमूत** पु. मेघ; ढग : 'जीमूत प्रेरिले सत्वरा ।' -मुआदि ४९.९८ [सं.]

**जीमूतवर्ण** वि. मेघवर्ण; निळा.

**जीयावे** जगावे : 'या वरी आतां जीयावें या हे पण बरें' - गीताचंद्रिका १.४६.

**जीर** पु. कोवळे केळ. (को.)

**जीर** स्त्री. लहान साखळी. [फा. झिराह]

**जीर्ण** वि. जुने; फाटके; तुटके; कमकुवत; जुनाट; अशक्त; नासलेले; विरलेले (वस्त्र, वस्तू, प्राणी). [सं.]

**जीर्ण** वि. पचलेले; जिरलेले (अन्न). [सं.]

**जीर्णज्वर** पु. पुष्कळ दिवसांचा बारीक ताप; हाडीताप. [सं.]

**जीर्णावस्था** स्त्री. मोडकळीस आलेली अवस्था, गत. [सं.]

**जीर्णोद्धार** पु. १. जुनी मूर्ती किंवा देऊळ यांची डागडुजी किंवा नवीन बांधणी; जुन्याचे नवे करणे. २. (ल.) जुनी वस्तू काढून नवी घेणे; बदल करणे; जुन्या बदली नवे घेणे. [सं.]

**जील** पु. स्त्री. १. झील; संबळ वाद्यांपैकी लहान टिमकी; टिमकी. २. बैलाच्या गळ्यातील घुंगरे. (व.) [फा. झील] (वा.) ० **देणे** – उठावणी देणे; उत्तेजन देणे. (व.)

**जील** पु. काटेरी झुडपांची दाट जाळी. (व.)

**जीलसुभानी** स्त्री.१. ईश्वराची सावली. २. (ल.) पादशाहाची एक पदवी : 'हजरत जीलसुभानी याणीं आज्ञा केली जे...'- मइसा ६.६२७. [अर.जिल ए सुबहानी]

**जीव** पु. १. प्राण : जीवित. २. प्राण असणारा जिवंत प्राणी. ३. लहान कीटक; प्राणी (चिलट, घुंगरडे, पिसू, किडा इ.). ४. तेज; वीर्य; जोम; धमक; पाणी; शक्ती; धैर्य; कार्यक्षमता; सत्त्व; सार (माणूस, घोडा, बैल इत्यादींचे). ५. अंतरात्मा; सचेतन आत्मा. पहा : **जीवात्मा** [सं.] (वा.) ० **अधांत्री उडणे** – संकटात पडणे; भांबावून जाणे; घाबरून जाणे. ० **अर्धा करणे** – मनुष्याला अतिशय त्रास देणे. सर्व शक्ती खर्च करणे (श्रम, व्यर्थ शिकवण इ.). ० **अर्धा होणे** – भिणे; त्रासले जाणे; गर्भगळित होणे; श्रमणे; दमणे; अर्धमेले होणे. ० **अडकणे, टांगणे, टांगला असणे** – आवडत्या वस्तूच्या प्राप्तीसाठी घाबरे होणे, काळजी लागणे. ० **आटणे** – १. मरेमरेतो काम करणे. २. अतिशय थकून जाणे (मेहनत, काळजी इ.नी). ० **आंबणे** – त्रासून जाणे; कंटाळणे. ० **उडणे** – १. प्रेम नाहीसे होणे; विटणे. २. भीतिग्रस्त होणे. ० **कयंगटीस येणे** – १. मेटाकुटीस येणे. २.मुरगळून पडणे. (कर.) ० **कालविणे** – गलबलणे ; अतिशय क्षोभ होणे; घाबरणे; गडबडणे. ० **की प्राण करणे** – अतिशय प्रेम करणे. ० **कोड्यात पडणे** – बुचकळ्यात पडणे; काही न सुचणे : 'हे ऐकून भागाचा जीव कोड्यांत पडला.' – ऊन १७. ० **कोरडा होणे, पडणे** – घसा वाळणे; थकणे; अतिशय दमणे; (आजार, श्रम, भूक यांनी). ० **कोंडाळणे** – गुदमरणे (ना.). ० **खरडून बोलणे, सुकणे, रडणे** – आकांत करणे; ओक्साबोक्सी रडणे. ० **खाऊन** – सर्व शक्ती एकवटून किंवा मनापासून; जोरजोरात : 'ताशा वाजंत्रीवाले सकाळपासून दाराशी येऊन दोन पायांवर बसले होते आणि जीव खाऊन वाजवीत होते.'– भुज १२२. ० **खाऊन काम करणे** – मनापासून काम करणे; कसून काम करणे. ० **खाणे – घेणे, जिवास खाणे** – एखाद्याच्या जिवास त्रास देणे; झुरविणे. ० **खाली पडणे** – उत्कट इच्छा पूर्ण होणे; साध्य गाठणे; मनाजोगे होणे. ० **गंगाजळ होणे** – धन्य होणे; कृतार्थ होणे : 'मळवट भरून त्येंच्यासंगं गेली असती. जीव गंगाजळ झाला असता माझा.' – खळाळ ७४.० **गोळा होणे** – १. अधीर होणे. २. मरणोन्मुख होणे. अतिशय घाबरणे : 'जों जों देखे देव कार्खेत बोळा । तों तों त्याचा होतसे जीव गोळा। ' – आसुच २६. ० **घेऊन पळणे** – जीव वाचविण्यासाठी पळून जाणे. ० **जाळणे, मारणे** – निग्रह करणे; दमन करणे (कामेच्छा, पाप वासना, मनोविकार यांचे). ० **टाकणे** – १. प्राण सोडणे. २. निराश होणे; चित्त स्वस्थ नसणे. ३.फार उत्कंठा लागणे; अतिशय हट्ट, छंद घेणे. ४. खूप प्रेम करणे; लुब्ध होणे : 'त्यासाठी मी जीव टाकतो.' – अआबांदे ११. ० **टाकून पळणे** – अतिशय त्वरेने, घाईने, एकदम पळणे; भिऊन पोबारा करणे. ० **टांगणीस लागणे** – १. एखाद्या वस्तूवर प्रीती बसणे. २. चिंताग्रस्त होणे. ० **टांगणे** – काळजीत असणे : 'लवकर ये रे बाबा – माझा जीव टांगलेला आहे.' – एल्गार १२८. ० **टांगून ठेवणे** – तिष्ठत ठेवणे; काळजीत ठेवणे : 'चार वर्षं बिचारीचा जीव टांगून ठेवलात.' – ऑक्टोपस ६१. ० **ठिकाणी नसणे** – अस्वस्थ असणे; चैन न पडणे. ० **डहळणे, मळकणे** – (ना.) मळमळणे. ० **तुटणे** – १. अतिशय थकणे. २. तळमळ लागणे. एखाद्याचा ध्यास लागणे; एखाद्याबद्दल अतिशय काळजी वाटणे. ० **तोडणे** – दुःखाने सचिंत होणे. ० **तोडून करणे** – अतिशय मेहनतीने करणे. (काम, धंदा). ० **थारी असणे** – स्वस्थपणा असणे. ० **थारी नसणे** – अस्वस्थ असणे; चैन न पडणे. ० **थोडा थोडा होणे** – (ग्लानी, देणे इत्यादी कारणांनी) अतिशय चिंताग्रस्त होणे; काळजी लागणे; भीती वाटणे; फार दुःख होणे; धैर्य खचणे. ० **देणे** – १. आत्महत्या करणे. २. सगळे लक्ष घालणे; लक्ष देऊन करणे; पुष्कळ प्रयत्न करणे. ० **धडधड करणे** – काळजी, भीती वाटणे. ० **धरणे** – नवीन शक्ती मिळविणे; रंगारूपास येणे; बरे व्हावयास लागणे. जगणे, वाढीस लागणे (झाड वगैरे). ० **धरून** – १. धैर्य धरून; उत्सुकतेने; उत्साहाने (कृत्य करणे.) २. जिवंत राहून; अस्तित्व टिकवून (कसा तरी याला जोडून योजना.). ० **धागधूग करणे** – घाबरणे; वरखाली होणे : 'निकालाचा दिवस जो जो जवळ येऊ लागला तो तो माझा जीव धागधूग करू लागला.' – पलको ४९१. ० **धुकुडपुकुड करणे** – घाबरणे.(ना.) ० **नाकास येणे** –नाकी नव येणे; नाकी नळ येणे; दमछाक होणे. ० **पछाडणे** – मोठ्या कळकळीने, लाचारीने नम्र होणे. ० **पडणे** – एखाद्या गोष्टीत मनापासून शिरणे; गोडी लागणे; तत्पर होणे. ० **पाखडणे** – १. अतिशय मेहनत करणे; प्रयत्न करणे. २. जळफळणे; तडफडणे. ० **पोळणे** – १. दुःख होणे. २. चट्टा बसणे; धडा मिळणे. ० **प्यारा असणे** – जिवाविषयी अति प्रीती दाखविणे. ० **फुटणे** – अतिशय उत्सुक होणे : 'तुझे भेटीसाठी निशिदिवस माझा जिव फुटे ।' – सारुह ६.१५८. ० **बसणे** – (एखाद्यावर) मन बसणे; प्रेम करणे. ० **भांड्यात पडणे** – जीव स्वस्थ होणे. ० **मट्ट्यास येणे** – दमणे, अगदी थकून जाणे. ० **मुठीत धरणे** – १. काळजीपूर्वक स्वतःचे संरक्षण करणे (धोक्यामुळे). ० **मोठा करणे** – १. जोराचा प्रयत्न करणे; धैर्य धरणे. २. उदार होणे (खर्च करण्यात); मन मोठे करणे. ० **रखमेस येणे** – कंटाळा येणे; त्रासणे. (कु.) ० **राखणे** – जिवाचे रक्षण करणे; आळसाने काम करणे. ० **लावणे** – प्रेम करणे; माया लावणे. ० **वर धरणे, वरता धरणे** – अतिशय उत्सुक होणे; उत्कंठा लागणे. ० **वारा पिणे** – उदास भासणे; भयाण वाटणे. ० **सुकणे** – अशक्त, व्याकूळ होणे. ० **सुचिंत नसणे** – काळजीत

असणे. ० **सोडणे –** १. मरणे. २. जीव धोक्यात घालणे; स्वतःच्या जिवाची आहुती देणे. ३. अतिशय इच्छा दर्शविणे. ४. आजारी माणसावरून कोंबडे ओवाळून टाकणे (याने आजाऱ्याचा रोग कोंबड्यावर जाऊन ते मरते अशी समजूत). **जिवाचं काय पांढ्ढ (काळं-पांढरं) करणे–** जिवाचे बरेवाईट करणे : 'कोन्या आडशइरीवर जावं आन् आपल्या जिवाचं काई काय पांढ्ढ करून टाकावं.' – शिळान ७८. **जिवाचा कान करणे –** लक्षपूर्वक कान देऊन ऐकणे : 'वयातीत वृद्धही त्यांचे बोलणे ऐकण्यासाठी जिवाचा कान करीत असत.'– लोसंक्षि १२१. **जिवाचा घात करणे –** १. आटोकाट प्रयत्न करणे ; जिवापाड मेहनत करणे. २. अतिशय छळणे; गांजणे (जीव जाईपर्यंत). **जिवाचा घोट घेणे –** जिवाचा घात करणे; मरेपर्यंत छळणे. **जिवाचा धडा करणे –** साहसाचा प्रयत्न करण्यास तयार होणे. **जिवाचा निधडा करणे –** जिवावर उदार होणे : 'तेव्हा त्याणें जिवाचा निधडा करून शिपाइगिरी म्हणावी तैशी केली.' – ऐको ४४५. **जिवाचा लोळ करणे –** १. फार श्रम करणे; जिवाला त्रास देणे. २. फार मेहनत घेणे. **जिवाची कोयकोय करणे –** (कुत्र्यासारखे भुंकावयास लावणे म्हणजे) अतिशय छळणे. **जिवाची ग्वाही –पाखी देणे –** खात्रीपूर्वक सांगणे. **जिवाची घालमेल होणे–**जीव अस्वस्थ होणे : 'तुझ्या जिवाची आता जी घालमेल चालली होती' – असा ८१. **जिवाची बाजी –** जिवाची पर्वा न करता : 'येसाजींनी जिवाच्या बाजीनं वाटा रोखल्या.'– श्रीयो २४७. **जिवाची मुंबई करणे –** चैन करणे : 'मोटारी उडवून जिवाची तात्पुरती मुंबई करतात.' – शेले ३८. **जिवाची राळवण करणे –** अतिशय काम करणे (राळ्याच्या काडीसारखे होणे); त्रास घेणे. **जिवाची हुल्लड करणे –** मोठा नेटाचा प्रयत्न करणे. **जिवाची होड करणे –** प्राण पणास लावणे; एखादे कार्य सर्व सामर्थ्यानुसार करणे: 'जिवाची होड करून चालविलेल्या त्या स्वातंत्र्यसंगराने.'– मससंअभा ४४६. **जिवाचे चार –** चार करणे – थेर करणे; नाचणे; चैन, विलास करणे. **जिवाचे रान करणे –** अतिशय कष्ट सोसणे. **जिवाच्या आकांताने –** गर्भगळित होऊन; अतिशय घाबरून; सर्व शक्तीनिशी : 'ते जिवाच्या आकांताने बाहेर पडले.'– माचू ३७३. **जिवाच्या गाठी बांधणे –** मनात नीट ठसवून किंवा बिंबवून घेणे. **जिवात जीव आहे तोपर्यंत –** मरण येईपर्यंत; जन्मभर; सदासर्वदा. **जिवात जीव घालणे –** १. उत्तेजन देणे; सांत्वन करणे; धैर्य देणे. २. आपले व दुसऱ्याचे मन एक करणे; आपले विचार दुसऱ्यास नीट समजावणे. **जिवात जीव नसणे –** धीर नसणे – अस्वस्थ्य होणे : 'घरी येईपर्यंत तिच्या जिवात जीव नव्हता.'– रथचक्र १७३. **जिवात जीव येणे –** गेलेली शक्ती, धैर्य पुन्हा येणे; धीर येणे. **जिवानिशी –** जिवासकट. **जिवानिशी जाणे –** मरणे (जुलमाने, अकाली). **जिवाला करवत लागणे –** अतिशय चिंता लागणे. **जिवाला काही तरी करून घेणे –** आत्महत्या करणे; जीव देणे. **जिवाला खाणे –** मनाला लागून राहणे; झुरणे; झिजणे. तडफडणे. **जिवाला चरका लावून जाणे** – बेचैन करणे : 'हे पद जिवाला चरका लावून जात असे.'– मास्मृग्रं १४२. **जिवावर आंगेजणी करणे –** जिवावर उदार होऊन कार्यभाग अंगीकारणे : 'लढाई होईलसी दिसती ते बहूत हे थोडे परंतु हे जिवावर आंगेजणी करितील श्री यश कोन्हास देईल पहावे.' – ऐको ४४५. **जिवावर उठणे –** दुसऱ्याच्या जिवाची काळजी न करणे; त्याचा जीव घ्यायला याला तयार होणे. **जिवावर उड्या मारणे –** दुसऱ्याच्या पैशावर, मदतीवर चैन बढाई मारणे. **जिवावरची होड –** प्राणावर बेतलेले संकट; प्राणाची पैज; प्राणपणाला लावणे. **जिवावर द्वारका करणे –** एखाद्याच्या आधारावर, आश्रयावर चैन करणे; महत्कृत्य करणे; मोठा उपकार करणे : 'तुमच्या जिवावर एवढी द्वारका केले घरदार दोमजली।' – पला ८५. **(दुसऱ्याच्या) जिवावर (आपले) पोट भरणे –** दुसऱ्यावर अवलंबून आपला उदरनिर्वाह चालविणे. **जिवावर येणे, बेतणे, जिवाशी गाठ पडणे –** १. जीव धोक्यात पडणे; मोठे संकट ओढवणे. २. दुष्कर वाटणे. ३. चिडणे. **जिवावरचे आधण उतरणे –** कठीण प्रसंगांतून बचावणे, निभावणे. ९८. **जिवाशी धरणे, बांधणे, जिवी धरणे, बांधणे –** अतिशय प्रीती करणे; बहुमोल वाटणे: 'काय इणें न धरावें अधनत्वें भूप –जन–वरा जीवीं ।'– मोवन १३.१८ **जिवाशी बेतणे –** प्राण जाण्याची वेळ येणे : 'जिवाशी बेतल्यावर तरी शुद्धींत याल असं वाटलं होतं.'–एल्गार ११२. **जिवास जहानगिरी करणे, होणे –** जिवावर मोठे संकट येणे, आणणे; संकटाचा प्रसंग ओढवणे. **जिवास जीव देणे –** प्रिय माणसासाठी आपला जीव देणे. अतिशय सख्य करणे. **जिवास पाणी घालणे –** जिवावर उदार होणे : 'अवघे लोक पळाले, ऐसा प्रसंग लोकांचा या भरोसियावर रहावे तरी आपल्या जीवास पाणी घालोन रहावे लागते.' – ऐको ४४५. **जिवास मुकणे –** मरणे; मृत्यू पावणे. **जिवी लागणे –** १. आवडीचा असणे; प्रिय वाटणे. २. मर्मभेद होणे; जिवाला लागणे. **जिवे धुस जाणे** – धस्स होणे; जिवात धडकी भरणे : 'तुमते एतां देखिलें। तेंची माझां जीवे घुस गेले ।' – शिव १२५. **जीवे प्राणे उभे राहणे –** जिवावर उदार होणे : 'हें जीवें प्राणें उभे राहिलें तेव्हां त्याणीं अमल दिल्हा व तह केला.'– ऐको ४४७. **जिवे मारणे –** जीव जाईपर्यंत मारणे. **जिवे वाचणे –** एखादे संकट टळून जिवंत राहणे; जीव जाण्याचा प्रसंग असता जीव न जाता बचावणे.

**जीव** पु. खरेपणा ; सत्यता; विश्वसनीयता; मिलाफ; मेळ (बातमी वगैरेंचा). [सं.]

**जीव** पु. सौंदर्य; जोर; दम (लिहिण्याचा). [सं.]

**जीव** पु. मन; प्रवृत्ती; कल. [सं.]

**जीव** पु. १. यश; नफा; राम; अर्थ (कार्य, काम, उद्योग यांत). २. बळकटी; स्थैर्य; मजबुती; टिकाऊपणा; भक्कमपणा (पदार्थ, वस्त्र यांचा). [सं.]

**जीवई** स्त्री. कलाकुसर केलेली छोटी स्टूलवजा बैठक : 'बैठकीच्या दोन्ही बाजूला आक्रोडी जीवयांवर मुरादाबादी चांदीच्या पिकदाण्या

ठेवल्या होत्या.' – स्वामी २४६.

**जीवकण** पु. अल्प जीवदशा; जीवांश : 'जीवकणु जयाचा उपमर्दे ।' – ज्ञा १८.१२७२.

**जीवकळा** स्त्री. जिवंत माणसाच्या तोंडावरचे तेज.

**जीवकोश** पु. प्राणाचे, आत्म्याचे आवरण; शरीर.

**जीवखडा– धोंडा** पु. अश्मा. (कुण., आगरी., को.)

**जीवग्रह** पु. आयुष्यात साठवलेली पुंजी : 'राउळीं माझा बालकाचा जीवग्रहो राखिला '– गोप्रच ७०.

**जीवघटक** पु. पेशी. [सं.]

**जीवघेऊ–णा–णी–ण्या** वि. १. जीव जाईपर्यंत त्रास देणारा; लोचट (भिकारी). २. भारी कठीण (काम).

**जीवजंतु–तू** पु. १. लहान किडा, प्राणी; किडा-मुंगी इ. २. सर्व प्राणिमात्र (अनेकवचनी प्रयोगात).

**जीवडवाळ** स्त्री. जिवाची उपाधी : 'हे अज्ञानकृत जीवडवाळ ।' – रंयोवा ८.१४३.

**जीवणे** अक्रि. जगणे. पहा : **जिवणे**: 'म्या कैंवि अन्यजनसख्यसुखें जिवावें ।'– मुआभा १.

सक्रि. संतुष्ट करणे. [सं. जीव्]

**जीवत्व** न. चैतन्य; जीवदशा : 'जीवत्वदुर्गी आडिला ।' – ज्ञा १७.२.

**जीवदयासंघ** पु. प्राणिमात्रावर दया दाखविणारी, प्राणिमात्राचा जीव वाचविण्याचा प्रयत्न करणारी मंडळी; गोरक्षण वगैरे करणारे मंडळ.

**जीवदशा** स्त्री. १. आयुष्य; अस्तित्व; सचेतन स्थिती. २. आत्मज्ञानावाचून जीवन व्यतीत करण्याची अवस्था.

**जीवदान** न. १. जीविताचे देणे, देणगी; प्राण न घेणे. २. दुसऱ्याच्या प्राणांचे संरक्षण; एखाद्याला संकटातून वाचविणे. (क्रि. मिळणे, करणे, देणे.)

**जीवदार** वि. १. सचेतन; जिवंत. २.(ल.) धैर्यवान; पाणीदार; जोरदार; शक्तिवान. ३. रसयुक्त; रसाळ. ४. (ल.) फायदेशीर (धंदा, उद्योग.).

**जीवद्रव** पु. पहा : **आदिरस** [सं.]

**जीवद्रव्य** न. (जीव.) सजीव पेशींतील मूलाधार असणारे द्रव्य. [सं.]

**जीवधन** न. गुरेढोरे, जंगम मालमिळकत.

**जीवधर्म** पु. कामकर्मादिक.

**जीवन** न. १. आयुष्य; अस्तित्व; प्राणधारणा; निर्वाह. २. जगण्याचे, उदरनिर्वाहाचे साधन (नजीकचे किंवा अंतिम भक्ष्य, अन्न, उद्योग-धंदा).३. धारणा; साधन; अग्नीचे जीवन वायू, झाडाचे जीवन पाणी : 'वदनकथामृतश्रवण । तें जीवन मज तुझें ।' – एरुस्व १.५. ४. पाणी; जल.

वि. आयुष्य देणारे; जीवदायक. [सं.]

**जीवन** न. वेतन : 'कां सेवकां देसी जीवन ।' – ज्ञा ९.९९.

**जीवन** न. गोलपणा, रंग, तेज या दृष्टीने एकसारखी असणारी बसराई मोती.

**जीवनकलह** पु. जिवंत राहण्यासाठी करावी लागणारी धडपड; योगक्षेमासाठी करावा लागणारा संघर्ष.

**जीवनकला–ळ** स्त्री. १. पहा : **जीवकळा**. २. आयुष्य पुष्कळ दिवस राखण्याची युक्ती; जगण्याची कला.

**जीवनकाल** पु. (वन.) एखाद्या वनस्पतीचा (किंवा प्राण्याचा) जिवंत स्थितीत असण्याचा काळ.

**जीवनचक्र** न. (जीव.) सजीवाच्या जीवनातील वेगवेगळ्या जन्म-बाल-तारुण्य-वृद्धत्व- मरण अशा अवस्था. [सं.]

**जीवन(ना)पाडी–डे** क्रिवि. यथाशक्ति; यथासाधन; शक्त्यनुसार; सामर्थ्यानुरूप (काम सांगणे, दंड करणे, औषध देणे इत्यादी).

**जीवनपाणी** न. शक्ती; जोर; आवेश; दम; योग्यता; धारणाशक्ती. पहा : जीव ४

**जीवनप्रणिधि** स्त्री. आयुर्विमानिधी. [सं.]

**जीवनभृति** स्त्री. पोटमजुरी. पहा : **जीवनवेतन** [सं.]

**जीवनमान** न. (अर्थ.) जीवन जगण्याचा विशिष्ट स्तर, पातळी; व्यक्तीला ज्या गरजांची सवय असते त्यांची पूर्ती होईल अशी राहणी.

**जीवनमान निर्देशांक** (अर्थ.) जीवनावश्यक वस्तूंच्या किमती दाखविणारा अंक म्हणजे जीवनमान निर्देशांक.

**जीवनमाफक** क्रिवि. यथाशक्ति; यथासाधन; शक्त्यनुसार; सामर्थ्यानुरूप (काम सांगणे, दंड करणे, औषध देणे इ.).

**जीवनरस** पु. मूल स्रोत; चैतन्याचा स्रोत : '...हे चारहि ठराव मिळून एक प्रतिमा बनलेली आहे. त्या सर्वांमधून वाहणारा जीवनरस... त्यांच्यांतील मूलप्रेरणा एकच आहे.'– आआआ ५५.

**जीवनरसायन शास्त्र** पाश्चात्त्य वैद्यकातील एक प्रकार; बारा क्षारांच्या औषधांचे शास्त्र. मानवी शरीरात बारा क्षार असून त्यांत एक अगर अधिक कमी झाल्यास रोग होतो, ही उणीव, कमी असलेला क्षार शरीरात घालून भरून काढतात.

**जीवनवृत्तांत** पु. एखाद्या व्यक्तीच्या आयुष्याचा क्रमवार इतिहास.

**जीवनवेतन** न. जीवनाच्या किमान गरजा पुऱ्या करता याव्यात म्हणून (पगाराऐवजी) देण्यात येणारी रक्कम; जगण्यापुरती मजुरी : 'एक लहानसे जीवनवेतन देण्यात येईल.'– असा २०१.

**जीवनशक्ति–क्ती** स्त्री. जगण्याची शक्ती; दम. [सं.]

**जीवनशिक्षण** (शिक्षण.) जीवनशिक्षण म्हणजेच गांधीजीप्रणीत मूलोद्योग शिक्षण. यात एखाद्या मूलोद्योगाला केंद्र मानून जीवनाला आवश्यक असणाऱ्या सर्व विषयांचे शिक्षण दिले जाते.

**जीवनसत्त्व** न. शरीरातील चयापचय यंत्रणा कार्यक्षम राहण्यासाठी आवश्यक असलेली योग्य पोषक घटकद्रव्ये.

**जीवन सहजप्रवृत्ती** (मानस.) फ्रॉइडप्रणीत मनोविश्लेषणातील जीवमात्राची पुनरुत्पत्तीची व स्वसंरक्षणाची जन्मजात प्रेरणा. (विरोधी संज्ञामूल्य सहजप्रवृत्ती).

**जीवनसूत्र** न. जीवाधार; जिवाचा चालक : 'जेथ जगाचें जीवनसूत्र । श्री महालया असे ।।' – ज्ञा १८.१८०३.

**जीवनहेतु** पु. १. जगण्याचा हेतु, कारण. २. जिवाचे कार्यक्षम साधन.

**जीवनावश्यक वस्तू** (अर्थ.) भूक, निवारा, आच्छादन अशा गरजा तीव्र असतात. त्यांची पूर्ती जगण्याला आवश्यक असते. अशा गरजा पूर्ण करणाऱ्या वस्तू.

**जीवनी** स्त्री. व्यक्तीचा जन्म, त्याचे घराणे आणि त्याच्या कर्तृत्वाचा थोडक्यात परिचय.

**जीवनीटीप** घराचा कर निश्चित करण्यासाठी पहाणी करण्यास येणाऱ्या महसूल अधिकाऱ्याला धान्य किंवा पैशाच्या रूपाने मिळणारे शुल्क.

**जीवनुक** स्त्री. जिवंतपणा; जीवनाचे अस्तित्व : 'ज्याचेनी जीवनुक जीवा। म्हणोनी भक्तिशेवा।' - श्रीकृष्णच १०.५०.

**जीवनोपाय** १. निर्वाहसाधन; जीव राखण्याची युक्ती : 'जीवनोपावो कां जैसा। कोल्हाटियांचा ॥' - ज्ञा १८.६०६. २. उदरनिर्वाह; शरीरधारणा. ३. संकटापासून वाचण्याचा उपाय.

**जीवन्मुक्त** वि. १. जिवंतपणीच आत्मज्ञान होऊन देहाभिमानापासून मुक्त झालेला; या जन्मीचे संस्कार व पुढील जन्ममरणाचे फेरे यांतून सुटलेला. २. पूर्ण आत्मज्ञानी. ३. अत्यंत विरक्त; संन्यस्त.

**जीवन्मुक्ति-क्ती** स्त्री. आध्यात्मिक ज्ञानाने ऐहिक संस्कारापासून व पुढील जन्ममरणापासून झालेली सुटका; जीवन्मुक्ताची स्थिती.

**जीवन्मृत** वि. १. जिवंतपणीच मेल्यासारखा असणारा. २. दुष्कीर्ती प्राप्त झालेला; निंद्य; पतित. ३. (ल.) मूर्ख; वेडा.

**जीवपूर्व** वि. (भूशा.) सजीवांची उत्पत्ती होण्यापूर्वीच्या काळातील.

**जीवपेशी** स्त्री. जिवंत प्राण्याच्या शरीराचे अतिसूक्ष्म सजीव घटक. [सं.]

**जीवप्राण** पु. १. जीव आणि आत्मा; प्राण (जोर देण्यासाठी वापरतात). २. आवडता माणूस; लाडका, जीव की प्राण असा माणूस, मित्र.

**जीवभाव** पु. १. जिवाचा भाव; इच्छा; मनीषा : 'मागणे तें तुज मागों। जीवभाव तुज सांगों ।' -तुगा १५७८. २.आत्मा; स्वत: (जोरदार अर्थी). ३. जिवाचे अस्तित्व.

**जीवभौतिकी** न. (वन.) भौतिक (वास्तव) शास्त्राच्या दृष्टिकोनातून केलेला सजीवांचा अभ्यास. तापमान, आर्द्रता, वातावरणाचा दाब. समुद्रसपाटीपासून उंची इत्यादी घटकांचा सजीवांवर होणारा परिणाम अथवा त्यांच्या प्रतिक्रिया; भौतिक नियमाप्रमाणे घडून येणाऱ्या काही शारीरिक प्रक्रिया.

**जीवमर्दी** स्त्री. शर्थ; शौर्य : 'सरकारच्या २ तोफांपैकी १ जीवमर्दीकरून काढिली. दुसरीचें तक्त मोडलें म्हणोन गेली.' - ऐको ४४७.

**जीवमान** पु. हयात असणे; अस्तित्व : 'माझ्या वडिलांचा जीवमान असेतोपर्यंत आमच्या घरीं दरवर्षी बारा ब्राह्मणांची ही समाराधना होत असे.'- स्मया ५३.

**जीवमिति-ती** स्त्री. (शिक्षण.) संख्याशास्त्राच्या साहाय्याने जैविक वैशिष्ट्यांचा व प्रक्रियांचा अभ्यास करणारे शास्त्र.

**जीवयात्रा** स्त्री. जिवाच्या मुक्तीसाठी अनेक योनींतून झालेला प्रवास : 'जीवयात्रा, लोकयात्रा हे शब्द प्राचीन मुनी महत्त्वाचे मानीत.'- भासं ११.

**जीवयोनि-नी** स्त्री. १. सरपटणारे प्राणी ; क्षुद्र कीटक इत्यादींचा वर्ग. २. जरायुज प्राणिवर्ग. पहा : **योनि**

**जीवरखी** स्त्री. देवाचा नक्षीदार देव्हारा. (को.)

**जीवरस** पु. जीवन देणारा रस.

**जीवरसायनशास्त्र** न. (वन.) सजीव प्राणी व वनस्पती यांच्या शरीरांत चालू असलेल्या किंवा त्यांच्या मध्यस्थीने शरीराबाहेर चाललेल्या रासायनिक प्रक्रियेसंबंधीच्या माहितीचे शास्त्र. उदा. शरीरातील पचन, विघटन, संघटन, उर्जानिर्मिती; शरीराबाहेरील कुजणे, आंबणे इत्यादी सूक्ष्मजंतूद्वारे होणाऱ्या घटना; वितंचन.

**जीवरक्षक** वि. पाण्यात बुडणाऱ्यांना वाचविणारी; जिवाचे रक्षण करणारी; जीव वाचवणारी : 'कॉर्व्हेट्सप्रमाणेच ७२ फूट लांबीच्या लाँचेस, जीवरक्षक छोट्या बोटी.'- युद्धशास्त्र ८१.

**जीवरसायनशास्त्र** न. सजीवांच्या शरीरातील विविध रासायनिक प्रक्रियांचे अध्ययन करणारी विज्ञानशाखा.

**जीववस्तुमान** न. १. (भू.) एका मर्यादित प्रदेशात (वसतिस्थानात) ठरावीक पद्धतीच्या अन्नभक्षक सवयी असणाऱ्या जिवंत प्राणी अवस्थेतील वनस्पती. यांचे एका वेळी असणारे एकूण वजन. असे वजन प्रत्यक्षात करत नाहीत. अनुमानाने काढतात.

**जीववस्तुमान** न. कोणत्याही पोषण पातळीवरील सर्व सजीवांच्या एकत्रित शुल्क वजनाचा द्रव्यसंचय. – व्यामको.

**जीववा हात** जेवणाचा हात (उजवा) : 'येते समयीं घोडीहून पडले त्याचा जीववा हात दुखून जरबेत आला आहे.' – ऐको ४४७.

**जीवविणे** सक्रि. चैतन्ययुक्त करणे; जिवंत करणे : 'परि आतां चंद्रापासोनि निवविते । जें अमृताहूनि जीवविते ।' – ज्ञा ९.२४.

**जीवविरोधक** न. (जीव.) सजीवांच्या विषावरील उतारा. [सं.]

**जीवशक्ति-क्ती** स्त्री. प्राणशक्ती.

**जीवशास्त्र** न. प्राणी, वनस्पती आदी सर्व सजीवांचा सर्वांगीण अभ्यास करणारी ज्ञानशाखा.

**जीवशास्त्रज्ञ** पु. सर्व सजीवांचा अभ्यास व संशोधन करणारा शास्त्रज्ञ. : 'मग जीवशास्त्रज्ञांनी तर काही चूक केली नसेल ?' – स्वयु १२०.

**जीवशिवपेठ** स्त्री. जिवाशिवांच्या भेटीची जागा : 'ते रूप वैकुंठ जीवशिवपेठ ।'- निगा ५०.

**जीवशैल** पु. (भू.) जैविक प्रक्रियांनी तयार झालेला खडक; सामान्यपणे यात जैविक अवशेष असतात. तसेच याची रचना स्तरित असते. उदा. स्टोमॅटोलाईट.

**जीवश्चकंठश्च** वि. अत्यंत घरोब्याचा; अतिशय दृढ (मित्र, मैत्री)

**जीवस** वि. जिवट.

**जीवसरे** क्रिवि. प्राणाप्रमाणे; जिवासारखी : 'जाणोनि गीता जीवसरें । धरिली मियां ॥ ' – राज्ञा १३.३२९.

**जीवसातत्य** न. (वन.) पूर्वज जिवांपासून नवीन जिवांची निर्मिती, अशी सनातन परंपरा.

**जीवसांख्यिकी** स्त्री. आयुर्दायशास्त्र; ह्या शास्त्रात निरनिराळ्या जातींचे लोक किती किती वर्षे जगतात याचा विचार केलेला असतो.

**जीवसिद्धान्त** पु. (जीव.) अनुवंशविषयक सिद्धान्त.

**जीवसुत** पु. अंत्येष्टिकर्म; और्ध्वदेहिक विधी.(गो.) [सं ]

**जीवसृष्टि-ष्टी** स्त्री. सचेतन सृष्टी.

**जीवस्वर** पहा : **वादी**

**जीवहत्या** स्त्री. जीवजंतू यांचा नाश, वध, खून; प्राणिहत्या; हिंसा.

**जीवंतहत्या(ते)र** न. तलवार, भाला इ. पहा : **जीतहत्यार**

**जीवा** स्त्री. (ग.) ज्या; वर्तुळावरील वा दुसऱ्या कोणत्याही वक्रावरील दोन बिंदूंना जोडणारा रेषा खंड. [सं.]
**जीवा** स्त्री. (यंअ.) कैची (तुळयांची रचना)मधील महत्त्वाचा घटक. सर्वसाधारणपणे दाब आणि तणाव पेलणाऱ्या तुळयांच्या जोडीपैकी एक तुळई. [सं.]
**जीवाअजोग** वि. जिवापलीकडील; सामर्थ्याबाहेरचे; शक्ती–पलीकडील : 'जीवा अजोग श्रमानें बेशुद्ध होऊन पडले.' – विछच ६०.
**जीवाजीव** पु. अव. जडाजड; प्राणी आणि वस्तू; सजीव व निर्जीव प्राणी, सृष्टी. [सं.]
**जीवाणुज** वि. (वैद्यक) सूक्ष्म जंतूपासून उत्पन्न होणारे.
**जीवाणुनाशक** पु.(जीव.) जिवाणूंचा नाश करणारा (घटक पदार्थ). [सं.]
**जीवाणुयुद्ध** न. सूक्ष्म रोगकारक जंतूंचा, विषाणूंचा मानवसंहारासाठी वापर करून केलेले युद्ध.
**जीवाणुशास्त्र** न. (कृषि.) जिवाणूंचा अभ्यास करणारी विद्याशाखा.
**जीवाणु–णू** पु. (जीव.) एकपेशीय सूक्ष्म सजीवांचा व्यापक वर्ग; बॅक्टेरिया. [सं.]
**जीवात्मा** पु. जीवरूप आत्मा; गुणांनी बद्ध, देहाभिमानी आत्मा : 'पिंडीं व्यापक ब्रह्मांश । त्यास जीवात्मा बोलिजे ।' – दास ८.७.४९. याच्याहून शिवात्मा किंवा परमात्मा – शुद्ध आत्मा हा निराळा आहे.
**जीवाभारी** वि. डोईजड : 'जीवाभारी झाले आहे.' – निअसा १४२.
**जीवाभावाचा** वि. जवळचा; अतिशय प्रेम असलेला; फार आवडता : 'लोकमान्यांचे एक जीवाभावाचे स्नेही .'– उद्र ३४.
**जीवाभ्य, जीवादारभ्य** क्रिवि. १. जन्मापासून. २. जिवंत असेपर्यंत. ३. मनापासून; तनमनधनेकरून; जिवापलीकडे : 'ये समयीं जीवाभ्य श्रम करून दौलत वांचवूं.' – चिसं २२. [सं.]
**जीवाश्म** पु. प्राचीन काळातील वनस्पती किंवा प्राणी यांचा किंवा त्यांच्या अवयवांचा दगडावरील ठसा अथवा कार्बन, रेती किंवा चुनखडीने पूर्णपणे व्याप्त असा अवशेष.
**जीवाळा** पहा : **जिव्हाळा** : 'तेथ जीवाळा काही आहे । प्राप्तीचा ।।' – राज्ञा ४.१९३.
**जीवाळें** न. लहान कमळ : 'चौकावरील जीवाळी : नवरत्नांची '– ऋव ४५९.
**जीविका** स्त्री. १. व्यवसाय; उपजीविका : 'यज्ञाऐसें वर्तन । जीविकें केलें ।।'– ज्ञा १७.३३९. पहा : **जीवनोपाय.** २. शक्ती; सामर्थ्य; अनुकूलता. [सं.]
**जीवित–त्व** न. जीव; आयुष्य; अस्तित्व; जिणे; प्राणधारणा. वि. जिवंत केलेला; सजीव केलेला. [सं.]
**जीविष्णु–ष्णू** पु. जगू इच्छिणारा : '...ह्या । जीविष्णु, वर्धिष्णु... मानवी समूहांना '– प्रतिनिधी ११५.
**जीवी** वि. जगणारा; निर्वाह करणारा. (समासात) भिक्षाजीवी. [सं.]
**जीवीचा** वि. प्राणप्रिय; जिवलग.
**जीवेभावे** क्रिवि. अंत:करणापासून; प्रीतीने; मनापासून; उत्साहाने; नेटाने.
**जीवोपजीवी** पु. दुसऱ्या जिवाचे शोषण करून उपजीविका करणारा; परजीवी; बांडगूळ.
**जीहणे** अक्रि. जिवंत राहणे – असणे. [सं.जीव]
**जीहुजूर** अ. हांजी हांजी करणारा : 'मी 'होयबा' वृत्तीचा 'जी हुजूर' माणूस नव्हे.' – मीएशिसं ७१.
**जींपणे** सक्रि. पराभव करून विजय मिळविणे; पाडाव करणे : 'तो तुझे वाक्य वाचूनि । न जींपे आणिकें ।।' – राज्ञा २.६४.
**जुअ** पु. जोडा, जोडी; युग्म. वि. जुळे : 'जुआं सांगडीं ।' – वच्छह २८०. [सं.युग]
**जुआरी** पु. द्यूतकार; जुगार–जू खेळणारा : 'माध्याने एकी रात्रीं जुआरी जुं हारवीलें : ते तेथ आले :' – लीचपू ९२.
**जुआळिकारू** वि. जवळ असणारा; रहस्यातील, गुह्य गोष्टी सांगण्यास योग्य असा : 'गुपितिअें जुआळिकारूं । मातुसांगितें ।' – शिव ३५४. [सं.युज]
**जुइटे** न. बेट.
**जुई** स्त्री. एक पुष्पलता व तिचे फूल. जाईच्या फुलापेक्षा हे फूल थोडे लहान असते : 'हा प्रकृतीमाझि उभा । परि जुईं जैसा वोथंबा ।' – राज्ञा १३.१०१६. [सं.यूथिका]
**जुई** स्त्री. मंजिरी; मंजुळा : 'तुळस आऊबाई कुनी हलाई तुही जुई ।'– जलोसा ७२७.
**जु(जुं)क(ख)ड** न. जु. पहा : **जोखड** [सं.योक्तृ]
**जुकविणे** अक्रि. टाळणे; फसविणे : 'या इष्काते जुकविणें ।' – होबाला ७६. पहा : **झुकविणे**
**जुका** स्त्री. ऊ : 'तया पासोडेयावरि... जुका असे' – पंचो ३७.११.
**जुकाड** न. जोखड (तिरस्कारार्थी). [सं.योक्तृ]
**जुका(खा)म** न. थंडी; सर्दी; पडसे : 'ती जुखाम होण्याची भीति सांगते.'–शिळान ४९. [अर.झुकाम्]
**जुक्ति–क्ती** स्त्री. युक्ती. पहा : **जुगत** [सं.युज् – युक्त]
**जुखेळ** पु. जुगार; द्यूत. [सं.द्यूत]
**जुग** न. युग : 'अनंत जुगाचा देव्हारा ।' – तुगा १७७.
**जुग** न. १. जुळे; जोडी. २. एका घरातील दोन सोंगट्या. [सं.युग]
**जु(जुं)ग, जुंक** न. गलबताचा एक प्रकार.
**जुगड** पु. मैत्री; दोस्ती.
**जुगडाव** पु. सोंगट्यांच्या किंवा फाशांच्या खेळातील एक डाव. ज्या दानाने दोन सोंगट्यांचे जूग एकदम नेता येते असे दान. उदा. पोबारा, चवदा, पंधरा, दसदोबारा इत्यादी.
**जुगणी** न. रत्नखचित पदक (छातीवरील).
**जुगणे** अक्रि १. भाग, तुकडे जोडणे; जुळविणे. २. (ल.)जमणे; मिलाफ होणे; एकमत होणे; सिद्धयनुकूल परस्पर सुसंगत होणे (दोन माणसांचे विचार, उपाय, पदार्थ). ३. समजूत पटणे; सख्य होणे; तडजोड होणे (शत्रू, वादी, प्रतिवादी यांची). ४. मिलाफ बसणे; परस्पर जमणे; जुळणे; अनुरूप घटना होणे (काव्याचे चरण इत्यादिकांची). ५. संभोगासाठी स्त्री पुरुषांनी एकवटणे. [सं.युज्.] (वा.) **जुगू लागणे** – कामक्रीडा करणे; संभोग करणे. ६. अनेक

सोंगट्या एका घरात येणे.

**जुगत** स्त्री. १. युक्ती; शक्कल; चातुर्य; हिकमत ; व्यावहारिक हुशारी. २. जुगूल याबद्दलही क्वचित वापर. ३. पहा : **जुगूल.** [सं.युक्ति]

**जुगताई** पहा : **जुगत १**

**जुगदान** पहा: **जुगडाव** २. सुयाळे; कागद वगैरे ठेवण्याची पिशवी; जुजदान.

**जुगल** स्त्री. १. जमाव; समूह. २. सख्य; मिलाफ; एकतानता (वाद्ये, उपाय) यांची. ३. सामना; बरोबरी. ४. जोडीने गाणे, खेळणे; दुसऱ्याशी आपले जमविणे; साथ; एकमेकांचा संयोग. ५. एकत्र केलेले खलबत; मसलत. ६. (सामा.) जूग; जूट; जोडी. [सं.युगल]

**जुगलबंदी** स्त्री. मुख्यत: संगीतातील खेळीमेळीची स्पर्धा; प्रश्नोत्तरी; एकमेकांवर मात करण्यासाठी चाललेली होड : 'लोकांची चर्चा आणि पेंडशांचे उत्तर अशी जुगलबंदी हल्ली रोज रात्री चालू असते.' – निठ ६०.

**जुगली** स्त्री. हूण; वार; आघात : 'तरवारेची जुगली जानोजी पिसाळ्या लागली. पोटला बाहेर निघाला.' – मइसा १५.२.

**जुगंत** वि. एकत्र; संमीलित : 'ऋषि झाले जुगंत ।'– वसागा ४४.

**जुगाड** न. सर्दी; खोकला वगैरे किरकोळ आजार.

**जुगाड** पु. व्यवस्था; तयारी. (झाडी)

**जुगात** न. घनघोर युद्ध.

**जुगार** पु. पैशाच्या लोभाने किंवा नशिबाची परीक्षा पाहण्याकरिता करमणुकीच्या खेळात पैसे लावून खेळणे; जुवा; द्युत. [सं.द्यूतकार]

**जुगारी–ऱ्या** वि. जुगार खेळणारा; जुगारीचे व्यसन असलेला.

**जुगांत** न. प्रलय; घनघोर युद्ध. [सं.युग + अंत]

**जुगुति** स्त्री. १. युक्ती, तंत्रमंत्र इ. : 'गोसावी श्रीमुगुटें नीरा करिलें : जोगु नाहीं : जुगुति नाही :'– लीचउ १.२२०. २. योगसाधना.

**जुगुप्सा** स्त्री. निंदा; वीट; निर्भर्त्सना; दोष देणे, लावणे. [सं.]

**जुगुप्सित** वि. निंदिलेले; दोष दिलेले; तिरस्कृत. [सं.]

**जुगुप्सित दृष्टी** स्त्री. (नृत्य) डोळ्याचा मध्यभाग व पापण्या आकुंचित करणे. हा भाव जुगुप्साद्योतक आहे.

**जुगूत** १. कल्पक युक्ती, योजना; खुबीदार कल्पना; टूम; बूट. २. कला; कौशल्य; हातोटी; कार्याची सुरेख व्यवस्था लावणे. ३. काटकसरीने प्रपंच चालविणे; निर्वाह करणे. पहा: **जुगत.** [सं.युक्ति]

**जुगूतुगू** क्रिवि. कसंबसं, रुटूखुटू : 'चालवायचं त्येच्यावर कसंतरी नाटानिटीनं, जुगूतुगू !'– रैत १५०.

**जुगूल** पहा : **जुगल**

**जुगोटा जोगी, जोगिड्डा** पु. कावळ्याच्या रंगासारखा, पुरुषभर लांब व जाडा साप. हा निर्विष असून मोर, ससा खाणारा आहे. हा चावत नाही. [सं.योगी]

**जुग्म** न. युग; जोडी. [सं.युग्म]

**जुज–झ** पहा : **जुंज, जुंझ, जूझ**

**जुजका** वि. जुजबी; किरकोळ; क्षुल्लक : 'दोस्तीचा लौकिक अटक रामेश्वरापावेतों जाला त्यांत जुजका कामावर नजर ठेवणें हें खानदानांस उमेदपणांस लाजम नाहीं.' – ऐको ४४७.

**जुजगल** वि. जुजबी; किरकोळ : 'जुजगल कोन्ही राहिले.' – पेद १६.३६.

**जुजता** वि. १. भेटणारा; दोन विरुद्ध दिशांनी समोरासमोरून येऊन एकमेकांना मिळणाऱ्या तुळया, काठ्या, म्याने तिरकस ठेवलेल्या व एकमेकांचा एकमेकांना आधार आहे अशा. २. दोन्ही बाजूंकडून कामास सुरुवात होऊन मध्यावर एकमेकांस मिळणारे (काम, शेताची कापणी इत्यादी). ३. कागदाच्या वरील व खालील बाजूकडून लिहिण्यास प्रारंभ करून मध्ये येऊन खेटणारे (लिखाण).

**जुजदान** न. कापडाची पिशवी, बटवा (कागद, पाने, सोवळ्याची चीजवस्तू इत्यादी ठेवण्यासाठी) : 'जुजदान देखील आणिलें त्यांत दरबारखर्चाची यादी.' –ऐलेसं १०७१. [फा. जुझ् + दान]

**जुजबी** वि. १. किरकोळ; तात्पुरती; सरासरी निर्वाहापुरती; कमजोर बांधणीची (इमारत). २. लहान प्रमाणावर चालविलेला; तात्पुरता; किरकोळ; यथातथा निर्वाहापुरता (व्यवहार, धंदा). ३. थोडा; हलका; काहीसा; किंचित; क्षुद्र: 'यांसि जुजबी पीक आले.' – मइसा १८.३१. ४. कामचलाऊ; तात्पुरता; हंगामी : 'नंतर लॉर्ड्स सभेत काहीं किरकोळ वाटाघाट होऊन त्या सभेनें आपल्या रचनेत काही जुजबी फेरफार करण्याबद्दल ठराव केले.' – पार्लमेंट २४६. ५. आटोपशीर (संसार). ६. रास्त; योग्य. (अहि.)

क्रिवि. बेताबेताने; हळूहळू; तुरळक. [अर.जुझ्बी]

**जुजर(रु)शी–सी** स्त्री. १. काळजी; चिंता; लक्षपूर्वक शुश्रूषा (प्राण्यांची, वस्तूंची). ( क्रि. ठेवणे, राखणे, करणे, पाहणे.) २.बारीक चौकशी : 'शहरचे दरवाजे तीन चार खुले; तेथें गाडदी ठेऊन येणाऱ्या जाणाऱ्याची जुजरसी बहुत आहे.'– मइसा ५.९९. ३. काळजीपूर्वक व्यवस्था, संपादणी (काम, धंदा यांची).[फा.जुझसी]

**जु(जुं)जाट** पहा: **झुझाटा**

**जुजुत्सू** पु. जपानमधील कुस्तीचा एक प्रकार. या खेळात शक्तीपेक्षा युक्तीचा जास्त उपयोग करून आपल्यापेक्षा अधिक भारी अशा गड्याला चीत करायचे असते. [सं.युयुत्सु]

**जुज्बियात** न. किरकोळ गोष्टी; तपशील : 'आम्हाकडील जुज्बियातचे फडचे करून द्यावे.' – मइसा ५.११. पहा : **जुजबी.** [अर.]

**जुझारी** स्त्री. युद्ध : 'तरि आपोआप विस्कटी । जुझारी तेयांची ॥'– क्रिपु २६.२३

**जुटणे** अक्रि. १. जोडले जाणे; संयुक्त होणे; मिळणे. २.एकत्र जमणे; गोळा होणे; जमणे. [सं.युज्]

**जुटी** स्त्री. १. जूट; ऐक्य; मिलाफ. २. टोळी; संघ. ३. गर्दी; जमाव; समाज.

**जुटेदार** वि. कापड चुणून शिलाई केलेली; चुणीदार : 'आमचे भावजाई आहे. त्यास आम्ही येथून पातल व चोली सोनेरी जुटेदार पाठविली आहे.'– ऐको ४४८.

**जुट्टा** पु. दहा विटांची अगर कौलांची रास.

**जुठ्या** वि. खोटे; झूट: 'चार घड्या जुठ्या बोल.' – एहोरा ८.१०.

**जुडका–के–गा–गे** पु. न. भारा; गड्डी; पेंढी; लहानसा गठ्ठा; जुडी (आगकाड्या, भाजी, उसाची कांडी, बोरू, केस इत्यादींची).

**जुडचे** सक्रि. अंगचटीस येणे; सुटून पडणे. पहा : **जुडणे** (गो.)

**जुडणी** स्त्री. १. जुळणी; सांधणी; जोडणी. २. समुदाय; जुडगा.

**जुडणे** अक्रि. १. प्रवृत्त होणे; धावून येणे. २. एकत्र जमणे, येणे. ३. मिळणे; जमणे; एकमत होणे; विरोध न येणे (अनेक बातम्या, मजकूर यांचा). ४. भिडणे; बिलगणे; खेटणे : 'मंथरा जुडे अंतरी उडे ।'– मध्यक ४२.

सक्रि. १. व्यवस्थितपणे व क्रमाने एकत्र करणे, जुळणे; एकत्र रचणे; क्रमाने लावणे. २. लावणे; जडविणे; वर बसविणे; ठेवणे. [सं.युज्]

**जुडा–डी** पु.स्त्री. १. जुडगा; समुदाय (आगकाड्या, भाजी, पेन्सिली, अंबाडी यांचा). २. गाठ; जुडी; बुचडा; अंबाडा (केस, कांदे यांचा).

**जुडाई** स्त्री. १. मिलाफ करणे; जोतणे; जोडणी. २. जोडलेपणा; संयुक्तता; जूट. ३. जुळविण्याची मजुरी. ४. (गवंडी) बांधकाम.

**जुडाई द्रव्य** सांधणारे, जोडणारे द्रव्य : 'मातीचा उपयोग.. घराच्या बांधणीसाठी व जुडाई द्रव्य म्हणून होत आला आहे.'– भाख २१.

**जुडी** स्त्री. लहान जुडा; लहान पेंढी. पहा : **जुडा.** (वा.) ० **करणे –** अंग आखडून घेणे; हातपाय पोटाशी घेणे : 'रडत, लंगडत तो बाजूला जुडी करून बसला.'– रथचक्र ५. [त. मुडि]

**जुडी** स्त्री. १. सरकारी नोकरांना त्यांच्या नोकरीबद्दल बक्षीस दिलेली इनाम जमीन. २. या जमिनीवरील सरकारी सारा, पट्टी.

**जुडीव** वि. व्यवस्थित रीतीने जोडलेले, ठेवलेले, बसविलेले.

**जुडूप** न. रास; लहानसा गठ्ठा : 'गोळ्यांचं जुडूपच भरून ठेवलं.' – रानगंगा ८०.

**जुत** न. द्यूत; जुगार : 'जुतक्रीडा' (शीर्षक) – लीचपू १८.

**जुत** स्त्री. लागण; जोपासना; लावणी; मशागत; नांगरणी: 'तुम्ही खाऊन मुलखाची जुत होत नाही.' – बाबारो ३.७ [सं.युज्–युति]

**जु(जुं)तणे** सक्रि. जुंपणे; जोडणे : 'तरी संसारपांतीं जुंतलिया । भवताचि असावें ।।' – ज्ञा ८.२४४. [सं.युत]

**जुतररो, जुत्री** स्त्री. १. लहान ओढा; नाला; ओहोळ. २. कोरडा ओढा; ओढ्याचे कोरडे पात्र. पहा : **झुतरी, झुत्री**

**जुता–ती–ते** पु. स्त्री. न. पायताण; जोडा; वहाण; चप्पल. [हिं.जूता]

**जुती** स्त्री. उक्ती; वचन : 'आहो नारदादिकां संतां । तेयांचिया जुतीस्वरूप सरिता । ' – राज्ञा १०.१४९.

**जुती(ते)पैजार** स्त्री.१. खेटराखेटरी; जोडाजोडी; वहाणांनी एकमेकांना मारणे. (क्रि. करणे, होणे, चालणे.) २. भांडण : 'सख्या भावांत देखील जुतेपैजार होते.' – आगर ३.१८४.

**जुत्पत्ती** पु. रणकुशल योद्धा; बाका लढवय्या; शूर वीर; जेती : 'तो अंगद दक्षिणेप्रती । सवें देवोनि जुत्पत्ती । रामें धाडिले सीताशुद्ध्यर्था। ' – भाराकि १६.१५१. [सं.युद्धपति]

**जुदा** वि.निराळा; वेगळा; भिन्न; अलग. [फा.]

**जुदाई–गी** स्त्री. निराळेपणा; वेगळीक; अंतर : 'पंडित प्रधान व नबाब निजाम यांचा तरिका एक्लासीचा कदिमापासोन चालत आला, हर्बाबे त्यासी जुदागी नाहीं.'– मइसा १०.१६५.

**जुदी** वि. वेगळी; निराळी : 'ती भाषा जुदी हाय.' – परेपा २९७.

**जुबट** न. थवा; जमाव : 'आणिकें जुनटे नवनवजणें। आंबनवपीती जाणपणें।' – जास्वंद

**जुनट, जुनवट** वि. १. जीर्ण; प्राचीन; जुना. २. आनुभविक; जुन्यासारखा : 'जुनटु जुंझारू हा येकु । नाहीं जयातें कलंकु ।' – गीतार्णव १.४३५. [सं.जीर्ण]

**जुनरी** स्त्री. एक प्रकारची केळ्याची जात : 'दहा प्रकारच्या केळी लावल्या मी : राजेळं... हजारी, जुनरी.' – आआशे ६४.

**जुनवट** वि. म्हातारा.

**जुनवण** न. जून झालेली; रापलेली (नागवेलीची पाने) : 'रेशमी पानमळ्यांतून जुनवणाचा खुडा करून परतेन.' – परपां ३१७.

**जुनवत** स्त्री. नागवेली, वड इत्यादी झाडांची पिकलेली पाने.

**जुनवान** वि. १. पिकलेली (पाने). २. जुनाट (झाड, वनस्पती). ३. जुना; अनुभवी : 'तातडीचा निरोपहि एका जुनवान कारकुनाजवळ त्याने देऊन ठेवला होता.' – भुज १४.

**जुना** वि.१. पुराणा; प्राचीन; पुरातन; अर्वाचीन काळचा नव्हे असा. २. फार दिवस वापरलेली (वस्तू); झिजलेला, फाटलेला (जिन्नस). ३. बंद होऊन बराच काळ झाला आहे असा (व्यापार इ.).[सं.जीर्ण]

**जुनाट** वि. १. जुना; प्राचीन; फार दिवसांचा; जुन्या काळचा. २. पक्का; पक्व (बुद्धी, विचार, अनुभव, झाड). ३. पुरातन; कालबाह्य.

**जुनापाना, जुना पुराणा** वि. १. बराच जुना; जीर्ण; २. वापरलेला; फाटलेला, झिजलेला. (कपडा, भांडे, घर). ३. वडील; ज्येष्ठ; फार दिवसांचा (माणूस). ४. बहुत काळचा; जुना (कामदार, हुद्दा, धंदा, व्यापार). पहा : **जुना** ३

**जुना पापी** धूर्त ; शहाणा (म्हाताऱ्याबद्दल वापरतात).

**जुना बाजार** जुन्या, वापरलेल्या वस्तू मिळण्याचे ठिकाण : 'या दिव्याला असेल असे बर्नर स्वस्तात मिळविण्यासाठी जुन्या बाजाराची वाट धरण्याची वहिवाट असे.' – रोपा १५.

**जुनारदार** पु. वाख किंवा केक्ताड यांचे दोर वळणारे लोक : 'देशक मंडळी म्हणजे... जिनगर, कोळी, ... जुनारदार वगैरे बिनसरकारी.' – शसौ ६१.

**जुनावणे** अक्रि. १. जून होणे; पक्व होणे; पक्के होणे; स्थापित होणे; बळावणे; दृढता पावणे (वस्तू, झाड, बुद्धी, अभ्यास, बातमी, रोग इत्यादी). २. (वाईट अर्थाने) तारुण्यातील जोर जाणे (बुद्धीचा); उतरत्या कळेस लागणे.

**जुने खोड** वि. दणकट; चिवट; टणक; सशक्त (म्हाताऱ्या माणसास म्हणतात).

**जुनेर–रे** न. जुने वस्त्र (विशेषत: बायकांचे जुने लुगडे) : 'मुकाट्याने एक जुनेर घेऊन उठली.' – पलको ३१५. (को.)

**जुन्नर हरहुन्नर** हिकमत; लुच्चेगिरी; युक्ती; करामत; लटपट; उलाढाल. हा शब्द व्यापक अर्थाने वापरतात.

**जुप** न. कोठार; भांडार : 'नातरि देव –राजधानीचीं जुपें । उघडली मज पांतां ।'– ऋव २३.

**जु(जुं)पण–णी** स्त्री. १. जुंपण्याची क्रिया. २. जुंपणी. ३. जुंपण्याचा सोइस्करपणा, योग्यता; सवंगड्याशी जुळते असणे. ४. बैलास

बांधण्याची दोरी. (कु.)

न. १. गाडीची धुरी; इसाड व जू यांना बांधणारी दोरी. २. जाड, मजबूत पदरांची - दुपेडी तिपेडी दोरी. ३. (वस्त्रोद्योग) मागाच्या दुसऱ्या टोकाजवळचे सूत ताणणारे धनुष्याकृती लाकूड. ह्या लाकडाने व गुलड्याने हे सूत ताणले जाते. पहा : **गुलडा** [सं.युज्]

**जु(जुं)पणे** उक्रि. १. जोडणे. २. (ल.) गुंतविणे; कामास लावणे, लागणे. ३.प्रारंभ करणे; व्यवस्था लावून देणे (काम, उद्योग इत्यादींची). ४. प्रवृत्त होणे (युद्ध, वाद इत्यादींस); सुरू होणे. [सं.युज्]

**जु(जुं)पणे** न. १. पहा : **जुंपण** ३. २. (वस्त्रोद्योग) कापड विणून झाल्यावर उरणारी एका ताण्याची शेवटे दुसऱ्या कापड विणायच्या ताण्यास जोडण्याचे साधन. ३. (ल.) उत्पत्ती; रचना : 'जै पहिलें सृष्टीचें जुंपणे ।'- ज्ञा १४.५७. ४. बैलाच्या गळ्यातील दोरी; जोखडाचा पट्टा; दोरी. पहा: **जुवणी, जुवाली** [सं.युज्]

**जुपन** न. औताच्या जुंपण्याच्या बेरडी, चऱ्हाट, वारती, कासरा मिळून होणारे सर्व. पहा : **जुंपण** (व.)

**जुपी** स्त्री. पूर्व तयारी ; जोडाजोड : '(झाडं घेतल्यात त्येंची ) तोडायला जुपी करायची हाय.'- गोतावळा १३१. (वा.) **० होणे –** सुरुवात होणे : 'कामाला लागलीच जुपी झाली.' – आपा २०.

**जुपेंड** पु. डवरा; जुवाला बांधण्याची दोरी. (व.)

**जुप्पी** स्त्री. जोडणी : 'वाडीच्या दोन बैलगाड्या आल्या. जुप्पी केली.'– रैत ४१.

**जुफो** पु. रानगांजा.

**जुबा** पु. पायघोळ झगा (सर्वांत वर घालण्याचा); झब्बा : 'जुबा मोठ्या पट्टीचे मश्रूचा.'- ऐटि ३.५०. [फा.]

**जुभा** स्त्री. कफनी.

**जुमडा** पु. (वन.) गवत अथवा तत्सम वनस्पतींचा झुबका; काही गवताळ प्रदेशांत गवत झुबक्यांनी वाढते. उदा. तृणसंघात.; बुचका; जुंबाड.

**जुमला, जुम्ला** पु. १. एकूण जमा, बेरीज, आकार : 'नाकिर्दी असेल जुम्ला पैकीं । तें किर्दी करावी निकी ।' - मेपुले (लेखकाधिकार ) ११५. २. समुदाय. ३. सव्वाशे घोडेस्वारांची पलटण; शंभर-दीडशे शिपायांचे पायदळ. [अर.]

**जुमलेदार** पु. १. जुमल्यावरचा अधिकारी; शताधिप : 'एवढी मोठी छावणी पण जुमलेदार, कारकून द्यावे तसे लक्ष देत नाहीत.'– श्रीयो २.१७४. २. जमाबंदी खात्यातील मुख्य हिशेबनीस.

**जुम(म्म)स** १. भय ; धास्ती; दरारा : 'येकायेकी जुमस खाणार नाहींत.' – पेद ४.५. २. कच; फारकत. पहा : **जुमान** [फा.]

**जुम(मा)स, जुमान** पु. स्त्री. १. जागा सोडणे; सरकणे; बदलणे; हार खाणे; हटणे (नेहमी निषेधार्थी उपयोग). (क्रि. खाणे, पावणे.) २. धाक; आदरयुक्त भीती; दरारा; व्यक्ती, वस्तू यासंबंधी फार भयप्रद कल्पना. (क्रि. खाणे, पावणे, पडणे, असणे.)

[फा. जुंबिश् = गती व फा. गुमान = कल्पना, विचार] .

**जुमानणे** सक्रि. १. किंमत मानणे; मान देणे; महत्त्वाचे, भारदस्त किंवा भयंकर आहे असे समजणे; भय बाळगणे; पर्वा करणे (निषेधार्थी उपयोग). २. कसाला लावणे; अजमावणे. ३. अनुल्लंघनीय आहे असे मानणे. ४. गाठणे. [फा. गुमान]

**जुमारात** स्त्री. गुरुवार. [अर. जुमेरात]

**जुम्मा** पु. शुक्रवार : 'काय रे, जुम्माच्या नमाजेला नाय आयलोस.' – इंधन ६७. [फा.]

**जुम्लह** पु. एकूण; सर्व. [अर.]

**जुयटे** न. नदीतील, खाडीतील बेट; नदीच्या पात्रातील उघडा पडलेला लहानसा भाग.(को.) [सं.द्वीप]

**जुरई** वि. घोड्याचा एक रंग.–अश्वप १.२८.

**जुरत** स्त्री. धाडस; ताकद; हिंमत; मर्दुमकी; बिशाद; शौर्य (निषेधार्थी प्रयोग) : 'जुरत कोणाची पाहील मजकडे नजर करून वाकडी.'– पला ६. [अर.]

**जुरतदा(द्दा)र** वि. धाडसी; शूर; धीट; हिंमतदार. [फा.]

**जुरत मेहनत** धैर्याचा प्रयत्न : 'पूर्वीपासोन जो कोणी जुरत मेहनत करीत आहे त्यास मुलखास व खजान्यास व फौजेस कमी नाहीं.' – दिमरा १.३४.

**जुरदा** वि. उत्तम. (माण.)

**जुरबगार** वि. तीक्ष्ण धारेची तलवार.

**जुरा** पु. ससाणा. [अर.जुर्रा]

**जुरा, जुर्राबावरा** वि. कुर्रेबाज; अक्कडबाज; रंगेल; नटवा: 'सवाई यशवंतराव जुरा।' – ऐपो ३६१.

**जुरुरत** स्त्री. आवश्यकता.

**जुरूर** क्रिवि. आवश्यक.

**जुर्बा(र्मा)ना** पु. दंड; शिक्षा. [फा.]

**जुलबगार** स्त्री. मिरवणुकीत ताबुताबरोबरील तरवार आणि भाला. [अर.जुलफकार]

**जुलमाचा रामराम** पु. निरुपायाने नाखुषीने पत्करलेली गोष्ट; शिक्षा होईल अशा धाकामुळे केलेले काम; सक्तीने करून घेतलेले काम, नोकरी इत्यादी: 'आज या घराला रामराम ठोकण्यापेक्षा घटकाभर जुलुमाचा रामराम पत्करला.' - भावं ९०.

**जुलहाल** वि. चपळ. [अर.]

**जुलमी** वि. जबरदस्ती करणारा; प्रजापीडक; अन्यायी. [अर.झुल्मी]

**जुलाब** पु. १. ढाळ होण्याचे औषध; ढाळक; रेचक. २. त्या औषधाने झालेला ढाळ, रेच. [अर.जुल्लाब]

**जुलाल** वि. प्रभावी.(झाडी)

**जुलाह** पु. कोष्टी; विणकर. पहा : **जुल्हाई** [अर.]

**जुलूप** न. केसांचे झुलूप; काकपक्ष. [फा.झुल्फ]

**जुलूम** पु. १. जबरदस्ती; जबरी; बलात्कार; परपीडा; अन्याय; अन्यायाचा दाब; प्रतिबंध; सक्ती. २. दीर्घ प्रयत्न; अतिशय श्रम; अतिशयपणा; जाजती; कमाल. ३. एखाद्या गोष्टीचा अतिरेक झालेला पाहून झालेली आश्चर्यचकित मनोवृत्ती दर्शविण्यासाठी योजतात. [अर.झुल्म]

**जुलूमगार** पु. जुलूम करणारा : '...जुलूमगार जुलमी बनतो.'– स्मया २०३.

**जुलूमजबरी** स्त्री. बलात्कार; जुलूम; दडपशाही.

**जुलूमजा(द)स्त–स्ती** स्त्री. १. जुलूम. २. जुलमाचा, जबरदस्तीचा

व्यवहार किंवा आचरण; करडा अंमल; सक्ती, जबरदस्त उपाय. [अर.झुल्म+फा.दस्त]

**जुलूमपादशाही** स्त्री. अतिशय जबरदस्ती; बलात्कार; बळजबरी; कडकपणा; अमर्याद कृत्य. एखाद्या कृत्याचा बेसुमारपणा दर्शविण्यासाठी योजतात. [अर.झुल्म् + फा. पातशाही]

**जुलूमबाजार** पु. ठरावीक दिवसाहून अन्य दिवशी भरवावयास लावलेला बाजार.

**जुलूष–स** पु. १. मिरवणूक; उत्सव. २. समारंभ; थाट; डामडौल; भपका; वैभव: 'तिकडून दीडप्रहर रात्रीस मोठे जुलूसाने फिरंगियांसहवर्तमान शहरांत आले.' – मइसा १.२७. पहा: **जुलूष** वि. वजनदार. [अर.जुलूस]

**जुलै** पु. इंग्रजी वर्षाचा सातवा महिना. [इं.]

**जुल्कद्र** वि. प्रतिष्ठित : 'जुलकद्र कृष्णराव नारायण.' – मइसा १९.१०५. [अर.झुल् + कद्र]

**जुल्म** पहा : **जुलूम**

**जुल्ह(ल्हा)ई–ही** पु. कोष्टी; विणकर. [फा.जुलाहा]

**जुव** न. जोखड. पहा : **जू**

**जुवडी** जोडजू; जोडणी. पहा: **जुवाड, जुवाडी** (खा.)

**जुवणी** स्त्री. १. कोळप्याची जोडी. २. जुपणी, जोते (बैल इत्यादिकांच्या मानेस अडकवावयाचे). (राजा.)

**जुवळ** न. जुळे; जुळी मुले; एका गर्भापासून उत्पन्न झालेले दोन प्राणी. [सं.युगल]

**जुवळा** वि. १. जुळा; जावळा; जुळ्यांपैकी एक. २. दुहेरी ; जोडीने वाढणारी (फळे).

**जुवळी** स्त्री. १. जोडपे; जोडा; जोडी; युग्म. २. जुळी.

**जुवा** पु. सांधा; जोड; जवा; एकमेकांशी बरोबर मिळणे; जोडले जाणे. 'तीं (कौले) एकमेकांत जुवा होऊन बसतील अशीं असावीं.' –तप ८२. [सं.युज्]

**जुवा–वे** पु. न. नदीतील बेट. (को.) पहा : **जू** [सं.द्वीप]

**जुवा, जुवार** पु. १. फाशांचा खेळ; द्यूत; जुगार. २. जुगारी: 'तें जिणें कीं जुवाराचें । टिटेघर ।।' – ज्ञा १८.६७३. [सं.द्यूत]

**जुवाटा** पु. घोळका.

**जुवाड–डी** स्त्री. लहान जोखड; नांगराच्या, चाहुरीच्या वगैरे पुढील बैलांच्या मानेवरील जू.

**जुवाम(मा)र्दी** स्त्री. पराक्रम; जवामर्दी; शौर्य. पहा: **जवानमर्दी**. [फा.]

**जुवारी** स्त्री. जोंधळा; जवारी (धान्य). [सं.]

**जुवारी** वि. १. जुगार खेळणारा. २. (समाज) अधम वृत्तीचा; खोटे नाटे करून जुगार जिंकणारा.

**जुवाली** स्त्री. बैलाला जुंपण्याची दोरी. पहा : **जुवणी** (को.)

**जुवाळिया** पु. जुळवाजुळव करणारा; वार्ताकार; संघ करणारा. [सं.युग]

**जुवाळून** क्रिवि. मेळ करून; संघ करून; समजून.

**जुवीज** पु. न्यायाधीश : 'आपल्या वडिलांच्या ओळखीच्या एका जुवीजाला या मिठागरांतील शेंवट्यांची कशी चटक लागली होती.'– जोसह्याद्री १०४.(गो.) [पोर्तु.]

**जुवे** न. बेट. उदा. कुंभारजुवें. (गो.) [सं.द्वीप]

**जुवेबाज** वि. फाशांनी द्यूत खेळणारा; जुगारी.

**जुव्वा, जुव्वेबाज–जी** पहा : **जुवा** इत्यादी

**जुष्टी** स्त्री. आनंद : 'विश्वें घ्यावी सांठवून । ही एक तुझी जुष्टी ।' – टिक १८३. [सं.जुष् = संतोषविणे]

**जुस्त** वि. योग्य; बरोबर. [सं. युक्त]

**जुस्ताजुस्त** वि. नीटनेटका; ठाकठीक. (गो.)[पोर्तु.]

**जुहारणे** अक्रि. 'जोहार' म्हणून वंदन करणे : 'मग तैसा चि भेणभेण । पुढुती जुहारी चरण ।।' – राज्ञा ११.४८५.

**जुहूर** वि. व्यक्त; जाहीर. [अर.]

**जुळणी** स्त्री. १. परस्परांचा संयोग; जुळण्याची क्रिया; मेळाने किंवा व्यवस्थितपणे, क्रमवार जुळणे; एकत्रपणा; रचना; योग्य आणि नियमित एकत्रीकरण. पहा : **जुळणे**. २. मेळ; तुलना; समता; जम; जवा. ३. सुटे भाग जोडणे, एकत्र करणे.

**जुळणीस** पु. जुळारी : 'इंग्लंडमध्ये जुळणीसाला मिळणारे वेतन.' – अम ६४९.

**जुळणे** उक्रि. १. नियमितपणे एकावर एक ठेवून मिळते जुळते होणे; बाजूला जोडणे (कापड मोठे करण्यासाठी त्यास तुकडा); एकापुढे एक लांबवर जोडले जाणे. २. (शब्दश: आणि ल.) मेळात, एकत्र येण्यास योग्य असणे; व्यवस्थित रचणे (यंत्राचे भाग, कवितांचे चरण, धंद्यांची खाती, पुस्तके, कागद, पाने, ठसे इत्यादी); मेळ बसणे; एकत्र असणे, ठेवणे (अनेक हिशेब, मजकूर, नानाविध स्वभाव). सक्रि. पटणे; मतैक्य होणे.[सं.युज्](वा.) **जुळवून घेणे** – मेळ घालणे; अनुयोजन करणे; जमवून घेणे; एकत्र करणे; समायोजन : 'साथीदार तुणतुणे, डफ, टाळ जुळवित होते.' – श्रीयो ५६.

**जुळलेला** वि. १. एकत्र केलेला; संयुक्त. २. सर्वच्या सर्व किंवा आठ दात उगवलेला (बैल). उदा. हा बैल जुळलेला आहे = याला सर्व दात आले आहेत: 'तो आता 'चौसा' झाला होता. पण 'जुळलेल्या'खोंडाला भारी दिसत होता.'– भेटीगाठी ९०. ( वाई).

**जुळव** पु. भारा; जुडी.

**जुळवणी** स्त्री. एखाद्या यांत्रिक उपकरणाचे वेगवेगळे भाग एकत्र करण्याची कृती, प्रक्रिया. (क्रि. करणे.)

**जुळवाजुळव** स्त्री. १. व्यवस्थित मांडणी; नीटनेटकी व्यवस्था (अनेक भाग, व्यक्ती इत्यादींची). पहा : **जुळणी**. २. अनेक ठिकाणांहून आणून एक करणे, मांडणे (वस्तू); तयारी : 'सप्तरंगी चित्रपटाची जुळवाजुळव पूर्ण झाली.' – अक्षर १७०.

**जुळा** वि. १. जावळा; जुवळा; आवळ्याजावळ्यांपैकी एक. २. दुहेरी; आवळाजावळा; एकमेकास चिकटून उत्पन्न झालेली; जोडीने एकत्र वाढणारी (दोन फळे). [सं.युगल]

**जुळाजु(जू)ळ** पहा : **जुळवाजुळव**

**जुळारी** पु. मुद्राक्षरे जुळवणारा; टाईप जोडणारा; जोडारी: 'एक जुळारी ह्या नात्याने.' – निअसा ३४०.

**जुळी** न.अव. एखाद्या स्त्रीने एकाच वेळी जन्मास घातलेली दोन अर्भके. एकबीज व द्विबीज असे जुळ्यांचे दोन प्रकार असतात.

**जुळी** स्त्री. १. गठ्ठा; ढीग; गड्डी; जुडी; युग्म; जोड (विड्याची पाने, पत्ते, कागद इत्यादी एकाच जातीच्या आणि एकाच आकाराच्या वस्तू). २. दोन बांगड्यांचा दागिना; दोन रत्ने किंवा सोनेरी मणी असलेले दोन सर. ३. एकत्र वळविलेली दोन वातींची जोडी. ४. (सामा.) दुहेरी, जोडवस्तू. पहा: **जुवळी**

**जुळीदूड** स्त्री. काचेच्या मण्यांच्या किंवा हिरव्या पोतीच्या दोन पदरांत सोन्याचे दोन मणी घातलेला लहान मुलींच्या गळ्यातील दागिना.

**जुळे** न. १. जोड मुले; आवळीजावळी मुले. पहा : **जुवळ**. २. बांगड्यांचा जोड किंवा बांगड्यांचे जुळे. ३. जोडी; दुक्कल; जूग (आंब्याचे - केळ्याचे - पेरुचे - फळाचे - जुळे.) ४. मैथुन (पक्षी, साप इत्यादींचे). ५. नवराबायको; पुरुषस्त्री; मिथुन. [सं.युगल]

**जुं, जुंआठा** पु. जुगार खेळण्याचे ठिकाण; द्यूत, जुव्वा खेळण्याची जागा : 'गोसावीयासि सारी जुं खेळावयाची प्रवृत्ति : मग गोसावी प्रतदीनीं जुंआंठेयासि बीजें करीतिः सारी जुं खेळावेयाचें वेसन स्वीकरीतिः' - लीचपू १८.

**जुंगट** न. गुंजट (वर्ण विपर्यासाने); लाकडाला आलेले टेंगूळ, गाठ. वि. गाठी असलेले (लाकूड).

**जुंगा** पु. झिंगा नावाचा मासा : 'जेय सावजांचा धुधुवाटीं । जुंगियांचा रुणझनाटीं ।' - शिव ३१४.

**जुंगा** वि. तरबेज; हुशार; चतुर; कुशल. (प्रां.)

**जुंगाड** न. १. झाडे, झुडपे, वेली इत्यादींच्या पानांची किंवा फांद्यांची गुंतागुंत; जुंबाड; दाट विस्ताराचे झाड, झुडूप, जाळी.(को.) २. (ल.) अगडबंब माणूस, रेडा, साप, मासा इत्यादी.

**जुंगो** वि. १. वृद्ध. (गो.) २. निष्णात. पहा : **जुंगा**

**जुंज-झ** न. स्त्री. लढाई ; युद्ध; झोंबी; भांडण; कज्जा : 'न होअेंची जुंझ भांडण ।' - शिव १२०. [सं.युद्ध]

**जुं(जु)ज(झ)णे** अक्रि. लढणे; भांडण करणे.

**जुंजा(झा)र** वि. युद्धकुशल; युद्धाची आवड असणारा; वीर; शूर; लढवय्या : 'आधीं जुंझार तुवां होआवें । मग जुंझावया शस्त्र घेयावें ।' -ज्ञा १८.१२८३.
न. लढाई; युद्ध (क्रि. लागणे,होणे.) [सं. युध]

**जुंझावात-यू, जुंझामारुत, जुझापवन** पहा: **झंझावात**

**जुंती** स्त्री. जुंपणी.

**जुंफण-णी-णे** पहा : **जुंपण, जुंपणी, जुंपणे**

**जुंब(बा)ड-डा-डे,जुंभाड** न. १. वेणी, शेंडी यांचा डोक्यावर बांधलेला बुचडा, गाठ. २. समुदाय; झुबका; जुडगा (काथ्या, वेत, मुळ्या, केस, मोत्यांचे सर इत्यादींचा) : 'काढूनि प्रळयविजूंचीं जुंबाडें । जैसें पन्नासिलें गगनाचे हुडे ।' - ज्ञा ११.३६३; 'तुझिया भुजांचें जुंबाड । हें मी करीन शतखंड ।'- कक २.१३.१४५. ३. सापाचे वेटोळे : 'हातें रगडिता सर्पतोंडें । सुटली सर्पांचीं जुम्बाडें ।' - मुआदि २९.१०६. ४. दाट पानांचा वृक्ष, झुडूप; जाळी; झाडांच्या फांद्यांची, पानांची गुंतागुंत; दाट झाडी : 'नाना वृक्षांचें जुंबाड ।' - दास १०.९.२. ५. (विशेषत:) माणसांची टोळी, समुदाय. [सं.युग्म]

**जुंव्हारणे** अक्रि. वंदन करणे; जोहारणे : 'कर जोडोनि जुंव्हारिते जाहाले । वेळोवेळी तेया ।।' - क्रिपु ८८.

**जू** स्त्री. ऊ (प्राणी). [सं.यूका]

**जू** न. बैलाच्या मानेवरचे जोखड. पहा : **जुव**. २. (ल.) ओझे; बोजा (जबाबदारीचा, धंद्याचा, काळजीचा इत्यादी); गुलामगिरी; जबाबदारी. [सं.युज्]

**जू** न. जुगार; द्यूत : 'छळितया विंदाना - । माजीं जूं तें मी विचक्षणा ।' - ज्ञा १०.२८४. [सं.द्यूत]

**जू** न. नदीतील बेट. (को.) पहा : **जुवा**

**जूग** न. १. मंडळी; टोळी; जूट. २. मंडळ; समिती; संघ, ३. (सोंगट्यांचा खेळ) दोन किंवा अधिक सोंगट्या एका घरात येणे. [सं.युग]

**जूग** न. (नाविक) दोऱ्या ( टाकणी, अलाज, खुराप) तयार करण्याकरिता केलेले एक साधन. (कु.) [सं.युग]

**जूग** न. एक प्रकारचे गलबत.

**जूग** वि. जास्त. (झाडी)

**जूज** वि. थोडे; किरकोळ; क्षुद्र : 'जूज कामाकरितां आपआपल्यांत नाखुशी राखणे ठीक नाही.' - मइसा १९.१०. [अर.जुझ + अ]

**जूझ** न. युद्ध; लढाई : 'जे धर्मालय म्हणिजे । तेथ पांडव आणि माझे । गेले असति व्याजें । जूझाचेनि ।।' - ज्ञा १.८६.

**जूट** पु. स्त्री. न. १. जूग; तट; मंडळी; जुळलेली मंडळी. २. एकोपा; मैत्री; सलगी; ऐकमत्य. ऐक्य : 'सर्व कुलकर्ण्यांच्या जुटास' - जोफुसंग्र १२८. ३. समाज; तांडा; संघ; समुदाय; कंपू. ४. जंगजूट. पहा : **जंगजोड** [सं.यूथ]

**जूट** न. अंबाडी; ताग [इं.]

**जूटभाऊ** पु. एकत्र कुटुंबातील व्यक्ती.

**जूड** पु. झुडूप. (झाडी)

**जूडा** पु. अंबाडा ; बुचडा (केसांचा). (ना.)

**जूता** पु. जोडा; पायतण : 'माझ्या पायांत, मला वाटतें, दिल्लीचा जूता असावा.' - दिअहो १६९.

**जूती** स्त्री. जुडी; जुडगे : 'बाणाच्या सर्वे जूत्या राजा मिर्जा मोहोरे आला.' - ऐपो २.२९.

**जूद** क्रिवि. लौकर; त्वरेने; जलद : 'जूद चेनापट्टण तालुक्यांत जाणें होय तें करावें.' -मइसा १९.७३. [फा.ज़ूद]

**जूदतर** वि. अधिक त्वरेने: 'जूदतर खर्चाची मदत इम्दाद पोक्ता ऐवज देऊन रवाना करून पाठवावें.' - पया ३८७.

**जूदो** पु. जपानी कुस्तीचा प्रकार ; जुजुत्सू : 'जूदोमध्ये प्रावीण्य मिळविण्याचा त्यांचा प्रयत्न चालू आहे.' - जाजपू २३०.

**जून** वि. १. कोवळेपणा गेलेला; निबर; राठ; पक्का झाल्यामुळे कठीण झालेली (वनस्पती, फळे इत्यादी). २. (ल.) दृढ; परिपक्व; घट्ट

(चांगल्या व वाईट अर्थी – समज, समजूत, बुद्धी). ३. भक्कम; मजबूत; पक्का: 'बुरजाचा घेर शंभर हात होणें आहे तें काम जून पायावर चढवावें लागतें तें करावयासी लाविलें आहे.' – पेद ३९.१४९.

**जून** पु. इंग्रजी वर्षाचा सहावा महिना. [इं.]

**जूप** न. कोठार; भांडार : 'ना तरी देवराजधानीची जूपें । उघडली' – ऋव १२४.

**जूफ** न. खेळातील एक संज्ञा. या खेळाचा प्रकार असा – अनेक खेळणाऱ्यांनी चक्यावर उभे राहून प्रत्येकाने एक एक असे गलीत पैसे फेकावयाचे. ज्याचा पैसा गलीत पडेल त्याने गलीच्या बाहेर पडलेल्या (इतरांनी सांगितलेल्या) पैशावर नेमका पैसा फेकून मारावयाचा व फेकलेले सर्व पैसे जिंकावयाचे.

**जूम** पु. १. पहा : **जुमान**. २. गलबताकरिता काथ्याचे दोर वळण्याचे एक साधन ; जूग.(को.)

**जूसर** न. जोखड.(कुलाबा,को.)

**जूहारणे** अक्रि. नमस्कार करणे : 'तवं अवस्वरिये जुहारिले : ' – एरुस्व १२७.

**जूळ** न. जुळे; दुहेरी वस्तू. पहा : **जुळे**

स्त्री. (प्रा.) एकत्र बांधणे; जुंपणे (दोन बैल इत्यादी). (क्रि. घालणे.) [सं.युगल]

**जृंभण, जृंभा** न. स्त्री. जांभई, जांभळी. (क्रि. घेणे.) [सं.]

**जृंभणे** अक्रि. १. जांभई देणे. २. स्वस्थता पावणे : 'जी। जी। याहुनि लाभ काय ? म्हणुनी भूपाळची जृंभला।' – आसीस्व ५७. [सं.जृंभ्]

**जृंभनास्त्र** न. जांभया आणणारे अस्त्र : 'तो फुंपातेनि जृंभनास्त्रे : पीसा केला ' – शिव ४५७. [सं.]

**जृंभावात** पु. ज्यामध्ये फार जांभया येतात असा वातरोग. [सं.]

**जे** उअ. १. की; (हा शब्द पुढील विधानाचा दर्शक आहे) कारण की : 'जे सानुकूळ श्रीगुरू।' – ज्ञा १.७५. २. ज्यामुळे : 'कैसें वो तुमचें करण । जे पुढिलां एओ पाहे मरण ।' – शिव ८२०. [सं.यत्]

**जे** अ. १. पादपूरणार्थक अव्यय. २. अवधारणासूचक अव्यय; जेहेत्ते.

**जे** सना. १. कोणते. २. ते या संबंधी सर्वनामांचे प्रतिस्वरूपी रूप. [सं.]

**जे** अ. म्हणून. (प्राम.)

**जेउता–ती–ते** क्रिवि. जेथे; जिकडे : 'मग जेउती वास पाहिजे ।' – ज्ञा ४.१९१.

वि. जितके; जेवढे. [सं.यावत्]

**जेक** पु. खांब.

**जेका** उअ. की (पुढील वाक्याचा दर्शक). पहा : **का**

**जेगा** न. डोक्यावरील (पागोट्याला बांधण्याचा) एक मर्दानी अलंकार : 'जेगा व शिर्पेच दिला.' – ऐलेसं ८.४०००. [फा.जीघा]

**जेच्चा** वि. जेथला. (झाडी)

**जेजया, जिजिया** पु. मुस्लीम राज्यात मुसलमानेतर लोकांनी द्यावयाची डोईपट्टी : 'अलमगिराचे कारकीर्दीत यज्ञोपवीतास साडेतीन रुपये जेजयां बसून, ओलें अन्न विकावें, सर्वांनीं घ्यावें हें नौबद गुजरली.' – ऐको ४५३.

**जेजाणे** न. युद्ध; लढाई. पहा : **झुंझणे** [सं. योधान्]

**जेजाल** स्त्री. फिरविता येण्यासारखी लांब नळीची बंदूक : 'जेजाल जुंबरे बाणकरी वळवळ ।' – राला १०१. [हिं.जंजाल, फा.जेजाल]

**जेजालन्दाज, जेजाल बरदार** पु. जेजाल उडविणारा, डागणारा; गोलंदाज. [हिं.]

**जेजुइट** वि. ख्रिस्ती कॅथालिकांमधील एक संप्रदाय : 'सतराव्या शतकात जेजुइट मिशनऱ्यांनी मराठी भाषेत केलेली साहित्यनिर्मिती .' – प्रिस्मृग्रं १४६.

**जेजे** स्त्री. त्रास; श्रम; उपद्रव; यातायात; कंटाळवाणी गोष्ट. (क्रि. करणे, देणे, पडणे, पावणे, सोसणे.)

**जेजेकार** पहा : **जयजयकार**

**जेजेवंती** स्त्री. एक फुलवेल.

**जेट** १. (भौ.) फवारा; २. विमानाचा एक प्रकार. एखाद्या नळीतून किंवा बारीक छिद्रातून दाब देऊन उडवण्यात येणारा वाफेचा किंवा द्रव पदार्थाचा जोराचा फवारा. [इं.]

**जेटी** स्त्री. समुद्रावरील धक्का : 'तिथं जेटीलगत असलेल्या टेकाडाशीं ते उभे राहिले.' – स्मगा १९.

**जेठ, जेठवड, जेठोडी** पु. ज्येष्ठ महिना. [सं.ज्येष्ठ]

**जेठ** क्रिवि. जेथे : 'दूर जागा पाहिला तुहा वारा नाहीं जेठ ।' – होबाला ५३.(खा.) [सं.यत्र]

**जेठ–ठा–ठ्या** वि. वडील; थोरला; ज्येष्ठ : 'जेठ्या लेकाची पहिली झोप.' – जसा १०१.

पु. वडील दीर. (खा.) [सं.ज्येष्ठ]

**जेठणे** उक्रि. घट्ट, ताणून बांधणे; आवळणे.

**जेठा** पु. कुसुंब्याचा काढलेला पहिला आणि गहिरा रंग.

**जेठा** पु. १. गुडघे उभे करून बसल्यावर कंबर व गुडघे यांच्याभोवती वस्त्र गुंडाळून बांधतात तो प्रकार. (क्रि. मारून बसणे.) २. (ल.) उद्योग नसणे; आळशी बनणे. (वा.) ० **मारणे** – ठाण मांडून बसणे : 'बिजलीने जेठा मारून जमिनीवर बसण्याची आपली घाणेरडी सवय सोडून दिली.' – वाघसिंह ८३.

**जेठाणी–नी** स्त्री. थोरली जाऊ : 'माझी जेठानी 'पानाईं' – बगा १२२.(खा.) [गु.][सं.ज्येष्ठ]

**जेठामाल** पहिल्या प्रतीचा, उत्तम माल.(व.)

**जेठी** पु. वेताळ; जबरे भूत.

**जेठी** पु. १. मल्ल; पहिलवान; कुस्तीगीर : 'कोटि जेठी लागले । उचलितां भागले । त्रिंबकासी ।' – मध्वक ३७. २. ज्येष्ठ, श्रेष्ठ ; वीर : 'मनोवेगीं पांडव जेठी ।' – मुसभा १३.६९. [सं.ज्येष्ठ]

**जेठोडी–डे** न. ज्येष्ठात पडणारा पाऊस.

**जेड** न. (भूशा.) सोडियम ॲल्युमिनियम सिलिकेट हे संघटन असणारे चिवट, उपरत्न म्हणून वापरले जाणारे खनिज. [इं.]

**जेड** पु. कोष्टी.(बे.) [क. जाड]

**जेडला** क्रिवि. जेव्हा. (चि.) [सं.यावत्]

**जेडवळ, जेडोळ** क्रिवि. १. जोपर्यंत; जेथपर्यंत; जितका वेळपर्यंत. २. इतका वेळ, उशिरा.

**जेणे** पहा : **जिणे**

**जेणे** क्रिवि. ज्यायोगे; ज्यामुळे : 'जेणे सदकीर्ती वाढे ।' – दास २.९.२. [सं.यत्]

**जेणेकरी, जेणे करून** क्रिवि. ज्यायोगे; ज्यामुळे : 'जेणेकरिं मिं संसार तरे ।' – पंचतंत्र १.२७.

**जेतव्य** वि. जिंकण्यास योग्य असा. [सं.]

**जेता** वि. सदैव जिंकणारा; अक्षय विजयी; जयशाली : 'थोर आल्हाद जेत्यांचा ।' – एरुस्व १२.८१. [सं.जेतृ]

**जेताश्री** पु. (संगीत) एक राग. गायनवेळ सायंकाळ. [सं.]

**जेती** पु. अने. वि. जितके : 'जेती घाणे वाहति तेतीयांप्रति पली पली तेला' – पाटण शिला १.२४.

**जेती** क्रिवि. जेथे. (झाडी)

**जेतीतेती** क्रिवि. सर्वत्र. (झाडी)

**जेतीबनला तेती** कोठेही; इतस्ततः. (झाडी)

**जेतुका–ला–ले** वि. क्रिवि. १. जितका; जेवढा (परिणामवाचक). २. जितका (संख्यावाचक) : 'असनिधानि जे जेतुलेनि क्षाळावे ते तेतुलेनि झाळी ।' – सिसू २६.८. [सं.यावत्]

**जेतुलाले** वि. जितके; जेवढे म्हणून : 'देखें जेतुलालें कर्म निपजे । तेतुलें आदिपुरुषीं जरी अर्पिजे ।' – ज्ञा २.२७१. [सं.यावत्]

**जेतूर** क्रिवि. ज्यात. (कु.)

**जेतृत्व** न. जय; विजयीपणा; जिंकण्याचे सामर्थ्य. [सं.]

**जेथ** क्रिवि. जेथे; ज्या ठिकाणी; ज्या जागेवर (संबंधदर्शक). [सं. यत्र]

**जेथचा–ला, जेथील** वि. ज्या जागेचा (संबंधदर्शक).

**जेथपर्यंत–पावेतो, जेथवर** क्रिवि. १. जितके ; ज्या जागेपर्यंत. २. जोपर्यंत; ज्या वेळपर्यंत.

**जेथू(थो)न, जेथने** क्रिवि. ज्या जागेपासून (संबंधदर्शक).

**जेथे** क्रिवि. जिथे; ज्या ठिकाणी (संबंधदर्शक) : 'जेथें नाहीं उत्तम गुण । तें करंटपणाचें लक्षण ।' – दास १९.३.२७. [सं.यत्र]

**जेथेकोठे** क्रिवि. जेथेजेथे ; ज्या, कोणत्याही ठिकाणी.

**जेथेतेथे, जेथूनजेथून** क्रिवि. सर्वत्र; सर्व ठिकाणी.

**जेदी(दु)स** क्रिवि. ज्या दिवशी. (गो.)

**जेधवळ, जेधोळ** क्रिवि. जेढवळ; जेवढा वेळ. [सं.यावत्काल]

**जेधवा** क्रिवि. जेव्हा; ज्या वेळेस : 'नातरी जेधवां जियें ठायीं ।' – ज्ञा ९.२५४. : 'वांटणी जेदवां झाली तेदवां कोली काय म्हणता.' – लोककथा २.५७.(को.) [सं.यदा]

**जेन** न. १. बुरणूस; लोकरीस खळ वगैरे लावून केलेले एक वस्त्र. २. निजावयाची गादी. (व.) ३. लेप, रजई. (ना.) (वा.) **जेनाच्या पदरी गाठ देणे, मारणे** – अशक्य काम करण्याचा प्रयत्न करणे.

**जेनबुद्धी** स्त्री. बुरणुसबुद्धी (ज्याप्रमाणे बुरणुसाला सुईने पाडलेली भोके बुजून जातात, त्याप्रमाणे एखाद्याच्या बुद्धीवरील झालेले संस्कार तेव्हाच नाहीसे होतात, त्यावरून); जडबुद्धी; स्थूलगती.
वि. मूर्ख; जड.

**जेपाळ** पु. जयपाळ. एक औषधी वनस्पती. याच्या बियाला जमालगोटा म्हणतात. ही तीव्र रेचक असून विंचवाच्या विषावर उगाळून लावतात. कोकणात ही झाडे येतात. [सं.जयपाल]

**जेपाळाचा ढाळ** १. मोठा रेच. २. (दंतकथेवरून व व्याजोक्तीने ) सर्वौषधी चूर्ण; त्रैलोक्य चिंतामणी; प्रत्येक रोगावरील औषध; बहात्तर रोगावर रामबाण.

**जेफा** वि. फाजील; जास्त. पहा : **जाफा** (कु.)

**जेब** पु. १. खिसा २. (ल.) आवाका : 'बडोद्यावर जाणें दोन दिवस तहकूब करावे, ते आपले जेबांत आहे.' – मदवा १.३०. [फा.]

**जेब करणे** ठार करणे : 'मग मनुष्य एक शहरांतून धरून आणून तोफेवर जेब केले.' – भाब ४०. [फा.जर्ब]

**जेब–व–जीनत** स्त्री. शोभा : 'त्यांचे येण्यांत रौनक अधिक होईल; जेब व जीनत येईल.' – मइसा ७.१९४. [फा.झेब = अलंकार]

**जेमते(त्ये)म** क्रिवि. कसेतरी करून; पराकाष्ठेने; मोठ्या कष्टाने (यामध्ये केलेल्या कामात अपूर्णता तरी असते किंवा पूर्णता असली तरी करणाराला निदान फार श्रम पडलेले असतात) : 'विद्यार्थीही जेमतेम करून तेवढी यातायात करतात.' – नि १७७. [गु.]

**जेमन** न. जेवण : 'नेणें तृप्तिस कामधेनु कवण्या पावेल कीं जेमनीं ।' – मोकृष्ण २०.५८. [सं.]

**जेमने** क्रि. जुळणे; एकत्रित होणे; साधणे. (व.)

**जेमाल** वि. देशी; जाडेभरडे.

**जेय** वि. जिंकण्यासारखा; वश करून घेण्यासारखा; हस्तगत करण्यासारखा. [सं.]

**जेया** सना. ज्याला. पहा : **जया** : 'देखत देखतां आत्मघातु । घडला जेया ।' – ऋव ८.

**जेर** वि. १. कमी योग्यतेचा; अशक्त; लेचापेचा. २. हतवीर्य; दमलेला; भागलेला; थकलेला. ३. त्रस्त, हैराण (दारिद्र्य, आजार इत्यादींनी). (क्रि. होणे, आणणे.) [फा.] (वा.) ० **करणे** – कोंडी करणे; बेजार, त्रस्त करणे, चोहो बाजूंनी जखडणे : 'चारी बाजूंनी जेर केलंय त्याला.' – श्रीयो १.५३. **जेरीस आणणे** – सततचा त्रास देऊन हतबल करणे. **जेरीस येणे** – मेटाकुटीला येणे; हैराण होणे : 'दोन्ही ठिकाणी पटवर्धन जेरीस आले होते.' – ओंकार १३६.

**जेरकडी** स्त्री. लगामाची कडी.

**जेरजप्त** वि. हस्तगत; स्वाधीन : 'पाण्यांत गड बसविले म्हणजे दर्या जेर्जप्त आहे.' – चिशिमब ८७.

**जेरजबर** स्त्री. उर्दू लिपीतील अकार व इकार दर्शक चिन्हे ; (ल.) शब्दनृशब्द : 'सुसंस्कृत आदब व पराक्रमी आत्मविश्वास यांचा प्रसन्न गंध तर या फारसी पत्राच्या जेरजबरमधून दरवळतो.' – शसौ २२.

**जेरजबर–री** वि. १. डाव्या अंगाचा जबर व उजव्या अंगाचा जेर अशा संकेताने खेळण्याचा गंजिफांचा एक खेळ. २. दुर्बळ– सबळ : 'त्यास कळों न देतां बिघाड करावा; मग जेर– जबर कोण किती तें पाहावें.' – चिशाब ८०.

**जेरजबरी** स्त्री. (चुकीने) जोरजबरी; जुलूम.

**जेरजामा** पु. कमरेखाली नेसावयाचे वस्त्र; अधोवस्त्र : 'तुझा जुना

जेरजामा.'- वज्राघात १९.

**जेरदरयाफ्त** वि. चौकशी व्हावयाचा : 'शिक्षा न झालेल्यास जेरदरयाफ्त कैदी असें लिहावें.' - के २३.६६.१९३९.

**जेरदस्त** वि. १. पहा : **जेर** १. दीन; गरजू. २. कमजोर; दुर्बल: 'तिकडून इराणाचे शाहानें जेरदस्त केलें.'- इभं २६०. ३. पहा : **जेरजबर, जेरजबरी.** ४. काबीज; जेरजप्त : 'ममताई देशपांडीण इणें तमाम प्रगणा जेरदस्त केला.' - एभा ७. [फा.]

**जेरदस्ती** स्त्री. १. विपन्नावस्था; दुर्बलता. २. गंजिफांच्या खेळातील एक संज्ञा. [फा.]

**जेरबंद** पु. घोड्याच्या पाठीवरचे जीन आवळून धरण्याचा चामडी पट्टा. या बंदाचा उपयोग जीन आवळण्यासाठी व मार देण्यासाठी ही होतो : 'प्राणी राजदंड पावत । जेरबंद चाबुक वेत।' - दास ३.७.६३.[फा.]

**जेरबार** वि. त्रस्त; हैराण: 'तेथे जाऊन व्यर्थ जेरबार व्हावें, वरकड अर्थ नाहीं.' - दिमरा १.२८७. [फा. झेबरि]

**जेरी** स्त्री. दुर्बलता; पडती; कमजोरी : 'फिरंगी यांची जेरी, श्रीमंतांची जबरी असें सोमवारचे वर्तमान आहे.'- मइसा ४.९८.

**जेरी नारळ** पहा : **जहरी नारळ**

**जेल** पु. तुरुंग; कारागार; बंदिशाळा; कैदखाना. [इं.]

**जे(जै)ल** क्रिवि. खाली दिल्याप्रमाणे (तपशील) : 'त्यावरून मौजे मजकुरास जाऊन थले नेमून दिधली तपशील जेल.' - ऐको ४५४.

**जेल** न. विद्रवाची घनस्थिती; गोठवलेला व घट्ट केलेला रस. [इं.]

**जेलर** पु. तुरुंगाधिकारी ; कारागृहावरील अधिकारी :'पुढे त्याने... जेलरची नोकरी पत्करली.'- प्रिस्मुग्रं ३५. [इं.]

**जेली** स्त्री. (रसा.) जिलॅटिनसारख्या पदार्थाच्या विद्रवापासून तयार केलेला घनसदृश पदार्थ. [इं.]

**जेवटा** पु. जेवण : 'मांडिला गोपाळी जेवटा । ग्रास घेती मटमटां ।' - कक ४.५.४. [सं. जेमन]

**जेवडे** न. म्हसरे; टोणगे.

**जेव(व्ह)ढा** वि. १. जितका मोठा; जितका. २. जितका (संख्यावाचक). ३. जो; कोणता (पुष्कळांपैकी); प्रत्येक; जो कोणी. पहा : **एवढा** [सं.यावत्]

**जेवढ्यातेवढं** क्रिवि. तितक्यापुरते : 'ओळखीपाळखीच फार झाल्यात. ते सारं आपलं जेवढ्यातेवढंच असते.'- वाकि ७२.

**जेवण** न. १. भोजन; खाणे; अन्न भक्षण करण्याची क्रिया. (क्रि. जेवणे, करणे.) २. जेवणाचे पदार्थ; वाढलेले अन्न. ३. आहार; खाण्याचे प्रमाण.[सं.जेमन](वा.) ० **अंगावर येणे** – जेवण भरपूर झाल्याने सुस्ती येणे, झोप येणे : 'ते जेवण अंगावर आल्यामुळे जरा पाठ लावण्याच्या विचारांत आहेत.'- काभिं २६.

**जेवणकार** पु. श्राद्धाच्या दिवशी पितरांच्या नावे जेवावयास बोलाविलेला मनुष्य.(कु.)

**जेवणखाण** न. अन्न; खाद्य; खाण्याचे पदार्थ.

**जेवणघर** न. १. घरातील भोजनाची जागा; स्वयंपाकघर : 'ती जेवणघरांत गेली.' - बाळमित्र. २. हॉटेल; खाणावळ. सन १८५३ साली मुंबईस हिंदूंच्या फराळाच्या दुकानास जेवणघर म्हणत असत.

**जेवणवत** न. जेवण्याच्या उपयोगाचे पान (केळी वगैरेचे).

**जेवणा, जेवणिआ** वि. उजवा (हात) : 'तो ओळगिअें जेवणिअे भुज ।'-शिव ३६०. (जेवण करण्याचा हात म्हणून उजवा). (खा.व.)

**जेवणाईत** पु. १. जेवणारा माणूस. २. पंगतीस घेतलेला आश्रित.

**जेवणावळ** स्त्री. १. मेजवानी; भोजनसमारंभ. (क्रि. करणे, घालणे.) : 'आतल्या बाजूला जेवणावळ चालली होती.' - कलंदर २४५. २. जेवणाचा खर्च. ३. (मुंबईस, जुन्या काळी) जेवणघर; खाणावळ; हॉटेल.

**जेवणावारी** क्रिवि. प्रत्यक्ष पैसे न देता जेवण देऊन काम करून घेणे.

**जेवणी** स्त्री. १. धान्य मळणारे मजूर, नोकर यांच्या मजुरीबद्दल दिलेले धान्य; शिधा : 'गावात कार्ये, प्रयोजन जाहाल्यास नारळ पानविडा जेवणी घ्यावी.'- मसाप २.१७११.

**जेवणी** स्त्री. मुख; जिवणी.

**जेवणे** अक्रि. १. खाणे; भोजन करणे. कधी कधी या क्रियापदाला कर्म असते तथापि त्याचा संबंध कर्त्याशीच असतो. उदा. मी भात जेवलो, भाकरी जेवलो. २. (ल.) फळ चाखणे; भोगणे (एखाद्या बऱ्यावाईट कृत्याचे); अनुभवणे; परिणाम भोगणे. ३. लाच घेणे.(वा.) **जेविता ठाव टाकणे** – पुढचे ताट ढकलून देणे; पानावरून उठणे. **जेवून सेवा गोड** – जेवण झाल्यानंतर मग नोकरी वगैरे बरी वाटणे. **दोहोंकडून जेवणे** – एखाद्या कामात दोन्ही पक्षांकडून पैसा खाणे. **दुसऱ्याच्या तोंडाने जेवणारा** – १. दुसऱ्याचे बोलणे ऐकून घेऊन तेच पुन्हा बोलणारा. २. स्वत:च्या मताने काही न करणारा; दुसऱ्याच्या तंत्राने वागणारा.

न. देवळातील जेवणावळ. (राजा.) [सं.जेमन]

**जेवण्या** पु. गलबतावरील जेवण करणारा.(को.)

**जेवतागण** वि. १. केवळ जेवण्याच्या कामाचा (माणूस). २. (ल.) बिनकामाचा पण खादाड (माणूस); फुकटखाऊ; भोजनभाऊ.

**जेवतेव** क्रिवि. कसेबसे; कसेतरी; काहीतरी करून : 'त्याज अलीकडे चार पांच वर्षे जेवतेव चालविलें. गतवर्षी कांही पावलें नाहीं.' - पेद २३.८२. पहा : **जेमतेम**

**जेवर** न. दागिना; अलंकार. [फा.]

**जेवा** पु. १. जेवण; खाणे; भोजन. २. उपजीविकेचे साधन. ३. जेवणाचा कोरडा शिधा, सामुग्री (धान्य, पीठ इत्यादी). ४. अन्नखर्च; भोजन; जेवणखर्च (चाकरांचा) : 'नाहीं वेठी जेवा सारा ।' - तुगा ३६०. (वा.) ० **पाडणे, साधणे, काढणे** – जबरीने जेवण मिळविणे.

**जेवित** वि. जेवणारे : 'जेवितें बैठले जैसें । रंधन करूं ।' – ज्ञा १८.४८८.

**जेवी** क्रिवि. जसे; ज्याप्रमाणे; ज्या रीतीने : 'कृतकृत्य होय तवसुत जेवि पिता अर्पितां वरीं दुहिता ।' - मोकर्ण ७.३३. [सं.यथा]

**जेवीतेवी** क्रिवि. जसे असेल तसे; चांगले किंवा वाईट; कसेबसे; हरप्रकारे : 'कल्याणार्थ सुनेनें सासूचें जेविं तेविं सोसावें ।'- मोअनु ७.१८. [सं. यथातथा]

**जेव्या** वि. जेवणाच्या वेळी हजर असणारा; भोजनभाऊ. पहा: **जेवतागण**

**जेव्हलि** क्रिवि. जेव्हा.

**जेव्हा** क्रिवि. १. ज्या वेळेस; ज्या समयी; जधी. २. ज्या अर्थी; जर; ज्या कारणास्तव. [सं.यदा]

**जेव्हाकधी** क्रिवि. कधीकाळी; केव्हातरी; एखाद्या समयी.

**जेव्हातेव्हा** क्रिवि. सदोदित; नेहमी; प्रत्येक वेळेस; सतत.

**जेसणा–ना** वि. जसा; जेवढा; जितका: 'जो तूं जेसणा जैसा । तो तूं तेसणा तैसा ।' – गीतार्णव १.३६.; 'जेसनांचे मागता । तेसनाचि दाता।' – उगी ८५.६५०. [सं.यादृश.]

**जेहनशीन, जेहननसीन** वि. विश्रुत; माहीत: 'अक्षरशः मजकूर नबाब सम्सामुद्दौला बहादूर यांसी पत्रें वाचून दाखवून जहननसीन केला.' – मइसा १.११४. [फा.]

**जेह(हे)पटी** स्त्री. मोकळे केस; वेणीची बट; झिपरी. पहा: **झेपटी, झिपटी**

**जेहाचे** सना. ज्याचे : 'अर्जुना वेदु जेहाचें मूळ ।'– राज्ञा ४.१५६.

**जेही** सना. ज्यांनी : 'जेंहीं शोधून पहिला ।'–दास १.९.१२.

**जेहुतीं तेउतीं** क्रिवि. जिकडे तिकडे : 'तैसि वक्त्रें जेहुतीं तेउतीं । तूझी देखतसें विश्वमूर्ती ।'– राज्ञा ११.२६६.

**जेहेत्ते** जे आहे ते (पुराणिक, हरिदास यांच्या तोंडी अवधारणाबोधक प्रयोग). पहा : **जे**

**जेंगट** न. १. झेंगट; तास वाजविण्याचे धातूचे घड्याळ; हातघड्याळ (काशाचे) : 'तवं जेंगटू पीटीनिलें । मध्यरात्रीचें ।' – शिव १६९. २. भिक्षेकऱ्यांची वाजविण्याची थाळी; तास : 'माथां सेंदुर दांत खाती । जेंगट हातीं सटवीचे ।' – तुगा ४१६. पहा : **जंगट** ३. एक वाद्य (विशेषत: देवळांतील): 'जेंगट मृदांग टाळ।' – दास २.७.२४. [ध्व.]

**जेंजाळ** पु. त्रास. पहा : **जंजाळ**

**जेंठमूल** न. ज्येष्ठमूळ ; एक झाड; ज्येष्ठमध : ' चिखल करीं जेंठमूल'– एहोरा ८९.

**जेंत** पु. जंतू, किडा : 'केशवनाएकांचा पन्हीवां जेंतीं भरला असे : '– लीचउ ६४.

**जॅक** पु. (भौ.) अवजड वस्तू उचलण्यासाठी वापरले जाणारे जलशक्ती व यांत्रिक शक्ती यांवर चालणारे उपकरण.

**जॅक** पु. (विअ.) एक मंडल (सर्कीट) पूर्ण करणारे साधन. याला विजेच्या तारा जोडलेल्या असतात.

**जॅकपॉट** पु. रेस, जुगार यांतील शर्यतीतून साचलेले मोठे बक्षीस : 'तो (मार्ग) म्हणजे रेसमध्ये जॅकपॉटवर पैसे लावणे हा होय.'– जॅकपॉट १०.

**जॅन्ना** क्रिवि. जेव्हा.(गो.)

**जॅम** पु. फळाच्या गरात साखर घालून, शिजवून केलेला मऊसर पदार्थ. ब्रेड पोळी याबरोबर खातात. [इं.]

**जॅर** वि. जेरीला आलेला; बेजार; त्रस्त (क्रि. होणे): 'मूल जॅर झालं होतं.' – तअं २०५.

**जॅस्पर** पु. (भूशा.) लाल, पिवळा, तपकिरी इत्यादी रंगांचा अपारदर्शक, अस्फटिकी सिलिकाचा प्रकार.

**जँ(जं) यसर** क्रिवि. जेथपर्यंत. (कु.)

**जँ(जं)यसून** क्रिवि. जेथून. (कु.)

**जै** स्त्री. भिंत व छप्पर यांमधील जागा; (काही पदार्थ ठेवण्यासाठी) भिंतीच्या शेवटावरील जागा; वळचण. पहा : **जई**

**जै** स्त्री. निजणे; झोपणे (मुलांत रूढ). (कर.) पहा : **जोजो**

**जै, जैं, जैअ** उअ. जर; ज्यापक्षी.
क्रिवि. १. जेव्हा; ज्या वेळेस. 'जैं कहीं देवें । अनुभविलें फावें ।'–ज्ञा ६.३१७. २. जेथे; जेथून. (गो.)

**जैकार** पु. जयजयकार : 'हैकार थैकार जैकार । तळप चवरें चमत्कार ।'– भाराकि ९.४४. [सं.जय + कृ]

**जैत–त्य–त्र** पु. जय : 'तैसे दृश्य जिंकतां द्रष्टे । पडिले जैताचिये कुटे ।' – अमृता ७.१५४; 'एका जैत्य एका हारी ।' – एरुस्व १३.६४. [सं.जेतृत्व, जयत्रम्]

**जैत(त्य–त्र)वादी** वि. विजयी : 'रणीं जैतवादी जाला । यादव नरेंद्र ।'–शिव १०८४.

**जैताश्री** पु. (संगीत.) जैत व श्री या दोन रागांच्या मिश्रणातून झालेला राग. पूर्वांगात जैत आणि उत्तरांगात श्री असतो.

**जैत्र** वि. जिंकणारा; जयशील.
न. १. विजय. २. श्रेष्ठत्व.

**जैदाद** स्त्री. फौजेच्या खर्चाकरिता दिलेला सरंजाम, नेमणूक, जमीन वगैरे : 'महादजीनें या नव्या फौजेच्या खर्चासाठी डिबाईनाला दुआबांतील कांहीं प्रांत जैदाद अगर सरंजामकरितां दिला.' – मशिच २२४. पहा : **जायदाद १**

**जैन** पु. १. महावीराने स्थापन केलेला भारतातील एक प्राचीन धर्म. २. जिनमतानुयायी; जैन धर्माचा माणूस.

**जैनचै (मै–सै)न** क्रि.वि. (अशिष्ट) कारणापुरते; बेताचे. २. पुष्कळ; विपुल; भरपूर.

**जैपाणणे** पहा : **जापाणणे**

**जैपाळ** पहा : **जेपाळ** : 'जैपाळाचे विषावर वेलदोडे दह्यात वाटून तीन दिवस द्यावे.' – फचि ११९१.

**जैफ, जई(य)फ** वि. म्हातारा; बुड्ढा; अशक्त. [अर.झईफ्]

**जैफी, जयफी** स्त्री. म्हातारपण: 'आ जयफी नबाबाची.'– मइसा ५.८२. [फा. झईफी]

**जैमिनी कानडा** (संगीत.) एक राग. गानसमय मध्यरात्र.

**जैयत** वि. १.जय्यत. २. तयार; सज्ज; सिद्ध. ३. हत्यारबंद. कधीकधी जैयत तयार असेही म्हणतात.

**जैय्य** वि. जिंकण्यास योग्य; जिंकण्यासारखा; वश होण्यासारखा. [सं.]

**जैऱ्ही** वि. विषारी : 'तसं वडाच्या रोपाचं तठी जेऱ्ही रोप झालं.'– बगा ६९.

**जैल** पु. मायना; सदर ; पुढचा भाग; खाली आलेला विषय. [अर. झील्]

**जैव** वि. जीवासंबंधी; प्राण्यासंबंधी. [सं.]

**जैव अनुकूलन** (जीव.) परिस्थितीशी जमवून घेण्याकरिता सजीवात होणारे बदल.

**जैव प्रतिबंधक** वि. रोगजंतू निर्माण होण्यास प्रतिबंध करणारे (औषध).

**जैव मनोविज्ञान** (मानस.) शारीरिक कारणांमुळे निर्माण झालेल्या मानसिक घटनांचा अभ्यास.

**जैवमिति–ती** स्त्री. (शाप.) सांख्यिकीय पद्धतीने जीवशास्त्रीय माहितीचा, सामग्रीचा अभ्यास करणे.

**जैवश्रेणी** स्त्री. (जीव.) एकमेकांशी संबंधित असलेल्या सजीवांची साखळी. [सं.]

**जैविक** वि. प्राणिशास्त्रासंबंधी. [सं.]

**जैविक घड्याळ** शरीरक्रिया, शरीरातील जीवरासायनिक प्रक्रिया तसेच अनेक व्यवहार यांचे नियमन करणारे शरीरातील कालबद्ध चक्र.

**जैश** न. सैन्य; फौज. [अर.]

**जैसा–सी–से** वि. ज्या प्रकारचा. पहा : **जसा, जसी, जसे** [सं.यादृश]

**जैसे थे** यथापूर्व; होते तसे : 'जैसे थे परिस्थिती ठेवणे एवढेच जणू खात्याचे काम होते.' – मीएसिशं ७४.

**जो** पुल्लिंगी संबंधी सर्वनाम ; तो या शब्दाचा पूर्वगामी शब्द. [सं.यत्]

**जो** क्रिवि. जव; ज्या वेळेस; जेव्हा. हे अव्यय कोणत्याही कृत्याचा जलद परिणाम, चापल्य, त्वरा दाखविते. या अव्ययाची जो या सर्वनामाप्रमाणेच जी आणि जे अशीही रूपे होतात. उदा. जो टोला मारला तो दोन तुकडे केले.

**जो** क्रिवि. १. जोपर्यंत; ज्या काळापर्यंत; जेथपर्यंत. २. पावेतो; पर्यंत. ३. ज्या काळी, अवधीत; ज्या क्षणी. [सं. यावत्]

**जोइ(ई)स** न. १. ज्योतिषशास्त्र. २. भाकिते; भविष्य. ३. गणित. [सं.ज्योतिष]

**जोइसी** पु. जोशी. [सं. ज्योतिषी]

**जोक** पु. माप; वजन. (झाडी)

**जोकना** क्रि. तोलणे; मोजणे. (झाडी)

**जोकने** क्रि. लागणे.(व.)

**जोकम** स्त्री. जबाबदारी. (झाडी) [हिं.]

**जोकर** पु. १. विदूषक २. पत्त्याच्या खेळातील एक चित्राचे पान. : 'सीक्वेन्स न लागल्यामुळे दोन जोकर्स असूनही.'– अंअ ७३. [इं.]

**जोकला** वि. सीमित; मोजके. (झाडी)

**जोकी** पु. माशांची एक जात; हे दिवाळीच्या सुमारास पकडतात. (को.)

**जोक्तर** स्त्री. वेश्याव्यवसाय करणारी बेरडीण.

**जोख** स्त्री. जळू (प्राणी). [सं.जलौका]

**जोख** न. १. भार; वजन : 'सहस्रखंडिकाप्रमाणे जोख ।'–मुकका १२.१९१. २. मेज; तुला; तुलना; जोखणे. (क्रि. करणे.) ३. माप; निश्चित आकार; भार : 'आला जोख उणा म्हणोनि वरुता नंदीशही ठेविला ।'– निमाक १.४३.(राजा.) ४. प्रमाण; मान. [सं.जुष्]

**जोखड** न. १. जुखड; जू; बैलाच्या मानेवरील दोन लाकडांपैकी एक; शिळवट. २. (उसाच्या) चरकाचा आडवा दांडा. याच्या एका टोकाला पाठीवर नवऱ्याचे डोके व दुसऱ्या टोकाला शेले असते किंवा ते ओढकाठीला जोडलेले असते. (को.) ३. (ल.) काळजीचे ओझे; लोढणे. ४. (ल.) अधेले, अजगर वगैरे जातीचा प्रचंड साप. [सं. यौक्तृ]

**जोखडबंद** वि. जखडलेले; बंदिस्त : 'बायकांना चांगलं जोखडबंद करून ठेवलंय.' – पुत्र २०.

**जोखण** न. मूल्यमापन; मोजमाप : 'गाण्याची जोखण करण्याचा मानदंड आहे की नाही ?'– एपिआ २१२.

**जोखणी** वि. १. जोखणारा : 'वैश्य तुला धरि वाणी । सत्य वाचा सत्य जोखणी ।' – एभा १२.८९. २. मापन; तुला.

**जोखणे** उक्रि. १. माप, वजन करणे. २.(ल.) अजमास करणे; अजमास काढणे; परीक्षा पाहणे; (पदार्थातील तत्त्वांश) तर्काने जाणणे; तुलना करणे.

अक्रि. फायदा होणे; मिळणे; पदरात पडणे. [का.जोखु][सं.जुष्]

**जोख(खी)म, जोखीव** न. स्त्री. १. धास्ती; भय; संकट. २. धोका; धोक्याचे काम; जिवावरचे काम; अचाट किंवा साहसाचे काम; परिणामाची चिंता. (क्रि उठविणे.) ३. धोका होईल असे द्रव्य, माल. ४. (क्व.) कोणत्याही कामामध्ये आलेला तोटा, कमतरता (पैशाची इत्यादी). ५. जबाबदारी; हमी. [हिं. जोखिम]

**जोखमाप** न. वजनाचे प्रमाण; वजन केल्यानंतरचे माप.

**जोखमी** वि. धोका असणारे; संकटाचे; जबाबदारीचे.

**जोखा** स्त्री. बाई; स्त्री. [सं.योषा]

**जोखी** स्त्री. सणकाडी. (राजा.)

**जोखी** वि. १. वजनी; वजनाचे. २. वजन केलेले, ठरविलेले. ३. गड्डी; जुडी : 'अंबाडीच्या चार जोख्या घेतल्या.' – गुंजा १३७.

**जोखीण** स्त्री. जळवा लावण्याचा धंदा करणारी स्त्री.

**जोखीव** वि. वजन केलेले; वजनाने ठरविलेले.

**जोख्खळ होणे** क्रि. घाबरून जाणे; भीतीने डबडबणे.

**जोग** पु. (संगीत.) दाक्षिणात्य संगीतातील एक राग. 'नाट' अथवा 'नाटे' असेही त्याला म्हटले जाते. त्याच स्वरूपाचा हिंदुस्थानी संगीतातील राग म्हणजे जोग होय.

**जोग** पु. १. संन्यास; संसारत्याग; कुटुंबपरित्यागपूर्वक वैराग्य. (क्रि. घेणे.) : 'एका पोटासाठीं जोग ।' – तुगा २४१६. २. हठयोग ; योगाभ्यास; योग; चित्तवृत्तिनिरोध ; समाधी. (क्रि. घेणे.) : 'तरी येथेंचि जोग आचरावा ।' – नभसा १७.१३२. [सं.योग] (वा.) ० **भरणे** – १. मुरळीची पाटी अन्नाने भरणे (हा पूजेचा एक प्रकार आहे). २. जोगिणीची दीक्षा देणे; जोगीण बनविणे.

**जोगकंस** पु. एक राग : 'त्यांची जोगकंसमधील ही चीज'– हुंदके ११०.

**जोगडा** पु. (निंदाव्यंजक) बैरागी; गोसावडा.

**जोगडी** स्त्री. ज्वारीची एक जात.

**जोगडीण** स्त्री. बोहारीण; सुया, दाभण, गळेसर वगैरे विकणारी स्त्री. [सं.योगिनी]

**जोगड्याचे भात** एका जातीचे भात.

**जोगणी** स्त्री. भिक्षापात्र; तुंबा. (वा.) **जोगण्या बांधणे** – मंत्रसामर्थ्याने भीती घालविणे.(व.) **जोगण्या लावणे** – भीती, दहशत घालणे. (व.)

**जोगणीमांगणी** स्त्री. अव. १. ज्येष्ठी अमावास्येच्या दिवशी शिवेवर

जाऊन करावयाच्या विधीतील दोन देवता. २. संतिणी; जोगणी. या नवरात्रामध्ये भिक्षा मागण्यास येतात.

**जोगणे** सक्रि. जोडणे; मिळणे; जुगणे. [सं.युत्]

**जोगता** पु. रेणुकेला (यल्लमा) वाहिलेले मूल : 'माझं पोर जगू – वाचू दे. मी त्याला जोगता सोडीन.'– नागीण १२९.

**जोगता, जोगा** वि. १.(काही एका क्रियेविषयी) योग्य. हा शब्द या अर्थाने सुटा येत नाही, धातूंच्या आया, आवया प्रत्ययान्त रूपास जोडून याचा प्रयोग होतो. उदा. तो पदार्थ खाण्याजोगता आहे. २. (विवक्षित पदार्थास) अनुरूप; साजेसा. जसे :– पायाजोगता जोडा, अंगाजोगता अंगरखा. [सं.योग्य]

**जोगति(ती)ण–णी** स्त्री. १.यल्लम्मा देवीला वाहिलेली मुलगी. २. जोगवा मागणारी स्त्री. ३. योगेश्वरी (यल्लमा)देवीची किंवा रेणुका मातेची भक्तीण. ४. मंत्रतंत्र जाणणारी भिकारीण, संतीण.

**जोगती** पु. १. यल्लम्मा देवीला वाहिलेला मुलगा : 'नवसाने यल्लम्मा देवीला वाहिलेल्या मुलांपैकी मुलगे जोगती बनतात आणि मुली जोगतिणी.'– मलोसंउ १०६. २.(ल.) हिंदू जातीचा हिजडा. ३. कर्नाटकातील यल्लम्मा देवीस वाहिलेला व्यभिचारोत्पन्न मनुष्य.

**जोगन्या** स्त्री. अव. ध्यास; तंद्री.(झाडी)

**जोगम्मा** स्त्री. गबाळी आणि घाणेरडी स्त्री, मुलगी; गोसाव्यासारखे केस सुटलेली आणि अंगास राख फासलेली स्त्री; माभळभटीण; हिडशी.

**जोगरुवे, जोगरुं** पु. अव. अधम, नीच योगी : 'जी जी या पींडाकारणें भवतीं जोगरुवें लुलाति : हा थोरीं कष्टीं राखिला जीः'– लीचअ २८.

**जोगलणे** उक्रि. मदत करणे; सांभाळणे; हात देणे; आधार देणे (आजारी किंवा अशक्त माणसास). (राजा.)

**जोगली** स्त्री. मातीचा लहानसा परळ, थाळी (जेवण्याची). ठाणे जिल्ह्यात जोगल्या असे पुल्लिंगी रूप आढळते : 'मातीचा मोरवा, परळ व जोगल्या असावयाचा.'– जोफुसग्रं २४०. [क.]

**जोगवटा** पु. वस्त्र; कफनी; जोग्याचे वस्त्र : 'यातेंहि एकु जोगवटा होता : परि : तो पाटसुताचा : ' – लीच १.१५.

**जोग(गा)वण–णी, जोग(गा)वणूक** स्त्री. १. निर्वाह; पोषण, गुजारा : 'प्रतिष्ठेतें अनुसरोनी । बाहीर करि जोगावणी ।' – राप २.६०९. २. निर्वाहापुरते जिन्नस : 'ही तुमची तात्पुरती जोगवणी. आपली मीठभातापुरती.' – पडघ ७.

**जोग(गा)वण–णी, जोग(गा)वणूक** स्त्री. काळजीपूर्वक संरक्षण; निगा: 'त्यांच्या जोगवणीस कसचीहि उपमा साजत नाही.' – नि ५६.

**जोग(गा)वण–णी, जोग(गा)वणूक** स्त्री. गमणे; आळस; रेंगाळणे; दीर्घसूत्रीपणा; चालढकल.

**जोगवणे** सक्रि. पोसणे; खाऊन, चरून पुष्ट होणे : 'कुणबिकीला सर्वात जास्ती ज्यांचा उपयोग ते बलुत्ये पहिल्यानें कांसेला लागतात, आणि यथेच्छ जोगवतात.'– गांवगाडा ९.

**जोग(गा)वणे** अक्रि. १.चांगल्याप्रकारे चालणे; त्रास न होता सुलभपणे निर्वाह होणे. २. बेतासबात होणे (संसार, प्रपंच). ३. भरभराट होणे; चांगले चालणे; फोफावणे; पुष्ट होणे (प्राणी, वनस्पती) : 'जोगावलों पोटीं खर । पाठी भार वरि नाहीं ।' – तुगा २३५४. ४. पुरेसे होणे; काम भागणे. ५. तृप्त असणे : 'आलोचूं जो नेणे । अनुभवचि जोगावणें ।'– ज्ञा १३.३६३. [सं.योग]

**जोग(गा)वणे** अक्रि. १. रेंगाळत काम करणे. २. चालढकल करणे.

**जोगवा, जोगेश्वरी** पु. देवीच्या नावाने पाच घरे मागितलेली भिक्षा. (क्रि. मागणे.)

**जोगविणे** सक्रि. बसविणे; व्यवस्था करणे; ठीक करणे : 'भांडी आणून जोगविती.'– पेद ३.१५. [सं.युज]

**जोग(गा)विणे** सक्रि. काळजी घेणे; चांगले पोषण करणे; बाळगणे (विशेषत: प्राणी).

अक्रि. गरिबीने पोसणे; कसातरी गुजारा करणे. १. (ल.) संपादणी करणे; पार पाडणे : 'पूजितीं दैवतें जोगावी ।'– ज्ञा १३.७९५. या क्रियापदाचे सकर्मक व अकर्मक हे अर्थ एकमेकांविरुद्ध आहेत; परंतु पहिला अर्थ अधिक प्रचारातील आहे. [सं.योग]

**जोगवेकर–री–रीण** पु. स्त्री. जोगवा मागणारा; जोगवा मागणारी.

**जोगं** वि. योग्य, उपयुक्त.

**जोगा–गी–गे** वि. योग्य; सारखा. पहा : **जोगता** : 'हा प्रसंगु असे तुजचि जोगा ।' – ज्ञा १५.६७. [सं.योग्य]

**जोगिडा** पु. खसखशीचे रोगट व पिवळे दिसणारे रोपटे.

**जोगिया** पु. (संगीत.) एक करुणरसप्रधान राग. गानसमय प्रात:काळ.

**जोगी** पु. आपल्याकडील गोंधळ्यांप्रमाणे दिल्लीकडे असणारे शाहीरी पेशाचे लोक.

**जोगी** स्त्री. एक रागिणी; आसावरीचा एक प्रकार.

**जोगी** पु. गोसावी; बैरागी; संन्यासी : 'जग जोगी जग जोगी । जागे जागे बोलती ।' – तुका ३२६. [सं.योगी]

**जोगी** पु. एक प्रकारचा साप. याच्या अंगावर मळकट पट्टे असून हा फार विषारी असतो. [सं. योगी]

**जोगी** पु. दुध्या भोपळा. (कु.) [सं.योगी]

**जोगीण** स्त्री. १. जोग्याची बायको. २. देवीची भक्तीण; जोगी झालेली स्त्री. ३. नाचणी या धान्याची एक जात.

**जोगीदंड** पु. जोगी, साधू हातात धरतात ती काठी : 'गोसावी नाथोबाची पुष्टीवरि आरोहण करुनि दोहीं श्रीकरी खांदावरि जोगीदंडु धरिला असे : '–लीचउ १५३.

**जोगे** शअ. द्वितीय पदी जोडले जाणारे अव्यय. उदा. खाण्याजोगे, पिण्याजोगे इ. : 'अळजपुर नगर बरवें असे जी : सीधसाधकांजोंगे : बरवें लाखारवन : बरवीं देउळें असति :' – लीचपू ७४.

**जोगे** न. एका जातीचे भात; जोगड्याचे भात.

**जोगेटा** पु. १. (निंदेने) जोगी; बैरागी. (को.) २. (निंदेने) जोगी नावाचा साप. (को.) [सं.योगी]

**जोग्या** पु. कुस्तीतील एक पेच. (क्रि. भरणे.)

**जोजवणे** अक्रि. आंदुळणे; डोलवणे; झोप आणणे : 'मग ती त्याला धोपटायची, जोजवायची.' – तचां ३१.

**जोजवार** पु. जबरदस्ती; सक्ती; त्रास : 'माझ्यावर एवढा जोजवार

नको.' – मस्थि १८०.

**जो(जों)जार** पु. १. धबडगा; कुटुंबाचा मोठा पसारा; व्याप (त्रासदायक व पोसण्यास कठीण): 'जोंजार प्रसवलासि बहुवसु ।'– ऋव ३२. २. (ल.) बोजा; त्रास; जंजाळ; भार; कष्ट; ओझे जसे कर्जाचा– कुटुंबाचा– घेण्यादेण्याचा इत्यादी जोजार :– 'तरी जन्मोनि जोजारु साहिजे ।' – ज्ञा ४.३४. जोजवार. (व.) ३. कटकट; त्रास; कष्ट; खटपट: 'कासया करिसी जोजार।' – दास ३.१०.४८.

**जोजार(व)णे** अक्रि. १. मोठे कुटुंब, खटला असणे; त्याच्या जबाबदारीखाली वाकून जाणे. २. त्रासणे; कष्टणे : 'प्रलयकाळीं जोजावलासि ।' – कक ७.७.१४६. [सं.जृ]

**जोजारी** वि. मोठे कुटुंब असलेला; कुटुंबभाराने त्रासलेला.

**जोजो** उद्गा. लहान मुलांना निजविताना म्हणावयाचा शब्द; अंगाई जसे :– जो जो जो जो रे कुळभूषणा, दशरथ नंदना, बाळा जो जो रे । स्त्री. लहान मुलांची निद्रा ; अंगाई. (क्रि. करणे.); निजावयास जाणे; निजणे; झोपी जाणे (लहान मुले). [ध्व.]

**जोट–ठ** पु. भरभरीत व जाड सुती कापड; पांघरावयाची खादीची पासोडी; शेल्यासारखे वस्त्र : 'एकवर्णी तंतू नानावर्णी पट । कोण्ही जोट शेले पगड्या ।' – मध्वक ५४१. [सं.जटा]

**जोट–ठ** पु. मळईची जमीन. (मावळ) [हिं. जोत]

**जोटा** पु. पोत्यात माल भरून तोंड बंद केल्यावर उलट बाजूने दुसरे पोते घालून ते शिवून तयार केलेली बंगी, पार्सल.

**जोटी–ठी, जोटी(ठी)व** वि. जोठाच्या कापडाचे केलेले (पंचा, अंगरखा इत्यादी).

**जोठ** पु. खांब आणि तुळई यांच्यामध्ये मजबुतीसाठी घातलेला लाकडी तुकडा.

**जोड** पु. स्त्री. १. दुक्कल; जोडी; जोडा; युग्म (एकाच जातीच्या दोन दोन असणाऱ्या वस्तू). जसे :– पाटली जोड, काकणे जोड इत्यादी. २. जोडी; संघ; संच; ताफा (सोंगट्या खेळणाऱ्यांचा, पूजापात्रांचा, खेळणाऱ्यांचा, वाद्यांचा, वाजविणाऱ्यांचा); डाव (पत्त्यांचा, गंजिफाचा); संच (कपडे, धोतर व अंगवस्त्र यांचा). सामान्यत: सेट. ३. ठिगळ; गावडी; साचा लावलेला तुकडा; संयोग (वस्त्र, लाकूड, धातू वगैरेस). ४. सूर लावण्यासाठी सा, रे, ग, म, प, ध, नी हे सूर खाली-वर करणे; आलाप घेणे. ५. जोडलेला या अर्थी हा शब्द फळांच्या नावांच्या मागे जोडतात. जसे :– जोडआंबा, जोडपेरू इ. ६. दुहेरी या अर्थाने जोड शब्दाचे समास होतात. जसे : – जोडकडी, जोडखांब इ. ७. वीणेच्या मधल्या दोन तारा; सतारीच्या मधल्या दोन (ज्या षड्ज स्वरात मिळविलेल्या असतात त्या) तारा. [सं.जुड्]

**जोड** स्त्री. (बांधकाम) पुस्ती; नवीन गोष्टींची किंवा कामांची वाढ. [सं.जुड्]

**जोड** स्त्री. (ओतकाम) दोन पिशव्यांचा दोन हातांनी फुंकला जाणारा भाता. [सं. जुड्]

**जोड** स्त्री. (कुस्ती) एक डाव. जोडीदाराचा एक हात त्याच्या दोन्ही पायांतून धरून आपला दुसरा हात जोंडीदाराच्या मानेवर ठेवून जोडीदाराची मान खाली दाबून पायांतून जोडीदाराचा धरलेला हात वर उचलून त्याला चीत करणे. [सं.जुड्]

**जोड** स्त्री. १. साठा; संचय; संग्रह; मिळविलेले द्रव्य. २. मिळकत; लाभ; किफायत : 'जोड जोडिली मनुष्यदेहा ऐसी ।'– तुगा ७१२. [सं.जुड्]

**जोड** स्त्री. १. मैत्री; सलगी; जिव्हाळा. २. बरोबरी; साम्य; साथ: 'धर्मासि म्हणे बागा साधो जोडा नसेचिया दिवसा ।' – मोविरा ७.१६.[सं.जुड्] (वा.) ० **करणे** – कृपा संपादणे. ० **देणे** – लाभ, फायदा देणे : 'संतपदाची जोड । दे रे हरी ।' – अमृतकसं १०८.३४. ० **नसणे** – बरोबरी न होणे; उपमा न मिळणे.

**जोड** स्त्री. गुंतवण; सांधा; संबंध; सांगड; गुंतवणूक (पशूंची, माणसांची) जोडपणा; साखळी. (क्रि. घालणे.) [सं.जुड्] (वा.) ० **करणे** – सांधणे; मिळविणे : 'पुण्याची करावया जोड, जीव हा सजला।'– विक ६९.

**जोडकरीण** वि. तुल्यबल, जोडीची (वस्तू) : 'अटकेची जोडकरीण तोफ फत्तेलष्कर होती.'– भाब ४०.

**जोडका** वि. (जोडणारा) मिळविणारा; संपादन करणारा; कमावता; मिळविता : 'जोडका पुत्र देखोनी गुणी । जनक जैसा सुखावे ।'– मुआदि ३०.२२४.

**जोडका–ता पूत, राम, रावजी** पु. १. कुटुंबातील पैसा कमावणारा मुलगा. २. लोकांची अंडीपिल्ली सरकारला सांगणारा नीच माणूस. या मार्गाने पैसा कमवणारा पुरुष.

**जोडकाम** न. १. निरनिराळे तयार केलेले भाग जोडून केलेले काम. २. जोडधंदा; मुख्य कामाखेरीज दुसरे काम.

**जोडकार** वि. जोडका. (गो.)

**जोडखीळ** स्त्री. जोडणारा दुवा : 'ते राष्ट्र सेंटो व सियाटो यांतील जोडखीळ आहे.' – सैस्वा २४२.

**जोड गहू** खपल्या गहू.

**जोडगि(गी)र–रीर** वि. १. तुकडा जोडलेला; तुकडा जोडून केलेला. २. दुहेरी; दोन वस्तू ज्यात आहेत असा; जोडाचा (खांब, किल्ल्याच्या भिंती, कौलांचे घर).

**जोडगि(गी)र–री** स्त्री. १. साथ; मदत (गवई, हरिदास यांना). २. दुहेरीपणा; दोन पदार्थांचे एकत्रीकरण. ३. जोडलेली स्थिती.

**जोडगोळी** स्त्री. १. दोन गोळ्यांचा वार. २. एका वेळी दोन गोळ्या झाडणारी बंदूक. ३. (ल.) दोन्हीकडून खटपट. ४. (ल.) जोडी; युग्म.

**जोड चौकट** दुहेरी चौकट. याचा साचा (विशेषत: दाराचा) दोन लाकडे बाह्यांना जोडून केलेला असतो.

**जोडजंतर** पु. उपाययोजना. (झाडी)

**जोडजू** न. शेलाटी (पुणे); शिळवट, जडी (नगर); शेवळ, शिवळ (सातारा); जोडणी, जुवडी. (खानदेश).

**जोडजोड** स्त्री. जंगजोड; एकी; एकात्मता : 'लाला नरसिंगदासजीचा व यांचा जोडजोड आहेच.' – ऐको ४५७.

**जोडणी** स्त्री. १. जोड; सांधा जोडणे. (जोडणे क्रियापदाचे

धातुसाधित).२. जुपी; व्यवस्था; सोय : 'त्येच्याजवळ गाडीबैलाची, मोटनाड्याची जोडणी नको का ?'– रैत ८.

**जोडणे** सक्रि. १. सांधणे; जुळविणे; संयोग करणे; एकत्र करणे (दोन तुकडे). २.मिळविणे, अधिक लावणे; जोड देणे (लांबविण्यासाठी); एकावर एक किंवा एकापुढे एक ठेवणे (दुसरा थर, अस्तर). ३. जवळ जवळ लांबीच्या पुढे, बाजूस, शेजारी ठेवणे. ४. जुंपणे; मानेवर जू ठेवणे किंवा खोगीर घालणे ( गुरे, घोडे यांच्या). ५. (ल.) जागेवर गुंतविणे; कामाला लावणे, चिकटविणे. [सं.जुड्]

**जोडणे** सक्रि. १. जमविणे; गोळा करणे; साचविणे. २. मिळविणे; संपादणे; स्वत:साठी कायम करणे, दृढ करणे; (कृपा, स्नेह, मैत्री, आश्रय, धंदा इत्यादी) : 'आम्ही जें जें जोडावें । तें समस्तीं इहीं भोगावें ।'– ज्ञा १.२१७. [सं.जुड्]

**जोडणे** सक्रि. १. पूर्ण करणे; तडीस नेणे; घडवून आणणे. २. युक्ती काढणे; तजवीज करणे; उपाय करणे. [सं.जुड्]

अक्रि. १. ताब्यात येणे; मिळणे. २. (क.) भरभराट होणे; भरमसाठ मिळणे; लग्गा साधणे. [सं.जुड्]

**जोडता** वि. मिळविता; संपादन करणारा. पहा : **जोडका**

**जोडतोड** स्त्री. समायोजन. (झाडी)

**जोडदंड** पु. (व्यायाम) कसरत करण्यासाठी दोन आडवी लाकडे बसविलेले साधन.

**जोड दुर्बीण** (स्था) दोन्ही डोळे लावून पाहण्याची लहान दुर्बीण.

**जोडधंदा** पु. मुख्य धंद्याबरोबर करता येण्यासारखा दुसरा, छोटा धंदा. उदा. शेतीबरोबर कुक्कुटपालन हा जोडधंदा : ' शेतकऱ्यास जोडधंदा बघून द्यावा.'– धरागाले १४१.

**जोडनाल** पु. तालीमखान्यातील एक साधन.

**जोडप** न. जोड; सांधा; जोडणे; जुडविणे.(राजा.)

**जोडपट्टी** स्त्री. १. (लोखंडी पाणरहाट) पोहरे एकमेकांशी अडकवून माळ करण्यासाठी प्रत्येक पोहऱ्याच्या दोन बाजूंना बसविलेल्या लोखंडी पट्ट्या. २. ( स्था.) दोन रूळ लांबीच्या बाजूने जोडण्यासाठी वापरतात ती सांधपट्टी.

**जोडपत्ता** पु. जोडीने येणारे पान; पत्त्यातील एकामागून येणारी दोन पाने : 'काय, एक्काबाशा होय कां जोडपत्ता?' – वानगी २९.

**जोडपाडे** क्रिवि. द्वंद्वाने ; भेदबुद्धीने : 'विधिनिषेध जोडपाडें। जेथ विशेष कर्म वाढे ।' – एभा ७.६७.

**जोडपी** वि. जोडीदार; सोबती; बरोबरीचा; जोडीचा; जुळणारा (सजीव, निर्जीव वस्तूंमध्ये).

स्त्री. (क.) १. जुळणी; मेळ; एकत्र जोडणे. २. जुळण्यास योग्य असणे; बरोबरी.

**जोडपे** न. १. नवराबायकोची जोडी : 'अडचणीमुळें विवाहसंबंधाने बद्ध अशी स्त्रीपुरुषांची विसंगत जोडपीं दृष्टीस पडतात.'– टिकेले ४.२. २. जुळे; एकदम जन्मलेला मुलगा व मुलगी.

**जोडफळाचा सांधा** १. (ल.) सततचा संयोग किंवा संबंध; निकटचे साहचर्य (चांगले वाईट, सुख दुःख इ.). २. निकटची दाट मैत्री; स्नेह.

**जोडबंद** पु. एकास एक चिकटवून लांबी वाढवलेला कागद.

**जोडमंडी** स्त्री. वज्रमुष्टी व्यायाम; बैठक मारून क्रमाने दोन्ही हात व दोन्ही गुडघे जमिनीवर टेकून करावयाचा व्यायाम.

**जोडमुंदी** स्त्री. जोडवे. (झाडी)

**जोडरेघ** स्त्री. विरामचिन्हातील खूण ( – ); अपसारण चिन्ह.

**जोडवे** पु. स्त्रियांनी पायाच्या अंगठ्याजवळच्या बोटात घालावयाचे चांदीचे जाड व मोठे वळे.

**जोडवज्रांगी** स्त्री. दुहेरी चिलखत : 'जोडवज्रांगिया भेदौनि । भेदताए वक्षेस्थळ '– उह १३८२.

**जोडशिवण** स्त्री. सांध्यावरील टीप.

**जोडा** पु. १. एकाच जातीच्या पदार्थाची जोडी. यापैकी दोन पदार्थ प्राय: एकत्र असतात (पायांतले जोडे, एका ताण्याची दोन धोतरे इत्यादी); विवाहित स्त्रीपुरुषांची जोडी : 'हा जन्मांचा जोडा आहे.'– मोरएल. १९ ; सजीव प्राण्याचे (नरमादीचे) जोडपे: 'हा पक्षियांचा जोडा ।' – कक १.३.८५; जानव्यांचा जोड (पाच जानवी) ; दोन सोबती : 'समाबसवंत कबीर खेळिया । जोडा बरवा मिळाला रे ।' – तुगा २४३. २. पायांतील जोड्यांपैकी एक; पैजार; पायपोस; कोणत्याही जोडीपैकी एक वस्तू; सोबती; भिडू. ३. जोडीदार; बरोबरीचा किंवा जोडीचा मनुष्य, वस्तू किंवा उदाहरण. ४. भरणी श्राद्धात आपल्या जातीचे घालावयाचे मेहूण. (कुण.ठाणे) (वा.) **कोणाचा जोडा कोणाच्या पायात नसणे** – बंडाळी, घोटाळा, अव्यवस्था असणे. ० **टाचणे** – (चांभारी) रेशीम भरण्यासाठी तजास अरीने भोक पाडणे. ० **फाडणे, झिजवणे** – एखाद्याच्या भेटीसाठी अनेक फेऱ्या किंवा खेटे घालणे.० **मारणे, जोडेपूजा करणे** – खरडपट्टी काढणे ; पाद्यपूजा करणे.

**जोडा** पु. बरोबरी; उपमा. (क्रि. नसणे.)

**जोडा** पु. भराडी गौरीच्या वेळी मुली परड्यांवर फुलांच्या पाकळ्यांची काढतात ती चित्रविचित्र आकृती. (ना.)

**जोडाई** स्त्री. जोडणावळ; निरनिराळ्या वस्तू किंवा तुकडे एकत्र जोडण्याची मजुरी. [हिं.]

**जोडाजोडी** स्त्री. जुळवाजुळव : 'करूं जोडा जोडी अक्षरांची '– तुगा १३६.

**जोडाजोडी** स्त्री. परस्परांना जोडे मारणे; भांडण; मारामारी; खेटराखेटरी.

**जोडारी** पु. यंत्राचे तयार सुटे भाग जुळविणारा कारागीर.

**जोडाक्षर** न. जोडलेले अक्षर. उदा. क्र, म्ह, स्त इत्यादी.

**जोडी** स्त्री. १. जोडा; जोडपे; युग्म (एका जातीचे); जुळे. २. संच; जोड (हरिदास, पुराणिक इत्यादीचा एक मुख्य व दुसरे मदतनीस यांसह). ३. एका वेळी फिरविण्याचे दोन मुद्गल.

**जोडी** स्त्री. बरोबरी; साम्य; तुल्यगुणत्व.

**जोडी** स्त्री. १. ठेवा; साठा; राशी; लाभ: 'गुण गाईन आवडी । हेचि माझी सर्व जोडी ।' – तुगा ११९३. २. प्राप्ती; संग्रह : 'मानसा करि तयाचिच जोडी ।' – सारुह ४.१०४.

**जोडी** स्त्री. सरकारी सारा, पट्टी. पहा : **जुडी**

**जोडी** स्त्री. प्रारब्ध; नशीब : 'तुझें कर्म असे सहज। आपली जोडी भोगावी ।' – गुच २०.२१.

**जोडीचा** वि. जोडीसंबंधी; बरोबरीचा.

**जोडीदार** पु. १. साथी, सोबती, सवंगडी. २. (समाज.) एकमेकांशी पती किंवा पत्नी या नात्याने संबंधित असलेली व्यक्ती.

**जोडीपाड** पु. मुलांचा एक स्काऊटचा खेळ.

**जोडीव** वि. तुकडे जोडून केलेले; ज्याला तुकडा जोडला आहे असे; जोडलेले; एकत्र केलेले; ठिगळ लावलेले.

**जोडे** शअ. शेजारी : 'चिकन सोपारी एकली कशी खाऊ । शीवजोडे भाऊ अंतर का देऊ ।।' – लोसाको. (अहि.)

**जोडे** न. १. विवाहित जोडपे; जोडा (स्त्री-पुरुषांचा, नरमादीचा) २. नारळांची जोडी.(को.) ३. हातापायांतील जोडवे; वळे. (राजा.)

**जोडेकरी** पु. जासुदजोडी; हरकारे : 'पत्रदर्शनी जोडेकरी दोन्ही स्थली रवाना करावे विस्तारे आपणासी ल्याहावे.' – पेद ३.२२

**जोडेजोडे** क्रिवि. बरोबर; एकमेकांच्या संगतीने. (खा.) [जोडचे द्वि.]

**जोडेपट्टी** स्त्री. जोड्यांनी मारामारी; जोडाजोडी : 'प्रसंगी जोडेपट्टी व्हायची पाळी आली तरी.' – मिरास ६३.

**जोडेफाड** स्त्री. जोडे फाटेपर्यंत फिरावे लागणे; यातायात : 'वधू-पित्याप्रमाणे त्यांना जोडेफाडही करावी लागली नाही.' – आंटा १९.

**जोढे** अ. जवळ.

**जोत** न. तलवारीचा बंद.

**जोत** स्त्री. १. ज्वाळा. २. तेज; उजेड; चकचकीतपणा; शोभा; चकचकी: 'जोत जरिपटक्याची.' – ऐपो १९१. ३. तेज; पाणी; लकाकी (रत्नांची). ४. सफाई; चकाकी (वस्त्राची). ५. पाणी (शस्त्र किंवा हत्याराचे). ६. जोर; जोम; सत्त्व; तेज; बळ; जोरकसपणा (पाऊस, ऊन, पीक, पदार्थ, मनुष्य, प्राणी, धंदा, व्यापार इ.चा). ७. प्रख्यात माणूस किंवा कडक देवस्थान; जागती ज्योत. ८. घशातील जळजळ. (क्रि. लागणे.) ९. वहिवाट हक्क. १०. कोवळी शेंग. (झाडी)[सं. ज्योति] (वा.) ० **धरणे** – तेज, शोभा, जोर, सौंदर्य संपादन करणे किंवा येणे.

**जोत** पु. घुमट वाद्यावर म्हणावयाचे एक गीत : 'एक जोत गाण्यास त्याने आरंभ केला.' – जोसह्याद्रि ६८.

**जोत** न. १. जुंपलेल्या बैलांची जोडी. (क्रि. बांधणे, लावणे, लागणे.) २. बैलांच्या जोडीने ओढलेला नांगर. उदा. जोत चालले, जोत धरले, जोत पडले, जोत सुटले : ' विश्रामने जोत धरले होते.' – शेलू ३१. ३. जुंपणी. (खा.) ४. दोन होड्यांनी समुद्रात जाऊन मासे मारतात ते जाळे. (कु.) ५. नांगरणी; लावणी. ६. बैलाच्या गळ्यास जू अडकविण्याचा पट्टा. (व.खा.) (को.) [हिं.; सं.युत]

**जोतक** न. भाकित; भविष्य : 'मज स्वप्नापासाव मृत्यु आसे : ऐसें जोतकीं आसे ' – पंचो २२.३.

**जोतकशी** वि. शेत नांगरणारा. पहा : **जॉतकशी** (गो.)

**जोतकार** वि. देवाजवळील दिवे लावणारा. (गो.)

**जोतणे** सक्रि. (बैल) जुवास जुंपणे.

**जोतदार** वि. १. तेजस्वी; चकचकीत; लखलखणारा; प्रकाशमान. २. (ल.) शहाणा; धूर्त; समर्थ; हुषार; बुद्धिमान; प्रतिभाशाली.

**जोतपात** न. नांगर, बैल वगैरे शेतकीस लागणारे सामान.

**जोतरा** पु. ओटा; देवळीपुढची बसण्याची जागा. (अहि.)

**जोताड** स्त्री. ज्योत. (ना.) (वा.) ० **लावणे** – आगलावेपणा करणे.

**जोती** पहा : **ज्योती** : 'तुमीं प्रथुवीचेआ जोती । तुमीं स्वर्गद्वारे उगडिती ।' – क्रिपु १.८६.

**जोतीक** न. ज्योतिष; ग्रहतारकादिकांच्या गतीचे शास्त्र : 'सर्वज्ञे म्हणीतलें : बाइ : जोतिकातव जाणिजे : ' – लीचपू ५५२.

**जोतीवंत** पहा : **जोतदार**

**जोते** पु. जोडा; पादत्राण : 'घोड्याबैलो बाबा माजो जोतें विसरलो.' – लोसाको. [हिं.जूता]

**जोते** न. चिरेबंदी कडा, काठ. याच्यामुळे घराची गच्ची किंवा ओटा सुरक्षित राहतो. चौथरा; गच्ची; उंच केलेली जागा; चिऱ्यांनी बांधलेला ओटा; इमारत बांधण्यापूर्वीचे चिरेबंदी काम : 'गरुडपाचूंचीं जोतीं ।' – हरिवि ३.४.१३५. [का. जत्तगि; सं. युक्त]

**जोते** न. १. जिने बैलाचा गळा जोखडाशी बांधला जातो ती दोरी किंवा पट्टा. २. जू; शेवू. [क.जत्तगि, सं. योक्त्र]

**जोतेर** न. धडुते; धोतर : 'कमरे नेसला जोतेर.' – एहोरा ९.

**जोतेक्षेत्र** न. (स्था.) इमारतीचे जोते व त्याच्या आतील भाग यांनी व्यापलेले एकूण क्षेत्र.

**जो तो** सना. १. जो कोणी; प्रत्येक जण; प्रत्येक मनुष्य; हरएक व्यक्ती : 'जो तो चेष्टवी मुला ।' – भाराबाल ९.७४. २. कोणी ; कोणी एक; कोणीतरी : 'जो तो म्हणे हा प्रचंडवीर । सांगती रावणासी बडिवार ।' – रावि २१.११४.

**जोत्या** वि. १. नांगऱ्या; नांगरणारा माणूस; जोत धरणारा गडी; शेतकरी. २. (ल.) गावंढळ; नांगऱ्या. ३. (ल.) मंदबुद्धी; ढ ; अक्षरशत्रू.

**जोधा** पु. योद्धा.

वि. १. मजबूत; धष्टपुष्ट; राकट; पहिलवानासारखा : 'ढेंसा कवणु तो जोधांचा मेळावा।' – शिव ९४४. २. उंचापुरा; ; लठ्ठ व बळकट हातापायांचा. (व.) [सं.युध]

**जोन** स्त्री. मासळीचा एक अवयव. (झाडी)

**जोन्हळा, जोनांग** पु. जोंधळा. 'विरूढलेयां जोन्हळा। कणिसाचा निर्वाळा ।' – ज्ञा १४.१२५.

**जोप-पे** न. वासरू (गाईचे, म्हशीचे). पहा : **जावपे** : 'चांगली जोपें निपजण्याकरितां रगदार जनावरे पाहिजेत.' – गांवगाडा १८१.

**जोपणे** उक्रि पोसणे; रक्षण करणे; सांभाळणे; खाऊपिऊ घालणे. [सं.गुप् = रक्षण करणे]

**जोपर्यंत, जोपावेतो** क्रिवि. जंव; ज्यावेळेपर्यंत. [सं.यावत्]

**जोपा, जोपन** स्त्री. काळजी; निगा; संगोपन; संरक्षण; जोपासना : 'जो पाहे सदसद्‌विचार हृदयीं जोपा जनाची करी ।' – रकाव्य ४.[सं.गुप्]

**जोपाणे** अक्रि. वाढणे : 'मग ते अंकुर जोपातां गुणीं पावले परिपुष्टता ।' – गीतार्णव १३.१७८.

**जोपारणे** अक्रि. उलट जबाब देणे; बेपर्वाई दाखविणे; उद्धट होणे : 'वर मलाच उलटं असं काय करतां हो म्हणून जोपारावं ?' – फानाछ १. पहा : **जापारणे**

सक्रि. झिडकारणे; तुच्छ मानणे; तिरस्कारबुद्धीने नाकारणे.

**जोपाऱ्या** वि. झोपाळू; विसरभोळा. (झाडी)

**जोपाव(स)णे** उक्रि. काळजी घेणे; निगा राखणे; संगोपन करणे; बडदास्त ठेवणे. (को.) [सं.गुप्]

**जोपाशीर–ल जोपा** पहा : **जोपासना**

**जोपासना–णी** स्त्री. निगा; बडदास्त; काळजी; लक्षपूर्वक पालनपोषण किंवा सांभाळ, संगोपन करणे; मशागत. [सं.गुप्]

**जोबन** पु. १. स्तन; उरोज; कुच; थानः 'तंग चोळी छातीवर जोबन कोवळे रसरसले ।'– होबाला ८९. २. तारुण्य; ज्वानी. [सं.यौवन]

**जोबनपट्टी** स्त्री. १. जोबन; स्तन. २. (ल.) स्त्रियांवर बसवलेला कर : 'कुलाबकर आंग्र्यांनीं तर सोनकोळ्यांच्या बायकांवर जोबनपट्टी नांवाचा कर बसविला होता.' – जोसह्याद्रि ४६५.

**जोबाळणी** स्त्री. जोपासना. पहा : **जोपाशीर, जोपा**

**जोबेदंड** वि. १. शक्तिमान; जोरदार; बळकट. २. जवानमर्द; धिप्पाड; दांडगा; गलेलठ्ठ.

**जोम** पु. १. घटमुठपणा; दार्ढ्य; घट्टपणा; शरीराच्या बांध्याचा व चेहऱ्याचा तजेला, भरदारपणा. २. शरीरातील बल; जोर; शक्ती; बळकटी (बांध्याच्या घटमुठपणामुळे). ३. दम; अवसान.[सं.यौवन; क. झोअम] ·(वा.) **जोमात असणे** – १. झोकात किंवा थाटात असणे. (माण.) २. जोरात असणे ; उत्साहयुक्त असणे.

**जोमदार** वि. १. घटमुठ : आवेशयुक्त. २. शक्तिमान; बळकट; सामर्थ्यशाली; जोरदार. ३. दमदार; अवसानयुक्त. ४. भक्कम; दृढ: 'दयानंदानी त्याला जोमदार स्वरूप दिले.' – व्यक्तिरेखा ५१.

**जोय** जवळ; पाशी.

**जोयजे** पाहिजे; हवा.(अहि.)

**जोयशी** पु. ज्योतिषी; जोशी.(कु.) [सं.ज्योतिषी]

**जोर** पु. १. जोम; शक्ती; ताकद; बळकटी. २. स्थैर्य; दार्ढ्य; गंभीरपणा; दमदारपणा; सहनशक्ती (सजीव प्राणी, वस्तू यांची). ३. वेग; शक्ती; आघात; झपाटा; गतीचा वेग (वार, बंदुकीची गोळी यांचा). ४. जुलूम; जबरदस्ती; अन्याय. ५. दाब; ताण; नेट; वजनाचा भार. ६. जोष; पूर्ण वेग; भर (रोग, पाऊस, थंडी यांचा). ७. तालमीतील एक व्यायामविशेष; दंड. (क्रि. काढणे.) ८. (यंत्रशास्त्र) प्रेरकशक्ती. ९. महत्त्व; भर : 'या गोष्टीवर गव्हर्नरसाहेबांनीं बराच जोर दिला होता.' – केले १.१९९. [फा.] (वा.) **० करणे, लावणे, जोरास येणे** – जबरदस्तीने वागणे; अडथळा करणे; शक्तीची, बलात्काराची गरज उत्पन्न करणे; तडीस नेण्यास, उरकण्यास कठीण करणे, जाणे.**० काढणे** – दंड काढणे; व्यायाम करणे : 'तू नाईलाजाने आपले जोर काढीत असतोस.' – ओंकार २४. **० चढणे** – वेग येणे; भरात येणे : 'आता लढाईला खरा जोर चढलेला दिसतो.' – लव्हाळी ६७. **० देणे** – १. पुष्टी; मदत, आधार देणे; भर देणे. २. महत्त्व देणे; विशेष उल्लेख, निर्देश करणे.

**जोर** पु. (नाविक) पूर; समुद्राची भरती (विशेषतः पौर्णिमा – अमावास्येच्या दिवशीची); उधाण.

**जोर** पु. ज्वर; ताप. [सं.ज्वर]

**जोरकस** वि. १. दंड काढणारा. २. व्यायामपटू; ताकदवान; सशक्त ३. (ल.) फायदेशीर; भरपूर उत्पन्न देणारे; प्रभावी : 'वॉशिंग्टन व बाल्टिमोर या शहरातील मुक्कामही मोठे जोरकस गेले' – वाघसिंह २१५.

**जोरगत** स्त्री. उधाण; उसाण; समुद्राची भरती (अमावास्या व पौर्णिमेची) : 'पुनवेच्या व जोरगतीच्या दिवशीं भरतीच्या वेळीं मानसेचीं दारें बंद केल्यावरसुद्धा काय बिशाद होती.'–जोसह्याद्रि ९४. (राजा.)

**जोरजबरी, जोरजुलूम** स्त्री. पु. जुलूम; जबरदस्ती : 'मला जोरजुलमाने आत बसता येण्यासारखे नव्हतेच.' – मसप्र १०८.

**जोरतलप–ब** स्त्री. १. हजर राहण्याचा तगादा. २. अन्यायपूर्वक हरण; बलात्काराने हरण : 'जोरतलबेनें ऐवज शिंदे यांनीं आणिला म्हणून वार्ता आहे.'– ऐलेसं ९.४९८४.

**जोरतलपी–बी** स्त्री. जुलूम; जबरदस्ती.

वि. १. जुलमाचे; जबरीचे; जोराचे; बळजबरीची (हजेरी, पैसा उकळणे यासंबंधी मागणी) : 'त्यापेक्षां अंमल जोरतलबीचा सुरू करावा.'– चिथोशा ७७. २. मग्रूर; अरेराव : 'कोठें जोरतलबा महाल असतील, हरामखोरांस तंबी पोहोंचवून पैसा वसूल करून देणे.' – मदवा १.११८. [फा.]

**जोरतलबीटीप, जोरतलसर** स्त्री. पत्त्यांच्या खेळातील एक संज्ञा.

**जोरदार–वान** वि. १. बळकट; सशक्त. २. परिणामकारक; प्रभावी; सामर्थ्यशाली.

**जोरपट्टी** स्त्री. दोन थरांना जोडणारी पट्टी : 'जरूर पडल्यास वरवंड्या जोरपट्टीने जोडाव्या.' –तप १३.

**जोरबळ** न. शारीरिक बल; पाशवी शक्ती; आडदांडपणा; दांडगाई; जुलूम.

**जोरबेजो(जौ)र** क्रिवि. जोरावारीने; जबरदस्तीने : 'इंग्रज घाट चढोन येन जोरबेजोर होसकट्ट्याचें ठाणें घेतलें.' – ऐलेसं ९.४४५४.

**जोरा** पु. १. अधिकार; सत्ती; जोम; सत्ता. २. जुलूम; जबरदस्ती; अन्यायाचा दंड, शिक्षा. 'आम्ही रोजगारानं घेऊ काम. जोरा नको लोकांचा.' – सीए १३३३. ३. शह; जोर : 'स्वामीचे पुण्यप्रतापें अबदालीस जोरा पोंचवून तंबी करतील.' – इमं २६०. [फा.झोर] **जोरात असणे** – झोकात असणे; भरात असणे : 'बक्षी जोरात आहेत.'– यहो ७.

**जोरावणे** अक्रि. १. (अक्षरशः व ल.) बळावणे; समर्थ, शक्तिमान, पराक्रमी, तेजस्वी होणे. २. जुलमी होणे; माजणे. ३. जोराचा होणे (वारा, पाऊस, मनोविकार, रोग). ४. वाढणे; फोफावणे : 'झाडे झुडपे जोरावली, वेली पसरू लागल्या.' – वामा १५.

**जोराव(वा)र** वि. १. जोरदार; बलवान; समर्थ : 'मालोजी जोरावर।' – मध्वक ३१४. २. जुलमी; जबरीचा; जबरदस्त.

**जोराव(वा)री, जोरावा** स्त्री. पु. १. बळजबरी; जुलूम; जबरदस्ती: 'आपणावरी जोरावरी करिताती.' – मइसा २०.४५. २. पाठपुरावा ; पाठबळ; मदत. [फा. झोरावर]

**जोरासोराना** क्रिवि. उत्साहाने (झाडी).

**जोरी** स्त्री. ज्वारी. पहा : **जोंधळा** [हिं.]

**जोरी** स्त्री. जुलूम; जबरदस्ती; पुंडावा : 'किलेकरी जोरी करितील.' – मइसा १६.३४. बळजोरी शब्दात हा शब्द येतो. [फा.]

**जोरी** वि. (बुद्धिबळाचा खेळ) पाठिंबा किंवा जोर दिलेले, देणारे (प्यादे). या डावात एका बाजूने दुसऱ्याचे जोरात असलेले मोहरे मारावयाचे नसते. [फा. झोरी=बल]

**जोरी** स्त्री. तापाची साथ.(गो.) [सं. ज्वर]

**जोरी** पु. सोन्याचे मणी, मंगळसूत्र इ. डोक्यावर घेऊन विकणारा सराफ.

**जोरू** स्त्री. स्त्री; पत्नी; बायको. [ ; फा.]

**जोल** स्त्री. जमणे; साजणे; शोभणे; जुळणे. (प्रा.)

**जोलीचा** वि. मिलापी; जुळणारा; योग्य असणारा; शोभणारा.

**जोल्ल** न. लाळेचा ओघळ. (बे.) [क. जोल्लु = लाळ]

**जोव** स्त्री. वीज. (राजा.) [सं.दिव]

**जोवणी** स्त्री. जोखडाची शिवळ, खुंटी, खीळ. (राजा.)

**जोवणे** अक्रि. वीज चमकणे. (राजा.) [सं.द्योतन]

**जोवणे** अक्रि. दाटी जमणे, होणे; घोंगावणे (माशा, मुंग्या इत्यादी). (राजा.) [सं.योजन]

**जोवर–री** क्रिवि. १. जोपर्यंत; ज्यावेळेपर्यंत. २. यावत्काल; जितका वेळपर्यंत. [सं.यावत्]

**जोवळा** पु. नामर्द; नपुंसक.

**जोवाल** स्त्री. जमीन भाजणे, टहाळे तोडणे इत्यादी शेतीची सर्व कामे करण्यासाठी अनेक शेतकऱ्यांचा जमलेला समूह; अनेक शेतकऱ्यांनी एकवट काम करणे; ताळे. पहा : **सावड** (राजा.)

**जोव्हारी** पहा : **जोहरी**

**जोश–ष–स** पु. जोम; जोर; आवेश; आवेग: 'तो कमालीचा थकला होता. उफाळणारा जोश आटोपला होता.'– चक्र ९७. [फा.जोश्]

**जोशन** न. चिलखताचा एक प्रकार.

**जोशी** पु. जनावरे विकणारी एक जात.

**जोशी–सी** पु. १. गावात पंचांग सांगणारा; भविष्य वर्तविणारा; भिक्षुकी, जोसकी करणारा ब्राह्मण (विशेषत: धंदेवाईक); ग्रामजोशी. पूर्वी ही वृत्ती असे व जोशाला गावात बलुते देण्याचीही वहिवाट असे. २. कुणब्यांतील एक जात; कुडबुडे जोशी (कुणब्यांतील). हे सहदेवी मताचे मुहूर्त, ज्योतिष जाणतात. [सं.ज्योतिषी]

**जोशी–सी** पु. बगळ्याच्या जातीतील पक्षी; कुकुडकुंभा.

**जोसकी, जोसपण–णा, जोसीक** स्त्री. पु. न. गावजोशाची वृत्ती, धंदा, वतन.

**जोसगंड** पु. जोशास निंदार्थी म्हणतात.

**जोसावणे** अक्रि. जोर धरणे; वाढीस लागणे : 'महाराष्ट्रांतील संस्था निघतात व कशाबशा टिकतात, पण त्या जोसावत नाहींत.'–नके ५१.

**जोहनळा** पु. एक तृणधान्य; जोंधळा : 'शिशुपाळ सैन्याचे जोहनळे। पीटु करेणु एकें वेळें । उखळीं वसुंधरेचां।' – शिव ९१४. [सं.यावनाल]

**जोहर** पु. न. १. अग्नी : 'जोहरीं रक्षील सर्पातें।' – मुआदि ९.७१. २. (ल.) संकट : 'मला सत्य घालील कीं जोहरीं तो ।' – किंसुच ८८. ३. लाक्षागृह : 'मागां जळत काढिलें जोहरीं ।' –ज्ञा ११.६०.

**जोह(हा–हो)री** पु. १. सराफ; जव्हेरी; जवाहिऱ्या; रत्नपरीक्षक : 'जैसा रत्नामाजी जोहारी । रत्न पारखी आपुलें ।' – मुआदि ४१.१०१. २. जुना जरतार विकत घेणारा; जरीपुरानावाला. ३. आरशा, फण्या, चरकी भांडी इत्यादी जिन्नस विकण्यासाठी दारोदार फिरणारा; अशी जात. ४. मणी, पोवळी विकणारी एक जात.(व.) [अर.]

**जोहळा–ऱ्या, जोहा–ह्या, जोहे** पहा : **जोंधळा** (ना.)

**जोहार** पु. १. निकराच्या वेळी शत्रूच्या हाती पडण्याऐवजी हिंदू स्त्रिया करीत असलेले अग्निदिव्य. रजपूत लोकांत हे विशेष प्रचलित होते. २. अग्निसात होणे : 'ऋषि जोहार जालें।'– उगी १०१. [फा.जोहर = अग्निदिव्य]

**जोहार** पु. १. नोकर लोक राजाला वंदन करताना हा शब्द 'हे वीरा' या अर्थी वापरत असत : 'रायासि जोहार करुनि उचित स्थानिं बैसविला.'– पंचतंत्र १.१६. २. महार, चांभार वगैरे आपसांत किंवा वरिष्ठांना नमस्कार करताना हा शब्द योजत असत : 'जोहार जी मायबाप जोहार।' – तुगा ३३६. [सं.जयहर]

**जोहा(ह)र** न. १. जवाहीर; रत्ने इत्यादी : 'आंगावर जोहार फार खुलले । वनीं जणू पळस तरु फुलले ।' – होबाला १३५. २. जवाहिऱ्याचा धंदा; सराफी. [अर.जोहर]

**जोहारणे** अक्रि. वंदन करणे : 'मग जाऊनि बंदीजन । जोहारिला नृपनंदन ।' – कक ६.१५.२२. [हिं. जोहारे]

**जोळ** स्त्री. जळू (प्राणी). (गो.)

**जोळक** न. माडाची बाग. (कु.)

**जोळी** स्त्री. १. आतडे. (गो.) २. नांगराला बैल जोडण्याची दोरी. (ठाणे)

**जो (ज)ळोव** पु. जळण; सर्पण. (गो.) [सं.ज्वल्]

**जोळ्क** वि. फोल (भाताचे). (बे.) [क.जोळ्कु = फोलपणा]

**जोक्षीकन** क्रिवि. फुरसतीने. (खा.)

**जोंदुर्ली** स्त्री. एक काटेरी झाड. (झाडी)

**जोंधळा** पु. एक प्रकारचे तृणधान्य; त्याचे रोप व दाणा; ज्वारी किंवा त्याचे ताट. [सं.यावनाल] (वा.) **जोंधळे उचलणे** – शपथ घेणे.

**जोंधळी** स्त्री. भुई आवळी; एक वनौषधी. हिचा काढा मधुमेहात देतात.

**जोंधळी पोत** जोंधळ्यासारखे बारीक सोन्याचे मणी असलेली, चार–पाच पदरांची, मधोमध जाळीचा मणी किंवा बेलपान असलेली पोत.

**जोंबडा** पु. १. जुमडा; गवताचा भारा, गठ्ठा; लाटा. २. (विशेषत:) शेतात टाकलेला किंवा फळझाडावर बांधलेला बिंडा (सरकारद्वाहीचे चिन्ह. यावरून शेत कापणे किंवा झाडावरची फळे तोडणे यास सरकारी मनाई आहे असे समजण्याची खूण). ३. (ल.) सैल बांधलेली शेंडी.

**जोंबाड** पहा : **झोंबट, झोंबाड**

**जोंबाळणे, जोमालणे** उक्रि. १. उत्तम रीतीने राखणे, जपणे. पहा : **जोपावणे**. २. नेहमी गोंजारणे; लाड करणे (लहान मूल इत्यादींना); नेहमी कुरवाळणे; लडिवाळपणे वागविणे किंवा सांभाळणे; पाठीवरून हात फिरविणे.

**जॉख** न. वजन. (गो.)

**जॉ(जु)ते** न. वहाण. (गो.) [हिं.जूता]

**जॉ(जु)तेकार** पु. चांभार. (गो.)

**जॉबकाम** न. छपाईचे किरकोळ काम; फुटकळ काम.

**जॉबर** पु. रोखे बाजारातील शेअर खरेदी-विक्री करणारा वर्ग; मंदीवाल्यापासून विकत घेऊन तेजीवाल्यास विकणारा वर्ग.

**जॉबर** पु. १. छपाईची किरकोळ कामे करणारा. २. गिरणीतील मुकादम.

**जॉर्जेट** न. एक प्रकारचे तलम कापड : 'निळसर रंगाचे पाचवारी जॉर्जेट ती नेसली आहे.' – खेकडा १३२.

**जॉं(जा)त** बैलास काम शिकण्याकरिता केलेला खुंटारा; जनावरास वठणीस आणण्यासाठी केलेले साधन; एखाद्या माणसाला शिक्षा देण्याची रीत. (कु.)

**जौ** क्रिवि. जोपर्यंत. [सं.यावत्]

**जौजा** स्त्री. पत्नी; स्त्री. उदा. राधा जौजे माधव = माधवाची पत्नी राधा. पहा : **जवजे** [अर.]

**जौजार** पु. त्रास; कंटाळा. पहा : **जोजार**

**जौनपुरी** पु. (संगीत.) एक राग. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर.

**जौस, जौसगी** वि. उत्तम; चांगले. पहा : **जोश** (नंद.)

**जौहर** पु. रत्न; जवाहीर.

**जौहर** पु. १. आगीची खाई : 'मागां जळत काढिलीं जौहरीं । तें तें देहासी चि भय अवधारीं ।' – राज्ञा ११.६०. २. युद्धात हार होण्याच्या प्रसंगी बायकामुलांना जाळून मारण्याची रजपुतातील एक चाल. पहा : **जोहार**

**जौळ** न. १. अभ्र; अभ्राच्छादित आकाश. (को.) २. सपाट्याचे वादळ; जोराचा वारा. याचा वेग ताशी ५० मैल असतो. (राजा.)

**जौळ** पु. समूह : 'कोंमेजे केतकी – जौळु :'– उगी ८.१८.[सं. जालम्]

**जौळी** वि. १. वादळी, तुफानी (हवा, वारा). २. वादळाचा परिणाम न होणारे; त्याला टक्कर देण्यासाठी तयार केलेले (तारू).

**ज्या** स्त्री. १. धनुष्याची दोरी. २. (भूमिती) जीवा; वर्तुळाच्या परिघातील कोणत्याही दोन बिंदूंना सांधणारी सरळ रेषा. ३. पृथ्वी. [सं.]

**ज्याजुळ** स्त्री. व्याकुळता : 'लटिकी ज्याजुळ न देखे : आणि बाळु आहे काखे ' – ऋभ ४७६.

**ज्यातप्राय** वि. जवळजवळ पूर्ण झालेले; झाल्यासारखे : 'तो हौद ज्यातप्राय आहे.' – पेद १८.१८२. [सं.जात + प्राय]

**ज्यातू** वि. ज्यादा; बदली : ' 'ज्यातू' म्हणजे कोणी कामगार गैरहजर असेल तरच ज्याला काम मिळते असा कामगार.' – श्रीनापें १२५.

**ज्यादम** न. जाजम. (गो.)

**ज्यान फाइदा** पु. तोटा, नफा. [फा.]

**ज्यानी दुष्मनी** हाडवैर : 'त्या दिवसापासून फडणीस व त्रिंबकराव यांचा इतिफाक (सख्य) व सखारामपंतासी ज्यानी दुश्मनी.'– ऐको ४६०.

**ज्यापक्षी, पेक्षा** क्रिवि. ज्या अर्थी; कारण की; अशाकरिता.

**ज्याफल** न. (ग.) ज्यापासूनचे अंकरूप फल; वर्तुलचापाचे माप; धनुफल. [सं.]

**ज्याबी(बू)द** वि. सुरक्षित; शाबूत. [अर.शाबीत]

**ज्यामिती–ती** स्त्री. (भूमिती) भूपरिमाण; भूमापन; भूमिती; पृथ्वीचे क्षेत्रफळ. [सं.]

**ज्यामितिभूषा शलाका** (स्था.) जिन्याच्या बाजूला बसवलेले नक्षीदार उभे दांडे, शलाका.

**ज्यामिती नक्षी** (स्था.) काटकोनाकृती जाळीची नक्षी; आडव्या व उभ्या पट्ट्या बांधून केलेली नक्षी.

**ज्याहां** क्रिवि. जेथे. (राजा.)

**ज्याहिल** वि. अज्ञानी; अविचारी : 'कारपरदाज (कारभारी) मनसुबेबाज व तरतुदी नाहीत केवळ ज्याहील आहेत हा दोष लागतो.' – ऐको ४६१.

**ज्याहेली** स्त्री. पहा : **जहाली**. उग्रता; रागीटपणा; कडकपणा; तिखटपणा : 'ते मल्हारराव यांचे ज्याहेलीमुळें हे खराबी ! मोटा सदमा गुजरला.'– मइसा ७. [फा.]

**ज्युदी** स्त्री. अंगरखा. (गो.)

**ज्युबिली** स्त्री. महोत्सव; आनंदोत्सव; एखाद्या गोष्टीस, संस्थेस अगर व्यक्तीस २५,५०,६० अगर अधिक वर्षे झाली म्हणजे करावयाचा उत्सव. [इं.]

**ज्यूट** पु. ताग; सण. [इं.]

**ज्यूनिपर** न. हिमालयाच्या पश्चिमेच्या कोण्ण प्रदेशात आढळणारे क्षुप.

**ज्यूरी** स्त्री. न्यायालयात निर्णयासाठी नेमलेले पंच. पहा : **जूरी**. [इं.]

**ज्येष्ठ** पु. हिंदू वर्षातील तिसरा महिना. [सं.]

**ज्येष्ठ** वि. १. वयाने मोठा; वडील; (भावंडांमध्ये) मोठा. २. उत्तम; उत्कृष्ट; श्रेष्ठ. ३. सेवेत, नोकरीत अगोदर नेमणूक झालेला. [सं.]

**ज्येष्ठता** स्त्री. (शाव्य.) नोकरीत सेवाकालानुसार मिळणारा वरचा क्रम.

**ज्येष्ठ(ष्ठी)मध** पु. एका औषधी वनस्पतीचे मूळ. हा गोड असतो. याचा अर्क खोकल्यावर देतात.

**ज्येष्ठमंगल** न. विवाह किंवा उपनयन संस्कार. [सं.]

**ज्येष्ठमूळ** न. (ग.) समीकरणातील अशी संख्या की जिचा वर्ग जास्तीत जास्त मोठा येतो : '(क्ष,य) ला अनुक्रमे ऱ्हस्व आणि ज्येष्ठमूळ (रूट) संबोधले आहे.' – कहीग ५१.

**ज्येष्ठलय** पहा : **विलंबित लय**

**ज्येष्ठवड** स्त्री. जेष्ठाचा काल; सबंध ज्येष्ठ महिना (आठवडा, पंधरवडा यांसारखा बनलेला शब्द).

**ज्येष्ठा** स्त्री. सत्तावीस नक्षत्रांपैकी अठरावे नक्षत्र. [सं.]

**ज्येष्ठाकनिष्ठा** स्त्री. १. समुद्रमंथनातून निघालेल्या दोन बहिणींपैकी वडील (ज्येष्ठा) ती अलक्ष्मी आणि धाकटी (कनिष्ठा) ती लक्ष्मी होय. काहींच्या मते फक्त लक्ष्मीच समुद्रमंथनातून निघाली. त्या वेळी तिला ज्येष्ठा म्हणत व तिचे विष्णूशी लग्न लागल्यावर तिलाच कनिष्ठा म्हणू लागले. २.वरील बहिणींच्या पूजेचा दिवस; भाद्रपद शुद्ध पक्षातील ज्येष्ठा नक्षत्राचा दिवस. [सं.]

**ज्येष्ठासन** न. लहान साडूने मोठ्या साडूस लग्नात द्यावयाचा मानपान किंवा लहान मुलीच्या लग्नप्रसंगी मोठ्या जावयास सासऱ्याकडून द्यावयाचा असतो तो मानपान; ज्येष्ठ जावयाची पूजा. [सं.]

**ज्येष्ठांश** पु. अनेक भाऊ असताना सर्वांत वडील भावास वडिलार्जित मिळकतीचा सर्वात जास्त हिस्सा मिळावयाचा हक्क.

**ज्येष्ठी** वि. ज्येष्ठ महिन्यातील (पौर्णिमा).

**ज्योत** स्त्री. स्मरणार्थ सतत पेटत ठेवलेली ज्वाला/ज्योती.

**ज्योति-ती, ज्योत** स्त्री. १. उजेड; तेज; चकाकी; प्रभा; प्रकाश. पहा: **जोत**. २. वात. ३. रूप : 'तुका म्हणे होती। तुझी माझी एक ज्योति ।' - तुगा ३७७२. ४. पाणी; तेज (रत्नाचे) : 'तैसीच हिरियाची ज्योती ।' - यक्ष २.६४०. [सं.ज्योतिस्]

**ज्योतिरूप स्वरूप** न. प्रत्यक्ष प्रकाश; स्वयंसिद्ध प्रकाश.

**ज्योतिर्मय** वि. १. तारांकित. २. तेजस्वी.

**ज्योतिर्लिं(लिं)ग** पु. शिवाचे लिंग. ही बारा आहेत : 'सत्य ज्योतिर्लिंगे बारा। प्रातःकाळीं स्मरण करा।'- भूज्या १०. पहा : **बारा ज्योतिर्लिंग**

**ज्योतिर्लोक** पु. आकाशातीत नक्षत्रलोक. [सं.]

**ज्योतिर्विद** पु. ज्योतिषी; ज्योतिषाचा जाणकार.

**ज्योतिर्विद्या** स्त्री. ज्योतिषशास्त्र.

**ज्योतिर्वैद्यक** न. ज्योतिष शास्त्राच्या आधारे रोगनिदान करणारे शास्त्र.

**ज्योतिष** न. १. ज्योतिशास्त्र; ग्रहांची गती जाणण्याची विद्या; सामुद्रिक व ग्रहज्योतिष; रमलविद्या. २. ज्योतिषाचा उद्योग व धंदा; जोशीपणाची वृत्ती; जोसकी. [सं.]

**ज्योतिषचक्र** न. नक्षत्रगोल. [सं.]

**ज्योतिषी** पु. १. आकाशातील ग्रहताऱ्यांच्या स्थितिगतींचे शास्त्र जाणणारा, संशोधक. २. फलज्योतिष सांगणारा; जोशी; गणक : 'पढोनि मुहूर्त चिंतामणी। जाला ज्योतिषी ब्राह्मण ।' - मध्वक ४३२. [सं.]

**ज्योतिष्टोम** पु. १. ज्यात सोळा ऋत्विज लागतात असा यज्ञविशेष, अग्निष्टोम. २. (निंदार्थी) मोठा डौल; जंगी तयारी असणारे काम. [सं.]

**ज्योतिष्मा** वि. तेजस्वी; तेजःपुंज; चकचकीत; सुंदर; प्रकाशमान. [सं.]

**ज्योतिःशास्त्र** न. सूर्यचंद्र, ग्रहतारे इत्यादींची स्थिती व गती यासंबंधीचे शास्त्र; खगोलशास्त्र; फलज्योतिषशास्त्र. [सं.]

**ज्योत्स्ना** स्त्री. चांदणे; चंद्रप्रकाश; कौमुदी. [सं.]

**ज्योहबेज्याह** क्रिवि. जागोजाग.

**ज्वर** पु. ताप. [सं.]

**ज्वरपाच(चा) वा** पु. ताप निघाल्यानंतर हिंडाफिरावयास लागल्यामुळे उलटलेला ताप; नजर लागल्यामुळे उलटलेला ताप.

**ज्वरमापक, ज्वरमापी** पु. ताप मोजण्याची काचेची नळी : 'ताप आहे की काय म्हणून ज्वरमापक लावून पाहिले.' - समक १२.

**ज्वरविपाक** पु. तापाचा भर; जोराचा ताप. पहा : **विपाक**. [सं.]

**ज्वरसृष्टि-ष्टी** स्त्री. तापाच्या गुंगीमुळे पडणारे स्वप्न, होणारा भास. [सं.]

**ज्वरहारी** वि. (वैद्यक) ज्वरघ्न; ज्वर नाहीसा करणारे (द्रव्य किंवा औषध). [सं.]

**ज्वरातिसार** पु. तापाबरोबरचा अतिसार; हगवण. [सं.]

**ज्वरांकुश** पु. तापावरील एक औषध. [सं.]

**ज्वरांश** पु. तापाची कसर; कणकण; तापाची लक्षणे. [सं.]

**ज्वलज्जहाल** वि.अतिजहाल; कडवा सरकारविरोधी. [सं.]

**ज्वलन** न. १. पेट; जळणे; दहन. २. विस्तव; अग्नी. ३. जळण. [सं.]

**ज्वलन तापमान** एखादा पदार्थ किंवा मिश्रण ज्या तापमानापर्यंत तापविल्यास पेट घेते ते तापमान.

**ज्वलनमूल्य** न. एक ग्रॅम वजनाच्या पदार्थाचे ज्वलन झाले असता त्यापासून बाहेर पडणाऱ्या उष्णतेच्या कॅलरी (उष्मांक).

**ज्वलनांक** पहा : **ज्वलन तापमान**

**ज्वलंत** वि. १. धगधगती; तीव्र; जबरदस्त : 'मियांच्या जीवनांतील ती एक ज्वलंत महत्त्वाकांक्षा होती.' - एल्गार ५६. २.भडका उडेल असा.

**ज्वलित** वि. १. जळत असलेले. २. जळलेले; दग्ध झालेले. [सं.]

**ज्वल्य** स्त्री. १. त्वेष; संताप; क्रोध; राग. २. भीती; धाक; भयाची प्रबळ भावना. ३. दुर्गंधी; घाण. [सं.]

**ज्वात** न. औत. पहा : **जोत** (कु.)

**ज्वान-नी, ज्वानकट्टा-ट्ठा, ज्वान मर्द-मर्दी, ज्वामर्दी, ज्वानादिवानी** पहा : **जवान** इत्यादी. : 'अंगीं तारुण्याचा बहर ज्वानिचा कहर, मारिते लहर, मदन तलवार ।' - राला ११३.

**ज्वामर्द-र्दी** पहा : **जवानमर्द, जवानमर्दी**

**ज्वार-री** स्त्री. जोंधळा.[सं.](वा.) **ज्वार-री भडकणे** - ज्वारी वाळणे. (व.)

**ज्वारी** पु. जुगार खेळणारा; जुवा खेळणारा : 'बहीरवी अवस्थान : ज्वारी उपद्रो :' -लीचपू ९२.

**ज्वारी पोत** स्त्री. ज्वारीसारख्या मण्याची पोत. (झाडी)

**ज्वालक** न. (भौ.) शेगडी किंवा ओव्हन (भट्टी) चा एक भाग. यातून ज्वाला किंवा उष्णता बाहेर दिली जाते.

**ज्वाला-ळ-ळा** स्त्री. ज्योत; जाळ; अग्निशिखा; जळत असणारा विस्तव. [सं.]

**ज्वालाग्राही** वि. जळणारे; जळण्याला योग्य; जलद पेट घेणारे. [सं.]

**ज्वालापटल** न. ज्वालांचा समुदाय; आगीचा डोंब, झोत. [सं.]

**ज्वालामाळी** पु. अग्नी. [सं.]

**ज्वालामुख** न. ज्वालामुखीचे तोंड; ज्वालामुखी पर्वतांचे कुंड.

**ज्वालामुखी** पु. पृथ्वीच्या पोटातील उष्णतेमुळे वायू व तप्तरस ज्या पर्वताच्या तोंडावाटे बाहेर पडतात तो पर्वत.

**ज्वालामुखी** स्त्री. एक देवी. हिच्या मुखातून ज्वाला निघत असते.

**ज्वालामुखी, बहिःस्त्रावी खडक** (भूशा.) भूपृष्ठातून लाव्हा रस बाहेर ओतला जाऊन तयार झालेला खडक.

**ज्वालारस** पु. ज्वालामुखीतून बाहेर पडणारा द्रव.

**ज्वाहार** न. जवाहर : 'अंगावर ज्वाहार झळके भारी'- मला १६३.

**ज्वाळी** वि. ज्वालामय : 'तिजा नेत्र ज्वाळी जातवेद' - नागा ५४४.

**ज्वाळी** स्त्री. जासुदामार्फत आलेला लेखी राजादेश : 'ज्वाळीया आलीया' - लीचपू ७४.





**झ** मराठी वर्णमालेतील चोविसावे अक्षर आणि नववे व्यंजन. याचे ज या वर्णाप्रमाणे दोन उच्चार आहेत. एक तालव्य. उदा. झिंगणे, झेब्रा व दुसरा दंतमूलीय. उदा. झटणे, झगा.

**झउल** वि. (अशिष्ट) लफंगा; थापेबाज. (ना.)

**झक–क्क** स्त्री. १. मासा. २. (ल.) वाईट गोष्ट; निंद्य कर्म. [सं.झष् = मासा] (वा.) ० **मारणे** – (अशिष्ट) १. ढोबळ चूक करणे; मूर्खाप्रमाणे वागणे. २. निंद्य कर्म, व्यभिचार इ. करणे; लोकसंप्रदायाविरुद्ध वागणे. ३. करू नये ती गोष्ट केली असे कबूल करणे किंवा कबूल करून तिच्याबद्दलचा दोष आपल्या पदरात घेणे. ० **मारीत पडणे**– निरुपयोगी, निष्फळ होऊन पडणे. (एखादी गोष्ट) ० **मारीत करणे, जाणे, देणे, येणे, झ(क्क)कत करणे, जाणे, देणे, येणे** – इच्छा नसताही नाइलाज म्हणून करणे – जाणे इ.; आपसुख करणे इ.: 'या भरवसेनें दवडिलें लुब्धा । येईल झकमारू म्हणोनि ।' – दावि ४४०. पहा : **झकत, झक मारीत राहणे** – भीक मागणे; नाइलाज म्हणून हात चोळीत बसणे; बोंबलत राहणे : 'मागें दौलत किल्ले स्वामींचे स्वामी घेतील. कर्जदार झक मारीत राहतील.'– ऐलेसं १.१७७. ० **मारून झुणका खाणे** – झक मारणे; मूर्खपणा करणे. (कर.)

**झक** स्त्री. झाक; चमक; दिपविणारा प्रकाशः 'झक पडे नयनीं । जाय निघोनि ।' – दावि १७८.

वि. झक्क; भपकेदार; चकचकीत; झगझगीत; लख्ख : 'झळकत झक झक घनदामिनी ।' – दावि ४९६. [सं.चकास्]

**झककण–कन–कर–दिनी–दिशी** क्रिवि. एकदम चमकून; तेज पाडून; लकाकत.

**झककणे** अक्रि. झळकणे; झकाकणे; चकाकणे : 'शेषफणांची आकृती । हिरेजडीत झककती ।' – हरिवि ३४.११८. [झकचे द्वि.]

**झकझक–की** स्त्री. चकाकी; तेज; चमक; लकाकी; झळक (अग्नि, तारे वगैरेची).

वि. लखलखीत; चकचकीत; प्रकाशमान; झळकणारे. [झकचे द्वि.]

**झकझक–का** क्रिवि. लखलख करीत; चकचकत; झळकत.

**झकझकणे** अक्रि. चकाकणे; झगझगणे; लखलखणे; चमकणे.

**झकझकाट** पु. लखलखाट; चकचकीतपणा; चकचकाट; अतिशय प्रकाश.

**झकझकीत** वि. चकाकणारे; तेजस्वी; झळकणारे; लखलखणारे.

**झकटणे** अक्रि. १. घसटणे; (जाताना, येताना) घासून जाणे; चाटून जाणे. २. झगडणे; भांडणे; कलह करणे. पहा: **झगडणे**

**झकडी** क्रिवि. चांगली; उत्तमः 'आकडी घालूं झकडी पैंजन फकडी । सबा म्हनी राया । आकडी घालू आमी साजनी बाया ।' – लोसाको

**झकणे** अक्रि. १. विस्मित होणे; मोहून जाणे; फसणे; दिपून जाणे; थक्क होणे; चकणे : 'येती ना द्विज केवलान्वय झके कृष्णापुढें द्वारके ।' – आसुच १८. २. मोहून, भुरळून, हुरळून,गोंधळून जाणे; चुकणे; भटकणे; मार्ग सोडून जाणे; बहकणे; फसणे : 'देखोदेखी गुरु करिती । शिष्य शिणती । गुरुची परिक्षा नेणती । झकोनि जाती ।' – दाविधा १३५.

**झक(क्क)त** क्रिवि. निरुपाय म्हणून; झकमारीत; नाइलाजाने. हा शब्द सर्व क्रियापदांचा गुण दाखवितो आणि पुरुष व वस्तू यांना लागतो : 'मी झक्त टोपली सुपे उचलली' – शेलूक ७९. [सं. झक्]

**झकपक–मग** स्त्री. १. चकाकी; झळक; चमक. २. साफसुफी; चकचकीतपणा. ३.नीटनेटकेपणा; टापटीप.

वि. साफसूफ; चकचकीत; लख्ख. [झकचे द्वि.]

**झकमक** स्त्री. चकमक; भांडण; खटका; खडाजंगी. (क्रि. झडणे.): 'झकमक सुरू झाली कीं अशा बातम्या निघायच्याच.'– सूर्यग्र २३५.

**झकलट** वि. १.विक्षिप्त २. लहरी. (झाडी)

**झकली** वि. स्वच्छंदी वृत्ती.

**झकवण–णी, झकवणूक** स्त्री. १. फसवणूक; ठकवणूक; भूलथाप. २. फसले गेल्याची स्थिती, प्रसंग.

**झकवाद** पु. १. शुष्क वाद; वितंडवाद. २. लपंडाव; फसवेगिरीचे भाषण; ठकवाद. ३. मिथ्यावाद; अहितकारी भाषण, उपदेश : 'आणीक कोणाचे झकवादीं । वावरों नेदों मानसा ।' – मुसभा १२.३४.

**झकाकणे** अक्रि. अतिशय झकझकणे; चकाकणे; लखलखणे; लकाकणे; झळकणे : 'सतेजीक तेज झकाकी लखाखी ।' – रामक १.९०. [सं.चकास्]

**झकाकी** स्त्री. चकाकी; चकचकाट; झगझगाट; तेजस्विता ; तकाकी.

**झकाकी(क)त** वि. १. चकचकीत; तेज:पुंज; सतेज. २. सफाईदार; तजेलदार.

**झकाझक–का** क्रिवि. १. धडाधड; खळखळ; झडझडा (पैसा येणे-जाणे). २. एकदम व एकसारखे; गप्पदिशी. [ध्व.]

**झकाझकी** स्त्री. १. झकाकी; भपका; पोकळ डौल : 'झकाझकी झकों नका । ठकाठकी ठकों नका ।' – दावि २०.८. २. कटकट; व्याप; भांडण: 'फुकटच्या झकाझकी पाहिजेत कशाला' – उअ १२०.

**झकाझोक** स्त्री. ऐट; नखरा; डौल; थाटमाट; नटूनथटून डौलाने जाणे. (क्रि. लावणे, मांडणे, करणे, बनून चालणे.)

**झकार** स्त्री. उष्ण हवेची लपेट. (ना.)

**झकारपटी** स्त्री. खरडपट्टी; खडसावणी; खरपूस समाचार. (गो.)

**झकास–थ** वि. १. चांगला; उत्कृष्ट; मारू. २. ऐटबाज; डौलदार. (कु.) ३. चकचकीत.

**झकू** पु. तगादा; भुणभुण; नेट : 'आफ्रिकावाल्यानं मेव्हण्याच्या मागं झकू लावल्यापासून गंप्याची धावाधाव चाललेली दिसते.' – लव्हाळी २२६.

**झकेला** पु. झुला; झोपाळा.

**झक्क** वि. १. चक्क; लख्ख; उत्कृष्ट; चकाकणारे; चांगले दिसणारे. २. पहा : **झकास**

**झक्कण–न–र–दिनी–दिशी इ. शब्द 'झक'मध्ये पहा.**

**झक्कड** स्त्री. झगडा; चकमक. [हिं.]

**झक्कड** वि. स्वच्छंदी; हेकेखोर; हट्टी; दुराग्रही.

**झक्की** वि. लहरी; छांदिष्ट. (व.ना.)

**झक्कू** पु. १. (विटीदांडूचा खेळ) एक संज्ञा; गुण (मार्क) मोजण्याचा परिमाणवाचक शब्द; एक सबंध डाव; गेम; वकट, लेंड इ. जिंकल्यावर डाव लागू होऊन एक झक्कू होतो. २. उतारीच्या रंगाचे पान नसल्यास दुसऱ्या रंगाचे पान टाकून भारी पानवाल्याला डावांतील सर्व पाने घ्यायला लावण्याची क्रिया. (कर.)

**झक्कू** पु. तगादा; नेट.

**झक्कू** पु. (अश्लील) मैथुन; स्त्रीसंग; संभोग.

**झगझग, झगझगणे, झगझगाट, झगझगीत, झगझगीत** पहा : **झकझक इ.**

**झगझग** स्त्री. दगदग; यातायात : 'प्रवासाची झगझग नाही !' – कोउ ४५.

**झगझाप** स्त्री. झडप; उडी : 'सावळ्या सुरतीवर नार टाकिते झगझाप। माझ्या ग बाळाचं अजून बाळरूप ।' – लोसाको.

**झगटणे** उक्रि. १. जोराने पकडणे; धरणे; कवटाळणे. २. जोराने पुसणे, घासणे. ३. झाडणे; झटकणे: 'हस्तीं झगटी कबरीभार ।' – नमसा २०.१८.
अक्रि. १. जोराने झोंबणे; चिकटणे; दाबणे; खेटणे; भिडणे; बिलगणे: 'ब्रह्मविद्ये झगटैली । परा चाचरैली ।' – ऋव ५९४. २. झगडणे; भांडणे; (एखाद्यावर) चालून जाणे; जोराने हल्ला करणे; तुटून पडणे; भिडणे; वाद करणे. पहा : **आदळणे** : 'मेरू मांदर झगटले । तैसे रथ अतिरथ तगटले ।' – एरुस्व ११.२४. ३. जडणे; वेधणे : 'माझ्या स्वरूपीं झगटलें मन ।' – एभा. १४.१६२. [ध्व.]

**झगडणे** अक्रि. १. भांडणे; तंटा करणे; वादविवाद करणे; हुज्जत घालणे; लढणे. २. बिलगणे; झोंबणे; झगडणे. ३. कष्टणे. [क.]

**झगडा** पु. मुलींचा एक खेळ.

**झगडा** पु. मूल्य; पैसे; किंमत : 'एका भिल्लिणीला मी झगडा भरला आहे म्हणून एक मुसलमान उचलून घेऊन गेला.' – प्रबोध ८.११.१६.

**झगडा–ड** पु. स्त्री. १. तंटा; भांडण; कलह. २. कज्जा; मुकद्दमा; खटला. ३. लढाई; युद्ध : 'तो दुःशासन राया सहदेवा बंधुसीं करी झगडा ।' – मोकर्ण ९.६. ४. (नाटक) दोन पात्रांचा संगीत वादविवाद, संवाद, छकड : 'अग म्या पुष्कळ संगीत झगडे.. संगीत छकडी पाहिल्या आहेत.' – घोटाळा ५. ५.(ल.) एकरूपता; मिश्रण: 'राजहंसापुढें । चांचूचें आगरडे । तोडी जेवीं झगडें । क्षीर नीराचें ।' – ज्ञा १४.२०७. [क. ज (झ)गळ; हिं.]

**झगडाऊ–ळू** वि. भांडखोर; भांडकुदळ; कलहप्रिय; तंटेखोर.

**झगडाझगड** स्त्री. १. भांडाभांडी (सामुदायिक, सार्वत्रिक); जोराचे भांडण, कज्जा. २. मुकद्दमा; खटला.

**झगडारगडा** पु. खडाजंगी; धडकाधडकी; गलबल्याने युक्त असे मोठे भांडण.

**झगडी** वि. स्त्री. भांडखोर; तंटेखोर; भांडकुदळ : 'वासनाबायको शेजारीण । झगडी कुटील मोठी दारुण ।' – भपसं २१.

**झगडेकार** वि. भांडणारा; तंटेखोर; कलहप्रिय. (गो.)

**झगबग** स्त्री. तळमळ; अस्वस्थता.

**झगमग** स्त्री. चकाकी; लकाकी. पहा: **झकमग** : 'दीपाचिया झगमगा । जाळील हें पतंगा ।' –ज्ञा १३.७४०.
वि. लखलखीत; चकचकीत. [झकचे द्वि.]

**झगमगणे** अक्रि. झळकणे : 'केशर कस्तुरी भाळी झगमगिताहे ।' – श्रीसप्र ४.१७.

**झगमगाट** पु. चमचमाट.

**झगमगी** स्त्री. चकाकी; तेज : 'देखोनि दीपरूप झगमगी । उपभौगबुद्धी पतंगीं ।' – एभा ८.८९.

**झगमगीत** वि. तेजस्वी; तेजःपुंज : 'त्रयोदश वर्षे रजनीत । झगमगीत होते पै ।' – पांप्र ३६.३३.

**झगरे–री** न. स्त्री. १. पेटवलेल्या गोवऱ्यांचा, रखरखीत निखाऱ्यांचा ढीग (स्वयंपाकासाठी, शेकण्यासाठी). विस्तव. २. थोडासा विस्तव असलेली तप्त राख. (चि.) ३. (सामा.) शेकोटी; आगटी : 'शेतांतून शेतकरी लोक शीतनिवारणार्थ मोठमोठ्या झगऱ्या पेटवून सभोंवतीं बसले होते.' – मौयो २१५. [ध्व.]

**झगले** न. लहान मुलांचा झगा; झबले. [हिं. झंगुली]

**झगा** पु. १. पायघोळ अंगरखा : 'पाळी येकला त्रिजगा । अंगीं पिवळा झगा ।' –मध्वक ३५. २. मागे गुंड्या असलेला व कमरेजवळ चुण्या असलेला मुलींचा गळ्यापासून पायापर्यंतचा कपडा. राजव्यवहारकोशात याला प्रतिशब्द कंचुकी असा दिला आहे. [फा. जुब्बा, जुबा]

**झगागी** स्त्री. झगी. पहा: **झकाकी**

**झगाझगा** क्रिवि. भराभर; जलद : 'ऐन ग दुपारीचा कोण येतोया झगाझगा। बंधूच्या भिगबाळीचा मोती करीतो भगाभगा ।' – लोसाको.

**झगार** न. १. पावसाची अंधारी; मळभ; आभाळ; मेघांचे अवडंबर. (क्रि. येणे, उठणे, निघणे, घालणे.) २.अभ्रपटल; ढगांचा समुदाय; मोठा ढग. ३. पावसाची सर. (क्रि.पडणे.)

**झगाळ** वि. पायघोळ; ऐसपैस: 'झगाळ, जनुं की रानीवनी ।' – मर्द ६४.

**झगी** स्त्री. मासे पकडण्याचे कुंपण. (झाडी)

**झगी** स्त्री. चकाकी; तेज; झाक; झकाकी : 'जेवीं कां शिंपीचे अंगीं। जडली रुपेपणाची झगी ।'– एभा २२.२३९.

**झगुला** पु. झबले. (झाडी)

**झजकारून** क्रिवि. स्वच्छ; सुस्पष्ट : 'नदीच्या पल्याडून हाका मारी झजकारून । माझा भाऊराया आला पार शिणगारून ।' – लोसाको.

**झझणा** पु. पंखा; विंझणा. (व.) [सं.वीजन]

**झझन** पु. पंखा. (व.)

**झट** न. लचांड; लोढणे; लिगाड; खेकटे; झेंगट; उपद्रव; उपाधी (मनुष्य, प्रसंग, स्थिती याकडे उपयोग). इतर अर्थी पहा : **लचांड** : 'मध्वनाथ म्हणे आलें होतें झट । परसरामभट दबावीलें ।' – मध्वक ७६.
स्त्री. न. १. आघात; धक्का; धुसणी; ठोका; हिसका; प्रहार. (क्रि. लागणे.) : 'आदळतां मोहाचीं झटें । ज्याचा बोध कदा न पालटे ।' – एभा २५.३३२. २. ठेच; ठोकर. (व.) (वा.) ० **घेणे** – बालंट रचणे; विनाकारण आरोप करणे. ० **लागणे** – १. झळ पोचणे; शब्द लागणे. २. ब्याद मागे लागणे; ससेमिरा, लचांड पाठीशी लागणे : 'कीं भितां मज एका उद्धरितां लागतील फार झटें ।'– मोसंशय ४५. ० **लावणे** – १. कंटाळा येईपर्यंत गप्पा मारणे. २. तगादा करणे.

**झट, झटसा** क्रिवि. लौकर; त्वरेने; जलदीने; झटकन; चुटकीसरशी ; 'तेव्हां भीम उठोनी गेला बाहेर तूर्ण झटसा रे ।' – कीत १.१८. [सं.झटिति]

**झटक** स्त्री. १. चटदिशी जाऊन परत येणे; फेरफटका; फेरा; ये जा. (क्रि. मारणे.) २. झटका; झटकारा; फटकारा; तडाखा. (क्रि. मारणे.): 'हांसे देखोनि मातें झटक उठवितां काय सांगूं कपाळा ।' – आकृ २९. [ध्व.] (वा.) **झटकझुटक करणे** – रागाने बोलणे; डाफरणे : 'वामननं सूर्याला आणखी थोडं झटकझुटक केलं.'– बाविबु २७१.

**झटकणे** अक्रि. १.सटकणे; झडाडणे; झटकन निसटणे. २. (एखाद्यापासून) विभक्त होणे; निराळे राहणे; संबंध तोडून वागणे; तुटक वागणे. ( या अर्थी हे क्रियापद सामान्यत: फटकणे या क्रियापदाला जोडून येते. उदा. झटकून फटकून राहणे, असणे.)

**झटकणे, झटकाविणे** उक्रि. १. झाडणे (वस्त्र). २. वस्त्राने झाडून टाकणे; फटकारा मारून, हिसडा देऊन झाडणे. ३. (धान्य, अग्नी इत्यादींवर) वारा घालणे; फोल, कोंडा इ. निघेल असे करणे; पाखडणे. ४. पंखा इत्यादीने वारा घालून अग्नी प्रज्वलित करणे. ५.हिसडणे; हिसडा देणे; झटका देणे; झाडणे (हात, पाय इ.).

**झटकन– र–दिनी–शी** क्रिवि. लौकर; जलदीने; त्वरेने; चटकन; लगबग. [का. द (ध)क्कने]

**झटका, झटकारा** पु. १. (वेदनेचा, दु:खाचा) आवेग; कळ; लहर; आचका; तिडीक; चमक; करक. २. एखाद्या व्याधीने पछाडल्याची अवस्था. ३.(काठी इ.चा) तडाखा; फटकारा; रट्टा; आघात. ४. हिसका; हिसडा (हाताने, पायाने मारलेला): 'हातानें मारिन झटका ।' – मसंगी ४७. ५. (शस्त्राचा) झपाटा; फटकारा; फेर; मंडळ. ६. वस्त्राच्या शेवटाचा फटका; फटकारा. (क्रि. मारणे, देणे, बसणे.) ७. (वाऱ्याचा) वेग; झपाटा; सपाटा; सोसाटा. ८. (राग, वारा, संताप इत्यादिकांचा), फणकारा; झणकारा. ९. झपाटा (भूत, पिशाच इत्यादिकांचा). १०. झोका; पाय मागेपुढे होणे (नृत्यातील). ११. (हाताचा, शरीराचा) हेलकावा; हेलावा; झोक; झोल. १२. (धान्य इ. सुपात घालून किंवा पंख्याने) फटकण्याची क्रिया; झडपण; पाखडणे. (क्रि. देणे.) १३. (एखादा पदार्थ दुसऱ्यावर आदळल्याने लागलेला) धक्का; ढुसणी; आघात (पडताना लागलेला); ठोका; मार. (क्रि. लागणे.) १४. (उन्हाची) झळ; तिरीप. १५. (रोग, जरीमरी, साथ इत्यादिकांचा) घाला; सपाटा; धाड (ताप, पित्तविकार याचा). १६. (पिकांवर पडणारा) तांबेरा, मेकाडा. १७. (व्यापारांतील) तोटा; धक्का; ठोकर. (क्रि. लागणे, बसणे, मारणे.) [ध्व.] (वा.) ० **देणे** – हिसका दाखवणे: 'जमले तर त्यांनाही एक झटका द्यावा असा विचार.' – गार ९.

**झटका** पु. बकरे एका झटक्यात मारण्याची पद्धती.

**झटका** पु. एका घोड्याची, कमी उंचीची छकडेवजा गाडी.– (तंजा.)

**झटकाखटका** पु. छोटीमोठी कुरबुर, भांडण : 'हे संरक्षक युद्ध पेशवाईतहि झटक्याखटक्यानें चालूच होते.'– मसासंअभा ४४३.

**झटकाफटका** पु. १. सर्व अर्थी पहा : **झटका**. २. (पावसाची) जोराची झड; झडी; वादळी पाऊस. ३. जोराचा सपाटा; दाब; जोर; झोल; तडाखा. ४. तगादा; नेट; लकडा (कामाचा, धंद्याचा).

**झटकाफटकी** क्रिवि. त्वरित; वेळ न घालवता; तडकाफडकी : 'संपहि केले. पण ते झटकाफटकी संपवावे असा सूर असे.' – पऐको २१०.

**झटकारणे** उक्रि. १. झटकणे; झाडणे. २. हिसडणे; ओढणे. ३. झिडकारणे; तिरस्कारणे; धिक्कारणे.

**झटकावणे** उक्रि. पहा : **झटकणे** : 'तें आपलें ऊर पाण्यांत बुडवून तीं भिजलेली पिसें धुळीवर झटकावतें.' – मसपु २५.

**झट की पट** ताबडतोब; क्षणार्धात : 'तर आकाशात उडणाऱ्या पक्षाच्या छाटा तुम्ही झट की पट मोजून दाखवू शकाल.' – वासुनाका १६५.

**झटक्यापटक्यात** क्रिवि. एका झटक्यात; क्षणार्धात; झट्दिशी; झटक्यासरशी.

**झटक्यासरशी–सा** क्रिवि. १. फटक्यासरशी; फटकारा लागताच; तडाखा बसताच. २. एका हिसक्यासरशी; एकदम ओढताच. ३. एका उडीसरशी, उसळीसरशी, उसळीसरसा. ४. जोराने; चपलतेने; झटकन. ५. (रागाच्या, संतापाच्या) फणक्याने; फणकाऱ्याने; झणकाऱ्याने. ६. एका आचक्यात; एकदम; एकाएकी (प्राण जाणे, मरून पडणे).

**झट(टा)झट–टा, झटाटा** क्रिवि. पहा : **झटकन.** चपलतेने; एका क्षणात; झटक्यासरशी; पटपट : 'चला झटझटा वोसंडुनि वाट । पंढरी मूळ पीठ दूरी आहे ।' – बबागा ४५८. [झट द्वि.]

**झटझडून** क्रिवि. खोदून खोदून.

**झटझोंबट** न. (व्यापक) १. तंटेबखेडे; भांडाभांडी; भांडणतंटे. २. अडचणी; विघ्ने; खेकटी; लचांडे; पेच; पंचाइती.

**झटणे** अक्रि. १. (एखाद्या गोष्टीविषयी) नेटाचा प्रयत्न करणे; आटोकाट यत्न करणे; मनापासून श्रम घेणे: 'धराया रायाचे भट झटत येतांचि जवळी ।' – मोकृष्ण ६२.३४. २. (लढाईत, भांडणात एखाद्याच्या अंगाशी) भिडणे; झोंबणे; लगट करणे; तुटून पडणे : 'तो गज गदाप्रहारें धृष्टद्युम्नें झटोनि लोळविला ।' – मोशल्य ३.३७. [सं.झट्]

**झटनारी** क्रिवि. चटकन. (झाडी)

**झटपट** स्त्री. त्वरा; घाई; जलदी; चपळाई; चलाखी (कामाची). (क्रि. घेणे, खाणे, धरणे, करणे).
क्रिवि. चपकर; झटदिशी; चटकन; तडकाफडकी; लौकर. [ध्व.]

**झटपट** पहा : **झटापट** : 'झटपट क्षणोक्षणी जवळ येऊ लागली.' – फकिरा ७७.

**झटपटणे** अक्रि. धडपडणे; प्रयत्न करणे.

**झटपट्या** वि. चलाख; चपळ; झपाट्याने काम करणारा.

**झटपेट** न. स्पिरीट; चटकन पेटणारे तेल.

**झटा** पु. लगट; ऐक्य. (वा.) ० **लागणे** – उपद्रव होणे.

**झटा** पु. झटापट. पहा : **झुंज, झट** : 'बोलके पहिलवान कळकटे। तयासीच घ्यावे झटे ।' – दास १९.९.१९. [सं.झट्]

**झटाटणे** अक्रि. लागणे; चिकटणे : 'लोखंड परिसा झटाटलें जेव्हां ।' – बबागा ४४६.

**झटाटा** क्रिवि. झटपट : 'झटाटा तुझं सगळं आवरून घे.'– रैत २२.

**झटाडकन्** अ. चटकन; लवकर.

**झटापट–टी** स्त्री. १.भांडण; कलह; रागाचा वादविवाद; झटपट; झोंबाझोंबी. (क्रि.उडणे, झडणे, लावणे, होणे, लागणे, करणे.) २. घोटाळा; घाई; गोंधळ; धावदौड; धांदल. ३. स्पर्धा; अहमहमिका. [ध्व.]

**झटाळ** न. झट; झेंगट; लचांड. पहा : **झट**

**झटा(ट्या)ळ–ळी** वि. १.नाना तऱ्हेच्या युक्त्या, हिकमती, कल्पना लढविणारा; युक्तिबाज; मसलत्या. २. कर्जबाजारीपणामुळे अनेक लचांडे मागे असलेला; पेचात सापडलेला. ३. झोंट; झोंड; निर्लज्ज; अप्रामाणिक. ४. गळधट; चिकट; चिवट.(व.)

**झटा(ट्या)ळी** स्त्री. झटाळ माणसाची वृत्ती, धंदा; झटाळपणा.

**झटितिप्रत्यय** वि. (सास.) ताबडतोब येणारा अनुभव; चटकन येणारा कलात्मक अनुभव. [सं.]

**झटीझोंबी** स्त्री. परिश्रम; खटपट : 'गाडीसंगं झट्याझोंब्या खाऊन दुसरं चाक बसविलं.' – गोतावळा ३१.

**झटू** क्रिवि. झटकन; ताबडतोब : 'सकाळी उठूईनी आधी बाहेर गेले झटू । बया मालन ग माझी तुळशी घाली खेटू ।' – लोसाको.

**झटे** न. अव. १. ढोसणी; ओढाताण; झोंबी; झुंज. पहा : **झट** : 'वसवीतीं कपाटें । डोंगरां देइजेति झटे' ।' – ऋव ७९. २. (ल.) ऐक्य; एकरूपता : 'तंव महाभूतांची जवनिक फिटे । मग दोहींसि होय झटें ।' – ज्ञा ६.३०६. (वा.) ० **खाणे, घेणे** – झोंबणे; झटणे; झगडणे, टक्कर देणे : 'त्यांच्या तोंडावर गणेशपंत व भापकर सात आठ हजार फौजेनसी राहून झटे खात आहेत.'– ऐको ४६२.

**झटे** स्त्री. १.ठेच. २. दुमणी. ३.धडक.

**झटेपटे, झट्टेपट्टे** न. अव. अटापीट; उरस्फोड; दगदग; आटाआट; यातायात. (क्रि. खाणे, घेणे, सापडणे.)

**झटेल–ली** वि. वात्रटपणाच्या, खोडकरपणाच्या गोष्टी करण्यात पटाईत; पूर्ण हिकमती; त्रासदायक; उत्पाती. पहा: **झटा(ट्या)ळ**

**झट्टी** स्त्री. १. नाटकाची तालीम. २. परवचा; उजळणी. (गो.)

**झट्टीमिट्टी** स्त्री. चिकाटी. (वा.) ० **खेळणे** – मनगटे धरून झोंबाझोंबी करणे.

**झट् मावशी** वि. खोटा आरोप करणारी; खाष्ट.

**झड** स्त्री. १. पावसाची एकसारखी वृष्टी; झिंबड; पर्जन्याचा संतत वर्षाव; त्यावरून. २. (ल.) एखाद्या वस्तूचा सारखा वर्षाव. (क्रि. लागणे, बसणे.) : 'भीमावरि न गणुनि शरवृष्टीची झड करी करी लगट ।'– मोद्रोण २.४६. ३. जोराच्या पावसाचे उडणारे तुषार; वावझड; शिंट. ४.(ल.) पावसाचे तुषार आत येऊ नयेत म्हणून दार, खिडकी, पागोळ्या इत्यादिकांवर बसविलेले झडप, तट्ट्या, पाखाटी, छप्पर, हाथरी; सुपारीच्या झाडाची चुडते.

**झड** स्त्री. १. (घार, गिधाड इ. हिंस्र प्राण्यांची) झडप; झपेट; झाप. २. (ल.) धाव; उडी; (एखादी वस्तू मिळावी म्हणून) उत्कंठेने घातलेली उडी; झेप: 'झडकरी झड घाली धांव पंचानना रे ।' – करूणा. ३. एखाद्या वस्तूवर एकाच वेळी अनेकांची प्रवृत्ती; कल. (क्रि. घालणे, करणे, पडणे, लागणे.) ४. (एकामागून एक येणाऱ्या गोष्टींची, माणसांची) माळका; परंपरा. (क्रि. लागणे, पडणे.) [ध्व.]

**झड** स्त्री. लाट : 'झड सरली हिवाची.' –जलोसा ८४५.

**झड** स्त्री. १. (डोक्याचे केस, झाडांचा मोहोर, पाने इ. एकसारखे) गळणे; पड. २. (ल.) (शरीराची क्षय इ. ने होणारी) झीज; क्षय; क्षय रोग. (क्रि. घालणे, लागणे, पडणे.)

**झड** स्त्री. त्वरा; जलदी; घाई : 'पांचाळ देशूं लंघौनीं । पातलासे झड वरौनि ।' – शिव २३६. [सं.झटिति]

**झड** स्त्री. १. थंडी. २. झडप.

**झड** स्त्री. झुंज; लगट; झोंबाझोंबी; हल्ला : 'ज्याच्या शरीरबळाचें कोड । एकला लक्षांवरी दे झड ।' – एभा १७.१३९.[सं.झट्] (वा.) ० **जाणे** – रागे भरणे : 'तुम्हीं स्वदस्तुरें पत्र लिहिलें, त्यांत लोक् न आले, त्यामुळें फारच शरमी (श्रमी) व आम्हावरहि झड गेला. ऐशास आमचा उपाय काय?' – ऐलेसं ११६. ० **येणे** – लोभीपणाने मागे लागणे: 'तो गुरू नव्हे भिकारी। झडे आला।' – दास ५.२.२०. **झड्या घेणे** – अंगलटीस येणे; झोंबणे; झटणे : 'तो दांडगेश्वर कितीतरी दिवस त्यांच्याशी झड्या घेई.' – डोह १८.

**झड** स्त्री. पिशाच्चबाधा. (गो.)

**झडकणे** पहा : **झटकणे** सर्व अर्थी. विशेषतः झाडणे क्रियापदाच्या पुढे योजतात. उदा. झाडून झडकून ठेव (धान्य, विस्तव, घर इ.).

**झडकणे** अक्रि. भांडण होणे : 'सुरेशनं पण पोलिसाला अस्सल शिव्या दिल्या. त्यांची चांगलीच झडकली'– कोसला १८१.

**झडकणे** क्रि. एकदम जाणे. [सं.संटक्]

**झडकन–कर–दिनी–दिशी** पहा : **झटकन** इ.

**झडकर, झडके** क्रिवि. झपाट्याने. पहा : **झडकन** [सं.झटिति]

**झडकरी, झडकरून** क्रिवि. लौकर; झटकन; जलदीने; त्वरेने : 'ते वेळीं अर्जुन म्हणतसे देवा । आतां झडकरी रथु पेलावा ।'– ज्ञा १.१६९.

**झडका** वि. क्षीण झालेला; रोडावलेला; झडलेला (शरीर, पाने).

**झडका** पु. झटका; घाव; आघात; जोर : 'रोहितकर पाटलास प्याद्यानें निरापराधें तरवारीचे झडके मारिले,'– ऐको ४६३.(व.)

**झडका** पु. नोक; झोक; ऐट. (व.)

**झडकारणे, झडकाविणे** पहा : **झिडकारणे**

**झडकी** क्रिवि. सत्वर; वेगाने : 'बनियेचा राउळा आणिली झडकी' – नरुस्व ४४.३८८.

**झडक्यानं** अ. जोराने.

**झडगे** न. भाताची एक जात.(कर.)

**झडझजिणे** क्रि. वेगाने वाहणे, येणे.

**झडझड–डा** क्रिवि. १. जलदीने; झरझर; घाईने; लगबगीने. पहा: **झटझट–टा**. २. धडधड, झडझड असा आवाज होऊन: 'वायो झडझडा वाजे ।' – दास १३.९.३६ [सं.झटिति]

**झडझडणे** अक्रि. १. (एखाद्याच्या अंगावर) वसकन् येणे; वसवसा करणे; तिडतिडणे; खिसखिसणे (वर–शी– अंगावर या शब्दांबरोबर प्रयोग).

२. (एखाद्या कामावर) तुटून पडणे; झपाट्याने लागणे. ३. झपाटणे. [ध्व.]

**झडझडाट** पु. १. जोराने वाहणाऱ्या वाऱ्याचा आवाज, वेग, सोसाटा: 'झडझडाटें सुटला वारा ।' – मुआदि २६.८१. २. घोष; गर्जना. ३. (ल.) अस्तित्वाची मोठ्याने जाणीव करून देणे : 'मार्जी वेदांचा पाला दाट । तो करी सुविद्येचा झडझडाट ।' – ज्ञा १५.१९२. [ध्व.]

**झडझडाडणे** अक्रि. झड झड वाहणे.

**झडझडीत** वि. रोडावलेला; हडकलेला : 'झडझडीत झालेला नाना हंबरत होता.' – रानगंगा १३.

**झडझडीत–झडून** क्रिवि. १. अर्थाला अधिक जोर आणण्याकरिता झाडणे या क्रियापदापूर्वी योजतात. उदा. खोली झडझडीत, झडझडून झाड. २. जलदीने; त्वरेने. पहा : **झडकरी** (क्रि. बोलणे, चालणे, पळणे, धावणे, देणे, मारणे, करणे इ.). ३. निश्चयपूर्वक; तावातावाने: 'असे मर्ढेकर झडझडून सांगतातही..' – मक १९. [ध्व.]

**झडझडीत–झडून** क्रिवि. झिडकारून; झाडून: 'सोडुनि सूत सुयोधनपक्षातें झडझडोनि बा । निघ रे ।' – मोउद्यो ११.१५. [ध्व.]

**झडझडौनि** क्रिवि. झटकून टाकून; त्वरित.

**झडझड्या** वि. १. (एखाद्यावर) वसवस करणारा; अंगावर येणारा; तिडतिड्या; शिडशिड्या. २. जोराने, धडाक्याने काम करणारा; कामावर तुटून पडणारा; झटझटून कामास लागणारा.

**झडझोंबट** पहा : **झटझोंबट**

**झडणी, झडणूक** स्त्री. झडण्याची, गळण्याची, गळून पडण्याची क्रिया.

**झडणे** अक्रि. १. (चौघडा, झांज इ. वाद्ये जोराने) वाजणे : 'झडे चौघडा अंबेचे पुढें' – पाळणे ६. २. (बंदुका इ.) उडणे; धडाडणे. ३. (सैन्याचा किंवा नोकरीचा) पगार ठरल्या वेळी महिन्याच्या महिन्यास मिळणे; भराभर, एकसारखा पैसा घेण्याचा क्रम सुरू असणे; अखंड पैसा मिळत असणे. [सं.झट्]

**झडणे–ने** अक्रि. १. (डोक्याचे केस, शरीराचे अवयव, फळे, पाने इ.) एकसारखे गळणे; गळून पडणे; तुटून पडणे: 'हे हातपाय झडून जावोत.' – नामगा ८३. २. झिजणे; क्षीण होणे; रोडावत जाणे. ३.(रंग, चित्रे, लेखन इ.) निस्तेज, फिके होणे. ४. (ल.) अंग चोरणे; अंग संकुचित करणे : 'कागद झडताहि झडावें । नलगेचि अक्षर ।' – दास १९.१.११. ५. तुटणे; छिन्न होणे; नाश पावणे ; (इमारत, छप्पर, व्यवस्था, संस्था इ.) मोडणे; ढासळणे. [का. जरि; ध्व.]

**झडणे** अक्रि. आवाज करणे. [सं.सम् + ह्रद्]

**झडणे** अक्रि. सतत चालू असणे. [सं.सं+टक्]

**झडतपडत** क्रिवि. (प्र.) पडतझडत. १. सांडतसांडत; गळतगळत; टपकतटपकत; झरझरत (गवत, पाने, वाळू, राख इ. नेत असताना). २. धडपडत; कष्टाने; ठेचाळत; मोठ्या दुःखाने; कसेतरी.

**झडती** स्त्री. पहा: **झाडा.** १. (कायदा) (सामानांची, घरांतील कागदपत्रांची– पोलीस अधिकाऱ्याने केलेली) बारीक तपासणी; झाडा; धुंडाळा. (क्रि. घेणे.) : 'झडत्यांचं सत्र चालू होतं.' – अहीबिवा ७. २. (एखादी वस्तू सापडण्याकरिता केलेला) शोध; तपास; धुंडाळा. ३. सैन्यगणना. ४. (घरातील जंगम मिळकत, उत्पन्नाच्या बाबी इ.) मोजदाद; गणना; गणती; हिशेबाची तपशीलवार यादी किंवा तपासणी : 'झडती चिरंजीव राजश्री माधवराव नीलकंठ यांचें लग्न.' – भाव्रै १०.३.१६. ५.(सामा.) हिशोब; झाडा; उलगडा : 'जाणों स्वाऽधर्माची देती येथेंचि वीर ते झडती ।'– मोकर्ण ३३.४३. ६. ताळा. (गो.) ७. खेड्याच्या मुलकी उत्पन्नाचा व खर्चाचा हिशोब; सदर हिशोबाचा तलाठ्याजवळ असणारा तक्ता. ८. गणित; उजळणी : 'झडतीची तर मी एकोत्रीपर्यंत मजल गांठली होती.' – कुंजवि मार्च १९२७. (कु.) [सं.सद्]

**झडती** स्त्री. १. दंडारीतील एक काव्य प्रकार. २. पोळ्याच्या दिवशी गाण्याचा दोहा. (झाडी)

**झडती** स्त्री. (पैसा, अन्नादी पदार्थ इ.) फडशा; फन्ना. (क्रि. लावणे, देणे.)

**झडती** स्त्री. १. नाटकातील भूमिकेच्या भाषणाचे लिखाण. २. उठावणी; भूमिका घेतल्याप्रमाणे वागणे. (व.)

**झडती** क्रिवि. लौकर; त्वरेने; झपाट्याने : 'नाना नीद धराया हातीं । घेऊनि उठिला झडती ।' – अमृता ७.७५. [सं.झटिति]

**झडन** पु. झडलेले भाताचे लोंब. (झाडी)

**झडप** स्त्री. न. १. दाराची, खिडकीची फळी, तावदान; कवाड; आडोसा. २.(फोटोग्राफी) पडदा.

**झडप** स्त्री. पावसाचे उडणारे तुषार. (झाडी)

**झडप** स्त्री. झेप; झाप; उडी; उड्डाण; धाव; पकड. (क्रि. घालणे.) [हिं.]

**झडप** स्त्री. (भौ.) फोटो काढावयाच्या कॅमेऱ्याचा एक भाग, फोटो काढतेवेळी ही झडप थोडा वेळ उघडी ठेवतात.

**झडप** स्त्री. झटपट; त्वरा.

**झडपड** स्त्री. पहा : **तडफड.** जोराची धडपड; झटापट.

**झडपड** पहा: **झटपट**

**झडपडा** पु. पहा : **झडप.** पकड; पटकावणे; हिसडा. (क्रि. घालणे.)

**झडपड्या** वि. १. धडपड्या. २.चपळ; तरतरीत; झपाट्याने काम करणारा.

**झडपण** न. १. झडपण्याचे, वारा घालण्याचे साधन; पंखा. २. झाकण; आच्छादन; ढाकण; खिडकीची फळी; झडपा.

**झडपण–णा** स्त्री. १. भूतबाधा; बाहेरवसा; झपाटणे : 'कशी गत करूं ह्या बाळाला झाली झडपणा । घेईना थान गे बाई कांहीं केल्या समजेना ।' – सला ३. २. एकाएकी तापाने पछाडणे.

**झडपणी** स्त्री. १. वारा घालण्याची, झडपण्याची क्रिया. २. वारा घालण्याचे साधन; पंखा. पहा : **झडपणे.** ३. देव, भूत, सटवी इ. बाधा. पहा : **झडपणा** : 'येकी सांगति वो जालि झडपणी ।' – निगा ७७. ४. झडप; झपेट; झाप : 'सोसिल गरुडाची काय झडपणी चिमणी ।' – मोमौसल १.४७.

**झडपणे** न. वारा घालण्याचे साधन; पाखडण्याचे साधन; पंखा; सूप.

**झडपणे** उक्रि. फडफडावणे.

**झडपणे** सक्रि. १. धान्य, विस्तव यावर वारा घालणे; वारवणे. २.(भूत, पिशाच्च, देवता इ.) पछाडणे; झपाटणे: 'भूतें झडपोन मारिती ।' – दास

१.१०.५९. ३. झोडपणे; मारणे. पहा: **झोडपणे** : 'झडपीती वारुवांचे मोहाळें ।' – उह १७२३. ४. पकडणे; धरणे : 'गरुड जसा गगनांतुनि वेगें उतरोनि पन्नगा झडपी ।' – मोकर्ण ४५.११. [सं.सम् + क्षिप्] अक्रि. झडप घालणे; (पक्षी इ.) उडी घालणे : 'तो करींचा पिंड झडपोनी । घारीनें नेला अकस्मात ।' – रावि ३.१८७.

**झडपणे** अक्रि. थांबणे (पाऊस).

**झडपणे** अक्रि. १. धडपड करणे; हातपाय झाडणे : 'चाप उरीं दडपे झडपे मग आननपंक्ति धरे रचली ।' – वासीस्व ११. २. झडणे; धास्ती घेणे; दडपून जाणे : 'बागुलभेणें काळ झडपे । कीं अंधारचक्रीं रवि हारपे ।'–जैअ ७८.१४. ३. जोराने हलवणे : 'दावणीतली गाय तणावून जागी होई आणि वाजीबाबांनी टाकलेली पेंडी कान झडपीत खाऊ लागे.' – हपा १०२.

**झडपदार** न. झटक्याने बंद होणारे दार; ढकलून उघडले जाणारे व सोडल्याबरोबर बंद होणारे दार : 'वेटिंगरूमच्या झडपदाराचा आवाज झाला.' – स्मृचापा ४६.

**झडपपंखा** पु. नोकरांनी वारा घालण्याचा मोठा पंखा : 'भरगच्ची लोडगाशा लाविणे, झडपपंखा हजर ठेवणे.' – ऐरापुविवि ४४.

**झडपा** पु. १. (पेटी इ.) झाकण. २. कारव्या, बांबूच्या काठ्या इ.ने बनविलेले (बगीचा इ.चे) दार, झापा, झोपा, ताटी, काटक : 'झडपा वाजला.'–जैरेजै ५५. ३.बांबूच्या चटईचा पंखा.

**झडपा** पु. ठोसा.

**झडपाझडपी** स्त्री. १. वारा घालणे; वारवणे. २. (ल.) झोंबाझोंबी; धक्काबुक्की.

**झडपिणे** अक्रि. पछाडणे; झपाटणे : 'जाणता म्हणे जनातें । तुम्हांस मृत कैसें झडपितें ।...निर्विष म्हणे ।।'– दास ९.८.५३.

**झडपी–पे** स्त्री. न. ताटी; फाटक. पहा : **झडपा**

**झडपीव** वि. वारा घातलेले; वारवलेले.

**झडप्पी** स्त्री. निरसन; सोडवणूक; फेडणे.

**झडप्या** पु. खेडूत : 'नागपूरजवळील चांदा आणि भंडारा या दोन जिल्ह्यांना आजदेखील 'झाडी' हे नाव आहे आणि तेथील खेडुताला 'झडप्या' असे म्हणतात.' – मजीस्थि १०. (चांदा)

**झड(डि)वारा** पु. १. पावसाची संतत धार व वारा : 'पावो झाडी तरि मागां खांबीं लागे : झडेवारेन पीटे :' – लीचपू ४९०.२. जोराचा सोसाट्याचा वादळी वारा.

**झडविणे** अक्रि. भांडण लावणे; तोडणे.

**झडा** स्त्री. त्वरा; घाई; जलदी. पहा : **झड.** (वा.) ० **घालणे** – झडप घालणे : 'तंव तीं अवघीं सावध जालीं...झडा घालिती ।।' – दास ३.५.७. ० **मारणे** – प्रयत्न करणे.

**झडाका** पु. (काठी, पदर, पाऊस, वारा यांचा) जलद तडाखा, रट्टा, प्रहार. (क्रि. लागणे.). या शब्दाचा झपाटा व धडाका या शब्दांच्या अर्थींही कचित उपयोग होतो.

**झडाझड–डा–डी,झडाझडाड, झडाडा** क्रिवि. लौकर लौकर; झटपट; जलदीने : 'अशुद्धाचे महापुर वाहती शिरें उडालीं झडाझडी ।' – ऐपो १३४. [झड द्वि.]

**झडाड** पु. १. (वारा, पाऊस इ.चा ) जोर; सोसाटा; झपाटा; धडाका : 'प्रळयवायूचेनि झडाडें। आकाश निजस्वभावें नुडे ।' – एभा ११.४१२. २. (पंखांचा) फडाफडाट; जोराची फडफड : 'ज्याच्या पाखांचा झडाड । उन्मळी सुदृढ भववृक्षा ।' – एभा २१.२.

**झडाड** स्त्री. वृष्टी; वर्षाव.

**झडाडणे** अक्रि. १. (एखाद्या उद्योगास) तावातावाने, रागाने लागणे; जोराने, उत्सुकतेने लागणे. २. उत्साहाने पुढे चालणे, सुरू ठेवणे. ३. (वारा) सोंसों करीत वाहणे. झडझड आवाज करीत वाहणे: 'झडाडी तो वारा झडकत नभामाजि वितुळे ।' – दावि २२७.

**झडाडणे** अक्रि. झोडपणे.

**झडाडी** स्त्री. पहा : **झडाड** पु. १.

क्रिवि. सोसाट्याचा, फार जोराचा; झंझावातासारखा : 'वायु झडाडी सुटला व वातचक्राकारितां धुळोरा उठला.' –मइसा १.२३.

**झडाडे** क्रिवि. जोराने; झडाडून : 'झडाडें सूटला प्रळयवारा ।' – मुआदि ५६२.

**झडात** क्रिवि. झडाडत; झडझड आवाज करीत : 'बहुत वात झडात झडाडितो ।' – दावि ८६.

**झडातावा** पहा : **झरातावा**

**झडिती** क्रिवि. लौकर; झटकन; जलदीने. [सं.झटिति]

**झडी** स्त्री. पावसाची संततधार.

**झडी** स्त्री. १. क्षयरोग; झुरणी; रेंगाळत राहणारा, क्षीण करणारा रोग: 'झडी पडलें मी कमळण भ्रमरा केव्हां भोग देसी ।' – होबाला १७५. २. (झाडे इत्यादिकांच्या पानांची) गळती; जीर्ण होऊन गळून पडणे : 'वृक्षासि होय पानझडी ।' – एभा ३.१५५.

**झडी** स्त्री. १. उडी; झडप : 'तुका म्हणे आतां झडी घालूं पाहें । पांडुरंगे माये तुझे पायीं ।' – तुगा १६११. २. पावसापासून रक्षण करणारे दार; खिडक्या इत्यादिकांवरील झडपण, तट्टी इ. : 'तेथे झड्या पंखे वगैरे असल्याने उन्हाचा त्रास...' – मापु ९४.

**झडी** स्त्री. १. घाई; त्वरा. २. उत्साह; उमेद : 'ओढीना न झडी धरूनि तुळवी कोणी न तोली बरा ।'– आसीस्व ५०. [सं.झटिति]

**झडीब(बा)दली** पावसाची संतत धार, झड : 'कटक जवळ करावे. नाहींतर झडीबदली लागल्यास उठणेंच कठीण होईल.'– नाग १.११०.

**झडून** क्रिवि. कसून; मन:पूर्वक : 'झांज... तुणतुणे धरणाऱ्याच्या जोडीचा दुसरा सुरत्या झडून वाजवीत असतो.' – मलोत ५६.

**झड्या** वि. (रोगाने) क्षीण होत जाणारा; खंगणारा; क्षयी. (शिवीसारखा याचा उपयोग करतात) : 'मेल्या झड्या.'– रोआज्यू ८७.

**झड्यापड्या** स्त्री.अव. झोकांड्या; झुकांड्या; पायांचा थरकाप.(क्रि. देणे, खाणे, जाणे.)

**झणकन–कर–दिनी–दिशी** क्रिवि. १.झणझण, सणसण, सूं सूं करीत (बंदुकीची गोळी, गोफणीचा दगड इ. जाणे). २. झट्कन; झटदिशी; झटक्यासरशी; खट्कन. [ध्व. झण]

**झणकवायू** पु. घोड्याच्या पायाला होणारा एक रोग. याने घोडा चालत

असताना त्याच्या पायात शिणका मारते. - अश्वप. २.१११.

**झणका, झणकार-रा** पु. १. झणकारा; (विंचू इत्यादिकांच्या दंशाने होणारा) सणका; सणसण; चुणचूण; तीव्र वेदना. (क्रि. लागणे, सुटणे, वाटणे.) २. (राग, संताप इत्यादी मनोविकारांचा) झटका; झणकारा; उद्रेक; लहर. (क्रि. येणे.) : 'प्रेमाच्या झणक्यांत हंसाबाई म्हणाली.' - स्वप ४८. ३. झणझण असा आवाज; छनछनाट; झणत्कार : 'नाण्याच्या झणक्यानं नाचणारी भुतं दारिद्र्याच्या मंत्रानं दूर होतात.' - सगु ९२. ४. झपाटा; चपळाई, वेग (बोलण्याचा, काम करण्याचा). [ध्व.झण]

**झणकार-रा** पु. १. टणत्कार; झणत्कार; झणझण असा आवाज; सणाटा; सणसणाट. २. झटका; फटकारा; झटकारा. ३. (बोलण्याची, काम करण्याची) चपळाई; हुशारी; झपाटा; वेग. ४. (मनोविकारांचा ) उद्रेक; फणकारा; लहर. (क्रि. येणे.) ५. (विंचू इत्यादी कीटकांच्या दंशाने होणारा) सणकारा; शिणका; चुणचूण; झणका. (क्रि. मारणे.) [सं. झणत्कार, झंकार]

**झणकारा** पु. टोमणा : 'आमचे सारे... माईसाहेबांनी ऐकून वर येऊन हा झणकारा मारला.' - पलकोघे २७०.

**झणकी** स्त्री. १. (आघाताने, तडाख्याने कानात, हातांस इत्यादी होणारी) झणझणी, भणभण. २. चुणचूण; दाह; तीव्र वेदना (नांगी मारल्यामुळे). ३.(अतिशय तिखट पदार्थ खाल्ल्याने होणारी जिभेची, तोंडाची) आग; दाह; झणझण. (क्रि. मारणे, उडणे, निघणे.) वरील अर्थी झणक्या (अव.) हे रूप जास्त प्रचारात आहे. [ध्व. झण]

**झणझण** स्त्री. १. वारा झोंबणे. २. पहा : **झणझणी** (गो.)

**झणझण-णा** क्रिवि. १. झणझण असा आवाज होऊन; झंकार करीत. २. जलद; लौकर. ३. फणकाऱ्याने. [ध्व.]

**झणझणणे** अक्रि. १. झणझण आवाज करणे; खणखणणे; ठणठणणे; घणघणणे (टाळ वगैरेंनी); झंकार करणे. २. (मोठा आवाज, आघात इत्यादिकांनी डोके, हात, कान इत्यादी अवयव) झणक्याने युक्त होणे; भणभणणे; शिवशिवणे; धमकणे; ठणकणे : 'चापगुण झणत्कारें दिग्वारण मस्तकेंहि झणझणवी।' - मोकर्ण ४८.५१. ३. (तिखट इत्यादी पदार्थांनी तोंडाला, जिभेला) झोंबणे; आग होणे; भडका होणे. ४. (विंचू इत्यादिकांच्या दंशाने) सणका मारणे; चुणचुणणे; फुणफुणणे.

**झणझणाट** पु. १. (वाद्यांचा) झणझण असा मोठा आवाज; (शस्त्रांचा) खणखणाट; घणघणाट; ठणठणाट. २. (आघाताने शरीरावयवांत होणारा) भडका; आग. ३.(विंचू इत्यादींच्या दंशाने होणारी)तीव्र चुणचुण; शिणका.

**झणझणी-ण** स्त्री. पहा : **झणकी** (क्रि. येणे, सुटणे, लागणे, उठणे.)

**झणझणीत** वि. १. फार तिखट; तोंडाला झोंबणारा; अतिशय मसालेदार; चरचरीत; खमंग. (पदार्थ, जेवण इत्यादी). २.(ल.) चुरचुरीत; झोंबणारी : 'एवढी माहिती झणझणीत बातमी लिहिण्यासाठी त्याला पुरेशी होती.' - अक्षर ४८.

**झणत्कार** पु. (नूपुरे, घागऱ्या, वाळे इ. चा) झणझणाट; झणझण किंवा छुमछुम असा आवाज. [सं.]

**झणत्कारणे** अक्रि. झणत्कार करणे.

**झणफण** स्त्री. उडणे; उड्डाण. (कर.)

**झणाझण-णां** क्रिवि. एकसारखा झणझण, खणखण असा आवाज होऊन. [ध्व.]

**झणाटा** पु. १. (दगड इ. चा तशाच वस्तूंवर आदळून होणारा) मोठा व आवाजयुक्त ठोका, टोला, तडाखा. (क्रि. बसणे, मारणे.) २. बाण, बंदुकीची गोळी इत्यादिकांचा) गोंगावत, सूं सूं करीत लागलेला तडाखा. (क्रि. लागणे, बसणे.) ३. विंचवाच्या दंशाचा झणकारा. (क्रि. मारणे, बसणे, होणे, वाटणे.) ४. (उन्हाची) झळ; तिरीप. (क्रि. लागणे, बसणे.) ५. (मनोविकारांचा) उद्रेक; उमाळा. (क्रि. येणे.) ६. (सढळपणे) अवजडपणा; मोठेपणा; विस्तीर्णता; अवाढव्यपणा; अतिरेक; आधिक्य (आकार, संख्या, परिमाण, गुण इत्यादिकांचा. उदा. उन्हाचा झणाटा, वाऱ्याचा झणाटा, थंडीचा झणाटा); समासातही उपयोग होतो. तसेच विशेषण व क्रियाविशेषणासारखाही उपयोग होतो. उदा. झणाटा साप, झणाटी म्हैस, झणाटा पाऊस इत्यादी. [ध्व. झण]

**झणाण** पु. १.अतिशय मोठा, झणझण, घणघण असा आवाज. २.(बाण इ.चा ) झणझण असा आवाज : 'बाण झणाण खणाणित भाली होताहे भडिमार।' -दावि ३३४. ३. पहा : **झणकी** [ध्व.झण]

**झणाणणे** अक्रि. १.(घाट, वीणा इ. वाद्यांचा) झणझण असा आवाज होणे : 'वीणेच्या सगळ्याच तारा झणाणल्या.' - राकाघाका २४५. २. (फोडणी इ.चा) झणझण, चुरचुर आवाज होणे; झणझणणे.

**झणाणा** क्रिवि. एकसारख्या झणझण, अशा मोठ्या आवाजाने; घणघणा; खणाणा; ठणाणा. [ध्व.]

**झणी-णे** उअ. कदाचित; न जाणो; नाही तर; निषेधार्थी अव्यय: 'तें देखोनि आदिपुरुष विस्मितु । म्हणें झणें होय पां अंतु।' - ज्ञा १.१५९. [सं.क्षणे]

**झणी-णे** क्रिवि. लौकर; त्वरित; जलदीने: 'कीं जीव देहाचें धरणें। मज पातां सुटे झणें ।' -ऋव ६५. [सं.क्षणे]

**झणे** क्रिवि. अचानक.

**झणे** अ. १. कदाचित; जर. २. क्रियापदाला जोडून निषेधार्थी उपयोग करतात : 'म्हणोनि अझुनी अर्जुना । झणें चित्त देसी या हीना।'-ज्ञा २.१७.

**झणे** क्रिवि. निश्चयेकरून; खरोखर; नि:संशय; खात्रीने : 'केलां कर्मीं देयावें । तें झणें मज होआवें ।' - माज्ञा १८.१९१.

**झनक** हनु; हनुवटी.

**झनका** पु. आग; अग्नी.

**झनकारा** पु. १. आच. २. धक्का. ३. राग. (झाडी)

**झनझनें** क्रिवि. झणत्कार करीत.

**झननन** उद्गा. (मंजुळ वाद्ये, घुंगरू, पैंजण यांचा) झणझण असा आवाज : 'झनन्न झांनन झनत्कारी ।' - राला ३९. [ध्व.]

**झनाट्या** वि. फार मोठा; दांडगा (वाघ, विंचू, साप इत्यादी). पहा : **झणाटा ६** : 'तो मठ्ठ पण झनाट्या बाप होता.' - सूर्योदय ४.

**झनानणे** अक्रि. झणझणणे; झणाणणे. (व.) [ध्व. झण]

**झनाना** पहा : **जनानखाना, जनाना** [फा.झनान]

**झनापन** स्त्री. झटापट : 'झनापन उडनार म्हनत्यात.' – टारफुला २६.

**झनापनी** स्त्री. झटापट; झोंबी; हाणामारी : 'त्या टायमाला त्येच्याबरोबर झनापनी झाली ती, त्येची ती खूण !'– चिताक १४७.

**झने** क्रियापदाला जोडून नकारार्थी उपयोग : 'मी तुमचा धाकुला बंदु । झने वदु करा ।।'– क्रिपु ११.२३.

**झन्गा** पु. कुड.

**झन्नाट्या** वि. जोराचा; सुसाट, सोसाट्याचा : 'वारा आलारे झन्नाट्या झाडं झुडपं डोलली ।'– बबागा ४३.

**झन्नावणे–ने** सक्रि. झणझण होण्याइतके जोराने मारणे; भडकावणे.

**झपकन–कर–दिनी–दिशी** क्रिवि. झटकन; चटकन; लौकर; त्वरेने. पहा : **झपझप**

**झपकवने** क्रि. मारणे.

**झपका** पहा : **झुपका, झुमका**

**झपका** पु. डुलकी; गाढ झोप: 'त्याला झोपेचा झपका लागला होता.' – जैरेजै ८४.

**झपकी** स्त्री. झोपेची डुलकी. (झाडी) [हिं.]

**झपके** वि. झुपकेदार : 'झाड झपकं फूल टपकं।' –मसाप ४.४.२५२.

**झपकेबाज** वि. झोकदार : 'आजींनी झपकेबाज नथ घालून.'– हेतोप्रबो १६.

**झपझप** भरभर चालण्याचा पायांचा आवाज.

**झप(पा)झप–पा** क्रिवि. भरभर; झपाट्याने. पहा : **झटकन, झपकन** : 'सर्व गोष्टी त्याला झपाझप समजत असत.'– कोकि ७२८. [सं.सम्+क्षिप्]

**झपटणे** सक्रि. धरणे; हल्ला करणे. [सं.सं + पत्]

**झपडझपड** क्रिवि.घाईघाई, लगबगीने.

**झपणे** अक्रि. दबणे. (व.)

**झपताल** पु. (संगीत) चर्मवाद्यातील (तबला, पखवाज इ. तील) एक ताल : 'झपताल हा दहा मात्रांचा ताल.' – संहिता १८८.

**झपाटणे** सक्रि. १. (एखादी गोष्ट, काम) त्वरेने तडकाफडकी करून टाकणे, उरकणे, जलद संपादणे. २. गट्ट करणे; बकाबका खाणे; खाऊन फस्त करणे. ३. (भूत, पिशाच इ.नी) पछाडणे. [ध्व.]

**झपाटा** पु. १. सपाटा; जोर; वेग; तडाखा; आवेश; घाई (यात कौशल्याचा अंतर्भाव होतो). उदा. चालण्याचा झपाटा, लिहिण्याचा झपाटा, २. (शस्त्र, पदर इत्यादिकांनी लागणारा) जोराचा तडाखा, घाव, फटका. ३. जोर; आवेग; तीव्रता. उदा. तापाचा झपाटा, वाऱ्याचा झपाटा, उन्हाचा झपाटा, जरीमरीचा झपाटा, साथीचा झपाटा. ४. (पशु, पक्षी इत्यादिकांनी भक्ष्यावर घातलेली) झडप; झपेट. ५. अतिशयितता; अधिक्य. उदा. हाताचा झपाटा, बोलण्याचा झपाटा, चालण्याचा झपाटा, खाण्याचा झपाटा. ६. फटकारा. उदा. पदराचा झपाटा. ७. किरकोळ लढाई; चकमक.[ध्व.] (वा.) (एखाद्याच्या) **झपाट्यात सापडणे** – कचाटीत, तावडीत सापडणे.

**झपाटा** पु. सपाटा; जोर; वेग: 'नवसाहित्याचा आजचा झपाटा.' – नकावा ९८.

**झपाटेबंद** क्रिवि. वेगाने; झटपट : 'त्यांचे वितरण झपाटेबंद कसें होईल.' – निअसा ६०.

**झपाट्या** वि. १. चपळाईने काम करणारा; कामाचा उरक असलेला. पहा : **झपाटा**. २. फार मोठा.

**झपाडणे** सक्रि. निजविणे; झोपविणे. (खा.)

**झपाडी** वि. अतिशय मोठी. (को.)

**झपाण** न.डोंगराळ, अडचणीच्या प्रदेशातील प्रवासाचे साधन; डोली: 'रघुनाथरावांनीं त्या देशाचे रिवाजाप्रमाणें स्वतः बसण्याकरितां एक झपाण केलें.'– तीप्र ३३. [हिं.झंपान]

**झपापा** क्रिवि. घाईने; त्वरेने. [झप द्वि.]

**झपु(पू)र्झा** उद्गा. मुलींच्या खेळात 'जा पोरी जा' हे शब्द असताना होणारा ध्वनी, शब्द. हा शब्द कवी केशवसुत यांनी अत्यानंदाच्या सीमेचा वाचक या अर्थी रूढ केला : 'झपूर्झा ! गडे झपुर्झा !' – केक १०६.

**झपेट–टी** स्त्री. १. (हिंस्र पक्ष्याची) झडप; झाप; उडी. २.(ल.) पिशाच्चबाधा. [हिं. झपाटा]

**झपे(पा)टणे** पहा : **झोडणे**

**झबक** न. झुबका; झुमका.

**झबगोंदा** पु. नक्षीदार काम.

**झबले** न. लहान मुलांचे एक विशेष प्रकारचे अंगडे. हे अर्ध्या मांड्यांपर्यंत लांब असते. पहा : **झगले** [अर.जुब्बा; फा.जुबा, झुबा]

**झ(झु)बा–ब्बा** पु. झगा; मोठा, पायघोळ सदरा; कुडता (नेहरूशर्ट सारखा) : 'थंडीच्या दिवसात ते फ्लॅनेलच्या बंड्या व काश्मिरी भरतकाम केलेले झब्बेही वापरीत.'– बहुरूपी ८. [फा. झुबा]

**झब्बी** स्त्री. नरसाळे; गळणी.

**झब्बू** पु. १. घमेंडखोर मनुष्य. २. शिष्ट समजला जाणारा, लब्धप्रतिष्ठित माणूस. [सिं. झबू]

**झब्बू** पु. (पत्त्यांचा खेळ) एक खेळ. त्या खेळातील मारणी : 'खेळतोस तरी काय? झब्बू?' – अहिल्या १११.

**झब्बूपणा** पु. घमेंडखोरी ; शिष्टपणा : '... पांढरपेशी झब्बूपणाही तिच्या अंगी नव्हता.' – धाधो ८५.

**झब्बूशाही** स्त्री. पुंडशाही; जोरा; जुलूम : 'या बोलण्याने लांडग्याची झब्बूशाही उघडी पडून नवा नियम साफ निकालात निघाला.' – इसाप ३७.

**झमकणे** अक्रि. १. चमकणे; झळकणे; चकाकणे; प्रकाशणे : 'कुंडलें तळपती नीळ । वरी जडिले झमकती ।' –दास १.२.१४. २.(ल.) शोभणे: 'बारा हजार घोडा पुण्यांत कडकडीत । ह्याशिवाय झमकती पागा नाहीं गणित ।'– ऐपो १३०. ३. झणझण असा आवाज करणे; झणत्कार करणे : 'विणें ताळेंघोळें झमकत गुणी दोषदहनीं ।' – दावि २२२. [हिं. झमक]

**झमकणे** अक्रि. १. भांडण जुंपणे; चकमक उडणे. (व.) २. विस्तव पेटणे. (झाडी) [हिं. झमक]

**झमकाझमकी** स्त्री. झटापट; मारामारी : 'चार शहाण्यांनीं आवरला

म्हणून, नाहीं तर तिथंच व्हायची झमकाझमकी.'– पडघ १९२.

**झमझम–मा** क्रिवि. १. (घुंगरांचा, घागऱ्यांचा) रुणझुण, छुमछुम, झणझण असा आवाज होऊन. २. जोराचा पाऊस पडत असताना होणाऱ्या झमझम अशा आवाजाप्रमाणे ध्वनी होऊन. पहा: **झिमझिम** [ध्व. झम् द्वि.]

**झमझमा** स्त्री. मेघ मंडळासारखी गडगडगणारी तोफ.

**झमझमा** पु. (संगीत) खटका : 'आलापाचे चपळ झमझमे त्याच्या मनात भरले.' – अस्ताई २१.

**झमझमाट** पु. १. नूपुर, चाळ, घुंगरू इ.चा झमझम असा मोठा आवाज. २.(ल.) नृत्य; नर्तन; नाच. [फा. झम्झम् = गाणे, नाच]

**झमझमीत** वि. खरमरीत : 'तिला झमझमीत उत्तर द्यावं, असं त्याला वाटत होतं.' – ऐलेसं ३४३.

**झमाझमी** स्त्री. १. तरवारींची चकमक, कचाकच; चकाचकी. २. (ल.) भांडण; कटकट; बाचाबाच; खटका; चकमक.

**झमामा** क्रिवि. सपाटून; बेदम : 'झमामा झोडीपली. ढॉर वरडल्यागत वरडली.' – खळाळ २३.

**झमाल** काल.

**झमेला** पु. १. बखेडा; धुडगूस; धुमाकूळ : 'हुकमाप्रमाणें त्रिवर्गांनीं गडबड करून दिवसभर झमेला मांडला.'– विइंसं ३.६६.२. भानगड; जंजाळ.

**झम्माटा** पु. झपाटा; जोर : 'म्हणताना झम्माट्यान ती तशीच.'– जलोसा ६९.

**झय** स्त्री. झळ : 'पंढरपूरमां झयं सुटनी हिवनी' – जलोसा ४८६.(व.)

**झयकणे** क्रि. झळकणे; झळाळणे : 'पितांबर गगने झयकना' – जलोसा १२. (व.)

**झयकी** वि. चमकदार; चकचकीत.
स्त्री. चकचकीतपणा ; अभ्रक.

**झर** स्त्री. १. झरा. (गो.) २. (पदार्थाचा) झरून, झिजून गेलेला अंश : 'हा गाळ म्हणजेंच पाण्यानें वाहून आणलेली झर होय.' – सृष्टि ४०.[सं. झृ]

**झरक** पहा : **झरकन** : 'शरीर झरक झरझरी रोम थरथरी अनचित्त वळतें ।' – दावि ४१७.

**झरकटचे, झरकटावचे** अक्रि. ओरखडणे; खरचटणे. (गो.)

**झरकणे, झर्कणे** अक्रि. १. झरकन निघून जाणे; पोबारा, पलायन करणे; सरकणे; निसटणे; हातावर तुरी देणे : 'नळे आर्डत उठती । बाण हवाया झर्कती । गगनामध्यें ।' – दावि ५०४. २. झरणे; गळणे: 'तेणें झरकती प्रेमांबु लोचनीं ।'– दावि ३७५. [ध्व. झर्]

**झरकन–कर–दिशी–दिनी** क्रिवि. झटकन; चटदिशी; झटक्यासरशी.

**झरका** पु. (हालचाल, क्रिया, भाषण इ.) त्वरा; चपळाई; चापल्य; चलाखपणा. (क्रि.करणे, मांडणे, लावणे.) : 'चालसि हंसगती झरका' – पला १२९. (वा.) ० **देणे** – गिरका देणे; फसविणे; हातावर तुरी देणे : 'नाहीं तर दे झरका कापा गळा ।' – सला २.

**झरकुंड** न. जंगल.

**झर(रा)झर–रां, झरारा** पहा : **झपझप** : '–निर्झर झरझर उड्या मारिती मृग विपिनीं उडती बागडती ।' – विक ३५.

**झरझरणे** अक्रि. १. स्फुरणे; फुरफुरणे; अंगावर शहारे येणे; थरथरणे: 'त्या अंकुराची डहाळी होऊन झुलत असल्याची जाणीव अंगा अंगावर झरझरली.' – खळाळ १८५. २. ओघळणे.

**झरझरी** स्त्री. गुडगुडी; हुक्का व त्याची नळी : 'अस्ताव्यस्त लोक गाशे टाकून झरझऱ्या लावून बसले.' – भाब ९९. [ध्व. झर्]

**झरझरीत** पहा : **झिरझिरीत** [सं. जर्जरित्]

**झरझरीत** क्रिवि. ओघळत.

**झरणपात्र** न. पाझरणपात्र. ज्यातून कॉफीसारखे द्रव पदार्थ सावकाश झिरपतात, असे पात्र.

**झरणी–नी** स्त्री. शाई भरलेली लेखणी : 'माझी ही झरणी – हें फौंटन.' – कार्भि २१.

**झरणे** अक्रि. १. पाझरणे; बारीक धारेने वाहणे; झिरपणे. २. पाघळणे; चिघळणे. ३. गळणे; टपकणे. ४. (शरीर, आयुष्य, संपत्ती, बुद्धी इ.) कमी होत जाणे; झडणे; झिजणे; क्षीण होणे. [सं.क्षर्–क्षरति, झॄ]

**झरन** पु. पाणथळ जमीन. (झाडी) [सं.क्षर्]

**झरना** पु. झरा. उंचावरून पडणारी पाण्याची धार : 'जवळच पाण्याचा झरना.' – केया ३४.

**झरनाटबंद** वि. मोठा; अवजड; अवाढव्य.(व.)

**झरनाटा** पु. झपाटा; झणाटा.(व)

**झरनाटून** क्रिवि. सपाटून. (व.) [फा.]

**झरपा** पु. पाझर : 'ते बारके बारके झरपे बुधलाभर पसरले होते.' – जैरजै १२६.

**झरबादी** पु. ब्रह्मी स्त्री व मुसलमान पुरुष यांची संतती.

**झरवण** न. झरा; झिरपण.

**झरवणी** न. १. झऱ्याचे पाणी. २. झिरपणारे, पाझरणारे, ठिबकणारे पाणी.

**झरवणे** अक्रि. घासणे; उगाळणे : 'आबा वेखंड झरवीत होता.' – रापा ७४.

**झरस** स्त्री. एक वनस्पती. ही कडू व गोड अशा दोन प्रकारची असून हिच्या पाल्याची भाजी करतात.

**झरा** पु. १. जमिनीतून, खडकातून झिरपणारे पाणी, त्याचा प्रवाह; झिरा : 'वळणें वाकणें भोवरे । उकळ्या तरंग झरे ।' – दास ११.७.३. २.(ल.) पैशाचे, संपत्तीचे उगमस्थान, मूळ; खाण. ३. (द्रव्य इ.) सतत होणारी प्राप्ती. [सं.झृ]

**झरा** पहा : **झारा**

**झराका** पु. चपळता; चलाखपणा. पहा : **झरका**

**झराझर–रां, झरारां** पहा : **झरझर** : 'मिल्टनचीं काव्यें झराझर बाहेर पडलीं नव्हतीं.'– विज्ञावि ८.९.१६६.

**झराट** क्रिवि. संतत; एकसारखे; झरझर : 'तेणें लोटलें अपार जीवन । चक्षूंतून झराट तें ।' – नभसा १४.२३.

**झरातावा** स्त्री. अव. जोराचा, नेटाचा प्रयत्न; आटोकाट यत्न. (क्रि. देणे.)

**झरायने** क्रि. मंदावणे झरणे.

**झरी** स्त्री. १. झरा; ओहोळ; ओढा: 'नाना झऱ्या झिरपती ।' – दास १६.४.६. २. ( शेतकी) खार म्हणून जी भातजमीन तयार करतात तिला बांध घालून आतील पाणी सोडण्यास बांधास जो फांज

(दरवाजा) राखतात तेथपासून खार जमिनीच्या उंच भागापर्यंत बांधलेला फरसबंदी नाला.(को.) [सं.झ्रृ]

**झरी** स्त्री. ऱ्हास; क्षय (संपत्ती, शरीर, आयुष्य इ.चा); कमी कमी होत जाणे; क्षय पावणे. ( क्रि. लागणे.) [सं.झ्रृ,क्षर]

**झरी** स्त्री. १.लाकडाची खाच. २. सोनाराकडील नाल. ३.पाणवठा. (झाडी)

**झरी** पहा : **झारी**

**झरीपट्टी** स्त्री. (गवंडी काम) खिडक्या व जाळ्या यांच्या पायथ्याची गिलाव्याची उतरती भिंत.

**झरोका–खा** पु. (भिंतीतील) लहान खिडकी; गवाक्ष. [का. जेरुगं (गिं)डी; हिं.झरूका]

**झर्नाट्या** वि. अगडबंब; अवाढव्य. (व.) पहा : **झन्नाट्या**

**झर्रकन** क्रिवि. सर्रकन : 'गडाचें नांव घेतल्याबरोबर झर्रकन् तिच्या अंगावर रोमांच उभे राहिले.' – मोचन २२.

**झल** स्त्री. हुशारी; तरतरी.

**झलक** स्त्री. चुणूक; नमुना; वानगीदाखल दाखविली जाणारी दृश्यमालिका : 'त्याची नुसती झलक पाहिली.' – टेलिव्हि ९८.

**झलक** स्त्री. उडालेले तुषार. (झाडी)

**झलक–की** स्त्री. तरतरी; हुशारी; चलाखपणा.(व.)

**झलझल** वि. नाजूक; मऊ.

**झलमा** पु. पडदा : 'लाल झलम्याची गाडी । पाहतां कां दारीं सोडा ।' – वलो ९७.( व.)

**झलारी** स्त्री. पाण्याचा तरंग. (झाडी) [सं.]

**झला(ल्ला)ळ** स्त्री. १. झळाळ; चमक; तेज; चकाकी : 'मुगुट माथां कोटी सूर्यांचा झल्लाळ ।' – तुगा ३. २.ज्वाळांचा डोंब, भडका; जाळ. [सं. ज्वल्]

**झलैरी** स्त्री. वस्त्राची झालर.

**झल्लकणे** अक्रि. मोठी ज्योत होऊन जळणे, चकाकणे. [सं. संलक्ष्]

**झल्लर** स्त्री. झालर; किनार : 'मुक्ताफळाचीं झल्लरें । झुबके रत्नमणीचे ।' – वेसीस्व ७.८२. [सं. झल्लरी]

**झल्लर** पु. पाण्याचे तुषार; ओलावा : 'नीरज भार समार सुमारें। झल्लर मारितसें वर वारें।' – दावि ४४६.

**झल्लरी** स्त्री. झांज; झंगट; टाळ: 'नाद उठिला झल्लरी । मृदंगध्वनी त्यामाझारीं।'– एरुस्व ६.७४. [ध्व.]

**झल्ला** वि. झडलेला.(झाडी)

**झल्लावना** क्रि. रागाने ओरडणे. (झाडी) [हिं.]

**झल्लावा** स्त्री. जोरदार लाटा : 'पाणी मारते झल्लावा ' – जलोसा ६७६.

**झल्लाळ** न. तेज.

**झवकीर** वि. (अश्लील) कामुक; विषयांध; स्त्रीलंपट.

**झवणे–ने** उक्रि. (अश्लील) संभोगणे; मैथुन करणे; स्त्रीशी रत होणे. [सं.यभ्, यंभ्]

**झवतरोड** वि. (अश्लील) रोडका; किरकोळ बांध्याचा; अशक्त; दुबळा; मरतुकडा.

**झवना** पु. अश्लील, ग्राम्य शिवी : 'भिकार झवन्याचं ह्ये असलं जग झालंय' – रैत १७९.

**झवरपट्टी, झवाडपट्टी** स्त्री. (अशिष्ट) एखाद्याची भरमसाठ शिव्या देऊन केलेली निर्भर्त्सना; खरडपट्टी; घाणेरड्या शिव्या देणे. (क्रि. काढणे.)

**झवाडणे** सक्रि. (अशिष्ट) शिव्या देऊन खरडपट्टी काढणे; निर्भर्त्सना करणे; अभद्र बोलणे.

**झवाड्या** वि. (अश्लील) व्यभिचारी; अतिशय कामुक; विषयासक्त.

**झवुबायल्या** वि. नेभळट; नपुंसक.

**झष** पु. मासा. [सं.]

**झळ** स्त्री. १.धातू तापविल्याने होणारी घट; धातू तापविताना निघून गेलेले अशुद्ध द्रव्य. २. (ल.) व्यापारातील घस, तूट, बूड, ठोकर, तोशीस. (क्रि. लागणे.) [सं. झला] (वा.) ० **पोहोचणे–** आच लागणे; धग पोचणे; (ल.) उपद्रव होणे : 'ह्यामुळे इंग्रजांच्या सत्तेला काय झळ पोहोचणार आहे?' – दुर्दम्य ५८.

**झळ,झळई** स्त्री. १. उन्हाची तिरीप; धाप; धग; अंग भाजणारी उष्ण वाऱ्याची झुळूक. (क्रि. खाणे, लागणे, बाधणे, बसणे.) : 'तृषार्ता मरूदेशीं । झळे अमृतें बोळली जैसी ।' – ज्ञा १८.१६१. २. अग्नीची धग; अही; आंच. ३. मृगजळ : 'उदकाऐसी दावुनि ओढी । ऊर फोशी झळई ।' – तुगा १२६३. [सं. ज्वल् – झला]

**झळ, झळई** वि. तेजस्वी; झगझगीत : 'झळकत झक झळ घनदामिनी ' – दावि ४९६. [सं. ज्वल्]

**झळक** स्त्री. १. उन्हाची झळ. २. चमक; चकाकी. (क्रि. मारणे.) [सं. झला]

**झळक** न. मासळी.(गो.)

**झळकणे** अक्रि. (पातळ पदार्थ इ.) हेलकावणे; डबकणे; डबकून सांडणे.(ना.) पहा : **झुलकणे**

**झळकणे** अक्रि. १. चकाकणे; प्रकाशणे; चमकणे; झाक मारणे. २. शोभणे; साजणे : 'कंठीं झळके माळ मुक्ताफळांची ।' – आरती–गणपतीची. ३.दृष्टीस पडणे; आढळणे; दिसणे : 'वाघ त्या जाळीत मला झळकला.' – नम ९०. [सं. झला]

**झळकफळक** स्त्री. चकचकीतपणा; चकाकी; तेजस्विता; झकाकी. वि. चकचकीत; लख्ख; झकझकीत : 'कोणी झळकफळक गृहस्थ आले म्हणजे आजूबाजूचे लोक म्हणत.' – उअं १२५.

**झळका** स्त्री. झिलई : 'सुरी असे : ते नीसीजे : झळका करूनि पोगर आच्छादति :' दृपा ५३.

**झळकाट** पु. दिखाऊ चकाकी : 'नीति हें ज्ञानाचें मूल्य होय. तद्व्यतिरिक्त जे ज्ञान तो केवळ वरील झळकाट व आडंबर मात्र.' – मसवि ७०.

**झळकावणे** सक्रि. १. चकचकीत करणे; लखलखीत करणे. २. (ल.) (शस्त्र इ.) परजणे : 'कोल्हाटी शस्त्र दावी झळकावून । परी रणपंडित नव्हे तो ।' – हरिवि ५.१९३.

**झळझळ–ळी** स्त्री. १. चकचकाट; लखलखाट; झिलई; तकाकी; उजळा; तजेला. २. कवडसा. ३. स्वच्छता; सफाई. (गो.) क्रिवि. चकचक करीत; झगझगीतपणे : 'अतिमृदु पदतळ झळझळ

तळपति ।'- आविश्वा, चूर्णिका.

**झळझळणे** अक्रि. ( भांडी, दागिने इ.) चकाकणे; चकचकीत दिसणे; चमकणे : 'ओंकारांतुन माया झाली हिऱ्याहून झळझळे ।' – पला ८.

**झळझळाट** पु. (झळझळचा अतिशय) अतिशय तेज, चकाकी; झगझगाट.

**झळझळांवचे** सक्रि. स्वच्छ करणे; खळबळणे. (गो.)

**झळझळीत** वि. १. चकचकीत; झगझगीत. २. स्वच्छ; स्पष्ट; पांढरे. ३. निर्मळ; शुद्ध. पहा : **झुळझुळीत.** ४. (ल.) थाटामाटाचा : 'तुमच्या तेवढ्या झळझळीत देवपूजा पाहाव्यात.' – नामदेव ७५.

**झळझळीत** क्रिवि. १. अगदी उघडउघड; स्पष्टपणे; ढळढळीतपणे ; धडधडीत. ह्या शब्दाचा या अर्थी सामान्यतः निंदाव्यंजक शब्दाबरोबर उपयोग करतात. उदा. झळझळीत वेड, झळझळीत सोदेगिरी. २. (निषेधार्थी) बिलकूल; अगदी; मुळीच.

**झळणे** अक्रि. सूर्यकिरणांनी तापणे (मद्य इत्यादी). उन्हाने तापणे. (पाणी).

**झळणे** अक्रि. झाकले जाणे, पहा : **झाळणे**

**झळपेंवचे** अक्रि. झोपेत बरळणे. (गो.)

**झळफळ** स्त्री. १. झकपक; झगझगाट; चकाकी. २. (ल.) थाटमाट : 'बाह्य केली झळफळ । देहबुद्धीचा विटाळ ।' – नवनीत १८६.

**झळफळणे** १. झळकणे. पहा : **झळझळणे** : 'माजीं कौस्तुभमणी झळफळी वो ।' – दावि १५४. २. पहा : **जळफळणे**

**झळफळाट** पु. १. पहा : **झळझळाट**. २. दाह; तडफडाट.

**झळफळीत** वि. १. तेजस्वी. २. स्वच्छ; निर्मळ : 'झळफळित उपकर्णे । माळा गवाळी आसनें ।' – दास २.७.८२. ३. भरभराट पावणारा ; भरभराटीचा ; समृद्ध; संपन्न.

**झळम** वि. १. लोंबणारे; लटकत असलेले; वाकलेले; झळंबणारे (झाड). (यामुळे) २. (ल.)चढावयास कठीण (वृक्ष, शाखा इ.).

**झळमळणे, झळंबळणे** अक्रि. १.(हलणारे पाणी, काच इ.) चकाकणे; चमकणे. २. (झाडाच्या फांद्या इ. वाऱ्याने) हलणे; हेलकावणे; हेलकावे खाणे. [झळ द्वि.]

**झळवट** वि. उन्हाने तापलेले, तापविलेले (पाणी इत्यादी).

**झळवणी** न. उन्हाने गरम झालेले, केलेले पाणी (उन्हाळ्यातील घामोळे त्वचा रोगास उपयोगी.).

**झळवणे** अक्रि. पोळून निघणे.

**झळंब** पु. झेपण; झळ; झळई. पहा : **जळप, जळंप**

**झळंब** पु. चांदवा; छत : 'कीं झळंबाचेनि मीषें । अनुरागें रातला असे ।' – ऋव ६८.

**झळंब(म) णे** उक्रि. १. (जाताना एखाद्या पदार्थाशी) घासणे; चाटून जाणे; घसवटणे; खरडणे. २.भूत, पिशाच्च यांनी पछाडणे; झपाटणे. ३. (दुःख, गर्व, माया, मोह इत्यादिकांनी) पछाडणे; व्याप्त होणे; झोंबणे : 'सर्वेचि प्राणी झळंबला । मायाजाळें ।' – दास ३.४.४९. ४. ताप देणे; जाळणे; पोळणे: 'प्राक्तनु चंडांसाचा रश्मी । थोर तातली कर्मभूमि । झाउवी पदुउर्मी । झळंबिला जो ।' – ऋव ९. ५. उन्हात तापविणे; ऊन देणे. ६. स्पर्श करणे; स्पर्शणे ७. (ल.) लेपणे : 'कापूरकुमुदांचें पाणी । मर्दिजे चंद्रकिरणी । तेणें ते विरहिणी । झळंबीजे ।' – शिव ७७५. [सं.सम्+रंभ]

**झळंबणे, झळमणे** अक्रि. १. भरून येणे; उचंबळणे; डबडबणे; बुडणे : 'तैसे डोळे दिसति । झळंबैले । अश्रुपातीं ।'– ऋव १६. २. हेलकावे, गटांगळ्या खाणे : 'जन्ममृत्यूचिया लाटीं । झळंबती ह्या सृष्टी ।' – ज्ञा १२.८७. ३. (सूर्य किरणांनी पाण्यात किंवा मृगजळाने हवेत) हेलकावे खाणे ; हेलकावणे. ४. विरघळणे : 'जैसे लवण जळें झळंबलें ।' – ज्ञा २.३. [सं. झला]

**झळंबणे, झळमणे** अक्रि. १. आदळणे; धक्के दिले जाणे; हादरणे; डगमगणे; मर्मी लागणे: 'पै पुनरावृत्तीचेनि उभडें । झळंबती सत्यलोकींचे हुडे ।' – ज्ञा ७.८४. २. ओळंबणे; लोंबणे; लटकत राहणे : 'त्या नदीच्या तीरावरून एक मोठे झाड झळंबलें आहे.' – सिंब ४५; (फळाफुलांचे गुच्छ झाडावर) लोंबत राहणे. ३. झळ लागणे. [क. झळ्ळी]

**झळंबणे** सक्रि. १. शिडकावा करणे. २. झळकणे ३. मूर्च्छित होणे. ४. धरून राहणे. ५. झाकोळले जाणे. ६.अस्वस्थ करणे; वर्मी लागणे.

**झळंबुका** पु. झेला; गुच्छ; घोस : 'वासींगाचे झळंबुके दोहींकडे लागती ।' – ऋव १३८.

**झळंबुका** पु. एक कर्णभूषण. पहा : **झळुंबुके**

**झळंबून धरणे** (फळे इत्यादिकांनी झाडापासून) लोंबत राहणे; लटकून राहणे. पहा : **झळंबणे ६**

**झळा(ळा) ळ–ळा–ळी** स्त्री. पु. १. (झळझळचा अतिशय) चकचकाट; लखलखाट; चकाकी; उज्ज्वलता; कांती : 'कळस ढिमाचे पोकळ । जळो वरील ते झळाळ ।' – ज्ञा १३.४७४. २. तरंग. वि. १. चकाकणारा; उज्ज्वल; झळकणारा : 'झळाळिआं देवांचा पाळा । तूं गोपिनाथा ।' – शिव १५५. २. उन्हाच्या झळीमुळे उत्पन्न झालेले (मृगजळ इत्यादी) 'दशांही इंद्रियांचे दश विषयरूप मृग ते झळाळ उदकापाठि धाओनि अज्ञानत्वें मरों रीगे ।' – ऋव ९.

**झळाळणे** अक्रि. चकचकणे; लकाकणे. पहा : **झळझळणे** : 'पेशव्यांची हवेली दिमाखानं झळाळली.' – राऊ ३८२. [सं.झला]

**झळाळा** पु. चकाकी ; तेज.

**झळाळी** वि. तेजस्वी; शक्तिमान.

**झळी** स्त्री. झुडूप. (बे.)

**झळुसणे** सक्रि.भाजून, होरपळून काढणे.

**झळुंबुके** न. अव. कानांतील दागिना, झुबका, बाळ्या : 'कानिचे झळुंबुके करीति विरार :' – एरुस्व ९५.

**झळे** स्त्री. उन्हाची धग.

**झंकार** पु. १. झणझण, घणघण असा आवाज; झणत्कार; छुन् छुन् आवाज (घंटेचा किंवा नाचणाराच्या पायांतील घुंगरांचा, वाद्यांचा इ.) : 'जैसें निरंजनीं उठे झंकारु ।' – दावि ६८. २. गुंजारव. [सं.ध्व.]

**झंकृती** स्त्री. झंकार; वाद्यांचा, तंतुवाद्यांचा ध्वनी, झणत्कार : '(खंजिराच्या)... झंकृतीनें, ... त्या शांततेचा भंग केला.' – वैष्णव ५३.

**झंगट** न. १. एक वाद्य; तास. पहा : **जेंगट** : 'तूं प्रथम झंगट वाजीव.' –

बाबं १.२. २. मोगरीने ठोके वाजविण्याचे धातूचे घड्याळ. पहा: **जेंगट.** ३. वाद्यांचा गजर, कडकडाट. (क्रि. उठणे, लागणे.). ४.गोंगाटाने युक्त असे भांडण, वादविवाद; कल्लोळ; गोंगाट; खडाजंगी. (क्रि. लावणे, मांडणे, चालणे.). ५.(व्यापक) (मेजवानीतील पदार्थ, गाणे, बजावणे, नाचणे इ.ची) विपुलता; चंगळ; लयलूट.

क्रिवि. जोराने; मोठ्या आवाजाने; कलकलाटाने; दणदणाटाने (तंतुवाद्ये इ. वाजणे). [ध्व.]

**झंगट** न. लचांड; भानगड. पहा : **झेंगट**

**झंगाझंगी** स्त्री. झोलाझोली; टोलवाटोलवी; वाद. (माण.)

**झंजट** स्त्री. भांडण; भानगड. [हिं.]

**झंजर** पु. घुंगूर. (गो.) [ध्व.]

**झंजवात** पु. वावटळ; सोसाट्याचा वारा; झंझावात.

**झंजळणे** अक्रि. रागावणे; संतापणे.(व.)

**झंजा(झा)पवन** मारुती; समीर.

**झंजा(झा)वात, यू** पु. पर्जन्ययुक्त वादळ; सोसाट्याचा वारा; वादळ; वावटळ; अतिशय जोराचा, गर्जना करणारा वारा; तुफान : 'जैसा प्रकटतां झंजामारुत। जलदजाल वितुळे.' – हरिवि १.२०; 'शिरला कौरवकटकीं जैसा झंजासमीर तरुनिकरीं।' – मोभीष्म ७.१६. [सं.झंझा]

**झंजावाती** वि. तुफानासारखा वेगवान; गतिमान; खळबळ उडवून देणारा : 'त्यांचा दौरा झाला तो झंजावाती दौरा झाला.'– रचिं १२८.

**झंजुरूकेन** पहाटेचा संधिप्रकाश; झुंझुरके; तांबडे फुटणे.

**झंझट** न. १. झंगट; लचांड; शुक्लकाष्ठ; ब्याद.(ना.) २. त्रास; व्याप; कटकट.

**झंड** वि. हट्टी; झोंड; झट; हूड. (गो.)

**झंडी** स्त्री. निशाण : 'हिरवी झंडी बगलेत मारून गार्ड उभा होता.' – जहेवोजे २.

**झंडू दाटणे, फुटणे** विषारी साप चावल्यावर तोंडातून रक्तमिश्रित फेस बाहेर येणे, कासावीस होणे : 'तीव्र वेदना होण्याच्या जाणिवेने झंडू दाटू लागतात.'– भास ४१.

**झंप** पु. (संगीत)हिंदुस्थानी संगीतातील एक ताल. याच्या मात्रा दहा असून भाग चार आहेत. पहा : **झंपा**

**झंप** पु. तेज; झळाळी.

**झंपा** पु. १. एक प्रकारची झांज. २. (संगीत) एका तालाचे नाव. हा कर्नाटक संगीत पद्धतीतील आहे. [सं.]

**झंबाद** वि. १. जहांबाज. २. निष्णात. (गो.)

**झा** ध्व. पीक राखताना पाखरांना उद्देशून म्हणण्याचा शब्द. [ध्व.]

**झा, झां** पहा : **झ्या.** (वा.) ० **करणे** – पळून जाणे.

**झाई** स्त्री. भोवळ. (झाडी)

**झाऊ–व** पु. एक प्रकारचे सुरूसारखे झाड; शेरणी.

**झाऊ** स्त्री. झळ. (ना.)

**झाऊ** वि. १. झिरझिरीत; विरविरीत; पातळ विणीचा (कपडा इ.). २. हलका; तकलादी; नाजूक (दागिना, कागद, भांडे इ.). ३. (ल.) टाकाऊ; निरुपयोगी; कुचकामाचा (मनुष्य, जिन्नस). ४. एक प्रकारच्या झाडाची शोभादायक पाने. (अहि.)

**झाक** स्त्री. १.(रत्ने, दागिने, धातू, रंग इ.ची) चमक; चकाकी; लकाकी; तेजस्विता. २. (सोने, रुपे इ.चा) मुलामा; झिलई.

**झाक** स्त्री. पावसाची जोराची सर. (क्रि. येणे.)

**झाक** स्त्री. पक्ष्यांची झुंड; (टोळ इ.ची) धाड; पक्ष्याची झडप; झाप. (क्रि. येणे, पडणे, मारणे.) : 'वरौनि कापूरकेळीं । भ्रमरांची झांक उठिलीं ।' – शिव ६०५.

**झाक** स्त्री. १. (उन्हाची) तिरीप; झळ; ऊन किंवा थंड हवेचा मारा. (क्रि. लागणे, बसणे, येणे, वरून जाणे.). २.(ल.) चुणूक; भास; लकेर: 'दुष्काळामुळे कहर उसळला नाहीं तर त्याची झाक मात्र दिसली.'– विज्ञावि ८.७.१३५. ३. झुळूक; छटा.

**झाक** स्त्री. १. (भूतबाधा, पित्त, उपासमार यांनी डोळ्यांवर येणारी) झापड; झाप; तंद्री. (क्रि. पडणे, येणे, घालणे.). २. चक्कर; भोवळ; घेरी. ३. ग्लानी; गुंगी; सुस्ती; डोळे जड होणे व तारवटणे. (क्रि. येणे.) ४. (ढग, झाडे इ.ची घनदाट) अंधेरी; छाया; झापड; काळोख. (क्रि. घालणे, पडणे.) ५. संध्याकाळ. ६.मोहिनी.

**झाक उगाड** स्त्री. ऊन पाऊस. (झाडी)

**झाकट** स्त्री. उजाडण्यापूर्वीचा काळोख; झुंजुरका : 'शेवंताबाई नेहमींप्रमाणं अगदीं झाकटींत न येता...' – अगतिका २१.

**झाकड** स्त्री. काळोख : 'झाकड पडली, थांबू नकोस.' – राक १६.

**झाकडाळ** स्त्री. जेवणानंतरची आवराआवर : 'धोंडूमामींची झाकडाळ जोरात चालली होती.' – आआशे ५९.

**झाकण** न. १. आच्छादन; टोपण; ढापण. २. (क.) पहा : **झांपड, झापड** [सं.छादन]

**झाकणा** क्रिवि. झाकण घालून; झाकण असलेल्या स्थितीत (भांडे, इ. ठेवणे, असणे). (क्रि. ठेवणे, घालणे, असणे.) (राजा.)

**झाकणी** स्त्री. १. आच्छादन; भांडी इ. झाकण्याची ताटली, तबकडी, वेळणी : 'तपतेजाचा चेतऊन अग्नि । उदासीनता देऊनि फोडणी । आदण वोतूनि पतिपायवणी । झांकणी झांकिली उपासना ।' – दावि १०४. २. (बैल, घोडा इ. जनावरांच्या डोळ्यांना लावायची) झापडी; अंधारी. ३. आच्छादण्याची, झाकण्याची, लपविण्याची, गुप्त ठेवण्याची क्रिया; दाबादाब; छपवणूक. ४. (सुस्तीमुळे) डोळ्यांवर येणारी झापड.

**झाकणे** पहा : **झाकण** १ : 'जैसें झांकणें चर्मकुंडाचें । उघडितांच नये ।' – दास ३.१.१४.

**झाकणे–ने** उक्रि. १. आच्छादणे; झाकण घालणे. २. लपविणे; छपविणे. ३. (ल.) (एखादी गोष्ट, व्यवहार) छपविणे; दाबून, लपवून ठेवणे; दाबादाबी करणे. ४. (उपकार इ.) न फेडता तसेच ठेवणे, राखणे : 'तुझा ऐसा उपकार मी न झांकीं ।' – रकाव्य १३. [सं.छद्]

**झाकपाक, झाकापाक–की** स्त्री. १. जेवण झाल्यानंतरची स्वयंपाकघरातील उरलीसुरली कामे; सर्व पदार्थ झाकून जागच्या जागी

ठेवणे इ. : 'स्वयंपाक घरातील झाकपाक करून त्याही वर गेल्या.' – कोकि ३०३. २. जलदीने, गडबडीने आवरणे, उरकणे. [झाकणे द्वि.]

**झाकर** न. १. अतिशय दाट व पुष्कळ फांद्या फुटल्यामुळे विस्तृत दिसणारे (मिरची इ.सारखे) झुडूप. २. झाडाच्या दाट पानांचा गर्द, निबिड भाग; जाळी. ३. दाट पाने असलेली झाडाची खांदी. [सं. शाख]

**झाकरण** न. शाकारणी; घरावर कौले चढवणे : 'पावसाळा सुरू होण्याच्या आत झाकरण केले नाही.'– एहोरा ६६.

**झाकरणे** अक्रि. (झुडूप, झाड इ.) भरगच्च पानांनी झाकले जाणे – युक्त होणे; गुरफटलेले असणे.

**झाकरी** क्रिवि. ताबडतोब; लौकर; त्वरित : 'झाकरी अनुमानाचेनि करतळें ।' – ज्ञा ७.१९२.

**झाकले माणिक** (ल.) दिसायला साधा पण खरोखर गुणी व विद्वान मनुष्य.

**झाकल्या पाठीचा** ज्याला काही सबब सांगता येईल किंवा जो फारसा अक्षम्य समजला जाणार नाही असा (अपराध इ.).

**झाकल्या पाठीने** क्रिवि. अब्रू गमावून न घेता; प्रतिष्ठितपणाने; बोज कायम ठेवून.

**झाकल्या मुठीने** गुपचूप; बभ्रा न करिता; बोभाटा न होऊ देता; कोणालाही कळू न देता; गुप्तपणे.

**झाकविणे** पहा : **झकविणे**

**झाकविणे** उक्रि. १. लपवणे. २. व्यापणे.

**झाकसापा** पु. दाबादाबी; लपवालपवी.

**झाकळ** वि. अस्पष्ट.

**झाक(का)ळणे** उक्रि. १. झाकून ठेवणे; लपविणे; आच्छादित करणे; दडविणे. २. घेरणे; व्यापणे; लुप्त करणे; व्याप्त होणे: 'झोपेनें झांकळिला प्रियो ।' – मुआदि ९.४०. [सं. झष्]

अकर्तृक क्रि. १. अंधुक होणे; मलिन होणे; अंधारून येणे ( ढग वगैरेंनी): 'प्रभा पृथिमीवरी । यकायकीं झाकळली बरी ।' – ऐपो १२७. २. पहा: **झाकुळणे, झाकोळणे**

**झाका** स्त्री. १. मूर्च्छेमुळे, ग्लानीमुळे डोळ्यांवर येणारी झापड. (प्रां.) २. अंधारी; घेरी. ( क्रि. येणे, पडणे, घालणे.)

**झाका** पु. १. मोठे टोपले. २. भांडे ठेवण्याची जागा. (झाडी) [हिं.]

**झाकाझाकी** स्त्री. आवराआवर.

**झाकाताप–पा** पु. लपंडाव; छपवाछपवी : 'प्रगट विवेक बोलेना । झांकातापा करी जना ।' – दास १९.६.९.

**झाकी** स्त्री. इरले. (झाडी) [सं. ढक्]

**झाकीबाज** वि. ऐटबाज : 'तोंच एका झांकीबाजाचे सर्व कपडे ओलेचिंब झाले.'– नाता ३७.

**झाकीव** वि. १. झाकण, ढापण असलेला (डबा, पेटी इ.). २. ज्यावर झाकण, आच्छादन ठेवलेले आहे असा. ३. झाकून ठेवलेला; लपवून ठेवलेला; बंद करून ठेवलेला.

**झाकु(को)ळणे** उक्रि. १. झाकणे; लपविणे; आच्छादित करणे : 'यादव सैन्याचा महागिरी । शरधारीं झांकोळला ।' – एरुस्व ८.४९. २. (ल.) झाकले जाणे; फिके पडणे : 'मत्स्यवंशकुळदीपकजोती । झांकुळेल म्हणऊनि उजोती ।' – वाविरा ७.१४९. ३. व्याप्त होणे; लिप्त होणे: 'परी तेथिचिया उर्मी । झांकोळे ना ।' – ज्ञा ३.७०.

अक्रि. १.दिपणे; दिपून जाणे; चकित होणे. २. बंद होणे; मिटणे (डोळे, पापण्या इ.) : 'बुद्धीचें द्वार। झांकललें जेणें ।' – राज्ञा १३.११५. ३. अंधारमय होणे; सायंकाळ होणे : 'झांकोळलें गगन सूर्य गेला भिऊन ।' – ऐपो १२०.

**झाकू** वि. झकास; छान : 'काय वं साहेब जागा कशी झाकू आहे का नाय?'– कृकादे ३८.

**झाके** अ. व्यर्थ.

**झा(झ)कोळणे** उक्रि. १. आच्छादणे. २. व्यापणे.

**झाक्या** वि. झाकणारा.

**झागमाग** स्त्री. झगझगाट; झगमग : 'गॅसबत्तीच्या प्रकाशात हिरवागार शालू झागमाग करावा तसं ते वावर चमकत होतं.' – ऊन २७.

**झाज** पहा : **जहाज** : 'मोत्यापोवळ्यांनी झाजे भरली....' – एहोरा १४९.

**झा(झां)जरणे** उक्रि. १. घसवटणे; घासटणे; खरडणे; खरचटणे: 'चंद्रिकेच्या अंगावर झाजरल्यासारखें झाले.' – निचं १४. २.(ल.) फसवणे; एखाद्याला टोपी किंवा गोता घालणे. (राजा.) ३. वापरून खराब होणे; जीर्ण, जर्जर होणे; झिजणे; छिन्नभिन्न करणे; खराब करणे : 'ती जखम झाजरल्याइतकी कठीण ठरली नाहीं.' – झांमू २. ४.(ल.) पीडणे; पीडा देणे : 'झांजरलीं पंचबाणें एकमेकावरी पडिलीं हरणें ।' – उगी ४३०.[सं.जर्जर] (वा.) **झाजर माडाचे गरे खाणे** – (उप.) झाडावरून पडून अंग खरचटल्याने, ठेचल्याने पीडित होणे.

**झाजाव(वि)णे** सक्रि. जोरजोराने धसधस तोडणे; पुन्हा पुन्हा घाव मारणे; खापलणे; खांडणे. पहा: **जाजावणे** [सं.झझा]

**झा झा, झां झां** उद्गा. (घोडा, बैल इत्यादीने) जलद चालावे म्हणून उच्चारावयाचा इशाऱ्याचा शब्द [ध्व.] (वा.) **झाझाचे करणे, झां म्हणणे** – निसटून जाणे; पलायन करणे; हातावर तुरी देणे; पोबारा करणे.

**झाजात** स्त्री. शिकस्त; पराकाष्ठा; आटोकाट यत्न; यातायात. (क्रि. करणे.) (कर.)

**झाझू** स्त्री. १. कटकट; धुसफूस; बोलाचाली; कलह. २. झुमझुम, छुनछुन असा आवाज. [ध्व.]

**झाट** न. (अश्लील) शिस्नाच्या किंवा योनीच्या वरील केस, केसांचा समुदाय; गुह्यस्थानचे केस; शष्प; शेट. [सं.जटा]

स्त्री. खाली लोंबलेल्या बटा : 'मोहालीं पांजरांवरी झांटा । पायीं नोपुरें क्षुद्र घंटा ।' – गीतार्णव १.४८२.

**झाट मुंडावण** गुह्येंद्रियावरील केस काढणे, यावरून (तिरस्कारार्थी ) अतिशय क्षुद्र व सोपे काम.

**झाटी** स्त्री. दाटी; गर्दी: 'कृष्णमेघांचिया झांटी ।'– राज्ञा ११.२०१.

**झाटोजी** वि. (अशिष्ट) (उप.) व्यर्थ फुशारकी मारणारा; ढोंगी; गर्विष्ठ (माणूस); क्षुद्र; हलका (माणूस).

**झाड** न. १. वृक्ष; झुडूप; रोप; वनस्पती (लहान, मोठी). २. शाखायुक्त

वस्तू, पदार्थ; वृक्षाकार वस्तू. ३. मेणबत्ती इ. लावण्याचे काचेचे झुंबर; पुष्कळशा उदबत्त्या लावण्याचे वृक्षाच्या आकाराचे धातूचे घर: 'चांदीच्या झाडांतून उदबत्त्या खोंविल्या होत्या.' - अभा १३६. ४. दारूकामातील एक प्रकार; वृक्षाच्या आकाराचे दारूकाम. ५. भूताने पछाडलेले माणूस : 'ज्यास भूत पछाडतें त्या झाडास तें सुग्रास अन्न खाऊं देत नाहीं.' - अभा ५८. ६. वंशवृक्ष; वंशावळ. ७. बंदुकीचा लाकडी भाग, दस्ता. (कु) [सं.झटि] (वा.) ० **उभे करणे** - उत्कृष्ट रीतीने एखादे काम वठविणे. उदा. गायन, वादन, कीर्तन, व्याख्यान इ. उत्तम रीतीने करणे, रंगविणे. ० **पिछाडी करणे** - संपूर्ण झाडा करणे, संपूर्ण फडशा पाडणे: 'हल्ली यादी पाठविली आहे, त्यात एक कलम न राहता झाडापिछाडी करून देणे.' - को. प्रा. १७८. **कोण्या झाडाचा पाला** - एखाद्याचा दिमाख, नक्षा, मगरूरी उतरण्याकरिता योजावयाचा शब्द; अशा माणसाविषयी क्षुद्रता व तिरस्कार दाखविणारा शब्दसमूह : 'सुभेदार ? हं: सुभेदार म्हणजे कोण्या झाडाचा पाला? आम्ही ओळखीत नाहीं असे जाऊन सांग जा ?' - नाक. **झाडाचे राऊत दिसणे, करणे** - भीतीमुळे झाड घोडेस्वाराच्या, सैनिकाच्या आकृतीप्रमाणे दिसणे; दोरीचा साप बनविणे. **झाडावरचे भूत** - ज्याचा नामनिर्देश करणे अनिष्ट आहे अशा नीच, तिरस्करणीय मनुष्याबद्दल वापरायचा वाक्प्रचार. **सुक्या झाडाला बाक लावणे** - (सुकलेले झाड इष्ट त्या दिशेने वाकविता येणे शक्य नाही यावरून) एखाद्या वृद्धाला उपदेश करणे; हट्टी, हटवादी, पूर्वग्रहदूषित माणसाला बोध करणे (अशक्य आहे.).

**झाड** न. गोंधळ; दैना.

**झाडकवी** पु. मतिमंद किंवा क्षुद्र कवी : 'बंधक, खोटे: काइ गा : कांहीं तुमचेया सास्त्रासि मीळताए? कीं अवघे झाडकवि : ' - लीचउ १७१.

**झाडकळी** स्त्री. वृक्षराजी; झाडांचा समुदाय: 'आईच्या पाठोपाठ आम्ही झाडकळींतून ' - डाली १०५.

**झाडकी** स्त्री. किर्र झाडी.

**झाडकुट** न. वाळलेले, मोडून पडायला आलेले झाड, फांदी, काटकी. (गो.)

**झाडखंड** न. १. जंगल; झाडी; झाकर; जुंबाड; राई; रान: 'विशाळें बहू लागलीं झाडखंडें ।' - रामक १.१२. २. झुडपे; जाळी; लहान झाडांचा समुदाय.

**झाडखंडा** वि. क्रिवि. १. (वर दिलेल्या झाड उभे करणे ह्या वाक्प्रचाराच्या उलट अर्थी - झाडाची पाने, फुले, फळे तोडून टाकली असता ते बेढब व ओबडधोबड दिसते यावरून) ओबडधोबड; अर्धवट; रुक्ष; नीरस; अशास्त्रीय; अव्यवस्थित; बेशिस्त असे (गायन, वादन, कीर्तन, व्याख्यान इ.). २. गुरूपाशी अभ्यास न करता नुसते ऐकून आपल्याच अकलेने वाजविणाऱ्याचे वादन; स्वयंसिद्ध (गवयी, वादन).

**झाडखंडी** स्त्री. (क.) झाडे व झुडपे : 'दरें दर्कुटें झाडखंडी अनेकी ।' - दावि. वि. अरण्यमय; जंगलाचा (प्रदेश, जागा इ.).

**झाडगळ** स्त्री. झाडी किंवा झाडोरा माजलेला मुलूख.

**झाडझुडुला** पु. (व्यापक) लहानमोठ्या झाडांचा समुदाय; वृक्ष; झुडपे; रोपटी. [झाड द्वि.]

**झाडझपट-झटक** स्त्री. १.(व्यापक) धूळ, केर इ. काढण्याचे, झाडण्याचे, झटकण्याचे काम; झाडझूड; सडासंमार्जन. २. (ल.) (व्यापक) लुबाडणे, लुटणे इ. समाजविघातक समजल्या जाणाऱ्या क्रिया. ३. लुटालूट; धूळधाण; दाणादाण.

**झाडझवा** वि. (शब्दशः अश्लील, पण तो अर्थ मनात येत नसल्याने रूढ) उनाड; भटक्या; भणंग; भटकभैरव; उडाणटप्पू.

**झाडझाड** स्त्री. वरकणी टाळाटाळ : 'वामनला खुलविण्यासाठी मिट्ठू उगाच झाडझाड करीत असे.' - बाविबु ३१७.(व.)

**झाडझाडोरा-झुडपी-झडुला-झुडूप-झाडझूड** पु. स्त्री. न. लहान मोठ्या झाडांचा समुदाय. (समुच्चयार्थी, एकूणएक, कोणतेही.)

**झाडझूड** पहा : **झाडझपट** १

**झाडण** स्त्री. १. केरसुणी; झाडणी. २. झाडण्याची क्रिया. ३.(ल.) (कर्ज, अन्नसामुग्री इ.) बेबाक करण्याची क्रिया; फडशा पाडणे; देणे; वारणे; काम पार पाडणे.

**झाडणा** वि. झाडणारा : 'मी झाडणा मी खिल्लारी ।' - एभा १२.५६१.

**झाडणी** स्त्री. १. झाडण; केरसुणी : 'चित्तीं म्हणे नृप अहा चवरी ती झाडणीचं कीं केली ।'- मोआदि १२.७८. २. झाडणे; झाडून, झटकून टाकणे. ३. अंगातील भूत, पिशाच्च इ. मंत्रतंत्रांनी काढणे; पिशाच्च, विष, डोळ्यातील फूल इ. काढण्याकरता मांत्रिक करतात तो टाहाळ टाकण्याचा विधी; हकालपट्टी: 'अहंमहिषासुर लागला जनीं । त्यासि करावया झाडणी । कृष्ण गुणी चालिला ।' - एभा ७.२०८. ४. (ल.) रागे भरणे; कानउघाडणी; खरडपट्टी; खडसावणी; निर्भर्त्सना. ५. गर्भपात : 'मला दिवस गेलेत; झाडणी करायची का?'- राकाधाका १. [सं. झाटन; त. शोदनि]

**झाडणे** उक्रि. १.(केरसुणी इत्यादींनी) केरकचरा काढून साफ करणे; जागा निर्मळ करणे. २. हसडणे; झटकणे; झटक्याने हलविणे (ओले, वस्त्र, शेंडी इ.); (हात, पाय डोके इ. ना) झटका येणे : 'झाडितां आपला हात । लंब आंगासि असे जडित ।' - परमा १०.१९. ३. लोटून देणे : 'त्यांतें उडोनि झाडी झाले ते चूर्ण जेविं नगपातें ।' - मोवन १२.२९. ४. काढून टाकणे; नाहीसे करणे : 'लोक पारखुन सोडावे । राजकारणें अभिमान झाडावे ।'- दास ११. ५. (विस्तव इत्यादिकांस) पंख्याने वारा घालणे; झडपणे. [सं. झाटन; क. जाडिसु](वा.) **झाडून टाकणे** - झटकणे; अंगाबाहेर टाकणे : 'भाऊ असे झाडून टाकील असे त्यांच्या स्वप्नीही आले नव्हते.' - केस्व ३०.

**झाडणे** उक्रि. १. खरडपट्टी काढणे ; खडसावणे; निर्भर्त्सणे : 'बाळूला आणि नंद्याला लक्ष्मीकाकूंनीं चांगलेच झाडलें.' - सुदे ५२. २.(मागणाराचा,भिकाऱ्याचा) निषेध करणे. [सं. झाटन; क. जडि]

**झाडणे** उक्रि. १. (सरकार, सावकार इत्यादिकांची) बाकी काढून टाकणे; देणे बेबाक करणे: 'धन्याची बाकी हळु हळु झाडा ।' - भपसं १३४. २.(अंगातील भूत, पिशाच इ.) काढणे; हाकलून लावणे.

**झाडणे** उक्रि. (बंदूक इ.) उडविणे; गोळी मारणे.

अक्रि. (बंदूक उडताना हात इ. अवयवाला) हिसडा, झटका देणे.

**झाडणे पुसणे** उक्रि. काळजी घेणे. पहा : **झाडणे** ४

**झाडदस्त** पु. फळझाडावरील कर : 'झाडदस्त झाडे सुमारी ३१ येकूण रुपये.' – मसाप २.२.१४३.

**झाडन–नी** स्त्री. झाडणी; गवताची केरसुणी.

**झाडनी** स्त्री. कडाक्याच्या थंडीने, किंवा फार आंबट पदार्थ खाल्ल्याने (मनुष्याने केलेली) हात, पाय, डोके इ. झाडण्याची क्रिया; शहारे आल्यासारखे करणे. (क्रि. देणे.)(व.)

**झाडनी** स्त्री. (अंगातील भूत, विष इ.) मंत्रोपचाराने काढणे, कमी करणे : 'भूतबाधा झालीसे इजला करा झाडनी याघडी।' – होबाला १४१.

**झाडपच्छाड** स्त्री. बोलाचाली; उत्तरप्रत्युत्तर; तंटा; भांडण: 'आम्ही मेलो. आमची झाडपच्छाड बहूतच झाली. आम्ही जाऊ न देऊ ऐसें देखोन बाबाजी म्हसके यार्णी निकाल काढला.' – पेद ३३.३२७.

**झाडपट्टी** स्त्री. १. शेतसारा किंवा घरपट्टी याबद्दलची बाकी चुकती करण्याची अखेरीची मागणी. २. (उप.) खरडपट्टी; खडसावणी; बोडंती. (क्रि. करणे.)

**झाडपदरी** वि. किनारीमध्ये रेशमाची झाडे, फुले काढलेले (वस्त्र इ.).

**झाडपंचाळ** वि. १. (माकड अतिशय चपल असल्याने ते जणू काय एकाच वेळी पाच झाडावर असल्याचा भास होतो यावरून) चपळ; तरतरीत; टुणटुणीत; चलाख. २. चंचल; चळवळ्या; चुळबुळ्या; पायावर भोवरा असलेले (मूल इ.).

**झाडपाखड** स्त्री. १. (धान्य इ.) सुपाने पाखडण्याची, झटकण्याची, साफ करण्याची क्रिया. २. (ल.) कवडीकवडीचा हिशोब देणे-घेणे.

**झाडपाला** पु. १.(व्यापक) (औषधाच्या उपयोगी) वनस्पती, त्याचा पाला, मुळे इ.; (सामा.) वृक्ष; वनस्पती. २. (व्यापक अर्थी) खाण्याच्या उपयोगाचा भाजीपाला, पाने इ.

**झाडपि(पी)ड, झाडपेड** स्त्री. न. झाडझूड; झाडलोट: 'झाडपीडी करूनि मानऊं संताला ।' – दावि २५३; 'खालच्या प्रशस्त अंगणात झाडपेड संपून पाणी शिंपडणं चाललं होतं.' – कलंदर २७३.

**झाडपिड्या** वि. देऊळ, मंदिर इत्यादिकांची झाडलोट करणारा.

**झाडपी** वि. (भंडारा गोंदियाकडचे) झाडीत राहणारे.

**झाडपेढ–झाडमाड** पहा : **झाडझाडोरा**

**झाडपोते** न. कर्जफेडीचा शेवटचा हप्ता.

**झाडफूक** स्त्री. अंगारा; धुपारा; मांत्रिकांकडून करायचा मंत्रोपचार. (क्रि. करणे.) (ना, झाडी)

**झाडफेडणी, झाडफेडी** स्त्री. झाडणी; केरसुणी : 'शूद्री झाडफेडणी झाडफेड करी।'-योसं ६.४१.

**झाडबंदर** न. खेळाचा एक प्रकार : 'झाडबंदरही खेळत असू.' – माआवा ७८.

**झाडबाकी** स्त्री. १. (कर्ज, अन्नसामुग्री इ.ची) पूर्ण निःशेषता; बेबाक; निरानिपटा. २. कर्जफेडीचा शेवटचा हप्ता. (क्रि. करून टाकणे, करणे.)

**झाडबोहोर** स्त्री. स्वच्छता. (झाडी)

**झाडरू** न. लहान झाड; झुडूप : 'या बाजूस रानातून, डोंगरावर दणवा, रामाठा वगैरे झाडरूच रगड ?' – खेया ४३.

**झाडली** स्त्री. गलबतात शौचविधीसाठी केलेली लाकडी शिंक्यासारखी चौकट.

**झाडलें** न. झाडझुडुप.

**झाडलोट** स्त्री. केर काढणे, सारवणे इ.; झाडझूड; केरवारा : 'बाकी झाडलोट, जेवणखाण आई व बायको मिळून करीत.' – माआ ५०.

**झाडवण** स्त्री. न. झाडण्याची क्रिया; केरसुणी : 'त्या हातात ही झाडवण घेतलेली मला बघवत नाही.' – उःशाप ४३१.

पु. १. झाडणारा : 'चोखामेळा म्हणे मी तुमचा । झाडवण साचा म्हणवितो ।' – चोखा. २. केरसुणी; झाडू.

**झाडवळ** वि. झाडूवाला : 'आवघे झाडवळी महार । उतरले पार संतासंगें ।' – भपसं ६३.

**झाडवान** पु. झाडलोट, सफाई करणारा गावकामगार.

**झाडविणे** उक्रि. गदगदा हलवून खाली उतरविणे.

**झाडशाई** स्त्री. वस्त्रांवर काढलेली झाडाझुडपांची चित्रे.

वि. झाडांची चित्रे ज्यावर आहेत असे (वस्त्र, भिंत, जमीन).

**झाडसारव, झाडवणसारवण, झाडसारवण.** स्त्री. (घर इ.) झाडणे व शेणाने सारवणे इ. क्रिया; साफसुफी : ' झाडसारवण... वगैरे... करतांना त्यांचीं अंगें उकिरड्यासारखी होत असतील यांत काय नवल!' – नाकरु ३.९.

**झाडसुने** न. झाडकुत्रा; कुत्र्याची एक जात: 'पाणसुनीं झाडसुनीं । नाना प्रकारांचीं सुनीं ।' – दावि २४४.

**झाडळ–ळी** स्त्री. दाट झाडी; राई : 'जीवधर्माचिया झाडळी । मनोरथाचिया वंशजाळी ।' – ज्ञाप्रबो २६६.

**झाडा** पु. १. (कायदा, सामानसुमान इ. ची सरकारी नोकराने केलेली) झडती; बारीक तपासणी. (क्रि. घेणे.) २. (सामा.) हिशेब चुकता करणे; हिशेब, देणे-घेणे मिटविणे. ३. (ल.) पूर्णपणे, काही लपवून न ठेवता उघड करणे; खरे स्वरूप प्रकट करणे; झडती देणे: 'अहंतादि भावां आपुलियां । झाडा देऊनि आघवेयां ।' – ज्ञा १५.२७९.[सं.झाटन्] (वा.) ० **करणे** – १. कर्ज फेडणे : 'झाडा करून देऊ.' – भाअ १८३५.२७५. २. नाश करणे; निकाल करणे : 'ऐसा द्वादश बाणें झाडा केला।' – जैअ ३०.३७. ० **सुचणे** – विस्तारपूर्वक सांगणे: 'श्रोते म्हणती न सुची झाडें । लग्न निवाडें लागोंद्या ।' – एरुस्व १५.१५९. ० **होणे** – संपणे : 'आतां बातमी हरकारे झाडा झाले, लवकरी आणीक पाठविणें.' – पेद १०.९१.

**झाडा** पु. जुलाब; मलविसर्जन; मलशुद्धी.

**झाडा** पु. काबळ्याची एक पट्टी.

**झाडा** पु. फन्ना; निकाल; फडशा; निरास : 'त्याच दिसीं झाडा द्रव्याचाही जाला ।' – रामक २.९९.

**झाडाखडा** पु. पिवळे वस्त्र.

**झाडाझटका** पु. शौचमुखमार्जनादी विधी : 'लोकांसही सांगितलें कीं कंबरा सोडून झाडाझटका करावा आणि फिरून यावें.' – ऐको ४६४.

**झाडाझटका** पु. (व्यापक) सरकारी नाके इत्यादिकांवर केली जाणारी झडती, तपासणी इ.

**झाडाझडती** स्त्री. १.( व्यापक) पहा: **झाडाझटका.** २. (एखाद्याकडून) कवडीकवडीचा हिशेब घेणे; हिशेबाची कसून केलेली तपासणी. (क्रि. घेणे.).

**झाडापट्टी** स्त्री. घरपट्टी किंवा जमीनसारा भरण्याची सरकारकडून आलेली अंतीम मागणी.

**झाडापत्र, झाडापत्रक** न. मामलतदाराने ठेवायचे सारावसुलीचे मासिक पत्रक. पहा : **निकालपत्र**

**झाडापवाडा, झाडापाडा** पु. १. कसून हिशेब मागणे; कडक रीतीने जाब विचारणे. २. अशा तऱ्हेने दिलेला हिशोब, जाब, झडती (सामान्यत: अनेकवचनी प्रयोग). (क्रि. करणे, देणे, घेणे, होणे, येणे.) : 'न सुटेचि बाकी नव्हे झाडापाडा ।' – तुगा १५४३.

**झाडाबाकी** स्त्री. (कर्जाच्या) बाकीचा निकाल, फडशा : 'नामदेवा म्हणती घ्यावा जन्म तुम्हीं । झाडाबाकी आम्ही करूं येथे ।'– रामक २.१४३.

**झाडावा** पु. तपासणी; शुद्धी.

**झाडावॉरंट** न. (कायदा.) जंगम माल शोधून काढून दंडाधिकाऱ्याकडे हजर करण्याबद्दल पोलीस अधिकाऱ्याला दिलेला हुकूम.

**झाडी** स्त्री. १. झाडणे; झाडून टाकण्याची क्रिया : 'मुरडिवें आंगें झाडी करितु । अनियाळां डोळां वेंझ घेतु ।' – शिव ७१०. २. निकाल; फडशा. पहा : **झाडा.** ३. शुद्धी : 'देहजाड्याचिया किटा । आवृत्तिपुटीं सुभटा । झाडी कीजें'– ज्ञा १७.२०९. ४. लांबविणे; पळविणे. (वा.) ० **करणे** – झाडून टाकणे; निकाल, नाश करणे: 'स्वानंदे तृप्ति झाली । झाडी केली भवरोगा ।' – एभा १०.२९.

**झाडी** स्त्री. १. जंगली किंवा झाडाझुडपांनी व्यापलेला प्रदेश; राई; झाडांचा समुदाय : 'ज्यांच्या रम्य तटांवरी पसरल्या झाड्या किती सुंदर ।'– केक १२८. २. झाडोरा; झाडाझुडपांनी व्याप्त अशी अवस्था, निबिडता. (वा.) ० **लागणे** – जंगल वाढणे; मशागतीवाचून राहणे.

**झाडी** स्त्री. गलबतांच्या वांकांच्यामध्ये उभे घातलेले लाकूड; (गलबताच्या) वाकांची वाढी व भाग व गलबताची एक एक बाजू यांना जोडणारा तिरपा वासा. (हेट.)

**झाडी** स्त्री. एक लहानसे लाकडी टाळासारखे गोंडी वाद्य. (ना., का गोंदी.)

**झाडू** पु. १. केरसुणी; खराटा. २. झाडणारा; भंगी हलालखोर : 'ही बया माझ्या शिकारखान्यामधीं झाडूचं काम करीत व्हती.' – बाबं २.६.

**झाडूखोर** पु. भंगी; मेहतर. (ना.)

**झाडून** क्रिवि. यच्चयावत्; एकूणएक; एकही न वगळता: 'यदुसचिव पौरमुख्य द्रुत आणविले सभेंत झाडूनी ।' – मोमौस २.२९.

**झाडूवाला** वि. रस्ते झाडणारा; भंगी : 'पहिल्याच झपाट्याला झाडूवालीचें काम पत्करते.'– नाकरु ३.३८.

**झाडेकरी** पु. (जकातीच्या नाक्यावर नेमलेला) जकात अधिकारी.

**झाडेकार** पु. भूतबाधा घालवणारा, विष इ. उतरविणारा मांत्रिक. (गो.)

**झाडेझडोरे** न. दाट झाडी; राई : 'झाडेझडोरें लागत होती.' – जांदि ८०.

**झाडेभवांडे** पु. अव. १. अळंटळं; हयगय; दिरंगाई. २. हाल; हालअपेष्टा; भोग. (व.)

**झाडेमोह** न. झाडाच्या फांद्यावरील झाडायला सोपे असे मोहळ.

**झाडोरा–ली** पु. स्त्री. १. दाट, गर्द झाडी; राई; दाट झाडेझुडपे असणारी जागा : 'कल्पतरूंचे झाडोरे ।' – वेसीस्व ९.२०; 'विचित्रा वेदवेलीं । दिसतीं सहजें सिद्धांओळीं । भावा भावाचिआं झाडौली । चहींकडें ।' – वच्छह ४४४.(को.)

**झाड्या** पु. १. झाडूवाला; भंगी. २. सोदा; उचल्या; भामटा; चोर.

**झात् झात् करणे** मिनतवारी करणे : 'मी त्याला पुष्कळ सांगितले. झात् झात् केली; पण त्या दुष्टाने ऐकलें नाहीं.' – मोचन ९८.

**झान** न. सैन्य.

**झान** न. ज्ञान : 'कोणां सांगतसां झान । ठकाठकीचें लक्षण ।' – तुगा १४३०.

**झानन** पु. झनझन असा आवाज; झणझणाट; झणत्कार; छुमछुम; रुणझुण; नाचण्याचा आवाज. पहा : **छनन** : 'धिमकी धिमकी धिमभेरी – झननन झांनन झनत्कारी ।' – राला ३८. [ध्व. झन्]

**झानी** पु. बाहेरख्याली, व्यभिचारी मनुष्य. [अर.]

**झाप** पु. १. काटेरी झुडपांचे दाबून बांधलेले मोठे ओझे; काट्यांचा भारा. २.झाडाची मोडलेली फांदी; झाकर. ३. नारळीच्या झाडाची फांदी, झावळी, सावळी.(को.) ४. नारळीची, माडाची विणलेली झावळी; झावळीची चटई : 'शेतात झापाचे हंगामी थिएटर बांधीत...'– माजीया ४६. ५. माडाचे झावळ. ६. कळकाचा किंवा फोकांचा रात्री कोंबड्यांना झाकण्यासाठी केलेला टोपला, करंड्याच्या आकाराचे खुराडे : 'आई... कुडीक झाप घेऊन गावात... गेलीली.'– उपरा २. ७. गुरे जाऊ नयेत म्हणून केलेले फाटक; दुबेळके ; बेडे. ८. दाराचे, खिडकीचे झडप; फळी. ९. शेतातील गवतारू झोपडी : 'शेतात एकदोन घरें असलीं तर त्यांना झांप म्हणतात.' – गांवगाडा २.

**झाप** न. गुंतागुंत. (गो.) पहा : **घुसणी**

**झाप** स्त्री १.पक्ष्यांची झडप; झेप; उडी. (क्रि. घालणे.) २. (मनुष्य पोहताना, साप सरपटताना, कडेवरील मूल एखाद्या ओळखीच्या माणसाच्या पुढे केले असताना करतात ती) शरीराचा पुढील भाग थोडा उंचावून पुढे झोकण्याची क्रिया; झेप. ( क्रि. टाकणे, मारणे, घालणे, खाणे.): 'त्या तरुणीने एकदम झाप टाकली.'– वज्राघात ३. ३. (चोर इ. चा) हल्ला; छापा. (क्रि. घालणे, पडणे.). [सं.झंप]

**झाप** स्त्री. (मूर्च्छा, भूतबाधा, पित्त इ. मुळे) डोळ्यावर येणारी गुंगी; झापड; ग्लानी; तंद्री. [सं.स्वाप]

**झापकणे** अक्रि. फसणे.

**झापकुडूके** न. काड्या, फोक यांच्या विणलेल्या तट्ट्या किंवा टोपल्या : 'असेल झापकुडूक्याचं गिऱ्हाईक.' – उपरा १.

**झापटळ** न. माडाची जुनी झावळी; जुनी झाप.

**झापड** स्त्री. १. (पित्त, मूर्च्छा इत्यादींमुळे डोळ्यावर येणारी) झाप; गुंगी; ग्लानी; तंद्री; झोपेचा पगडा; डोळे मिटू लागणे. (क्रि. पडणे, घालणे.) सुस्ती: 'या स्वामीस लागले वेड । सादर मृत्यूझापड ।' – नमसा १५.७४. २. ढगांची अंधारी, काळोखी; मळभ. (क्रि. घालणे.) ३. तोंडावरून पांघरूण घेणे: वस्त्राने तोंड झाकणे. (क्रि. घालणे.) ४. (ल.).भूल; मोह; भुरळ : 'यांस कालगतीमुळे झांपड पडली.' – भाब ४८. ५. जनावरांच्या डोळ्यांना बांधतात ती ढापणी. ६. पहाट;

उषःकाल.(खा.) (वा.) ० **देणे** – एखाद्याच्या तोंडावरून हाताचा पंजा उलटा करून डोक्याकडून खाली उतरणे. २.(ल.) फसविणे. (व.)

**झापड** स्त्री. आटोका; तावड : 'लोक त्यांना फितविण्यास आले परंतु ते त्यांच्या झापडींत आले नाहीत.' – सअस ४०८.(ना.)

**झापडकन्** अ. ताडकन्. (व.)

**झापडवाला** वि. १. डोळ्यांना झापडे लावलेला. २. (ल.) ठोकळेबाज विचारांचा; पोथीनिष्ठ : 'पथ्यावर पडणारा एक झापडवाला विचारपंथ आहे.' – अंया २११.

**झापडी** स्त्री. १. गुंगी; ग्लानी; तंद्री : 'बाण सुटले कडाडी । पडली डोळियां झांपडी ।' – एरुस्व १०.१९. २.अंधारी. पहा : **झापड** ७; 'कां तेलियाचा ढोर पाही । डोळां झांपडी स्वदेहीं ।' – एभा २१.२६१. ३. तोंडावरून वस्त्र गुंडाळणे; घुंघट ; बुरखा. ४.पावसाची झडप घरात येऊ नये म्हणून दारावर, खिडकीवर केलेली पत्र्याची, गवताची छपरी, झडप, झांजी. (व.) ५. (सामा.) पहा : **झापड.** (वा.) **झापडीत येणे** – फसणे; भुलणे; कपटात गुंतणे.

**झापण** न. गुंगी; ग्लानी; तंद्री. (क्रि. पडणे, घालणे.)

**झापण–णी** न. १. झाकण; ढापण; आडोसा : 'हातांच्या तळव्यांचे भुंवयावर झापण करणे.' – ननाना १२५. २. झोपडीच्या दाराची झडप; झापी.

**झापणी** स्त्री. अंधारी; झापड; झापण.

**झापणे** सक्रि. खडसावणे.

**झापणे** उक्रि. १. झाकण घालून बंद करणे; झाकणे; झाकण ठेवणे. २. दिपणे. – प्रामको. [सं. छद्]

**झापणे** पहा : **झेपणे**

**झापती** न. जोते; बैलाचा गळा जुवाशी गुंतवणारा पट्टा : 'जू त्येंच्या खांद्यावर ठिऊन झापत्या बांदल्या.' – रैत २५.

**झापर** न. १. झोपडीचे फाटक ; झापा. (ना.) २. गवताने शाकारलेली झोपडी : 'तिथे झापरीकडे हात केला.' – चंदभू ३८.

**झापरे** न. डोक्यावरील केसांचे छप्पर; झिपऱ्या. (ना.)
वि. केसाळ.

**झापविणे** सक्रि. झाकण घालून बंद करणे; झाकणे : 'आपल्या हातानं माजी बोटं त्यावर झापविली.' –रैत १०४.

**झाप(पा)ळणे** अक्रि. १.(झाड) दाट फांद्यांनी, पालवीने युक्त होणे; गर्द, घनदाट होणे. २. (मेघ इत्यादींनी आकाश) दाटणे; व्यापणे; झाकोळणे; भरून येणे.

**झापा** पु. (कुंपण, झोपडी, गोठा यांचा )तट्ट्या; कामट्या, गवत, झावळी इ. चा केलेला दरवाजा, फाटक; झाप: 'त्या कबरस्थानाचा लोखंडी झापा उघडलेला होता.' – आर्फियस १.

**झापा** पु. छापा : 'लक्ष्मण खंडागळे व आनीक डोंगरे मिळोन झापा घातला. नारो अप्पा मोडला, फौज लुटली.' – पेद १४.४८.

**झापा(प)ळ** न. १. झाकर; गर्द छाया; झाडाच्या फांद्यांचा निबिडपणा; दाट झाडी. २. ढगांची अंधेरी. (क्रि. येणे.)
वि. दाट फांद्या असलेले (झाड); गर्द; निबिड; घन; दाट.

**झापी** स्त्री. झापड.

**झापी** स्त्री. वारा किंवा ऊनपाऊस यांचा त्रास होऊ नये म्हणून बांबूच्या कामट्या किंवा झावळ्या यांच्यापासून तयार केलेला आडोसा.

**झाबड** वि. अगदी वृद्ध; म्हातारपणामुळे रोड झालेली; जख्खड. (व.)

**झाबळा** पु. दोऱ्यांची विणलेली पिशवी; जाळे. पहा : **झारगे** (कु.)

**झाबळी** स्त्री. १. पकडलेले मासे ठेवण्याचे कोळी लोकांचे लहान जाळे.(को., हेट.) २. जाड्या सुताची विणलेली जाळीदार पिशवी. (हेट.) ३. गवत ठेवण्यासाठी बैलगाडी खालील असलेली पिशवी. (कु.)

**झाबा–बू** पु. तेल ठेवण्याचा, ओतण्याचा चामड्याचा बुदला; तेलाचे कातडी भांडे. [हिं.झाबा]

**झाबू–वू–ऊ** १. क्षुल्लक; किरकोळ. २. अशक्त; मोडके-तोडके. ३. कुचकामाचे.

**झामझुक्का** पु. खेड्यातील मुलींचा एक खेळ.

**झामड, झामडणे** पहा : **झांबड, झांबडणे**

**झामर** न. कागदी लिंबाच्या जातीचे एक अतिशय आंबट फळ; ईडलिंबू. [सं.जंबूर]

**झामरा** वि. केसाळ; फार केस असलेली (कुत्र्याची जात. लक्षणेने. माणसालाही म्हणतात).

**झाम्या** वि. मूर्ख; लहरी.

**झाय–या** स्त्री. झळ; झळा: 'इतलं लेसीनी परघर जाशी । आई बा जीवाले झाया लावशी ।।' – लोसाको. (खा.)

**झायमिली** स्त्री. तळमळ; तडफड; अस्वस्थता : 'पाऊस नि वारं ... एकच झायमिली सुरू झाली.' – रैत १३७.

**झायलिन** न. दगडी कोळसा किंवा खनिज तेलापासून मिळणारे एक विद्रावक. [इं.]

**झायाझुया** स्त्री. अव. (ऊन्ह, ताप यांमुळे दिल्या जाणाऱ्या मोठ्या) धापा; सुस्कारे; श्वासोच्छ्वास. (क्रि. करणे, देणे, टाकणे, होणे.) : 'गिरीजा करी झायाझुया.' – जलोसा १२८. [ध्व.]
क्रिवि. धापा टाकीत; लाहक्या, अहाळण्या देत.

**झायीझायी** क्रिवि. झळा येऊन : 'उन्हायाचं ऊन लागते झायीझायी। भाऊ गेला गांवी छतरी नेली नाई ।।' – लोसाको. (व.)

**झार** स्त्री.तांदूळ इ. धान्याचे कुटल्यानंतर, दळल्यानंतर, चाळणीने चाळून राहिलेले अतिशय बारीक कण. (राजा.) [सं.क्षर]

**झार** पु. १. रशियाच्या राजघराण्यातील राजाची पदवी. २.(ल.) जुलमी राजा.

**झार** पु. न. शेवाळासारखा नदीतून वाहून तीराला लागणारा एक बुळबुळीत पदार्थ.

**झार** वि. (तंतुवाद्याच्या तारेला झारा लावला असता होणाऱ्या आवाजाप्रमाणे) खणखणीत; उंच आणि स्वच्छ आवाजी; पहाडी (कंठ, तंतुवाद्य इ.). [ध्व.]

**झार** वि. अतिशय कडू; कडू जहर.

**झार–रे** न. समुद्रातील एक प्राणी. याच्या समुदायाला आकृतीवरून पोर्तुगीज लोकांचे लढाऊ जहाज या नावाने संबोधितात. (कोळी)

**झारगे** न. १. (झाडावरून फळे काढण्याची) जाळी लावलेली आकडी; झेला. २.( सामा.) जाळे; पिशवी. ३. नारळ वगैरे आणण्यासाठी दोऱ्यांच्या जाळ्याची केलेली पिशवी; थैली. (कु.)पहा : **झाबळा.** ४. मळणी झाल्यानंतर प्रथम ज्या चाळणीने धान्य चाळतात ती चाळण, चाळणी. (को.) [सं. क्षर]

**झारणी** स्त्री. १. चाळणी. २. गाळणे : 'वामननं तीनदा समजावूनहि झारणीनं पिंपातलं तेल कसं हापसायचं ते त्याला जमेना.'– बाविबु १५५.

**झारणे** उक्रि.१.(माती, पीठ इ.) चाळणे; गाळणे. (राजा.)२. पहा : **झारा** [सं. झृ]

**झारदार** वि. खणखणीत; उंच (आवाज) : 'त्यांचा तो बारीक पण मंजुळ व झारदार आवाज दूरवर ऐकू येई.' – विरंगुळा ९६.

**झारय** स्त्री. खेकडे धरण्याचा गळ. (गो.)

**झारशाही** स्त्री. १. झाराचा अंमल, राज्य. २. (ल.) झार बादशहाच्याप्रमाणे जुलमाचा व दडपशाहीचा अंमल : 'सरकारच्या झारशाही जुलुमाचा निषेध केला आहे.' – के २७.५.३०.

**झारंबा** पु. १. (उसाचा रस कढत असताना त्यावरील किंवा तेलावरील) मळी काढण्याची अथवा छाटण्याची परडी; झारा; टोपली. २. तेलातील गाळ.

**झारा–री–ऱ्या, झारिया, झारे, झारेकरी** पु. १. सोनाराच्या दुकानातील राख विकत घेऊन ती चाळून, गाळून तीतून सोन्याचे कण काढून त्यावर चरितार्थ करणारी एक जात व तीतील व्यक्ती : 'मिरविती गुणज्ञ कनका काढी सूक्ष्मा जपोनि झारा ऱ्या।' – मोमंभा २.१. २.(ल.) कृपण; कद्रू.

**झारा** पु. १. वीणा इ. तंतुवाद्याच्या घोडीजवळ तारेखाली घातलेला कापूस, लोकरीची दशी.(आवाज चांगला येण्यासाठी). २. तंतुवाद्यातील खर्ज स्वराची पितळी तार. ३. झाऱ्याच्या योगाने निघणारा चांगला आवाज; या आवाजासारखा कंठातून निघणारा आवाज. [ध्व.झार]

**झारा** पु. १. दांडा असलेले तसेच एका टोकाला सपाट, वाटोळे व सच्छिद्र असलेले स्वयंपाकातील एक उपकरण. २. गाळण्याचे साधन; गाळणी : 'नीर बहुत ठाईं हिंडलें । झारा घातला मग निवळलें।' – दावि ७७४. ३. पाणी तापविण्याच्या बंबातील विस्तव ठेवण्याची जाळी. [सं.झृ]

**झाराझुरा** पु. चुरा; चाराचुरा : 'पाणी वरून पडतें । मोत्यांचा झाराझुरा । जाते पाणी देवघरा।'– वलो २२.(व.)

**झारि** स्त्री. साल; फलकट; क्षार : 'अमृता ही झारि फेडिजे ।'–राज्ञा १८.१३२०.

**झारी** स्त्री. १. लांब गळ्याचे, पाणी थंड राखण्याचे (विशेषतः जस्ताचे) भांडे. २. तोटी असलेला गडू : 'निघे न झारींतुनि नीरबिंदु ।' –वामन, वामनचरित्र १.२७. ३. झाडांना पाणी घालायचे जस्ताचे भांडे. याला एक लांब तोटी असून तिचे तोंड पसरट व सच्छिद्र असते. ४. चहाची किटली. ५. तोटी. [सं.झृ]

**झारी** पु. झारेकरी : 'कीं धुळींत हारपलें मुक्त । झारी निवडी सावचित्त ।' – राvि ३१.४५.

**झारीची पळी** झारा. –(तंजा.)

**झारे** पहा : **झारंया १**

**झारोखा** पु. १. झरोका; खिडकी. २. भिंतीतील मडके वगैरे पुरलेला कोनाडा. पहा : **झरोखा**

**झारोळी** स्त्री. झाऱ्यावर भाजलेली पोळी : 'पोळ्या पुरणपोळ्या झारोळ्या.'– ऐनिसं २७०.

**झार्पानी** पु. तळाचे अवशिष्ट पाणी. (झाडी)

**झाल** स्त्री. १. एखाद्याच्या अंगावर लहान मुलाने टाकलेली झेप, उडी, झाप. (क्रि. टाकणे.) २. (गोट्यांच्या खेळात) गोटी विशिष्ट मर्यादेच्या बाहेर पडणे, फेकणे. (क्रि. खाणे.) ३. एखाद्यावर रागाने धावून जाण्याची क्रिया. (क्रि. जाणे). ४. झोल; झोकांडी; चाचरी. (क्रि. जाणे.)

वि. (प्र.) पहा: **जहाल** (वा.) **० जाणे** – (कोणा एकावर) त्याला उद्देशून अमर्याद भाषण करणे.

**झाल** मोहाचा मोठा वृक्ष. (झाडी)

**झाल** स्त्री. सायंकाळचा अंधार; झांजड. (ना.,व.)

**झाल** स्त्री. १. सुरमाडाच्या फळांचा व फुलांचा लोंबता घोस. (कु.) २.सुरमाडाच्या पानांचे केलेले पायपुसणे.

पु. बैलांच्या शिंगाला बांधायचा केसांचा गोंडा.

**झाल, झाल झेंडा** १.डाली; वेळूचे केलेले उथळ व पसरट शिपतर. २. हिंदू विवाहातील एक विधी. शिपतरात कणकीचे दिवे, फळे व इतर पदार्थ ठेवून वधू वरगृही जाण्याच्या पूर्वी वराच्या आईला दान करतात. पहा : **ऐरणी** : 'चरव्या घागरी आणि झाली । हारे डेरे रत्नाचे ।' – वेसीस्व १४.३९. [क.जह्ली]

**झाल झेंडा** पु. १. बांबूच्या चपट्या पट्ट्यांचा केलेला त्रिकोणी ध्वज. २. उत्कर्ष : 'नाच नाच माझ्या जीवा । संसाराचा झालझेंडा ।'–बगा १७.

**झालणा** पु. बांबूच्या कड्याला अडकवलेले मासे धरायचे हातजाळे. ह्याला हातझालणा असेही म्हणतात. (को.) [सं. जाल]

**झालमान** पु. न. झोल; झोका.

**झालर** स्त्री. १. झांज; झांजरी; टाळ: 'मुहूर्तविद झालर त्वरित वाजवी त्या क्षणीं ।' – सीक ३०. २. मोठ्या आवाजाचे एक रणवाद्य: 'चौघडे व नगारे व डौल व झालरी व तासे इत्यादी रणवाद्ये गावांत कोणास वाजवूं देऊं नये, परंतु मंगलवाद्यें वाजविल्यास चिंता नाहीं.' – वेधप्र. [सं. झल्लरी]

**झालर** स्त्री. १.मंडप, छत, झगा इ.ना शोभेसाठी लावलेला, चुण्या घातलेल्या कापडाचा पट्टा; संजाप; मगजी; नक्षीदार काठ. २.(नाट्य) राक्षसाच्या सोंगाने नेसायचा लुगड्याचा–चुण्या पाडलेला– घागरा. ३. (नाट्य) पडद्याच्या वरच्या बाजूला लोंबणारा कापडाचा चित्रित पट्टा. उदा. महालाची, आकाशाची, जंगलाची झालर. [का. जा(झा)लरि; सं. झल्लरी; हिं. झाल्लरी]

**झालर** स्त्री. १.गुऱ्हाळातील मांदण किंवा नांद यावरील चिव्याचे केलेले झाकण; चाळणी; उसाचा रस गाळून घेण्याची विरळ विणीची टोपली. २. विवाहसमारंभात वरातीच्या दिवशी जिच्यात तांब्या व बाळकृष्णाची मूर्ती ठेवून मानकऱ्याच्या डोक्यावर ठेवतात ती झाल. पहा : **गोपा** ३

**झालरदार** वि. शोभेसाठी लावलेला चुण्या घातलेला पट्टा; नक्षीदार काठ : 'कोठे अणकुचीदार तर कोठे झालरदार.' – डाली १०२.

**झालरी** स्त्री. झालर; लोंबती किनार.

**झाला** पु. (वाद्य) सतारीच्या सर्व तारांवर (चिकाऱ्यासुद्धा) द्रुत गतीने सतत बोल काढणे; बीन किंवा सतार वाजवीत असता कड – झीलीच्या तारेत ताल धरणे.

**झाला** वि. वयात आलेला बैल. (झाडी)

**झाला** पु. मुलगा : 'वांझेचिया झालिया.' – अमृता ७.८२.

**झालेपण** न. जन्म; आयुष्य : 'विजेसिंग युद्धास आला म्हणोन नामोहरम व्हावें तरी झालेपणाचें सार्थक काय?' – माब १०.

**झालोरी** स्त्री. झालर; पताका : 'चंवरे झालोरी झलकती।' – क्रिपु १०.७.

**झाल्लर** वि. १. सैल. २. डेरेदार. (झाडी)

**झाव** स्त्री. (उन्हाची) झळ, तिरीप; उष्ण वाफा; ऊन : 'उन्हाच्या झावा लागतील ना' – माणूस ३७०. (ना.,व.) [सं. दह] (वा.) ० **काढणे** – १. एखाद्याची खरडपट्टी काढणे.(व.). २. उष्णता कमी करणे.

**झावर** सतरंजी; वाकळ; गोधडी.

**झावरझावर** क्रिवि. अंधुक अंधुक : 'नंबर वाढलेल्या डोळ्यांनी झावरझावर दिसावं तसं...' – अयेवाफु ९.

**झावरेला** वि. उन्हाने करपलेला (आंबा). (झाडी)

**झावळ** न. झुंजुमुंजु; अंधुक उजेड: 'झावळंतच उटलाव की निगालाव गावाकडं.' – पाचोळा ५०.

**झा(झां)वळ** वि. १. विसराळू; भ्रमिष्ट; भ्रांतिष्ट; अजागळ; झांबऱ्या: 'बुद्धि झावल जयाची। तो ते मानी ।' – ग्रंथराज ६.६७. २. विसराळूपणाचे; भ्रमिष्टपणाचे; गबाळपणाचे (वर्तन, भाषण इत्यादी). ३. अस्पष्ट; अंधुक; संदिग्ध: 'एऱ्हवीं संकल्पाचिये सांजवेळें । नावेक तिमिरेजती बुद्धीचे डोळे । म्हणोनि अखंडित परि झांवळें । भूतभिन्न ऐसें देखे ।'– ज्ञा ९.७२.

**झावळझा(मा–व)वळ** न. स्त्री. झुंजुमुंजु; झांजड. पहा : **झांजडमांजड** सर्व अर्थी.

क्रिवि. अंधुकपणे.

**झावळणे** अक्रि. भ्रमिष्ट होणे.

**झावळा** वि. सावलीमुळे काळसर दिसणारा; धूसर : 'पापणी उघडू लागलेल्या झावळ्या डोहाचा प्रवाह...'– डोह १२९.

**झावळी** स्त्री. ताडामाडाचा, पोफळाचा, सुरमाडाचा झाप, फांदी (विणलेली किंवा साधी) : 'सरळ सोट सुरमाड येकावर येक जिवट झावळी।' –प्रला १५४.(को.) [सं. छायावली]

**झावळे** न. झांजड; अर्धवट प्रकाश व अर्धवट अंधार : 'मग गडद नां उजळ । ऐसें झावळें होये।' – राज्ञा ८.२२७.

वि. धूसर; अस्पष्ट.

**झावाड** न. खडकावर आपटणारी पाण्याची लाट. (क्रि. उसळणे, उठणे, पडणे.)

**झावू** वि. क्षुल्लक; किरकोळ. पहा : **झाऊ–बू–वू**

**झावेला** वि. झळ लागल्यामुळे म्लान झालेला. (व.)

**झाशा** पु. धमकावणी; धाक; दहशतः 'सरपंचाच्या बोलण्याचा झाशा पाहूनच हरिजन मंडळी हिय्या का करत नसावीत हे लक्षात आले.' – एगाएपा ६.

**झाषकणे** अक्रि. फसणे : 'कैसे झाषकालो ।' – राज्ञा ७.१८९

**झास** पु. दाट झाडी : 'अनर्थाचे आसुर । जेथ झांस दुर्धर । अतिस्नेहाचे पाझर । उल्हाळें देति ।' – ज्ञाप्रबो २७८. [सं. झप]

**झासा** पु. १. (दुसऱ्याला लुबाडण्याची, इजा किंवा दुःख देण्याची, वाईट करण्याची) धमकावणी; दहशत; दपटशा; धाक; भीती; अमुक गोष्ट न केल्यास पुढे तुझे अमुक तऱ्हेने वाईट करीन अशी (एखाद्याला) दमदाटी; धमकावणी: 'मनाचा बलात्कार कैसा। निर्गुणी पाडी गुणाचा फांसा । लावूनि जीवपणाचा झांसा । संसारवळसा आवर्ती ।'–एभा २३.६१७. २. लुटालूट; पुंडगिरी; उकळेगिरी: '...झांसा करण्यास कोणी माणूस निघेल आणि त्यामुळे बंड, फितुर होईल तर माजिस्त्रेटानें सदर अदालतीची आज्ञा घेऊन.' – न्यासे १००. [सं. झण]

**झासा** पु. तळमळ : 'लाविसी हरी किती मज झांसा।' – सारुह ४.११७. [सं. ध्यास]

**झासुरणे** अक्रि. १. मनात झुरणे; तळमळणे : 'तेंहि ब्राह्मणु नेवों सरे । कीं हाणिचेनि शिणें झांसुरे।' – ज्ञा १७.२९२; २. आळसाने स्वस्थ पडून असणे; निश्चेष्ट पडणे : 'उचितानुचित आघवें। झांसुरतां नाठवे जीवे ।'– ज्ञा १४.१८४.

**झाळ** स्त्री. १. (उन्हाची) झळ; तिरीप; झळई : 'झाळेंकरोनि म्लानलें मुख ।' – दावि १५७. २. डाक देणे. [सं.ज्वाल]

**झाळकाम** न. डाक लावण्याची क्रिया: 'झाळकामाला जेवढी धातू लागते तेवढा...' – कायअं ६२.

**झाळकी** स्त्री. जाळी; झुडूप; राहाटी : 'शिंगें एका झाळकीत अडकल्यामुळे त्या गरीब जीवाचा घात झाला.' – सायं.

**झाळण, झाळणी** न. स्त्री. १. कमी तपमानाला वितळणारा मिश्रधातू वापरून दोन धातूंचे पृष्ठभाग जोडण्याची क्रिया. २. झाळण्याची, डाक लावण्याची क्रिया; डाक लावून घट्ट बसविणे. ३. झाळलेली, डाक लावलेली अवस्था.

**झाळणे** सक्रि. (धातूची भांडी इ.स) कस्तर, डाग लावून अग्निसंयोगाने सांदणे, जोडणे. [सं.ज्वल]

**झाळणे** उक्रि. काढून टाकणे; स्वच्छ करणे; धुणे : 'झाळौनिया लेपु एकु' – ज्ञा ६.४९. [क. गालिसु]

**झाळारी** पु. (स्था.) टीनचा पत्रा कापून त्याला आकार देऊन, सांधे जोड करून वस्तू बनवणारा कारागीर.

**झांकचे** अक्रि. बडबडणे; बरळणे. (गो.) [हिं. झंखना, झकना]

**झांकढाळ** स्त्री. झाकापाक: 'त्यांनी... झांकढाळ, ठेवणें– रेवणें, सर्व व्यवस्था आपल्या लाडक्या सुनेवर सोंपवली.' – सराई १७८.

**झांकणी** वि. बरळणारा; बडबडणारा (गो.)

**झांकर** न. दाट झाडी. [सं. शाख]

**झांकवळपण** न. भुलावणी.
**झांकी** स्त्री. १. शोभिवंत मांडणी, आरास: 'श्रावण महिन्यांत देवाच्या मंदिरांतून झांकी व रोषनाई होण्याचा रिवाज आहे.' – विइंस १.७०. २. ऐट; डौल.
**झांकुळणे** अक्रि. १. साठणे; एकत्र होणे. २. अंधारमय होणे; फिके पडणे. [सं.सम् + कुल्]
**झांगट** न. (ल.) लचांड; ब्याद; भानगड; लफडे : 'सालीचं त्या लक्ष्मी इल्लास हॉटेलवाल्या भंडाऱ्याशी झांगट असलं पाहिजे.' – चक्र १०७.
**झांगड** स्त्री. १. एक प्रकारचे वाद्य; झंगट : 'झांगड नौबत वाजली दणादण ।' – ऐपो ११८. २. अनेक वाद्यांचा एकदम होणारा कडकडाट, गजर. ३. लचांड; लिगाड; झंगट; ब्याद. (व.) ४. भांडण; कलह; बाचाबाची; झांगडझिंगा. [ध्व.]
**झांगड** स्त्री. भांडाभांडी; जोराचे, हमरीतुमरीचे भांडण; झगडा.
क्रिवि. नगारा, नौबत यांच्या आवाजाच्या दणक्याने; मोठ्या गोंगाटाने; गलबल्याने.
**झांगड** न. मोठ्या विस्वणाचे जाळे. (कु.)
**झांगडझिंगा** पु. तंटाबखेडा; धांगडधिंगा; धिंगाणा; धिंगामस्ती. [झांगड द्वि.]
**झांगडू–टू** वि. उत्तम; फकड; फाकडू. (कर.)
न. १. प्रेमपात्र; रखेली बाई. २. प्रेमरहस्य; गुप्त प्रेम: 'गुंडिलांनी हे झांगडू जमवलं कसं?'– ल्व्हाळी ९०.
**झांगरा** पु. उडवाउडव; थापेबाजी. (ना.,व.) (वा.) **झांगरे शिकवणे, झांगरेबाजी करणे** – उडवाउडवीची उत्तरे देणे; बोलताना एखाद्या गोष्टीचा थांग न लागू देणे. ० **पाडने** – कसेतरी काम करणे.
**झांगाटी** स्त्री. फांदी.
**झांज** स्त्री. १. लहर; आवेश; त्वेष. २. मूर्च्छा : 'तरी झांज स्वभावानी आली तरी सबूरी करून गम खाणे हा मोठा उपाय आहे.' – शामब ४.१९२. ३. धुंदी : 'कान्होजीच्या आरमारी सामर्थ्याची इतरांना आलेली प्रचीति पाहून सिद्दीची झांज उतरली होती.' – सह्याद्री ३८६. [सं.झंझा]
**झांज** स्त्री. १.पंखा; विंझणा. २. ताटी; पडदा. पहा : **कुरकुला** : 'वाळियाच्या झांजी । दवण्याचे कुंड घालोनी।' – ऐपो १५.
**झांज–झ** स्त्री. एक प्रकारचे काशाचे वाद्य. हे पुरीएवढ्या काशाच्या तुकड्याच्या मध्यावर थोडी फुगवटी असलेले व तीत दोरी ओवण्याकरिता एक भोक पाडलेले असे असते. ओवलेल्या दोरीस बाहेरील बाजूला धरण्याकरिता लाकडाची गोटी बांधतात. प्रत्येक हातात एक झांज घेऊन त्या परस्परांवर आपटून भजन, कीर्तन इत्यादिकांत ताल धरतात. [फा. सञ्ज.] (वा.) ० **खाणे, झाडणे** – एखाद्याची खरवड काढणे. ताशेरा झाडणे. (व.) ० **झडणे, जाणे** – १. झांजा हातात असणे; झांजा वाजविल्या जाणे. २. एखाद्या कामात असणे; चकमक उडणे; भांडाभांडी होणे; मोठ्याने ओरडून बोलणे.
**झांजड–र, झांजरमांजर, झांझडमांज(झ)ड** न. स्त्री. १. पहाटेच्या वेळचा मंद उजेड; झुंजुमुंजु; अंगावरील लव दिसण्याजोगी पहाट. उदा. झांजड झांजड झालें कीं लागलेंच औषध घ्या. (क्रि. पडणे, होणे.) २. सायंकाळचा संधिप्रकाश : 'झांजर पडतां घेऊन पळे हा रांडमुंडेचा नित भारा।' – प्रला २४०.
क्रिवि. अंधुकअंधुक; मिणमिण.
**झांजण–न** न. पु. १. वेष; आच्छादन. २. वेषधारी; अंगावरून आच्छादन घेतलेला : 'एथ चांगदेओराउळ नाहीं : एकु झांजणु असे : तेयासि गुजरू वेखू असे : मग पाल्हाडांगीया गेला : ' – लीचपू २.२७.
**झांजर** वि. जीर्ण, झिरझिरीत, विरविरीत झालेला (कपडा इ.) : 'एका अंगावर झांजर शेला तो जातो चुरचुरा ।' – पला ८३. [सं. जर्जर]
**झांजर** पु. (हत्ती, बैल, घोडा इ.च्या पायात घालायचा) वाळ्यासारखा झणझण वाजणारा दागिना.
**झांजरणे** अक्रि. १. घसटणे; खरचटणे; खिळखिळीत होणे; पीडणे, पीडा देणे : 'गुडघे कोपर झांजरीति ।।'– दृपा १३.२. घायाळ करणे. [सं. सम् + चर्]
**झांजरता** पहा : **ओझरता**
**झांजरसा** वि. झिजलेला; जर्जर झालेला : 'दोन्ही खांद्याला दोन्ही घट्टे बांधल्या गरशी । वांकडा हातखुळा देह झाली झांजरसी।' – पला ८०.
**झांजरा** पु. चुटपुट; हुरहुर : 'शत्रुनें तुज बांधितां रथिं हुंबरा सम वासरा । फोडिला असशील तूं मज लागला जिवीं झांजरा ।' – कुशलवाख्यान ३२.
**झांजरी** स्त्री. लहान झांज; टाळ : 'मोरचंग झांजरी पतीसंपत्यही नानापरी।'– राला ३१. [फा. सञ्ज]
**झांजरी** स्त्री. हुग्गी. कोंडा काढून केलेली गव्हाची खीर.(बे.)
**झांजरी, झांजी** झोपडीच्या दाराची झडपी (गवत वगैरेची). (व.) पहा: **झांज**
**झांजी–ज्या, झी** वि. झांज वाजविणारा.
**झांजुळ** गाजावाजा.
**झांजू** न. एका विशिष्ट तालात गावयाचे पद, पोवाडा.
**झांझड–डी** स्त्री. सायंकाळचा संधिप्रकाश : 'पहाटेपासून झांझड पडेपर्यंत चालायचं.' – नागीण ११८.
**झांझर–री** पहा : **झांजरी** : 'वाद्यं वाजवायची. चवंडकं, तुणतुणं, झांझरी.' – नागीण १२४.
**झांझरणे** पहा : **झांजरणे**
**झांझी** स्त्री. कापसाच्या पऱ्हाट्यांची विणलेली ताटी. (व., खा.)
**झांटी** स्त्री. दाटी; गर्दी : 'तेथ कृष्णमेघांचिया झांटी। माझि कल्पांतळि जूंचिया फूटी ।' – ज्ञा ११.२०.
**झांप** पु. दाट आच्छादन.
**झांपाळो** वि. झोपणारा; झोपाळू. (गो.)
**झांपुर्क** पु. उंटावरील स्वार; सारवान; बंदूकदार. [अर. तुर्की– झाम्पूरक (झम्बूरक)]
**झांब** स्त्री घेरी; मूर्च्छा.(खा.)

**झांबड** स्त्री. १. हिसकावून घेणे. २. (ल.) लुबाडणे; लुटणे; लूट.
**झांबड** वि. बेडौल; अतिशय मोठा; अवाढव्य.
**झांबड** स्त्री. झापड; अंधार; काळोख. (क्रि. पडणे.)
**झांबड-ड्या** वि. गोंधळ्या; झांबऱ्या; भांबावलेला; भ्रमिष्ट.
**झांब(बा)डणी** स्त्री. हिसकावून घेणे; लुटमार; लुटालूट; नागवणूक.
**झांबडणे** अक्रि. (आजारीपणामुळे) सुस्त होणे; मंद होणे; मरगळणे. (राजा.)
**झांब(बा)डणे** उक्रि. १. हिसकावून घेणे; झडप घालून लुटणे; हिसडणे; हिसकणे; जोराने ओढणे : 'शिरींचा पाडोनिया मुगुट । दाहाही झांबाडिले कंठ ।' - भाराकि १६.१३६. २. लुटणे; लुबाडणे; नागविणे; बुचाडणे.
**झांबडणे** अक्रि. लढणे; युद्ध करणे; लुटणे.
**झांबडाझांबड** स्त्री. १. जोराची हिसकाहिसक, ओढाताण, झोंबाझोंबी. २. लुटालूट. [झांबड द्वि.]
**झांबर** न. पाभराने पेरणी करताना पेरलेले बी व्यवस्थितपणे मातीखाली झाकले जावे म्हणून पाभराच्या मागे बांधलेले काटेरी झुडूप किंवा झाडाची फांदी : 'पांभर पांभर मांघे धारये झांबर.' - बगा ३१.
**झांब(म)रा-ऱ्या** वि. (वर्तनात, दिसण्यात) गोंधळ्या; विसराळू; भ्रमिष्ट; गफलत्या; गबाळ्या; चुका करणारा. (राजा.)
**झांबरी** वि. गबाळी; गैदी; गोंधळी.
**झांबवला** वि. अंधुक; अस्पष्ट; मंद : 'ना दिवस नव्हे सोज्वळ । जैसी झांबवली सांजवेळ ।' - एभा २५.२५१.
**झांबळ** स्त्री. लूट; जाळपोळ. पहा : **झांबड**
**झांबळट** वि. बावळट; विसराळू.
**झांबळने** क्रि. घुटमळणे, शोधणे.
**झांबळे** न. कांबळे; लोकरीचे वस्त्र.
**झांवळ** वि. १. विसराळू, भ्रमिष्ट. २. अस्पष्ट; संदिग्ध. [सं. श्यामल]
**झांवळणे** उक्रि. झांवळ्यानी झाकणे. [सं. सम् + आ+वृ]
**झांवळणे** अक्रि. डोके फिरणे; भ्रमिष्ट होणे. [सं. सम् + भ्रमर]
**झांस** स्त्री. दाट झाडी : 'ए झांसीं सोरें घातलें: एथौनि घोडा प्रतवीला: ' - लीचउ ५१३. [सं. झष]
**झांसुरणे** उक्रि. तळमळणे; झुरणे. [सं. ध्यास]
**झिकझिक, झिगझिग** पहा : **जिगजिग**
**झिकझिकणे, झिकझि(मि)की, झिकझिकीत** पहा : **झिग**
**झिकणार** वि. झेलणारा. (गो.)
**झि(झिं)कणे** सक्रि. (चेंडू वगैरे) झेलणे.
**झिकलेस** स्त्री. (भरतकाम) जरतारीचे बंद; जीगची लेस. पहा : **झीक**
**झिकवण-णी** स्त्री. फसवणूक. पहा : **झकवण-णी**. (क्रि. करणे, लावणे, मांडणे.)
**झिकविणे** उक्रि. चकविणे; फसविणे; ठकविणे. पहा : **झकवणे २**
**झिकापुरी काठ** पु. जरीच्या काठांचा एक प्रकार. (नाशिक)
**झिकुला** पु. झाका; झोपाळा. (अहि.)
**झिगझिग** स्त्री. १. जिगजिग; पायधरणी; मिन्नतवारी; त्रासदायक विनवणी. २. किरकिर; पिरपिर; कटकट; तक्रार. ३. पावसाची बुरबुर. वि. त्रस्त; त्रासलेला; बेजार (अतिश्रमाने). [ध्व. झिग द्वि.]
**झिगझिग** स्त्री. (हालचालीतील, कार्यातील) मंदपणा; सुस्ताई; ढिलाई; दिरंगाई. (क्रि. करणे, लावणे, मांडणे, चालविणे.)
**झिगझिग-गी** स्त्री. चमक; लुकलुकी; चकाकी; तेज: 'राहेल कसी कौस्तुभमणिपाशीं माणिकांत झिगझिग जी ।' - मोमीष्म ६.३५.
**झिगझिगणे** अक्रि. चकाकणे; लुकलुकणे; चमकणे.
**झिगझिगीत** वि. झगझगीत; चमकणारे; लुकलुकणारे; चकाकणारे.
**झिग(गी)र** न. १. अंगठ्यात धरून धनुष्याची दोरी ओढतात ती जागा. २. धनुष्याच्या दोरीने अंगठा व तर्जनी यांचे मांस खोलले जाऊ नये म्हणून बोटास बसवावयाचे टोपण किंवा अंगुस्तान.
**झिगिमिगी** स्त्री. झगमग.
**झिगी** स्त्री. (नाविक) पट्टणास खालच्या अंगास आधार म्हणून जोडतात ती लाकडे. (को.)
**झिगी** स्त्री. जिल्हई; चकाकी. पहा : **झिगझिगी**
**झिजणावळ** स्त्री. (एखाद्या वस्तूच्या आकारमानातील) घर्षण इ.च्या योगाने झालेला कमीपणा; झीज; झिजणी; घसारा.
**झिजणी** स्त्री. १. झिजण्याची, कमी कमी होत जाण्याची क्रिया; रोडावणे; क्षीण होणे. २. क्षयरोग; झिरपणी.
**झिजणे** अक्रि. १. घर्षण इ.मुळे क्षय पावणे, कमी होणे; झरणे : 'मना चंदनाचे परी त्वां झिजावें ।' - मश्लो ८. २. (शरीर इ.) रोडावत जाणे; कृश, क्षीण होणे. ३.(ल.) कष्ट घेणे, करणे; उपयोगी पडणे : 'झिजल्यावाचुनी किर्ती कैंची । मान्यता नव्हे कीं फुकाची ।' - दास १९.३.२४. [सं.क्षि]
**झिजविणे** सक्रि. १. घासून कमी करणे. २. घसवटून जाणे; घस, झीज सोसणे; झरविणे; काचविणे.
**झिज्या** पु. मुलांचा एक खेळ : 'वाघोडी आणि आट्यापाट्या । झिज्या बोकट अगलगोट्या । भोंवरे चक्रें फेरवाट्या । देती काठ्या सत्वर ।' - भवि २७.२०
**झिट** न. १. झाडाची फांदी : 'राहिलेले भात लोकांनी.... चिंचेच्या झिटाने झोडपून काढले.' - आआशे २४२. २. वठलेले झाड. पहा : **झीट १**. [सं. झिंटी]
**झिटकारणे, झिटकारवणे** सक्रि. धिक्कारणे; तिरस्काराने उडवून देणे; धुडकावणे: 'भाबी मला घाईगर्दीनं झिटकारून... म्हणाली.' - कसा ४०. पहा : **झिडकारणे** [सं. हिट्]
**झिटपीट** स्त्री. हातघाई; हाणाहाणी : 'थोडासा गनीम एकदोन वेल गेला त्याची यांची झिटपीट होऊन गनीम माघारा फिराऊन लाविला.' - ऐको ४६५.
**झिटिमिटी** क्रिवि. १. थेंबाथेंबांनी (दूध भांड्यात पडणे, पाणी इ. ठिपकणे, गळणे). २.कणाकणांनी; थोडा थोडा; थोडथोडका; तीळतीळ (नफा इ. मिळणे). ३. क्वचित क्वचित; कुठेकुठे; तुरळक (पाऊस पडणे, पिके इ. पिकणे). [ध्व. झिट् द्वि.]
**झिटी** स्त्री. झिंजी; झिपरी. पहा : **झिंगी** [सं.झिंटी]

**झिडकझिडकु** क्रिवि. झरारा; भरारा : 'झिडकझिडकुं धांवे वारा।' – दास २०.८.२५.

**झिडकणे, झिडकार(वि)णे** उक्रि. धुतकारणे; धुडकावणे; कठोर भाषणाने धिक्कार करणे; झटकारणे; झिटकारणे : 'तिजलागीं पोटासि धरिता होये । तों ती तयातें झिडकावीत ।' – जैअ ७७.१७; 'चांडाळा निघ बाहेरी झिडकिला मार्जारवेषें दडे।' – कीर्तन १.८२.

**झिडका** पु. १. (हात, पाय, वस्त्र इ.चा) झटका; हिसका; झटकारा; हिसडा. २. पहा : **झटका** इतर अर्थी (क्रि. मारणे. देणे.).

**झिडकार, झिडकारणी** पु.धिक्कार; हेटाळणी; हेडसावणी; धुडकावणे.

**झिडकारणे** उक्रि. धुडकावणे; त्याग करणे: 'यज्ञ व यज्ञफल ही दोन्ही झिडकारली.' – एवाका ९७.

**झिडपिडणे** अक्रि. अडखळून पडणे : '(तो) कुणाचा धक्का लागून मध्येच झिडपिडे.'– खेकडा १३.

**झिडपिड्या** वि. अशक्त; हडकुळा : 'कुडीनं झिडपिड्याच आहे, पण बुद्धीनं तल्लख आहे हो!' – स्मगा ३८.

**झिडपुंचे** सक्रि. झिडकारणे. (गो.)

**झिडबीड** स्त्री. झटापट : 'फौजेनिशी बाहेर दोन कोसांवर येऊन राहिली. त्यास आठपंधरा दिवसा त्यांची याची झिडबीड होतच होती.' – ऐको ४६५.

**झिडाडणे** सक्रि. झिडकारणे; दूर सारणे : 'ते आपणासी झोंबी लागले. काये मुदा होता नकले. आपण त्यासी झिडाडून चालिलो.' – ऐको ४६५.

**झिणकार** पु. १. (वाद्ये इत्यादिकांचा) झंकार; झणत्कार. २. (कठीण वस्तूवर आघात केल्याने हात इत्यादिकांस येणारी) झणकी, झणझणी. ३. पहा : **झिडकार**

**झिणझिणणे** उक्रि. १. झणाणणे ; झणझण असा आवाज करणे; झणत्कार करणे. २. (विंचू इत्यादीच्या दंशाने) झणकारे निघणे. ३. कठीण वस्तूवर आघात केल्याने हातास झिणझिण्या येणे. [ध्व. झिण द्वि.]

**झिणझिणी** स्त्री. १. शहारा; झणकारा; कठीण वस्तूवर आघात केल्याने हातास प्रत्याघाताने वेदना होणे : '... भीतीची एक लहानशी झिणझिणी त्याच्या अंगातून चमकून गेली.'– वेज १२७. २. सुखद वेदना : 'अंगांगातून सुखाच्या झिणझिण्या उमटल्या.' – राऊ २५०.

**झिणा** वि. झिजलेला; घासलेला (दागिना, भांडे इ.). [सं. क्षीण]

**झिणी** स्त्री. झळक.

वि. किंचित, अल्पस्वल्प.

**झिण्या** स्त्री.अव. पूर्णपणे न पोसलेले, पोचट असे धान्याचे दाणे. हा शब्द एकवचनी (झिणी असा) क्वचितच आढळतो.

**झितरी** स्त्री. (ओतकाम) ओतलेली मूर्ती साफसूफ करताना होणारी घस.

**झित्तर** न. शिंदीचे मोडलेले टोपले, शिपतर. (व.)

**झिनका** पु. पाण्यात मासे पकडण्याचे कोळ्यांचे साधन. (झाडी)

**झिनकारा** पु. झणकारा; झटका (रागाचा) : 'त्यानं रागाच्या झिनकाऱ्यानं... शिव्या हासडल्या. ' – उपरा ३.

**झिना** व्यभिचार.

**झिनिया** पु. उद्यानातील एक शोभिवंत वनस्पती.

**झिनी** स्त्री. ठिणगी : 'तया प्रकाशाची झिनी । ते स्वर्गीं शशी तरणी।' – ज्ञाप्रबो ४९१. [ध्व. झिन]

**झिनॉ** पु. एक प्रकारचे झाड. (गो.)

**झिन्न** क्रिवि. जलद : 'दावितां खंडवेगु। कैसें राउतैचें आंगु। मुरडतां झिन्न वेगु । डोळां सुजावती ना ।'– शिव १४२१. [ध्व.]

**झिन्न** किंचित; अल्पस्वल्प.

**झिप** वि. गळलेली; खाली पडलेली. पहा : **झिम** [सं. क्षिप्]

स्त्री. सडा. : 'पहा फुलांची पखरण झिप् । माझे गडेग । टिप् फुलें टिप् ।' – केक. [सं.क्षिप्]

**झिपटी** स्त्री. केसांची बट; झिंजी. पहा: **झिपरी**

**झिपतर** न. टोपल्याचे फाटके बूड.

**झिपनी** स्त्री. भाजीपाला ठेवण्याची पसरट टोपली. (झाडी)

**झि(झिं)परा–ऱ्या, रं** वि. ज्याचे केस लांब असून अस्ताव्यस्त पिंजारलेले आहेत असा : 'सर्कशींत काम करणाऱ्या झिपऱ्या पोरीसारखी उडी मारून.' – नाकरू ३.१२.

**झि(झिं)परी** १. बट; झिंजी : 'माथां पिंगट झिंपऱ्या, मुखबिळीं विक्राळ दंतावळी।'– आपूव ४२. २. (ल.) अजागळ, गबाळ, गोबरी पण व्यभिचारी स्त्री; माभळभटीण; नेभळभटीण स्त्री. (वा.) ० **धरणे** – केस ओढणे; अवहेलना करणे; प्रत्यक्ष शिक्षा करण्यास उद्युक्त होणे: 'नेणो केव्हां धरूनि झिपरी देव घेईल झाडे ।' –आठल्ये.

**झिपुटा** पु. झोक्याची, पाळण्याची, झोळीची (झोके देण्याची) दोरी; शेपटा. [सं. शेप]

**झिपोटी** स्त्री. केसाची बट. (व.)

**झिपोडी** स्त्री. अस्ताव्यस्त केस असलेली.

**झिप्पट** न. (कुंपणाचे, झोपडीचे) झाप, झडप, झोपा.

**झिबली** स्त्री. मिठाईची टोपली. (ना.)

**झिबा–बे** पु. न. पायघोळ अंगरखा. पहा : **झुबा, झबा**

**झिबी** स्त्री. मुलींच्या वेणीतील रेशमी गोंडा. (कुण.)

**झिम** क्रिवि. एकसारखा व जोराने; मुसळधार (पाऊस पडणे). [ध्व.]

**झिमझिम** स्त्री. बारीक पण एकसारखा पाऊस; भुरभुर.

**झिमझिमा** क्रिवि. बारीक पण एकसारखा (पाऊस पडणे). [ध्व. झिम द्वि.]

**झिमटा** वि. कंजूष; कृपण; हिमटा. (बे.) [ध्व.]

**झिमड, झिमडी, झिम्मडी, झिमर** पहा : **झिम्मड**

**झिमने** क्रि. कोमेजणे; सुकणे.

**झिमन्या गाळणे** दुःख, शोक करीत बसणे. (व.)

**झिमुट** वि. बारीक. पहा : **झिमटा**

**झिमूर झिमूर** क्रिवि. झिमझिम. (झाडी)

**झिमोटा** पु. (रागाने, तिरस्काराने) कपाळास आठ्या घालणे, नाक, तोंड मुरडणे; भ्रुकुटीभंग. (क्रि. मारणे, घालणे.)

**झिम्मड** स्त्री. दाटी; गर्दी; झुंबड : 'दररोज रात्री दिवसां स्वामींच्या भोवती ज्ञानेच्छु मंडळींची सारखी झिम्मड. ' – नि ३४१.

**झिम्मा** पु. मुलींचा एक खेळ. यात मुली एकमेकीकडे तोंड करून उभ्या राहून परस्परांच्या हातांच्या पंजावर पंजे मारून थोडेसे मागे जाऊन पुन्हा पुढे येऊन, परस्परांच्या हाताच्या पंजावर पंजे मारतात.[ध्व. झिम] (वा.) (एखाद्या घरी भुतांनी) ० **खेळणे** – भुते नाचणे; भुतांनी घरात खेळ करणे, धिंगाणा मांडणे.

**झियादती** स्त्री. अधिकपणा. पहा : **जाजती** [अर.]

**झियादह, झियादा** वि. जादा; अधिक. पहा : **जादा** [अर.]

**झियाफत** स्त्री. मेजवानी. पहा : **जाफत, जियाफत, ज्याफत** इ.

**झिरकणी** स्त्री. (चिकट दुखण्यामुळे, जिवलग माणसाच्या विरहामुळे) मनाला लागलेली झुरणी; झिजणी. पहा : **झिरपणी**

**झिरकणे** अक्रि. रोडावणे; खंगणे; झिजणे; झुरणे; क्षय होणे. [सं.झ्रृ]

**झिरकीगल्ल** न. बराच बाक आलेले काकडी, दोडका यांसारखे फळ.(गो.)

**झिरकुंचे** अक्रि. झेलला जाणे. (गो.)

**झिरझिर** क्रिवि.बुरबुर ; थेंबथेंब पाऊस पडणे.

**झिरझिरा, झिरझिरीत** वि. १. जीर्ण झालेले; विरविरीत झालेले; फाटलेले (वस्त्र). २. पातळ; विरळ विणीचे (कापड इ.). [सं.झ्रृ]

**झिरणे, झिरणीस लागणे, पडणे, येणे** अक्रि.झिजणे; झुरणे; कृश होत जाणे; झुरणीस लागणे. [सं.झ्रृ]

**झिरपण–णी** स्त्री. १. पाझर; गळती; झरण्याची क्रिया. २. झुरणी; झिजणी. (क्रि. घेणे.)

**झिरपणे** अक्रि. १. पाझरणे; गळणे; झरणे; स्रवणे (भांड्यांतून, खडकांतून, झऱ्यांतून पाणी इ.); थेंबथेंब. २.(ल.) झुरणे; झिजणे; खंगणे; थकणे. [का. जोरू] [सं.क्षर्]

**झिरपरोधक** पु. (यंअ.) गळती थांबविण्यासाठी केलेली उपाययोजना.

**झिरपा** पु. १.स्राव; पाझर; गळती (एखाद्या फुटक्या भांड्याला असलेली, भांड्यातून होणारी.) २. ओहळ; ओघळ; झरा : 'ठिकठिकाणी सतत वाहणारे झरे व झिरपे असून.' – खेया ८.

**झिरबुटी** पु. हळवार जमिनीतील भात.

**झिरमळी, झिरमिळी** पहा : **झिळमिळी**

**झिरमा** पु. खांबाखालचा दगड.

**झिरमाट** पु. झिरझिर पडणारा पाऊस; हलकी सर : 'झिरमाट पडू लागलं आणि...' – टारफुला २८३.

**झिरमिट** क्रिवि. थेंबथेंब.

**झिरमिर–री** क्रिवि. १. थोडाथोडा; बुरबुर (पाऊस पडणे) : 'मग झिरमिर वर्षावो निर्मिला ।' – दावि ६६. २. (ल.) मंद प्रकाश : 'दूरवर मंद, काजव्यांच्या झळाळीची झिरमिर पसरलेली होती.' – राकाघाका १०. [ध्व. झिर द्वि.]

**झिरमिरी** स्त्री.मूर्च्छा; घेरी; झीट.

**झिरमिरीत** वि. ज्याच्यामधून पलीकडचे दिसते असा; पातळ: '(खिडकीवर) पातळ झिरमिरीत पडदा होता.' – राकाघाका १२७.

**झिरमुलॉं** पु. एक प्रकारचा कंद. (गो.)

**झिरमोळी** स्त्री. (फुलमाळ्याचा धंदा) हाराच्या मध्यावर सोडलेले पदर. पहा : **झिळमिळी**

**झिरवणी** न. झऱ्याचे पाणी; झरा.

**झिरंग** पु. कढीनिंबाचे झाड.

**झिरंग** स्त्री. एक प्रकारचे गवत : 'झिरंगीत ह्यो भेटला.' – जाण ३४२. (बे.)

**झिरंगट** न. झिमझिम, मर्दाळ पावसाच्या हलक्या सरी. (माण.)

**झि(जि)रंगी** स्त्री. कौशल्य; पाटव.

**झिरंबाट** न. भुरभुरु पाऊस पडणे; थोडा वेळ बुरबुर येणे: 'पाऊस उगंच झिरंबाटागत कवा पडायचा.' – रैत १५०.

**झिरा** पु. १. ओरखडा. २. झरा. (झाडी, गोंड.)

**झिरा** पु. १. वाळू उकरून पाणी साठवण्याकरिता केलेला खड्डा; भूमिगत ओहळ. २. (ल.)उगम; उत्पत्तिस्थान. [सं.झ्रृ]

**झिराअत** पहा : **जिराइत** [अर.जिरायत]

**झिरी** स्त्री. ओढा; ओहोळ.

**झिरूमिरू** वि. झुरुमुरु. १. सरासरी जीव मात्र धरून राहिलेला; अत्यंत अशक्त (मनुष्य); कसा तरी धुगधुगी धरून असलेला (आजारी मनुष्य). २. खंगलेल्या, खालावलेल्या स्थितीत असलेले (झाड, पीक इत्यादी). क्रिवि. बारीकबारीक; तुरळक तुरळक; थोडाथोडा; किंचित (पाऊस, ऊन पडणे.)[सं. जृ.] (वा.) ० **करणे** – १. मरूमरू करणे; जिवंतपणाची किंचित धुगधुगी असणे; (मरणसमयी).जीवज्योती किलकिलणे. २. आजारी असणे; अतिशय दुबळे, अशक्त होणे.

**झिरे** न. १. (कुंपणाकरिता) झाडाची तोडलेली फांदी; काटकी; झाकर. (को.) २. बांबूचा बारीक शेंडा.

**झिरोग्राफी** स्त्री. (भौ.) साध्या कागदावर मूळ दस्तऐवजाची बरहुकूम प्रत मिळवण्यासाठी वापरली जाणारी पद्धत. [इं.]

**झिर्पिटावचे** सक्रि. झिडकारणे. (गो.)

**झिल** स्त्री. बैलाच्या गळ्यातील लहान घुंगरांची माळ. पहा : **झील** (व.)

**झिल,झिलगा–गो, झिलो** पु. मुलगा. (को. राजा. गो. बे.) पहा : **झील** : 'परवांचे दिवशीं झिलगे भोंवडीवर गेले व आज परत आले.'– जोसह्याद्री ११८.

**झिलइ, झिल(ला)ई, झिल्ह(ल्हा)ई, झिल्ली, झील** स्त्री. तकाकी; चकाकी. पहा : **जिल्हई**.(वा.)० **देणे** – उजळा देणे; तजेलदार करणे.

**झिलईकार** पु. उजळा देणारा; चकाकी आणणारा; पॉलिश करणारा.

**झिलईदार** वि. तकाकी असलेला; चकचकीत : 'गुळगुळीत केलेल्या झिलईदार बाजारी.' – असा ३६४.

**झिलणी** स्त्री. ढलपी : 'जळणासाठी झिलण्या घेऊन जायला सांगायचा.' – कनिसा ५८.

**झिलपा** पु. फांदी : 'कावया कोकाये चंदनना झिलप्यावरी । भाऊ शे पाव्हना बहिन ध्रुपतीना घरी ।' – लोसाको. (अहि.)

**झिलपी** स्त्री. ढलपी; धलपी: 'चुलीतल्या.... झिलप्यांमधून पिवळ्या जिभा बाहेर पडल्या.'– जहेवोजे १५.(व.,खा.)

**झिलमट** न. पहा : **जळमट**. कोळिष्टक : 'कानाकोपऱ्यांत कोठें जाळीं झिलमटें आहेत कां काय पाहून.' – सुदे ३३.

**झिलमिल** वि. मिळमिळीत.

**झिलमील** स्त्री. प्रकाश पडून लकाकणे : 'उन्हं कलत होती. समुद्र

झिलमील करत होता.' - आर्फियस २०.

**झिलं** न.पु. आंबेतोडी. (व)

**झिला-ल्या** पु. एक प्रकारचा नाग : 'मयोर मंडुक झिल्यादि नाग ।' - दावि २५२.

**झिलाण-न** १. पाणथळ जागा; दलदल; ओलवट जमीन. २. (जमीन इ.चा पाण्याच्या झऱ्याचा निदर्शक असा) ओलावा; आर्द्रता; ओल. ३. जमिनीच्या पोटातील झरा. पहा : **झील.** [सं. क्षीर]

**झिलाभाला** पु. एक प्रकारचा भाला.

**झिली** क्रिवि. हळू.

**झिली** स्त्री. भिंगुरटी; भुंगी.

**झिलीची, झिल्हईची, झिल्हेची माती, झिल्हई, झिल्ही** स्त्री. भांडी, हत्यारे साफ करण्याकरिता वापरतात ती पिवळसर तांबडी माती.

**झिल्काद** पु. अरबी अकरावा महिना. पहा: **जिल्काद**

**झिल्लट** वि. १.विरविरीत; झिरझिरीत (कापड). २. पातळ; अतिशय बारीक (कागद, मनुष्य इ.). ३. (ल.) क्षुद्र; किरकोळ; घाणेरडा (मनुष्य, जिन्नस). [हिं. झिल्ली]

**झिल्लमटोप** पु. बाणाचा एक प्रकार.

**झिल्ली** स्त्री. रातकिडा; राळ; मुरकुट : 'ज्या वर्नीं करिती झिंकृत झिल्ली ।' - आशआ ५. [सं.]

**झिल्ली** स्त्री. (मांसाहारात) (जनावराच्या) मेंदूवरचा पापुद्रा : 'प्रथम झिल्लीसह तीन मेंदू वाफल्यावर त्यांवरची झिल्ली काढून टाकावी.'- गृशि २.८५. [सं. छाल]

**झिल्लीम** स्त्री. न. १.शिरस्त्राण.२.(विशेषतः) मुखवटा (शिरस्त्राणाचा). [हिं. झिलम]

**झिळमळणे** अक्रि. मंद प्रकाशणे; लुकलुकणे : 'जीव ज्योति झिळमळी : हृदया आंतु' - उगी १६.७४.

**झिळमिटा, झिलमिट्यार** पु. झुंजुमुंजु; झांजड; झांजरमांजर. पहा : **झिळमिळणे** (गो.)

**झिळमिळ-ळा** क्रिवि. १. झळंबत; झोलावत; हेलकावे खात; लोंबकळत. (क्रि. लोंबणे, लटकणे, हालणे.) २. लुकलुक करीत; चमचम करीत: 'सावळ्या रेशमी लाटा झिळमीळ करीत धावत होत्या.'- जहेवोजे १००.

**झिळमिळणे** अक्रि. लिकलिकणे; मिणमिणणे; मंद मंद प्रकाशणे : 'जीवज्योति झिळमिळीं हृदयां' - उगी ७४. [सं.ज्वल्]

**झिळमिळणे** क्रि. थरकापणे.

**झिळमिळी** स्त्री. १. नथ, हार इ. दागिन्यांस शोभेसाठी लावलेले लोंबणारे मोती, लोलक इ. : 'पायी पैंजण सांकळ्या । नक्षिदार चरणांगुळ्या । लावून वर्ते झिळमिळ्या ।' - होबाला ८०. २. काचेच्या झुंबराला लावलेला लोलक. ३. (पगडी इ.ला) शोभेसाठी लावलेला कलाबतूचा झुमका, पदराचे दोरे, दशा, आचळ्या : 'वरतीं टांगण्याकरितां कमानीचा घाट काढून खालीं झिळमिळ्या काढाव्या.' - रवं १.१६. ४. शोभेसाठी लावलेल्या (कागद, झालर इ.च्या) चिरफळ्या. ५. जुनाट छपराला लोंबणारे कोळिष्टक; जळमट. ६. (ल.) लिकलिकी; मंदमंद प्रकाश; मिणमिण: 'निबरी काझु सारखी। झिळिमिळी करी ।'- क्रिपु २.२२.४२. [सं.झला]

**झिळमिळीत** न. अस्पष्ट आकृती : 'भाताचेआ टेकाआड झिलमिलीत दिसतु असे'- लीचउ १०१.

**झिळे** न. मासे धरण्याचे जाळे. (को.)

**झिं(झि)कणे** सक्रि. वरचेवर झेलणे, पकडणे, धरणे. (राजा.)

**झिंग** स्त्री. १. धुंदी; नशा : 'झिंग अशी आली होती कीं, सारखं पुढें पाऊल टाकायचंच.'- कोसला १६७. २. तगादा. (क्रि. लावणे) (अहि.)

**झिंगचे** अक्रि. खुरटणे; खंगणे; रोडावत जाणे; झुरणे. (गो.)

**झिंगट** न. झिंगा नावाचा लहान मासा; चिंगाटी; कोळंबे. [सं. चिंगट]

**झिंगट** वि. दारुड्या; निशाखोर; अंमली; दारू पिऊन झिंगणारा.

**झिंगडी** पु. चावटपणा. (गो.)

**झिंगणे** अक्रि. (दारु, अफू इ. मादक पदार्थांच्या सेवनाने) धुंद होणे; गुंगणे; बेशुद्ध होणे; गुंगून पडणे; कैफात, तारेत येणे. [सं.शिख्]

**झिंगनी मात** पु. एक प्रकारचा गोड व पौष्टिक चारा; गवत : 'वरच्या रानचा झिंगनी मात।' - मसाप ४.४.२६४. (को.)

**झिंगरडू** न. शेतात आढळणारा एक लहान कीटक. [सं.झिंगरूप]

**झिंगवणे** सक्रि. धुंदी आणणे; गुंगवणे: 'पंढरीने समाजाला झिंगवलें नाही.' - दिअहो २६६.

**झिंगा** पु. सुंठ. (झाडी)

**झिंगा, झिंगरू** पु. न. लहान मासा: 'जळीं राघव माशास अडविलें असंख्य झिंग्यांनीं।' - ऐपो ४०३. [सं. चिंगट]

**झिंगा** पु. (राग इ. मनोविकारांचा) झटका; लहर; आवेग; झपाटा. (क्रि. येणे.)

**झिंगा** पु. गारुडी, जादूगार, तमासगीर इत्यादी लोकांच्या विशेष वापरातील अश्लील अर्थाचा एक शब्द.

**झिंगा-ग्या, झिंगीखोर** वि. दारुड्या. पहा : **झिंगट**

**झिंगाटो** पु. एक प्रकारचे राक्षसाचे सोंग. (गो.)

**झिंगाभोई** पु. भिक्षा मागणारा.

**झिंगी** स्त्री. १. अंमल; धुंदी; माज; गुंगी. २. (ल.) ( संपत्ती इ.च्या योगाने येणारा) ताठा; धुंदी; माजरेपणा; मस्ती. ३. मादक द्रव्य; दारू; मद्य. (क्रि. खाणे)

**झिंगी-जी, झिटी, झिंझोटी** स्त्री. तोंडावरून अस्ताव्यस्तपणे लोंबणारी केसांची बट; झिपरी. (नेहमी अनेकवचनी प्रयोग. उदा. झिंग्या, झिंज्या.) [सं. झिंटी]

**झिंगीखोर** वि. दारुड्या; झिंग्या.

**झिंगुडे** न. १. बारीक बारीक काटेरी बोंडे येणारे एक जंगली झाड. २. बांडगूळ. (व.)

**झिंगोटा** पु. झोके घेण्याचा खेळ : 'आगोटा पागोटा घाली झिंगोटा। सीता बोलते पान हालते.'- स्त्रीगीत २०.

**झिंजा(झा)डणे, झिंजाटणे** उक्रि. १. (एखाद्याला) केस धरून खाली पाडणे; झिंजी धरून वाकविणे. २. झिडकारणे : 'थोरपणासि पाडिलें। वैभवासि लिथाडिलें । महत्त्वासि झिंजाडिलें । विरक्तिबळें।' - दास ५.९.३८. ३. झुगारणे; झाडणे (हात, पाय इ.) : 'सोडवूनि

मगरमिठी । झिंजाडोनि लोटिला ।' – मुसभा ७.२५. ४. (ल.) तिटकारणे; हुर्यो, छी, थू करणे. [सं.जट]

**झिंजाड(र)णे** अक्रि. १. (बंदूक उडताना, काठी मारताना) प्रत्याघात होणे; झटका देणे; उसळी खाणे. २.झटका बसणे; प्रत्याघाताने (हात इ.) जायबंदी होणे.

**झिंजाडा–रा** पु. १. (बंदूक, तोफ इ. उडताना किंवा काठीने मारताना होणारा) प्रत्याघात, धक्का, झटका; उलट खाणे (क्रि. होणे, येणे.) २. वरील धक्क्याने (हात इ.वर) होणारा परिणाम, वेदना. (क्रि. बसणे.)

**झिंजाळी** वि. झिप्री; केस पसरून बसणारी : 'न्हाऊन धुऊन स्वयंपाक केला, झिंजाळ्या कारटीने उष्टा केला.' – एहोरा.

**झिंजी, झी** स्त्री. पहा : **झिंगी.** केसांची बट : 'झिंजा धरूनि पाडिती ।' –पांप्र १६.१८९.

**झिंजी** स्त्री. झुंज.

**झिंजो(झो)टी, झिंझूटी** स्त्री. (संगीत) एक राग. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर. हा सार्वकालिकही मानतात. [हिं. झिंजोटी]

**झिंजोटी राग** – (ल.) एकमेकींच्या झिंज्या ओढणे : 'बाया वर्दळीवर येत. कधी कधी झिंजोटी रागापर्यंत मजल जाई.' – दिअहो ५४.

**झिंज्या(झ्या)वात** पहा : **झंझावात**

**झिंडवा** पु. एकास एक चिकटलेले, अशा जोड केळ्यांचे लोंगर. [गु.]

**झिंडवा** पु. अफूचा दोडा, बोंड. [गु.]

**झिंद** पु. मेलेल्या मुसलमानाचे पिशाच्च. पहा : **जिंद** : 'तुमच्या घरांत झिंद गेलें.' – धकु ८३.

**झिंदाबाद** वि. चिरायु; विजयी : 'आतां आपण करतों आहोंत तें आपल्याला जमेल, असं कधीं वाटलं होतं? आपण झिंदाबाद !' – कोसला ७३.

**झिंपा, झिंपापाणी खेळ** पु. मुलींचा एक खेळ; यात दोन्ही पक्षांकडील गडी एकमेकांवर पाणी फेकतात : 'झिंपा गे झिंपा रामचरण झिंपा । विषयाचे गोही बायां नको करूं खेपा ।' – बबागा ५९२. [सं. क्षिप्]

**झिंपोरडी** स्त्री. झिंजी; झिपरी.(व.)

**झिंबड–डी** स्त्री. १. पावसाची जोराची झड. (क्रि. बसणे.) २. (ल.) मेजवानीतील, गाण्याच्या मजलसीतील, खेळातील चंगळ; सामुग्रीची विपुलता; बहार-रंग. ३. (कामाचा, धंद्याचा) रगाडा; झोड. ४. (माणसांची) अतोनात गर्दी; झुंबड; झोड; दाटी. [ध्व. झिम] (वा.) **झिंबड्या मारणे** – चैन करणे; मजा करणे: 'अशा झिंबड्या मारता मारता जवळची रक्कम केव्हाच उडून गेली.' – गागो १३.

**झिंबा** पहा : **झिम्मा**

**झी** धनुष्याची प्रत्यंचा किंवा दोरी.

**झीक–ग** पु. जरतार; कलाबूत.

**झीग** स्त्री. सुळक्याचा टेका.

**झीगिमीगी** स्त्री. तेज; झगमग : 'आगीचिया झीगिमीगी :' – उगी ४१.३४०.

**झीज** स्त्री. १. (दागिने, भांडी, यंत्र, धातू इ.ची) वापरण्याने, घर्षणाने होणारी घस; काही अंश कमी होणे; वजनात उणेपणा. २.(ल.) शारीरिक कष्ट. ३.(व्यापार, व्यवहार इ.तील) घस; नुकसान; बूड. (क्रि. खाणे, बसणे, येणे.) : 'त्याच्या करितां मी बरीच तनमनधनानें झीज सोसली.'– टिसू ३. ४. (सामा.) क्षय; नाश. [सं. क्षीय]

**झीजतूट** स्त्री. वापरामुळे झालेली घट, तूटफूट इ.

**झीज थर** पृष्ठस्तर; घर्षणथर; रस्त्याचा सर्वात वरचा थर.

**झीट** स्त्री. १. (म्हातारपण इत्यादींमुळे चालताना जाणारी) झोकांडी; झोक; झोल. २. घेरी; मूर्च्छा; अंधेरी; भोवळ. (क्रि. येणे.)[सं. क्षीण] (वा.) ० **येणे** – घेरी येणे.

**झीट–ड–ण, झींट** न. स्त्री. १. जीर्ण, खराटलेले, वठलेले झाड, वनस्पती. २. असल्या झाडाचे खोड, बुंधा, सोट. ३. असल्या वृक्षाची एखाददुसरी उरलेली फांदी. ४. (ल.) जर्जर झालेला, खंगलेला खप्पड, म्हातारा मनुष्य; गरीब; मरतुकडा माणूस. (को.) ५. (ल.) (साथीत वगैरे कुटुंबातील बाकीची माणसे मेल्यामुळे) शिल्लक राहिलेला एकटाच पुरुष, वंशांकुर.

**झीट** न. १. काटक्या, ढलप्या, फांद्या, उपटलेली वाळकी रोपे यांचा भारा. ही जमीन भाजण्यास उपयोगी असतात. २. (नाविक) दोरीला अडकवून ठेवण्याचे लाकूड. (हेट.) ३. (अशिष्ट) झेंगट, लचांड, अडथळा; पेच; संकट; त्रास; दशा. [सं. क्षीण]

**झीटपीट** स्त्री. (प्र.) झटापट; चकमक : 'यैसियास त्याची याची झीटपीट झाली.' – पेद ३.१२६.

**झीण** स्त्री. (चंदनाचे खोड, गंधाचा रवा, हळकुंड इ.चा उगाळून उगाळून शिल्लक राहिलेला तुकडा; बोटूक; खोड; (एखाद्या पदार्थाचा) घासून घासून अवशिष्ट राहिलेला भाग. [सं. क्षीण]

**झीणा** वि. १.जुना; फार दिवसांचा. २. पातळ; कृश. [सं. क्षीण]

**झीन्न** वि. अस्पष्ट, किंचित : 'ज्ञान जालें ? सर्वज्ञें म्हणीतलें : वानरेशा ज्ञान झीन्न :' – लीचउ ६२०.

**झीबी** स्त्री. मुलीच्या वेणीतील रेशमी गोंडा : 'त्याखालीं फुल तेंचि ताइत पहा झीब्यांवरी आंवळे ।' – अककसं २.

**झीम** क्रिवि. एकसारखा व जोराने; मुसळधार : 'पाऊस झीम बसला; शेतं ओली किच्च झाली.' – खळाळ ८६.

**झील** पु. १. मुलगा; झिलगा, झीलो (को.गो.) : 'तूं नंदाचो झीलो, माकां फडको दी ।' – भपसं ८. २. एका झाडापासून केलेले, उत्पन्न झालेले दुसरे झाड. ३.(ल.) जवळजवळ नष्ट झालेल्या वंशातील जिवंत मनुष्य, वंशाचा अंकुर. [सं.झला=मुलगी]

**झील** स्त्री. (संगीत) १. गाण्यातील सफाई, ठाकठिकी, २. गाणाऱ्या कंठाचा कंप; गिटकडी. ३. (वाद्य) संबळाच्या दोन टिमक्यांपैकी लहान आकाराची खणखणीत आवाजाची टिमकी (मोठ्या व ढब आवाजाच्या टिमकीला बंब म्हणतात). ४. चौघडा. (क.) ५. एक प्रकारचे चर्मवाद्य. हे कड्या एवढ्या टिमकीच्या आकाराचे असून याला प्राय: कड्याच्या मधून सभोवार खाचा पाडून लोखंडी अगर पितळी गोल पत्र्या किंवा झांजा बसविलेल्या असतात. ६. (तमाशात)

गाण्यातील पालुपद; (तमाशातील) पुढील गाणारांनी म्हटलेल्या भागाला साथीदारांनी पालुपद म्हणून करायची साथ. ७. बैलाच्या गळ्यातील घुंगुरमाळ. (व.) [सं. झिल्ली] (वा.) ० **ओढणे, धरणे, देणे** – १. (दुसरा) गाताना त्याच्या सुराची साथ करणे. २. (ल.) (एखाद्याचे) अनुकरण करणे; री ओढणे, धरणे.

**झील** स्त्री. रत्न इत्यादिकांवरील तेज.[फा. जिला] (वा.) (एखाद्याची) ० **उडणे, उतरणे, बिघडणे** – (एखाद्याचे) वैभव खालावत जाणे, नष्ट होणे; कीर्तीचा, मानमरातबांचा नाश होणे. ० **चढणे** – (कर्त्याची षष्ठी). (एखाद्याच्या) वैभवाची, मोठेपणाची भरभराट होणे. ० **चढविणे** – १. अगदी तकतकीत, साफ हजामत करणे, तासणे. २. (एखाद्याला) नावारूपाला आणणे; प्रतिष्ठा मिळवून देणे; मोठेपणाला चढविणे.

**झील** न. एका टोकाला जाळी लावलेली, झाडावरून आंबे इ. काढण्याची बांबूची आकडी, झेला. (प्रां.)

**झील** पु. १. पाणथळ, दलदलीची जागा, जमिनीचा ओलावा; दमटपणा; आर्द्रता; ओलसरा : 'एकेकडून पानें व शेरणीचीं बेटें व पाणियाची झील असे अडचणींत उतरलों.' – भाब ५६. २. झरा; ओहोळ. [हिं.]

**झील** स्त्री. १. दाट झाडी. २. (विटीदांडूच्या खेळातील) एक सप्तक; झकू. (गो.)

**झील** वि. हलके : 'कां मेघांचे आंग झील । दिसे वारेनि जैसें जाईल ।' – ज्ञा १३.२१३.
क्रिवि. हळू; मंदपणे.

**झील** वि. झिरमिरीत, भोके पडलेले : 'पाइलें तवं झील ऐसें देखिलें: मग सांडिलें : ' – लीचपू ८६.

**झीलगो** पु. १. मुलगा. २. गडी. पहा : **झिलगा** (कु.)

**झीलफ** पु. (संगीत) एक राग. गानसमय दिवसाचा पहिला प्रहर.

**झीलाण** पहा : **झिलाण**

**झील्लि** स्त्री. भिंगुरटी : 'उर्णनाभि झील्लि : यां चोविसां गुरुंची वोळि : सांघितली तुज.' – भागी २९.२६८.

**झुअरह** पु. शुक्राचा तारा. [अर.]

**झुई** स्त्री. नदीतील बेट; जुवा; जुवे; जु.

**झुकझुक** क्रिवि. १. आगगाडीच्या वाफेच्या इंजिनासारखा आवाज. २. डुलतझुलत; रमतगमत; अतिशय मंदगतीने : 'फुलराणी नावाची मुलांची लहान आगीनगाडी झुकझुक करीत नुकतीच सुटली होती.' – वाकि ७१–७२.

**झुकणे–ने** अक्रि. १. लवणे; वाकणे; नमणे; एका बाजूला कलणे; वळणे. [क. जग्गु] २. डुलतडुलत, झोके खात चालणे. ३. रमत गमत, रेंगाळत चालणे; डौलाने, मिरवणुकीतल्या प्रमाणे चालणे : 'घाटगे मोहिते माने पाटणकर झुकती ।' – ऐपो १०७. ४. दृष्टी चुकवून निसटणे; पळून जाणे; हातावर तुरी देणे; पोबारा करणे. ५. (आजाराने) कृश, रोड होणे.

**झुकतझुकत** क्रिवि. डुलतडुलत; झोके खात.

**झुकवणी** स्त्री. १. वाकवण्याची, ओणविण्याची, कलविण्याची क्रिया. २. झुकांडी; झुगार; हुलकावणी; टाळाटाळ; चुकवाचुकव. (वा.) **झुकावा करणे** – छापा घालणे.

**झुकाटणे, झुकांडणे** अक्रि. (एखाद्याच्या) हातावर तुरी देणे; पोबारा करणे; निसटणे. [सं. ष्वष्क्]

**झुकाटा–टी, झुकाटणी** पु. स्त्री. चुकवाचुकव; चकविणे; फसवून निसटून जाणे. (क्रि. देणे.)

**झुकापुरी** स्त्री. (विनोदाने) झुकांडी. (क्रि. देणे.) : 'जी व्हय, आलो हातनं मागारी असे म्हणून झुकापुरी देत नसे.' – व्यंमाक ११.

**झुकाव** पु. कल : 'नेत्यांच्या डाव्या उजव्या वैयक्तिक झुकावांचे मनावर दडपण असले.' – सैस्वा २०४.

**झुकांडा–डी** पु. स्त्री. १. झोल; तोल. २. डुलणे; झोक; झोकांडी; भेलकांडी; भिरकंडी. ३. गुंगारा; पळ; निसटणे. (वा.) ० **देणे** – चुकवणे; टाळाटाळ करणे; चकवणे.

**झुगझुग–गा** क्रिवि. अतिशय मंदपणे; मिणमिण; धुगधुगीने, अंधुकपणे (दिवा, जीव – प्रकाशणे, असणे). [ध्व. झुग द्वि.]

**झुगझुगणे** अक्रि. १. (दिवा, प्राण) लिकलिकणे; मिणमिणणे; धुगधुगी असणे. २.फडफडणे; लुकलुकणे.

**झुगझुगी** स्त्री. (दिवा, जीव इ.ची) धुगधुगी; लिकलिक; मिणमिण; अतिमंद प्रकाश.

**झुगटणे** सक्रि. फेकणे; दूर लोटणे; झुगारणे: 'कुकर्मासि सत्कर्मे झुगटिलें ।' – दास ५.९.४८.

**झुगर** न. झुंबर.

**झुग(गा)र** न. १. जाडेभरडे व झिरझिरीत कापड. २. लग्नकार्यात पाटील, देशमुख इत्यादिकांना देण्याचा मानापानाचा पोशाख. ३. टाकाऊ, क्षुद्र, बिनकिमतीचे कापड, वस्तू, मनुष्य इ.
वि. जुने व जीर्ण (वस्त्र इ.).

**झुगारणे** सक्रि. फेकणे; फेकून देणे; उडविणे; दूर लोटणे; भिरकावणे; झोकणे; झुगाडणे : 'वोढी सनाळ कमलांस तटीं झुगारी ।' – रकाव्य ५६. (खा.) [सं. अधि + उद्वारणम्]

**झुगारणे** न. दुर्बळ व कृश मनुष्य, जनावर.

**झुगारपट्टी** स्त्री. ढकलाढकल; आज–उद्या असे सांगून काही तरी पोकळ सबबीवर लांबणीवर टाकणे; झुकवाझुकव; झुलवणी. (क्रि.देणे.)

**झुगारा** पु. नजर चुकवून काढलेला पळ; झुकांडी; चकविणे; झुकाटा; गुंगारा; टाळाटाळी; दडी; झुगारपट्टी. (क्रि. देणे.)

**झुगुर** न. लहान एकेरी घोंगडी. (ठाकरी)

**झुज–स** न. झुंज; लढाई; भांडण. [सं.युद्ध]

**झुजणे** सक्रि. झटापट करणे : 'दोन दिवस ती खणाशी झुजत होती.' – रथचक्र १८८.

**झुजता** पहा : **जुजता**

**झु(झुं)जा(झा)ट** स्त्री. जोराचा वारा; वादळ; वावटळ; पहा : **झुजाटा** (क्रि. येणे.)
वि. सोसाट्याचा, जोराचा, घोघाट्याचा, सनाठ्याचा (वारा इ.) 'तो सुटला झुंझाट वारा ।' – वैसीस्व २.४२.
क्रिवि. १. सोसाट्याने वाहत. (क्रि. सुटणे.) २. जोराने; चपळतेने;

चपळाईने (घोडा इ. धावणे.).

**झुटकणे** अक्रि. पळून जाणे; झुकांडी, झुगारा देणे; पळ काढणे. पहा : **झटकणे**

**झुटका** पु. १. (विडी, गुडगुडी इ.चा) झुरका. २. (उसाचा रस, दूध, पाणी इ. पेयाचा) घोट; घुटका. (क्रि. घेणे.) ३. चुट्टा; विडी; चिरूट. ४. (गोष्ट, गाणे, लेखन इ. कांचा) चुटका; मजेदार उतारा. ५. व्यंगोक्ती; उखाणा; आहाणा; कोडे; कूट प्रश्न. ६. चुटका; झुळूक; डुलकी. [ध्व.]

**झुटा, झुटीसानक** स्त्री. १. उष्टे झाल्यामुळे दुसऱ्याच्या उपयोगी न पडणारे ताट, अन्न इ. २. (ल.) कायमची, परत न घेता येण्यासारखी जहागीर, इनाम जमीन. पहा : **सानक, खुर्दसानक**. ३. इनामपत्र. [सं. उच्छिष्ट]

**झुटा दोरा** खोटी आशा, अपेक्षा : 'उगाच झुटा दोरा ठेवून आम्हास श्रमी करतां! सर्वेप्रकारें आमचा नाश होतो.' – ऐको ४६६.

**झुटामुटा** क्रिवि. १. थोडेथोडे; थेंबथेंब (दूध गळणे, पिळून काढणे). २. तुरळक तुरळक (पीक इ. येणे.).

पु. (क.) तुटवडा; दुष्काळ; कमतरता; तोटा. [हिं.]

**झुट्यार** वि. खट्याळ; स्वैर; हूड; द्वाड; वात्रट. (कु.)

**झुडणे** पहा : **झडणे**

**झुडत(ता)र** न. (निंदार्थी) १. खुरटे, पाने गळलेले व कोमेजलेले झुडूप. २. खुजा व दुबळा माणूस ; म्हातारपणाने जर्जर झालेला जखखड मनुष्य, जनावर.

**झुड(डू)प** न. १. लहान, खुजट व पसरणारे झाड. २. दाट झाडी; झाडांची जाळी; झाडी; वृक्षवाटिका. (को.) पहा : **झुडपी**

**झुडपी** स्त्री. झुडुपांची दाटी; झाडी; अनेक फांद्यांनी, वेलींनी गच्च भरलेले झाड; जाळी; झाडझूड. (को.)

**झुडूपातील खार** स्त्री. मुलांचा एक खेळ.

**झुणका** न. बेसन; पिठले; अळण.

**झुणझुण–णा** क्रिवि. १. पायातील पैंजण, नूपुर इ.चा झुनझुन असा आवाज होऊन ( क्रि. वाजणे.) : 'झुणझुणशब्दाकरिति घागऱ्या तालावरतीं गाती ।' – कमं ४.१०९. २. सूं सूं करीत; सोसावत; गोंगावत (वारा वाहणे). [ध्व. झुणचे द्वि.]

**झुणझुणणे** अक्रि. १.(वारा इ. काने) सूं सूं, घो घो करणे, गोंगावणे, २. (वीणा, बीन इ. तंतुवाद्याने) तनन् तनन्, तुन तुन करणे. ३.(पायातील पैंजण, वाळे इ.नी) झन झन, छुमछुम असा आवाज करणे; रुणझुणणे ; छुमछुमणे. ४.फुणफुणणे ; सणसणणे; झणझणणे.

**झुणझुणा–णी** स्त्री. लहान मुलांचा एक प्रकारचा खुळखुळा.

**झुणा** वि. नाजूक : 'हाति रूमाल बारिक झुणा' – मला १६३.

**झुणा–ण्या–ना** पु. लहान मुलींचा एक खेळ : 'झुना बाई झुना । झुना घालूं रात्रीं ।' – मसाप २.३.२३२. [ध्व.]

**झुणा–ना** पु.(मुलीचा) लहान लहंगा, परकर; लहान लुगडे; रंगीत पातळ : 'जरतारि झुणा करनाटकिचा ।' – अककसं २. (व.) [हिं. झूना]

**झुणूक** स्त्री. किंचित भास. पहा : **चुणूक**

**झुतरी, झुत्री** स्त्री. १. लहान ओढा; नाला. २. लहान ओढ्याचा पाट. ३. पाटाचे कोरडे पात्र, तास.

**झुनका** पु. बैलांचा साज. (झाडी) [हिं. झुमका]

**झुप(ब–म)का** पु. १. गुच्छ; घोस; पुंज; गेंद (फुलांचा, केसांचा इ.). २. कर्णफुलाला लावलेला मोत्यांचा घोस, लोलक. [क. जोंप] [हिं. झुमका]

**झुपकी** स्त्री.(वेली इ.ची) जाळी; कुंज; पुंज; झुपका : 'मुलीचे हातीं एक शतावरी नामक वेलीची झुपकी लागली होती.' – धकु २५.

**झुपाट** न. झुडूप; लहान झाड: 'विखुरलेल्या तिळांच्या झुपाटांवर पिवळसर फुलें लागून त्यांचा मंद वास पसरू लागला.' – किर्लोस्कर नोव्हे. १९४०.

**झुबकळी** स्त्री. झुबक बाळी. पहा : **झुप(ब–म)का**

**झुबकी** स्त्री. झुपकी; पुंज; पुंजका; राशी: 'पवित्रा ते केली परम असतां पापझुबकी।' – निमाक २.८७.

**झुबके(क)बाळी, झुबेबाळी, झुबा–बी–बे, झुबुकबाळी** स्त्री. पु. न. मोत्यांचा, पोवळ्यांचा घोस लोंबत असलेली बाळी : 'बुगड्या झुबकबाळ्याच्या जोडें।' – देभाव ४.

**झु(झुं)बड** स्त्री. १. दाटी; गर्दी; झिंबड; खेचाखेच; भोवती गोळा होणे : 'तसेच त्याच्याही पलीकडे नैर्ऋत्येकडे उडालेली अशीच झुंबडही सहज दिसेल.' – पार्लमेंट ४५. (क्रि. चालणे, पडणे.) २. पहा : **झिंबड** [अर.झुमरा]

**झुबा** पु. डूल; एक कर्णभूषण : 'माझें कानांत सुंदर झुबे घातले होते.' – माआअ ५८.

**झुबा** पु. पायघोळ अंगरखा; झगा. पहा : **जुबा** [अर.]

**झुबी** न. अव. लोलक : 'झुबी लटकती नथणीस.' – समारो ४.७२.

**झुमकणे** अक्रि. ठमकणे; ठुमकत, नखऱ्याने, अकडीने चालणे; नटूनथटून, नाटकी पद्धतीने चालणे. [ध्व.झुम]

**झुमकदोडके** न. दोडक्याची एक लहान जात. याचे घोस असतात.(खा.)

**झुमझुम–मा** क्रिवि. पायांतील घागऱ्यांचा, पैंजणांचा छुम्‌छुम् आवाज होऊन. (क्रि. वाजणे, करणे.) [ध्व.झुम द्वि.]

**झुमर** स्त्री झुंबड; मारामारी; हातघाई ; चकमक : 'खालीं आंतील माणूस, वर इकडील लोक, दोनचार रोज मोठी झुमर झाली.' – ऐको ४६७.

**झु(झू)मरा** पु. एक ताल. यास चौदा मात्रा व चार भाग आहेत : 'डावा हात कोणताही ठेका मग तो झुमरा असो.' – गाविदि ७२.

**झुम्मड** स्त्री. गर्दी; खेचाखेच. (खा.) पहा : **झुंबड** (वा.) ० **उडणे** – गर्दी, खेचाखेच, रेटारेटी होणे.

**झुम्रह** पु. गर्दी; जमाव. [अर.जुमर]

**झुरकण–न–र** क्रिवि. त्वरित; सपाट्याने; झटकन; पळात; क्षणातः 'आनंदवनीं भ्रतार होता । झुरकर उडाला गेला केउता।' – चांगा २१. [ध्व.]

**झुरकणे** सक्रि. तपकीर, चिलीम यांचा झुरका, वारा इ. खूप जोराने आत

ओढणे; दम मारणे.

**झुरकणे** अक्रि. निसटणे; पळणे; झुकांडी देणे.

**झुरका** पु. १. जोराने (तपकीर, वारा, विडी, गुडगुडीचा धूर इ.) आत ओढण्याची क्रिया; जोराने मारलेला दम. २. पातळ पदार्थाचा जोराचा घुटका, घोट. (क्रि. घेणे, ओढणे.) [ध्व. झुर; सं.सृकः]

**झुरका** पु. झरोका; खिडकी. [हिं.]

**झुरझुर–रा, झुरझुरून** क्रिवि. पहा : झुळझुळ; खळखळ, गुडगुड असा आवाज होऊन. पहा : **झरझरा** [ध्व.] (वा.) ० **पळणे** – जवळजवळ पण जलद पावले टाकून पळणे (विंचू, लहान मूल इत्यादींनी); तुरतुर पळणे.

**झुरझुर** क्रिवि. एकसारखी : 'ती मनात झुरझुर झुरत होती.' – व्यंमाक १२७.

**झुरझुरणे** अक्रि. १. झरणे; झिरपणे; ठिबकणे. २. झुरणे ; क्षीण होणे; झिजणे; क्षय पावणे (शरीर इ.) : 'तुजसाठीं जैसी मैना झुरझुरी.'– होबाला १४४. ३. हळूहळू नाहीसे होणे.

**झुरझुरपंजर** वि. अत्यंत क्षीण झालेला; अस्थिपंजर उरलेला; हाडाचा सापळा असा दिसणारा (माणूस).

**झुरझुरी** स्त्री. हुक्का, त्याची नळी (ध्वन्यनुवाचक) : 'अस्ताव्यस्त लोक गाशे टाकून झुरझुऱ्या लावून बसले.'–भाब ११२.

**झुरझुरीत** वि. १.झिरझिरीत; पातळ; विरळ विणीचे (कापड). २. उपयोग केल्याने विरविरीत झालेले; फाटलेले (वस्त्र). [सं. झृ = जीर्ण होणे]

**झुरट** वि. क्षीण; अशक्त; थकलेला.

**झुरडी** स्त्री. १.सुरकुती. २. क्षीणता.

**झुरण** न. तांदूळ कांडल्यानंतर झालेली कणी; तांदळाचा चुरा. पहा : **झुरकणी**

**झुरणी** स्त्री. १. (प्रिय माणसाच्या वियोगामुळे होणारी शरीराची किंवा मनाची) क्षीणता; क्षय; झिजणी. २. खंत; निदिध्यास. ३. गळती; झरणी; झिरपणी. (वा.) ० **लागणे** – वियोगाने क्षीण, अशक्त होणे: 'झुरणी लागलेल्या पाटलीणबाई.' – टारफुला ८.

**झुरणे** अक्रि. १. झिरपणे; स्रवणे; गळून जाणे. २. झिजून, झरून हळूहळू नाहीसे होणे (पावसाने भिंत इ.). ३. दुःखाने क्षीण होणे; खंत घेणे; झुरणीला लागणे. ४. (ल.) डोळा चुकवून पळून जाणे; निसटणे : 'साधुसंता पाहुनि झुरा।' – सिसं ३.१७५. [सं.झृ]

**झुरत** स्त्री. हिंमत; पराक्रम : 'झुरतीने किल्ला घेईन.' – ऐपो ३५१. [फा.जुर्रत]

**झुरतडी** स्त्री. सुरकुती; वळी.(व.)

**झुरती** स्त्री. पलायन; पळ. (क्रि. करणे.) : 'तुम्ही देखतचिटी झुरती करणे.'– भाब ७८.

**झुरतुडला** वि. १. कृश; झिजलेला. २. थकलेला; क्षीण झालेला. ३. (ल.) गरीब; अशक्त; निरुपयोगी (वस्तू).

**झुरने** क्रि. शोक करणे. [हिं.]

**झुरमुट** स्त्री. झटापट; झोंबी : 'त्यांची यांची एकदोन वेळा झुरमट होऊन, येथे आपले पाय टिकत नाहींत असे समजून.' – ऐको ४६७.

**झुरमुट्या** वि. बोडका (खडक) : 'डोंगरावरून झुरमुट्या कातळ उतरून खलाण्यांत शिरत होते हे दोघे.'– पडघ १८७.

**झुरमुरणे** अक्रि. १. खालावणे; ऱ्हास पावणे; झिजणीला लागणे; रोगट होणे (प्राणी, झुडूप). २. (प्रिय वस्तू, माणसे यांच्याबद्दल) झुरणीस लागणे; शोकाकुल होणे; खंत करणे. [सं. सृ]

**झुरमुरती** वि. खंगलेली : 'अशक्त झुरमुरत्या शरीराची आपली सवत.'– काचक १०.

**झुरमुरीत** वि. थोडासा राग किंवा रागाचा आवेश आणलेला; झणझणीत; खरमरीत.(गो.)

**झुरमुली** पहा : **झिळमिळी** : 'मोत्याचा शिरपेंच व झुरमुल्या पगडीला शोभा देत होत्या.' – स्वामी ५६.

**झुरली** स्त्री. सुरकुती; वळी; दुमड : 'गुंग, लख्ख, झुरली खळखळणारा.'– सामा ६३.

**झुरविणे** सक्रि. रिझविणे; आनंद देणे : 'तुकोबाचीं पदें अद्वैत प्रसिद्ध। त्यांचा अनुवाद चित्त झुरवी.'– बबागा २१.६.

**झुरळ** न. १. बागुरडा; किटकवर्गातील एक किडा; एक क्षुद्रजंतू. २. पतंगाची एक जात. [क. जिरिलें.]

**झुरळी** स्त्री. १. सुरकुती; वळी; चिरमी; वळकटी (मांस, फळ, वस्त्र इ.ला पडणारी) शिथिल चामड्याला पडलेली सुरकुती. २. दुमड; दूण; घडी. [सं.झल्लरी]

**झुरळूक** स्त्री. अस्पष्ट, अंधुक, ओळखू न येण्याजोगा देखावा किंवा आकृती (वस्तूची).
क्रिवि. अंधुकपणे; अस्पष्टपणे (दिसणे).

**झुरा** वि. करपलेला. (झाडी)

**झुरा** पु. ओढा. (जुन्नर)

**झुरा, झुराबावरा** वि. १. धाडसी; बेफिकीर; निधड्या छातीचा : 'मिळालें दळ तीन लाख झुरा.– ऐपो २८७. २. बिनदिक्कत; निःसंकोच; बेगुमान; निर्भीड. ३. डामडौली; फाकडा; रंगेल; इष्कीबाज : 'तुम्ही झुरे बावरे फंदी मुशाफर दिसता ।' – प्रला १९१. [फा.झहरा]

**झुरांटी** स्त्री. लांब पल्ल्याची बंदूक. (गो.)

**झुरांटा** पहा : **झुरका** (गो.)

**झुरी** स्त्री. लहान ओढा. पहा : **झुरा**

**झुरी** स्त्री. आंब्याच्या फळाच्या देठातील चीक.

**झुरुका** पहा : **झुरका, झरोका**

**झुरुझुरू** क्रिवि. खळखळा. पहा: **झुरझुरा**

**झुरूझुरू,झुरेमुरे** क्रिवि. अत्यंत कष्टावस्थेत; मृत्युपंथास लागलेला; क्षीण, जर्जर झालेला : 'हा संप्रदायच झुरूमुरू अवस्थेत आहे.'– लोसारू ३८. पहा : **झिरूमिरू**

**झुर्झुरा** क्रिवि. झुरूनझुरून : 'झुर्झुरें पंजर होऊन झिजे । या नाव आदिदैविक ॥'– दास ३.८.२६.

**झुऱ्या** उड्डा पु. १. विटीदांडूच्या खेळातील संज्ञा. २. असावधान.

**झुर्रा** पु. एक प्रकारचा बहिरी ससाणा : 'बहिरी ससाण्याच्या 'बाज', 'झुर्रा', 'लगड', 'शिक्रा' अशा मुख्य जाती आहेत.'– शिस ६६.

**झुलकणे** उक्रि. हळू हलणे किंवा हलवणे; फडफडणे (वाऱ्यात –

निशाण, कापड, कागद इ.).

**झुलक(का)वणी, झुलवणी** स्त्री. भूलथाप; चालढकल; चकवणी.

**झुलक(का)विणे, झुल(ला)विणे** उक्रि. १. बतावण्या सांगून झुलत ठेवणे; नादी लावणे; सबबी सांगून काम लांबणीवर टाकणे. २. आळसाने वेळ घालवणे.

**झुल(ळ)णा** पु. झोपाळा; चौपाळा; पाळणा. [हिं. झूलना]

**झुल(ळ)णी** स्त्री. झोका; डोल. [हिं. झूलना]

**झुलणे** अक्रि. १. अंग हालणे; डुलणे (हत्ती चालत असता, घोडेस्वार दौडत असता). २. (ल.) हळूहळू चालणे; रमतरमत चालणे; रेंगाळणे. पहा : **झुलणे.** ३. (ल.) गदगदणे (हसताना शरीर). ४. झोका घेणे; आंदोलणे. [सं. दोलन]

**झुलपडता** क्रिवि. सायंकाळी. (झाडी)

**झुलवणे** अक्रि. आशा लावून चालढकल करणे : 'खलिते पाठवून झुलवीत ठेवणार.'– वज्राघात ३०२.

**झुलवा** पु. वेश्या, जोगतीण किंवा विधवा हिला स्वस्त्री म्हणून बाळगताना लग्नविधीप्रमाणे करायचा एक विधी.

**झुल(ला)वा** पु. १. झोका; आंदोलन. (क्रि. देणे.) २.चौफाळा; झुला. [हिं. झूलना]

**झुलवाझुलव–वी** स्त्री. पहा : **झुलकवणी**. टोलवाटोलवी ; कपटाने लांबणीवर टाकणे. (क्रि. करणे, मांडणे, लावणे.)

**झुलवॉ, झुला** पु. देवालयात किंवा देवाच्या पालखीपुढे कलावंतिणींनी गायची स्तुतिपर पदे. (गो.) : 'बांदकरांनीं रचलेले 'झुले'.' – अआमागो १०२.

**झुला** पु. झोला. १. जत्रेतील पाळणा; हिंदोळा; झोपाळा; चौपाळा. २. डोंगराच्या कड्यांवर, नदीच्या दोन्ही काठांवर खांब उभारून दोरखंड बांधून त्या दोरावरून सरकत्या टोपलीतून जाण्याची योजना. ३. वरीलप्रमाणे दोन कड्यांना, तीरांना दोरी बांधून त्या दोरीच्या साहाय्याने खाली बांधलेल्या लाकडावरून जाण्याकरिता केलेला रस्ता; साकव; दोरीचा पूल. उदा. लक्ष्मण झूला. ४. झुलता बिछाना; झोपाळा; पाळणा. [हिं. झूला]

**झुला** पु. घोड्याचा रोग. पहा : **कमरी** – अश्वप २.१०९.

**झुलार** पु. झोपाळा; पाळणा. पहा : **झुला** : 'परी पुत्रमोहाची संपत्ती। चित्तझुलारीं हेलावे ।'– नभसा १६.१७३.

**झुलावणे** न. झुला. पहा : **झोला**

**झुलुआ–क, झुलूक, झुलू** स्त्री. झुलुक, लहर, वारा : 'विकारांचिया झुलुआ चुकोनि ।' – मा ७.९५.; 'पवनु अति निर्बलु। मंद झुलुका ।।'– रामा ६.१७५.

**झुलूप** न. १. कुरळ्या केसांचा झुपका किंवा गुच्छ; कानावर लोंबलेले डोक्याचे केस. २. लहान मुलाच्या टाळूवर व कानांवर ठेवण्यात येणारे केस; (बहुधा अनेकवचनी 'झुलपे' प्रयोग); काकपक्ष. [फा. झुल्फ]

**झुलझुल्** स्त्री. पहाट.(व.)

**झुल्ल, झुल** पु. विटीदांडूच्या खेळांतील संज्ञा; खंडा; डाव ; झकू.(कर.)

**झुवा** पहा : **झुबा**

**झुळकणे** अक्रि. १. हळूहळू व मधूनमधून वाहणे; झुळझुळ, मंदमंद वाहणे (वारा). २. हळूहळू, लपतछपत फिरणे : 'वाघ जाळीजाळीतून झुळकत होता.'– नभसा ४८.

**झुळका** पु. चुबका; चूळ (पाण्याची). (क्रि. घेणे, टाकणे.) [ध्व.]

**झुळकी** वि. आलवणी रंगाचे आडवे सूत व कुंकवासारख्या भडक रंगाचे उभे सूत घालून विणलेले (लुगडे). (कर.)

**झुळझुळ–ळा** क्रिवि. मंद, वाहत्या पाण्याच्या आवाजाप्रमाणे (क्रि. वाहणे.). पहा : **झुरझुर, झुरझुरा** [ध्व. झुळ द्वि.]

**झुळझुळ–ळा** क्रिवि. अंधुक, अस्पष्ट (आकृती).

**झुळझुळणे** अक्रि. हळूहळू, मंदमंद वाहणे (पाणी, वारा).

**झुळझुळीत** वि. १. चकचकीत; तेजस्वी; चांगली जिल्हई दिलेले; गुळगुळीत; मोहरेदार; तकतकीत. २. झकपक; स्वच्छ; सुंदर (लुगडे इ.).

**झुळमुळी** पहा : **झिळमिळी**

**झुळवणी** न. झुळझुळ वाहणारे पाणी.

**झुळळी** स्त्री. झुळझुळ वाहणारी पाण्याची धार.

**झुळं(ळुं)बक** न. १. एक कर्णभूषण; लोलक. २. झळाळी; तजेला : 'मौक्तिकांचें झुळुंबकें।' – शिव ४२४. [सं. ज्वलल्लंवक]

**झुळा** वि. १.जुळे; जुळ्यांतील एक. २.दुहेरी (फळ).

**झुळी** स्त्री. सुरकुती: 'ती नऊवारी साडी चांगली चापून चोपून नेसली होती. कुठं झुळीसुद्धां पडली नव्हती.'– माणूस २४९.

**झुळु** स्त्री. झुळूक.

**झुळूक, झुळक–की** स्त्री. १. वाऱ्याची मंद लहर : 'वारेयांची झुळकी आली।'–शिव ६१३. २. (ल.) अनुकूल वेळ, संधी. (क्रि. वाहणे.) ३. ओघ; अखंड प्रवाह; चलती (वारा, विशेष प्रकारची हवा, पाऊस, उन्ह, थंडी, व्यापारधंदा, रोगराई, साथ इ.ची). ४. (ल.) तकाकी; चकाकी. [सं.सृकः]

क्रिवि. पहा : **झुळझुळ** (क्रि. वाहणे.)

**झुळूक, झुळक–की** स्त्री. अंधुक, अस्पष्ट देखावा; (वस्तूच्या) आकाराचा किंचित भास.

**झुंकार** पु. झणत्कार; झंकार : 'तेथें आलीं षट्पदकुळें । झुंकारशब्दे ।'– दास १.२.११. [सं.झंकार]

**झुंकारणे** अक्रि. गूं गूं असा आवाज करणे; गुंजारव करणे : 'भ्रमर झुंकरती झुंकारें ।'– मुआदि २८.९.

**झुंग** स्त्री. तांडा; समुदाय; टोळी; झुंड.(प्रां.)

**झुंज–झ** न. स्त्री. १. लढाई; युद्ध; रण: 'बहुतकरुनि कौरव । हे आतुर दु:स्वभाव। वांटिवावीण हांव । बांधिती झुंजीं।' – ज्ञा १.१७२. २. भांडण; कलह; झोंबाझोंबी. [सं.युद्ध, युज्]

**झुंजणार–रा** वि. झुंजार; लढवय्या: 'सखाराम पानशे परशुराम भाऊ भले झुंजणार।'– ऐपो २५५.

**झुंज(झ)णे** अक्रि. १. लढणे; युद्ध करणे. २. हुज्जत घालणे; भांडणे. (वा.) **झुंजात राहणे** – लढाईत ठार होणे. **झुंजा(झा)स उभे राहणे** – लढाई देणे; लढाईला सिद्ध असणे.

**झुंजरुक मुंजरुक, झुंजुमुंजू, झुंजुकमुंजुक** न. संधिप्रकाश;

अरुणोदयाच्या वेळेचा प्रकाश. पहा : **झांजड**

**झुंजविणे** सक्रि. १. झुंजण्यास लावणे; लढविणे. २. भांडणास प्रवृत्त करणे. (वा.) **(कण्या, दाणे टाकून कोंबडे) झुंजविणे** - गमतीखातर लोकांना भांडायला प्रवृत्त करणे; लालूच दाखवून भांडण लावणे.

**झुंजागाळ** स्त्री. रणभूमी. (गो.)

**झुंजात** न. तुफान; वादळ; झंझावात. पहा : **झुंजाट** [सं. झंझावात]

**झुंजा(झा)र, झुंजा(झा)रट** स्त्री. लढाई; युद्ध; घनचक्कर. (क्रि. लागणे, असणे, होणे.)

वि. लढवय्या; युद्धनिपुण; रणशूर : 'धाक घेतला झुंझारीं । केशिक सैन्य पळे दूरी ।' - एरुस्व १०.३६.

**झुंजा(झा)रराव** पु. योद्ध्यास द्यायची एक पदवी; वीरपुरुष; शूरबहाद्दर; रणगाजी : 'पुण्यांतल्या तरुणांनीं मोठमोठ्या झुंझाररावांना चकविलें.'-संप १२०.

**झुंजारी** वि. अंगाशी अंग लावून लढणारा.(गो.) पहा : **झुंजार**

**झुंजुरका-की-के** क्रिवि. पहाटेला; उजाडता उजाडता; अरुणोदयाच्या वेळी.

**झुंझ** न. लढत.

**झुंझरूक** न. पहाटेचा संधिप्रकाश : 'झुंझरूक झालेलं असतं.' - पंवा १८.

**झुंझाट** स्त्री वादळी, सोसाट्याचा वारा. [सं. झंझा]

**झुंझुक** न. पहाटेचा प्रकाश : 'अजून झुंझुकच असते.' - उअं ८०.

**झुंझुमुंझु** न. संध्याप्रकाश. पहाटेचा अंधुक प्रकाश. [क. मंजु= धुके]

**झुंझुरका** क्रिवि. झुंजुमुंजु होताना; पहाटेस.

**झुंझुरझुंझुर** क्रिवि. थोडथोडे; अस्पष्टपणे; अंधुकपणे : 'आतां पायाखालीं झुंझुरझुंझुर दिसूं लागलें.'- निचं.

**झुंझूरमाला-ळा** स्त्री. घोड्याचा एक दागिना.

**झुंट** न. झुडूप : 'कनकनाम हा पलाश, तैसा क्षुद्र झुंट धत्तूर ।'- टिक १८८. [सं.]

**झुंडडी** स्त्री. १. (मनुष्य, प्राणी इ.ची) टोळी; जमाव; गर्दी; कळप. समुदाय; (पशू इत्यादिकांचा) कळप; खिल्लार : 'देवें एकहि न मिळे जेथ मृगांच्या सदैव बहु झुंडी ।' - मोकर्ण ४१.५२. २. (मानस.) एखाद्या निश्चित उद्दिष्टाच्या दिशेने सक्रिय असणारा जमाव. [सं.यूथ]

**झुंड** पहा : (प्र.) **झोंड, झोंट** [क. हिंडु]

**झुंड वर्तन** (समाज.) जमावाची अविवेकी, बेलगाम वागणूक.

**झुंडाई** स्त्री. झुंडपणा; दांडगाई. पहा : **झोंटाई**

**झुंबड** स्त्री. गर्दी;तोबा; जमाव; खेंचाखेंच. [अर.झुमरा=गर्दी]

**झुंबडा-डे** पु. न. (धान्याच्या कणसांची) जुडी ; मोळके; जुडगा; गुच्छ : 'हाती झुंबडा जाईचा'- जसा ४३९. (माण.) पहा : **जुंबाड**

**झुंडी** स्त्री.(सामा) झुंड.

**झुंबणे, झुमणे** अक्रि. झोंबणे; चावणे; दंश करणे. (खा.)

**झुंबर** न. १. अनेक दिवे लावता येतील अशा रचनेचे बिलोरी काचेचे लोंबणारे झाड; दिव्यांचे झाड : 'खोलीच्या मध्यावर झुंबर टांगलेलं होतं.'- कलंदर १४५. २. (खडीकाम) कमानीच्या नकशीमध्ये झुंबरासारखी काढतात ती आकृती.

**झुंबर-ड** न. झोंबी : 'झुंबर करितो तिथें कोण कुणाचा वाली ।' - राला ४०.

वि. तुंबळ; हातघाईचे; निकराचे (युद्ध): 'आला दिवस दोनपारला लागली टक्कर झुंबर लढाई दोन्ही दलाला ।'- ऐपो ३३५. [अर.झुमरा]

**झुंबाडी** स्त्री. जुडी : 'गवताची झुंबाडी धरून .'- जैरेजै १२९.

**झू** उद्गा. पहा : **छू** [ध्व.]

**झूझू** पु. लहान मुलांकरिता बांधलेला कापडाचा पाळणा.

**झूट** स्त्री. लबाडी.

वि. लबाड; खोटे; असत्य (भाषण, मजकूर). [सं.शठ; हिं.]

**झूटा** वि. उष्टे. पहा : **झुटा**. [हिं.]

**झूटाबर्तन** १. उष्टे भांडे. २. (ल.) उपभोग घेऊन टाकलेली वस्तू. [हिं.]

**झूटेपण** क्रिवि. खोटेपण; कपट.

स्त्री. झुडूप; लहानसे झाड; झाडझूड. [हिं.]

**झूड-म** स्त्री. १. झुंड. २. तगादा; निकड; आग्रह. ३.भोवती जमणे; गर्दी करणे ; (क्रि. घालणे, पडणे.) [फा.]

**झूद** वि. चलाख. [अर.]

**झूम पद्धती** जंगल जाळून शेती करण्याची पद्धत : 'झूम पद्धतीने (जंगलाची पट्टी जाळून शेती करण्याच्या पद्धतीने) शेती करावयाची नाही...'-सीपो ३६.

**झूम भिंग** स्त्री. (विअ.) कॅमेऱ्याला जोडता येणारे अनेक भिंगांनी बनविलेले संयुक्त भिंग. यामुळे कॅमेऱ्याचे केंद्रांतर (फोकल् लेंथ) सलगपणे एका ठरावीक मर्यादेत कमीजास्त करता येते. या भिंगामुळे जवळच्या व दूरच्या वस्तूंची प्रतिमा सुस्पष्ट मिळवण्यासाठी भिंग बदलावे लागत नाही.

**झूमरा** पु. (संगीत) एक ताल. यात चौदा मात्रा व चार विभाग आहेत.

**झूर** स्त्री. १.सच्छिद्र जागा, भोक (बंधारा, मातीची घागर वगैरेतील). यातून पाणी झिरपते. २. सच्छिद्रता. ३. झिरपलेले, गळालेले पाणी; द्रवपदार्थ. [सं.जृ]

**झूर** न. सडताना झालेल्या तांदळाच्या कण्या; चूर.

**झूल-ली** स्त्री. घोडा, हत्ती इ.च्या अंगांवरील, पाठीवरील वस्त्र; आच्छादन : 'यापरी पृष्टीं झुली व्यक्त ।' - नभसा १३.७४. [क.झुलु, झुलु; हिं.]

**झूल** पु. विटीदांडूच्या खेळातील एक संज्ञा; झक्कू.

**झूला** पहा : **झुला**

**झे** अ. जो; अतिरेक दाखविणारा उद्गार.

**झेक मारने** क्रि. नाईलाज होणे; असफल प्रयत्न करणे.

**झेज(झ)रणे** उक्रि. १. घासटणे; खरचटणे; झाजरणे. (राजा). २. (ल.) फसविणे. ३. हालवून खिळखिळे करणे; धसकफसक करून, वेडेवाकडे वापरून नादुरुस्त करणे; इजा करणे; बिघडविणे; शिथिल करणे. ४. झेजरचे = चेचणे; बदडणे; ठेवणे. (गो.)५. ठेचणे : 'बाळतलिंबाचा पाला झेजरून आन -' वारी १२१. ६. त्वचा हुळहुळी होणे.

**झेजरणे, झेझरणे** पहा : **झेंझटणे, झेंझडणे**

**झेटकने** क्रि. रोड होणे; अशक्त होणे.

**झेटि** स्त्री. केसांची बट : 'कपाळ झेटि मिसें बोट लावि तेसी लल्लाटीं।'- निगा ९०. [सं जटा]

**झेडोली-ळी** स्त्री. गवताची चुडी (प्रकाशासाठी पेटविली जाणारी).

**झेप** स्त्री. १. पुढे किंवा बाजूस कलण्याची गती; झोक; तोल; झोकांडा; हेलकावा; झाप. (क्रि. देणे, खाणे, घेणे, जाणे.) : 'झेप घालीं सुखरूप गगनपंथें।' - रकाव्य १८. २. पक्ष्यांची भक्ष्यावरील झडप. ३. एखादा पदार्थ पकडण्यासाठी पुढे मारलेली उडी, झाप : 'झाला सावकाश झेंप घाली वरी।' - तुगा ५१. ४.पोहणाऱ्याची पुढे जाण्याची अथवा पाणी तोडण्यासाठी लांब हात टाकण्याची गती इ. (क्रि. घालणे, मारणे, टाकणे.) ५. लंबक, पाळणा, झोपाळा इ.ची झुलती गती; आंदोलन; डोल; झोल; मागेपुढे होणे. (क्रि. घालणे, देणे, घेणे.) [सं. क्षिप]

**झेप** स्त्री. अथांग पूर असलेली स्थिती.(व.)

**झेपटी** स्त्री. तोंडावर लोंबणारी (केसाची) बट.

**झेपणे** अक्रि. १. पोहणे; पाण्यावर तरंगणे; खेळणे. (खा.) २. झेप घेणे.

**झेपणे, झेपाविणे** उक्रि. पेलणे; सोसणे; पूर्ण करणे; पार पाडणे; बजाविणे; करणे (एखादे कष्टसाध्य काम) : 'प्रतिपादन करावयाचे गहन अर्थ कोत्या मराठी भाषेस झेपण्यास कठीण असे वाटून. '-नि २.

**झेपसा** पु. १.झोपाळ्याची दोरी; झेपुटा. (को.) २. झोका; दोल; डोल. (क्रि. देणे. घेणे.) [सं. शेप]

**झेपसा** पु. मातीचा ढेपसा; ढेकूळ. (प्रां.)

**झेपावणे** अक्रि. १. उडी घालणे किंवा टाकणे : 'कितीयेक झेंपावती अंतराळीं।' - रामक १.१३. २. झडप घालणे (पक्ष्याने). ३. वेगाने येणे; उसळणे; झाप टाकणे (सापाने): 'लज्जेनें न पुसे सखिप्रति कदा कंदर्प झेंपावला ।' - अकक २. ४. लुब्ध होणे; भुलणे; मागे लागणे : 'पाहून मोहरा तुजसारखा तुजवर झेपावती । तुला आपलेकडे मोहिती ।' - होबाला ९३.

**झेपाळणे** अक्रि. हेलपाटणे; झोक जाणे: 'वाऱ्याला धराय चालल्यागत झेपाळत हुता.' - गोतावळा २७.

**झेपुटा** पु. झोक्याची, पाळण्याची दोरी; झेपसा. [सं. शेप]

**झेपुटी** स्त्री. झोपाळ्याची दोरी.

**झेम** स्त्री.डुलकी; झोप. (गो.)

**झेमला** पु. शेमला, फेटा बांधल्यावर त्याचा खाली सोडतात तो झोळ : 'डोक्याला खादीचा फेटा (त्याला झेमला नसे) असा असे.' - माजीया २४७.

**झेराफिन** न. एक फिरंगी नाणे.

**झेल** स्त्री. १. झोका; झोपाळा; झोला : 'तुटली संसाराची झेल.' - अमृतकसं ११३. २. जाळे.

**झेल** पु. वस्तू चेंडू झेलणे, पकडणे : 'त्याने घेतलेले झेल..' - गाक्रिप २२०.

**झेलकरी** पु. गाणाऱ्याच्या मागे सूर धरणारा : 'झेलकऱ्यागत बायकोनं सूर काढला...'- टारफुला १७५.

**झेलगे** न. आंबे काढण्याची आकडी. पहा : **झेलणी २**

**झेलचे** अक्रि. मागेपुढे होणे; डोलणे; झोका घेणे. (गो.)

**झेलचेंडू** पु. लॉनटेनीसचा खेळ. (बडोदे)

**झेलणी** स्त्री. १. वस्तू अलगद पकडणे; पकड. २. फळे काढण्याची जाळे लावलेली आकडी; झेलगे.

**झेलणे** उक्रि. १. फेकलेली किंवा पडणारी वस्तू हाताने अलगद पकडणे. २. (ल.) तत्काळ (श्लोक, गाणे वगैरे) ध्यानात ठेवणे; उचलणे; अनुसरणे. ३. उत्सुकतेने कबूल करणे, मान्यता देणे, परवानगी देणे (सूचना, विनंती, वचन यास). ४. स्वीकारणे; ग्रहण करणे; पत्करणे (आव्हान इ.)[सं. सम् + वेल्ल] (वा.) (**थुंकी, शब्द** इ.) **झेलणे** - आपल्या कामासाठी दुसऱ्याची वाटेल ती गोष्ट ऐकणे.

**झेलती** स्त्री. (नाविक) बोडतास दम भरण्याकरिता असलेली दोरी.

**झेलपटणे** अक्रि. झोकांड्या खाणे : 'झेलपटत बाहेर येता येता दारात आडवा पडलेल्या जमीवर त्याचा पाय पडला.' - चक्र ४४.

**झेलपाटी** स्त्री. झोकांडी; तोल न सावरणे : 'ते कुत्रे... झेलपाट्या खात रस्त्याच्या कडेला आले.'- वेज ३०.

**झेलरवा** पु. (सोनारी) फीव; सोन्याच्या सुताच्या एका टोकास दिव्यावर धरून केलेला रवा; गोळी (हा नथेसाठी वापरतात).

**झेला** पु. १. पुष्पगुच्छ; फुलांचा झुबका, घोस : 'गमे चंपक-कुसुमौघ हार झेला।' - रकाव्य १८. २. फुलासारखी नाजूक पकड :'दळण दळीते, पाच बोटांच्या झेल्यानी । दूध घेतलं तुझं ग मालनी ।' - लोले ३११.

**झेला-ली-ले** पु.स्त्री. न. १. झाडावर लावलेले मोठे जाळे. आखी. यात झेलणीने उतरलेले आंबे टाकतात. २. शेताला पाणी द्यायची एक प्रकारची टोपली.

**झेलौचे** अक्रि. मागेपुढे करणे; झोके घेणे; हलविणे. पहा : **झेलचे** (गो.)

**झेहल** वि. जलाली; जहालपण.

**झेंगट** न. एक वाद्य. पहा : **झंगट-ड** [ध्व.]

**झेंगट** न. १. कठीण काम; त्रास; लचांड; कचाटी; घोटाळ्याचा प्रश्न. २. गुप्त कट; हिकमत; युक्तिप्रयुक्ती. ३.(ल.) ठेवलेली बाई; रखेली. [सं. जेंगट, झिंजट]

**झेंगट्या** वि. हिकमती; लटपट्या; विनाकारण ब्याद आणणारा.

**झेंजटणे** अक्रि. वाजविणे; गाणे. [ध्व.सं.शिज्]

**झेंजट(ड)णे,** अक्रि. थंडीने जड होणे; नाक चोंदणे; थंडी बाधणे; सुन्न होणे. [सं. हद्]

**झेंडा** पु. १. पताका; निशाण; ध्वज; काठीसह निशाण. २. फुलांच्या माळा घालून मिरवणुकीत चालविलेले निशाण. ३. (ल.) मोजणी कामगाराची काठी, निशाण.[सं.ध्वज+दण्ड] (वा.) ० **नाचविणे, मिरविणे** - स्वत:ची प्रौढी मिरविणे; स्वत:स मोठे समजणे; आपलाच पराक्रम सांगणे (पराक्रम केल्यानंतर, विवाहानंतर झेंडा (धेंडा) नाचविण्याची चाल असते तीवरून). ० **लावणे, रोवणे** - एखादा मोठा पराक्रम करणे; कीर्ती संपादणे; ध्वज लावणे (हा शब्द उपरोधिक अर्थानेही वापरतात) : 'दिल्लीआग्र्यावर झेंडे रोविले।' - ऐपो २४९.

**झेंडा(डे)पट्टी** स्त्री. १. नवीन निशाणाचा खर्च भागविण्यासाठी गावावर (प्रवासी, व्यापारी यांच्यावरही) बसविलेला फाळा. २. झेंडा

लावण्या-वापरण्याबद्दलचा कर.

**झेंडू** पु. १. एक फुलझाड व त्याचे फूल. याच्या कळ्या (लहान फुले) तांबड्या मखमालीच्या चेंडूसारख्या दिसतात; मखमाल. (वा.) ० **फुटणे** - अरुणोदय होणे; संधिप्रकाश. [का. चंडुहुव्वु]

**झेंडू** पु. जहरी साप चावल्यानंतर तोंडातून बाहेर येणारा रक्तमिश्रित फेस; फेसकूट; रक्ताची गुळणी. (क्रि. येणे, फुटणे.) : 'तत्काळचि झेंडू येऊन। तेथेंच त्याला गेला प्राण ।' - भावि ५४.४७. (वा.) ० **फुटणे** - १. (ल.) तोंडाला फेस येईपर्यंत दमछाक होणे. २. घाबरगुंडी उडणे : 'त्याचा झेंडूच फुटला असता.' - उअं २३.

**झेंडू** पु. गुरांच्या घशातील एक रोग. (राजा.)

**झेंडू** पु. लाकडाची मोठी टकळी.

**झेंडूगेंद** पु. झेंडूच्या आकाराचा गेंद; गुच्छ.

**झेंडोली-ळी** स्त्री. गवताची चूड. पहा : **धेंडोली**

**झेंब(म)णे, झेमणे** अक्रि. १. कोमेजणे; वाळत जाणे (वृक्ष, लता इ.). (को.) २. झोपेची डुलकी घेणे. (को.)

**झॅक** स्त्री. तोरा; ऐट : 'पुन्हा ते आपल्याच झॅकेत बोलले.' - तअं २१६.

**झॅक** वि. झक; झकास; सुरेख : 'गावाला झॅक सडक झाल्यावर...' - आपा ५.

**झॅम** स्त्री. झोप; डुलकी. (गो.)

**झॅल जाणे** कडक वागणे; उग्र धोरण स्वीकारणे : 'तंवर झॅल जाण्यात अर्थ न्हाई...' - टारफुला २३६.

**झोक** पु. १. कल; ओळंब्यांतून एकीकडे कलणे; झुकणे; तोल. (क्रि. जाणे.) २. (ल.) वळणे; रोख; कल; दिशा; मोडणी; रीत; चाल; वृत्ती (सैन्य कूच करताना, स्वभावाची, भाषणाची इ.). 'राजबाच्या लक्षांत केसरसिंगाच्या बोलण्याचा झोकच आला नव्हता.' - स्वस्था १९. ३. वाऱ्याचा मोठा झोत; वादळाचा तडाखा, झटका. ४. झपाटा (वस्त्राच्या पदराचा). ५. (ल.) भाषणाचा प्रवाह, वेग: 'श्लोक वाचण्याचा झोक थांबवून अर्थाकडे थांबावें लागतें.' - विज्ञावि ८.७.१२४. ६. प्रवृत्ती; तालमान; रीत. [हिं.] ७. बाज; पद्धत: 'नानाचा पुढला आयुष्यक्रम फारच निराळ्या झोकावर गेला असता.' - गणप १०१. ८. डौल.

**झोक** पु. दिमाख; ऐट. [अर.]

**झोक** पु. झुबका; गुच्छ. (ना.) [हिं.]

**झोकचिट्टी-ठ्ठी** स्त्री. १. खोटे अभिवचन; खोटा चेक किंवा करारपत्र. २. व्यर्थ दिलेला हेलपाटा; कपटवचन; खोटी आज्ञा. (क्रि. देणे.)

**झोकणी** स्त्री. १. झुकणे. २. ढोसण्याची क्रिया.

**झोकणे** अक्रि. १. ओळंब्यातून एकीकडे जाणे; कलणे; वाकणे; झेपणे; नमणे. २. झोके खात जाणे; झुकणे. [सं. जुष्]

**झोकणे** सक्रि. ढोसणे; मोठमोठे घोट घेणे; ढसढसा पिणे (दारू, दूध इ.).

**झोकणे** सक्रि. १. फेकणे; झुगारणे. २. साधणे; पार पाडणे; झेपणे. ३. बेधडक गप्प ठोकून देणे, सांगणे; (नसेल ते) उठविणे. 'तू आपला थाप झोकून देतोस वाटते.' - कर्मयोग ३७.

**झोकदार** वि. ऐटबाज; रुबाबदार : 'एकसारखे झोकदार पोशाख करून.' - दुर्दम्य २८३.

**झोकने** क्रि. फेकणे. (व.)

**झोकपट्टी** स्त्री. पोकळ वचन; भूलथाप; फुसलावणी. पहा : **झोकचिठ्ठी**

**झोकबाज** वि. चांगली; सुरेख.

**झोकल बातमी** उडत बातमी; हूल; अफवा.

**झोका** पु. १. हेलकावा; झोला; आंदोलन. (क्रि. घेणे, खाणे, देणे, टाकणे.) २. वजन करताना लुच्चेगिरीने तराजूला मारलेला झटका, आचका. ३. (ल.) निष्कारण प्रवास; हेलपाटा; फेरा; धक्का; फुकट फेरी. ४. झोपाळा; झोला. ५. हलविणे; मागेपुढे ओढणे. (क्रि. टाकणे.)

**झोका** पु. १. तोटा; नुकसान. २. फसवणूक; लुच्चेगिरी; गोता. (क्रि. देणे.)

**झोका** पु. १. पाणी झोकण्याचे टोपले. २. रस पिळण्याची जागा. (झाडी)

**झोकाझोक** स्त्री. १. फेकाफेक. २. (ल.) टाळाटाळ; सबबी सांगणे; दिवसगत लावणे; चालढकल. ३. दुसऱ्यावर काम टाकणे; कोलवाकोलव; टोलवाटोलव. [झोकणे द्वि.]

**झोकाठोका** पु. बोलाफुलास गाठ पडणे; अवचित घडणारी गोष्ट; दैवयोग; तडाखा; लग्गा (नशिबाचा). (वा.) **झोक्याठोक्यात येणे** - सहजगत्या किंवा दैवयोगाने घडून येणे.

**झोकाना** क्रिवि. काळजीपूर्वक. (झाडी)

**झोका बेतानं** अ. हळूहळू; सांभाळून; जपून.

**झोकावणे** अक्रि. झुकणे; डोलणे; तोल जाणे: 'हसं अनावर होत श्रोते इकडे तिकडे झोकावू लागले.' - साहेब २७४.

**झोकांडा-डी-डे** पु. स्त्री.न. १. झुकांडी; तोल जाणे. (क्रि. जाणे.) २. निसटणे; तुरी देणे; झुकांडी. (क्रि. देणे.)

**झोग** स्त्री. झुकलेला, पुढे आलेला भाग (मोटवणीचे खांबाचा, सुळक्याचा इ.)

**झोजा-झा-ज्या-झ्या** वि. १. स्थूल; दोंदील; पोटाळ; ढमाल्या. २. सुस्त; आळशी व मंद.
पु. गांडू. [अर.झौजा]

**झोज्यामल्लारी** पु. गबदुल, अजस्त्र माणूस. कपड्याचा बोंगा आलेल्या, मोठ्या माणसाचे कपडे घातलेल्यास म्हणतात.

**झोट** स्त्री. बैलांची झुंज. (झाडी)

**झोट-टा** पु. केसांचा बुचडा.

**झोटा** पु. १. रोपांची पेंडी. २. केसांचा टोप (विग). (झाडी). [सं.जटा]

**झोटाळणे** सक्रि. शेंडी धरून ओढणे : 'मन धांवतां कल्पनेपाठीं। विवेक उठाउठीं झोंटाळीं।' - एभा २३.९५.

**झोटिंग** पु. १. भूत; पिशाच्च (विशेषत: मृत मुसलमानांचे) : 'जाग्या झोटिंग जखिणी । त्यांस भजोन जन बुडाले।' - हरिवि १३.६७. २. (ल.) घरदार, बायको मुलगा नसलेला, फटिंग माणूस. ३. जुलमी, आडदांड, त्रासदायक माणूस.

**झोटिंगपाच्छाई, झोटिंगपा(बा)दशाही, झोटिंगशाही** स्त्री. १. बेबंद(द्ध)शाही जुलमी व भोंगळ कारभार, राज्यव्यवस्था: 'सुधारलेल्या राज्यपद्धतीस अनुसरून कांहीं गोष्टींत सर्वच झोटिंगपाच्छाई करतां येत नाहीं.' - टिकेले ४.२३०. २. अंदाधुंदी; गोंधळ ; घोटाळा; अराजक.

**झोटी** स्त्री. डोक्यावरचे लांब केस.

**झोटे** पु. अव. झिंज्या; केस : 'झोटे सोडलेली, भरल्या कुंकवाची... बाई त्याला ... बोलावत होती.' - आआं ५२.

**झोड** स्त्री. १. ठोक; मार; चोप. (क्रि. मारणे, काढणे.). २. (ल.) यथास्थित दणकणे, झोडणे, खरपूस समाचार. ३.(भाताची, धान्याची इ.) झोडपणी. ४. (ल.) एकसारखा जोराचा पाऊस. (क्रि. बसणे किंवा पावसाने झोड लावणे.) ५. अतिरेक; पराकाष्ठा; भडिमार. उदा. गाण्याची, जेवण्याची, लिहिण्याची झोड. (क्रि. लावणे, लागणे, पडणे.) ६. गर्दी; रास. (व.) (वा.) ० **उठविणे** - कहर करणे; भडिमार करणे : 'पावसानं झोड उठवली होती.' - बएरा ३५.

**झोडकाम** न. ओबडधोबड, साधारण प्रतीचे काम; ज्याला चातुर्यापेक्षा शक्तीची जास्त गरज आहे असे काम; अंगमेहनतीने काम.

**झोडकामी-म्या** वि. जिकिरीचे, त्रासदायक, हमालीचे काम करणारा; कसबी नव्हे असा (सुतार इ.); अकुशल.

**झोडगा** वि. झोडण्याची आवड असणारा; मारकट; मारका; निर्लज्ज; हट्टी; हेकेखोर; ठोक देणारा.

**झोडगी** स्त्री. धान्याची कणसे झोडपून त्यातून दाणे काढण्याची क्रिया; झोडणी; झोडपणी.

**झोडगे** न. कोडगी, निर्लज्ज, स्वैरिणी, हट्टी स्त्री. (राजा.)

**झोडझपाट,झोडझपा(पे)ट** पु. स्त्री. १. जोराचा हल्ला, धाड (मारण्यासाठी किंवा लुटण्यासाठी). २. मारामार; लुटालूट; जुलूम; मूठमर्दाई.

**झोडणी** स्त्री. १. भात झोडण्याकरिता आयंडा ज्या दोरीने बांधतात ती दोरी. पहा : **झोडगी**. २. काठी इत्यादींनी झोडपण्याची, मारण्याची क्रिया.

**झोडणे** उक्रि. १.बडविणे; कुटणे; झोडणी करणे; मळणे. २. (ल.) चांगले मारणे; ठोकणे; झोडपणे; कुबलणे. ३. रेटणे; भरडून काढणे. ओबडधोबडपणे करणे (काम, मेहनतीचे काम, व्याख्यान). ४.(अशिष्ट) घशात कोंबणे; खच्चून भरणे. ५. (खेळात) डाव मारून येणे.[सं.क्षुद्र] (वा.) **झोडून घेणे** - (गंजिफांचा खेळ) घेणी घेणाराने राजाबरोबर आणखी एक पान टाकून मारणे; देणी देणारा जर आपल्या लगतचा (उजव्या हाताकडील) असेल व देणीसाठी उतरलेल्या पानाच्यावरील पान आपल्या हातात असेल तर राजाबरोबर ते पान टाकून डाव घेणे. असे केल्याने या हाताची सहा पाने मिळतात.

**झोडणे** उक्रि. (ग्राम्य) संभोग करणे.

**झोडणे** सक्रि. १. लुटालूट करणे; दरोडे घालणे. २. हाणमार करीत राहणे; दांडगाईचे वर्तन ठेवणे.

**झोडपट्टी** स्त्री. १. खरपूस मार, चोप, ठोक. २.(ल.) खरडपट्टी.

**झोडपणे** उक्रि. पहा : **झोडणे** (शब्दशः व ल.) १. ठोकणे; बडवणे. २. ताव मारणे; फडशा पाडणे. ३. झोडणे;

**झोडपा** पु. फळें पाडण्याची काठी. (झाडी)

**झोडपे** न. लाकूड : '(नागपुरी मराठीतील) सासू (=जळण), ताप (= विस्तव, शेक)... झोडपं (= लाकूड)वगैरे शब्दहि ग्रांथिक मराठीला नवीन वाटतील.' - पेंगौग्रं ११८. (ना.)

**झोडाझोड** स्त्री. १. यथास्थित चोप, मार; मारामारी; ठोकाठोकी. २. (ल.) चलाखी; चपळाई (काम, लढाई इ.तील). [झोडणे द्वि.]

**झोडी** स्त्री. मार.

**झोडीधाडी** स्त्री. पुंडावा : 'धारापत पुंढावे झोडीधाडी करीत असत.' - ऐको ४६७.

**झोडीव** वि. १. झोडलेले; मळणी केलेले. २. (ल.) ओबडधोबड रीतीने तयार केलेले; कसेबसे भरडून काढलेले. ३. वाकसाने कसेबसे छिलून काढलेले (लाकूड).

**झोत, झोतावा** पु. १. आगीची मोठी ज्वाळा. २. पाण्याचा मोठा प्रवाह, लोंढा, लोट (वरून खाली पडणारा); धोत. ३. (सामा.) प्रवाह; लाट (वारा इत्यादींची) : 'वोसाणे वाहाती उदंड । झोतावे दर्कुटे दगड।... वळसा उठे ।।' - दास ११.७.६. ४. प्रकाशाचा लोट : 'तेव्हा आपण तरुण होतो... किर्तीच्या झोतात होतो.' - साहेब ४०२. [सं. ज्योतिस्]

**झोतदिवा** पु. प्रकाशकिरण टाकणारा दिवा : 'बाजूच्या पडदाणीतून झोतदिवे...' - असा ११.

**झोतदीप** पु. १. (भौ.) दूर अंतरापर्यंत प्रकाश देणारा दिवा. २. (विअ.) मोठा प्रदेश प्रकाशमान करण्यासाठी पृष्ठभागापासून काही अंतरावर ठेवलेले मोठ्या क्षमतेचे दिवे.

**झोतभट्टी** स्त्री. (भौ.) धातूचा रस करण्याची गरम हवेच्या झोताने चालणारी भट्टी.

**झोतली** स्त्री. दोराचा पाळणा; मोठी पिशवी.

**झोति-ती** स्त्री. अडथळा; व्यत्यय. विक्षेप; धक्का. 'रचलेपणा पडैल। झोती हन ।' - ज्ञा १३.२५६.

**झोत्री** स्त्री. दोरीचा पाळणा.(झाडी.)

**झोप** स्त्री. निद्रा; नीज. (क्रि. घेणे, येणे.) [सं. स्वप्]

**झोपडकरू** पु. झोपडीत राहणारा : 'आजारी नि अपंग झोपडकरूंची तिरपीट उडाली.' - माखा १०.

**झोपडपट्टी** स्त्री. नागरी सुखसुविधांचा अभाव असलेली, अतिगर्दी, दाटीवाटी असलेली गलिच्छ वस्ती; आरोग्यविघातक अस्वच्छ वस्त्या, दारिद्र्य आणि सामाजिक बेशिस्त यांनी युक्त असलेला बकाली नागरी किंवा उपनागरी भाग.

**झोपडी-डे** स्त्री. न. १. गवतारू घर; खोपटी; पर्णकुटी. २. काड्यामोड्यांचे घर; अगदी गरिबाची राहण्याची जागा (झोपडीपेक्षा झोपडे हे जास्त हलकेपणा दर्शवते. अगदी कमी प्रतीची झोपडी = झोपडे असाही अर्थ करतात).

**झोपण** न. बैलाच्या डोळ्यांवरील ढापण.

**झोपणे** अक्रि. निजणे.

**झोपय, झोपै** स्त्री. झोका; आंदोलन. (गो.)

**झोपरा** वि. झोपाळू; खूप झोपणारा.

**झोपा** पु. १. डोल; हेलकावा; झोका. २. झोपाळा; चौपाळा; झुला: 'आडकिला झोंपा । रिता कळिवराचा खोंप ।' - तुगा २४७६.

**झोपा** पु. १.नांगरलेल्या जमिनीत धान्य पेरून ती जमीन सारखी

करण्यासाठी लांब दोरी बांधलेला टहाळांचा झुबका, केरसुणी. (को) २. झापा; झोपाटा; झोपडी किंवा कुंपण यांचे (बारीक फांद्यांचे विणलेले) ताटीवजा दार; झापा.

**झोपाळ** न. भाराने वाकलेली अवस्था : 'तुळशीला घाली पानी तिचं झालंया झोपाळ। तिथं खेळतो गोपाळ।' – लोसाको

**झोपाळा** पु. १. झोके घेण्याचे साधन; हिंदोळा; चौपाळा; झुला. २. एक कडी पायांच्या लवणीत धरून दुसरी कडी हातात धरून झोके घेण्याचा खेळ. [क. जोकालि]

**झोपाळा आंबा** पु. ज्याची फळे खाली टेकतात असा आंबा.

**झोपाळू–ळ–ळ्या** वि. अतिशय झोप घेणारा; नेहमी सुस्त असलेला.

**झोरा** पु. थोडेसे सामान मावण्याजोगी, गळ्यात अडकविण्याची कापडी पिशवी, बॅग : 'आठवल्यानं गादीपाट अन् एक धडसा सदरा घेऊन झोऱ्यांत कोंबला.' – बाविबु ३२६.(व.)

**झोरा** पु. झोऱ्या; एक तऱ्हेचे जाजम किंवा सतरंजी.

**झोरा** पु. एका लोखंडी चौकटीस झोळाप्रमाणे कापड शिवून मुलांकरिता केलेला झोला, पाळणा इत्यादी.

**झोरा** पु. (बांधकाम) धाब्यांतील धारे ; झरोका.

**झोरीमुशी** स्त्री. समुद्रातील मुशी नावाच्या माशाची एक जात.

**झोरो** पु. रोडपणा; अशक्तता. (राजा.)

**झोऱ्या** पु. जाड सुताडा. हा जाड्याभरड्या सुताचा असतो. बोऱ्या; पांढरे जाजम किंवा सतरंजी : 'खाली बसायला एक झोऱ्या होता.' – मस्थि ४३.(खा.)

**झोऱ्या** पु. सुताराचे एक हत्यार. (को.)

**झोल–ळ** पु. वस्त्राचा सैल व हलणारा शेवटाचा भाग; घोळ; घेर (अंगरखा इत्यादींचा). [सं. दोल]

**झोल** पु. झोला; हिसका; धक्का: 'जैसा क्षपणिक निषेधी झोल । पिकल्या मधुमोहळांचे ।।' – मुआदि १६.१४२.

**झोल–ळ** पु. १. कल; तोल; एकदम एका बाजूस वळणारी गती; झोक; झटका; फेर; गिरकी. (क्रि. देणे.) २. झोका; डोल: 'झोल झोलों' देवापासी जगावें रे ।'– दावि २०३.

**झोल** वि. लफंगा; लबाड. (व.)

**झोल** वि. थलथलीत : 'वयें उतार झोल शेवटीं।'– अकक २. [सं. दोल]

**झोलकांडा** पु. झोक; झोकांडी. (क्रि. जाणे.)

**झोलणे** अक्रि. झोका घेणे, देणे, खाणे; डोलणे; हालणे.

**झोल(ला)र** वि. घोळाचे; फुगीर; झोल आलेले (छत, बाज, वस्त्र इ.).

**झोलविणे** सक्रि. झोके घेणे, खाणे, देणे; हलविणे.

**झोला** पु. १. झोका (क्रि. देणे, घेणे.) : 'तो मुकाट्या उठला, अंगाला झोले देत गावात गेला.' – वाळवण ५.२. झोपाळा; हिंदोळा.[सं. दोला] (वा.) ० **खाणे** – झोके घेणे : 'हिंदोळ्यावर झोलें खाऊ लागले.' – अंया ३३. ३. झोक; कल; तोल: 'डोले बोलत बोल तों न धरवे गेलांचे झोला भला।' – आसीस्व ४४. [सं. दोला]

**झोला** पु. १. फसवणूक; गप्प; कपट; लबाडी; टाळाटाळ. (क्रि. देणे.) २. धोका; संकट; त्रास : 'येमयातनेचा झोला । कठीण आहे।' – दास ११३.३.८. ३. गोता; हिसका. (क्रि. मारणे.) : 'जो देता मधुकैटभ– कनकशिपुमुख – महासुरां झोले ।' – मोस्त्री २.३०. [सं. दोल] (वा. ) ० **बसणे** – गोता बसणे; नुकसान होणे.

**झोला** पु. १. झोळ – झोल; पदर; काठ; सोगा. २. घोळ सुटणे, सोडणे; झोलफुगारा (वस्त्राचा). [सं.दोल]

**झोलाझोल** स्त्री. झुकांडी; टाळाटाळ; टोलवाटोलवी. [झोलणे द्वि.]

**झोलावणे** अक्रि. ढेरपोट्या, थलथलीत, गबदुल होणे, असणे.

**झोल्याचा शेकाटा** उंच बांबू: 'शिवाजी असा होता? बोंड्या नाकाचा?.. झोल्याचा शेकाटा?' – पडघ २२०.

**झोवीरे** पु. अव. झरे : 'ठाई ठाई झोवीरे जाले । विदुल्यतांचे ।।' – दास १६.४.२७.

**झोळ** पु. वस्त्राचा वगैरे लोंबणारा फुगीर भाग; घोळ : 'कासेच्या झोळावरून तिची (शेळीची) दोन तीन वेते झाली असावीत.' – वावटळ ३२. पहा : **झोल**

वि. (ल.) मिथ्या; खोटा.

**झोळ–ळी** स्त्री. १. झोळी, पिशवी : 'तें देह झोळु ऐसें मानुनी। ठेले आपणचें आपणचि होउनि ।'– राज्ञा ८.५९; 'जैसें कल्पतरू तळवटीं। बैसोनि झोळिये पाडी गांठी।' – राज्ञा ९.३०८. २. खोळ; गवसणी.

**झोळकंबणे, झोळंबणे** उक्रि. लोंबकळणे; लोंबकळत राहणे, ठेवणे; झोके घेणे; हेलकावणे; हेलकावे घेणे.

**झोळकं(खं)बा–कुंदा–खुंबा** पु. १. सैलपणे इकडेतिकडे, पुढेमागे हलणे; झोल; झोका; लोंबकळी; हेलकावा. (क्रि. घेणे, खाणे.) : 'तदन्याय तरूवरतीं । देव उफराटे झोळकंबे घेती ।' –नभसा १२.१८५. २. झोपाळा; चौपाळा; पाळणा; झोला.

**झोळण** स्त्री. १. चोळ; झोळ; फुगवट (वस्त्र, छत इत्यादींचा). २.सुरकुती; वळी; आठी.

**झोळणा** पु. १.औषधांचा, विड्याच्या सामानाचा, चार तोंडाचा व चार दोऱ्यांचा बटवा, पिशवी; लोंबती मोठी पिशवी. [क. जोळ्ना] २. चार कोपरे एकत्र केलेले वस्त्र (आजाऱ्यास नेण्याचे); अशा झोळण्याने आजाऱ्यास वाहून नेण्याचे काम करणारा तो झोळणेकरी : 'झोळणेकरी व तट्टे व पालखी व दुम–मनुष्य, चालणार नव्हे ऐसे लोक, शेंदीडशें हें आम्हाकडे पाठविले.' – ऐको ४६८. जहाजावर जनावर चढवण्याकरिता तयार केलेली नवधण, शिंके, शिंकाळी. ३. पोते (भूस, हलके पदार्थ ठेवण्याचे). [सं. झौलिक]

**झोळणी** स्त्री. भाद्रपदातील गौरींच्या सणाच्या दिवशी करावयाचा एक पदार्थ. (व.)

**झोळमाठ** वि. ज्यांचा डेरा किंवा पोट मोठे आहे असा (माठ) : 'काचेचे मर्तबान झोळमाठ मडकीं आणून... त्यात तेल तूप साठवावें.' – मराआ ११०.

**झोळा** पु. १. मोठी झोळी. २. डोळा : 'तेणे झांपताति झोळे : सारथीयाचे'– रुस्व २०७८. [सं. झौलिक]

**झोळी** स्त्री. १. पहा : **झोळणी**. २. चौपदरी; दोन दोन कोपऱ्यास गाठ

दिलेले फडके (भाजीचे, भिक्षेचे). ३. वस्त्राचा पाळणा; दोऱ्यांचा विणलेला पाळणा. ४. (सामा.) पिशवी. ५. लढाईत जखमी झालेल्या माणसास उचलून आणण्यासाठी दोन भाल्यांवर पासोडी गुंडाळून त्याची स्ट्रेचर बनवून त्यास काढून आणीत, त्याला झोळी म्हणत. [क.जोळिगे; सं. झौलिक]. (वा.) ० **घेणे,सावरणे** - भीक मागणे.

**झोळीकोपरगावचा सुभा** भिकेचा धंदा. (क्रि. घेणे.)

**झोळीगुढा** पु. शिष्याला झोळी (म्हणजे संन्यास) देण्याच्या विधीबाबतचा ग्रंथ.

**झोळीबंद** वि. भिकारी; भीक मागण्याचा धंदा करणारा.

**झोळु** पु. पदर, घोळ : 'अंगौनि येकुणा झोळु । फेडितांचि तो बाहिरिलु' - अमृता २.४८.

**झोंट** पु. १. निर्लज्ज, अरेराव, सदसद्विचारशून्य माणूस. २. (विशेषतः) कर्ज फेडण्याच्या कामी लबाडच्या किंवा खळखळ करणारा माणूस. ३. (सामा.) अरेराव, जुलमी, दांडगा माणूस. पहा : **झोंड**

**झोंट, झोटी** स्त्री. १. झिपरी; पुढील केस; झुलूप; बटः 'झोंटी धरूनि विराटसुता ।' - मुविरा ६.६२. २. लहान मुलांचे जावळ. ३. (सामा.) शेंडी. [सं. जटा]

**झोंट धरणी** स्त्री. १. एकमेकांचे केस धरून ओढणे; भांडणे; केशाकेशी. २. (ल.) भांडण; तंटा; कज्जाः 'झोंट धरणी केशयुद्ध ।' - मुआदि ३०.१६०. ३. झोंबाझोंबी : 'परंतु हिंमत धरून आंगावर कोणी येईनात. परस्पर झोंटधरणी होतच होती.' - भाब ७०.

**झोंटधरणी** स्त्री. १. झोंट माणसापासून कर्जफेड करून घेण्यासाठी केलेले अतिशय श्रम, खटपट. २. कृपा व्हावी म्हणून एखाद्याची केलेली हांजीहांजी; नीच सेवा.

**झोंटाई** स्त्री. झोंट माणसाचे वर्तन, वर्तणूक, दांडगाई; झोंडपणा.

**झोंड** पु. १. पहा : **झोंट**. २. दांडगा; पुंड. ३. (विशेषतः) निगरगट्ट कूळ : 'नाहीं गळां पडलों झोंड ।' - तुगा १२५४.
वि. चिकट; कोडगा; निर्लज्ज, अंगाला चिकटणारा. [सं. सं+पत्]

**झोंडगी** स्त्री. निलाजरी; दांडगी स्त्री : 'झोंडा झोंडगीचे पोटी । फळें विजाती करंटी।' - तुगा २९७४. पहा : **झोडणे**

**झोंडपणा, झोंडाई** पु. स्त्री. उद्दामपणा; अरेरावी; निगरगट्टपणा : 'आतां पक्काच झोंडपणा करायचा.' - संस ४९. पहा: **झोंटाई** : 'हे तो झोंडाईचे चाळे । काय पोटीं तें न कळे ।।' - तुगा २०२६.

**झोंडोली** स्त्री. जुडी पेटविणे.

**झोंड्यांचा कापूस** शेवटच्या वेचणीचा कापूस.

**झोंबकळणे** अक्रि. लोंबकळणे : 'झोंबकळल्यागत वाकून बघू लागला.' - टारफुला १५५.

**झोंबकळा** पु. झोपाळा; हिंदोळा. (माण.)

**झोंबट** न. मैथुन; संभोग; ते करणारे जोडपे; झांगडू (विशेषतः सापाचे, प्राण्यांचे).

**झोंबट-ड-डे, झोंबाट** न. १. त्रासदायक काम किंवा माणूस; लचांड; कुलंगडे. २. कचाट; संकट; तंटाबखेडा; भांडण; कलह; समुदायाचे भांडण; वाद आणि त्यातील लोक : 'हे काय रे झोंबट हे.' - संस ५७.

**झोंब(बा)डणी** स्त्री. १. ओढाओढ; हिसकणी. २. लूट; चोरी.

**झोंबडणे** उक्रि. १. धान्याची मळणी करणे. २. चोपणे; घाव घालणे; आपटणे (धुताना कपडे). ३. पहा : **झोंबाडणे**

**झोंबडा** वि. १. (बायकी) निर्लज्जपणे, दांडगेपणाने अंगाशी लगट करणारा; अंगाला झोंबणारा; आवळणारा (अतिप्रसंग करणाऱ्या पुरुषास म्हणतात). २. लोचट; चिकट; नकार दिला तरी पिच्छा पुरविणारा; अत्यंत आग्रही. ३.चावणारी (मुंगी, माशी.).

**झोंबडाझोंबड** स्त्री. १. हिसकाहिसकी; ओढाओढी. २. झगडणी; झोंबी.

**झोंबणी** स्त्री. १. कुस्ती; झोंबी. २. झगडाझगडी; हिसकाहिसकी.

**झोंबणे, झोमणे** सक्रि. १. आग होणे; तीव्र वेदना होणे; मर्मभेद होणे. २. (ल.) बोचणे; टोचणे; चावणे; चरचरणे; झणाणणे ; चुणचुणणे; डसणे (जाळ, उपरोधिक शब्द किंवा भाषण, निंदा). ३. डसणे (साप) : 'कीं झोंबला करीं साप ।' - मोकर्ण ६.५६.; नांगीने टोचून तीव्र वेदना करणे (विंचू इत्यादींनी). ४. जोराने व बलात्काराने स्त्रीस आलिंगणे, दाबून धरणे; पकडणे; अंगलट येणे; मिठी मारणे : 'ऐसे वदोनि कंठीं झोंबे दुःशासन स्वभावाच्या' - मोवन ७.७०. जोराने घसटणे. ५. भांडणे; मस्ती करणे; युद्ध करणे; तुटून पडणे; कुस्ती करणे : 'इकडे निशाणाकडे जनकोजी शिंदे झोंबतच होते.' - भाब ६३. ६.(ल.) ओढा असणे : 'कृष्णाकडे झोंबति मायबापें ।' - सारुह ७.९२. ७. (ल.) आकलन करणे; समजून घेणे : 'बोलाआदि झोंबिजे । प्रमेयासि ।' - ज्ञा १.५८. ८. झटून काम करणे : 'नरनारी झोंबती साहित्य करित ।' - दावि १७२. [सं. जंभ्]

**झोंबणे** अक्रि. दाट येणे; गुच्छ बनणे; अतिशय लगडणे (फुले, फळे, बहर). [क. जोंपु= गुच्छ]

**झोंबरा** वि. १.तीव्र वेदना करणारा, देणारा; मर्मभेद करणारा; जिव्हारी लागणारा; दंश करणारा; टोचणारा (अक्षरशः व ल.) : 'त्यांचा विनोद कधींही झोंबरा नसे. ' - कोकि ७२२. २. जोराने लगटणारा ; अंगलट करणारा ; जोराने अंग आवळणारा, धरणारा; पकडणारा. ३. एकदम चावणारा, तोडणारा. ४. जळजळीत; झोंबणारा; तीव्र : 'माळावरून गार झोंबरे वारे वाहू लागले.'- बनग २.

**झोंबा** पु. तेल ठेवण्याचे भांडे ; बुदला. पहा : **झाबा, झाबू**

**झोंबाउ** नपु. नसती ब्याद.

**झोंबाडणे** सक्रि. १. जोराने, दांडगाईने हिसकावून घेणे; धसकफसक करणे. २. लुटणे; नागविणे; लुबाडून घेणे; चोरी करणे.

**झोंबाडा** पु. १. जबरीने पकडणे, घेणे; घाला; हिसकावून घेणे; धाड; झेप. (क्रि. घालणे, करणे, घेणे, मारणे.) २. चोर; लुटारू; दरोडेखोर. ३. भूतबाधा. (झाडी) ४. कटकट. (झाडी)

**झोंबारा** वि. झोंबणारा : 'गार झोंबारा वारा आत येत होता.'- तूमांतूमो ४६.

**झोंबिन (त्र-नि)णे** सक्रि. आलिंगणे. पहा : **झोंबणे** : 'असासितु झोंबिनिली । प्राणवल्लभासि ।'- शिव ७०६.

**झोंबी** स्त्री. १. कुस्ती; झुंज; लढाई. (क्रि. घेणे. खेळणे.) : 'कृष्णापुढें नाचती गोवळे । झोंबिया घेती एक बळें । ' - हरिवि १३.२२४.

२. कज्जा; भांडण; तंटा.(क्रि. घेणे.) : 'की बांधिले ती आरोचकें। झोंबिआं विणू ।' – शिव ११९. ३. अंगलट; आलिंगन : 'तारुण्याच्या बळें घेऊं धांवलीस झोंबी ।'– निगा ९६. ४. उडी. (वा.) ० **घेणे** – झुंज घेणे : 'त्याच्याशी झोंबी घेत राहाणे एवढेच हातात उरते.' – खळाळ १८७.

**झोंबीलोंबी** स्त्री. अंगलट; कुस्ती : 'झोंबीलोंबी घेऊन । जाती टाकिती नेऊन ।' – दावि ४०४.

**झोंबीलोंबी** स्त्री. खेळीमेळीची झटापट.

**झाँळणों** पु. पाळण्याचे कापडी छप्पर. (गो.)

**झाँकी** आरास; सौंदर्ययुक्त मांडणी.

**झ्यंड** न. लचांड. (गो.)

**झ्या, झ्याझ्या** उद्गा. बैल, घोडा यांना हाकताना उच्चारावयाचा शब्द : 'तो कोदंडाचें घोडें करूनी । झ्या झ्या म्हणोनि ओढी मेदिनी ।' – रावि ७.२४९. (वा.) ० **म्हणणे, करणे** – पळून जाणे; झुकांडी देणे.

**झ्याऊ** वि. पादराफुसका; कुचकामाचा; निर्जीव.

**झ्याक–ग** वि. छान; सुंदर; उत्तम; चकचकीत; प्रकाशमान. पहा : **झाक** स्त्री. नोकझोक; ऐट; चकाकी; चमक: 'आज काय झ्याकीत काम दिसतंय !' – रैत ६९.

**झ्याझ्या** पु. (लहान मुलांत) घोडा.

**झ्याझ्यात** स्त्री. पराकाष्ठा; शिकस्त. (क्रि. करणे.) (कर.)

**झ्याझ्यू, झ्याट, झ्याप, झ्यापणे, झ्याल, झ्योजा** – हे व असलेच दुसरे शब्द झाझू, झाट इत्यादीमध्ये पहा. (यातील 'य' अक्षराने या शब्दांचा उच्चार कठोर होतो.)

**झ्याडीपुडी** स्त्री. खुशामत करणे; पुढे पुढे करणे : 'मास्तर जवळ परत झ्याडीपुडी करायची.' – रैत २९.

**झ्येतीय–व** पु. १. अशिक्षित. २.किरिस्ताव माणूस. (गो.)

■■

**ञ** –मराठी वर्णमालेतील पंचविसावे अक्षर आणि दहावे व्यंजन. हे व्यंजन शब्दारंभी आणि शब्दात इतरत्र येत नाही.

■■■



**ट** मराठी वर्णमालेतील सव्विसावे अक्षर आणि अकरावे व्यंजन.

**ट** पु. अक्षरशत्रू; मूर्ख; ढ. (वा.) ० **फ करणे**-एखाद्या विषयाचे फार थोडे ज्ञान होणे : 'विद्यालयांतून जे संस्कृतज्ञ बाहेर पडतात त्यांना ट फ करण्याचें सामर्थ्य आलें न आलें कीं लगेच कोणत्याही शास्त्रावर व्याख्यान, निबंध वगैरे सुरू झालेच.'– नि. ० **फ करीत वाचणे** – अडखळत किंवा चुका करीत वाचणे; एकेक अक्षर लावून वाचणे (नवीन शिकणारा असे वाचतो). ० **लाट जुळविणे**– १. यमकासाठी अक्षराला अक्षर जुळविणे. २. कमी प्रतीचे काव्य, कविता करणे : 'असे ढ पुढें येणार आहेत हें जर त्या कवीला माहीत असतें तर त्यानेंहि ट ला ट जुळविण्याचे श्रम घेतले नसते.' – मूना.

**टऊर** वि. खोडकर; टवाळ; उनाड (मूल). पहा : **टौर**

**टक** पु. १. औषधाचा एक भाग; डोस. (खा.) २. भाग; हिस्सा.

**टक** स्त्री. १. कपाळशूळ; कपाळ उठणे.(क्रि. लागणे). २. एकाग्र दृष्टी; एकसारखी दृष्टी. (क्रि. लावणे, लागणे.) : 'डोळीया पडलें टक।'– बगाथा २३४. ३. टकळी; गुऱ्हाळ.
न. १.आश्चर्यामुळे होणारी एकाग्रता; स्थिर दृष्टी; नवल; अत्यंत आश्चर्य; भूल. (क्रि. पडणे): 'मागधासी पडलें टक। तटस्थ ठेला मुहूर्त एक।'–एरुस्व ११.४५. २. (ल) मौन; मुग्धपणा (आश्चर्याने): 'वर्णितां थोरांसि पडलें टक।'–भवि २७.८. [सं.टक्]

**टक** स्त्री. १. अखंड आवाज (अभ्यास, ओरड, रडे, गाणे, पाऊस पडणे इ.चा); सातत्य; अखंडता. २. टकळी; गुऱ्हाळ. ३. सवय. (व.)

**टक** स्त्री. संकट. [सं.तक् = तग धरणे]

**टक** पु. कपडा शिवण्याची एक तऱ्हा; टीप. (क्रि. घालणे). २. चूण (आडवी).

**टक** पु. पिंड : 'टका कावळा शिवला नाहीं.' – ऐको ४६९.

**टकटक** स्त्री. १. अखंडपणा; सातत्य. २. कंटाळवाणे भाषण; बडबड; टकळी; वटवट. ३. सतत पिरपिर; चिरचिर; रडणे (मुलांचे). (क्रि. लावणे, लागणे.). ४. चालू घड्याळाचा एकसारखा ध्वनी.
वि. सतत; एकसारखे (पाहणे). [ध्व.]

**टकटक** स्त्री. चकचक; चकाकी; तकाकी (सापाची).

**टकटक–का** वि.क्रिवि.१.अनिमेष दृष्टीने; एकसारखे रोखून; नजर न हलवता; न खळता : 'दाजी टकटका पाहत होता. '– राकाधाका २१६.२. (कानशिले इ.) शिलशिलण्याने, उडण्याने. (क्रि. करणे).

**टकटक** स्त्री. भणभण. (अहि.)

**टकटकणे** अक्रि. टवटवी येणे; फुलणे; खुलणे; ताजेतवाने होणे; जोमदार दिसणे (फुले, चेहरा) : 'मन मरत नाही.... चेचून चेचूनही टकटकत राहतं डोळ्यांत....' – मुखवटे १३६. २. कानशिले उडणे, ठणकणे.

**टकटकी** स्त्री. टवटवी; प्रफुल्लितपणा; तुकतुकी (चेहऱ्याची).

**टकटकीत** वि. टवटवीत; तुकतुकीत; प्रफुल्ल; सतेज; ताजातवाना (चेहरा, पदार्थ); लख्ख.

**टकणे** उक्रि. १. मिळणे; येणे; लागणे.२. साधणे; प्राप्त होणे; करता येणे; साध्य होणे : 'हे अगाध निष्ठा परिपूर्ण। बाळ्या भोळ्या न टके जाण।'– एभा २.५१७. ३. तर्काने जाणणे. [हिं.; सं. तग्]

**टकणे** अक्रि. १. एकसारखे सकाम दृष्टीने पाहणे; टक लावून पाहणे. २. शकणे; करू शकणे. ३. टिकणे; स्थिर राहणे : 'असो न टकें माझें ध्यान।' – एभा २८.६१७. [सं. टक्]

**टकणे** अक्रि. विरोध होणे. [सं. स्तक्]

**टकणे** अक्रि.१ अडणे; बंद पडणे : 'जैं यमनियम टकति। तैं इंद्रियें सैरा विचरति।'– ज्ञा १.२४८. २. आश्चर्यचकित, थक्क होणे : 'गेले टकौनि अवघे पटचित्ररूपें ।' – गरा २७१.

**टकणे** अक्रि. १. सोडवणे. २. प्राप्त होणे. ३. टाकणे.

**टकणे** सक्रि. १. चिकटणे; जवळ जाणे. २. मिळणे. [सं. तग्]

**टकणे** पहा : **ठाकणे**

**टकबंदी** स्त्री. पिकांचे व गावकऱ्यांचे रक्षण. गाव वसाहतीस आणण्याच्या तीन मुख्य कामांतील एक.

**टकबंदी** स्त्री. दर टक्यास (प्रत्येक १२० चौरस बिघ्यास) अमुक रक्कम अशी जमिनीची टक्केवारीने मोजणी करून कायमचा ठरविलेला धारा.
वि. १. (टका = १६ शिवराई) टक्यांमध्ये ठरविलेले, हिशेब केलेले, ठेवलेले; (नेहमीप्रमाणे रुपयांत न ठेवलेले) हिशेब, रोखे. २. टक्क्याच्या हिशेबाने ठरविलेली, अजमास केलेली (जमीन).

**टकमक** स्त्री. टवटवी; बहर : 'तारुण्याचिया टकमका : सर्वांगें एकमेकां : बांधर्ती जालीं :'– उगी ३८.३१०.

**टकमक** पु. पर्वताचा उंच, कठीण, तुटलेला, वरून खाली पाहिले असता डोळे फिरतील असा सुळका किंवा कडा; अगदी उभा कडा.

**टकमक** स्त्री. निश्चल दृष्टी. पहा : **टक**

**टकमक–का** क्रिवि. निश्चलपणे; चकित होऊन. (क्रि. पाहणे) : 'टकमक पाहत होते प्रभुमुखचंद्राकडेचि मग्न चातकसे।' – मोउद्योग ७.९८.

**टकमक–की** स्त्री. गोलाकार, भोपळ्यासारखी फळे येणारी एक वेल.

**टकमक** स्त्री. चोहुकडे; खालवरही.– तंजा.

**टकमकीत** पहा : **टकटकीत**

**टकमके** न. टकमक वेलीचे फळ.

**टकरणे** सक्रि. टक्कर घेणे; हल्ला करणे : 'येसाजी शिंदे यांनी ४,००० फौज व दोन हत्ती ऐसे गाठूनच आले व पंताचे फौजेवर येऊन टकरले.' – ऐको ४६९.

**टकरमकर** क्रिवि. एकसारखे; टकटक. (व.)

**टकराघो** वि. पोपटासारखा वाचाळ; टकळी लावणारा; बाता मारणारा.

**टकरावणे** अक्रि. धडक मारणे : 'गावठी जत्रेचा जणू पूर लोटला होता आणि आत शिरायला एकेका डब्याशी टकरावत होता.' – जहेवोजे २.

**टकरी** वि. सारखे बघणारी. (व.)

**टकला** वि. दोन्ही शिंगे मागे असलेला.(व.)

**टकलाई** वि. सारखी फिरणारी; भटकी.(व.)

**टकली–ले–ळी** स्त्री.न. १. डोके; डोचके; विशेषतः डोक्याची कवची. २. सपाट जमिनीवरील उंचवटा; टेकडी.

**टकल्या, टक्कलमाथ्या** वि. डोक्यास टक्कल पडलेला.
**टकसाय** स्त्री. हेटाळणी; गैरसोय.
**टकळा** पु. १. टुकळा; विरहाने लागलेली घोकणी; वेध; ध्यास; जप; उत्कट इच्छा. (क्रि. घेणे, धरणे, लागणे, ठेवणे.) : 'सांडूनि दुधाची टकळी। गोंवारी गांवधेनु वेंटाळी।' – ज्ञा १८.१७४. २. घोष; घोकणी.
**टकळाई** स्त्री. टवटवी; तेज : 'त्यांची पहिली कळा मावळून आता अंगातोंडावर थोडी टकळाई आली होती.' – हपा ९६.
**टकळी** स्त्री. १. जीभ. २. एकसारखी वटवट; बडबड; चऱ्हाट; तोंडाचा पट्टा; लांबण; रडारड; भुंकाभुंक (बडबडे लोक, मूल, कुत्रे इत्यादींची). (क्रि. लावणे, लागणे.). पहा : **टकळा** [द्रा. टक, सं. स्तक्]
**टकळी** स्त्री.(ल).१. कापसाचे सूत काढण्याची चाती : 'म्हातारे बाजीनाना टकळीवर लोकर कातीत बसत.' – घरदार ७. २. डोके; डोक्याची कवची. ३. तीव्र इच्छा. [द्रा. टक]
**टका–क्का** पु. १. एक नाणे. २. पैका; धन; द्रव्य. ३. कर. (समासात) घरटका, लग्नटका, तोरणटका. [सं. टंक = नाणे, टंकक = छाप मारलेले चांदीचे नाणे] (वा.) **टके(क्के) करणे**– १. पैसा जवळ करणे; एखादी वस्तू विकून तिचे पैसे करणे. २. फायदा, नफा मिळविणे. ३. वर्चस्व मिळविणे; वरचढ होणे.
**टका–क्का** पु. १२० चौरस बिघे जमिनीचे माप; जमीन मोजणीचे एक परिमाण.
**टका** पु. कापडावर लिहिलेला लेख : 'येथेच दासोपंतांच्या पासोडीसारखे कापडावर लिहिलेले लेख मिळाले. त्यांस टका म्हणतात.' – अहागो २३२.
**टका** न. टोक; मर्यादा : 'टके उठिति बहुवसा।' – ज्ञा १५.१८६.
**टका–के** पु. न. १. निशाण; ध्वज; छत्र. २. (ल.) प्रतिमा; ठसा; छाप : 'स्त्री पुरुष नपुंसकें। हे व्यक्तिभेदाचें टके।'– ज्ञा (कुंटे)१५.१६१. [सं. तञ्च्; क. टंके=काठी, टेके=निशाण]
**टका** पु.स्त्री. अग्रभाग; कोंभ; अंकुर; पारंबी; धुमारा : 'तो पाला तया धुमे। टकेयावरी।।' – ज्ञा १५.१६६. [सं. तञ्च्, तग्]
**टकाका** पहा : **टकटक–का**
**टकाचोर** पु. हिमालयातील एक पक्षी : '(हिमालयात) साधारणतः ५००० ते ७००० फूट उंचीपर्यंत टकाचोर नांवाचे पक्षी वरचेवर दिसत. त्यांचें मुख्यांग साळुंकाएवढें असून शेपूट मात्र त्याच्या दुप्पट लांब असतें.' – पद ११२.
**टकाटका** क्रिवि. एकसारखे रोखून : 'तालुक्याच्या वाटेकडे टका टका बघू लागला.' – आपा २१.
**टकातोंडपा** पु. आघात; अनुभव : 'जमीदार येऊन टकातोंडपा खाऊन....' – आंपव्य ५.
**टकापैका** पु. पैसाआडका : 'आजीपर्यंत टकापैका खर्च जाहाला तो फुकटच जाहला !' – ऐको ४६९.
**टका(क्का)बंदी** स्त्री. १. पहा :२ **टकबंदी**. २. टका ( तांब्याचे नाणे) या नाण्यात हिशेब ठेवणे.
**टकामका** क्रिवि. चकित होऊन.
**टकामयोर** पु. छत्रमयूर; ज्याच्या छत्रावर मयूरचिन्ह आहे असा.
**ट(टं)कारी** पु. दगडाची जाती तयार करणारी किंवा त्यांना टाकी लावणारी पाथरवटाची जात; त्या जातीतील व्यक्ती; दगड घडवण्याचे काम करणारी एक जात, व्यक्ती.
**टकु(कू, को)च–चे** न. डोके, कान झाकणारे (बायकांचे, लहान मुलांचे) टोपडे; कानटोपी; कुंची.
**टकुरे–ले, टकोले** न. १. डोके; टाळू; मस्तक; टाळू; टकोरें; बोडके : 'माजं टकुरं मंजी काय मधानं बरबाटलेलं फूल हाय का?'–जैरेजै ३१. २. वरील भाग; तोंड.
**टकुली–ळी** पहा : **टकळी**
**टकुळी** स्त्री. पहाः **टकळा** १ : 'दुधाची टकुळी सांडूनि' – राज्ञा १८.१७२.
**टकेकार** पु. छत्र धरणारा.
**टके शेर** १. अतिशय स्वस्त; पैशास पायली; मातीमोल. २. कवडी किमतीचा; क्षुद्र; महत्त्व नसणारा. ३. चांगले किंवा वाईट एकाच मापाचे, एकाच योग्यतेचे; समानमूल्य.
**टकोचा** पु. हत्तीच्या डोक्यावर घालावयाची टोपीसारखी शिरी.
**टकोटको** क्रिवि. टकमक (पाहणे). (झाडी)
**टकोर** वि. कठीण; कडक (गूळ, माल).
**टकोर** पु. स्त्री. घोष; कल्ला; गोंगाट; कटकट. पहा : **टक ३**
**टकोर–रा** वि. मोठ्या आकाराचा; साधारण मोठा; (दुसऱ्यापेक्षा) मोठी. सामान्यतः लहानसहान वस्तूंबद्दल वापरतात.
**टकोरणे, टकोरे** पहा : **टिकोरणे, टिकोरे**
**टकोरा** पु. १. ठोसा; रपाटा (फळी, काठी, दांडके यांचा). पहा : **टिकोरा** २. एकसारखा नाद. ३. मोठी वाटी.(झाडी)
**टकोरी–रे, टकु(क्कु)रे, टकु(को)ले** स्त्री. न. (तिरस्कारार्थी) डोके; टाळू; टाळके. [क. टकोर= लहान टिमकी]
**टक्क** क्रिवि. पूर्णपणे : 'टक्क रात्र उजाडून उन्हे वर आल्याशिवाय आईचा विंचू उतरत नसे.' – व्यंमाक २७७.
**टक्क** स्त्री. खोड; चट; सवय. – (तंजा.)
**टक्कन** क्रिवि. झटक्यात; पटकन : 'म्हाताऱ्याची हनुवटी टक्कन उघडली.' – चक्र १०.
**टक्कर** स्त्री. १. (जनावरांची) शिंगे किंवा कपाळ यांनी परस्परांवर केलेला आघात; ढुसणी; समोरासमोर बसलेली धडक; ठोकर; धक्का. २. (ल.) बरोबरी; स्पर्धा; चढाओढ करण्याचा प्रयत्न; सामना.(क्रि. खाणे, मारणे.).
**टक्करणे** अक्रि. आदळणे; आपटणे : 'नव्या भिंतीवर जोरानं टक्करला.' – रानगंगा ११.
**टक्कल** न. १. डोक्यावर मध्यभागी केस नसणे; डोक्यावरील केस नसलेली जागा; केशहीनत्व (म्हातारपण, रोग इत्यादी कारणांमुळे झालेले). २.(ल.) उभ्या पिकाच्या शेतातील पीक नसलेला जमिनीचा तुकडा; माळरान; उंच व कोरड्या जमिनीचा प्रदेश. ३. (तिरस्कारार्थी) तोंड, चेहरा. ४. सपाटपणा. [क. तरट]
**टक्का** पु. मुलांच्या खेळातील कपाळावर टिचकी मारण्याचा खेळ. (वा.) **० देणे**– टोलवाटोलवी करणे; जबाबदारी टाळणे : 'कोण म्हणतो टक्का दिला? अशासारखा प्रकार चालला होता.' – रथचक्र १०२.
**टक्का** पु. आघात; घाव; टवका : 'नुसता रूढीच्या विरुद्ध शब्द काढायचा

अवकाश की आलीच सारी काव काव करून चोचींनी टक्के काढायला!' – पलकोघे ४७८.

**टक्के(के)टोणपे** पु. अव. १. ठोसे; आघात; प्रहार; ठेच. २.(ल.) संकटे; हालअपेष्टा; अडथळे; बरेवाईट अनुभव. (क्रि. खाणे, घेणे, सोसणे, भोगणे.). ३. अद्दल घडणे. ४. धक्के. ५.(ल.) संकट. [सं. तक्]

**टक्केवारी** स्त्री. शेकडा प्रमाण : 'चढत्या प्रमाणात ही टक्केवारी वाढत जाते.' – भादा ३८.

**टक्याचे भांडण** मुलींचा एक खेळ.

**टगचाई** पहा : **तंगचाई**

**टगट** पु. टिनाचा मोठा पत्रा.

**टगटगणे** अक्रि. रडणे; आक्रंदन करणे : 'तीसी घाए लागले : ते गेले : एकवीरा टगटगीति होति : परसरामा : धांव धांव :'–लीचउ १४६.

**टगळ** स्त्री. युक्ती; खुबी; शैली. (क्रि. साधणे) : 'ही बरी हाय की टगळ....' – टारफुला १९७. (कर.)

**टगेगिरी** स्त्री.१.भामटेगिरी; लुच्चेगिरी; डाव; कपट. २.दांडगाई; पुंडाई.

**टग्या** वि. १. लुच्चा; उनाड; गुंड; लबाड; भामटा; कपटी : 'एखादा पुंड टग्याही असेंब्लीची जागा अडवूं शकेल.' – के १.७.३०. २. गबदूल; गलेलठ्ठ; धटिंगण. ३. तगडा; निकोप; सशक्त : 'चांगला टग्या आहेस.' – हाकांध १९४. [सं. ठक; क. टक्कु = लबाडी, कपट]

**टग्या** पु. शिसे आत भरलेली मोठी कवडी.

**टच** न. नेमलेली वेळ; योग्य प्रसंग; काळ (कामकाजाचा); हंगाम; ऋतु; सुगीची वेळ; तयारीचा, घातीचा समय. (को.)

**टच** स्त्री. सोन्याचा दर्जा; कस. [इं.]

**टचकणे** अक्रि. १. बोचणे; रुतणे. २. धक्का लागून थोडेसे टिचकणे (अंडे इ.). [सं. तस्]

**टचकन-कर-दिनी-दिशी** क्रिवि.(याचा उपयोग हळूच, चपलतेने या अर्थी टोचणे, भोसकणे, खुपसणे इ. क्रियापदांबरोबर करतात.) टच असा आवाज होईल असे. उदा. टचकन डोळ्यांत पाणी आले.[ध्व.]

**टचक(का)रा, टचकारनीस** पहा : **तजकरा** इ.

**टचका** पु. १. एक लाकडी खेळणे (हे लाकडी गोट्यांच्या घडाचे असते.). २. टोच; टोचणी; टोचा : 'टचका बसताच कोणती जाणीव तरारून वर येईल याचा नेम नसतो.' – पवा २०४. ३. बोटाने किंवा गोटीने हळूच मारलेली टिचकी, धक्का इत्यादी; टच आवाज होईल असा प्रहार. (क्रि. मारणे). ४. (खडकाळ रस्त्यातून जाताना) गाडीला बसलेला आचका, धक्का.५. एकदम भळभळा स्राव (रक्त, पू, रस, अश्रू यांचा). ६. खटका. [ध्व. टच]

**टचका** पु. तुणतुण्यावरील लावण्या म्हणण्यातील झोक. [ध्व.]

**टचटच-चा** क्रिवि. टोचताना, ठोकताना, उवा-पिसवा इ. मारताना, गळू ठुसठुसताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे. [ध्व.]

**टचटचणे** अक्रि. १. ठुसठुसणे; ठसठसणे; ताठरून कडक बनणे; ठणकणे (गळू इ.). २. टच टच असा आवाज करणे. ३. फुगणे; सुजणे व दुखणे. [ध्व.]

**टचटचीत** वि. १. ठुसठुसणारे; ठसठसणारे; ताठरून कडक बनलेले; घट्ट; टणक; निबर (गळू); डब्ब झालेले, फुगलेले (पोट); रक्त खाऊन फुगलेला (ढेकूण). २. रसरशीत (द्राक्षे); गच्च भरलेली (शेंग, कणीस इ.) : 'तुरीच्या टचटचीत सावळ्या शेंगा ओरबाडायच्या...' – वाटा २. विशेषतः फुगणे, भरणे या क्रियापदांबरोबर, क्रियाविशेषण असताना योजतात.

**टचटचीत** क्रिवि. सढळ हाताने; औदार्याने (खर्च करणे).

**टचटचून** क्रिवि.१.विपुलतेने; भरपूर; पुरेपूर; वाहून जाण्याजोगे. (टोचल्याबरोबर आत कोंडला गेलेला प्रवाही स्राव इ.). २. अतिशय; विपुल (रडणे, डोळ्यांत पाणी येणे, सारखे खुपणे, जोराने ठणकणे या क्रियांचा आवाज, प्रकार यांचे अनुकरणवाचक).

**टचणे** अक्रि. ओढाताण करणे. [सं. तञ्च्]

**टचरणे-ने** अक्रि. कचरणे. (व.)

**टचाचणे** अक्रि. (टचटचणेचा अतिशय) जोराने, सारखे खुपणे; ठणकणे; सळक मारणे; ठुसठुसणे (गळू इ.).

**टचाचून, टचाचा, टचाटच-चा** क्रिवि. टचटच, टचटचून यांची आधिक्यदर्शक रूपे.

**टटमडना** क्रि. ताटकळणे. (झाडी)

**टटमड्या** स्त्री. अव. भुकेच्या जांभया. (झाडी)

**टटारणे** सक्रि. ताठणे (अंग इत्यादी). पहा : **तटाटणे**

**टटास** स्त्री. नीलकंठ पक्षी. (झाडी)

**टटोरी** स्त्री. धान्याने भरलेले, घोसदार कणीस. (को.)

**टटोरी** स्त्री. अन्न किंवा श्वासनलिका; अन्नमार्ग. (कुण.)

**टट्** वि. १. ताठ. २. स्थिर. ३. तुडुंब. (झाडी)

**टट्यान** पु. एक प्रकारचे गवत. (झाडी)

**टणक** वि. १.कठीण; दृढ; भरीव; निबर; कडक; दाट; घट्ट; फोडायला कठीण. २. (ल.) तगडा; मजबूत; कणखर; बळकट : 'टणक धाकुटीं। अवघीं सरती विठ्ठलीं।'– तुगा ३५५. ३.खणखणीत; खडखडीत; निरोगी. ४. प्रचंड; मोठा; स्थूल गंभीर :'ऐसा टणकु सिंहनादु।'– गीतार्णव १.७५५. [ध्व.;सं. तर्णक; क.ठण्के]

**टणक** वि. उंच. (तंजा.)

**टणक, टणकारा, टणकभाग** पु. श्रमामुळे आलेला थकवा; शीण; भोगवटा; बेजारपणा. (क्रि. येणे) : 'आतां आला असे टणक । निद्राकरी उगाची।' – भवि ३२.३८.

**टणकणे** अक्रि.१.(बायकी) कुरकुरणे; तक्रार करणे; फुरंगटणे. २. हिरमुष्टी होणे; दुर्मुखणे. ३. थकणे.

**टणकणे, टणकारणे, टणकणे भागणे** अक्रि. पुष्कळ श्रमाने ग्लानी येणे; थकणे; दमणे; शीण येणे : 'आवघीं भगतीजने टणकली : तीये राहीलीं :'– गोप्रच ८०.

**टणकणे, टणकावणे** सक्रि. मारणे; काठीने मारणे; सपाटा देणे. [क. टण्के=काठी, सोट्या, टण=मारण्याचा आवाज]

**टणकन-कर-दिनी-दिशी** क्रिवि. टणक पदार्थास लागून मागे उसळलेल्या गोटी इत्यादीच्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन; धनुष्याच्या टणत्कारासारखा. (उड्या मारणे, नाचणे, बागडणे, धुडगूस

घालणे इत्यादी क्रिया जोरदारपणे दर्शविण्यासाठीही त्या त्या क्रियापदाबरोबर हे क्रियाविशेषण योजतात). [क. टन; ध्व.]

**टणकरी** क्रिवि. पटकन.

**टणका, टणकारा** पु. १. विंचवाच्या नांगीचा ठणकारा; दंश; फणकारा (क्रि. मारणे); वेदना. २. (ल.) टोमणा; मर्मभेदक भाषण; व्यंगोक्ती; खोचदार भाषण. (क्रि. मारणे, मारून जाणे.). [ध्व.]

**टणकाई** स्त्री. १. काठिण्य; दृढता; घनता. २. कणखरपणा; धट्टेकट्टेपणा.

**टणकारणे** अक्रि. वाजविणे : 'मज कुडकुडें नाहीं येणें। नाहीं कवाड टणकारणें।' – एभा १२.२०२.

**टणकारणे** सक्रि. छेडणे.

**टणका(त्का)रणे** सक्रि. धनुष्याची दोरी वाजविणे : 'टण्कारोनि धनुष्यही लगबगां व्याधें मृगी घेरली।'–आमृच ९७. [ध्व. टणत्कार]

**टणकी** वि. सुदृढ; ठणठणीत : 'इंदू ही शिरूच्या भावंडांतील सर्वांत टणकी. दोन दोन बालद्या धुणी एकटी धूत असे.' – श्रीनापें १०८.

**टणक्कन** अ. (उडी) मारून.

**टणटण** पु. (चेंडूचा) आवाज. [क.; ध्व.]

**टणटण–णा** पहा : **टणकन–कर–दिनी–दिशी.** (वा.) ० **उडणे, बोलणे** – टोमणा मारणे; खोचदार उत्तर देणे; रागाने फाडफाड बोलणे इत्यादी.

**टण(णा)टण–णा** अ. भराभर (उड्या मारण्यासंबंधाने).

**टणटणणे** अक्रि. १. उडणे व उशी खाणे (चेंडूने); उड्या मारीत चालणे. २. (ल.) टोमणा मारणे; खोचदार प्रत्युत्तर देणे. ३. तणतणणे; अतिशय रागावणे; फार ताणणे.

**टणटणी** स्त्री. एक झुडूप : 'टणटणीच्या झुडपावर ते (बुलबुल) वारंवार आढळतात.' – पद १२.१३.

**टणटणीत** वि. १. तणतणीत; तुटेपर्यंत ताणलेला. २. शरीराने अत्यंत सुदृढ व टुणटुणीत : 'मी तर चांगला टणटणीत आहे.' – जहेवोजे १५५.

**टणत्कार** पु. बाण सोडताना होणारा धनुष्याच्या दोरीचा आवाज : 'भावांना त्याच्या धनुष्याचा टणत्कार ऐकू येत नाही.' – व्यासपर्व ७४.

**टणू–ण्णू** पु. न. आघाताने डोके किंवा कपाळ यास आलेले टेंगूळ : 'कपाळास लागून टणु आलें.' – रामक १५.११८.[सं. स्तन; ध्व.]

**टण्णा–न्ना** स्त्री. योनी; स्त्रीजननेंद्रिय. [सिं. टणो]

**टन** शअ. च; केवळ. (झाडी)

**टनचन** वि. व्यवस्थित; ठाकठीक; चांगली (परिस्थिती). (व.)

**टनटन** स्त्री. किरकिर ; कुरकुर. [क.]

**टनभार** पु. (स्था.) एक हजार किलोग्रॅम वस्तुमानाचे वजन.

**टनस** पु. ताठा; अहंकार. (व.)

**टनस** स्त्री. वाद; खोडी. [हिं.]

**टप** पु. १. चेंडूची उशी, उसळी. २. खेळण्याची मोठी गोटी. [ध्व.]

**टप** पु. १. तंबूचे आच्छादन. २. गाडीचे वरील आच्छादन, तट्‌ट्या. [सं. स्तुभ्; इं. टॉप]

**टप** पु. डूख (क्रि. धरणे): 'यासाठी बसला होता काय तू टप धरून?'– जैरजै ९७.

**टपक** वि. टपोरे.

**टपकणे** अक्रि. १. थेंब थेंब पडणे; गळणे; झरणे : 'थेंबांनी पिंडीवर टपकत होते.' – पुत्र २२. २. येणे; अचानक उपस्थित होणे; अकस्मात येणे. ३. मरणे. [ध्व.]

**टपकन–कर–दिनी–दिशी** क्रिवि. १. टप असा आवाज करून. २. निमिषात; क्षणात; फटकन; चटकन; जलद; झटक्यात. ३. हळूच टोचून (बोलणे.). [ध्व.]

**टपकळ** वि. १. भरीव; मोठे व चांगले; भक्कम; ठळक; ठोकळ. २. स्वच्छ; स्पष्ट; पूर्ण; पुरेपूर; उठावदार (खूण, अक्षर).

**टपका** पु. १. टपकत पडणारा पाण्याचा थेंब. २. (ल.) एकसारखी गळती; झरणी (पाऊस, फळे, साथीत मरणारी माणसे किंवा जनावरे यांची). (क्रि. लावणे). [सं. तिप्; ध्व.]

**टपका** पहा : **ठपका**

**टपका** पु. कुसवाचे घर.

**टपका** पु. विड्याचे पिकलेले पान.

**टपकाळ** क्रिवि. बेताने; अल्हाद. (व.)

**टपखाणे** घाबरून पडणे. (तंजा.)

**टपटप–पा** क्रिवि. १. थेंब थेंब पाणी पडण्याच्या आवाजाप्रमाणे; धावताना घोड्याच्या टापांचा होणाऱ्या आवाजाप्रमाणे. २. जलद; क्षणात; झटक्यात.

**टपण** पु. जपणे. (तंजा.)

**टपणी** स्त्री. दक्षतेने (दबा धरून) वाट पाहात बसणे; टेहळणी; पहारा.

**टपणे** अक्रि. लक्ष लावून स्वस्थपणे वाट पाहत बसणे; दबा धरून बसणे (ध्यानस्थ–शांत बसणे ह्यावरून); टेहळणी करणे; जपत राहणे; संधी साधण्यासाठी जपून बसणे. [सं. तप्]

**टपनारी** क्रिवि. पटकन. (झाडी)

**टपर** न. फडके.

**टपर टपर** बडबड; विनाकारण बोलणे. (क्रि. करणे). [क.]

**टपरं** न.पु. टरफल; बेकार वस्तू. (व.) [क. टप्पा]

**टपराण** न. टेपर; ठपका; बोल; दोषारोप. (कु.)

**टपरी** स्त्री. तात्पुरता उभारलेला छोटासा निवारा; छोटेसे दुकान : 'म्हातारा मारवाडी घराशेजारच्या टपरीत झोपला होता.' – कृकादे ५४.

**टपऱ्या** वि. १. हलकट; कमी दर्जाचा. (व.) २. दरिद्री (डोक्यास टपर–फडके बांधणारा यावरून).

**टप(पा)लणे, टंबलणे** सक्रि. कामभोगासाठी आवळणे; आवळून धरणे. [सं. तल्प]

**टपला–ली** पु. स्त्री. चापट; चापटी; थप्पड. [ध्व.]

**टपली** स्त्री. १. लाकडाची उडालेली ढलपी; धपली; सुकलेल्या कातड्याची खपली. (क्रि. निघणे, जाणे, उडणे.). २. (ल.) तिरस्कृत स्थिती; अप्रतिष्ठा; सर्व प्रकारे मानखंडना (क्रि. उडणे); नष्ट स्थिती. ३. थकावट; शिणवटा (काम, कष्ट, खर्च यांमुळे आलेला).

**टपलेबाजी** स्त्री. थप्पडबाजी; खरपूस मार. (क्रि. करणे, काढणे.).

**टपाटप** स्त्री. पहा : **टपटप–पा.** एकामागे एक; लवकर लवकर. (तंजा.)

**टपार** स्त्री. (नाविक) गलबतास पावसाची किंवा समुद्राच्या पाण्याची झड लागू नये म्हणून दोन्ही बाजूंना बांधावयाची लाकडी साटी. (हेट.)

**टपाल** न. मुलांचा एक खेळ. [क.]

**टपा(प्पा)ल** न. १. डाकघर. २. डाक; पत्रे; पोस्ट. ३. पत्रे इत्यादी नेणे-आणणे.

**टपालदाखली पत्र** पोस्टात टाकल्याचा दाखला घेऊन पाठवलेले पत्र; परतपावतीचे पत्र.

**टपालपेटी** स्त्री. पत्रे टाकण्यासाठी पोस्ट खात्याने ठेवलेली पेटी; डाकपेटी.

**टपालहशील** न. टपालाने पाठविण्यास तिकिटे इ. रूपाने लागणारा खर्च.

**टपाला** न. घोड्याचा एक रंग.

**टपुरा** पु. दणका; टोला. (व.)

**टपूर** पु. धष्टपुष्ट मेंढा.

**टपूर** वि. मोठा.

**टपू(पो)र-रा** पु. काठीचा तडाखा. (क्रि. मारणे). पहा : **टकोरा**

**टपूर-रा** पहा : **टपोर**

**टपो(प्पो)र-रा** वि. मोठा; मोठ्या आकाराचा; इतरांपेक्षा मोठा; पुष्कळांमध्ये मोठा; उठावदार; फुगीर; ठसठशीत.

**टपोऱ्यानं** अ. ताबडतोब. (व.)

**टप्पकन-र, टप्पदिशी** पहा : **टपकन** इत्यादी.

**टप्पर** न. पु. १. झाकण; पत्रा. (व.) २. छप्पर.

**टप्पल** न. १. व्रणावरील खपली; चामडे. (क्रि. उडणे, निघणे.). २.(ल.) सर्वस्व. (वा.) **(खर्चाने) ० उडणे** - खर्चाने त्रासून जाणे.

**टप्पल** स्त्री. पहा : **टपला.** (वा.) **० खाणे**- थप्पड खाणे; अवमानित होणे : 'टप्पल खावी तसं तिला वाटलं.' - रथचक्र ११९. **० देणे** - टोमणा मारणे : 'उगाचच जाता जाता दुसऱ्याला टप्पल द्यायची म्हणजे काय?'-लव्हाळी २७२.

**टप्पा** पु. १. पत्रे आणविण्यासाठी टप्प्याटप्प्यावर लोक ठेवून बसविलेली डाक : 'पुण्याकडील टप्पा आला आहे; टप्प्याचीं पत्रें वाचून दाखविली.'- ऐको ४७०. २. पल्ला; आवाका. [क.]

**टप्पा** पु. १. (गायन) एक चीज. मिय्या शौरी याने ही चीज तयार केली. हिचा विषय शृंगार. काफी, खमाज, भैरवी इत्यादी रागांत बहुधा ही वापरतात. २. एक ताल; यात १६ मात्रा व ४ विभाग असतात. [क.]

**टप्पा** पु. १. चेंडू, बाण, बंदुकीची गोळी यांच्या माऱ्याचे अंतर; फेक; मर्यादा : 'भांडी, जंबुरे आदिकरून यंत्रे... तटोतट टप्पे मुजरे साधून ठेवावी.'- मराआ १११. २. दोन थांब्यांमधील ठरावीक अंतर; दोन रेघांतील-गावांतील अंतर. ३. विसाव्याची किंवा थांबण्याची जागा; विशेषतः डाक पोचविणारे धावते नोकर किंवा हमाल अथवा घोडे यांची अदलाबदल होते ती जागा; ठेवलेली डाक; टेकडीवरील, घाटामधील विश्रांतीचे ठिकाण किंवा चढ; जिन्यावरील मधली थांबण्याची आडवी जागा. ४. चेंडूची उशी, उसळी. ५. (ल.) प्रवाह; ओघ; आटोका; कल; कक्षा (भाषण, मन, धारणाशक्ती यांचा); प्रगतीची अवस्था. ६. मजल; ठेपा; विराम; विरामाचे स्थान. [क. टप्पा, टप्प; फा. तप्पा](वा.) **० खाऊन येणे** - ताबडतोब परत येणे (दूत, निरोप्या). २. रमतगमत, मध्ये विसावा खाऊन येणे. **० खाणे**- थांबणे; विसावा घेणे (बोलताना, वाचताना). **टप्प्यात येणे**- आटोक्यात, आकलनशक्तीत येणे; अवसानात येणे. **टप्पे लावणे**- मुक्काम दरमुक्काम करणे.

**टप्पा** पु. शिवण्याची एक तऱ्हा.

**टप्पा** पु. देशविभाग; घेरा (मोठे शहर व त्याखालील भोवतालची खेडी मिळून). पहा : **देश**

**टप्पा** पु. जेथे भिंत छपरास मिळते त्या ठिकाणी आतील बाजूस राहिलेली जागा. पहा : **जई**

**टप्पा-पा** पु. नेम; गोळीचा धक्का.

**टप्पागायक** वि. संगीतातील टप्पा हा प्रकार गाणारा; तानबाजी फार करणारे गायक : 'त्या वेळी मिरजेस महेश्वरबुवा नावाचे एक टप्पागायक राहात असत.' - गाविदि.

**टप्पागुजरा** पु. तोफांचा धमधमा; उंचवटा : 'तटोतट टप्पेगुजरे बांधून...' - मराआ ३३.

**टप्पार** न. डोंगरमाथा; छप्पर : '...डोंगराच्या मानानं हे वरचं टप्पार किती दांडगं दिसत हुतं !' - रैत १६३.

**टप्पू** पहा : **टप्पल** : 'आणखी कुणी... डोक्यावर एक सॉलिड टप्पू ठेवून दिला.'- कोउ १४०.

**टप्पेदार** वि. टप्प्याटप्प्याने चढत जाणारे : 'आवाज बुलंद आणि हसणे टप्पेदार.' - दिअहो १२.

**टप्पेबाजी** स्त्री. गप्पाटप्पा : 'कांहीही टप्पेबाजी न करता आम्ही टाईम पास करीत होतो.' - वासुनाका ६२.

**टब** न. १. लांबट जस्ती भांडे. २. पिंप. ३. स्नानासाठी वापरण्यात येणारे लांबट आडवे पात्र. [इं.]

**टब** वि. तुडुंब.

**टबकणे, टबका** पहा : **टपकणे, टपका**

**टबका** पु. १. पहा : **टमका.** २. मार; अविरत मार : 'आंत रेकला लिंबाएवढ्या गोळ्याचा आहे. ते दोन्ही रात्रंदिवस टबका लाविला आहे. मारणार चांगला आहे.' - ऐको ४७०.

**टबकेपण** न. टवटवी; तेज.

**टबला** पु. तबला; ताल धरण्याचे एक जोडसाधन.

**टबुका, टबूक** वि. (ग्राम्य) मोठ्या आकाराचा; अजस्र; धेंड; धूड.

**टबोणा** वि. मोठा; मोठ्या आकाराचा. पहा : **टपोरा**

**टब्बू** पु. गोट्यांचा खेळ.

**टम** वि. काठोकाठ; भरगच्च (क्रि. होणे, भरणे इ.) : 'त्यांची पोटं टम झाली. त्यांनी ढेकर दिले.' - हातभट्टी १३६.

**टमक** पु. टिमकी.

**टमकणे** अक्रि. ठुमकणे.

**टमकन** अ. चटकन; पटकन. (व.)

**टमका** पु. चापटी; थप्पड.

**टमकी, टमटम** पहा : **टिमकी, टिमटिम**

**टमकी** स्त्री. डांगोरा; धांडोरा; एक प्रकारचे लहान वाद्य. (तंजा.)

**टमटम** स्त्री.१. एक प्रकारची घोडागाडी.२. सहा आसनी रिक्षा.

**टमटम** क्रिवि. चटकन.

**टमटम** स्त्री. १. आवाज; गलबला २. वाद्यांचा ध्वनी. ३. बोभाटा.

**टमटमनगरी** स्त्री. १. प्रसिद्धी; डांगोरा; गाजावाजा. २. गोंधळ; अव्यवस्था. ३. जेथे पुष्कळ गप्पीदास व चहाडखोर लोक राहतात ते गाव; गप्पांचे आगर.

**टमटमराज्य** न. १. बेशिस्त, अव्यवस्थित कुटुंब, जमात, समाज. २. गोंधळ; अव्यवस्था.

**टमटमीत** पहा : **टुमटुमीत**

**टमरट** न.पु. टोकरी; डबा. (व.)

**टमरेल** न. पाणी पिण्याचे कान असलेले पात्र.

**टम्ना** क्रिवि. चटकन. (झाडी)

**टम्म** वि. भरलेली; गच्च : 'बाळाची डुरी दुधाने टम्म झाली होती.' – आआशे १३०.

**टर** स्त्री. फजिती; मानहानी; निर्भर्त्सना; उपहास; चेष्टा; टवाळी; हेटाळणी. (क्रि. उडविणे, करणे, उडणे, होणे.). [सं. तृह]

**टर** स्त्री.१.घरघर, करकर आवाज (भोवरा, खेळणे इ.चा).२.आग्रह; हट्ट.

**टरक टरक** क्रिवि. जोराने; कुरकुरत. (क्रि. करणे,बोलणे).

**टरकणे** उक्रि. १. चरकणे; भिणे; घाबरणे. २. गुंगारा देणे; त्याच पावली परतणे. [सं. तर्ज्;ध्व.]

**टरकणे** उक्रि. टर्र असा आवाज होईल अशाप्रकारे वस्त्र, कागद इ. फाटणे. [ध्व. टर]

**टरकणे** अक्रि. शौचास पातळ होणे.

**टरकन–कर–दिनी–दिशी** क्रिवि. टर्र असा फाटण्याच्या आवाजासारखा आवाज होऊन. (क्रि. फाटणे, फाडणे.). [ध्व.]

**टरकमोहबत–मोबत** स्त्री. वरवर केलेली समजूत, संपादणी; हांजी हांजी; तोंडपूजा; लाघवी भाषण; खोटी किंवा पोकळ प्रीती.

**टरकहाणी** स्त्री. कंटाळवाणी व त्रासदायक गोष्ट, भाषण; भाकडकथा; कटकट; टुरटुर; पिरपिर; भुणभुण.

**टरका** वि. १. घाबरट : '....डोळे जरासे टरकेच झाले होते....'– कोउ ११९. २. तिरळा.

**टरका** पु. पादण्याचा ढं असा आवाज; पाद. (राजा.) [ध्व.]

**टरकाकडी** स्त्री. उन्हाळ्यात नदीच्या काठी होणारी मोठी व लांब काकडी. पहा : **तरकाकडी**

**टरकावणे** सक्रि. कापड फाडणे. [क. चिरक्कसु, चिरकु]

**टरकाव(वि)णे** उक्रि. १. पहा : **२ टरकणे**. २.(ल.) कानउघाडणी करणे; खडसून किंवा रागाने बोलणे. [ध्व.]

**टरघाणी** स्त्री. मुलांचा एक खेळ. एका खांबावर अडकवलेल्या आडव्या लाकडाच्या दोन टोकांना दोऱ्या बांधतात. त्यांना धरून दोन मुले लोंबकळतात आणि ते गरगर फिरवितात. तेव्हा टर्रटर्र असा आवाज होतो. [ध्व.]

**टरटर–रा, टरटरून** पहा : **टरकन**

**टरटरणे** अक्रि. वर येणे; फुगणे. [सं. त्रग्]

**टरटरणे, टरारणे** पहा : **तरतरणे, तरारणे**

**टरटरीत** क्रिवि. 'टर्र' असा आवाज करणारा.

**टरटिंगल** स्त्री. टवाळी; चेष्टा : 'बघ्यांच्या टरटिंगलीत...'–माजीगा १२८.

**टरपेन्टतेल, टरपेन्टाईल–न** न. रंग सुकण्यासाठी त्यात वापरावयाचे देवदाराच्या झाडाचे तेल; टारपीण तेल.

**टरपेल** न. टरपेन्टाइन तेल : 'टरपेल लावून जरा पाठ चोळू कां?' – जाण १५.

**टरफल, टर्फल, टलफर** न. १. कवच; फोल; बाहेरची त्वचा; आवरण; साल (पोफळ, बदाम, भुईमूग इ.ची); वाटाण्याची शेंग; चिंचेचे बोटूक; मोठा कोंडा. २. फोतरे. (अहि.) [सं. तृह+फल; ध्व.]

**ट(टु)रफूस, टरभोवरा** स्त्री. पु. कानाशी होणारी कटकट; किरकिर; त्रास; ओरड. (क्रि. लावणे, मांडणे, करणे.). [ध्व.]

**टरबाजी** स्त्री. थापेबाजी; टर्रेबाजी; मुजोरी; दांडगाई : 'असें टरबाजीचे उत्तरही देण्यांत आलें.' – के १२.४.१९३८.

**टरबूज** पु. न. कलिंगड. [फा. तर्बुझ]

**टरल** वि. फुगीर : 'फुटाणेकार.... चणेयासि वोल दे : भीजति : कंचुकवत टरल होए :' – चदूफा ३४.

**टरल** न. टरफल.

**टरळी** स्त्री. नाला; पाट; खंदक; मोरी; गटार; चर; खळी; पाळी.

**टरां(रं)वटरां(रं)व** क्रिवि. बेडकांच्या ओरडण्याच्या आवाजाचे अनुकरण करून. [ध्व.]

**टराकणे** अक्रि. घाबरणे : 'माणूस सापाला टराकत.'–फकिरा १७८.

**टराटर–रा, टरारा–रून** पहा : **टरटर, टरटरा**

**टरारणे** अक्रि. तुकडे होणे. [सं. तृह]

**टरारणे** अक्रि. १. अतिशय फुगणे. २. गर्वाने उन्मत्त होणे. ३. नशा करून झिंगणे. ४. भिणे; घाबरणे. ५. उत्तेजित होणे. पहा : **तरारणे**. ६. अपानवायूचा आवाज होणे.

**टरू** न. घट्टा; किणा; बधिर जागा. (राजा.)

**टरोटरो करणे** क्रि. उगाचच मोठेपणा मिरवणे : 'अहंकाराने टरोटरो करणारे...' – भासं १५.

**टर्किश टॉवेल** गुबगुबीत, सुते वर ठेवलेला टॉवेल. [इं.]

**टर्की** पु. एक खाद्यपक्षी.

**टर्को** वि. वाचाळ.

**टर्न** पु. १. (छापखाना) कंपोज करताना केसीच्या घरातील एखादे अक्षर संपल्यावर, त्याच्या जागी उलटे लावले जाणारे दुसरे अक्षर. २. पाळी; खेप. ३. वळण. [इं.]

**टर्निप** पु. एक कंदमूळ : 'उत्तर भारतात मुख्यतः मुळासाठी टर्निपचे पीक घेतले जाते.' – भाजीपाला ८२.

**टर्म** स्त्री.१. पाळी; सत्र. २. ठरावीक मुदत. ३. शालेय वर्षाचा विशिष्ट कालावधी. [इं.]

**टर्रेबाजी** स्त्री. मुजोरी; बढाया मारणे; दांडगाई. (ना.) [हिं.]

**टलबटा** पु. (उचले) पागोटे.

**टलणे** क्रि. हालणे; टाळणे : 'आणि गुणाचां यावाजावा। टले चले ना पांडवा।' – ज्ञा १४.३३७.

**टल्ला** पु. चक्कर; फेरी; फेरा : 'मी नाही जातगित इतक्या लांबवर टल्ले मारायला...' - बाविबु ३१३. [हिं.] (वा.) **टल्ले खाणे** - कष्ट भोगणे; टक्केटोणपे खाणे : 'एकंदरीत आमच्या नशिबांत जन्मभर टल्ले खायचे आहेत एवढंच खरं.' - संस ७५.

**टल्लू** वि. १. लहान व जड. २. ठेंगणाठुसका. ३. लट्ठ.

**टल्लेनविशी** स्त्री. रिकामटेकडेपणा. (ना.) [हिं.]

**टव** पु. (कासारी धंदा) पत्रा कापताना मध्यबिंदू काढण्याचे एक खिळ्यासारखे हत्यार.

**टवकणे** सक्रि. बारीक करणे. [सं. त्वक्ष, त्वच्]

**टवका** पु. १. कुसवाचे घर; भोक; खोबण. (कु.) २. पृष्ठभागाचा किंवा त्वचेचा लहानसा तुकडा (शस्त्राघाताने निघालेला); कपचा.

**टवका** पु. १. पूर्वसूचना. २. आवाज.

**टवकारणे** अक्रि. आश्चर्य, राग इ.मुळे मनुष्याने डोळे व पशूने कान ताठ करून एखाद्याकडे पाहणे; कान उभारून, डोळे वटारून बघणे; सावध होऊन पाहणे : 'ऐकतां मुरलीचा स्वर। गाई टंवकारल्या समग्र।' - हरिवि १३.४१.

**टवकारणे** अक्रि. विकासणे; फुलणे.

**टवकारी** वि. टोकदार : 'आधीच शिंगं हाईत टवकारी.' - खळाळ १०१.

**टवकी** स्त्री. इकडेतिकडे फिरणे.

**टवकेपण** न. टवटवी; तेज.

**टवचणे** अक्रि. टोचणे; भोक पाडणे (जमीन, भोपळा वगैरेस).

**टवचणे** सक्रि. कातडे धरणे; खपली धरणे. [सं. त्वच्]

**टवचळणे, टवचा-ची 'टो'पासून सुरू होणाऱ्या शब्दामध्ये पहा.**

**टवटव** स्त्री. बेडकाचा आवाज : 'पाण्याची खळबळ आणि बेडकांची टवटव कानांवर आली.' - हपा ३७.

**टवटव** स्त्री. टवटवी; गोंडसपणा : 'घरी टवटव अतिबरवी।' - एभा ३.३९०.

**टवटवणे** अक्रि. फुलणे; बहर येणे; ताजे दिसणे; खुलणे; प्रफुल्लित होणे; ताजेतवाने होणे (फुले, चेहरा). [सं. तु]

**टवटवा** वि. प्रफुल्लित; ताजा : 'मरणी असे टवटवा।'-ज्ञा ८.२१०.

**टवटवी** स्त्री. प्रफुल्लता; तेज; ताजेपणा; चेहऱ्याची हुशारी; तजेला; बहर.

**टवटवीत** वि. सतेज; प्रफुल्लित; ताजा; ऐन उमेदीत आलेला; पाणीदार चेहऱ्याचा तेजस्वी; आनंदी. २. निरोगी.

**टवणा-णी-णे** स्त्री. १. वजनी मापाबरोबरचे कैली माप. २. वजनी पाच शेर मापाचा उभा तांब्या. (को.)

**टवणा-णी-णे** क्रिवि. काठोकाठ; भरपूर. (क्रि. भरणे, येणे.).

**टवणे** अक्रि. उतरणे; नरम होणे. (व.)

**टवर** स्त्री. तुकडा; तोडलेला भाग.

**टवरकी, टवरचाळ -ळा** स्त्री. पु. उडाणटप्पूपणा; बदफैलीपणा; भटकेपणा; टवाळकी.

**टवरा** पु. मोठी पणती. (झाडी)

**टवरी** वि. भटक्या; उनाड; विषयी; बदफैली; उडाणटप्पू.

**टवरी** स्त्री. लहान पणती. (झाडी)

**टवऱ्या, टवऱ्या माहाडोर** पु. बांबूबनात राहणारा विषारी साप. (झाडी)

**टवसण** वि. टणक; कडक. (व.)

**टवळ-ळा-ळे** न. समई किंवा पळीचे तोंड, चाडे. यात तेल व वात असते : 'खेद संतापें उपजळला। हृदयटवळा दीपकु।।' - मुआदि ३४४.

**टवळी** स्त्री. १. नारळाच्या करवंटीचा तुकडा. २. लामण दिव्यामध्ये ज्या खोलगट तबकडीत तेलवात घालतात ती पितळी पणती. ३. डोक्याचा पुढचा भाग; कपाळ. ४. पळी; चाटू. [सं. ट्वल; क.]

**टवळी** स्त्री. एक प्रकारची शिवी. वाईट चालीच्या स्त्रीला उद्देशून हा शब्द वापरतात. [क.]

**टवळी** स्त्री. जोंधळा किंवा ऊस यांतील एक प्रकारचे बांडगूळ. [क.]

**टवळी अमावस्या, अवस** १. आषाढी अमावास्या. या दिवशी टवळ्यांची म्हणजे दिव्यांची पूजा करतात. २. (ल.) अभद्र किंवा अपशकुनी स्त्री.

**टवळे** न. तुतारीचा टोकाचा भाग; चुनाळ्याचा, तपकिरीच्या डबीचा, डब्याचा अर्धा भाग; चुन्याची डबी; दुहेरी शिंपीचे अर्ध; वाटीच्या आकाराचे भांड्याचे अर्ध; गोफणीत दगड ठेवावयाची जागा.

**टवंक** वि. तुडुंब; भरपूर. (गो.)

**टवंच** न.दुःख; त्रास; टोचणी : 'कोणीहि टवंच न देखे।'-ज्ञा १२.१८२.

**टवा** पु. डौल; ढब.

**टवाल-ळ** पु. १. आळ. २. सोंग; ढोंग : 'सर्पबुद्धि तंव टवाला। उखी होउनि।।' - राज्ञा १३.११३२.

**टवाळ-ळी, टवाळकी, टवाळगिरी** स्त्री. १. थट्टा; निंदा; उपहास; कुचेष्टा; नक्कल. २. निरुद्योगी; स्वैर; त्रासदायक; खोडकर किंवा बेफिकिरीचे वर्तन किंवा वागणूक (मुलांची). ३. चटोरपणा; उनाडपणा. ४. अर्थशून्य बडबड; वटवट. [क. ठवुळि]

**टवाळ-ळ्या, टवाळ(ळी)खोर** वि. १. नेहमी निंदा करणारा; दोष काढणारा; निर्भर्त्सना, उपहास, कुचेष्टा करणारा; चटोर; टिंगलखोर; वाह्यात; वात्रट. २. उनाड; खोडकर; व्रात्य; चाळे किंवा खोड्या करणारा; दुर्गुणांनी परिपूर्ण (मूल). ३. चहाडखोर. ४. लटके; मिथ्या; निरर्थक : 'तरी सांडी म्हणे आघवें। टवाळ हें।।' - ज्ञा १३.८१०. [क. टमाळ= कपटी; सं. ट्वल]

**टवाळे** न.अव. खोटेपणा; अवगुण; खोड्या; दोष; टवाळपणा : 'ययांचीं टवाळें जाणें।'- शिव ८६५.

**टसर** न. एक प्रकारचे कच्च्या रेशमाचे जाड कापड. [इं.; सं. त्रसर]

**टहरणे** अक्रि. ठरणे; स्थिर राहणे; ठाम उभे राहणे.

**टहलणे, टहलता पहारा, टहळणी-णे, टळ्या** पहा : **टेहलणे, टेहळणी** इत्यादी.

**टहाटळ** पु. टाकळा, तरवटा या नावाची वनस्पती.

**टहाणटुहाण** न. मंत्रतंत्र; नवससायास; जादूटोणा : 'पोराकरता तुझ्यावानी टहाणटुहाण नाय करीत आम्ही !' - आआशे ८.

**टहाळ** पु. १. डहाळी; फांदी (झाडाची). २. लाख, वाटाणा, विशेषतः हरभरा या द्विदल धान्याचे रोपटे, झाड.

**टहाळा-ळी-ळे** पु.स्त्री.न. १. पाने असलेली लहान फांदी, डहाळी (झाडा-झुडपाची तोडलेली). २. पहा : **टहाळ** २

**टह्र** पु. मोठे बोर. (व.) पहा : **टंबू**

**टळकण–कर–दिनी–दिशी** क्रिवि. लख्खकन; झळकन; चटदिशी (दिसणे, रक्त निघणे, उसळणे, उडणे, डोळ्यांत पाणी येणे.).[ध्व.]

**टळका** पु. बांबूची लहान चटई; हाथरी; डाळी. पहा : **तळका**

**टळटळ, टळटळीत** क्रिवि.१.निखालस; चकचकीत; भर; ढळढळीत; उघड उघड. हे जोरदार शब्द दोन प्रहर या अर्थाच्या शब्दाबरोबर योजतात. जसे :–'टळटळित दुपारां जन्मला रामराणा.'. २. क्वचितच 'मध्यरात्र' या शब्दाबरोबरही योजतात.

**टळटळणे** अक्रि. बरोबर मध्यान्ह होणे.

**टळटळणे** अक्रि. रकरकणे; तळतळणे; तडतडणे.

**टळटळीत** वि. १. ऐन (मध्यान्ह, तिन्हीसांजा). २. स्वच्छ; निखालस; लख्ख; स्पष्ट; चकचकीत; मोठे आणि चकचकीत दिसणारे (अक्षर, खुणा, गळू, अश्रू, दव इ.). [सं. तल्]

**टळणे** सक्रि. ठाकणे; सहन करणे. [सं. तल्]

**टळणे** अक्रि.१.जाणे; निघून जाणे; नाहीसे होणे; चुकणे; कलणे. (काळ, ऋतू, संकट, दुःख) : 'हे किती? न त्यास त्याचें काळासीं भिडवितां सुतप टळतें।'– मोभीष्म ८.५५.२. पराङमुख होणे; न येणे; पाळण्यास चुकणे; न जागणे (वचन, शब्द इ.); अंतर पडणे. ३. कलंडणे; कलणे (जहाज, नाव). ४. पळणे; ढळणे : 'टळती गजहि न अन्य प्रेक्षक जे तेचि तेधवां पळती।' – मोकर्ण ८.२२. [सं. तल्]

**टळमळणे** अक्रि. तळमळणे.

**टळोऽ करून** क्रिवि. रिकामटेकडेपणाने; कामधंदा न करता :'तुम्ही एक टळोऽ करून गाडीबरोबर फिरत न्हावा.' – चिताक १०.

**टळोटळो** न. दुपारचे कडकडीत उन्ह किंवा प्रकाश.
क्रिवि. ढणढणीत; टळटळीत; चकचकीत किरणांनी युक्त; सतत तेवत किंवा तळपत असणारा (सूर्यप्रकाश, प्रदीप्त आग).

**टक्षी** स्त्री. शेंडा : 'झाडाच्या टक्षीवरील फिकट होऊन गेलेल्या पानांच्या...' – सनई १७८.

**टंक** पु.१. अक्षराचा किंवा लेखनचिन्हाचा ठसा : 'सातआठ टंक टंकपेटिकेंत कमी लागतील.' – मसासंअभा ४१०. २. टाईप; छापखान्याचा खिळा; ठसा. ३. नाणे. [सं. तव्ञ्]

**टंक** पु. पाथरवटाची छिन्नी; टाकी : 'खाली क्षितिला दंडें जेविं शिळेलागि खाणिता टंकें।'– मोआदि २.१०४. [सं. तञ्च्]

**टंक** पु. चार माशांचे वजन; पक्क्या शेराचा ७२ वा भाग. पहा : **टाक**

**टंक** पु. लबाड मनुष्य.

**टंक** पु. रणगाडा.

**टंक** पु. डोंगराचे शिखर.

**टंक** क्रिवि. (जोरदार, अर्थद्योतक अव्यय. याचा उपयोग वजन–मापासंबंधीच्या क्रियापदाशी व नामाशी होतो) तंतोतंत; भारंभार; अगदी वजनाबरहुकूम. (क्रि. उतरणे, होणे.).
वि. परस्परतुल्य; बरोबर.

**टंकण** न. सवागी. पहा : **टाकणखार**

**टंकणाम्ल** न. बोरिक ॲसिड.

**टंकन** न. नाणेपाडणी; नाणे तयार करण्याची क्रिया.

**टंकयंत्र, टंकलेखनयंत्र** न. अक्षरांच्या कळा बोटांनी दाबून छापल्यासारखा मजकूर लिहिण्याचे यंत्र; टाईपरायटर.

**टंकलेखन** क्रि. टंकलेखनयंत्रावर मुद्रित करणे.

**टंकशाला–साळ, टकसाळ** स्त्री. नाणी पाडण्याचा कारखाना; टांकसाळ. [सं. टंकशाला]

**टंकसाळचा फुटका, फुटलेला** १. टांकसाळीत मोडलेला. २. (ल.) लहानपणापासून दुर्वृत्त, बिघडलेला; आईबापांच्या घरीच कुचकामी झालेला; नीट शिक्षण न मिळालेला; असंस्कारित.

**टंकसाळ्या** वि. १. नाणी पाडण्यासाठी ठेवलेला (सोनार).२.(सामा.) टांकसाळेतील एखादा नोकर.

**टंका** पु. एक ऐतिहासिक नाणे : 'बुऱ्हाणुद्दीनकडे तीन हजार टंके नजर म्हणून दिले.' – सूसं ६७.

**टंकाम्ल** न. (शाप.) टाकणखाराचा तेजाब, फूल.

**टंकार, टणत्कार** पु. धनुष्याच्या दोरीचा टणत्कार : 'शिरले यवनाच्या श्रवणीं त्या टंकार।'ह्न विक २६. [ध्व. सं. टणत्]

**टंकारणे** अक्रि. टणत्कार करणे, होणे.

**टंकी–का, टंकीरा** स्त्री. (संगीत) एक राग. गानसमय सायंकाळ.

**टंकेकारी** पु. द्वारपाळ.

**टंकोटंक** क्रिवि. बरोबर; तंतोतंत. पहा : **टंक** [टंक द्वि.]

**टंगचाई** स्त्री. तंगी; टंचाई : 'आम्ही कर्जदार, नित्य खर्चाची टंगचाई. रुपये कोठून देणार ?' – ऐको ४७५.

**टंगडमंगड** वि. वेडेवाकडे; कामचलाऊ.

**टंगशी** स्त्री. डहाळी : 'वरच्या टंगशीवर दोनतीन पिकलेले पेरू मी हेरून ठेवले होते.' – गआचा ९४. (गो.) [क. टोंगी = शाखा]

**टंगस्टन** न. (रसा.) पांढऱ्या रंगाचे धातुरूप मूलद्रव्य (वितळणबिंदू ३३८०°). याच्यापासून बल्बमधील तारा बनवितात. [इं.]

**टंगस्टन दीप** (विअ.) टंगस्टन धातूची तार (फिलॅमेंट) असणारा विजेचा दिवा.

**टंगळ** स्त्री. त्रेधा; त्रास : 'पण पुढे संसारयात्रेत उडणारी टंगळ कोठे दिसते? – पलकोघे ५४

**टंगळमंगळ** स्त्री. न. १. निष्काळजीपणाने, वरवर काम करणे. २. हयगय; टाळाटाळ; कांकू; दिरंगाई; मुद्दाम केलेला चेंगटपणा; अनास्थेची चुकवाचुकवी; बेपर्वाई; आळस; चुकारपणा; चालढकल. [सं. तग्]
क्रिवि.१.हयगयीने; रमतगमत; निष्काळजीपणाने; अनास्थेने; आळसाने (काम करणे). २. लहरीने; मधूनमधून; इकडेतिकडे करीत; थांबून थांबून; राहून राहून; हात राखून (वेळेवर, योग्य जागी करावयाचे काम). ३. रडतखडत; अळंटळं करीत; कचरत; बिचकत.

**टंगाळ्या** वि. उंच; लांबटांग्या : 'मामांचा टंगाळ्या भागेली कृष्णा सावंत.' – सीपो ७२.

**टंगुली** स्त्री. लहान कुऱ्हाड.

**टंग्या** मु. कुऱ्हाड. (झाडी)

**टंच** वि.१. गच्च; भरलेली; भरीव : 'बायकामंडळी मुलायम, सफाईदार

नि टंच...' - डाली २४. २. श्रीमंत; दणगट.

**टंचाई, टणचाई** स्त्री. महागाई; दुर्मिळता; तुटवडा. पहा : **तंगचाई**

**टंटणी** स्त्री. घाणेरी; एक वनस्पती; फुलझाड.

**टंब-बू** वि. १. गरगरीत; खूप गोल : 'लहान लहान भाकरी तव्यावर पचवून चुलीत सरकवताच टंब फुगून येत.' - चंदभू ४३. २. फुगलेली; भरलेली : 'गाल फुगवून टंबू दिसणारी...कणसं.' - आआं १४२. ३. मोठे. (व.)

**टंबरेल** न. उभट भांडे; पात्र : 'रुप्याचं टंबरेल नाहीं तर पातेली आणा वहिनीबाईपासून मागून.' - माबा ७६.

**टंबलणे, टम(मा)लणे** उक्रि. (ग्राम्य) संभोग करणे.

**टंबू** पु. १. मोठे व वाटोळे बोर. (व.) २. (ल.) मोठ्या शेंड्याचे नाक; बोंड.

**टंब्या** पु. बैदूल; मोठी गोटी. (कर.) [क.]

**टंवच** पु. टोचणी : 'तैसेनि टंवच दियें। येक दोनि चि वेल लाहे।' - ज्ञा १३.७६४.

**टाईट** वि. १. चोख : '...पोटापाण्याची व्यवस्था टाईट करून ठेवावी.' - वासुनाका १७३. २. आवळ; घट्ट; तंग. [इं.]

**टाईप** पु. १. शिसे इत्यादी धातूंच्या अक्षराचा ठसा, खिळा. २. नमुना. ३. टंकलेखन. ४. प्रकार; वर्ग. [इं.]

**टाईमकीपर** पु. मजुरांच्या येण्याजाण्याच्या वेळेवर देखरेख ठेवणारा. [इं.]

**टाईल** १. सिमेंट, संगमरवर यांची जमिनीत बसवावयाची शोभिवंत फरशी. २. कौल, नळा. [इं.]

**टाऊक-के** न. टावके; आकस्मिक लाभ किंवा फायदा; घबाड; प्राप्ती. [सं. टौक्]

**टा(टां)क** पु. १. शिक्का; धातूच्या पत्र्यावरील देवतेचा ठसा. २. (ल.) एखाद्या समारंभाला अवश्य बोलावणे केले पाहिजे असा प्रतिष्ठित माणूस: 'जेथें चंद्रसूर्याचा टांक न पडे।' - सिसं २.३३. [सं. टङ्क]

**टाक** पु. १. एक रुपया; कोणतेही चांदीचे नाणे : 'पडती बहुवस टांक।' - ज्ञा ७.२५. २. खर्च करण्याची शक्ती. (गो.)

**टाक** पु. १. निब लावलेली एक प्रकारची लेखणी; लिहिण्याचे साधन. २. (ल.) लेख. [सं. टङ्क; क. टाकु] (वा.) ० **गुंतणे** - हातचा लेख देऊन वचनास बांधून घेणे. ० **मारणे**- लिहिण्यास घेणे, बसणे. **टाकाने (लेखणीच्या टाकाने) गळा कापणे** - नुसत्या लिहिण्याने एखाद्याचा नाश करणे.

**टाक** पु. टाकी; छिन्नी.

**टा(टां)क** स्त्री. पायाची टाच : 'टांकेचेन उत्तरभागें '- राज्ञा ६.१९६.

**टाक** पु. दगडासारखी घट्ट जमीन. (गो.)

**टाक** पु. वाढ. (व.)

**टाक** पु. एका जातीचा आंबा.

**टाक** वि. कोरडी ठणठणीत (नदी, तळे इ.).
पु. तलाव. [सं. टङ्क]

**टाक** पु. १. एक तोळ्याचे (एकबहात्तरांश पक्का शेर) वजन; ९ माशांचे किंवा ४ माशांचे वजन : 'तुका म्हणे घालूं खंडीमध्यें टांक।'-तुगा ३८७०. २. (सामा.) अल्पप्रमाण (दारू इ.बाबतीत). [सं. टङ्क]

**टाक** पु. विशिष्ट जातीचा ओवा.

**टाक** स्त्री. बरोबरी; समान धर्म. (वा.) ० **टाकणे** - स्पर्धा किंवा बरोबरी करणे.

**टाकटाक बोलणे** क्रि. जेरीस येणे. (व.)

**टाकटाकी** क्रिवि. लगेच; तात्काळ : 'तरि टाकटाकीं आणिक एक। मांडी चि तो।।' - ज्ञा ६.४८.

**टाकण-न** पु. लहान जातीचा घोडा : 'रहवाल... टाकण, तुर्की अशी अनेक देशीची जातिवंत जनावरे पाहून...'-श्रीयो २.१७१.

**टाकण** पु. नक्षीकामाचे एक सुतारी हत्यार; टाकणी. (कु.)

**टाकणकार, टाकेकरी, टा(टं,ट)कारी** पु. जात्याला टाकी लावणारे.

**टाकणखार** पु. एक प्रकारचा खार, क्षार. याचे तेल्या, चौकीचा, खड्या असे प्रकार असून हा अपचन, अग्निमांद्य, त्वचेचे रोग यांवर गुणकारी आहे. मातीच्या भांड्यास जिल्हई देण्यासाठी हा उपयोगी आहे. उत्तर भारतात सापडणारे खनिज; (इं.) बोरॅक्स. [फा. तंगार]

**टाकणी** स्त्री. पखवाजाच्या शाईच्या पुडीबाहेरचा काठाजवळचा भाग; चाट.

**टाकणी** स्त्री. लहान रोयली; उलटे पाच पाय असलेला लहान नांगर. (हेट.)

**टाकणी** स्त्री. फेकून मारावयाचे सैतीसारखे हत्यार : 'बंदूक बाळगणारासह गडावरील हशमानी तरवार टाकणी हेही हत्यारे बाळगीत जावी.' - आज्ञा ३९.

**टाकणे** सक्रि. दोऱ्याने शिवणे; टाचणे. [सं. टक्, टंक]

**टाकणे** सक्रि. १. पेरणे; फेकणे; उधळणे; हरवणे; पाडणे; काढणे; काढून टाकणे; दूर करणे; टोलवणे. २. सोडून देणे; त्याग करणे; अंगाबाहेर लोटणे; स्वीकार न करणे; ठेवणे; घेऊन न जाणे; वर्ज्य करणे. ३. (बिछाईत इ.) पसरणे; घालणे. ४. हवाली करणे; सोपविणे; अवलंबून ठेवणे (उद्योग, ओझे, विश्वास); दुसऱ्यावर विसंबणे. [सं. तक्, त्यज्](वा.) **टाकून बोलणे** - तिरस्काराने, तोडून बोलणे; खरडपट्टी काढणे.

**टाकणे** सक्रि. मिळविणे; गाठणे; पकडणे; ठाकणे; जवळ जाऊन पोचणे; प्राप्त करणे; जवळ करणे : 'तरि हें जैसें नीगैल तैसें तुम्ही यातें टाकाल?' - लीचपू ४४४; 'भट गोसावी यातें टाकीत जाति : परि टाकतिना :' - लीचउ ८४. [सं. टक्]

**टाकणे** सक्रि. पैज मारणे; पणास लावणे.

**टाकणे** सक्रि. आकलन होणे; आवाक्यात येणे : 'तें माझिये अल्पमतिसि। केवी टाके।।' - क्रिपु २.२८.३७.

**टाकणे** सक्रि. टाकी लावणे; जात्याच्या टाकीचे ठोके पुन्हा उजरणे. [सं. टंक]

**टाकणे** सक्रि. १. मिळणे; प्राप्त होणे; पावणे. २. सुखावह होणे. ३. घडणे. टाकणे हे क्रियापद घालणे, ठेवणे या क्रियापदांप्रमाणे व्यापक अर्थाने तसेच निरनिराळ्या प्रकारांनी वापरण्यात येते. पहा : **ठेवणे**. या टाकणे क्रियापदापूर्वी, अनिश्चिततादर्शक प्रत्यय, ऊन प्रत्यय, भूतकालवाचक

धातुसाधित असल्यास त्याचा अर्थ चालू असलेल्या गोष्टीची पूर्णता दर्शवितो. उदा. मारून टाकणे = ठार मारणे, पाडून टाकणे, तसेच खाऊन, देऊन टाकणे-लिहून-पिऊन टाकणे इत्यादी. [सं. त्यज् = सोडणे]

**टाकणे** औपचारिक (मनापासून नव्हे अशी) गोष्ट करणे; फुकट नमस्कार करणे; वरवरचा देखावा करणे(बोलावणे, भेटणे इ.चा); मान किंवा मैत्री नसेल तेथे कोरडा आदर करणे.

**टाकतोर, टाक्तोर** अ. पर्यंत. (व.)

**टाकफेक** स्त्री. अव्यवस्थितपणा. (झाडी)

**टाकभर** वि. थेंबभर; थोडेसे : 'सारजा, जरा मुरवाणला टाकभर आण म्हणलंय गं सासूबाईनं...' - खळाळ ७५.

**टाकभाडे** न. नुसते पोचविण्याबद्दलचे, वाहतुकीचे भाडे.

**टाकभाड्याचे काम** मोलाचे, हमालीचे, मनापासून न केलेले काम.

**टाकमटिकम** क्रिवि. कसाबसा; जेमतेम.

**टाकमटिका, टाकमटिकला-ळा, टाकमटीक** पु. वेणीफेणी; नट्टापट्टा; टिळाटोपी; छानछोकी; डामडौल; सुरेखपणा; नखरा; डौल : 'व्यभिचारीचा टाकमटिका। उपहास होती लोकां।' - तुगा २७५९.

**टाकलणे** सक्रि. जात्याला वगैरे टाकी लावणे : 'बापा, तुले टाकलाये टकारीन आली दारी।' - बगा २०.

**टाकला** क्रिवि. निश्चित; कायम; हमखास. (वा.)० **डाव पडणे**-(फाशांतील दानावरून)मनात योजलेली गोष्ट हटकून घडून येणे. ० **येणे, टाकून येणे** – फेकल्यासारखा नेमका येणे; वरचेवर, नेहमी येणे.

**टाकला रोजगार-उदीम-व्यापार** एखाद्यावर सोपविलेला, लादलेला व्यापार इ.

**टाकलावणी** स्त्री. नोंद; लेख : 'या गोष्टीची लोकांनी कधींच टांकलावणी करून ठेवली आहे.' - विद्याभि १७०.

**टाकली किंमत** आपण सांगितलेली व ताबडतोब मिळालेली किंमत.

**टाकले** पु. अव. अचानक टपकल्यासारखे येणारे; फिरस्ते : 'वर्ष दोन वर्ष त्या गावी टाकले उतरतात.' - गांवगाडा १०.

**टाकले अन्न-जेवण** न चुकता मिळावयाचे जेवण.

**टाकलेला** क्रिवि. १. निश्चितपणे ठेवलेला; खात्रीचा, खरोखर, अवश्य, नेहमी, नियमित ठेवलेला असा. २. परित्यक्त.

**टाकलेली** वि. परित्यक्ता; नवऱ्याने सोडून दिलेली.

**टाकवणा** वि. फेकून देण्याच्या योग्यतेचा; गाळसाळ; रद्दड. (राजा.)

**टाकवलं** न. पु. तळपायाला झालेली जखम. (व.)

**टा(टां)कसाळ** स्त्री. नाणी पाडण्याचा कारखाना. [सं. टंकशाला]

**टाक(के)साळ** न. भाताची एक जात. (कु.)

**टा(टां)कसाळथर** पु. झिजलेले, ठोकलेले, कापलेले व म्हणून पुन्हा नवीन पाडण्यासाठी टांकसाळीत परत आलेले नाणे.

**टा(टां)कसाळी** स्त्री. टांकसाळीवर बसविलेला कर.

वि. टांकसाळीत तयार झालेले किंवा टांकसाळीसंबंधी (नाणे, मजूर).

**टा(टां)कसाळ्या** पु. टांकसाळीवरील अधिकारी.

**टाक(कु)ळणे** अक्रि. ताठरणे; भारावणे; दमणे; ताटकळणे; थकणे; श्रमणे (जागरणाने किंवा फार वाचण्याने डोळे).

**टाकळणे** अक्रि. आग होणे.

**टाकळा-ळी** पु. स्त्री.१.एक लहान वनस्पती; याच्या पाल्याचा भाजीसाठी व औषधासाठी (विशेषतः चर्मरोगावर) उपयोग होतो. अंगावर बिब्बा उतल्यास याचा रस लावतात. २. ओसाड प्रदेशात पावसाळ्यात उगवणारे तण.

**टाकळाण** स्त्री. जळल्यासारखी आग.

**टाकळे** न. भाताची एक जात.

**टाका** पु. ठरलेला, ठरावीक कर. (माळवी)

**टाका** पु. १. (शिवणकाम)टाचा; शिवण; बंध (वस्त्र, पत्रावळ इ.ना दिलेला). २. शरीराचा सांधा. विशेषतः पाठीचा मणका.[सं. टक्, टंक] (वा.) ० **चालता होणे** – एखाद्या कामात प्रवेश होणे, मिळणे; चलती होणे; चंचुप्रवेश करणे; काम सुरू होणे. **टाके ढील, ढिले करणे**- १. सपाटून मारणे.२.अतिशय काबाडकष्ट करणे. **टाके ढि(ढी)ले होणे**-१. सांधे निखळणे.२. फार काम पडणे; त्यामुळे थकणे इ. ३. खरपूस मार खाणे.

**टाका** पु. हौद. (झाडी)

**टाका** पु. मेकाडा (पिकावरील एक रोग).

**टाकाऊ** वि. रद्दड; टाकून देण्यास योग्य; निकामी; निरुपयोगी.

**टाकाटाकी** पहा : **टाकोटाक**

**टाकारा-री** पु. टंकारी; दगडी जात्यास टाकी देणारा; पाथरवट.

**टाकारी** पु. एक पक्षी.

**टाकारी पिंजारी** गरीब, दुर्बळ, हलका, नीच, भित्रा माणूस.

**टाकि-की** इच्छेचा शेवट; ध्येय; आटोका : 'आर्तु आपुली टाकि पां विसरे।' - ज्ञा ११.९१.

**टाकिणे, टाकिजणे** सक्रि. पावणे; गवसणे : 'लोकीं टाकिजे काशी।' ह्न ऋव १९.

**टाकी** स्त्री. दंडक; रीती : 'बरें ज्याची जैसी टाकी। तैसें करावें।।' ह्न दास ११.८.१६.

**टाकी** स्त्री. १. पाण्याचा हौद; टाके; हाळ; गुरांचा पाणी पिण्याचा हौद; डोण. २. गॅसबत्तीमधील, स्टोव्हमधील रॉकेल ठेवण्याची जागा. [हिं. टंकी; सं. टंक]

**टाकी** स्त्री. १. पाथरवटाचे हत्यार; छिन्नी. २. जात्याला टाकीने मारलेला ठोका, ठोके, टोचे. (वा.)० **चालणे**-इलाज चालणे; क्रम चालविणे; कोणताही उद्योग, धंदा, कार्य चालू स्थितीत असणे. **टाकीचे तोंड, तोंडास टाकी दिलेली असणे**- देवीचे वण असलेले तोंड. ० **लागणे**-चंचुप्रवेश होणे; मार्ग सापडणे; कामास सुरुवात होणे.

**टाकी** पु. कृती; आवड; आटोका. [सं. तक्]

**टाकी** स्त्री. १. तबल्याच्या शाईची कड. २. (तबल्याच्या) चाटीवर बोटाने काढलेला, होणारा मधुर ध्वनी.

**टाकी** स्त्री. गंजिफाच्या पत्त्यांच्या खेळात प्रथम पान टाकण्याची पाळी. (ना.)

**टाकीथापी** स्त्री. तबल्याची वादनशैली : 'हवी ती पराण अगदीं टांकीथापीला खणाणत राहूनहि बत्तासा फुटत नसे.' ह्न विछच ९६.

**टाकुले** न. मस्तकाच्या कवटीचा पुढला भाग; टकुरे; टकोरे.

**टाकुळणे** पहा : **टाकळणे**

**टाके** न. अति थंडीमुळे खरबुजाच्या वेलावर पडणारा रोग. याने वेल पांढरे पडतात.

**टाके** न. १. पाण्याचा हौद; टाकी; दगडांनी बांधलेले किंवा कातळात खोदलेले पाण्याचे तळे. २. मर्यादा दाखविण्यासाठी खडपात पाडलेले भोक. (को.) [सं. टंक]

**टाकेकरी** पु. टाकारी; जात्यास टाकी देणारा.

**टाकेदार** पु. खंडकरी; खंड देणारा : 'यामुळें तिच्या हाताखालचे टाकेदार क्वचित प्रसंगींच खंड देण्यास हरकत करीत.'–देअच१२९.

**टाकोटाक** क्रिवि. १.पाठोपाठ; मागोमाग; पावलोपावली. २.बरोबर; प्रमाणशीर; मापाबरोबर; गरजेपुरता; पुरेपूर; तंतोतंत. ३. ताबडतोब; लगेच; डाकेने; अतिशय त्वरेने: 'तरी नाटोपे श्रीरंग। टाकोटाकीं जातसे।'–मुसभा १५.१८७. [क. टाकोटाकु]

**टाकोटाकी** क्रिवि. टाकता टाकता.

**टाकोला** वि. देवीचे व्रण असलेला.

**टाकोळी** स्त्री. खंडणी : 'टाकोळी १०० रुपये द्यावी लागते.'–मज्ञा८१.

**टाच** स्त्री. पावलाची मागील खालची बाजू; पायाची खोट. [सं.तक्ष](वा.) **० वर करणे**–उंच होणे; मानाने वागणे. **उंच टाच करून वागणे, टाचेला माती(मळ) न लागू देणे**–लक्षपूर्वक व शुद्धाचरणाने वागणे; निरुपद्रवी व निष्कलंक असणे. **टाचा घासणे**–तडफडणे; मरणसमयी पाय झाडणे.

**टाच** वि. टिचके; लहान; उणे; अपुरे : 'पातां गगन हीं दीसे टांचें' – राज्ञा ६.१११. [सं.तक्ष]

**टाच** स्त्री. रांग; एकसारखी ओळ; प्रवाह. (व.)

**टाच** स्त्री. घेणेकऱ्याने किंवा सरकारने घर इ.वर आणलेली जप्ती हुकूमनाम्याची बजावणी. (क्रि. आणणे, येणे): '...पट्टीवर टाच निघाली दिवानी कोडताची :' – आआशे ९४. [सं. तक्ष]

**टाचकळ** पहा : **टाकळा**

**टाचका–गा** वि. अपुरा; तोकडा; अरुंद; लहान.

**टाचके** न. आखूड; लांडे; अल्प; थोडे : 'टाचकं पडलं तर आणि अंगावर धावून येतोय !' – ऊन २९.

**टाचघोळ** पु. उत्कर्ष.

**टाचण** न. १. नोंद करून, लिहून ठेवलेला मजकूर; अशा मजकुराचा कागद; टिप्पणी; यादी; मजकूर लिहिण्याची क्रिया : '...गुल्हाटी कमिशनला एक सविस्तर टाचण सादर केले.' – धरागाले १११. २. स्मरणार्थ वही.

**टाचणी** स्त्री. १. पहा : **टाचण** १. २. कागद एकत्र टाचण्याची बिन नेढ्याची व माथे असलेली लहान सुई.

**टाचणी** स्त्री. १. उणीव; कमतरता; संकोच; टंचाई : 'न करा टांचणी। येथें कांहीं आडचणी।' – तुगा २५४८. २. दुर्दशा : 'करावें स्वरूपतेमाजी स्थिरू। तंव तो टांचणीचा उतारू।' – एभा २०.१८२.

**टाचणे** सक्रि. वर वर, सैल शिवणे; टाचे देणे; एकत्र करणे.[सं.टंक्, तञ्च्]

**टाचणे** सक्रि. टाचण लिहिणे; उतरून ठेवणे; नमूद करणे. [सं.टंक्, तञ्च्]

**टाचणे** अक्रि. क्षीण होणे.

**टाचणे** सक्रि. टंचाई पडणे.

**टाच देणे, मारणे** क्रि. घोड्यास चालण्याबद्दल इशारा देणे; टाचेला मंबरेज असतो त्याने घोड्याला टोचणे.

**टाचर, टाचंरू** न. टाच.

**टाचरा** स्त्री. पायाची टाच : 'टांचराच्या कुच्या मारा वेगीं।'–तुगा २९५१.

**टाचरा** वि. भांडकुदळ; उद्धट.

**टा(टां)चरू** पु. टाचेस येणारा फोड, गळू, गाठ.

**टाचऱ्या** वि. टाचा पूर्ण न टेकवता चालणारा : 'ह्यो टाचऱ्या म्हाताराच बोलल म्हंतीस व्हय ?' – ऊन ८३.

**टाचलांडा** पु. आखूड (गुडघ्यापर्यंत) शेपटी असलेला बैल.(व.)

**टाच(चा)ळणे** सक्रि. १. जनावराने जलद चालावे म्हणून त्याला टाचेने प्रहार करणे; टाच मारणे : 'घोड्याला टाचळून चालू लागला.' – कोकि ४७८.२. (ल.) चेतविणे; नेट लावणे; आग्रहाने प्रवृत्त करणे.

**टाचा** पु. टाका; शिवण. (क्रि. मारणे, देणे, घेणे.) : 'एक टाचा समयीं मारल्याने तो नव टांचे वाचवितो.'– मासंवा २.(वा.) **(जिभेस) ० देणे**–बोलणे आवरून धरणे.**(पोटास) ० देणे** – खावयास न मिळणे; पोटास चिमटा घेणे.

**टा(टां)चा** वि.१. अपुरे; लहान; तोकडे (वस्त्र इ.) : 'यांचें हृदय पहातां विपुल म्हणति कवि तथापि नभ टाचें।'–मोभीष्म १.६२. २. थोडा; अल्प : 'झाले प्राप्त विपुलगुण सुत तत्संबधयोग परि टाचा।' – मोअनु ६.१४. ३. अरुंद; कमी घोळाचा.

**टाचाळणे** सक्रि. सुरीने न कापता हातानेच (केळीचे पान) फाडणे.

**टाचे** वि. उणे; थोडे; क्षुद्र; लहान : 'परि टांचें न्हवे भलें। पुरतें आहे।।' – राज्ञा १०.४९. [सं.तञ्च्]
न. टंचाई.

**टाचेचे काळीज** १. मेहुणा; बायकोचा भाऊ (पायाच्या टाचेला जसे टोचणे सहन होत नाही तसे बायकोच्या भावाला वाकडे बोललेले तिला सहन होत नाही यावरून). २. अतिशय आवडती बायको. ३. (ल.) अतिशय आवडते माणूस,वस्तू इ.

**टाट** पु. थाट; थाटमाट; शृंगार.

**टाटका** वि. ताजे. (झाडी)

**टाटा करणे** क्रि. हात हलवून निरोप घेणे, देणे (विशेषतः लहान मुलांच्या संदर्भात).

**टाटाळ(व)णे** सक्रि. १. करकरचून बांधणे : 'टाटाओनी बांधा वहिला।' – शिव १३१. २. तोडणे; फाडणे; कापणे (केळीचे पान – हातांनी). (को.) [ध्व.]

**टाटी** स्त्री. १. लहान ताट. २. बांबूची ताटी. (झाडी.)

**टाटू** पहा : **ठाटू** [ध्व.]

**टा(टां)टोळा** पु. १. केळीच्या पानाचा उभा दांडा. (को.) २. जोंधळ्याचे किंवा बाजरीचे ताट.

**टाट्या** पु. लहान रेडा; टोणगा. (को.)

**टाण** पु. १. जोर; जोश.(क्रि. येणे). २. घमेंड; मगरुरी. (कर.)
**टाण–णा, टाणणे, टाणाटाण** पहा : **ताण** इत्यादी
**टाणकोल** पु.(विणकाम) कापडाच्या मागावरील ताण्याला ताण बसण्यासाठी शेवटी वापरावयाचा तीरकामठा. (बे.)
**टाणटाण** वि. जलद; भराभर : 'टाणटाण उड्या मारत पोरं जवळनं गेली.' – ऊन ९०.
**टाणाटोणा** पु.१. जादूगिरी; मंत्रतंत्र; जारणमारण : 'केलें टाणेटोणे सारी।'– पला ९७. २. अर्धवट, तुटपुंजे ज्ञान; प्रत्येक विषयातील थोडी थोडी माहिती. ३. निवडक वेचे(ग्रंथातील). [ध्व.;हिं.]
**टाणे** पु. योग्य वेळ; प्रसंग; समय; बहर; पक्वदशा; मोसम.
**टाणे** अक्रि. राहणे.
**टानकूल** न. (विणकाम) वईच्या पेढ्यांत अडकवून त्याचे पेले पाडण्याचे लाकडी दोन हात लांब असलेले साधन.
**टा(टां)प** स्त्री. १. घोड्याच्या पुढील पायाचा होणारा टट्टट्‌ असा आघात; घोड्याने मागील पायाने मारलेली लाथ; त्याचा तळपाय. (क्रि. मारणे). २. बोटांच्या पेरांनी डोक्यावर मारलेली टिचकी. ३. (ल.) मर्मभेदक टीका; टोमणा; निर्भर्त्सना. (क्रि. मारणे). ४. (वहाण, जोडा यांचे) टाचेचे कापून तयार केलेले कातडे. (बे.)[सं. स्तप्, स्तभ्, स्थापय](वा.) **० करणे** – घोड्याने पुढील पायाने बडवणे.**० खाजने** – बडबड सुरू असणे. (व.) **टापेखाली असणे, चालणे, राहणे, वागणे** – एखाद्याच्या हुकुमात, ताब्यात असणे.
**टाप** स्त्री. हिंमत (क्रि. असणे, लागणे, नसणे) : स्टलिन हयात असेपर्यंत कोणाची चूं करण्याची टाप लागली नाही.' – आआआ १६०. बहुधा नकारात्मक प्रयोग.
**टाप** स्त्री. छाट; तासणी. (क्रि. मारणे).
**टाप** स्त्री. आई जवळ नसताना लहान मुलाने तिचा घेतलेला ध्यास; धोसरा. (क्रि. करणे, घेणे.).
**टाप** स्त्री. भाजीचे लहान झाड; तशा झाडाचा खुंटलेला अग्रभाग.
**टाप** पु. लेखात खुणेसाठी केलेले रेषादिरूप चिन्ह.
**टाप** पु. टाप; पाऊल.
**टाप** स्त्री. कुवत; सामर्थ्य.
**टापटीप** स्त्री. १. घासणे; चापूनचोपून नीट करणे; थापटणे; थोपटणे. २. नीटनेटकेपणा; सुव्यवस्था; रेखलेपणा; बेतबात; ठाकठिकी : 'अगदी सगळी व्यवस्था टापटिपीनें केलेली.'–पलकोघे ३४२.[क. टाकुटेकु] क्रिवि. नीटनेटकेपणाने. [टाप द्वि.]
**टापटीप, टापास टीप** क्रिवि. अगदी अज(द)मासाबरहुकूम; कमी न पडता किंवा जास्त न होता.
**टापटेप** पु.अव. उंचवटे; टेकाडे; वारुळे; टेकड्या.(को.) [टेप द्वि.]
**टापणे** अक्रि. (दगड इत्यादीची) बाजू साफ करणे.
**टापर** स्त्री. १. घोड्याने मारलेली लाथ. २. बोटांच्या पेरांनी डोक्यावर केलेला आघात. (क्रि. मारणे).
**टाप(फ)र, टापरण** स्त्री.न. डोक्याला बांधावयाचे फडके; टापशी. (क्रि.घालणे, घेणे).
**टापर** न. मोठे लाकडी घुंगरू. (ना.) [ध्व.]
**टापर–ऱ्या** वि. बडबड्या (मनुष्य). (ना.)
**टापर** न. १. (कुत्सितार्थी) तोंड. (व.) २. टपका; दोष; चूक; गुन्हा; अपराध. [क. तप्पु = चूक]
**टापर** न. मोगरी; हातोडी; मेखसू.
**टापरण, टापरा** न. पु. (टापरणेपासून) मर्मभेदक शब्द; टोमणा; व्याजोक्ती; ठोसा; आघात (अपराध, उपकार, कृपा इत्यादींसंबंधाने). (क्रि. ठेवणे, मारणे.).(वा.)**० वाजणे** – दिवाळे निघणे; फडशा पडणे; संपणे.(ना.)
**टापरण** न. उपकाराचे ओझे.
**टाप(फ)रणे, डाप(फ)रणे, टापारणे** १. रागावणे; चवताळणे; खेकसणे; खरडपट्टी काढणे; टोमणा मारणे; दटावणे; दम देणे. २. (घोड्याने) जमीन टापांनी ठोकणे. ३. मोगरीने खुंटी इ. ठोकणे. ४. (ल.)कोणी मुक्तपणे वागू नये म्हणून त्यास एखाद्या कामात गुंतवणे. ५. एखाद्याची लबाडी त्याच्यावरच उलटविणे.
**टापरा** पु. मोगरी; लाकडी मोठा खुंटा.
**टापरा** पु. १. घंटा. २. तोंड. ३. दिवाळे. (झाडी)
**टापरी** स्त्री. १. ओझ्याखाली घेण्याची चुंबळ; बुचडी. (हेट.) २. पहा : **टापशी**
**टापरु** पु. बैलाच्या गळ्यातील घंटा. (झाडी)
**टापशी** स्त्री. १. डोक्याला बांधावयाचे फडके; टापरी; डोक्याला बांधलेल्या पागोटे, रुमाल इ.वरून बांधायचा कपडा. २. पाऊस लागू नये म्हणून डोक्यावर घेतलेली कांबळ्याची खोळ.(क्रि. बांधणे). ३. टक्कर; ढुशी.(क्रि. मारणे). (राजा.) (वा.) **टापशा बांधणे**–(प्रेतयात्रेच्या वेळी डोक्याला पांढरा रुमाल, फडकी गुंडाळतात त्यावरून) प्रेतयात्रेची तयारी करणेः 'त्यानंतर तासाभरांतच मंडळींनी टापश्या बांधल्या.'– व्यव १००.
**टाप(पु)सणे** अक्रि. सुजणे; फुगीर होणे (शरीर, अवयव).
**टापसा** पु. सूज; फुगवटा; फोपशा, फुगीर भाग.
**टापा** पु. १.रोप. २. पीक : '....ते वालाच्या टाप्यापेक्षा मोठे झाले होते...' – आआशे ३१६.
**टापिओका** अन्नसंचय करणारी मुळे असलेले झुडूप अथवा लहान वृक्ष; एक कंदमूळ; यापासून साबुदाणा तयार करतात.
**टापु** न. नागवेलीचा अंकुर; कोंभ.
**टापू** पु. १. बेट; चारी बाजूंनी पाण्याने वेढलेला प्रदेश. २. इलाखा; परिसर; भाग : 'झिंगऱ्या आणि चिंगी यांनी त्या टापूतील लोकांना दारूचा रतीबच लावला होता.'ह्व चंदन ६. ३. टप्पा; मजल; प्रदेश; प्रांत. [हिं.]
**टापू** न. १.झुडपांचा कोवळा देठ, शेंडा; लहान झुडूप किंवा भाजी (खावयास उपयोगी); त्याचा कोंभ. २. हरभऱ्याचा टहाळा, दाणा; दाणे काढून घेतलेली पोकळ शेंग किंवा त्यांचा समूह. ३. हरभरा, तूर, वाटाणा, मसूर, हुलगा, करडई, कोथिंबीर यांचे रोप; गवत; चारा; लव्हाळे; हरळी; ज्वारीचे किंवा बाजरीचे ताट. [हिं.]
**टापूची सजा** जन्मठेप; काळ्या पाण्याची शिक्षा.

**टापोर** न. पहा : **टापर**

**टाफरे** वि. घोडा टाप टाकतो त्याप्रमाणे ठेचाळत चालणारे : 'गारोळे जामून ठाफरें।' – दास ३.६.४२.

**टाफेटा** पु. एक प्रकारचे घट्ट रेशमी कापड.

**टामटूम** स्त्री. गाजावाजा; भपका; शोभा; थाटमाट; दिखाऊपणा; तमाशा; डौल दाखवणे; टाणाटोणा; देखावा.
क्रिवि. नगाऱ्याच्या आवाजाप्रमाणे, ढमढम. [हिं.]

**टामरेल** स्त्री. ट्रॅम : 'जाताना फक्त टामरेलीचा आणा.' – माजीगा १०३. [इं. ट्रॅमरेल]

**टामारी** (उद्गा.) काहीही होवो. (व.)

**टाय** पु. विशेषतः पुरुष वापरतात तो शर्टच्या कॉलरच्या मधून बांधायची लांब अरुंद पट्टी. त्याची गाठ गळ्यापाशी मारून लांब सुटे भाग मोकळे ठेवतात. [इं. नेकटाय]

**टाय** स्त्री. बैलाच्या गळ्यातील घंटा. (व.)

**टाय** स्त्री. हरभऱ्याचे कोवळे झाड. (व.)

**टायकळा** भाताची एक जात. (कु.)

**टायखिळा** पु. पहा : **टाकळा**

**टायनी** स्त्री. भुणभुण; पिच्छा. (क्रि. लावणे, पुरवणे) : 'अशी सारखी टायनी लावल्यानी हां गेले चार दिवस !' – गुंजा १३९.

**टायपां** न. भिंतीची एक बाजू. (गो.)

**टायफॉइड** पु. संपूर्णपणे न निघता काही ठरावीक दिवस राहणारा ताप; आंत्रज्वर; मुदतीचा ताप; विषमज्वर.

**टायर** पु.न. मोटार, स्कूटर किंवा सायकल यांची रबराची पोकळ धाव. हिच्यात हवा भरलेली रबराची पोकळ नळी असते. [इं.]

**टायस** वि. स्पष्ट.

**टार** पु. घोडा. (घोड्याची, त्याचप्रमाणे नार, गार, सार म्हणजे बायको, जवाहीर, द्यूत यांची किंमत नेहमी बदलते किंवा कल्पनेच्या बाहेर पडते यावरून.).
न. १. शिंगरू किंवा निरुपयोगी, म्हातारा व रोडका घोडा : 'वाहावया पोथी वृद्ध टारा।' – एभा १८.३४८.२. खोडकर मूल.
वि. खोडकर; द्वाड; टारगट.

**टारगट, टारगा** वि. १. ठेंगणा; बुटका; लहान आकाराचा; खुरटा. २. आखूड; अपुरा (मोठ्या माणसाचे वस्त्र इ.). ३. खोडकर; द्वाड; चटोर; फाजील : 'त्यांनी 'मंचर-मावशी' अशी टारगट पदवी दिली.' ह्व खर्डेघाशी १९. [देशी; सं.टारक]

**टारगेपणा** पु. वात्रटपणा; चटोरपणा; छचोरपणा; चारगटपणा.

**टारपीण** तेल टर्पेटाईन.

**टार(ळ)फुला** पु. जोंधळा, ऊस या पिकांत उगवणारी एक वनस्पती. ही दुसऱ्या झाडात आपल्या मुळ्या खुपसून स्वतःचा निर्वाह करते व दुसऱ्या पिकाचा नाश करते.

**टारले** न. ओबडधोबड पाळणा, कावड, झोळणा.

**टाराटु(टो)री** स्त्री. १. पोकळ धाक; व्यर्थ भीती; फुकट अरेरावी. २. निष्फळ प्रयत्न; टुरटूर. [ध्व.]

**टारे** तिरकस पाहणे. (तंजा.)

**टार्ट** पु. फळांपासून बनवलेला एक खाद्यपदार्थ.

**टार्टरिक आम्ल** द्राक्षे, चिंच आणि इतर फळांत आढळणारे आम्ल.

**टाल** वि. पन्नास संख्या; ५०. (नंदभाषा)

**टाल** पु.न. इमारती किंवा जळाऊ लाकडे मिळण्याचे दुकान. (ना.,व.) [इं. स्टॉल]

**टाल** पु. सबंध डोक्याची केलेली गुळगुळीत हजामत; टाळू; डोक्यास पडलेले टक्कल. (ना.)

**टालणे** क्रि. टाळणे; चुकविणे : 'अवाच्य तें तें टाली। जीभ चि गा।।' – ज्ञा १४.२०७.

**टालमटोला** पु. कार्य लांबणीवर टाकण्याचा प्रकार; टाळाटाळ; टंगळमंगळ; दिवसगत लावणे; थापा देऊन चाळविणे. [हिं.]

**टाला** पु. झुकांडी; टाळाटाळ : 'याकरितां टाला देऊन दिलीकडे छ २७ सफरी कूच करून गेले.' ह्व पेद १४.९. २. कुलूप; टाळे. (वा.) ० **देणे** – १. चाळवणे. २. भूलथाप : 'राजश्री आईसाहेब गडावरती. खाली आलियावर देतील, ऐसे म्हणोन टाला देत जाणे.' – ऐको ४७१.

**टाली** स्त्री. (मंडई संकेत) आठ आणे; अधेली. [हिं.]

**टालेटोले** पु.अव. दंगेखोर; पुंड : 'रामजी बंडगर याने माणकोजी बंडगर याची फौज आणिकहि टालेटोले जमा करून.' –ऐको४७१.

**टाव** पहा : **टाहो**

**टावकं–के** न. किफायतशीर गिऱ्हाईक; घबाड : 'डॉक्टरसाहेब, पुन्हा आलं आपल्याला एक टावकं.' – मावा २४९.

**टावरण** न. चहाफराळाचे दुकान; हॉटेल : 'इराण्याच्या टावरणातसुद्धा खातील.... 'ह्व माजीगा ५२.

**टास** वि. ठोस; कठोर; कठीण; भरीव; घट्ट; भरभक्कम.

**टास** न. (नाविक) लहान ओहळातून खारे पाणी वाहणे. (कु.)

**टाहकळ–ळी, टहाटळ** स्त्री. टाकळा वनस्पती : 'सीवणी टाहकळी वेहंकळी।' – कापु २२.१४.

**टाहळ–ळा–ळी, टाहाळ–ळी** पहा : **टहाळ** इ.

**टाहारा** पु. दंडारीतील नाचणाऱ्यांच्या हातातील दंड.

**टाही** स्त्री. लहान मुलांचे ट्याहां ट्याहां रडे. (क्रि. मारणे, भरणे, घेणे.). [ध्व.]

**टाहुवा** पु. आलाप; टाहो : 'तेथ टाहुवा करीति चक्रवाके।' – ऋव १८. [ध्व.]

**टाहुर** न. १. दारूचा गुत्ता. २. टावरन. (गो.) [इं. टॅव्हर्न]

**टाहो** पु. १. (मोर, बगळा इ.) काही पक्ष्यांचे ओरडणे; (त्यावरून) दीर्घ आक्रोश; मूल उपजल्यानंतरचे पहिले रडे, ट्याहां ट्याहां; ओरडणे (मूल इ.चे).(क्रि. फोडणे, घेणे.): 'झाला कुमार अद्भुतरूप करी तत्क्षणींच तो टाहो।' – मोसभा १.८०.२. हंबरडा; विलाप; किंकाळी, आरोळी; मोठ्याने हाक मारणे; घोष; गलबला : 'तुका करी टाहो : पाहे रखुमाईचा नाहो :' – तुगा २१४२.३. जमिनीतून वाफा निघणे.(क्रि. फुटणे).

**टाहो** पु. लाभ.

**टाळ** स्त्री. जबडा; तोंड : 'पदर टाळीत धरून भूदेवांना वाकून नमस्कार केला.'ह मकथा १४०. [त. शालर-रा; ताळम्]

**टाळ** पु. १. काशाची पोकळ झांज. (क्रि. वाजविणे, कुटणे.). २. (संगीत) ताल धरणे.३. बैलाच्या गळ्यातील घंटा. (व.) [सं. ताल] (वा.) ० **लावणे** - गप्प करणे; बंद करणे : 'राज्याचा ताळेबंद ज्याला मुखोद्गत आहे त्याला आम्हाला टाळ लावायला फारसा वेळ लागणार नाही.' - स्वामी १७. ० **वाजणे**-१. साठा, कोठारातील वस्तू संपणे.२. पायांत पाय अडकणे.

**टाळ** पु. (शेती) नांगराच्या पानाप्रमाणे दिसणारे दिंडात बसविलेले पाभरीचे फण. (बे.)

**टाळ** पु. लांडोरीचे लहान पिलू. (जुन्नर)

**टाळ** वि. मधोमध एक वर्तुळ असलेले (मोती).

**टाळ** स्त्री. भोक : 'मराठ्यांनी सुरुंग लावला की त्याने उलट सुरुंग लावून सुरुंगांना टाळी पाडावी.' - वमो.

**टाळ** वि. शुभाशुभ गोष्टींत स्वार्थासाठी वावरणारा (माणूस).(कु.)

**टाळ** पु. टहाळ; लहान फांदी : 'खते न वापरता रुईचा टाळ, शेणमूत इ.च्या साहाय्याने...' - माजीगा ४२४. (राजा.)

**टाळ, टहाळ** क्रिवि. स्पष्ट; पूर्ण. (जुन्नर)

**टाळकण-कर-दिनी-दिशी** क्रिवि. स्पष्टपणे; उघडपणे; स्वच्छ (दिसणे क्रियापदाबरोबर उपयोग).

**टाळकरी** पु. टाळ वाजविणारा : 'शंभरदीडशे टाळकरी जमले.'- माआ ११.

**टाळकाहाळ** पु. टाळ आणि भेरी.

**टाळकुटेपणा** पु.(निंदार्थी) टाळ वाजविण्याची सवय; भजनात वेळ घालवणे : '...त्यांच्या नामसंकीर्तनामुळे टाळकुटेपणाची साथ फैलावून समाज रसातळाला गेला...' - संवासाफ ४८.(ल.) वेळ घालवण्यासाठी निरर्थक चर्चा करत बसणे.

**टाळकुट्या-घाशा** वि.१.(निंदार्थी) टाळ वाजविणारा; ढोंगीपणाने भजन, कीर्तन करणारा.२.(ल.)वेळ घालवण्यासाठी निरर्थक चर्चा करत बसणारा (मनुष्य).३.(ल.)पायांत पाय अडकवून चालणारा (घोडा).

**टाळके** न. १.(निंदार्थी) डोके; मस्तक; बोडके; टकले. [सं. तालम्, तालकम्] (वा.)० **शेकणे**-१. मारणे; बडविणे. २.तोटा येणे. **टाळक्यावरचे केस काढणे**- नागवणे : 'स्वामी तरी शंभर नंबरी आहे का? नायतर देसायाच्या टाळक्यावरचे केस काढून पोबारा करायचा...' - अगोचर ५.

**टाळघोळ** पु. झांजा वगैरे वाद्यांचा मोठा गजर.

**टाळणे** सक्रि. १. दूर करणे; नाहीसे करणे; चुकविणे; बंद करणे; काढून टाकणे; लोटणे; घालविणे (संकट, दुःख, त्रास, साथ इ.). २. करमणूक करणे; झुलविणे; रंजन करणे. ३. लोटणे; घालविणे (वेळ). ४. अळंटळं, टाळाटाळ, टोलवा-टोलवी करणे; लांबणीवर टाकणे; वेळ काढणे. [सं. टल्; क. टलायिसु]

**टाळध(धा)री, टाळधाऱ्या** वि. टाळ वाजविणारा.

**टाळनसार** वि. सुरेख; नीटनेटका.

**टाळबद्ध** वि. तालात असलेला; ठेक्यात बसविलेले. क्रिवि. (गायन) योग्य तालावरील (गाणे). [सं. तालबद्ध]

**टाळमुळं** क्रिवि. मूळ आणि शेंडा; (ल.) वरपासून खालपर्यंत.

**टाळसूर** पु. योग्य काल व आवाज; तालसूर.

**टाळा** पु. १. ढकलाढकल; टोलाटोली; पोकळ बढाई.(क्रि.मारणे). २. टाळणे; परिहार; अडथळा; गुंगारा (त्रास, उपद्रव, संकट यांना) : 'तो निजगुरुसुत म्हणुनि न दे परिभव दे तयासि कवि टाळा।' - मोभीष्म ६.५७.(वा.) ० **देणे**-अंग काढणे; विन्मुख होणे : 'या समई व्यर्थ मार खाऊन घोडे माणूस जाया करावे हें ठीक नाही. या वेळेस टाळा द्यावा.'ह ऐको ४७१.

**टाळा** पु. १. तोंडाच्या वरच्या जबड्याचा आतील भाग. २.(शिंपी) चांदवा. (क.) ३.(चर्म.) मोट शिवतेवेळी दोन अधोडींमधील वरच्या बाजूस लावलेला कातडी तुकडा; जिभेच्या वरच्या चामड्याचा चांगला जाड भाग. ४. दाराची एक झडप, फळी. (बे.)[सं. तल] (वा.) ० **कोरणे** - वहाण, जोडा इत्यादींच्या खालच्या तळास नक्षी पाडणे. ० **वासणे**- आ वासणे : ''आणि ?'' फिरंगोजींनी टाळा वासला.' - श्रीयो २०२. **टाळ्याला टिपरू नसणे** - जीभ सारखी वळवळणे; तोंड कधी बंद नसणे : 'तिच्या टाळ्याला टिपरू नव्हते.' - परेपा २७०.

**टाळा** पु. जोंधळ्याचे ताट. (क्रि. लावणे). (बे.)

**टाळा-ळी** पु. टहाळा; लहान फांदी : 'मोडोनि वृख्याचा टाळा। लवलवित पत्रांचा कोवळा। आला घेऊनि।।' - क्रिपु ८२.

**टाळा** पु. कुलूप : 'कामकळिकेसीं टाळी घातली।' -शिव १९०.[ते. टाळमु]

**टाळाटाळ-ळी** स्त्री. चालढकल; भूलथाप; चुकवाचुकव; अळंटळं; टोलवाटोलव. [क. टाळाटोळि]

**टाळी-टालि** स्त्री. १. एका तळहातावर दुसरा तळहात मारणे; दोन तळहात एकमेकावर आपटल्याने होणारा आवाज; ताल. (क्रि. वाजविणे, वाजणे, पिटणे, मारणे.). २. (गायन) गाताना हाताने ताल धरणे. ३. हातावर हात वाजविणे (फजिती, आनंद दर्शविण्यासाठी, संकेत करताना). ४. हातावर हात मारणे; वचन देणे (सौदा ठरविताना). [सं. ताल, तालिका] (वा.) ० **देणे** - १. कोणत्याही खेळास प्रारंभ करणे. २. दुसऱ्याने सांगितलेली गोष्ट पटली असे दाखविणे. ० **चेतविणे**- समाधी लावणे. ० **वाजणे** - लग्न लागणे. **टाळीस टाळी देणे** - वरिष्ठाच्या म्हणण्यास मान तुकविणे; हांजी हांजी करणे. **टाळ्या देणे** - पसंतीदर्शक किंवा प्रशंसात्मक टाळ्यांचा गजर करणे.

**टाळी** स्त्री. उपेक्षा; रेंगाळणे. (क्रि. लावणे, देणे.).

**टाळी** स्त्री. लय; ध्यान; समाधी. (क्रि. लावणे) : 'पंचविषय एकवटुनि। लाविली टाळी।' - क्रिपु २.३१.४१. पहा : **ब्रह्मटाळी** [सं.ताल]

**टाळी** स्त्री.१. कानठळी; दडा : 'वाऱ्यानें जाऊं पाहे अवनी। टाळी कानीं बैसली।' -एरुस्व १२.१०५.२. चुनेगच्ची जमीन. [सं. ताल]

**टाळी** अव. दोन्ही जाभाडे, जबडे. [सं. तालु] (वा.) ० **आत्मा लावून बसणे**- १. समाधी लावून बसणे. २. रुसून निश्चल बसणे.

**टाळी, अटाळी** स्त्री.१. बिनछपराची चुनेगच्ची. २. ठिगळ. [सं. अट्टालिका]

**टाळीचा घोडा** मुलींचा एक खेळ.

**टाळीपटकी** स्त्री. हातावर हात मारून (वचन देऊन) केलेला करार; पक्का करार (सौद्याचा). (क्रि. करणे).

**टाळुकी** स्त्री. फांदी : 'म्हणे येसेचेया मुळातुनु। टाळुकी येइल निपजुनु।' – क्रिपु ३४.४१.

**टा(ता)ळू** स्त्री. १. डोक्याचा वरील व पुढचा भाग; मस्तकाग्र; कवटी. २. टाळूवर ठेवलेले केस. ३. तालुप्रदेश; तोंडाच्या वरच्या जबड्याचा आतील भाग. [क. तले=डोके, सं. तालु; त. शुळि] (वा.) ० **भरणे**– (चर्म.) टाचेखालचा भाग उचलून देणे. ० **भरणे, टाळवेस लावणे**– (बायकी) लहान मुलाच्या टाळूस तेल लावणे किंवा न्हाऊ घालण्यासाठी तेल लावणे. ० **राखणे**– केस राखणे : 'ईश्वराने टाळू राखली होती.' – व्यंमाक १०. **टाळूवर तेल घालणे, ओतणे**–काम होणे; गरज भागणे; साहाय्य करणे. **टाळूवर मिरे वाटणे**–एखाद्यावर पूर्ण ताबा चालविणे, अंमल गाजविणे. **टाळूवर हात फिरविणे** – फसविणे; बुडविणे. **टाळूस, टाळेस, टाळवेस टिपरू लागू न देणे**–१. आपल्या अंगावर येणारी बाजू मोठे शब्दपांडित्य करून उडवून देणे; काथ्याकूट करणे; अघळपघळ पण मुद्दा सोडून बोलणे. २. आरोप शेकू न देणे; सहन न करणे. **मढ्याच्या टाळूवरचे लोणी खाणारा**– अतिशय कृपण व नीच.

**टाळू** स्त्री. (चित्रा नक्षत्राच्या लोखंडी चरणात पडलेल्या पावसाने) जमिनीचा बनलेला चिकट व जाड थर. (सामा.) जमिनीचा टणक थर, भाग. (क्रि. धरणे, देणे.). [सं. तालु] (वा.) ० **येणे** – जमिनीस खरपुड्या येणे : 'लोक म्हणतात जमिनीला टाळू आली आहे.' – के ३०.३.१९३७.

**टाळू** स्त्री. तबल्याच्या शाईचा मध्यभाग. [सं. तालु]

**टाळूचा दात** (सापाचा विषारी दात टाळूपाशी असतो आणि तो त्याला फार जपतो त्यावरून) अतिशय आवडती वस्तू; जिवाचा कलिजा.

**टाळूनखी** स्त्री. भांड्याच्या सांध्यावर दोन ओळी कोरण्यासाठी वापरावयाचे कासाराचे साधन.

**टाळू पडणे**–लहान मुलांना होणारा एक रोग. याने मुले रोड, किरकिरी होतात.

**टाळे** न. १. कुलूप. २. कुलपाच्या किंवा घड्याळाच्या खालचे किंवा वरचे अंग, बाजू. ३. पाण्याच्या नळामधील वाऱ्यासाठी असलेले उभे दार; त्या दाराची फळी; मोरीमधील गाळ काढण्यासाठी मधोमध ठेवतात ते दार. [सं. ताल, तालकम्] (वा.) ० **ठोकणे** – बंद करणे : 'उद्या पोलिसांना सुगावा लागून त्यांनी दुकानाला टाळं ठोकलं...' – एल्गार ७३. ० **पाडणे** – भोक पाडणे; भगदाड पाडणे : 'त्या सुरुंगानें रात्री टाळें पाडून फौजेची फौज आत जावी असें केलें आहे.' – ऐको ४७२.

**टाळे** न. १. आढे; पोटमाळा; छपराच्या मध्यभागाचा वासा. २. इमारतीची दर्शनी बाजू. [सं. तल]

**टाळे** न. झाडाच्या फांदीवरील मधाचे पोळे. (को.)

**टाळे** न. जोड्याचा तळ. [सं. तल]

**टाळेतून खीस पडणे** –(उप.) अतिशय जोराने टाळघोष करणे.

**टाळे** न. भोक.

**टाळेटाळे** पु.अव. पुंड; जमातदार; दंगेखोर : 'विराण्या वगैरे टाळेटाळे जमा होऊन मुलखांत धूम मांडली आहे.' – ऐको ४७१.

**टाळेबंदी** स्त्री. मालकाने गिरणी किंवा कारखाना बंद ठेवणे; कामगारांचे काम थांबवून त्यांना कामाच्या जागेत प्रवेश न देणे.

**टाळेभेकरा** वि. वेडसर; तर्कटी; चक्रम. (कु.)

**टाळेभेकरे** न. १. एका जातीचे माकड. २. मलबारातील एक रानटी जात व त्या जातीतील व्यक्ती. हे लोक कमरेभोवती झाडाच्या लहान डहाळ्या किंवा पाला बांधतात व बाकीचे शरीर उघडे ठेवतात.

**टांक–का** क्रिवि. ताबडतोब; त्वरित; टाकोटाक (क्रि. चेपणे): 'विनाणी आणों जांती टांक घडावेया क्रुसु।।' – क्रिपु ४८.५५; 'तवं पर्वति काळी घोडे सेळी में में करीत नीगाली : तेयांचिया टांका चेंपीति : आणि दाईचा उबे राहाति :' – लीचउ ११..

**टांकण** वि. हिमालयाच्या डोंगराळ प्रदेशातील टांकण देशातील घोडा.

**टांकसाळ दर** (वाणिज्य) नाण्याचे त्यावर टंकित केलेले मूल्य.

**टांका** पु. सुईचा शेंडा.

**टांग** स्त्री. टांगण्याची तिपाई; काटा टांगण्याचे साधन. (कर.)

**टांग** न. मस्तक : 'फुलाचेया भोगा । लागि प्रेम टांगा ।' – ज्ञा १३.५५६.

**टांग, टांगडी** स्त्री. १. (अवहेलनेने) तंगडी; टिरीपासून पावलापर्यंतचा पाय; ढाप : 'टांग धरूनिया गगनीं।'ह्मपापू १३५. २. विशेषतः ढेंग; दोन पाय जमिनीवर एकापुढे एक ताणून टाकले असताना त्यांच्यामध्ये राहणारे अंतर. [हिं. टांग; सं. टंक्, टंका, टंगा] (वा.)० **तिंबणे**– १.(ग्राम्य) लग्न करणे. २. आंघोळ करणे. ० **बांधणे**– एखाद्याचे गुह्य उमजून घेऊन त्यावर वरचष्मा मिळविणे. ० **मारणे**–१. दांडी मारणे; नोकरी, व्यवसायात अनुपस्थित राहणे. २.(कुस्ती) पायावर लाथ मारून पाडणे. ३. आर्थिकदृष्ट्या बुडविणे; फसविणे. **टांगड्या तोडणे**– पायपिटी करणे. **टांगेखालून जाणे**–हार जाणे; पराभूत होणे; नम्र होणे.

**टांगटोला** पु. (क्रिकेट) चेंडू पायांमधून मागे जाईल असा टोला.

**टांगणे** सक्रि. लोंबकळणे; लोंबविणे; लटकविणे; अधांतरी ठेवणे; अडकविणे. [सं. टंकण, तंक्, तंग्.] (वा.) **टांगणीला लागणे**– काय होणार या काळजीने बेचैन होणे : 'लोकांचा जीव टांगणीला लावत होते.' – वेण ३४. **टांगल्यासारखे वाटणे**– बेचैन होणे; काय होणार हे न कळल्यामुळे अस्वस्थ वाटणे : 'कांही निश्चित असे ठरेपर्यंत टांगल्यासारखं त्याला वाटायचं.' – कोसला ३२.

**टांगदिवा, टांगता दिवा** पु. लोंबता दिवा; टांगता येईल असा दिवा; लामण दिवा.

**टांगर** वि. दांडगी (स्त्री).

**टांगरा** पु. खुजा बैल. (कु.)

**टांगरे, टांगूळ** न. दोरीला घट्ट पीळ बसण्यासाठी व नंतर मारलेली गाठ आवळण्यासाठी उपयोगात आणायची काठी; अशी मारलेली गाठ.

**टांग(गू)ल** न. मासे धरण्याचे मोठे जाळे वर ओढण्यासाठी घेतलेला लहान दांडा. (कु.)

**टांगसी** स्त्री. वरण वाढण्याची लहान वाटी. (झाडी)

**टांगळ** स्त्री. (ग्राम्य) कसबीण; रांड.

**टांगळ** वि. १. लांबटांग्या. २. लाथा मारणारी (गाय).
**टांगा** पु. घोडागाडी. [क.]
**टांगाघोडे** न. आकड्यांच्या जुगारातील परिभाषा : 'टांगाघोडे म्हणजे सहाचा आकडा.' – मकथा ६१–३१.
**टांगाटोली–ळी** स्त्री. उचलबांगडी; हातपाय धरून उचलून नेणे: 'पोऱ्हं निंघाले शिवयाले। कधीमधी टांगाटोली।'– बगा १०७.
**टांगापढाव** पु. टांगे थांबण्याची जागा; तळ : 'रुक्मा रस्ता चालू लागली. टांगापढावापाशी आली.' – वानगी २२३.
**टांगे** न. १. (तिरस्कारार्थी) पहा : **टाकुले** : 'प्रभुत्वें सांसिणले कव्हणी। धनुवीति टांगे।' – ऋव ६१. २. तंगडी : 'काळाचें टांगें मोडिलें।' – दास ५.९.४१. ३. मस्तक; टाळू.
**टांटू** न. बंदुकीची गोळी सोडताना होणारा आवाज.
**टांफरणे** क्रि. मनात फुगणे.
**टिक** स्त्री. १. डोळ्याच्या बाहुलीवर येणारा पांढरा ठिपका. २. मोत्याचा किंवा जडावाचा गळ्यात घालण्याचा दागिना.
**टिक, टीक** स्त्री. टिकली; रवा : 'पार्थी सोनयाची टिक। सोनयासी लागली देख।' – ज्ञा १४.३८३. [सं. तिलक]
**टिकटिक–का** क्रिवि. १. (करणे या क्रियापदासह) मिणमिण (जळणे). २. उत्तेजन देणे; चेतविणे; उठावणी करणे. [ध्व.] (वा.)० **करून राहणे**–अत्यंत गरिबीत दिवस काढणे. (शेवटची धुगधुगी असणे असा मूळ अर्थ.).
**टिकटिक–की** स्त्री. १. विझणाऱ्या दिव्याची मिणमिण; माणसाची अखेरची धुगधुगी. २. विशिष्ट आवाज (घड्याळ वगैरेचा). [ध्व.]
**टिकटिकणे** अक्रि. १. मिणमिणणे; झिरूमिरू असणे (मालविण्याच्या वेळचा दिवा.). २. (ल.) मृत्यूच्या वेळची धुगधुगी असणे. ३. टिकटिक असा आवाज करणे.
**टिकटिळा** पु. नखरा; शृंगार; नट्टापट्टा.
**टिकणे** अक्रि. १. शेवटपर्यंत कायम राहणे; विनाअडथळा चालू राहणे; नाश न पावता राहणे; निभाव लागणे; उभे असणे; तग धरणे; सहन करणे (वस्तूसंबंधी योजतात.). २. (एखाद्याजवळ) राहणे; वास करणे; (असलेली स्थिती) चालू असणे; चिकटून राहणे (स्वास्थ्याच्या दृष्टीने); थारा असणे (माणसासंबंधी योजतात.). ३. (दुकानदारी) गिऱ्हाईक चिकटून राहणे. [हिं. टिकना; सं. टिक्=जाणे]
**टिकणे** अक्रि. उड्या मारणे (हरीण इत्यादी).
**टिकमिरवणा** वि. नीटनेटका; दिखाऊ पण पोकळ (माणूस, वस्तू). (राजा.)
**टिकम्टोला** पु. नट्टापट्टा. (झाडी)
**टि(ठि)करी** स्त्री. जमिनीवर विशिष्ट प्रकारची आकृती रेखाटून दगडाच्या किंवा खापरीच्या लहान तुकड्याने लंगडत खेळावयाचा मुलांचा खेळ; मामामामींचा खेळ. (ना.)
**टिकल** स्त्री. उडी; कुदी. (क्रि. मारणे, घेणे.).
**टिकलग** वि. शोभिवंत; जडित; जडावाचा (अलंकार) : 'तेवीं नवगुण टिकलग। लेणें ब्राम्हणाचें अव्यंग।'– ज्ञा १८.८५४.
**टिकलस** वि. नीटनेटका; टापटिपीचा. (व.)
**टिकला** पु. १. कपाळावर गंध, गोपीचंदन, कुंकू इत्यादीची वाटोळी किंवा इतर दुसऱ्या आकाराची लावलेली खूण (ही शोभेसाठी किंवा निरनिराळ्या धर्मपंथांचा भेद दर्शविणारी असते); तिलक; मोठा टिळा. २. (ल.) कुळातील किंवा जातीतील श्रेष्ठ पुरुष. [सं.तिलक]
**टिकली** स्त्री. १. लहान टिकला, ठिपका. २. बायकांच्या कपाळावर लावतात तो कुंकवाचा लहान टिकला; लहान वाटोळी वस्तू (अभ्रक, मेण, काच, जरतार, झीग इ.ची); लहान पोळी; चांदकी. ३. (ल.) नट्टापट्टा किंवा नखरा करणारी स्त्रीः 'असल्या लै छपन्न टिकल्या बघिटल्यात म्या...' – रैत १४५. [टिकला याचे लघुत्वदर्शक]
**टिकली** स्त्री. १. वाफ्यातून उपटून दुसरीकडे पुन्हा लावायचे भाजीपाल्याचे रोप, रोपटे. २. एक औषधी वनस्पती. हिची पाने नखाएवढी बारीक व फुले तांबडी किंवा पांढरी असतात.
**टिकलीचे शेवाळे** स्थिर पाण्यामध्ये मुक्तपणे तरंगणारी लेम्ना प्रजातीमधील जलवनस्पती.
**टिकलीमिकली** स्त्री. वेणीफणी; नट्टापट्टा; टिळाटोपी; नखरा.
**टिकले** न. पातळ कालवण. (कु.)
**टिकल्यापाणी** न. मुलींचा एक खेळ. याचा उल्लेख वात्सायनसूत्रात आढळतो.
**टिकवणी** स्त्री. जपून ठेवणे; शाबुती.
**टिकवणीचा** वि. ठेवणीचा; टिकाऊ; काळजीपूर्वक वापरलेला.
**टिकवना** क्रि. १. देणे. २. बळाने घ्यायला लावणे. (झाडी)
**टिकविणे** सक्रि. १. जपून ठेवणे; शाबूत राखणे; कायम राखणे; तगवणे. २. (दुकानदारी) गिऱ्हाईक मिळवून कायम राखणे; जोडणे.
**टिकविणे** सक्रि. १. विकत घेतलेल्या मालाची किंमत रोख देणे. २. लगावणे; मारणे : 'दोन्ही हात एकत्र पकडून वडील मला दुसऱ्या हातानं पटापट टिकवत राह्यचे.' – कोसला ९.
**टिकशी, टिक्षी** स्त्री. अंकुर; कोवळा शेंडा; डिकशी : 'चार फुलं, एखादं बेलाचं पान, चार तुळशीच्या टिकशा, असं असलं की त्यांचं भागे.'ह्र पडघ ६५.
**टिकस** स्त्री. तिकीट. (व.)
**टिकसटिंगणा** वि. १. हलका; भुर्रकन उडणारा. २. ऐटबाज; ढबदार; अलबत्या गलबत्या.
**टिकसा** वि. सुगंधी उटणे. (व.) पहा : **चिकसा**
**टिका** पु. १.पहा : **टिकला** १. २.(ल.) जनावराच्या कपाळावरील वाटोळा, पांढरा ठिपका. [हिं.; सं.तिलक] (वा.)० **कपाळी लागणे** – डाग लागणे; दोषारोप येणे. ० **लागणे** –प्रख्यात होणे; कपाळावर शिक्का मारल्याप्रमाणे असणे (कृत्य, गोष्ट).
वि.कपाळावर गोल, पांढरा ठिपका असलेला (प्राणी). जसे – टिका घोडा, टिका बैल.
**टिका–क्का** पु. राज्याभिषेक विधी; सिंहासनाधिष्ठित होण्याचा समारंभ : 'टिक्याचा हत्ती चांगला व घोडे उत्तम वगैरे सामान समागमे घेऊन येणें.' – ऐको ४७२.
**टिका** पु. मान; जबाबदारी : 'वडिलपणाचा टिका आतां तुम्हास आहे.

भलतसे लळे चिरंजीवांचें पाळावे हे उचित आहे.' – ऐको ४७२.

**टिकाईत** वि. गादीचा हक्कदार; युवराज.

**टिकाऊ** वि. शाबूत राहणारा; दीर्घकाल चांगल्या स्थितीत असणारा; दमदार; शाश्वत.

**टिकाऊपणा** पु. टिकण्याचा गुण.

**टिकारणे** न. जाडजूड दांडके : 'एक वावभर टिकारणे तोडून आणून त्या ढासळत्या भागाच्या बाजूने दाबून दिले.' – वावटळ ३३.

**टिकारना** क्रि. आतिथ्य करणे.

**टिकाव–स** पु. कुदळ; पिकाव; खोदकामासाठी लागणारे हत्यार. [क. पिकासु]

**टिकाव** पु.१. निभाव; मजबुती; सतत टिकवणी (एखाद्या ठिकाणी किंवा एखाद्या माणसाच्या संगतीत सुखाने, सोयीने). (क्रि. होणे, निघणे, लागणे, धरणे.). २. निभावणी; स्थैर्य; खंबिरी; सहनशक्ती(वस्तूची).(क्रि. होणे, निघणे.). ३. बचाव; कायमपणा; यश.

**टिकाविणे** सक्रि. १. (हाताने, काठीने) मारणे; लगावणे; भडकाविणे. २. पहा : **टिकविणे**

**टिकाळी** स्त्री. उंच टोक; शिखर : 'आम्ही एका टेकडीच्या टिकाळीला येऊन पोचलो.' – ससप्र ७.८०.

**टिकिटिकी** पहा : **टिकटिक–का**

**टिकी** स्त्री. उद्योग; व्यापार; धंदा; निर्वाहाचे साधन; नोकरी. (क्रि. लागणे, सापडणे, मिळणे.).

**टिकी** स्त्री. १. रोपाचा कोंभ; डिकशी; पालवी. (को.) २. पंजाबातील सप्ताळू नावाचे फळ.

**टिकुली** स्त्री. कपाळावर लावलेला टिळा.

**टिकू** पहा : **टिकला**

**टिकूर** न.पु. तुकडा.

**टिके** पु. ठिके; तीळ; मस; डाग.

**टिके** पु. शेत; वावर.

**टिकेकरी** पहा : **टिक्याचा धनी**

**टिकोजी–बा** पु. १.(निंदार्थी) मानपानाच्या टिळ्याचा अधिकारी; बडे धेंड : 'आम्हांला सांगणारे हे टिकोजी कोण?'–गुशि ११. २. पहा : **टिक्याचा धनी**

**टिकोर** न. लाकडाचा तुकडा.

**टिकोर** न. कटकट; त्रास; गोंधळ (क्रि. पडणे) : 'पागेच्या घोडीचा पाये नळीत जाऊन टिकोर पडले. घोडी मेली.' – पेद ९.४१.

**टिकोर–रा** वि. मोठा भसाडा. पहा : **टकोर**

वि. चांगला.

**टिकोर–रे** न. मोठा व सुंदर घोडा.

**टिकोरणे, ठिकोरा–रे** न. पु. १. काठी; सोटा; दांडके. २. (अश्लील) शिस्न. हा शब्द अतिशय मोठ्या व अतिशय लांबट वस्तूस लावतात. जसे :– टिकोरणे–शेत टिकोरा पाऊस इ. ४. ठोसा; रट्टा; तडाखा (विशेषतः काठीचा). (क्रि. मारणे).

**टि(ट)कोरी** स्त्री. डोक्याची कवची; टाळके. (व.)

**टिकोळी–ळे** स्त्री. लहान पत्रावळ; ठिकोळे.

**टिक्कल** स्त्री. सततचा छळ; त्रास; खरडपट्टी; शिव्यांचा भडिमार. (क्रि. लावणे, मांडणे, करणे.).

**टिक्कंटिळा** पु. चट्टीपट्टी; नखरा. (व.)

**टिक्का** १. जिल्ह्याचा एक विभाग. २. ज्या गावच्या जमिनीची वर्गवारी, वाटणी व त्यानुसार आकारला जाणारा कर याच्या सर्व नोंदी झालेल्या आहेत असे गाव; स्वतंत्रपणे ओळखले जाणारे गाव.

**टिक्का** पु. १. जनावरांच्या कपाळावरील वाटोळा, पांढरा ठिपका. २. ठिपके पडणारा पिकावरील रोग : 'तंबाखू ह्य यावर टिक्का... मर हे रोग होतात.' – सभा ११८. ३. टिळा; तिलक.

**टिक्का–का** स्त्री. पहा : **टीक** : 'गळ्यांत टिक्का, ठुशी...' – गेतेदि २८.

**टिक्का, टिक्कोजी** वज्रटिका. पहा : **टिका** इ.

**टिक्कार** न. काठी; सोटा; दांडके. पहा : **टिकोरा** : 'बाजीबाबांनी... आवेशाने ते टिक्कार रेडकावर भिरकावले.' – हपा १०९.

**टिक्की** वि. छोटी; आकाराने लहान; टिचकी : 'बोलता बोलता दोन टिक्की पोती घेटली...' – खळाळ २०.

**टिक्की** स्त्री. एक औषधी वनस्पती. जखमेतून वाहणारे रक्त थांबविण्यासाठी हिचा उपयोग करतात.

**टिक्की** स्त्री. नेट; चिकाटी. (कर.)

**टिक्की** वि. कपाळावर पांढरा ठिपका असलेली (मेंढी). (जुन्नर)

**टिक्की** स्त्री. सोय; तजवीज; संधान; तरतूद. (क्रि. जमविणे). (वा.)

० **लावणे** – जेवणाची सोय लावणे.

**टिक्कुजी** पु. शिष्ट : 'लक्षीशी एवढ्या सलगीने वागणारा हा कोण टिक्कुजी म्हणून त्याने वाकड्या मानेने त्याला तीनतीनदा न्याहाळले.'–हपा १९.

**टिक्या** पु. भातपिकास होणारा एक रोग.

**टिक्याचा धनी** १. जवळ ज्ञान, पैसा, अधिकार, सत्ता इ. नसतानाही परिस्थितीमुळे ज्याला मानमरातब मिळतो असा माणूस. २. कुंकवाचा धनी; मानापुरता मालक. ३. राजा; सत्ताहीन पदाधिकारी व्यक्ती.

**टिग** न. डबके.

**टिच** स्त्री. हटक; अपशकुन. (व.)

**टिच** न. उसण.

**टि(टी)च–चु** पु. स्त्री. लहान वीत; अंगठा आणि तर्जनी ह्यांमधील अंतर.

**टिचकणे** क्रि. वाढवणे; पिचणे(बांगडी).

**टिचकन–कर–दिनी–दिशी** क्रिवि. टचटचा; टचकन; टिचकी मारल्यासारखा आवाज होऊन. [ध्व.]

**टिचकनी** स्त्री. दार बंद करण्याची आडवी पट्टी. (झाडी) [हिं.]

**टिचका** वि. आखूड (वस्त्र); लहान; तोकडे.

**टिचका** वि. पु. तडा गेलेला; विचका. (व.)

**टिचकी** स्त्री. १. टिचका; टचका. २. टाप; टचकी; बोटांचा प्रहार; चुटकी. (क्रि. मारणे, वाजविणे.): 'ज्यानें टिचकीनें मारिली।'–ऐपो ४९.

**टिचकी, टिचकुली** स्त्री. लहान मुलांचे फुगीर पोट. (क्रि. फुगणे, वर येणे.).

**टिचकी** वि. बारीक; लहान.

**टिचकीपाणी** मुलींचा एक खेळ. [ध्व. टिच]

**टिचकुली** स्त्री. लहान मुलांचे फुगीर पोट.
**टिचटिच–चा** क्रिवि. पोटातील कुटकुट आवाजाप्रमाणे आवाज होऊन.
**टिचटिची, टिचिटिचि** पहा : **टिचटिच**
**टि(टिं)चणे** उक्रि. १. टिचकी मारणे. २. गोटी, कवडी इत्यादी लक्ष्यावर नेम मारणे; वेधणे. ३. (ल.) (पैसे) भरणे; देणे. [सं. तिज्]
**टिचर–रे** न. डोक्यातील कृमी पडलेला व्रण; शरीराच्या कोणत्याही भागात व्रणापासून पडलेले छिद्र.
**टिचरणे, टिचणे** अक्रि. तडा जाणे : 'तो घडा टिचरतांच' – मिख १६८.
**टिचवणे** सक्रि. रोख देणे; हातावर टिकवणे : 'घ्या... तुमची कोंबडीं, कुत्रीं सगळीं आणली आहेत. अकरा रुपये टिचवले आहेत.' – व्यव १८१.
**टिचा** पु. (विशेषतः नावाचा टिचा – उडणे, पडणे, होणे, करणे या क्रियापदाबरोबर) अपकीर्ती; वाईट नाव; दुष्कीर्ती.
**टिचा** पु. लहान मुलाच्या कपाळावरील काजळाची तीट. (क्रि. लावणे, लागणे.) (को.)
**टिचीव** वि. साफ केलेल्या घडीव दगडाचे (जोते).
**टिचुकली** स्त्री. १. लहान फुगा. २. चिकी. (झाडी)
**टिचुकली** वि. लहान. (झाडी)
**टिचूमिचू** वि. ठिसूळ; न टिकणारे. (व.)
**टिचे** न. तीव्र वेदना; उसण; पीडा (शरीरातील). (क्रि. भरणे, उतरणे.).
**टिचे** न. गळू; पुळी; करट. पहा : **टिचर**
**टिच्चून** क्रिवि. प्रत्यक्ष; समोरासमोर; भरपूर; रोखठोक; स्पष्ट.
**टिट** न. १. पायाचा चवडा. २. तिकटे.
**टिट** न. चोच : 'टिटांतु नळी। धरूनि ठाके।।' – ज्ञा ६.७७.
**टिट(टे)घर** न. अड्डा; सोंगट्यांतील कटघर; चाडी, चोरी, शिंदळकी या तीन वाटांवरचे, तिठ्यावरचे घर : 'तें जिणें कीं जुवारांचें। टिटेघर।।' – ज्ञा १८.६७३. [सं. तिट्टा]
**टिटव** न. १. मोटवण, चाक व त्याखालचे दोन खांब इ. (व.) २. खांब व तुळई यांच्यामध्ये त्यांच्याच जाडीचा लांबट, जाड ठोकळा. (खा.)
**टिटवी, टिट(टि)वरी** स्त्री. बहुरंगी व दिसण्यात सुरेख असा एक पक्षी. याचे अंडे सोनेरी असून त्यास चांगली किंमत येते. [सं. टिट्टिभि, टिट्]
**टिटवी, टिट(टि)बरी** स्त्री. पाटस्थळ; पिकास पाणी देण्याची सरी. (को.)
**टिटाळी** स्त्री. शेंडा. (को.)
**टिटिभ** स्त्री. टिटवी. [सं.]
**टिटिय, टिटी** न. टिट; पक्ष्याच्या पायाचा चवडा, तिकटे : 'टिटियांतु नळी। धरूनि ठाके ।।'ह्र राज्ञा ६.७७.
**टिटॅनिअम** न. एक धातूरूप मूलद्रव्य. [इं.]
**टिट्टिभ** पु. तांबूस रंगाचा नीलमणी.
**टिड्डी** स्त्री. टोळ. [हिं.]
**टिणगिण्या** स्त्री. अव. खोड्या; चाळे; चेष्टा; लुच्चेगिरीची भांडणे; वात्रटपणाचे चाळे; उनाडक्या. (क्रि. मारणे). (को.)
**टिणटिण–णा** क्रिवि. १. उडतउडत; उड्या मारीत; उसळी घेत (चेंडू). २. उड्या मारणे; खिदळणे; हुंदडणे (लहान मुलाने). [ध्व.]
**टिणमणी–नी** पु. स्त्री. १. घुंगुरमाळा : 'बैलांच्या टिणमण्या हलत होत्या.' – बाविबु १४३. २. तुणतुणे.
**टिन** पु.न. १. एक धातू; जस्त. २. पत्र्याचा वाटोळा डबा. [इं.]
**टिनप(पा)ट** न. १. जस्ताचे वजनाने हलके भांडे. २. (ल.) भिकार; दरिद्री; क्षुल्लक; कुचकामी. [इं. टिनपॉट] (वा.) ० **वाजणे** – दिवाळे निघणे; फडशा पडणे.
**टिनपाट** वि. पोकळ. (झाडी)
**टिप** स्त्री.खुषी; बक्षिसी; वाढपी, सेवक इ.ना त्यांनी केलेल्या कामाबाबत दिलेली किरकोळ रकमेची बक्षिसी. [इं.]
**टिप** स्त्री.१. पद्धत. २. लहान घुंगरू; घंटी. (व.)
**टिप** न. अश्रू. (क्रि. काढणे, गाळणे, रडणे).
**टिप** पहा : **टीप**
**टिपक** पु. टिपून घेणारा; शोषून घेणारा.
**टिपकणे** अक्रि. ठिबकणे; थेंब थेंब पडणे; गळणे. [सं. तिप्; ध्व.]
**टिपका** पु. १. ठिपका; थेंब; बिंदू. २. डाग; खूण; चिन्ह. ३. (ल.) बारीक टिकला. ४. गळती; सततची ठिबकणी (पाऊस, गळणारे पाखे, ओले वस्त्र यांची).(क्रि. लावणे, मांडणे, करणे.). ५. (ल.) हळूहळू पण सततचा मार. [ध्व.]
**टि(टी)पकागद** पु. शाई टिपून, शोषून घेणारा कागद.
**टिपगा(गि)री** स्त्री. चुन्याने भिंत वगैरेच्या दरजा भरणे : 'देऊळ गळत असे त्यास... टिपगारी करविली.' – तीप्र २७३.
**टिपटिप** स्त्री. १. पहा : **टिपका** ४. (क्रि. गळणे). २. (ल.) तगादा; निकड; टुमणे.(क्रि. लावणे, मांडणे, करणे.). ३. गळती.
**टिपटिप–पा** क्रिवि. गळण्याचा टपटप असा आवाज होऊन. [ध्व.]
**टिपटॉ(टा)प** वि. नीटनेटका : 'टिपटॉप पोषाखातील ड्रायव्हर...' – गुमा २५. २. वक्तशीर; भरपूर; पूर्ण : 'वर्षभर ह्यांनी टिपटाप अभ्यास केला होता.' – कोसला ८८. [इं.टिपटाप]
**टिपण** न. १. चिठ्ठी; स्मरणपत्र; टाचण; यादी. २. जन्मपत्रिका. ३. लहान विवरण; टीका. [क. टिप्पणि; टीप–पु;हिं. टिप्पणी;सं. टिप्पनकम्]
**टिपण** न. १. उडी; उशी (वाघाची). (क्रि. टाकणे). २. नेमलेले स्थान किंवा वेळ; तोफ किंवा बाण यांचे लक्ष्य; तारकीट. (वा.) **टिपणास येणे** – आटोक्यात येणे; आवाक्यात, कक्षेत येणे. (को.)
**टिपण** न. धान्य पेरण्याची भोक असलेली नळी; तिफण : 'बियाणांची ओटी घेऊन आणि टिपण जुंपून भल्या सकाळी लोक रानाकडे जाऊ लागले.' – बनगर ४०.
**टिपण** न. शिवणटिपण अशा जोडशब्दात. पहा : **टिपणे**
**टिपणबाज** वि. काटेकोर; करारी; वक्तशीर इ. : 'इंग्लंडमधील छापखानेवाले इकडच्यापेक्षा मोठे टिपणबाज.' – कआत्म ४३४.
**टिपणी** स्त्री. १. यादी, टाचण इ. करणे; टीप. २. पहा: **टिपण १**
**टि(टी)पणी(नी)स** पु. १. गावातील घरादिकांची, लष्कराची नोंद करून त्यावर पट्टी ठरविण्याचे काम करणारा अधिकारी; टीपकर. २. जकातीचा अधिकारी.
**टिपणे** उक्रि. थेंब थेंब पडणे; गळणे; स्राव होणे. [सं. तिप्]
**टिपणे** उक्रि. (वस्त्र इ.) शिवणे; दोरा घालणे; टाका घालणे.

**टिपणे** सक्रि. धान्याचा एक एक दाणा वेचून घेणे. [सं. डिप्]

**टिपणे** सक्रि. शाई, तेल इत्यादी शोषून घेणे; वस्त्राने पुसून काढणे; टिपकागदाने शाई वगैरे वाळवणे; ओलेपणा शोषणे.

**टिपणे** सक्रि. १. गोळी, बाण, चेंडू इ.नी लक्ष्य वेधणे; नेम धरून मारणे; (लढाईत) एकटा निवडून काढून ठार मारणे. २. (खेळ) ईर्ष्येने पळून झाड, दगड, खेळगडी इ.स शिवणे, स्पर्श करणे. ३. नोंद करणे, घेणे (टिपण, यादी करणे; टाचण करणे) : 'स्वारांची होणारी हालचाल बाजीरावांच्या कानांनी टिपली.' – राऊ २६८. [सं. डिप्]

**टिपणे** सक्रि. चुना वगैरेंनी भिंत सारवणे.

**टिपर** क्रिवि. झकझकीतपणे (चंद्र प्रकाशणे).
पु. देवळाच्या पुढे दिवे ठेवण्यासाठी दहा-पंधरा हात उंचीची दगडाची केलेली रचना; दीपमाळ.

**टिपरघाई** स्त्री.१. नगाऱ्यावर गती वाजवताना किंवा टिपऱ्या खेळताना ज्याप्रमाणे अखेरीस अतिशय जलदीने वाजवतात व खेळतात त्याप्रमाणे अतिशय त्वरित होणारी क्रिया. २. घाईने व जोराने केलेले कृत्य; अतिशय त्वरा; धुमश्चक्री; जोराची धावपळ, गडबड : 'क्षणभर तरवारीची टिपरघाई जाली.' – भाब ४६.

**टिपरं** न.अव. तुकडे : '...बानं जुंधळ्याची टिपरं सोलून दिली होती.' – मळणी ९७.

**टिपरी–रू–रे** स्त्री. मापी पावशेर.

**टिपरी–रू–रे** स्त्री १. वीतभर लांबीची लहान काठी, दांडी; कांडी (नगारा वगैरे वाद्ये वाजविण्याची, खेळातील, तसेच हाताच्या बोटामध्ये पिरगळण्यासाठी घालण्याची). २.(वाद्य)ताल धरण्याची वीतभर लांबीची काठी. ही प्रत्येक हातात एक एक घेऊन एकावर एक आपटून ताल धरतात. ३. उसाचा तुकडा. [सं. डिप्]

**टिपरी** स्त्री. १. कडा. २. शेजार.

**टिपरी–ऱ्या** स्त्री. न. एक प्रकारचा चाप; दोरीला पीळ घालून लाकडी दांडी फिरवून केलेल्या छळाचा एक प्रकार : 'कोणाहि नको टिपरी। हें नाकींची श्रमेहिजन कोटि परि।' – मोकृष्ण ४९४५.

**टिपरी–रू** स्त्री. न. अंगाला घट्ट बसणाऱ्या कपड्यांमुळे, दागिन्यांमुळे कमरेला होणारी वेदना. (क्रि. लागणे) : 'घडीभर बसलें तर कमरेला टिपरू लागते...' ह्र गांवगाडा १६२. २. अतिशय दमल्यामुळे अंग ताठरण्याने होणारी वेदना, दुःख.

**टिपसी** वि. क्रिवि. ग्लानीत; निश्चल : 'तापानं तू टिपसी पडून होतीस.' – जमा ९३.

**टिपळण** स्त्री. विहिरीतील पाणी आटणे, कमी होणे. (को.)

**टिपा** स्त्री.अव.(सास.) स्पष्टीकरणात्मक भाष्य; खुलासेवजा मजकूर.

**टिपाड** न. पाणी साठविण्याचा पत्र्याचा ड्रम, पिप : 'पाणी साठवायला टिपाड पाहिजेत.' – स्मगा २५१.

**टिपायान** न. वेळ.

**टिपाले लागणे** क्रि. वाजवू लागणे; वाजवणे. (व.)

**टिपावण** वि. ठरलेले किंवा ठरविलेले.

**टिपिरा** पु. फेरा : 'तुमच्या म्होरं लांबचा टिपिरा मारून आलुया.' – बाब ३.

**टिपी** स्त्री. १. लक्ष्य. २. डूख. (झाडी)

**टिपीण** स्त्री. एक फूलवेल.

**टिपुजी** पु. (निंदार्थी) टिकोजी; शिष्ट : 'सर्वांवर टीका करणारे तुम्ही कोण टिपुजी लागून गेलात मोठे.' – विजी ४२.

**टिपु(पू)सणे** सक्रि. थेंब थेंब गळणे (भांडे, छप्पर, वस्त्र इ.); हळूहळू पाझरणे; झिरपणे.

**टिपू** न. थेंब; अश्रूबिंदू.

**टिपून** क्रिवि. नेमके; निश्चयात्मक.

**टिपूर** पु. त्रिपुर; दीपमाळ. (राजा.)

**टिपू(प्पू)र** वि. चकचकीत; पिठासारखे, स्वच्छ पांढरे शुभ्र (चांदणे).

**टिपू(प)रखेळ–घाई–घाळी** पु.स्त्री. नगाऱ्यावर टिपऱ्या वाजवून खेळायचा नाच.

**टिपू(प)रखेळा** पु. नगाऱ्यावर टिपऱ्या वाजवून खेळायच्या नाचातील नाचणारा.

**टिपू(प)रखेळे** न.(सोनारी) चौफुल्यावरील पत्रा बसवून ठोकण्याची हातोडी.

**टिपूस** न. १. थेंब : 'केसांना तेलाचा टिपूस माहिती नाहीं.' – वासुनाका १. २. पाण्याचा स्वल्पांश; तुषार; शिंतोडा. ३. (ल.)ठिणगीने जळून पडलेले भोक. ४. ठिपका; बिंदू; टिंब.

**टि(ठि)पूसणे** अक्रि. थेंबाथेंबाने गळणे; थेंब पडणे. [सं. तिप्+स]

**टिपूंजी** पु. इजारदार; मालगुजार. (व.)

**टिप्पण–णी** स्त्री.न. टिपण; टीप; खुलासा; स्पष्टीकरण; टीका; व्याख्या; संक्षिप्त लेखन; परामर्श. पहा : **टिपण** [सं. टिप्पनकम्]

**टिप्पण** पहा : **तिफण** : 'पुनः पेरणी झाली की वाण्याचीच टिप्पण पावात जाई.' – व्यंमाक १४०.

**टिप्पल** स्त्री. विटी. (झाडी)

**टिप्पस** स्त्री. मिजास; ऐट. (व.)

**टिप्पिरा** पु. टोला; मार; दणका : 'धोंड्याचा एक खच्चून टिप्पिरा डोसकं गवसून दिला.' – गोतावळा ३९.

**टिबकणे** अक्रि. थेंब थेंब गळणे (पाऊस, वस्त्रातून पाणी). [ध्व.]

**टिबका, टिबुक** पु. १.ठिपका; थेंब. २. डाग; कलंक; कालिमा.

**टिबना** क्रि. १. पहारीने छिद्र पाडणे. २. बी पेरणे.

**टिबा** पु. थेंब. (राजा.)

**टिबा** पु. उंचवटा. [हिं. टिबरी]

**टिबी** स्त्री. पहारीने जमिनीस केलेले छिद्र. [हिं.]

**टिबुकली** स्त्री. दाबचीक पक्षी. (झाडी)

**टिब्बा** पु. १. माडीवरचा सज्जा, गॅलरी. २. टेकाड; उंच जागा; उंचवटा; माथा : 'श्रीधर राजवाडे लाल टिब्बावरून....' – तूमांतूमो १४२. (व.)

**टिब्बू** पु. दोष; ठपका. (व.)

**टिभा** पु. पानवेलीवर पडणारा एक रोग; मेकाडा.

**टिभा** पु. (चर्म.) टाका; टाचा; शिवण; शिलाई.

**टिमक टिमक करणे** पुढे पुढे करणे; मध्ये मध्ये करणे. (व.)

**टिमकारणे** सक्रि. १. मारणे; चोपणे. २. डोळे वटारून पाहणे; कान उभे करणे.

**टिमकी** स्त्री. १. लहान नगारा; टमकी. २.(ल.)ओरड.[ध्व.; सं.डिमडिम+क; क. टंकि, टमकु] (वा.)० **देणे** – जाहीर करणे. ० **वाजविणे, बडविणे** – १. अपकीर्ती होणे. २. उदो उदो करणे; जाहीर करणे.

**टिमकुळ** न. ठिपका; पूज्य; शून्य. (तंजा.)

**टिमटिम** स्त्री. १. टिमकीचा आवाज. २. पिरपिर; कुरकुर; बडबड. ३. (ल.) चैन; मजा. [ध्व.]

**टिमटिम** क्रिवि. मंदपणे (तेवणे).

**टिमटिमणे** अक्रि. मंद, क्षीण उजेड पडणे : 'काही (दिवे) सदाच्याच दुखणेकऱ्यांप्रमाणे टिमटिमत टिमटिमत दूरवर पोचतात.' – जीली२५.

**टिमटिमा** क्रिवि. टमटम; ढमढमा; टिमकीच्या आवाजासारखा आवाज होऊन. [ध्व.]

**टिमरूक** न. टेंगूळ : 'आपली उंच मान आणि तिच्यावरचे उंच टिमरूक दिसले.' – वर्षा ४५.

**टिय्या, टिंया, टुया** वि. तांबड्या डोक्याचे छोटे, लहान (पोपट) : 'तांबड्या भडक चोचीचे टिय्ये राघू फांदीवर उलटे होऊन जांभळे खात असत.'ह व्यंमाक ११२.

**टिरकी** स्त्री. धार. (व.)

**टिरटिर** स्त्री. क्षणभंगुर चकचकाट, आनंद (एखाद्या भिकाऱ्याला एकाएकी मिळालेल्या पैशाने होणारा किंवा एखाद्या महत्त्वाकांक्षी माणसाला थोड्याशा प्राप्तीने, मिळालेल्या साधनांपासून होणारा); दरिद्री माणसाचा चार दिवसांचा श्रीमंती डौल. [ध्व.]

**टिरटिर** स्त्री. वाद; बडबड; कुरकुर. (झाडी)

**टिरटिरा** क्रिवि. चमकून; चकचकाटाने; झगमगाटाने. [ध्व.]

**टिरा** पु. टिळा. (झाडी)

**टिरी, टीर** स्त्री. ढुंगण : 'एक टिरीचा मृदंग करून। वांकुल्या दाविती वाजविती।' – हरिवि १०.१४५. (वा.) ० **पिटणे** – अत्यानंद होणे. ० **फाटणे** – हैराण होणे. ० **बडविणे** – बढाई मारणे.

**टिऱ्या** वि. खुजट व अशक्त (विशेषतः पशू).

**टिर्री** वि. हलकट; नीच; लुच्चा; दुर्गुणी.

**टिल(ळ)क** पु. १. टिळा. २. श्रेष्ठपणा दाखविणारा शब्द.

**टिलटिला** वि. अशक्त; रोड.

**टिलंगी** स्त्री. सायकलची घंटी. (झाडी)

**टिला, टिलिया** पु. टेकाड; उंचवटा : 'दिलीपार लाहून दरवाजाकडे मजमूच्या टिलियावर यमुनातीरीं मुक्काम करून राहिले.'–भाव ४२.

**टिल्ल–ल्ल्या** वि. लहान; खुजा; बुटका; ठेंगू व मजबूत.

**टिव** स्त्री. ठाव; ठिकाणा.

**टिवणे, टिवटिवणे** अक्रि. टिटवीप्रमाणे टिवटिव असा आवाज करणे : 'टिटवे थोर टिवटिवती।' – मुआदि ३६.५८; 'टिव नैदि – योजिता स्वाहाकारी'ह वच्छाह ५९.

**टिवल्या(ळ्या)बाव(व्ह)ल्या–ळ्या** स्त्री.अव. १. खोड्या; उनाडपणा; कुचेष्टा; रिकामटेकड्या गोष्टी; अकडबाजी; थट्टामस्करी; वेडेवाकडे नाचणे; टवाळक्या करीत हिंडणे. २.छानछोकी; नखरा. ३. गमतीजमती. [सं.ट्वल्+व्हल]

**टिव(वि)ळा** पु. एक प्रकारचे चर्मवाद्य. टीविला.– राज्ञा १.१३३.

**टिवळे** न. नारळाच्या करवंटीचा तुकडा : 'कारण दोन पैशांचें टिवळें, त्यांत दमडीचें तूप घालून ब्राह्मणास देतात. (त्यापासून जो दान घेतो त्याला कांहीं उपयोग नाहीं).' – लोश ११५.

**टिवंचणे, टिवचळणे, टिवचा** पहा : **टोचणे**

**टिवा** पु. टिपका.

**टिवाटीव** स्त्री. १. टिटवी पक्षी.२.(ल.) उंच व सडपातळ माणूस.

**टिवाळ** न. सार (आमसोलांचे). (गो.)

**टिवाळ** स्त्री. शिदोरी (शेतकऱ्यांची).

**टिवाळ** स्त्री. नडगी.

**टिवाळ** स्त्री. एक वाद्यविशेष : 'धुरधुरितीं टिवाळा।'-शिव ५२३.

**टिस** स्त्री. तहानः'टिस लागीसनी गेला। पेयालेज पानी।'–बगा ७१.

**टिसटिस** न. ठुणठुण; ठुमणे; कटकट. (व.)

**टिसमिस** स्त्री. वितंडवाद; खोडी. (झाडी)

**टिसवा** पु. खच्ची केलेल्या झाडास येणारा नवा अंकुर. (कु.)

**टिहा** पु. धान्याची मळणी करताना खळ्यात बैल जुंपण्यासाठी मध्ये रोवलेला छोटा खांब; तिवडा.

**टिळकला** पु. लहान टिळा.

**टिळका** पु. ठिपका; थेंब(तूप, दूध इ.चा); गुळगुळीत, चमकदार गोळी. (व.)

**टिळटिळीत** वि.भरपूर व सतेज, चकचकीत; तुकतुकीत (द्राक्ष).[ध्व.]

**टिळा** पु. १. कपाळावर लावलेला गंधाचा, कुंकवाचा वाटोळा ठिपका; पोट, हात इ.वरील गंधाचे ठिपके. २. कपाळावर गंध लावण्याचा नाम, यंत्र, छाप.[सं. तिलक] (वा.) ० **करणे**– राज्यावर बसविणे : 'कीं तुम्हांसी टिळा करूं सुदिनीं।'– कक ३.१७.२०. **टिळाटोपी करणे** –पवित्रपणाचा बाह्य देखावा करणे; नटूनथटून सुशोभित होणे. ० **वेशीस लावणे** – गावातील सर्वांना जेवावयास बोलाविणे. ० **लावणे** – नियोजित वधूला कुंकू लावणे; विवाह निश्चित करणे.

**टिळाविडा** पु. पाटलाचा एक हक्क.

**टिळेडोळे** पु. अव. १. कणकेच्या, उकडीच्या किंवा मातीच्या मुखवट्यावर गंध व डोळे काढणे. २. नट्टेपट्टे; थाटमाट; नखरेबाजी.

**टिळेपट्टे–मिळे** पु. अव. सर्व प्रकारच्या नटण्याला व्यापक शब्द. (क्रि. करणे, होणे.).

**टिळेफाटे** पु.अव. (उपहासाने) बायकांच्या कपाळावरील लांबट व भले मोठे कुंकू.

**टिळ्याचा धनी** मुकादम; एखाद्या टोळीचा, संस्थेचा जबाबदार माणूस. पहा : **टिक्याचा धनी**

**टिक्षा** पु. शेंडा; शेंड्याची पाने : 'माडांच्या आणि सायांच्या टिक्षांवरच काय ती समुद्रांत डुबणाऱ्या सूर्याची सौम्य दृष्टि किंचित स्थिर झाली आहे.' – काभि ५३.

**टिंगणे** अक्रि. १. लंगडणे; अडखळणे; ठेचाळणे. २. (ल.) अडकून पडणेः 'त्यांना संध्याकाळपर्यंत शेतात टिंगावे लागले.'–आआशे २३६.

**टिंगना** वि. तिरळा. (व.)
**टिंगर** न. तंगडी; टांग : 'बकऱ्याची मागची पुढची टिंगरे...' – जोफुसग्रं २४४. [सं. टंगा]
**टिंगरी** स्त्री. नरोटीवर छोट्या दांडक्या बांधून तयार केलेले तंतुवाद्य.
**टिंगल** स्त्री. थट्टा; टवाळी; कुचाळकी. (क्रि. करणे, वाजविणे.).[क. टिंगल]
**टिंगल** स्त्री. (चर्म.) बारीक खिळा; टेकस.
**टिंगाणी** स्त्री. मातीची परळ; वेळणी : 'कुंडाला, ....टिंगाणी ही मातीची साधने होती... परळ... टिंगाणी ही ताटवाटीप्रमाणे वापरायला उपयोगी पडत.' – शिआ १४२.
**टिंगुस्ली** स्त्री. एक खेळ; लंगडी. (झाडी)
**टिंगेरा** पु. फेरा; हेलपाटा : 'सकाळीच सोनावण्याला निघालो. येताना परत तेवढाच टिंगेरा पडला.'– सबा ८.
**टिंच** पहा : **टीच**
**टिंटघर** न. १. चहाडी, चोरी, शिंदळकी या तीन वाटांवरचे घर : 'तें जीर्णें कीं जुवारांचें। टिंटघर।।' – ज्ञा १८.६७०. २. तिठ्यावरील जुगारीचा अड्डा.
**टिंडा** स्त्री. एक भाजी : '(उन्हाळ्यातील भाजी पिकांमध्ये) काकडी, ...टिंडा इ. पिके येतात.' – भाजीपाला १२६.
**टिंब** न. १. थेंब. २. अक्षरावरील अनुस्वार; अनुनासिकाची खूण. ३. (गणित) पूज्य; शून्य.
**टिं(टुं)बर** न. १. टेंगूळ. २. लहान टेकडी. (बे.)
**टिंबर** न. इमारती लाकूड.
**टिंबकारणे** सक्रि. छेडणे.
**टिंबा** पु. दणका; फटका : '... येतोस का न्हाईस ? का देऊ एक टिंबा ठिवून?' – मिरास ३१३.
**टिंबी** स्त्री. लहान मडके; लहान दगडी.
**टिंबुरणी** स्त्री. एक प्रकारचे काळ्या रंगाचे लाकूड : 'एबोनी (यालाच 'टिंबुरणी' असेही म्हणतात) व 'वैन' या इतर लाकडाच्या जाती आहेत.' – मई १२९.
**टिंबू** पु. गोट्यांच्या खेळात ज्याचा एकही गुण झाला नाही असा खेळाडू.
**टिंवटिंवे** न. तुणतुणे. (गो.)
**टीक** न. ठिकाण; स्थान : 'जे ज्ञानें केलें टीक।'– ज्ञा १४.३००.
**टीक** पु. एक मोठा, उंच वृक्ष : 'आकाशात सरळ उंच उंच गेलेली टीकची झाडे होती.' – स्वांदे १११.
**टीक** स्त्री.१. टिकली; नथ, गळसरी, पाटली इ. दागिन्यांवरील शोभेची मोत्यांची चौकडी किंवा हिरकणी अथवा सोन्याचा मणी; कुंकवावर चिकटवलेली काचेची चमकी. २. मोत्यांचा किंवा जडावाचा गळ्यातील एक दागिना. उदा. वज्रटीक : 'टीक भांगार एकवट।' – ज्ञा १७.३४८. ३. ठुशी, वज्रटीक इ. दागिन्यांतील एक एक स्वतंत्र भाग. [हिं. टिका]
**टीक** स्त्री. डोळ्यातील मोतीबिंदू. [सं. तिलक]
**टीक** स्त्री. हातावर काढलेल्या देवी. [सं. तिलक]
**टीकठौळ** न. जडावाचे काम.
**टीकलग** वि. जडावाचे काम केलेले.
**टीका** स्त्री. १. (सास.) एखाद्या कृतीचे गुणदोष विवेचन; आलोचना. २. (कठीण ग्रंथावरील) व्याख्या; स्पष्टीकरण; विवरण; भाष्य; भाषांतराचे किंवा व्याख्येचे केलेले अर्थविवरण; समीक्षा; भाषांतर; निरूपण. पहा : **टिप्पण** २. ३. (ल.) पाल्हाळ; विस्तार; अतिशयोक्ती.४. (ल.)गुणदोषविवेचन; दोषदर्शन; पाठीमागे केलेली निंदा; कुतर्कानें केलेले मनस्वी शब्दपांडित्य. [सं.टीक्, टीका]
**टीका** पु. टिळा; टिकली : 'त्याच्या बोटानं टीका लावला.' – आभा ५८.
**टीकाकार** पु. (सास.) गुणदोषात्मक विवेचन करणारा; समीक्षक.[सं.]
**टीकापाठ** पु. (शिक्षण) अध्यापन पद्धतीतील बारीकसारीक उणिवा प्रशिक्षण घेणाऱ्या नवीन शिक्षकांच्या ध्यानी याव्यात म्हणून पाठासाठी उपस्थित असलेल्या सर्व शिक्षकांकडून साधकबाधक चर्चा करण्यासाठी मुक्त ठेवलेला पाठ.
**टीकाशास्त्र** न.(सास.) कला, साहित्य इत्यादींचे विश्लेषण व मूल्यमापन याविषयी सैद्धांतिक विचार करणारे शास्त्र. [सं.]
**टीकासंग्रहणांक** पु. (ग्रंथ.) 'कोलन' वर्गीकरणातील टीका ग्रंथास दिला जाणारा सांकेतिक अंक.
**टीकांक** पु. (ग्रंथ.) एखाद्या ग्रंथावरील टीकेच्या पुस्तकाचा वर्गांक (वर्गीकरणातील).
**टी–कोझी** स्त्री. चहा गरम ठेवण्यासाठी किटलीवर घालण्याची मऊ कापसाची टोपी : 'केतकरांनी चहाच्या किटलीला गुंडाळलेली 'टी–कोझी' उचलली.' – मीसांपा ११०.
**टी गुण्या, टी स्क्वेअर** (गणित) इंग्रजी टी अक्षराच्या आकाराची लाकडी मोजमाप–पट्टी.
**टीच** स्त्री.१. अंगठा व त्याजवळील बोट यांच्या टोकांतील महत्तम अंतर. २. टिचकी; टिचका; टचका; बोटाने उडवणे. ३. टाप; टचकी; बोटांचा प्रहार. (क्रि. मारणे).
**टीच** स्त्री. लहान मुलाच्या कपाळावरील काजळाची तीट. (क्रि. लावणे). (को.)
**टीचभर** वि. अंगठा व तर्जनी यांच्या टोकांतील कमाल अंतराइतके; (ल.) अगदी छोटा, लहान, एवढासा.
**टीथआरी** स्त्री. (चर्म.) बुटाच्या कडेला नक्षी काढावयाची दात्यांची आरी.
**टीप, टिपेचा सूर** पु. (गाणे) तृतीय सप्तकातील स्वर; तारस्वरवादन प्रकार. या वादनातील स्वर मध्यमाच्या दुपटीचे असतात.(वा.) **टिपेला पोचणे** – शिगेला पोचणे; ताणली जाणे : 'एक्साइटमेंट अगदी टिपेला पोचली आहे सगळ्यांची.' – सुलतान ४५.
**टीप** स्त्री. १. शिस्त; रेखीवपणा : 'बाई चालणं टीपीचं। काय सांगू राजसाचं।' – वलो १०९. (व.) २. जम; मेळ; मिलाफ : 'अस्तुरीका पुरुषांची। ख्याली खुशाली दिसेना। टीप दोघांची बसेना। सूत घरांत जमेना।'– वलो ४४.
**टीप** स्त्री. १. कर बसविण्याकरिता घेतलेली जनावरे, झाडे इ.ची. गणती, मोजणी; मोजदाद. २. (सोनार) दागिन्याची किंमत,आकार इ.चे टिपण. ३. आकडेवार नोंद; यादी; बिल; हिशेब; फेरिस्त; टिपण; स्मरणपत्र; पैशाची हुंडी. [सं. डिप्] (वा.)० **जमणे, बसणे** – बरहुकूम असणे, जुळणे; विरोध न येणे. **टिपेस उतरणे** – टिपणाबरोबर जमणे, असणे.

**टीप** स्त्री. शिवण; शिवण्याची एक पद्धत; विशिष्ट टाका. (क्रि. भरणे, घालणे, मारणे.). ० **घालणे** – (चर्म.) जोड्याचा ढोपराजवळील भाग दोऱ्याने शिवणे.

**टीप** स्त्री. सोडतीतील तिकीट.

**टीप** स्त्री. गंजिफांच्या खेळातील एक संज्ञा. तलफ इत्यादी डाव दुसऱ्याकडून आला असता एका पानाच्या ऐवजी दोन पानांनी घेण्याचा प्रकार.

**टीप** स्त्री. पुस्तकातील मुख्य भागाचे, पृष्ठाच्या खाली केलेले विशेष स्पष्टीकरण; खुलासेवजा माहिती; टिप्पणी; तळटीप; संदर्भवजा माहिती.

**टीप** स्त्री. गाडीचे छप्पर; गाडीमध्ये जिच्यावर बसतात ती गाडीची साटी.

**टीप** न. नेम; नियम.

**टीप** न. अश्रू; थेंबः 'ते दिवस डोळ्यापुढे उभे राहिले म्हणजे टपाटपा टिपे येतील बरे अजून डोळ्यांतून !' – भाबं ५७. [सं. टिप्]

**टीप** न. पिंप; अमली पदार्थ तयार करण्याचे लाकडी पिंप.

**टीपक** न.पु. शाई टिपण्याचा कागद; हा कागद बसवलेले उपकरण.

**टीपकर** पहा : **टिपणीस**

**टीपगाण** न. तारसप्तकातील सूर लावलेले गाणे गाणारा गायक.

**टीपगारी** स्त्री. (शिंपी) शिवणकामात टाके घालण्याचा एक प्रकार. (क्रि. करणे).

**टीपदार** वि. व्यवस्थित वागणूक असणारा.

**टीपदोरा** पु. दुहेरी टाका.

**टीपॉय** पु. चहाचा ट्रे ठेवण्यासाठी केलेले बैठे टेबल. [इं.]

**टीब** स्त्री. यादी; टीप : 'पंचविसा हजाराच्या टिबा दिधल्या त्याची हुंडी करून देणे.' – पेद १५.१८.

**टीर–री** पहा : **टिरी**

**टील** पु. चक्रांग पक्षी. हा पाळीव बदकाएवढा असतो. नर करड्या रंगाचा, त्याचे डोके तपकिरी (चेस्टनट) रंगाचे असते. डोळ्यांपासून मानेच्या मागे चकचकीत हिरव्या रंगाचा पट्टा हे या पक्ष्याचे वैशिष्ट्य होय.

**टीलिल्लो** पु. मुलांचा एक खेळ. [ध्व.]

**टीवकारणे, टिमकारणे** क्रि. वाजवणे; ठोठावणे : 'तवं मढासि कवाडें घातलीं असति : मग उपाधि कवाड ऐसें आंगुळीया करूनि टीवकारिलेः' – लीचपू १८१.

**टींबकारणे** अक्रि. तार छेडणे; वाजू लागणे : 'एकु माहात्मा आणि माहात्मी सरिवीणा घेउनि आली : आणि दांडी टींबकारिलीः' – गोप्रच ४७.

**टुई** स्त्री. १. गोसावी नावाच्या पक्ष्याचा आवाज. २. एकाच तानेचे गायन. (क्रि. लावणे). ३. टुमणे; तगादा; निकड; त्याच त्याच गोष्टीबद्दल सारखे बोलत बसणे. (क्रि. देणे, लावणे.). [ध्व.]

**टुक** स्त्री. लहान तुकडा; थोडासा रतीब; खुराक : 'ढेंप लावित असे टुक यातें।' – किंगगवि २३.
वि. थोडा; अल्प. [क.टूकि]

**टुक** स्त्री. १. इच्छा; अपेक्षा : 'आमची दौलत खाली आणि मसलत तो स्वामीचे टुकेप्रमाणें करून दाखविलीं पाहिजे...' – ऐको ४७३. २. प्रतिष्ठा.

**टुक** स्त्री. शिस्त; रीत; तजवीज; व्यवस्था; निगा; दक्षता: 'नेणें संसाराची टुका।' – तुगा ४५५५.

**टुक** स्त्री. कसोटी : 'जरी न उतरे टुके इतर भक्त भद्रा मुके।' – मोकृष्ण ५७.२७. [क. टूकि = सारांश, कल्पना]

**टुकची** स्त्री. गलुते; कुंची; टोपडेः 'त्यांनी आपापल्या लहान मुलांना रंग रंगीत रेशमी गोंड्याची टुकची घातली.' – तअं १६३.

**टुकटुक–का** क्रिवि. आशेने, उत्सुकतेने, लोभाने पाहणे (दुर्मिळ वस्तूकडे).[क.] (वा.) ० **दाखवणे**– बोटाने वेडावणे; वाकुल्या दाखविणे. ० **माकड करणे** – आपण एखादा पदार्थ खात असताना बोट वाकवून दुसऱ्यास हिणवणे.(लहान मुलांत रूढ.). ० **वाणा बसणे**– फुकट टक लावून बसणे.

**टुकटुक–का** क्रिवि. मिणमिण; अंधुकपणे (दिवा जळणे). [ध्व.]

**टुकटुक–का** क्रिवि. खुटूखुटू; गरिबीने; जेमतेम (उपजीविका करणे); कशीतरी गुजराण करणे. [ध्व.]

**टुकुटक–का** क्रिवि. एकाग्र दृष्टीने किंवा टक लावून पाहणे.

**टुकटुकणे** अक्रि.१. उत्सुकतेने पाहणे; रोखून बघणे. २. विव्हळणे.

**टुकटुकी** स्त्री. अखेरची धुगधुगी.

**टुकटुकी** स्त्री. तजेला; टवटवी; तुकतुकी; पाणीदारपणा.

**टुकटुकीत** वि. ताजा; तजेलदार; टवटवीत (फूल, पान, चेहरा).

**टुकडबापू–बाबू–मोड्या, टुकडा–डी** पहा : **तुकडबापू–बू इ.**

**टुकडा** पु. तुकडा : '...शेवंता रानातून दमून आल्यानं आल्या आल्या भाकरीचा टुकडा खाऊन झोपली होती.' – तअं ८.

**टुकडा** पु. (घर) लाकडाची मोठी तुळई; वासा. (व.)

**टुकणी** स्त्री. (कोष्टी) विणकराच्या फणीच्या दात्यांकरिता, बांबूच्या चोया करण्यासाठी खोबणी पाडलेली फळी.

**टुकणी–णे–नी** स्त्री. (एखादा पदार्थ) मिळण्याच्या इच्छेने तिष्ठत बसण्याची क्रिया. (क्रि. लावणे, लागणे.). (व.)

**टुकणे** अक्रि. १. आशाळभूतपणे पाहणे. २. थकणे. ३. तुटणे.

**टुक(कु)मुक–कू** क्रिवि. पहा : **टुकटुक**

**टुकळा** पु. झुरणी; खंत; नाद; छंद (गैरहजर माणूस किंवा वस्तू यांविषयी).

**टुका(क्का)र** वि. तिरस्करणीय; भिकार; कमी दर्जाची.

**टुकी** वि. आशाळभूत. (व.)

**टुकी(के)ने, टुकेवर** क्रिवि. सर्व गोष्टी योग्यपणे, काळजीने व नियमितपणे (करणे, जेवणे, टोलणे, औषध देणे, घेणे इ.). (अहि.)

**टुकुटुकु** क्रिवि. उत्साहाने; रोखून : 'सारी भोवतीनं उभी राहून टुकुटुकु बघत राहतात.' –ऊन १०४. [ध्व.]

**टुकुरटुकुर** क्रिवि. टकमक (पाहणे). (झाडी)

**टुगलाई–लिन** १. पटवून घेणे. २. फूस लावणे. (अहि.)

**टुचकन–कर–दिनी–दिशी** क्रिवि. मऊ पदार्थांत टोकदार वस्तू टोचताना निघणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन. [ध्व.]

**टुचकु(को)ली** स्त्री. वाकुल्या; थट्टा; चिमटा; डुसकी; टोचणी; डुसणी (एखाद्यास त्रास देण्यासाठी). (क्रि. करणे).

**टुचबाज** वि.१. मन मोहून टाकणारी; छबेली : 'रघूच्या मनातून ती टुचबाज बाई जाईना.' – जांदि ५८. २. भरीव; भक्कम.

**टुटवा** वि. किंचित स्पर्शानेही तुटणारा : 'स्वस्तता पावे ऐसे काही आति सर्वज्ञें म्हणीतलें: बाइः हिरवा टुटवा जीवः' -लीचउ ४५९.

**टुणकणे** अक्रि. उडी मारणे. [क. टणक्कणे]

**टुणकन-कर-दिनी-दिशी, टुणटुणा-टूण** पहा : **टणकन, टणटणा** इ.

**टुणटुणीत** वि. शरीराने अत्यंत सुदृढ.

**टुपणे** सक्रि. १. सुई किंवा इतर टोकदार हत्यार आत खुपसणे, भोसकणे. २. जमिनीत बी खुपसणे, पेरणे. ३. (शिंपी) शिवणे या क्रियापदापुढे योजतात. उदा. शिवणेटुपणे. ४. सुईच्या नेढ्यात दोरा घालणे.
अक्रि. खुपसणे; भोसकणे; टोचणे; बोचणे.

**टुपसा** पु. १. खिळ्याचे डोके. २. डोके, कान झाकले जातील अशा रीतीने डोक्यास बांधलेले वस्त्र. ३. फुगवटी; फुगीरपणा.

**टुपू(बु)कटुपू(बु)क** क्रि. हळूहळू (मारणे, ठोकणे). (झाडी)

**टुप्पा** पु. घोळका (मुलांचा).

**टुभणी, टुमची** स्त्री. चाबूक; पराणी. (झाडी) [फा.]

**टुमका टाकणे** क्रि. आगीत तेल ओतणे; कळ लावणे. (अहि.)

**टुमटा(ठा)म** स्त्री. डामडौल; दिमाख; थाटमाट; टामटूम; भपका; अवडंबर. [ध्व.]

**टुमटु(ट)मीत** वि.१.नगाऱ्यासारखे ताणलेले, गुबगुबीत (पोट इ.). २. मांसल; गलेलठ्ठ; धट्टाकट्टा; ताजातवाना (पशूइ.). ३. (ल.) मालमत्ता असलेला; खाऊनपिऊन सुखी. [ध्व.टुमटुम= नगाऱ्याचा आवाज]

**टुमणी** स्त्री. १. पहा : **टुमणे**. २. आश्रयदात्याची आठवण, स्मरण ठेवणे. (क्रि. लावणे, देणे, करणे.).

**टुमणी** स्त्री. गावच्या महाराला देणगीदाखल दिलेला जमिनीचा लहानसा तुकडा.

**टुमणी** स्त्री. १. चाबूक किंवा पराणी. २. टोचण्यासाठी शेंड्याला खिळा लावलेली काठी.

**टुमणे** न. तगादा; टोचणी; निकड; लकडा; घडीघडी सांगणे.

**टुमणे** अक्रि. फुगणे. (व.)

**टुमदार** वि.१. छोटा पण सुंदर; सुरेख; बैठा आणि डौलदार (बंगला, घर). २. शोभिवंत; रम्य; रेखीव; डौलदार; सुबक; मोहक; छानदार. ३. युक्तीप्रयुक्तीने युक्त.

**टुमदारपणा** पु. डौल; मोहकपणा; सुरेखपणा.

**टुमना, टुमनारी** क्रिवि. १. मध्येच. २. एकदम. (झाडी)

**टुमा** पु. टोमणा; टोचणी : 'त्रिंबकजी भोसले बाबांस टुमा देतात कीं, वचनचल न होऊं द्या.' - पेद ६०८४.

**टुरटुर-री-रु** स्त्री. न. १. (बेडकांचा आवाज) टरांव टरांव डरांव डरांव : 'त्याच्यापुढें टुरु टुरु टरौंटरौं शब्द हे किती करिसी।'- मोकर्ण २७.९. २. भिकाऱ्याचा त्रास, तगादा. (क्रि. करणे, लावणे, मांडणे). ३. (ल.) एकसारखा त्रास देणारा आवाज; त्रासदायक तक्रार; धमकावणी; कुरकुर; किरकिर. [ध्व.]

**टुरटुर** स्त्री. १. थोडा वेळपर्यंत चकित करून सोडण्यासारखे कृत्य. २.गमजा. ३. पहा : **टिरटिर**

**टुरटुरणे** अक्रि. सारखी पिरपिर करणे. [क. टुरुटुरेंने]

**टुरफूस** स्त्री. १. टुरटुर. २. (ल.) खरडपट्टी; हजेरी; कानउघाडणी. एखाद्याशी या शब्दास जोडून वापर करतात.(क्रि. लावणे, मांडणे, करणे.). [ध्व.]

**टुरमा** वि.१. ठेंगणा; ठुसका; खुजट. २. आखूड; गिड्डा (अवयव).

**टुरुटुरु** क्रिवि. टपटप (बोलणे).

**टुलटुल-ला, टुळटुळ-ळा** क्रिवि. रोखून; उत्सुकतेने; टक लावून. (क्रि. पाहणे, बघणे.). [ध्व.]

**टुल्ल-ल्लू** वि. ठेंगणा; खुजट. पहा : **टुरमा**

**टुल्लर** वि. १. ठेंगणा; ठुसका; गिड्डा. २. चावट; चिल्लर : 'बुवा कांहींतरी गंभीर सांगायला लागले कीं बाहेर त्या टुल्लर कार्ट्यांचा हंशाचा कल्लोळ.' - पडघ २२२.

**टुल्ल** पु. (अश्लील) शिश्न.

**टुशी** स्त्री. गव्हातील कोंड्यासह असणारे दाणे. (व.) [सं. तुष]

**टुंग, टुंगर, टुंग(गु)ळ, टुंबर** न.१. टेंगूळ; गाठ (शरीरातील, झाडावरील).२. जमिनीवरील लहान उंचवटा; टेकाड.

**टुंगा** पु. किस्सा : 'ऐकणार असलास तर मी एक टुंगा सुनावतो तो ऐक.' - वावारु १३२.

**टुं टुं** न. घुंगरांचा आवाज.

**टुंबर, टुंबरूक** न. टेंगूळ. पहा : **टंग, टुंगर** इ.

**टूक** स्त्री. १. कळ; गुरुकिल्ली; युक्ती; खुबी; मखखी; फसविण्याची हिकमत; गूढ. (क्रि. साधणे, सापडणे.).२.धोरण; खुबी; हातोटी; कसब; उत्सुकता; कौशल्य; हुशारी; शीघ्रग्रहणशक्ती; कल्पकता; आकलनशक्ती. [सं. तक्ष]

**टूक** स्त्री.१. पहा : ३ **टुक** . २. जरूरीच्या वस्तू; स्वाभाविक गरज; सुस्थितीस आवश्यक परिस्थिती, काल, साधनसामग्री. (वा.)
**० चुकणे** - योग्य वेळी योग्य, हवी ती गोष्ट न होणे. **(एखाद्याची)**
**० सांभाळणे**- एखाद्याला जे हवे ते त्याला हवे असेल तेव्हा देणे.

**टूक** स्त्री. टक; रोखून पाहणे; एकाग्र दृष्टी.

**टूक** स्त्री. हयगय. (क्रि. चुकणे, टळणे, अंतरणे.).

**टूक** स्त्री. औषधाचा टक; मात्रा. (व.)

**टूक** स्त्री. १. सवय. (व.) २. चाळा; खोड; ढंग. (तंजा.)

**टूक** स्त्री. आठवण; मुद्दा.

**टूकलणे** अक्रि. आशा न राहिल्याने खंगणे.

**टूट** स्त्री. तोटा; तूट.
वि. तुटलेले. (झाडी)

**टूम** स्त्री. १. नवीन तऱ्हा; फॅशन; चूष. २. नवीन युक्ती; शक्कल कल्पना; खुबी. (क्रि. काढणे):'...सनातनी पुढाऱ्यांनी बापाच्या नावापुढे आजोबाचे नाव लावण्याची टूम काढली.'- पापू २८. ३. डामडौल; मोठेपणाची ढब; ऐट; शोभा; दिखाऊपणा.४ . मनात भरण्यासारखा गुण, चिन्ह; नवी व सुबक वस्तू; चमत्कारिक वस्तू; नवीन व आश्चर्यकारक कल्पना, शोध. ५. (मानस.) (बहुधा तरुणांमध्ये) एकाएकी उद्भवलेली तात्पुरती किंवा अल्पकालिक परंतु उत्कटतेने अंगिकारलेली वर्तनपद्धती, रीती. [त. मेट्टू]

**टूर्मलिन** न. वेगवेगळ्या रंगात मिळणारे एक प्रकारचे रत्न. [इं.]

**टेक** स्त्री. न. १. बाणा : 'परशुरामभाऊंनीं आजपर्यंत शिपाईगिरीची टेक राखिली.' – ऐको ४७३. (क्रि. राखणे). २. ऐट; गुर्मी; ताठा : 'पर असली टेक चालायची न्हाई माज्याजवळ.' –पेरणी १०७. (वा.) **टेकीस टेक उतरणे** – तोलास तोल देणे; बरोबरी करणे; स्पर्धा लावणे.

**टेक** पु.न. लहान डोंगर; टेकाड; उंचवटा : 'तेथिची उंचखालें टेकें : मज वेंघवेति ना :' – लीचउ ७९. [सं. स्थिग]

**टेक** न. पेव; समूह; पुंज : 'तेथ सिद्ध येती गा आलोटें। सुरवरांचें टेक फुटे।' – १९.२३३. [सं. स्थिग]

**टेक** स्त्री. थकवा; थकावट; पुढे चालण्याची अशक्यता; दुर्बलता. (वा.) **टेकीला आणणे**–हैराण, बेजार करणे; असहाय करणे: 'मोठ्यामोठ्यांना त्यांनी टेकीला आणलं आहे.'– दुर्दम्य १००.

**टेक** स्त्री. १. स्वाभाविक व नेहमीच्या किंवा सवयीच्या गरजा; पक्की सवय; परिपाठ; हट्ट. (क्रि. राखणे, सांभाळणे, साधणे, चालविणे, उतरणे.) २. रंद्याचे पाते. (झाडी)

**टेकड–डे–डी** न.स्त्री. लहान डोंगर; टेकाड; उंचवटा. [त. तिट्टि]

**टेकण–णी–णे** स्त्री.न. टेकू; टेका; वटकन; आधारभूत पदार्थ : 'पितळीच्या पुढच्या अंगाला टेकण लावले.' – व्यंमाक १२.

**टेकणे** सक्रि. १. आधाराने ठेवणे, राहणे. २. (ल.) एखाद्या धंद्यावर, कामावर आशेने अवलंबून राहणे; भरवशावर असणे; खटपट न करता विसंबून राहणे : 'ज्या त्या गोष्टींत सरकारावर जी टेंकण्याची त्यांस सवय लागली...' –नि ४३१.
अक्रि. १. आधार घेणे; अंग टाकणे; ओटंगणे; रेलणे; बेतात असणे. २. (ल.) अवलंबून राहणे; प्रवृत्त होणे : 'आथिल्या भ्रतारें काम नव्हे पुरा। म्हणूनि व्यभिचारा टेकलिये।'– तुगा ३०२. ३. स्पर्श करणे; जवळ जाणे; लागणे : 'जैसी तीरी नाव न ढळे। टेंकली, सांती।।'– ज्ञा ७.४. [सं.टिक्, तिक्; क. टेंके]

**टेकणे, टेकावणे** अक्रि. (एखादी गोष्ट) पूर्ण होण्याच्या बेतात येणे; अगदी जवळ जवळ येणे. उदा. मरावयास टेकणे.

**टेकदार** पहा : **टेकीचा**

**टेक(च)बाज** वि. गर्विष्ठ. (व.)

**टेकर** पु. टेकाड; उंचवटा. (झाडी)

**टेकरडुंबर** वि. उंचसखल. (झाडी)

**टेकलेली** वि. दिवस भरलेली; बाळंतपण जवळ आलेली : 'अगदी टेकलेली गर्भारशी ती.' – पलकोघे २७६.

**टेकवणे** सक्रि. १. आधाराने ठेवणे, राहणे. २. लावणे; स्पर्श करणे.

**टेक(का)वा, टेका** पु. १. पहा : **टेकण** (क्रि. देणे). २. धिरावा; पाठबळ; आधार; दुजोरा; पुष्टी. (क्रि. देणे).

**टेकस** पु. तारेचा आखूड खिळा. [इं.]

**टेका** पु. १. आधार; टेकू : 'चढता यावे म्हणून टेके देई.'– डोह ११. २. दुजोरा; अनुमोदन. (व.) [क.]

**टेका(कू)ड** न. १. पहा : **टेकड** . २. (ल.) ढीग; रास (मोडकी इमारत, माती, चुना, कचरा इ.ची). ३. (ल.) गड्डा; वैपुल्य.

**टेकाडी–टी, टेका(को)ळी** स्त्री.पहा : **टेकड** : 'तयांचें घर तें टेंकाळीएसि :' – गोप्रच १८.

**टेकावणे** क्रि. होण्याच्या किंवा करण्याच्या बेतात असणे.

**टेकी** वि. हट्टी; दुराग्रही. (व.)

**टेकी, टेकुली** स्त्री. पहा : **टेकड** : 'तुरिये ऐसी टेंकुली।' – गीतार्णव १.१३७४; 'बोळगे उतरे टेकिया।' – क्रिपु २.१४.४७.

**टेकीचा** वि. आदरातिथ्यात तत्पर, उदार, स्थिर; शेवटपर्यंत टिकाऊ.

**टेकू** पु.१. ज्याच्यावर तरफ टेकतात तो आधार किंवा स्थिर बिंदू. २. (ल.) पहा : **टेका** २. ३. अनुमती; मंजुरी. [क.;त. मुट्ट]

**टेकूना** क्रि.१. विसावणे.२. दार बंद करणे.३. आधाराने बसणे.(झाडी)

**टेकूनी** स्त्री. १. टेकू. २. आधाराची काठी. (झाडी) [हिं.]

**टेगा** पु. गोंधळ; गडबड; दंगल : 'हें न झालें तर स्वामी मोगलाच्या शहास गुंतले तो चार रोज टेगा माजिवतील धामधूम करितील.' – पेद ६.२०७.

**टेच** स्त्री. मिजास : 'एवढी टेच आहे तर...' – पुत्र ५०.

**टेट** वि. ताठ. [इं.]

**टेटर** स्त्री. वि. १. मुजोर; हेकेखोर; उद्धट. २. ताठर; टणक.

**टेटावणे** अक्रि. टेटे करणे (पक्षी); ट्यांहा ट्यांहा करणे (लहान मूल). [ध्व.]

**टेटाविणे** सक्रि. १. केळीच्या पानाचे न कापता हाताने फाडून तुकडे करणे. (को.)२. (ल.) झिडकारणे; थट्टा करणे. [टेटे ध्व.]

**टेटू** पु. एक औषधी झाड.

**टेटे** न. १. साळुंखी, टिटवी इत्यादी पक्ष्यांचे ओरडणे.२. लहान मुलांचे रडणे. (क्रि. करणे, लावणे.). ३. बोलावयास प्रारंभ करताना लहान मुलाने केलेला पहिला उच्चार. (क्रि. करणे).
क्रिवि. वरीलप्रकारे आवाज करून. [ध्व.]

**टेट्रोड** (विअ.) चार विद्युतअग्रे (इलेक्ट्रोड) असलेली इलेक्ट्रॉन नलिका. एका काचेच्या निर्वात नळीत एक धनाग्र, एक ऋणाग्र, एक विद्युतनियंत्रक आणि एक सहायक अग्र असतात.

**टेणपणे** सक्रि. काठीने, टेणप्याने मारणे, झोडपणे. [ध्व.]

**टेणपा** पु. मारण्याच्या उपयोगाची जाड काठी; सोटा; दांडके.

**टेणा–णे–ण्या** पु.१. दिव्याची जाड वात. २. लठ्ठ व धष्टपुष्ट प्राणी, कीटक (ढेकूण,ऊ इ.) : 'तिच्या केसांत उवांचे टेणंच्या –टेणं धावत होतं.' – हातभट्टी ३६.

**टेणे** न. उडी; उशी. (क्रि. मारणे, घेणे.).

**टेन** पु. टोमणा. (व.)

**टेनना** क्रि. वाद घालणे. (झाडी)

**टेनप्या** वि. धश्चोट (माणूस). (व.)

**टेना** पु. १. उदाहरण. २. अन्योक्ती. (झाडी)

**टेनिस** न. आखीव मैदानात मध्ये जाळे लावून चेंडू व विणलेल्या रॅकेटस्नी दोन किंवा चार खेळाडूंनी खेळावयाचा मैदानी खेळ. [इं.]

**टेप** पु.न. १. टेक; उंचवटा; ओटा: 'ती दोघं एक टेप चढून गेली.'– जैरेजै १३१.२. डिखळ; ढेकूळ; ढेप. (राजा.) [सं. स्तिप्, स्थिग]

**टेप** स्त्री.न. १. टक्कर; दुशी.(क्रि. देणे) : 'बैलांशी आणि टोणग्याशी देखील

टेपा द्यायला सोनी गाय तयार असे.' – तचां १२३. २. टिकावाने मारलेला तडाखा. (क्रि. मारणे) (राजा.)

**टेप** स्त्री. (शिंपी) कपड्याचे माप घेण्याचे साधन; इंचपट्टी; मापनफीत; मोजपट्टी (फितीची किंवा नाडीची). [इं.]

**टेप** स्त्री. ध्वनिमुद्रण, चित्रण करण्यासाठी वापरण्यात येणारी एक विशिष्ट तऱ्हेची पट्टी. हिच्यावर भाषण, गाणे किंवा कोणताही आवाज चित्रित वा मुद्रित करता येतो; ध्वनिचित्रफीत. [इं.] (वा.) **० लावणे, चालू करणे** – तीच ती गोष्ट पुनःपुन्हा सांगणे; पुनरुक्ती करणे.

**टेपटाप** पु.अव. टेकड्या; उंचवटे इ. (को.) [टेप द्वि.]

**टेपण** पहा : **टेपर**

**टेपण–णे** न. खांब अपुरा पडल्यास त्याच्या वर किंवा खाली भरतीसाठी बसवावयाचा लाकडाचा तुकडा. (राजा.) [सं.टिप]

**टेपर–रे, टेपरण** न. पु. १. दोष; बोल; ठपका; उपरोधिक भाषण; अप्रत्यक्ष टीका; टापरण (अपराध, कृपा, उपकार यांच्याविषयी). (क्रि. मारणे, देणे, ठेवणे, येणे.). २.निमित्त; सबब; कारण; जबाबदारी : 'उद्या नाही व्यवस्थित नांदली तर नाखरीणबाई आपल्यावर टेपर ठेवतील.'ह्र लव्हाळी १७६.

**टेपर–रा** पु.न. उंचवटा; टेकाड.

**टेपर** न. (शाकारणी) खाचेत कौल नीट बसविण्यासाठी खाली टेकण द्यावयाचा कौलाचा तुकडा.

**टेपरणे** सक्रि. १. टापरणे; ढकलणे; रेटणे; कोलणे; आदळणे; आपटणे. २. (ल.) (निंदार्थी, थट्टेने) गर्भार होणे. [सं. तृफ्]

**टेपरणे** न. मोगरी; बळकट दांडके; सोटा.

**टेपरपना** पु. हट्ट; उद्धटपणा. (झाडी)

**टेपरा** पु. दोष; बोल; ठपका; टोमणा. (क्रि. मारणे).

**टेपलणे** सक्रि. १. फटकारणे; एखाद्याच्या अंगावर धावून जाऊन त्यास ठोकणे. २. ढकलणे; रेटणे : 'वारे त्या ढगांना चेंडूप्रमाणे टेपरू लागले.' – फकिरा १६. ३. टोमणा मारणे; उपरोधिक भाषण करणे.
अक्रि. १. एकमेकांवर आपटणे, आदळणे; धडक मारणे; धडकणे. २. (अश्लील) गरोदर होणे. (व.) पहा : **टेपरणे**

**टेपले** न. (तिरस्कारार्थी) गरोदरपणा; मोठे पोट. (व.)

**टेपशी** स्त्री. १. टापशी. २. टक्कर.

**टेपाड** न. टेकाड; लहान टेकडी : 'त्या दरीतल्या टेपाडावर चार घरे होती.' – गोप्र ८.

**टेप्र** वि. तेरा ही संख्या. (नंदभाषा)

**टेबरडं** न. बागेतील बारी. (व.)

**टेबल** न. १. मेज. २. कोष्टक; तक्ता; सारणी. [इं.]

**टेबळी** स्त्री. १. फणसाच्या सालीवरील काटा. २. वाकुल्या दाखवताना किंवा हसताना बाहेर दिसणारे दात.

**टेमली** स्त्री. (नाविक) एक लोखंडी पत्र्याचे कडे. यास दोरी घट्ट बसण्यासाठी बाहेरील अंगास खाच असते.

**टेमसने** क्रि. मारणे; पिटणे. (व.)

**टेमान** स्त्री. रास; ढीग.

**टेमूक** न. सोटा.

**टेर** स्त्री. अति तृप्ती; वीट; मिठी; शिसारी (अन्न इत्यादीची).

**टेर** स्त्री. तुकडा. (व.)

**टेर** वि. तर्र; झिंगलेला; दारू पिऊन धुंद झालेला : 'मग काय गडी टेर झाला ना ! मग कसातरी उठला आणि लटपटला.' – हातभट्टी ७६.

**टेर** स्त्री. हट्ट. (झाडी)

**टेर, टेहर** पु. विष्ठेचा पोहो. (क्रि. घालणे, पडणे.)

**टेर, टेरुक** न. कांडे; तुकडा. (व.)

**टेरकी, टेरू** स्त्री.न. १. नांगराच्या जोखडाला मधोमध जेथे इसाड बांधावयाचे तेथे मारावयाची एक बोटभर खुंटी. २. नांगर खुंटामध्ये इसाड बसविल्यावर ते निघू नये म्हणून बसविलेली खुंटी.

**टेरबाज** वि. हट्टी. (झाडी) [हिं.]

**टेरा–कोटा** (भूशा.) भाजलेल्या मातीच्या वस्तू.

**टेरिकॉट** न. सूत व कृत्रिम धागा यांच्या मिश्रणाचे कापड.

**टेरिलीन** न. कृत्रिम धाग्यांचे कापड : '....भंगीसुद्धा टेरिलीन वापरू लागला.' – एस्पृडा १००. [इं.]

**टेरेस** स्त्री. गच्ची. [इं.]

**टेलटिकु(को)री, टेहलटिकोरी** स्त्री.१. अळंटळं; टाळाटाळ; उगाच भटकणे. (खा.) २. उनाडक्या (क्रि. करणे) : 'गावातल्या दहा पोरांसारखा तो उगीच कुठे टेलटिकोऱ्या करीत फिरत नाही.' –व्यंमाक २६.

**टेलबुल करने** सर्वांकडून बोलणे. (व.)

**टेलि(ले)प्रिंटर** पु. दूरमुद्रक; दूर अंतरावरून टंकलिखित मजकूर पाठविणारे यंत्र. [इं.]

**टेलिफोन** पु. दूरध्वनी; ध्वनिवाहक तारेतून दूर अंतरावरील व्यक्तीशी बोलण्याचे साधन, यंत्र; दूरभाष. [इं.]

**टेलिव्हिजन** न. दूरदर्शन; दूरचित्रवाणी : '...टेलिव्हिजन शोधून काढला जॉन बेअड या स्कॉटिश शास्त्रज्ञाने.' – टेअं १.

**टेल्लू** पहा : **टिल्लू**

**टेव** पु. मातीचा थर.

**टेव** पु. १.वाईट सवय; कुलक्षण. (क्रि. पडणे). २. नखरा; नट्टापट्टा; खोड; हौस.

**टेव** पु. ठेवण; आकृती; ढब; डौल : 'मस्तकीची दिसे केवळ टेव।' – स्वादि ९.५.६४.

**टेव** तेवणे; तेज.

**टेव** पु. रीत : 'नवल सांगती ते टेव। युक्ति चातुर्य वैभव।' – एभा २२.७३५.

**टेव–वे, टेवरेव** पु. अव. नखरा; रंगढंग; युक्त्या; लकबी; खुब्या; मोहक हावभाव; छानछोकी : 'तेथ लावण्याची टेव। अर्थशोभा।।' – ज्ञा १.४.

**टेवखोर** वि. नखरेबाज; अक्कडबाज; ऐटबाज.

**टेवण** न. ठरावीक वेळ; योग्य प्रसंग. पहा : २ **टिपण** २

**टेवर** न. लाकडी तुकडा.

**टेवरड** स्त्री. बागेतील बाऱ्या (पाण्याचे लहान पाट) फोडण्याची लाकडी कुदळ. (व.)

**टेवा** पु. १. जमिनीत किंवा भिंतीत पाडलेले लहान भोक; बीळ; जमिनीतील

खळगा; खोलगटपणा. (राजा.) २. क्षताचे शोधन.

**टेवा** पु. ढब; डौल.

**टेस** स्त्री. १. ताठा; मिजास; गर्व. (व.) २. ऐट; दिमाख; रुबाब; डौल; नखरा : 'सदान कदा टेसात वावरणारा मर्द....मळकट कपडे घालून आला होता...' – चक्र ९८. ३. राग. (वा.) ० **होणे** – झिंगणे; टेर होणे : 'पुत्राला पोचवून आल्यावर चिक्कार पिऊन टेस झाले...' – चक्र ९९.

**टेसदार** वि. चवदार : 'कोवळ्या चिंचा नि आंवळे यांचा... ठेचा असा टेसदार होतो कीं...' – सोबत १९. [इं. टेस्ट + दार प्रत्यय]

**टेसी** वि. १. हट्टी. २. गर्विष्ठ. ३. रागीट.

**टेहणी–र** स्त्री. हेटाळणी; अनास्था; टवाळी; हसे; अपमान; विटंबना : 'सासुरां होईल टेहणी।' – एरुस्व ८.५२.

**टेहणे** सक्रि. राखणे; अडकविणे. [सं.स्तिह्]

**टेह(हे)लणे** सक्रि. चालविणे; कदमावर चालविणे (घोडा इत्यादी).

**टेहलीटिकोरी** स्त्री. १. उनाडकी.२. हांजीहांजी. ३. निरोपानिरोपी.

**टेह(हे)ले** अक्रि. १. टेहळणी करणे; पहारा करणे; चोरीसाठी गुप्तपणे न्याहाळून ठेवणे. २.खेपा घालणे. [हिं. टेहलना]

**टेहळक** वि. टेहळणी करणारा : 'पहिल्या महायुद्धातील हवाई युद्धातून लढाऊ, टेहळक आणि बॉमर असे विमानांचे तीन वर्ग आपोआपच तयार झाले.'– युद्धशास्त्र २०१.

**टेहळटिकोरी** स्त्री.१. पहा : **टेहळणी**. २. स्वैर गमन; उनाडकी. ३. आर्जव; हांजीहांजी. ४. (रागाने त्रासून) निरोपानिरोपी.

**टेहळणी, टेहळी–णी–ली** स्त्री. दुरून केलेली बारकाईची पाहणी, परीक्षा; बारीक दृष्टीने पहारा करणे; दुरून एखाद्याच्या हालचालीवर नजर ठेवणे; गुप्त पोलिसाची नजर; पहारा; पाळत; गस्त; हेरगिरी.

**टेहळणे** अक्रि. सूक्ष्म दृष्टीने पाहणे; चौकशीच्या नजरेने पाहणे; दुरून बारकाईने पाहणे किंवा तपासणे; पहारा करणे; गुप्तपणे संशयित माणसावर, घडणाऱ्या घटनेवर नजर ठेवणे. [हिं. टेहलना]

**टेहळ्या** पु. पहारेकरी; हेर; बातमीदार; गुप्तपणे पाहणी करणारा माणूस. वि. टेहळणी करणारा; उत्सुकतेने, बारकाईने, कसोशीने पाहणारा.

**टेहेलटिकोरी, टेहेळणे–ता, टेहेळणी, टेहेळी–ळ्या इ. टेहळमध्ये पहा.**

**टेळको** पहा : **टेहेळ्या**

**टेळणी, टेळणे, टेळी, टेळ्या, टेळ्यो** पहा : **टेहळणी** इ.: 'मागुता जातो पाहात पाहात। दुरी होऊनि असे टेळित।' – क्रिपु ४६.६९.

**टेंग(गू)ळ, टेंग(ळू)ळ, टेकाळ** न. आघातामुळे डोक्यास येणारी गाठ, उटंगळ. पहा : **टुंग, टुंगर**

**टेंगूळ** न. गाठ : 'काठीचे फनगाडे, कोंबरे व टेंगळे विळ्यानं काढत होतो.' – तअं ६२.

**टेंगूळ** न. मद्रासी चकलीचा एक प्रकार. (तंजा.)

**टेंगूळ** न. डोके किंवा कपाळ यांवर मार लागल्यामुळे उठलेला फुगवटा.

**टेंटू** न. एक औषधी झाड : 'लहान बेलमूळ, नखेलाचे मूळ, टेंटूमूळ, शिवणमूळ व पाडळमूळ या पांचांचा काढा करून...' – फचि १५४.

**टेंडर** न. एखादे काम विशिष्ट वेळात व किमान मूल्यात करून देण्यासंबंधीचा देकार; निविदा. [इं.]

**टेंप टाकने** क्रि. विचका करणे. (व.)

**टेंपरवारी** वि. हंगामी : 'ऐनवेळीं म्हणून गोविंदची टेंपरवारी म्हणून नेमणूक झाली.' – कोसला १९१. [इं. टेम्परारी]

**टेंपवना** क्रि. मारणे.

**टेंपा** पु. १. ठोकळा. २. ठपका; दूषण. (झाडी)

**टेंपो** पु. उत्साहवर्धक वातावरण : 'त्यामुळं टेंपो कायम राहिला होता.' – कलंदर २३७. [इं.]

**टेंपो** पु. मालवाहतूक करणारे ट्रकपेक्षा लहान वाहन. [इं.]

**टेंब, टेंभ–भा** पु.स्त्री.लहान टेकडी; उंचवटा; टेकाड. (को. राजा.)

**टेंबर** न. एक खाद्यपदार्थ : 'खारीक-खोबरे, साखर, बदाम, वेलदोडे अशा पाच वस्तूंचे सारण तयार करून ते पांच मोदकांत भरायचे याला टेंबर म्हणतात.' – गेलेदि ७०.

**टेंब(भ)रू, टेंब(भ)रे** न. टेंबुरणीचे फळ.

**टेंबली** स्त्री. (नाविक) लोखंडी गोल चकती, चाक.(हेट.) पहा : **टेमली**

**टेंबस** न.छोटी टेकडी.

**टेंबा** पु. झाडाचे, डोंगराचे शिखर, अग्र, टोक, शेंडा, शेवट, टोक : 'घाटी चढून तो टेंबावर आला.' – तोरण १६५. (को.)

**टेंबा–भा** पु. १. काठीला वाळलेली पाने किंवा चिंध्या वगैरे गुंडाळून केलेली मशाल; पलिता; दिवटी : 'मग कुंडलिनियेचा टेंभा।' – ज्ञा १२.५१. २. (गोंधळातील) दिवटी; दिवा. ३. बिनकाचेची व खाली लाकूड असलेली टिनची रॉकेल तेलाची मोठी चिमणी, मोठा काकडा. (माण.) ४. उंचवटा. ५. (ल.) डौल; ऐट; गर्व. [सं. स्तंभ, दम्भ](वा.) ० **उभा राहणे** – जोरा सुरू होणे; नारा नाचू लागणे. ० **चालविणे–** दुसऱ्यावर आपले वर्चस्व ठेवणे; वरचष्मा करणे; वरचढ होणे; दिमाख दाखविणे. ० **पाजळणे** – १. दिवा लावणे. २. (कुत्सितार्थी) एखाद्या अप्रसिद्ध मनुष्याने एखाद्या कृत्याने किंवा श्रीमंतीने एकाएकी पुढे येणे; प्रकाश पाडणे; पराक्रम करून दाखविणे; डौल मिरविणे.

**टेंबा–भा** पु.१. झाडाचा डांभा; खुंट. २.(ल.)आधार; आश्रय. ३. खांब; स्तंभ.

**टेंबी** स्त्री. १. टेकडीचे शिखर; वरचे टोक. २. नारळाची शेंडी. (को.)

**टेंबुक** न. टेकाड : 'पलीकडली खलाटी आणि हे टेंबुक जोडलेलं होतं.' – रथचक्र १०४.

**टेंबु(भु)रणी** स्त्री. एका जातीचे झाड.

**टेंबु(भु)रणी** स्त्री. एक प्रकारचा रुपया.

**टेंबूक–स** न. टेंगूळ; उंचवटा; गाठ (शरीर, झाड, जमीन यांवरील); उटंगळ; धक्का : 'तूं म्हणशील कीं माझ्या पाठीवर टेंबूक आहे म्हणून.'– निप १०.

**टेंबे** पु. अव. लाकडाचा सोटा : 'जैसा तो काष्ठाचे टेंबे घेऊनियां। चालिला गोलियावरि झुझावेया।' – क्रिपु २४.१०९.

**टेंभलणे** अक्रि. ओरडणे; बोंबलणे; रडणे. (व.) [ध्व.]

**टेंभा** पु. पुरणाच्या पोळीचा कुसकरा व तूप यांचा काला. (व.)

**टेंभी** स्त्री. टेकडी : 'टेंभीवर मुर्चेबंदी करून...' – पेद ३.११७.

**टेंभेकरी, टेंभ्या** पु. मशालजी.

**टॅक्सी** स्त्री. भाडोत्री मोटारगाडी. [इं.]
**टॅग** स्त्री. टोचदोरी. [इं.]
**टॅपटॅप** वि. घाबरा; घाबरट. (गो.)
**टॅटू** पहा : **गोंदण**
**टॅंक** पु. रणगाडा. [इं.]
**टॅंकर** पु. द्रवपदार्थांची ने-आण करण्याचे टाकी बसवलेले ट्रकसारखे वाहन. [इं.]
**टो** पहा : **टोव**
**टोई** स्त्री. टोळी.
**टोक** स्त्री. चोच.
**टोक** न. १. शस्त्र; अवजार; हत्यार; लेखणी वगैरेचे अणकुचीदार अग्र; शेवट. यावरून जमीन, गाव, खेडे, इमारत यांचा शेवटचा भाग किंवा जागा, प्रदेश. २. मोड; अंकुर. [सं. त्रौक्]
**टोक** स्त्री. दृष्टी; नजर. (क्रि. लागणे, काढणे.) (व.)
**टोक** स्त्री. दृष्ट. (झाडी) [हिं.]
**टोकण** न. टोक; अग्र; शेवट. (राजा.)
**टोकण** स्त्री. दाणे टोकून पेरणी करण्याची पद्धत.
**टोकणणे** सक्रि. भुईमूग इ.चा एकेक दाणा जमिनीत छिद्र करून पुरणे : 'त्या दिवशी दिवसभर भुईमूग टोकणला.' - भेटीगाठी ११.
**टोकणधार** स्त्री. वाचाळ स्त्री; बोलभांड स्त्री; टणटण करणारी स्त्री. (व.)
**टोकणा** पु. लग्नात मुलीला जशी करवली तसा नवऱ्या मुलाला टोकणा; करवला; वराचा निकटचा मित्र, आप्त; पाणजावई; जावयाचा भाऊ : 'टोकणा म्हणून मिरवायचं आहे का त्याला?' -एल्गार ५१.
**टोकणे** सक्रि.१.हटकणे; प्रश्न विचारणे; रोखणे; पुढे जाऊ न देणे (पहारेकऱ्याने). २. आव्हान देणे; पुढे सरसावणे; जागे करणे. [हिं. टोकना;सं. त्रौक्]
**टोकणे** अक्रि. १. एखाद्याकडे उत्सुकतेने पाहणे; टुकणे; टक लावणे : 'चाटावया स्त्रीअधरामृतासी। अहिर्निशी टोकत।' - भाराबाल ९.६३. २. टोकावणे; डोकावणे; डोकावून पाहणे; निघू पाहणे.
**टोकणे** अक्रि. दोष, ठपका देणे; टोचून बोलणे. (व.)
**टोकना-नी** स्त्री.पु. टोपले. [हिं.]
**टोकना** क्रि. १. अडविणे. २. विचारणा करणे. ३. दोष देणे. (झाडी) [सं.]
**टोकयंत्र** न. पेन्सिलचे शिसे अणुकुचीदार करण्यासाठी वापरायचे साधन.
**टोकर** पु. १. चामड्याची तेलाची पाटीसारखी लहान बुधली (बुधला उभा चिरला असता त्याचा एक भाग); चामड्याने मढविलेली डोणी (ही झाडाचे खोड पोखरून करतात.) : 'कोरीव लाकडाचा टोकर रेतीत गडलेला सापडला.'- मंजुघोषा ११०. २. टोकरी; मोठी पाटी.
**टोकर** पु. लांब व जाड बांबू.
**टोकर** पु. १. नारळाची करवंटी; कवच; टरफल; फोल. २. टिनपाट.(व.)
**टोकर** पु. सत्यानाश. (वा.) ० **करणे**- पैशाची उधळपट्टी, नासाडी करणे.
**टोकरणी** स्त्री. (स्था.) खरवडण्याचे दाताळे.
**टोकरणे** सक्रि.१. कुरतडणे; उकरणे; कोरणे. २. (कान, दात इ.तील ) मळ काढणे. [सं. त्रौक्]

**टोकरा** पु. होडी; एक प्रकारची नाव; बांबूच्या टोपलीसारखे केलेले नदी उतरण्याचे साधन : 'व्यंकटराव नावा टोकरे जमा करून जलदीने नदी उतरला.' - वमो.
**टोकरी** स्त्री. १. करंडी; टोपली; डाळी; दुरडी; शिपतर; हारा. २. परडी.
**टोकरी-वी** स्त्री. चामड्याची, चामड्याने मढविलेली लहान गोल पाटी.
**टोकरी-वी** स्त्री. उनाड पशूच्या गळ्यातील बांबूची घाट; गळ्यातील लोढणे. (राजा. कु.)
**टोकरी** स्त्री.१. लांबट डोके (साप, पाल किंवा काही पक्ष्यांचे). २. चोच. (को.) ३. जिभेचा शेंडा (साप, पाल इत्यादींचा).
**टोकरी** स्त्री. ॲल्युमिनियमची वाटी; खोलगट भांडे.
**टोक(का)री कागद** जाड विलायती कागद (हा कागद टकारी बंदराहून मुंबईस येत असे अशी पूर्वी समजूत होती); जाड पोर्तुगीज कागद.
**टोकरेहशील** नावेवरचा कर.
**टोकऱ्या** वि. बेफाम; बेकार; रिकामटेकडा.
**टोकवणे** अक्रि. टुकटुक करणे : 'टोंकवाल बाळा आणिकहि।' - तुगा २३.
**टोकळा** पु. ध्यास; झुरणी; छंद; खंती. (क्रि. धरणे, घेणे, करणे, लागणे.).
**टोकळा** पु. ठरावीक पैसे देऊन घेतलेल्या रोजच्या अन्नाचे प्रमाण; तशी पद्धत; ठरलेले वेतन (धान्याच्या रूपाने). (क्रि. लावणे, चालविणे, तोडणे, लुटणे.).
**टोकळा** पु. टकटक असा गाडीवानाकडून तोंडाने काढला जाणारा आवाज. (क्रि. वाजणे, वाजविणे.).
**टोकळा** पु. भाताची एक जात.
**टोका** पु. धान्यातील एक किडा; पोर किडा.
**टोका** पु. (थट्टेने) मोठा व ओबडधोबड द्रोण.
**टोका** पु. माप; ताजवा.
**टोकावणी** स्त्री. डोकावणी; डोके पुढे करून पाहणे.
**टोकावणे** अक्रि. १. एखादी वस्तू बघण्यासाठी डोके पुढे करून पाहणे; (आत) डोकावणे. २. दुसऱ्याच्या कारभाराचे किंवा हालचालीचे अवलोकन करणे.
**टोकावली** स्त्री. मुलांच्या खेळातील एक विनोदी संज्ञा; टुकटुक माकड.
**टोकी** स्त्री. एक प्रकारची मासळी. (गो.)
**टोगळ** वि. हट्टी; बंडखोर : 'टोगळ लेकरू : अव्हेरी जननी : तैसे चक्रपाणी : त्यजु नको।।' - अभंगगा.
**टोगा** पु. पायघोळ वस्त्र : 'त्याने आपला टोगा चढविला.' - वज्राघात ८६.
**टोच** स्त्री. चोच.
न. टोचून पाडलेले क्षत; बोच.
**टोचणी** स्त्री. १. वेध; टोचण्याची क्रिया; सूक्ष्म अग्राचा तीव्र आघात. २. जाचणी; टुमणी. ३. भोके पाडावयाचा टोचा; काडीचे तीक्ष्ण टोक.
**टोंचणी** स्त्री. अनुताप; अनुचित, अप्रिय गोष्ट घडल्याबद्दल नंतर वाटणारी बोचणी; खेद; रुखरुख. (वा.) **(मनाला) ० लागणे** - दुःख होणे; बोचणे : 'आपणांविषयी नरसिंगरावाच्या मनाला किती टोचणी लागली आहे....'- विग्र ५१.
**टोचणे** उक्रि. १. अणुकुचीदार शस्त्राने किंवा वस्तूने अगदी बारीक छिद्र पाडणे; बोचणे; भोक पाडणे; वेधणे; क्षत करणे. २. (ल.) मनास

लागेल असे बोलणे; गांजणे; मर्मभेद करणे; खोचून बोलणे. ३. फळ, जखम इत्यादींवर ओरखडणे, खरवडणे. ४. आश्रयदात्याची वगैरे आठवण करून देणे. [सं. तुज्; क. तिवचु]

**टोचरे** वि. टोचणारे; दुःख देणारे : '...काहीतरी टोचरे बोलून तू माझे स्वागत केलेस.' - तचां १.

**टोचळणे** सक्रि. लहान छिद्र पडेल असे वेधणे; हळूच टोचणे.

**टोचं** न. बियाण्यांचा उगवलेला पुंजका : '...कोथमिरीचं टोचं, समदंच माळवं सोवळं.'- खळाळ २.

**टोचा** पु. १. थोडेसे टोचल्याने किंवा दगडातून टवका काढल्याने पडलेले भोक; लहान खाच; दगडाचा काढलेला टवका, कपरी. २. टोचल्याची खूण. ३. भोक पाडावयाची टोचणी किंवा टोचण्याचे हत्यार : 'गूळ फोडण्याचा टोचा कडीत घातला.'- बाविबु ३५३. ४. चर्मकारांचे एक हत्यार.

**टोची** पहा : **टोचा** १,२

**टोटके** न. १. लाकडाचा ओंडका; ठोकळा. २. सोटा; दांडके.

**टोटरा** पु. तोठरा; लाळेच्या अभावाने होणारी अवस्था; घशाचा कोरडेपणा. (क्रि. बसणे).

**टोड** स्त्री. पु. (जीव.) खडबडीत अंग असलेला, पुनरुत्पादन कालाव्यतिरिक्त जास्त काळ जमिनीवर राहणारा बेडूक. [इं.]

**टोणक(प)णे, टोणकाविणे** सक्रि. दांडक्याने मारणे, झोडपणे, सडकून काढणे.

**टोणका-के, टोणकूळ** पु.न. दांडके; टेणपा; लठ्ठ सोटा; ओंडका; ठोकळा : 'लाकडाची टोणकी आणून दारात टाकायची.' ह्न जैरेजै ८२. [क. टोण्णि]

**टोणगट** न. (तिरस्कारार्थी) टोणगा.

**टोण(न)गा** पु.१. रेडा; हेला. २. खुळगा. [क. तोणग]

**टोणगी** स्त्री. १. म्हैस; रेडी. २. (ल.) मोठी व आडदांड मुलगी; धांगडधिंगा घालणारी मुलगी.

**टोणप** न. कवच.

**टोणपनाथ, टोणा-ण्या, टोणेश्वर, टोणाऱ्या, टोणपा** पु. अडाणी; अज्ञ;मूर्ख, बथ्थड, आडदांड मनुष्य : 'टोणपा नव्हे गुणग्राहिक... येक चि म्हणती।।' - दास १७.१०.१६. [क.]

**टोणपा-पे, टोणा** पु. न. ओंडा; दांडके; काठी. [क. टोण्णि, टोण्णे, टोपण] (वा.) **टोणपेबाजी करणे** - सोटे लगावणे; काठ्या मारणे: 'होनाजी बलकवडे याणी सिपायावरी टोणपेबाजी करावयास लोक पाठविले.'- पेद ३३ पृ. ३८५.

**टोणवा** पु. दांडा.

**टोणा-ण्या** पु. जाड, गलेलठ्ठ ढेकूण, ऊ, गोचीड. [क. टोण्णि]

**टोणा-णे-ण्या** पु. १.जादू; मंतरतंतर; टाणाटोणा : 'तो मूढ नेणेच मुकुंद टोणा।' - आगो २४. २. प्रतिपक्षास दान पडू नये म्हणून हा शब्द उच्चारून मोठ्याने ओरडतात.

**टोणा-ण्या** पु. विटेचा किंवा मातीच्या ढेकळाचा तुकडा. (व.)

**टोणा-ण्या** पु. १. टोला; घाव : 'प्रगतिस जर तें हाणी टोणा।' - केक १०३. २. सोटा; दांडके. (बे.)

**टोणाटाणा-णी** पहा : **टाणाटोणा**

**टोणी** स्त्री. लाकडाचा लहान ओंडका; गाठ. [क. टोण्णि]

**टोणे** न. १. कैली मापाबरोबरचे वजनी माप.२.(ल.)काहीतरी किफायत किंवा नफा होण्याचा धंदा, जागा, अधिकार. ३. जड ओझे.

**टोणो** पु. ठणका; ठुसठुस. (राजा. कुण.)

**टोणो** पु. फार मोठा उंचवटा; टेकाड. (राजा.)

**टोप** पु. धातूचे उभट व रुंद तोंडाचे भांडे; पातेले. [सं. स्तूप]

**टोप** पु. १.(नाटक) केसांची विणून तयार केलेली चारसहा बोटे रुंद व मानेवर गाठ मारता येईल इतक्या लांबीची पट्टी किंवा वेणी; बुचडा ( स्त्रीपार्टी पुरुषं वापरतात.). २.(नाटक) राजासाठी बेगड वगैरे लावून केलेला लाकडी मुकुट, मुखवटा, शिरस्त्राण : 'घोडिया बाणली मोहाळी। कंगण टोप रागावळी।'-एरुस्व ८.१५. ३. रंग; तेज. ४. मुखवटा. ५. चौकी. [क. टोप्प;सं. स्तूप, स्तुभ्]

**टोपकर** पु. फिरंगी; टोपीकर (युरोप खंडातील) : 'रूम टोपकर लोकांचे अमलांत गेले, तेव्हां रूमचे लोक शहाणे झाले.' - लोश २८८.

**टोपड** पु. घोड्याचा एक रंग. - अश्वप १.२८.

**टोपडा** (तिरस्कारार्थी) पहा : **टोपकर**

**टोपडे-रे** न. लहान मूल, स्त्रिया यांची बंदाची कानटोपी; कुंचडे.

**टोपण** न.१. अंगुस्तान. २. झाकण; आच्छादन; आवरण. ३.(ल.) टोपणनाव. ४. कानातील एक प्रकारची बाळी : 'कोथिंबिरी टोपण घोसूबाळ्या।'-सारुह ६.२४. ५. ठपका; दोष : 'आमच्यावर सर्व टोपण ठेवणार तो.'- बालगं ३३. [सं. स्तुप्; क. टोप्प=झाकण]

**टोपण** न. आरी; भोक पाडण्याचे हत्यार; गिरमिट; सामता.

**टोपण** न. नगाऱ्याचा खोका, सांगाडा. [क. टोप्प]

**टोपणनाव** न. व्यवहारातील, प्रचारातील नाव (मित्र किंवा कुटुंबातील मंडळी एखाद्यास ज्या नावाने हाक मारतात ते).

**टोपणबाळी** स्त्री. कानात घालण्याचा एक अलंकार. पहा : **टोपण** ४

**टोपणशिला** (भूशा.) झाकणासारखा खालच्या थरावर बसलेला अभेद्य खडकाचा थर.

**टोपणे** न. सुताराचे एक हत्यार; सामता.

**टोपणे, टोपसणे** सक्रि. १. सामत्याने भोक पाडणे; खुपसणे; बारीक छिद्र पाडणे. २. साल काढण्यासाठी ओले लाकूड इ. मोगरीने किंवा दांडक्याने ठेचणे, बडविणे. ३. खूप मार देणे; ठोकणे. ४. टोचून लावणे : 'तो पत्रावळी टोपीत बसला.' - तोरण ४७. [सं.स्तुभ्]

**टोपन** न. दांडीच्या जवळचे व दांडीस आधार म्हणून लावलेले आखूड लाकूड. (व.)

**टोपपदर** पु. (लुगडे) ज्यात उभे व आडवे सर्व रेशीमच असते असा पदर.

**टोपर** पु. टोपकर; टोपीवाला; इंग्रज : 'टोपराचा कारभार खुलाशाचा नाहीं.'- भाऐपया ५१.

**टोपर** पहा : **टेपर**

**टोपरवेणी** स्त्री. टोपवेणी; सगळ्या केसांची मुकुटासारखी घातलेली लहान मुलांची वेणी.

**टोपरा** पु. ठपका; आळ : 'याचा सारा टोपरा आईवर आला.'– बलुतं १६.

**टोपरे** पहा : **टोपडे** : 'त्याला टोपरं घातल्याशिवाय नेत जाऊ नको कुठं.' – एल्गार ८९.

**टोपऱ्या** वि. मधे मधे मिरविणारा. (व.)

**टोपला** पु. १. मोठी वाटोळी पाटी; दुरडी; हारा. २. लहान टोपली. (को.)

**टोपली–ले** स्त्री.न. लहान टोपला; पाटी.

**टोपशी** स्त्री. १. टापशी; सूज. (क्रि. येणे). २. डोक्याची कातडी. ३. खिळ्याचे डोके. (वा.) ० **उडविणे** – जोराने खरडपट्टी काढणे.

**टोपसण** न. लहान पेटी, डबी, ताईत वगैरेचे टोपण, झाकण, आच्छादन.

**टोपसणे** अक्रि. टापसणे; सूज येणे; सुजणे; फुगणे.

**टोपस(सा)ल** न. (ग्राम्य) साल; कातडे. हा शब्द काढणे (सक्रि.) या क्रियापदाबरोबर योजतात व निघणे (अक्रि.) या क्रियापदाबरोबरही योजतात. काढणे या क्रियापदाबरोबर योजल्यास त्याचा अर्थ जिवंतपणीच अंगाचे कातडे सोलणे असा होतो. उदा. 'तो इतक्यात आला तर टोपसल काढील.' (वा.) ० **निघणे** – नाश होणे; दरिद्री होणे; फार खर्च होणे. उदा. त्या प्रयोजनात माझे टोपसल निघाले.

**टोपसा–सी** पु.स्त्री. १. डोके व कान झाकले जातील अशा पद्धतीने गुंडाळलेले वस्त्र; टापशी. (क्रि. बांधणे). २. खिळ्याचे डोके. (वा.) ० **उडविणे** – पहा : **टोपशी उडविणे**

**टोपसा** पु. सूज; फुगवटी; फुग्गीरपणा; फोपशेपणा. (क्रि. येणे, चढणे, उतरणे.).

**टोपंजी** वि. मोठा मनुष्य. (व.)

**टोपा** पु. एक प्रकारचे इरले.

**टोपा** पु. सोने, चांदी आटवण्याची लहान मूस. (गो.)

**टोपाझ** (भूशा.) पुष्कराज; फ्ल्युओरीनयुक्त ॲल्युमिनियम सिलिकेटचे, रत्न म्हणून वापरले जाणारे, पिवळ्या रंगाचे खनिज.

**टोपी** स्त्री.१. डोक्यावर पागोट्याखाली घातलेले शिरस्त्राण, कुल्ला; डोक्यावरची साधी टोपी; पावसाळ्यात डोक्यावर घेतात ती सखलाद वगैरेची घोंगडीच्या खोळेसारखी मोठी कुंची; युरोपियन लोकांचे शिरस्त्राण; लष्करी पोषाखातील नाना प्रकारची डोक्यावरील आच्छादने. पहा : **टोपण**. २.(इमारत) खांब व इस्पिंजर यांच्यामधील गोल घडणीचे बांधकाम. [सं. स्तुभ्; क. टोप्प, तोप्पगे] (वा.) ० **घालणे** – एखाद्यास बुडविणे; फसविणे; तोट्यात आणणे. ० **बसणे** – नुकसान होणे : 'वारंवार यांसी अर्ज करितो कीं, पागोटीयाची आबरू सोडून टोपी घालाल तर पुरती टोपी बसेल.'– ऐको ४७५. ० **सलामत, टोपीचे राज्य तपो, गादीटोपी सलामत** – गोऱ्या लोकांचे शुभचिंतन करणे.

**टोपीउचल** पु. स्काऊट खेळातील टोपी उचलण्याचा खेळ.

**टोपीकर, टोपीवाला** पु. युरोपियन माणूस; फिरंगी; टोपी घालणारा मनुष्य.

**टोपीफिरव्या** पु. (राज्य.) निष्ठा बदलून विश्वासघात करणारा.

**टोपु** पु. १. फुगवटा. २. (ल.) दगदग, खटाटोप : 'टोपु वाहे गळां। व्यापाराचा।।' – राज्ञा १४.१७१.

**टोपू** पु. फुगवटा; फुगारा; सूज; टापशी.

**टोपूल** न. लहान टोपली. (कु.)

**टोपे** न. मोठा द्रोण.

**टोबने** क्रि. काही ठरावीक अंतरावर हाताने बी पेरणे; टुपणे. (व.)

**टोबरा** पु. टोकाचा तुकडा : ' शेपटीच्या वरचा टोबराच तेवढाच निघाला.' – कोसला १५.

**टोबा** पु. कपड्यास पडलेले छिद्र. (झाडी)

**टोमका** पु. १. आलुत्याबलुत्याखेरीज रामोशी वगैरे गावातील इतर हक्कदार. २. जाड काठी.

**टोमणा–णे** पु.न. १. (विटीदांडू) विटीला मारलेला टोला, रट्टा, आघात. २. (ल.) व्याजोक्ती; खोच; मर्मभेदक टीका; टचका; छद्मी भाषण; शब्दांचा मार. [क.; सं. स्तुभ्]

**टोमणी** स्त्री. तगादा. पहा : **टुमणी**

**टोमणी** स्त्री. १. (जेवण्याचे) लहान ताट. २. (ल.) पहा : **२ टुमणी.** [क.]

**टोमणे** न. सुमारे पाच शेराचे तेल मोजण्याचे माप.

**टोमसूळ** वि. वडील माणूस किंवा पालक यांचा धाक नसलेला; ठोल्या; उनाड (मूल, माणूस). (गो.)

**टोमा(म्या)टो, टमाटा, टोमॅटो** पु. एक प्रकारच्या फळभाजीचे झुडूप; त्याचे फळ; बेलवांगे. (व.) [इं.]

**टोर** स्त्री. १. टोळ. २. मोहाचे बी. ३. भातातील गवत. ४. तांदळातील कीटक. (झाडी)

**टोरल** वि. पोकळ : 'कोरूनि देह टोरल केला।' – नदस्व १८१.

**टोरूली** स्त्री. मोठी मुंगी; चाचड. (झाडी)

**टोल** पु. १. नाके. २. नाक्यावर वसूल होणारा कर; जकात; चुंगी. [इं.]

**टोल** पु. पायटा : 'दगडी टोलांवरून एक एक पाय टाकीत विश्वास घराकडं जातो आहे.' – जहेवोजे १३.

**टोल** पु. रट्टा; मार : 'देन्या, आज तू मागं लागलास तर टोलं खाशील हां.' ह्व बा ३८.

**टोल** वि. भव्य; काळकट.

**टोलगा** पु. टोळभैरव; उनाड; निरुपयोगी; फुकटखाऊ (शिवी म्हणून) : 'काइ जालें यां टोलगीयांसि : वीद्यावंतें होऊनि गांवढी :' – लीचउ १६२.

**टोलटोली** स्त्री. गळती. (झाडी)

**टोलणे** पु. सक्रि. १. ढकलणे; अंगाबाहेर काढणे. २. दुसऱ्याच्या अंगावर काम ढकलणे; टोलवणे; कोलवाकोलव करणे. ३. धक्काबुक्की करणे.

**टोलनाका** पु. गावाबाहेरून आलेल्या मालावर जकात (कर) वसूल करण्याचे ठिकाण.

**टोलवणे** अक्रि. ढकलणे; लगावणे, फटकारणे (चेंडू) : 'हॉब्ज चेंडू टोलवून लावी.' – गाक्रिप २५.

**टोलवाटोलव–वी** स्त्री. चालढकल; टंगळमंगळ; टाळाटाळ (कामाची); इकडून तिकडे तिकडून इकडे करणे.

**टोलविणे** मारणे; हाकलणे; ढकलणे. पहा : **टोलाविणे**

**टोला** पु. १. दांड, काठी किंवा दगडाचा प्रहार; फटका; तडाखा; रट्टा; आघात; ठोका. २. विटेचा तुकडा; रोडा. ३. (ल.) कोपरखळी; छद्मी बोलणे; खोचदार भाषण. (क्रि. बसणे, देणे, मारणे.): 'तसं पाहिलं

तर ह्या माणसाचं असं काय मोठंसं कर्तृत्व होतं? टोला बसला.' - रथचक्र १५४. (वा.) ० **खाणे** - नापास होणे; यश न मिळणे; (परीक्षेत) अनुत्तीर्ण होणे : 'आगरकरांनी मात्र एम.ए.च्या परीक्षेत टोला खाल्ला.' - दुर्दम्य १०६. ० **बसणे** - फटका बसणे. ० **लागणे** - नेम लागणे : 'परीक्षा सुरू होणार. टोला लागला तर सिक्सर नाही तर क्लीन बोल्ड अशी तयारी आहे.' - लव्हाळी ३२.

**टोला-ली** पु.स्त्री. वाडी; उपनगर. (झाडी) [त.]

**टोलाटोल,टोलावणी** पहा : **टोलवाटोलव**

**टोलाठोसरा** पु. १. तडाखा; रपाटा. २. (ल.) टोमणा; खोच.(क्रि. देणे).

**टोला(ल्हा)र** वि. १. पोकळ; न भरलेले (कणीस, धान्याचा दाणा, शेंग). २. किड्याने खाल्लेले; पोकळ केलेले (धान्य, लाकूड). ३. (ल.) रोड; सुरकुतलेला; चिपडलेला (माणूस, जनावर). ४. पोकळ नळी (मेलेला विंचू, किडा यांच्या शरीराची).

**टोलाविणे** सक्रि. १. काम चालढकलीवर टाकणे. पहा : **टोलणे**. २. एकमेकांवर ढकलणे. ३. (ल.) टोमणा मारणे; उपरोधिक भाषण करणे. ४. फेटाळणे; घालविणे : 'मूर्खे स्वहित टोलाविलें।' - नवनीत ४४५. ५. एखाद्या माणसाला टाळणे.

**टोली** स्त्री. पैशाचा आठवा भाग; अर्धी दमडी : 'ए, एक टोलीचंच आण म्हणजे आजचा दिवस पुरेल...' - मस्थि ९.

**टोलीके** न. एक वाद्य.

**टोलेजंग** वि. १. मजबूत; दांडगी; बळकट; खंबीर; धक्के खाऊन टिकलेली (इमारत, खांब इ.). २. अजस्र; भव्य; अत्यंत मोठे; प्रचंड; गगनचुंबी. [फा.]

**टोलेबाजी** स्त्री. फटकेबाजी; लागोपाठ टोले मारणे : 'या टोलेबाजीत मात्र निर्घृणता नव्हती.' - गाक्रिप २५.

**टोलेवारी** स्त्री. टोलवाटोलवी; चालढकल : 'मग निघाल्या देहाबाहिरी। बाईल घेती टोलेवारी।' - भाराबाल १६.८२.

**टोल्या** पु. टोलवाटोलव करणारा; चालढकल्या; आपल्या अंगावरचे काम दुसऱ्यावर ढकलणारा.

**टोव** पु.१. पहा : **टेवा** १. २. शिवेची खूण म्हणून किंवा मर्यादा दाखविणारे एक फूटभर खोल खणलेले भोक, खड्डा किंवा दगडावरील खूण. ३. खोबण; दाराच्या कुसवाचे घर.

**टोवणी** स्त्री. १. जमिनीत बोटाने भोक पाडून वाटाणे, पावटे इत्यादी पेरण्याची क्रिया; टुपणी. (राजा.) २. जमिनीत छिद्रे पाडून बियाणे लावण्याचे छोटे अवजार.

**टोवणे** न. एक माप. पहा : **टोमणे**. (वा.) ० **भरणे** - इच्छा पूर्ण होणे.

**टोव(वि)णे** सक्रि पहा : **टुपणे** १, २.

**टोविणे** सक्रि. १. खरवडणे; ओरखडणे. २. वेधणे.

**टोसकर** वि. वयात आलेली; सज्ञान. (व.)

**टोस्ट** पु. १. भाजलेला पाव. २. विशेष प्रसंगी, मित्र आप्तेष्टांनी ग्लास उंच करून शुभेच्छा देण्याचा प्रघात : 'विशेष समारंभप्रसंगी 'टोस्ट'चा कार्यक्रम असला...' - मीसांपा ६२. [इं.]

**टोस्टर** पु. टोस्ट बनवणारे यंत्र : 'टोस्टरमधल्या चार स्लाईसपैकी...' - हेतोप्रबो ४४. [इं.]

**टोहो** पहा : **टोव**

**टोह्या** पु. पत्त्यांचा एक विशिष्ट प्रकारचा खेळ; झब्बूचा डाव.(ना.)

**टोळ** पु. १. पिकांचा नाश करणारा व पंख असलेला एक कीटक. ही जात समुदाय करून राहणारी असून जगात सर्वत्र आढळते. हिची वाढ फार झपाट्याने होते. २. नाकतोडा. [सं.ट्रल]

वि. उडाणटप्पू; उनाड. (वा.) **टोळटोळ करणे** - उच्छृंखलपणे भटकणे; वणवण : '.... टोळटोळ करीत गावभर हिंडायचं तुला म्हायित.'ह आआशे ६.

**टोळ** पु. चिंचोळा पन्हाळ. (गो.)

**टोळ** पु. १. गाडीची चौकट. (बे.) २. (गवंडीकाम) खिडकी वगैरेच्या चौकटी मजबूत बसण्यासाठी चौकटीच्या बाजूला जास्त राखलेली लाकडे.

**टोळ, टोळगोटा** पु. दगडाचा वाटोळा गोटा. (व.)

**टोळ, टोळवण** स्त्री. एक प्रकारचे गवत. (बे.)

**टोळकर** पु. कामकरी लोकांच्या गटाचा प्रमुख.

**टोळका** पु. द्रोण. (बे.)

**टोळके** न. टोळी; गट; थवा : 'लहान मुलांचे एक टोळके आले.' - वाकि ५.

**टोळक्रांत-ती** पहा : **टोळधाड**

**टोळखाद-ज** स्त्री. टोळांनी केलेला नाश.

वि. टोळांनी खाल्लेले.

**टोळधाड** स्त्री. १. प्रचंड संख्येने येणारा, उभे पीक नष्ट करणारा टोळांचा समूह. २. (ल.) छापा; हल्ला; टोळधाडीप्रमाणेच अचानक हल्ला; : 'अकस्मात् पोलिसांची टोळधाड येऊन जोराचा लाठीमार झाला.' - एल्गार ७०.

**टोळपणे** अक्रि. १. ओसरणे; कमी होणे; पडणे; मंदावणे.२. (व्याजोक्तीने) मरणे.

**टोळभैरव** वि. उनाड; उडाणटप्पू; रिकामटेकडा; टोळासारखी उगाच नासाडी करीत हिंडणारा; दांडगेश्वर; गावगुंड; निरुद्योगी; भटक्या; मोकाट; वांड. [सं.]

**टोळंबी** स्त्री. मोहाच्या फळातली बी : 'मोहाची टोळंबी म्हणजे फळातली बी पाण्यात उगाळून...' - फचि १७५.

**टोळा** पु. तांदळा; मोठा दगड : 'मूळदरी संस्कारू केला : एकू टोळा घातला :'ह लीचउ १४६.

**टोळी** स्त्री. १. मंडळी; टोळके; सैन्याची तुकडी; समूह; झुंड; समुदाय; जथा; घोळका; गट; जमाव. २. टोळधाड. ३. गण; कबिला. [सं. टोळ; क.]

**टोळी** स्त्री. एक प्रकारची मासळी. (गो.)

**टोळी** स्त्री. मोहाचे फळ. (व.)

**टोळीवाद** पु. टोळीच्या हिताला प्राधान्य देणारा विचार : 'एका दृष्टीने तो जमातवादी अथवा टोळीवादी...' - डाली १७.

**टोंकली** स्त्री. टोळी; जमाव; जथा.

**टोंग** न. टेंगूळ. (को.)

**टोंग** वि.पु. हट्टी; छांदिष्ट; उर्मट; हेकट (मूल, स्त्री); आडदांड; हूड;

चढेल; शिरजोर.

**टोंग** न. मोठा; पुंड; थोर; बडगा; धडेदार.(तंजा.)

**टोंगदार** वि. पोकळ डौल दाखविणारा; बढाईखोर; पोकळ अरेराव; गर्विष्ठ.

**टोंगपण** न. धटाई; जबरदस्ती.

**टोंगळ** वि. १. जाड; ओबडधोबड (काठी, दांडके). २. (ल.) पहा : **टोंगदार**

**टोंग(घ)ळा, टोंघया टोग्या** पु. गुडघा. (व.)

**टोंगा** पु. खोळंबा. (कर.)

**टोंगाई** स्त्री. टोंगपणा; मगरुरी; स्वैराचार; चढेल किंवा आडदांड वागणूक; आपढंग (मूल, स्त्री यांचा); दांडगाई; उर्मटपणा.

**टोंगी** स्त्री. टेकडी; बिंडा; टेंब; डोंगर : 'अंजनवेलीकडील खाडी अलीकडे आहे ती धामणीपासून येक भाग होऊन येक फाटा धामणीच्या टोंगीखालून गेली आहे.' – पेद ३३.३९२.

**टोंटो** पु. आवाज : 'सर्पाचे टोंटो, ... असे उदास शब्द कानीं पडू लागले.' – मंजुघोषा १०८.

**टोंडभर** पु. क्रिवि. निर्लज्जपणे.

**टोंडी** स्त्री. विहिरीचा वरील घेर.

**टोंपा** पु. टोमणा.

**टॉनिक** न. शक्तिवर्धक औषध : '...समाजात चैतन्य निर्माण करणारं ते एक मोठं टॉनिकच असतं.' – दुर्दम्य २९१. [इं.]

**टॉन्सिल्स** न. घशातील गाठी : 'तिच्या टॉन्सिल्स दुखूं लागल्या.'–माआ ३००.

**टॉप** स्त्रियांच्या कामातील दागिना. [इं.]

**टॉप** पु. विशेषत: मुलींच्या अंगातील कापडी कुडता. [इं.]

**टॉप** वि. उत्कृष्ट : 'इल्युमिनेशन टॉप आहे अगदी.'– सुलतान ४३.[इं.]

**टॉपण** न. टोचण्याचे आयुध. (गो.)

**टॉफी** स्त्री. चिक्की : 'टॉफी हा प्रकार कडक व चिवट असतो.' – मिखा ४५. [इं.]

**टॉर्च** पु. विजेरी; सेलवर चालणारा दिवा. [इं.]

**टॉवेल** पु. अंघोळीनंतर अंग कोरडे करण्यासाठी वापरले जाणारे जाड कापड. [इं.]

**टॉस** पु. खेळाची सुरुवात कोणी करावयाची हे ठरविण्यासाठी केलेली नाणेफेक; छापकाटा.

**टॉंका** पु. १. लहान टोपली. (गो.) २. रानटी लोकांचे पक्वान्न.(गो.)

**टौकी** स्त्री. १. मस्तकाचा पुढील भाग; कवटीचा, कपाळाचा भाग; कोटी. २. कापून काढलेला किंवा तोडून टाकलेला तुकडा. (क्रि. घेणे, तोडणे.) ३. अर्धा भाग; भकल (अंड्याचा, कवठाचा, नारळाचा इ.).

**टौचणे, टौचळणे, टौचा–ची** पहा : **टोचणे** इत्यादी

**टौर** वि. खोडसाळ; टारगट; कुचेष्टेखोर; छांदिष्ट; सोदा; लुच्चा; अप्रतिष्ठित; हलकट; चटोर : 'नहि तरि न म्हणीजे पोर हें टौरवाणी।' – गगौत्र ३९.

**टौळ** स्त्री. दिवेलावणी; देवाजवळील दिवा : 'तें ज्ञान ब्रह्मविद्येची दीपकळा। सत्त्वगुणीं अधिकार टौळा।' – ज्ञाप्रबो ५४७.

**टौळा** पहा : **टोला**

**टौळी** स्त्री. लहान भांडे.

**टौळे** न. एक प्रकारचा दिवा; मातीची पणती : 'मग सर्वज्ञें म्हणीतलें : वानरेया : टौळाचें तेल घेया गा :' – लीचउ ८.

**ट्याहां–ट्यांहां** क्रिवि. लहान मुलाच्या रडण्याचा आवाज. [ध्व.]

**ट्यूब** स्त्री. धातू, काच, रबर इ.ची नळी : 'फ्लूरसंट लाइटच्या ट्यूब्ज...' – हेतोप्रबो ४४.[इं.] (वा.) ० **पेटणे** – अर्थ समजणे : 'दुसऱ्याच्या बोलण्याचा अर्थ कळला नाही म्हणजे 'ट्यूब पेटली नाही' असं आम्ही म्हणतो.'– ऑक्टोपस ३४.

**ट्रक** स्त्री. मालवाहू मोटारगाडी. [इं.]

**ट्रंक** स्त्री. लोखंडी पेटी. [इं.]

**ट्रंककॉल** पु. एका गावातून दुसऱ्या गावात केलेला फोन : 'दिल्ली–मुंबईच्या त्या दोन व्यापारी कंपन्यांत ट्रंककॉल होऊ शकेल...' – गुभा १२.[इं.]

**ट्राम, ट्राम्बे** स्त्री. रस्त्यावर रुळावरून चालणारी विजेची गाडी. [इं.]

**ट्रायोड** न. (विअ.) एक धनाग्र, एक ऋणाग्र आणि एक विद्युत्प्रस्थ (ग्रिड) नियंत्रक अग्र अशी तीन अग्रे (इलेक्ट्रोड) असलेली काचेची निर्वात नळी.

**ट्रे** पु. तबक; कागदपत्रे, वस्तू ठेवण्याचे, नेण्याआणण्याचे साधन. [इं.]

**ट्रेनर** पु. प्रशिक्षण देणारा (मनुष्य, प्राणी यांना). [इं.]

**ट्रेलर** पु. जोडवाहन; अनुयान. [इं.]

**ट्रॅक** पु. १. आखीव मार्ग (शर्यतीत). २. ग्रामोफोन तबकडीवरील खोबणीचा मार्ग. ३. प्रगतिपथ (जीवनातील). [इं.]

**ट्रॅक्टर** पु. यांत्रिक नांगर. [इं.]

**ट्रॅपीझ** पु. व्यायाम किंवा कसरत करण्यासाठी उंच टांगलेला झोका : 'तालमींत मी सिंगलबार, डबलबार, ट्रॅपीझ वगैरे शिकण्याकरिता जात असें.' – माआ ४२ [इं.]

**ट्रँझिस्टर** पु. १. आकाशवाणी इत्यादीचे कार्यक्रम ऐकविणारे यांत्रिक साधन; अर्धसंवाहक. २. विशिष्ट तापमानात उष्णता व वीज यांचे वहन करू शकणारा छोटासा घनपदार्थ. [इं.]

■■■



**ठ** मराठी वर्णमालेतील सत्ताविसावे अक्षर आणि बारावे व्यंजन.

**ठक–ग** पु. लुच्चा, फसवा, धूर्त मनुष्य; लबाड; अप्रामाणिक; कपटी; बदमाश. [सं. स्थग्. स्तग्; क. ठक्नु] (वा.) **ठकास ठक भेटणे**ह्न जशास तसा भेटणे.

**ठक** न. तटस्थपणा; आश्चर्यामुळे येणारी दृष्टीची एकाग्रता; आश्चर्य; वीरकृत्य; भूल; विस्मृती; दिङ्मूढता. (क्रि. लागणे, पडणे.): 'उभा जानकीरमण। वधुसहित सुलक्षण। उभयरूपाचें बरवेपण। पाहण्या ठक पाडिलेसें।' – वेसीस्व १०.१२१.

वि. तटस्थ. [सं. स्थग]

**ठक** स्त्री. थकवा. (झाडी)

**ठकठक** स्त्री. ठणठण किंवा टकटक असा ठोकण्याचा आवाज; दणका; किटकिट; धूमधडाका; त्रासदायक भुणभुण किंवा बडबड. [ध्व.]

**ठकठकणे** अक्रि. ठक ठक असा आवाज करणे (हातोडीने ठोकून इ.).

**ठकठका** क्रिवि. हातोड्याने एखादी वस्तू ठोकली असता होणाऱ्या आवाजासारखा आवाज होऊन.

वि. ठोकण्याचा कानठळ्या बसवणारा (आवाज).

**ठकठके** न. पक्ष्यांनी भिऊन उडून जावे म्हणून बनवलेले, मोठा आवाज करणारे एक लाकडी यंत्र; खटखटे. [ध्व.]

**ठकठाकुर** पु. ठाकुर व त्यांच्यासारखे इतर लोक : 'राया लागतिते राएं घेतले : एर राजेराउति ठकठाकुरीं घेतले :'– लीचपू ३१.

**ठकडा–डी–डे–ड्या** पु. भुलवणारा; मोठा ठक:'म्हणती ठकडा रे कान्हा।'–तुगा २३०.

**ठकडेपणा** न. फसवेगिरी : 'तें ठकडेपण श्रीपती। न चले मजप्रति सर्वथा।' – एभा २९.७२८.

**ठकणा–णी** पहा : **ठकडा** : 'कोण मिळाली ठकणी.' – अफला ७८.

**ठकणूक** स्त्री. फसवणूक; फसगत; लबाडीने केलेली नागवणूक.

**ठकणे** अक्रि. फसणे; फसले जाणे; दगा होणे; निराशा होणे; बुडणे (धंद्यात); चुकणे : 'माझी ठकली वो बुद्धि।' – कक १.५.१४२.

सक्रि. दगा देणे; नाडणे; ठार मारणे (बेसावध असता, सापाच्या दंशाने किंवा चोरांनी हल्ल्यात.). (को.) [हिं.ठकना; सं. स्थग्]

**ठकणे** अक्रि. १. ठाकणे; उभा राहणे : 'न ठके निषेध आड। न पडे विधीची भीड।'ह्न माज्ञा १६.१८८. २. घडणे; होणे; प्राप्त होणे : 'नातरी देवो जैसें सांगतील। तैसें आपणपां जरी न ठकेल।' – ज्ञा ६.३३५. ३. राहणे; स्थिर होणे; वास्तव्य करणे; असणे : 'तयांचीं न ठकतीचि अंगीं कामें।' – ज्ञा १०.१६६. ४. थांबणे; बंद पडणे : 'जरीं राजा घरासि ये। तरी बहुत उपेगा जाये। आणि कीर्तिही होये। श्राद्ध न ठके।' – ज्ञा १७.१८६. ५. संपणे; अंतरणे; सरणे. ६. (चुकीचे) थकणे; दमणे; श्रम होणे किंवा पावणे. [सं. स्थग्, स्तक्]

**ठकणे** उक्रि. ठकविणे : 'म्हणशील मना इंद्र म्यां ठकीला' – बबागा १२७.

**ठकणे** अक्रि. १. थक्क होणे; स्तिमित होणे; आश्चर्य वाटणे. २. थांबणे : 'काइ मोकलां हिं चवडां। न ठके चि पूंसा।' – ज्ञा १८.३९०. [सं.स्थग्]

**ठकधंदा, ठकवणी** पु. फसवेगिरी; सोदेगिरी; लुच्चेगिरी. [क.ठक्कु]

**ठकना** क्रि. १. थकणे. २. देणे; बाकी असणे. (झाडी)

**ठकबाज** वि. लुच्चा; कपटी. पहा : **ठक**

**ठकबाजी** स्त्री. १. लुच्चेगिरी; फसवेगिरी; ठकाठकी; लबाडी. २.(कायदा) एखाद्या मनुष्यास फसवून माल देण्याविषयी त्याचे मन वळविणे. [हिं.]

**ठकऱ्याची** वि. ऐटीची; नखऱ्याची. (व.)

**ठकले ठाणे** जागच्या जागी आश्चर्यचकित होऊन राहणे.

**ठकवणा–रा** वि. ठकविणारा; लुच्चा : 'मोठा ठकवणा पंढरीचा राणा.'– चोखा १६.

**ठकव(वि)णे** सक्रि. फसवणे; लुबाडणे; नागविणे; लबाडी करणे: 'नोकरलोक तुम्हाला ठकवतात.' – रथचक्र २१४. [क.ठक्कु]

**ठकवा–व्या, ठकाऊ–रू–वू, ठकू** पहा : **ठकवणा–रा**

**ठकवाई** स्त्री. १. थकवा. २. कामाची बक्षिसी. (झाडी)

**ठकवाठकव** स्त्री. नाना प्रकारची फसवणूक.

**ठक(कू)विद्या** स्त्री. फसविण्याची कला; कपटयुक्ती; लबाडी; ठग लोकांचे चातुर्य.

**ठकव्याज** न. फसवून घेतलेले व्याज; अमर्याद व्याज.

**ठकव्यापार** न. कपटाचा व्यापार, धंदा, उद्योग.

**ठकसेन** पु.लबाड; लुच्चा : '...तो बिलंदर ठकसेन पोलिसांच्या हाती सापडला नव्हता.' – मुंपोचाक ९५.

**ठकसौदा** पु.१. गिऱ्हाईकाला ज्या वस्तूने किंवा मालाने फसवण्यात आले तो माल. २. पहा : **ठकव्यापार**

**ठकाठकी** स्त्री. पहा : **ठकबाजी** १ : 'प्रत्ययेंविण प्रेत्नलाना। ठकाठकी।' – दास १०.२.८.

**ठकार** पु. सौंदर्य; ऐट. [सं. स्थग्, स्तक्]

**ठकार** पु. ठ अक्षराचा आकार; आकृती : 'स्त्रीचेनि नांवें ठकारही न पाहावा : पाहिलेयां माजवी :' – लीचउ १११.

**ठकार–रे** वि. मनोहर; सुंदर; मोहक : 'तटस्त जैसी चित्रलेपें। ठकार मूर्ती देखोनी।' – वेसीस्व ५.७.

**ठकार–रू** वि. १. ठक; लुच्चा; चोर. २. तोट्याचा (व्यापार).

**ठकार** पु. उटी किंवा लेपन : 'आंगीं चंदनाचा ठकारू.' – नरुस्व ७४१.

**ठकारणे** अक्रि. होणे; बनणे; असणे : 'ठकारली व्यक्ति विठ्ठल वेधें।' – बबागा ३११. [सं. स्था]

**ठकारा** पु. ठसकारा; तोरा : 'सासऱ्याला जातां। मोठी ठकाऱ्याची तानी। आसु पुसा नेतराची। सोड लुगड्याची चिणी।'– वलो ११५. (व.)

**ठकावणे** सक्रि. कुंठित होणे; फसणे; भुलणे.

**ठकुली** स्त्री. मातीची लहान हंडी.

**ठकोर** पु. परिपाठ; कार्यक्रम : 'चालूं दे नित्य भेटीचा ठकोर' – अफला ७७.

**ठग** पु. एक जात व त्यातील व्यक्ती. हे लोक प्रजेला ठकवून लुबाडण्याचा धंदा करीत व प्रसंगी पैशासाठी लोकांचा प्राण घेत.

वि. थापाड्या; फसव्या; ठक; लुच्चा. [सं. स्थग; क. ठक्कु; हिं.]

**'ठग' शब्दापासून तयार होणारे शब्द 'ठक'मध्ये पहा.**

**ठगाई** स्त्री. लुच्चेगिरी.

**ठगाळ** वि. लुच्चा; धूर्तः 'कान्हो ठगाळ क्रीडा करी।'-भपसं ६२.

**ठगी** स्त्री. ठग लोकांचा धंदा; फसवेगिरी.

**ठग्गू** वि. थापाड्या.

**ठठरी, ठठोरी, ठठोली, ठठ्ठा** स्त्री. थट्टा; चेष्टा; मस्करी : 'उपाध्याय भाषण करते झाले आमची ठठोली करतां काय?'-माभू ८८.

**ठण** पु. धातूच्या वस्तू एकमेकांवर आपटल्याचा आवाज. [सं.तन्]

**ठणक** स्त्री. ठुसठुस; व्यथा. (क्रि. होणे).

**ठणक** अ. ठणक हे अव्यय कोरडा, सुका या शब्दांनंतर आले तर तेथे त्याचा अर्थ निखालस, पुरेपूर, अगदी कोरडा असा होतो.

**ठणक** स्त्री. १. स्फुरण; कंप; कंड (दुखावलेला अवयव किंवा क्षत यांची). २. शीण; थकवा; कंटाळा. [ध्व.]

**ठणक** पु. ठाण् असा मोठा आवाज : 'तीरा गोळ्यांचे ठणक होती.।' - ऐपो ८३.

**ठणकणे** अक्रि. १. ठसठस करणे; दुखणे; वेदना होणे; ठसठसणे. (व्रण, क्षत इ.). २. स्फुरण पावणे; उडणे. ३. शिणका किंवा तिडका होत असून दुखणे. (गळू, डोके, क्षत इ.). [ध्व.; सं. स्तन्]

**ठणकन-कर-करी-दिनी-दिशी** क्रिवि. धातूवर जड पदार्थाने मारल्यास होणाऱ्या आवाजाप्रमाणे; तसा आवाज होऊन; टणकन इ.

**ठणका** पु. १. तीव्र वेदना; ठुसठुस; तिडीक; चमक; शिणका; दुःख. २. वारा, थंडी यांचा कडाका. (क्रि. पडणे, सुटणे.) ३. थंडीची शिरशिरी, हुडहुडी. (क्रि. बसणे, लागणे.) ४. रागाची लहर (येणे). (वा.) ० **बसविणे** – खोड मोडणे; कायमचा बंदोबस्त करणे. (ना.)

**ठणकार** पु. ठण आवाज : 'उभे रस्त्याने चालले पहा जोडव्याचे ठणकार.' - मला २३८.

**ठणकावणे** सक्रि. १. खरडपट्टी काढणे; कानउघाडणी करणे; भोसडणे; धाक दाखविणे. २. दटावणे; दोष लावणे. ३. काम इत्यादीचा तडकाफडकी निकाल करणे; ताबडतोब उरकून टाकणे. ४. जोराने चालविणे; बेदरकारपणे हाकणे (वाहन, पशू, माणूस). ५. भांड्यांचा नाद पाहण्यासाठी त्यावर टिचकी, टोला मारणे. [ध्व.]

**ठणकावणे** अक्रि. चुणचुणणे; ठुसठुसणे; दुखायला लागणे. सक्रि. विंचू वगैरेंनी नांगी मारणे, दंश करणे.

**ठणठण-णा** क्रिवि. ठुसठुस (वेदनेचा); घणघणा (हातोडीने ठोकण्याचा, घंटा, घड्याळ वाजवण्याचा) इ. आवाजाप्रमाणे आवाज होऊन; मोठ्याने (बोंबलणे). [ध्व.]

**ठणठणणे** अक्रि. १. (जखम इ.) जोराने ठुसठुसणे; ठसठसणे; तीव्र वेदना होणे. २. धातूचे भांडे खणखण वाजणे. ३. टणटण उडणे. ४. तक्रार करणे; बोंबलणे : '....येसू नुकसानीबद्दल ठणठणत होता.' - अहीदि १६७. [ध्व.; सं. स्तन्-तस्तन्यते]

**ठणठणपाळ** पु.१. मूर्ख, गचाळ किंवा दरिद्री मनुष्य; कफल्लक माणूस; विद्याहीन माणूस. कधी कधी याला मदनगोपाळ हा शब्दही जोडतात. २. (ल.) पूर्ण अभाव. पहा : **ठणठणाट**. ३. दुसऱ्याचा पोकळपणा बाहेर काढणारा.

**ठणठणाट, ठणाका** पु.१.घणघण असा आवाज; (धातूच्या भांड्यावर हातोडीने मारले असता निघणारा) नाद. २. (विहिरीतील) पाण्याचा खडखडाट; फन्ना; चट्टा (वस्तूंचा).३. दारिद्य; गरिबी; पोकळपणा; कमतरता; अभाव; बोंब; दुर्मिळता. ४. शुष्कता.

**ठणठणावणे** सक्रि. ठणकावणे; निर्भयपणे सांगणे : 'मीं ....तें पुन्हा एकदां ठणठणावून सांगत आहे.' – खपा १०२.

**ठणठणीत** वि. १. खणखणीत (धातूचा नाद). २. खडखडीत (अतिशय कोरडा). ३. (ल.) चोख; निःसंदिग्ध; स्वच्छ (जबाब, भाषण). ४. दणदणीत; जबर; व्यवस्थित : 'मला शिक्षाहि ठणठणीत होईल.'- काभिं ७६.

**ठणण, ठणाठण-णा, ठणाणा** पहा : **ठणठण-णा**

**ठणाणणे** अक्रि. ठण असा मोठा आवाज होणे.

**ठणाणा** पु. बोंब मारण्याचा आवाज : 'सगळ्या गावाला ऐकू जाईल असा ठणाणा केला.' – मिरास ३२४.

**ठण्णकन** क्रिवि. ठण्ण असा आवाज होऊन : 'ठण्णकन् तांब्या वाजतो.' – ऊन ९०.

**ठन** स्त्री. मिरची पेरण्याची जागा. (झाडी) [सं. स्थल]

**ठनने** क्रि. कण्हणे; विव्हळणे. (व.)

**ठनान** क्रिवि. ठणाणा करीत ओरडणे.

**ठपका** पु. दुष्कृत्याचा डाग, कलंक; कालिमा; बट्टा; गुन्ह्याचा आरोप; दोषारोप. (क्रि. आणणे, ठेवणे, येणे.) : 'मी कोणताही ठपका घ्यायला तयार नाही.'– श्रीयो १. ४२७. [क. तप्पु; सं.]

**ठपका** पु. क्रम; लागण; रांक : 'स्वार झालो त्या दिवसापासून दर कुचात घोडी मरावयाचा ठपका लागला तो आजपर्यंत तैसाच चालला आहे.' – ऐको ४७६.

**ठपका** पु. पडणारा पाण्याचा थेंब.

**ठपकाठराव** पु.(राज्य.) निंदाव्यंजक ठराव; नापसंतीदर्शक मत.

**ठप(ब)कारणे** उक्रि. १. ठपका ठेवणे; टोमणा मारणे. २. (ल.) मर्मभेदक बोलणे; ठणकावणे. ३. खरमरीत, कडक रीतीने ताकीद देणे; हुकूम करणे. ४. गिळकृंत करणे; दाबणे (धंद्यात पैसा, नफा). ५. दोष येणे. [सं. स्तभ्]

**ठपठप-पा** पहा : **टपटप**

**ठप्प** क्रिवि. निश्चल; अविचल; पूर्ण थांबलेले : 'जागच्या जागी ठप्प उभे राहिलेल्या डब्यांतले उतारू.'– प्रतिनिधी २७.

**ठप्पा** पु. छाप; शिक्का. [क. ट(ठ)प्पे]

**ठप्पामुद्रण** न. (ग्रंथ.) उठावणीचे मुद्रण.

**ठमक** स्त्री. नखरा; चट्टीपट्टी.

**ठमकठाणवी** स्त्री. मोहक बांध्याची व ठुमकत चालणारी सुंदर स्त्री; गुटगुटीत आणि तजेलदार स्त्री.

**ठमकणे** अक्रि. १. नाटकीपणे, नखऱ्याने चालणे; डौलात, ऐटीत चालणे; थिरकणे; ठुमकत चालणे. २. लाजून मुरडून चालणे. ३. विलासयुक्त गतीने चालणे; ऐट करणे; नखऱ्याने वागणे. [ध्व.; सं. स्तम]

**ठमकहाणी** स्त्री. बनवलेली कहाणी.

**ठमका** पु. १.ऐटबाज चाल; थाटाने चालण्याची ढब; नखऱ्याची चाल. २. रुसून किंवा रागाने घेतलेली गिरकी, उसळी, आवेग. (क्रि. मारणे). ३. झोकदार चालणे. [सं. स्तम्]

**ठमकाई** स्त्री. १. थोराड व उफाड्याची स्त्री; ठुमकत चालणारी बाई; आडदांड, गबदुल मूल. २. वयाने लहान पण आजीबाईसारखी पोक्तपणे वागणारी मुलगी.

**ठमकारा** पु. ताठा; गर्व; वरपांगी नखरा; उसनी ऐट; तोरा : 'नेहमीच्या ठमकाऱ्यात तिथे प्रगटली.'-कथाकांता १११. [ध्व.]

**ठमकी चाल** सावकाश पण ऐटीची घोड्याची चाल.

**ठमटेळित** क्रिवि. जाणूनबुजून.

**ठमठमाट** पु. तोरा; ऐट; थाटमाट व अहंपणा; पुढे पुढे करणे.

**ठर** पु. ठराव; निश्चय; सिद्धांत : 'कोणते मार्गे जावयाचा ठर होतो, हें पहावें.' – ऐको ४७६. [हिं. ठेहराव]

**ठरणूक** स्त्री. ठराव; निकाल; कबुली; निर्णय; स्थिरपणा.

**ठरणे** अक्रि. १. निश्चय होणे; पक्के, निश्चित होणे; नेमणे; कायम होणे; निर्धार होणे; सिद्धांतास येणे. २. राहणे; थांबणे; वस्ती करणे; निभावणे; टिकणे; नांदणे : 'निरंजनवनीं ठराल तेव्हां नित्यानें भराल हो।' – नवनीत ४५०. ३. गाभण होणे (गाय, घोडी इ.). ४. रणांगणात गाडून उभे राहणे : 'लढाई मारूं एकदां ठरून लढाई मारूं रे।' – ऐपो २३४. ५. (कायदा) आरोप लागू पडणे. [सं. स्थिर]

**ठराव** पु. १. निकाल; निश्चय; निर्णय; पक्का निर्धार. २. स्थैर्य; टिकाव. ३. राहणे; मुक्काम करणे; थबकणे. ४. (कायदा) दाव्यातील मुख्य मागणीखेरीज इतर दाद मिळण्यासाठी केलेल्या अर्जाबद्दलचा निकाल. ५. सभेत मूळ किंवा उपसूचित स्वरूपात मान्य झालेला प्रस्ताव, सूचना. ६. (कायदा) नियम; सिद्धांत. [सं. स्थिर]

**ठरा(र)वणी, टरणूक, ठरावणूक** स्त्री. निकाल; निर्णय; कबुली. (क्रि. करणे). २. टिकाव.

**ठरावनामा** पु. करार; बोली : 'आमी काय मग लय चौकशी करीत ऱ्हायलाव नाय. ठरावनामा झाला.' – अउआ ९२.

**ठरावपत्र** न. (कायदा) १. दस्तऐवज; फैसला; निवाडापत्र. २. नियमांचे पत्रक, सूचना किंवा हुकमांची कलमबंदी; हुकूमपत्र.

**ठरावबंद-पट** पु. शासननिर्णय; ठरवलेली कलमे लिहिलेली यादी; मामलेदार वगैरेंना त्यांच्या कामासंबंधाने आलेला सरकारी कागद (यांत त्यांना सूचना, वटहुकूम इ. लिहिलेले असत); कानूजाबता; कोणताही ठराव, निवाडा किंवा त्यातील अटी अमलात आणण्यासाठी दिलेले आज्ञापत्र; एखाद्याला मक्त्याने मामलत दिली असता त्याने सरकारात सालअखेरीला किती पैसा किती हप्त्याने द्यावा याची यादी.

**ठरावबेरीज** स्त्री. निश्चित केलेला करआकारणीचा दर.

**ठरीव** वि. कायमचा; ठरलेला.

**ठरावी(वि)क** तोच तोच, एकच (दिनक्रम, काम, इ.).

**ठरेलपणा** पु. ठरावीकपणा; स्थिरपणा : 'मध्यमवयीन वृत्तीचा ठरेलपणा होता...' – स्नेहांकिता ९१.

**ठरोती, ठरवती** स्त्री. ठराव; निर्णय; करार; निश्चय; ठाम मत : 'नंतर धूर्त विशालमति सांगे विहीरहुंडा ठरोती।' – पैमार्षेदु

**ठल** वि. थट्टेखोर; विनोदी. (व.)

**ठलवा, ठल्वा** पु. १. बेकार, बेरोजगार माणूस. (व.) २. भूमिहीन शेतकरी. (झाडी)

**ठलाल** वि. कुचर; ठक; वस्ताद. (व.)

**ठलेली** स्त्री. थट्टा; मस्करी. (व.)

**ठवणे** वि. ठेवणे; स्वाधीन करणे.

**ठवय** पु. सुतार. (गो.)

**ठवला** पु. जात्याच्या खालच्या तळीच्या सांध्यात पक्की बसविलेली जिच्या भोवती वरची तळी फिरते ती, लोखंडाची किंवा लाकडाची खीळ, खुंटी.

**ठवस** न. पु. वायदा; ठरलेला संकेत.

**ठवळ** वि. योग्य; शोभेसे; ठळक; ठसठशीत : 'शृंगार अलंकार सोनेआचें। ठिकठवळ माणिक मोतियाचे।' – क्रिपु १.३०.५८.

**ठस** वि. १. स्पष्ट; ठसठशीत; ढळढळीत; मनात भरण्याजोगे; झगझगीत (अक्षर, रंग). २. बळकट; पूर्ण; ठरावीक (रुची इ.). ३. मजबूत; भक्कम; घट्ट विणलेले; दणकट (कापड); निश्चित; निर्भीड : 'ठसठोंबस खटनट।'– दास २.३.३२.४. भरीव (धान्याचा दाणा).

क्रिवि. कठोर; बोजड : 'तयाचा शब्द नावेक ठसु : रसवृत्ति तोकडी.'– स्मृस्थ १२१. [सं. स्था]

**ठसक** स्त्री. १. ठणका लागणारी जखम, व्रण. २. ठुमकत चालताना पायांच्या जोडव्यांतून निघणारा आवाज. ३.(ल.) ऐट; ढब; नाजूकपणा; नखरा; उठाव; मनावर पडणारी छाप; तोरा (चालणे, नाचणे, भाषण करणे यांतील).३. प्रभाव; ठेस. (अहि.) [ध्व.]

**ठसक** पु. खोकला; ढास; ऐट.

**ठसक** क्रिवि. ठुमकत ठुमकत; मुरडून पाहत (स्त्री, घोडी). (क्रि. चालणे).

**ठसकणे** अक्रि. ठसका लागणे; ढासणे; खाकरणे; इशारा करण्यासाठी किंवा कळण्यासाठी मुद्दाम खोकणे : ' कुणी तरी जवळ आले एवढेच दिसले. मी थोडा ठसकलो.'– बनगर१३. [सं. ध्रास + अकच्]

**ठसकदार** वि. १. नादयुक्त, वाजणारे (जोडवे). २. ऐटदार; नखरेबाज; ठमकाऱ्याचा (चालण्यात, घोड्यावर बसण्यात).

**ठसकन-कर-दिनी-दिशी** क्रिवि. दोन कठीण वस्तू परस्परांवर आदळल्याने होणाऱ्या खटकन्, धडकन् आवाजाप्रमाणे आवाज होऊन. [ध्व.]

**ठसकरी** क्रिवि. ठसकन : 'गोसवी चवरीचेनि दांडेनि ठसकरि डोइयेवरी हाणितले :' – लीचउ १५७.

**ठसका, ठसकारा** पु. १. कढत किंवा तिखट पदार्थ खाल्ल्याने, तपकीर ओढल्याने, पाणी घशात एकदम गेल्याने, नाक, डोळे वगैरेंत घशातून जाताना होणारी वेदना; खोकला; ढास. (क्रि. लागणे.). २. कपाळावर एखाद्या वस्तूचा आघात होऊन झालेला ठस असा आवाज. ३. बोलण्यातील जोर, छाप; वजनदारपणा; मर्मभेदक भाषण; टोमणा. ४. दरारा; धाक. (ना.) ५. आवेश. ६. दमदारपणा; तडफ; ऐट.

**ठसका** पु. ठेचा; हरभऱ्याच्या डाळीत मसाला घालून केलेली चटणी; चटका.

**ठसकेदारपणा** पु. ठामपणा; तडफ : 'तो पूर्वीचा ठसकेदारपणा ... सर्व काही आता नाहीसा झाला.' – पलकोघे २२८.

**ठसकेबाज** वि. फाकडा; छानदार; डौलदार; तडफदार; चित्ताकर्षक; आवेशी; कडक; रोखठोक; जोरकस (माणूस इ.). [ध्व.]

**ठसठशी(सी)त** वि. ठुसठुस करणारे (गळू, व्रण इ.).

**ठसठशी(सी)त** वि. १. खडखडीत; स्पष्ट; हजरजबाबी; उत्साहवर्धक; सडेतोड (भाषण, कार्यक्रम). २. बोचणारे; उपरोधिक; टोमणा लगावणारा. ३. चमचमीत; फोडणीचा; रुचकर (तिखट, उष्ण, तीक्ष्ण पदार्थ).

**ठसठशी(सी)त** वि. १. घोसदार; गरयुक्त; लठ्ठ (केळे, चिंच इ.). २. ठळक; डोळ्यांत भरणारे; घवघवीत; दळदार; उठवदार (दागिने).

**ठसठस** स्त्री. जोराची ठुसठुस; व्यथा; दुःख; ठणका; तीव्र वेदना : 'मनाच्या जखमा सारख्या ठसठसत होत्या.'–चार्वाक २. [ध्व.]

**ठस(सा)ठस–सा** क्रिवि. १. ठुसठुसत; फुरफुरत (गळू इ.). २. कपाळ इ.ला जड पदार्थ पटकन लागून वेदना होऊन किंवा ठसदिशी लागण्याची क्रिया होऊन (लागणे, वाजणे); रपाटे, धपाटे मारण्याचा आवाज होऊन.

**ठसठसणे** अक्रि. १. ठुसठुसणे; ठणकणे; फुरफुरणे. २. (ल.) उमटणे : 'सुख अंतरीचें बाह्य ठसठसी।' – तुगा ११२.

**ठसठोंबरा** पु. १. टोमणा; व्याजोक्ती; व्यंगोक्ती, तडाखा. (क्रि. देणे). २. पाहुण्याला कमी प्रतीची वागणूक देणे; पाहुण्याचा अनादर. (वा.) ० **वाटाण्याची अक्षत देणे, लावणे** – तोंडावर रोखठोक, कडक, स्पष्ट, खडखडीत, भीडभाड न धरता नकारात्मक उत्तर देणे; विनंती अमान्य करणे.

**ठसठोंबस** वि. १. निर्भीड व अक्षरशत्रू; अडाणी; ठोंब्या : 'ठस ठोंबस खट नट।'– दास २.३.३. २.ओबडधोबड; मोठा घाटा.

**ठसणे** अक्रि. १. मनावर बिंबणे; परिणाम होणे; खोलवर जाणे; ठसा उमटणे (मुद्रा, चिन्ह, छाप). २. (ल.) सांगितलेले, पाहिलेले मनावर बिंबणे; पटणे (उपदेश, गोष्ट) : 'सकळांलागीं भाव ठसला।' – नभसा १८.१८३. [हिं. ठसना; सं. तंस्]

**ठसणे** अक्रि. शोभणे : 'बाळ काळसा ठसे.' – ऐपो २.४३.

**ठसदार** वि. झुमझुम, छुमछुम, रुणझुण किंवा ठसकेदार आवाज काढणारे (जोडवे). [ध्व.]

**ठसन्** स्त्री. ऐट; शिष्टपणा. (व.)

**ठसर** वि. जाड; मजबूत; ठोंबस; भरीव.

**ठसवणे** क्रि. प्रकट होणे : 'निर्गुण गुणासि आले। परब्रह्म ठसवले।' – नाम १७१०.

**ठसा** पु. १. मुद्रा; नाममुद्रा; शिका; छाप. (क्रि. देणे, करणे, पाडणे.). आकार; रूप : 'ते न मोडतां अळंकारठसे।'– एभा २८.२६४. २. (आकृती इ.चा) छाप मारण्याचे साधन, साचा, हत्यार. ३. ठोका; घाव. ४.(ल.) मनावर पडलेले प्रतिबिंब; समजूत; ग्रह. (क्रि. पडणे). ५. (ल.) अधिकार; अब्रू; दाब; छाप; मान : 'परगणे पाटिल तुमचा सासरा जिकडे तिकडे ठसा।' – पला ८६. ६. (ल.) प्रसिद्धी; कीर्ती : 'आम्ही याज्ञिक या आवेशा। पिटिती ठसा तिहीं लोकीं।'– एभा ५.१४७. ७. प्रकार; रीतः 'पावोनियां मुक्त दशा। देही भोग भोगी कैसा। त्यासि त्यागाचा कोण ठसा। हृषीकेशा सांगिजे।' – एभा १०.७३. ८. अक्षराचे चिन्ह; धातूचा टाईप. [क. ठस्से] (वा.) ० **पिटणे** – दवंडी पिटणे; प्रसिद्धी करवणे. ० **होणे, पडणे** – दहशत, दरारा उत्पन्न होणे : 'दक्षिण देशामध्यें याचा थोर झाला ठसा।।' – ऐपो ३४०.

**ठसा** पु. स्थिती : 'एक ज्ञान पावोनि जाहला पिसा। पडिला अव्यवस्थ ठसा।' – एभा ११.१०१७. [सं.स्था]

**ठसा** पु. कफाचा बेडका. (व.)

**ठसाठस** क्रिवि. कोंबून; खच्चून : 'तिजोरीत लाखो नोटांची बंडले ठसाठस भरलेली असतात...' – पेआ ५.

**ठसालिकरि** क्रिवि. ठसकन : ' गोसावी चवरीचेनि दांडेनि ठसालिकरि डोइएवरि हाणितलें :'ह्व लीचउ १५७.

**ठसासणे** अक्रि. अतिशय ठणका लागणे; ठुसठुसणे.

**ठसी(सो)ल** वि. ठशांचे : 'कोठील म्हणांल ठसील नाणीं।'– वेसीस्व ११.७९.

**ठसेकागद** पु. शासकीय छाप असलेला कागद; स्टँपपेपर.

**ठसेठोमसे** वि. ओबडधोबड : 'मियां उन्मेखें ठसेंठोमसें।' – राज्ञा १५.५६०.

**ठसेदार, ठसेवाला** पु. ठसे, टंक बनवणारा : 'तेथें ठसेदार कोणी नव्हता.'ह्व निअसा १६६.

**ठस्स** पहा : **ठसठशीत**

**ठळक** वि. १. जाड; भरीव; पुरेपूर; मोठा; सुंदर (धातूचे पात्र, अलंकार, वस्त्रेप्रावरणे). २. स्पष्ट; ठसठशीत; मोकळे; स्वच्छ (अक्षर, आकृती, खूण, चांदणे) : 'त्या गड्याच्या ठळक बोलाबरोबर पांडा पवार चालता चालता थांबला.'–आपा ६६. ३. श्रेष्ठ; महत्त्वाचा; प्रसिद्ध; संपन्न (विद्येत, धनाने). ४. सुंदर; दिखाऊ; तुकतुकीत; मजबूत; धिप्पाड; उमदा; टुमदार (प्राणी, वस्तू–सामान्यपणे). [क. तळकु]

**ठळकून** क्रिवि. विशेष जोर देऊन; मुद्दाम : 'संभा... काळा असेल, पण ते अशा रीतिने ठळकून सांगण्याचे काही कारण होते कां ?' – मलोत १७५.

**ठळठळीत** पहा : **ठळक** २

**ठळणे** अक्रि. (लोखंडी कारखाना) काठ काढणे.

**ठंडाई** स्त्री. पुदिना. (झाडी)

**ठाइका** वि. तसाच.

**ठाइ–इं–ई** क्रिवि. ठिकाणी; स्थानी; जागी. (वा.) ० **ठाकणे** – योग्य ठिकाणी उपयोगी पडणे : 'हें काइ बाइ : तुम्ही एव्हडा वेळु ऐसें म्हणा : कोण्ही मानुस खातें तरि ठाई ठाकती : ' – लीचउ १९. ० **पडणे** – सापडणे ; कळणे : 'तो देव कोण्या गुणें। ठाईं पडे।' – दास ८.१.१५.

**ठाईं, ठायीं** अ. सप्तमीचे विभक्तिप्रतिरूपक अव्यय. [सं. स्थाम]

**ठाईचा–ची–चे** वि. मूळचा; पहिलाच; जात्याच : 'तो ठाईंचा मावकरी।' – कापु १०.४६.

**ठाउ** पु. जोर; आवेश : 'आणि नाथोबासासि ठाउ चढे : आणि नाथोबास

भटोबासातें लोटिति : ' - लीचउ १.१०५.

**ठाउवा** पु. ठावा (पलंगाचा पाय, खूर) : 'आवो तुं ठाउवा ठाउवा होसि म्हणे.' - गोप्रच ८८.

**ठाउवा** पु. माहितीचा; ठाऊक असलेला : 'हा रातिदिवसु पाहिं। जैसा जात्यंधा ठाउवा नाहिं।' - ज्ञा ४.२.

**ठाऊ-व** पु. १. स्थान; ठिकाण; जागा : 'बहिर्भूमी जावयासी। ठाऊ कैसा परियेसी।' - गुच ३६.१३५.२. प्रसंग. ३. सीमा; अंत : 'आपण होये स्थिति। ठाऊँ तेया।'- ज्ञा १३.९९४. ४. आधार. [सं. स्था]

**ठाऊक-का-वा-वे, ठावूक** वि. प्रख्यात; प्रसिद्ध; माहीत; विदित; ज्ञात; माहितीचे : 'परी तयामाजी गळु आहे। जो प्राणातें घेऊनि जाये। तो जैसा ठाउवा नोहे । झांकलेपणे।' - ज्ञा ३.२१४ ; 'प्रभुस्तुति न ठाउकी परि तिच्या महा कामुका।' - केका २५. [क. टाविके]

**ठाए** न. १. कार्य; परिणाम : 'नामाचे दहा ठाए :'ह्न लीचउ ६०.२. वस्तू : 'मग ते तीन्ही ठाए (आंगी, टोपरें, उपानही) काखे सूनि... गेले :' - लीचउ ६८.

**ठाएठाव** वि. १. जागोजागी. २. (ल.) तत्काळ.

**ठाक** क्रिवि.पूर्णपणे :'आईचं डोकं ठाक निर्विकार होतं.'- देश ६१.

**ठाक** पु. ठसा.

**ठाक(का)ठिकी** स्त्री. १. सुव्यवस्था; बेतबात; जम; जेथच्या तेथे लावणे किंवा घालणे (सामान, वस्तू, पोशाख); व्यवस्था; नीटनेटकेपणा; चापचोप.२.डागडुजी; दुरुस्ती; नीट करणे; टापटीप. [ठीकचे द्वि.]

**ठाकठिक्या** वि. टापटिपीने वागणारा; व्यवस्थित.

**ठाकठीक** वि. क्रमवार, जेथच्या तेथे, व्यवस्थितपणे लावलेला; नीटनेटका; बरोबर : '....मुंबईत कपड्यालत्त्यांची ठाकठीक जरा अधिकच असते.' - दुर्दम्य ५९.

**ठाकठूक** स्त्री. ठोकाठोक; जुजबी दुरुस्ती : 'मोटारीची ठाकठूक करण्यापुरती माहिती आहे.' - डाली २९.

**ठाकठोक** क्रिवि. हातोड्याने ठोकले असता निघणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन.

वि. रोख; प्रत्यक्ष; तत्काळ : 'ठाकठोक माझी प्राप्ति। पंगिस्त न होती आणिकचि।' - एभा १२.४०

**ठाकण-णी** न.स्त्री. ठिकाण; स्थान; जागा :'तुका म्हणे वाणी। वेचों बैसोन ठाकणीं।' - तुगा ३४६९. [सं. स्थान]

**ठाकणे** अक्रि. सजणे; शोभणे. [सं. स्था]

**ठाकणे** अक्रि. १.(उभा या शब्दाने आरंभ होऊन)स्तब्ध राहणे; स्वस्थ उभे राहणे. २. स्वीकारणे : 'जिहीं ठाकिलें चरणछत्र।' - एभा १९.११४. ३. जवळ येणे; प्राप्त होणे : 'जैसी नाव थडिये ठाकितां।'- ज्ञा २.३४९. ४. थांबणे; बंद होणे : 'जें यमनियम ठाकती। तेथ इंद्रियें सैरा राहाटती।'- ज्ञा १.२४९. ५. चेष्टा करणे. ६. मर्जी असणे; आवडणे : 'मग करूं देवा ठाके तैसें।'- ज्ञा ११.३८. ७. पोहोचणे : 'ठाकावया निजबोधासि।'- एभा ७.३५१. ८. गाठणे : 'तेथें उचलिता पाउलीं। निजबोधाची पव्हे ठाकली।'- एभा १०.१९४. ९. पटणे; खरे वाटणे :'श्रवण ऐकोनि नास्तिक। देवोचि नाहीं म्हणती देख। आहे म्हणती ते पोटपाइक। आम्हांसि विशेष ठाकेना।'- एभा ११.७०३. १०. घडणे; शक्य असणे : 'ठाके तो करावा जपतप।'- एभा १८.३१८. ११. प्रत्यक्ष होणे; अनुभवणे : 'माझे ठाकावया चिद्रूप।'- एभा १९.२५७. १२. नखरेल वागणे; खोटे खोटे वागणे. १३. मस्ती करणे. १४. योग्य होणे; अनेक ठिकाणी असणे, राहणे :'आणि बुद्धि होणियेरा सारिखी ठाके।'-ज्ञा ११.३९७. (वा.) **ठाकून येणे** - न विसरता येणे; दत्त म्हणून उभे राहणे : 'जिवा जन्मदारिद्र ठाकूनि आलें।' - मश्लो १३८. [सं. स्था, स्तक्]

**ठाकत** वि. साध्य; हातून घडण्यासारखे : 'हें ठाकतें कीं नागवे। हेंही नेणें।'- ज्ञा १४.१९०.

**ठाकर** पु. सह्याद्री पर्वताच्या भागातील एक आदिवासी जमात.

**ठाकल, ठाकी** पु. खाडा; नागा; खंड. (व.)

**ठाकसठिकस** वि. १. पहा : **ठाकठीक**. २. टापटिपीचा; नीटनेटका (वेष, घरातील सामान इ.).

**ठाका** पु. १. नादयुक्त आघात; ठोका; जोरजोराने भांडण; कडाक्याचा तंटा; खणका; दंगा; गलका; धडाक्याचा आवाज (बडबड, तोफेचा आवाज, वादळाचा दणदणाट, हत्यारांचा खणखणाट); घडघडाट. २. जोराचा, एकसारखा सपाटा; तडाखा (वाचणे, पाठ करणे, अभ्यास करणे, गाणे, खेळणे, खाणे, भांडणे, काम करणे इ.चा). (क्रि. लावणे). [ध्व. ठण] (वा.) **० देणे, मारणे** - प्रतिष्ठेने मिळवणे.

**ठाकाठोका** पु. जोशाचे सांगितलेले भविष्य. (क्रि. उतरणे, पटणे, लागणे, लागू होणे, प्रत्ययाला येणे.). [ठोकाचे द्वि.]

**ठाकिजणे** पहा : **ठाकणे**

**ठाकी** स्त्री. १. चाल; रीत; मार्ग; पद्धत; सरणी; विशेष (भाषण, कृती इ.ची). (याचा उपयोग जेथे उतरणे, साधणे, आणणे या क्रियापदाशी जोडून करतात तेथे त्याचा अर्थ अनुकरण करणे असा होतो.). २. पखवाज वाजवण्याची एक तऱ्हा. ३. युक्ती; खुबी; कला; रीत; योग्य सरणी किंवा व्यवस्था. ४. घशात खाकरा आणून चोरांच्या टोळीला केलेला इशारा. (क्रि. देणे, वाजवणे.).

**ठाकी** स्त्री. योग्यता : 'आर्तु आपुली ठाकी पैं विसरे।' - ज्ञा ११.९१.

**ठाकी** स्त्री. चालू कामात आलेला व्यत्यय; खंड; खाडा; ठाकल. (व.)

**ठाकी** वि. बाकी; थकित.

**ठाकु(कू-कौ)र, ठाकुरजी** पु. देव; देवाची मूर्ती; ईश्वर. [हिं.]

**ठाकु(कू)र, ठाकोर** पु. १. एका आदिवासी जमातीचे नाव व तीतील व्यक्ती. २. रजपूत किंवा भिल्ल टोळीचा नाईक, पाटील, सरदार (राजपुतान्यात). ३. मालक; मानाची एक पदवी; काही जातींचा उपाध्याय. [हिं; सं.तस्कर](वा.) **ठाकुरदास मांडून बसणे** - डौल करणे; (शुद्धतेचे, पवित्रतेचे) प्रस्थ माजवणे.

**ठाकुरद्वार-दारा** न.पु. देऊळ; देवघर; गाभारा. [हिं.]

**ठाकुली** स्त्री. दोन दगड मांडून तयार केलेली लहान मुलाची शौचाची सोय : 'ठाकुलीवर बसून मोठ्याने श्लोक म्हणत बसतो वेडगळ.'- श्याआ ११०. (को.)

**ठाकूनठो(ठु-ठि)कून** क्रिवि. प्रसंगानुरूप; अनेक युक्तीने; कलाकौशल्याने; सावधगिरीने; दक्षतेने; निगा राखून; अनेक हिकमती करून. (क्रि.

राखणे, करणे, चालवणे.)(ठोकणे या क्रियापदापासून बनलेले असे पुष्कळ शब्द आहेत.).

**ठाकेठोक** वि. चलाख; हुशार; ठाकठीक : 'ठाकेठोक ठेगाई करून पाहिल पत त्याची।' - पला ७०.

**ठाक्या** पु. पत्रा बनविणाऱ्यांचा हातोडा. [ध्व.]

**ठाचणे** सक्रि. ठासणे; ठेचून भरणे.

**ठाचा** पु. (बंदुकीची नळी) स्वच्छ करण्याचा बोळा (मारणे) : 'श्रीपतीने बंदुकीला ठाचा मारता मारता धोक्याचा इशारा दिला.' - नभ ४२.

**ठाटरा** पु. बांबूची जाड ताटी. (झाडी)

**ठाटूक** क्रिवि. नुकता; आताच.

**ठाठू** न. १. बंदुकीच्या सोडलेल्या गोळीचा ठूं ठूं असा आवाज; पुष्कळ वाद्यांचा आवाज इ. २. पहा : **छांछूं** [ध्व.]

**ठाठूरणे** अक्रि. थंडीने अवयव आकुंचित होणे, गारठून जाणे.

**ठाडा-डी-डे** वि. खडा; उभा; सरळ; ताठ असलेला. [हिं.; सं. स्तब्ध]

**ठाडेसरी** वि. पैसा, वस्त्रे यांचा अभाव असलेला; कंगाल.

**ठाण** न. १. घोडे बांधण्याची जागा; तबेला; गोठा. २. महालातील मुख्य गाव; ठाणे. ३. स्थान; जागा; प्रदेश. ४. धक्का; ठिकाण; आसन; बैठक. (क्रि. चालणे, ढळणे, हालणे, डगडगणे). (ल.) आपल्या स्थानावरून घसरणे; डळमळणे. ५. (ल.) धैर्य. [सं. स्थान] (वा.) ० **देणे** - बैठक मारणे. ० **मांडणे** - अढळ आसन ठोकणे; अटळ उभे राहणे. ० **सोडणे** - आसन सोडणे; पलायन करणे; तळ सोडणे; खुंटा उपटून (घोड्याने) पळून जाणे.

**ठाण** न. रूप; आकृती; शरीराचा आकार किंवा बांधा : 'तुझें ठाण केवढें।' - ज्ञा ११.२७४.

**ठाण** न. बाण मारतेसमयी उभे राहण्याचा एक प्रकार (एक गुडघा जमिनीवर टेकून इ.); शरीराची ठेवण, पवित्रा : 'करीं धनुष्यबाण अंतरी बिंबलें ठाण।' - दावि १६४. [सं. स्थान]

**ठाण-न** न. १. कापडाचा तागा. २.कापडाचा गठ्ठा. [सं.स्त्यान]

**ठाण** पु. मान; गर्व; ताठा. [सं. स्त्यान]

**ठाणई** स्त्री. १. लाकडाची समई; वर पणती ठेवण्याची लाकडी, लोखंडी घडवंची. २. खुजट स्त्री, मुलगी. ३. उठून दिसणारी मुलगी. (ना.)

**ठाणक** न.१. ठिकाण; स्थान; उतरण्याची किंवा राहण्याची जागा. २. किरकोळ व ग्राम्य देवतांचे ठिकाण; देवस्थान; देऊळ : 'मला वाटले, ठाणकावर जावे.' - इंधन ११३.

**ठाणकन-दिशी** क्रिवि. दाणकन; ठाण असा आवाज करून.

**ठाणगा** पु.१. किल्ल्यातील नायकवडी (किल्लेदाराच्या हाताखालचा). (को.) २. तालुक्याच्या ठाण्यातील जमाबंदी विभागातील शिपाई; एक हलका अंमलदार. ३. ठाणेदार. ४. वस्ताद; ठक; फसव्या. (व.)

**ठाणगुलाम** पु. घरगुलाम : 'दसपटीचें सतरा गांवी पाटीलकी हक्क हक्कदारी व ठाणगुलाम असतील त्यासुद्धां वंशपरंपरेने चालविणे.' - ऐको ४७७.

**ठाणठकारे** न. शरीराची ठेवण : 'ठाणठकारें अति उत्तम।' - एभा ६.४९.

**ठाणदूण** स्त्री. खाणखूण. (गो.)

**ठाण-दिपु** पु. स्तंभावरचा दिवा : 'सप्त टाळियांचा ठाण-दिपु।' - क्रिपु २१३.

**ठाणदिवी, ठाणवाई** स्त्री. १. पहा : **ठाणई** 'तेचि करूनि ठाणदिवी।' - ज्ञा ६.२३. २.(ल.) हालचाल न करता बसणे : 'त्याच्यापुढें ती नुसती ठाणवाईसारखी उभी राहिली.' - भाबा १५७.

**ठाणपट्टा** पु. ठाणास बांधायचा पट्टा, दोर : 'ठाणपट्टा व मुजाम नरम असावेत।' - अप १.१२२.

**ठाणपती** स्त्री. ठाणेदारीचा अधिकार किंवा दरक : 'हैबतराव यास या आढाण्याची ठाणेबंदराची ठाणपती सांगितली.' - ऐको.

**ठाणपालटाची शेती** वरचेवर स्थान बदलून करावयाची शेती; थारेपालट करून केलेली शेती : 'वरील दळ्यासारखी ठाणपालटाची शेती करणाऱ्या अनेक जंगली टोळ्या आहेत.' - मज्ञाज १३.

**ठाण(णे)बंद-दी** स्त्री. पशूची ठाणावरील कोंडणूक, अडकवणी. वि. ठाणावरच नेहमी बांधून ठेवलेला (घोडा इ.) : 'हत्ती ज्या बाजूला ठाणबंद करून ठेवलेले होते.' - वाघसिंह १३८. [हिं.]

**ठाणमाण** न. १. शरीराचा बांधा, ठेवण; आकृती; ढब; तऱ्हा : 'सिंहाकृति ठाणमाण।' - मुआदि १६.८२. २. डौल; आविर्भाव. वि. नीटस; नेटके : 'संसाराचें तारुं (कृष्णरूप) ठाणमाण दिसे.' -निगा.

**ठाणवई, ठाणवी** स्त्री. पहा : **ठाणई** १. [सं. स्थानदीपिका]

**ठाणांतर** न. पहाऱ्याची जागा; चौकी : 'प्रत्याहाराचिया ठाणांतरीं।' - ज्ञा १३.५०७.

**ठाणांतरी, ठाणां(नां)तरि(री)या** पु. पहारेकरी; ठाणेकरी; राखणदार; जागत्या : 'ठाणांतरियां जैसा पांडवा।' ह्व ज्ञा १६.३४०.

**ठाणी** जातचौगुल्याचे एक नाव.

**ठाणीठुणी** न.अव. लहान मोठी ठाणीः 'हैदरखानाकडील फौज अतःपर ठाणींठुणींयांचे गळीं पडत नाहीं.' - ऐको ४७७.

**ठाणे** न. जागा; स्थान. [सं. स्थानम्]

**ठाणे** न. १. तालुक्याचे मुख्य ठिकाण; दिवाणी अंमलदाराचे, अधिकाऱ्याचे, सैन्याचे वगैरे ठिकाण, जागा : 'नऊशें स्वार झाले ठार ठाणें द्यावें रस्त्याला।' -ऐपो १८५.२.शिपायांचे राहण्याचे स्थान, गढी, किल्ला इ. ३. पोलीसचौकी; गेट. ४. (ल.) पाहुण्याचे फार दिवस राहणे, मुक्काम.(क्रि. देणे, करणे.). ५. घोड्याचा तबेला. [सं. स्थान] (वा.) ० **घालणे** - १. कायमचे वसतिस्थान करणे. २. मोहीम करणे; स्वारी करणे. ३. तळ पाहणे. [क. टाण-णे]

**ठाणे-ण** उक्रि. स्तब्ध होणे; बंद पडणे.

**ठाणे** न. स्वरूप; आकार; स्थिती : 'इये नाहीं हेचि रूप। ठाणें हें अति उमप।' - ज्ञा १४.८८.

**ठाणेकर-दार** पु. ठाण्यावरील अधिकारी. यांचा दर्जा फौजदाराच्या हाताखाली असे.

**ठाणेसरी** पहा : **ठाडेसरी**

**ठाणो(णौ)री** वि. युद्धात मेलेला : 'म्हणौनि काम वैरी। जाला जेथ ठाणोरी।' - ज्ञा १८.१०६१. पु. वीरश्री अंगात संचारलेला योद्धा : 'ठाणोरियाचे मवावे। आणिकीं धाय।' - ज्ञा १८.४३९. [सं. स्त्यै, स्तान]

**ठान, ठानबंद-दी, ठानमान** पहा : **ठाण** इ.

**ठापटी** स्त्री. कायमचा निर्णय; अद्दल; थापड. (झाडी)
**ठापठेप** स्त्री. ठाकठीक; नीटनेटकेपण; टापटीप. (ना.)
**ठाम** वि. १. कायमचा; दृढ; घट्ट; ठरलेले; स्थिर; नक्की; अचल; निश्चित; पक्का; भक्कम. (क्रि. करणे). २. कायमची (रक्कम); सर्व हक्क मिळवून किंवा वजा करून राहिलेली (वट्ट रक्कम). ३. निग्रही; निश्चयी; खंबीर. [सं. स्तिम्]
क्रिवि. मापाप्रमाणे; टंकोटंक (वजन, माप यांसाठी याचा उपयोग करतात.) [हिं.]
**ठामठुमी** स्त्री. हौसमौज : 'अगदी जुन्या पद्धतीनं ठामठुमीत लग्न करायचे बेत घरात चालले होते.' – लामण ३.
**ठामणे, ठावके** न.(तूप, तेल इ. ठेवण्याचे)एक प्रकारचे भांडे; पात्र.
**ठामपणा** पु.पक्केपणा : 'पदक्षेपात पुन्हा ठामपणा आला.'– दुर्दम्य ३०.
**ठामसठोमस** वि. लठ्ठ. (झाडी)
**ठाय** न. ठाव; ठिकाण; स्थान; आश्रय; आसन.[सं. स्थान] (वा.) **ठायी करणे** – सिद्ध करणे : 'आत्मा अविकारी पाही। येणें निरूपणें केलें ठायीं।'– एभा २८.४९६.**ठायी घालणे**– ठिकाणी नेमणे, ठेवणे. **ठायी पडणे**–१. पत्ता लागणे; सापडणे; आढळणे; उघडकीला येणे : 'ठायीं न पडे कै गेली।'– मुरंशु ३३३. २. मेळ असणे; यथायोग्य करणे; अनुकूल होणे; स्वभाव जमणे.
**ठाय** पु. १. अन्न वाढण्यासाठी ठेवलेले पान, पत्रावळ. यावरून २. (ल.) जेवण्याचे ताट; भोजनपात्र. [सं. स्थान]
**ठाय** स्त्री. (वादन) मंदताल; (ध्रुपद म्हणताना, तबला पखवाज वाजवताना) सावकाश वाजवण्याचा किंवा म्हणण्याचा प्रकार; विलंबित मध्यलयीच्या एका आवर्तनाला लागणारा वेळ. [सं. स्थान]
**ठाय** स्त्री.व्यालेल्या गाईचे दूध व वासरू या दोहोंना म्हणतात.(राजा.)
**ठाय** स्त्री. प्रकार.
**ठाय** स्त्री. गुरे, भांडी इ. मोजताना संख्यादर्शक म्हणून हे क्रियाविशेषण लावतात. उदा. दोन ठाय, तीन ठाय. [सं. स्थान]
**ठायक** वि. नेमका. (व.)
**ठायचूक** वि. १. चुकलेला; भलत्या जागी ठेवलेला; भलताच; विपरीत. २. हरवलेली वस्तू कोठे ठेवली याचे भान नसणारा; ती वस्तू.३. स्वतःला भटक्या समजणारा.
**ठायठिकाण–णा** न.पु. पहा : **ठावठिकाण–णा**
**ठायठिके** वि. स्थिर; दृढ :'तेथ राहोनि ठायठिकें।'–ज्ञा १०.७४.
**ठायदुग(गु, गू)ण–न** स्त्री. धृपद इ. सावकाश म्हणण्यासाठी लागणाऱ्या कालात ते दोनदा म्हणणे किंवा मृदंग नेहमीपेक्षा दुप्पट गतीने वाजवणे.
**ठायपालट** पु. राहते घर बदलणे; थारेपालट.
**ठायबसल्या** क्रिवि. बसल्या बसल्या; बसल्या जागी; घरबसल्या; एके ठिकाणी बसून; आरामशीर (चाकरी, रोजगार, धंदा, व्यापार, पगार, जेवण, गुजराण इ. शब्दांबरोबर योजतात.).
**ठायवरी** क्रिवि. येथपर्यंत : 'कर्मी हा ठायवरी।'ह्न ज्ञा १८.६८.
**ठायी(ये)ठाव** अ. १. जेथल्या तेथे; नेमका : 'त ठायीं ठावो पडे। नासाग्रपीठीं।'– ज्ञा ६.२०४. २. जसा हवा तसा : 'तेव्हां ये वासनागर्भे। ठायेठावो।'– ज्ञा १४.९४. ३. पूर्ण : 'तैं ठायेठावो विलुचि होये।'– ज्ञा ८.१५६. ४. तत्काळ; वास्तविक; खरोखर.
**ठायींचा** वि. मूळचा.
**ठायेठिके** अ. ठाकठीक.
**ठार** क्रिवि. १. (क्रियापदाचा गुणदोष दाखवणारे क्रिवि. अव्यय. ज्या वेळेला एकदम व पुरेपूर तोटा, नाश, घात, हानी दाखवायची किंवा करायची असेल तेव्हा हे योजतात.) ताबडतोब; जागचेजागी; पार; अगदी; मुळीच. (क्रि. मारणे, करणे, होणे इ.) : 'ठार कामाला जायचा नाही.'– खळाळ १२.२. मारलेला, बुडलेला. ३.(एकदम जेथल्या–तेथे, जागच्या जागी) नाश. [सं. स्थावर; हिं.]
**ठालाठेल** क्रिवि. भरगच्च; खच्चून भरलेले : 'ठालाठेल भरलेला गावगाडा.'– गांवगाडा १८०.
**ठालीठुली** पु. डहाळी; काटकी कुटकी; झाडाची लहान फांदी.
**ठाव** पु. १. तळ; खोली; बूड (विहीर, तळे, खाडा इ.चे). २. (ल.) बूड; शेवटची मर्यादा; खोली; हद्द; सीमा; अंत. ३.(ल.) अज्ञात स्थान; प्रदेश (हरवलेल्या, शोधलेल्या वस्तूचा). (क्रि. लावणे, लागणे.). ४. जागा; स्थान; आश्रय; वस्ती; ठिकाणा; अधिष्ठान; बैठक; तळ. ५. मोकळी व स्वच्छ जागा; प्रदेश; अवकाश. ६. पत्ता; ज्ञान; मागमूस; ठावठिकाणा; थांग : 'ठाव नाहीं बापाचा। अकुळी साचा श्रीकृष्ण।'– एरुस्व २.३. ७. नग; वस्तू. (व.)[सं. स्थान; क. ठावु] (वा.) **० आणणे** – बुडी मारून तळाची माती आणणे :'पाण्यात लपतो, खेळतो, ठाव आणतो.'–भासं ६६.**० करणे**–१. पाटाचा नवरा करणे.(व.) २. जेवलेल्या जागी शेण लावणे. **० घेणे, पाहणे, (खडा टाकून) ० पाहणे**– १. तळ शोधणे; तळी जाणे; खोली पाहणे; बुडीद टाकून मोजणे; थांग किंवा शोध लावणे. २. अजमास काढणे; मनाची परीक्षा करणे. **० पुसणे, फेडणे** – नाहीसे करणे : 'निवात कवचांचा ठावो फेडिला।' – ज्ञा १.२००. **(चित्ताने, मनाने) ० सोडणे** – घाबरणे; चलबिचल होणे; बेभान होणे : 'आणि म्हातारीच्या काळजानं ठाव सोडला.' – ऊन १२१. **० सुटणे** – धीर सुटणे; चलबिचल होणे.
**ठाव–ओ** पु. स्त्री. १. समय; प्रसंग : 'हा ठाओ विपरीतुं : आम्हां धात्रा जोडला :'– शिव ७३९. २. पदार्थ; वस्तू : 'सीं. बी : चुल्ल : चिमुटि : यां चहुंमध्ये न गमे तरि एकु ठाओ आपजवीजेः' – लीचउ ७८.
**ठाव** पु. पहा : **ठाय** १,२ : 'बारा हजार लाविला ठाव।'– ऐपो ४२. [सं. स्थान] (वा.) **० करणे** – जेवण वाढणे : 'उमाइसीं ताट वाढीलें : सारंगपंडितांसि ठावो केला :'– लीचपू १२५.
**ठाव** पु. भाव; मुख्य उद्देश. [सं. स्थान]
**ठाव** पु. (ल.) जनावर. (व.)
**ठाव** पु. टाव; टाहो.
**ठाव** सक्रि. स्थापणे; राखणे.
**ठावक–कां–ले–ला** पु. न. १. भोजनपात्र. पहा : **ठाय**. २. दिवा ठेवण्याचे एक प्रकारचे भांडे. पहा : **ठामणे** : 'एक ठावक आण आपल्या दिव्याला.'–एहोरा २.२५. ३. पणती.४. जागा.

**ठावका, ठावठाका** वि. माहीत असलेला; ठाऊक; ज्ञात.

**ठावचूक, ठावपालट** पहाः **ठायचूक** इ.

**ठावठिकाण-णा** न. (स्थान सांगणारा) पत्ता; नक्की जागा; मागमूस; माहिती : 'देवस्थानाचा मात्र ठावठिकाणा उरलेला नाही.'– खर्डेघाशी ९९.

**ठावठीक** न. कामधाम : 'तिला घरचं ठावठीक कांहीं येत नाहीं.' – कोसला ६.

**ठाकठीक** वि. नीट; व्यवस्थित; सरळ : 'डोंगराचा घाटु चढलेः मग गोसावी घाटाचेया माथेयावरि ठावंठीकु बीजें करितातः'– लीचउ ६५४.

**ठावणे** अक्रि. राहणे : 'लावि आंत ठाऊनि कोपट।'–अमृता ४.४.

**ठावणे** सक्रि. १. ठेवणे. २. स्थापणे; राखणे : 'फौज ३,००० आहे. पायदळ २,००० पर्यंत आहे. नवे लौक आल्यास ठावतात. परंतु राऊत कोणी आतां येत नाहीत.'– ऐलेसं ५४८०. [सं. स्थापय]

**ठावर** पु. गळू; गाठ (एकदा जिरून पुन्हा उत्पन्न झालेली).(क्रि. धरणे).

**ठावरक, ठावरी** क्रिवि. पर्यंत; पावेतो : 'आतां ठावरक मी जागाच होतो जी.'ह्र अगतिका ९३.

**ठावा** वि. ठाऊक; ज्ञात; माहीत : 'ठावा नाहीं ऐसा होता येथें।' –तुगा ९७. [क. टाऊके]

**ठावा** पु. बाजेचा किंवा पलंगाचा खूर; पाय. (व.ना.)

**ठावे** न. ठिकाण.

**ठावे** वि. ठाऊक : 'आपणाला जे 'ठावे' ते दुसऱ्यास सांगितले पाहिजे.'– वक्तृत्व ७.

**ठावो** आमंत्रण; बोलावणे : 'राळेयाचे खचिटें रांधिलें : मग तयासि ठावो केला :' – दृपा २७.

**ठावोवरी** क्रिवि. पर्यंत; पावेतो.

**ठाशीव** वि. ठाम; जोरदार : 'तातूंचे ठाशीव बोलणे ऐकून वऱ्हाडाच्या जिवात जीव आला.' – आआशे ४३.

**ठास** पु. चाष किंवा तास पक्षी. [सं. चाष]

**ठास** वि. १. दृढ; टणक; कठीण (अतिशय दाबल्याने किंवा ठोकल्याने). २. अत्यंत उच्च; कर्कश (स्वर). ३. (ल.) निश्चित; साफ; निखालस; स्पष्ट (भाषण); विचारपूर्वक व दृढ निश्चयपूर्वक केलेली (युक्ती, गोष्ट); खरी, चांगल्या आधाराची (बातमी); पक्का; अढळ; घट्ट. पहा : **ठाम**. ४. समजूत. ५. खडतर. [हिं.] (वा.) ० **देणे** – टक्कर देणे : 'घाटामाजी सारे जमा होऊन फितूर गाईकवाडास बरे वजेने ठास देणे.' – ऐको.

**ठासणी** स्त्री. १. खच्चून भरणी; ठेचणी. २. गजगोटा; दारू ठासण्याचे लाकूड. (व.) ३. ठाम, बिनचूक बेरीज, हिशेब इ. ४. बंदुकीचा एक प्रकार : 'ठासणीची बंदूक, गोफणी घेऊन... पोरे रानामाळातून कांड्याकरकोच्यामागे धावू लागली.' – बनगर ६१.

**ठासणे** उक्रि. १. खच्चून, ठेचून भरणे; कोंबणे; कोंदणे; घट्ट बसविणे. २. अनेक रकमा एकत्र मिळवून केलेली बेरीज; एकत्र करणे. ३. (ल.) भरपूर पिणे (दारू इ.). ४. बंदुकीत दारू भरणे. [सं. अधि+ आस्, तस्]

**ठासपंप** पु. हवा भरण्याचा पंप : 'सायकलट्यूबमध्ये वारा भरण्याच्या पंपाला ठासपंप म्हणतात.' – निप्र १५३.

**ठासर** वि. पैसेवाला; श्रीमंत (कूळ).

**ठासा** पु. (विणकाम) कापडाच्या विणलेल्या भागाची गुंतागुंत नाहीशी करून तो साफसूफ व पक्का करण्यासाठी शिते किंवा फणी यांनी ठोकणे.

**ठासून** क्रिवि. ठामपणे; अविचलित; न हलता; न डगमगता; बेदरकारपणे; आग्रजपूर्वक खात्रीपूर्वक.

**ठाळणा** पु. मोटेचे पाणी साठवण्याचा हौद; थारोळे; थाळणे. (व.)

**ठाळा** पु. झाडाची लहान डहाळी. (बे.)

**ठांगय** वि. भाकड : 'तुझी म्हईस ठांगय नको रुसू लतखोऱ्या.' – बगाणी १११. (अहि.)

**ठांगळ** वि. लाथाळ (गाय इ.). पहा : **टांगळ**

**ठांगाड** स्त्री. म्हैस (तिरस्कारार्थी). (व.)

**ठांगाय** वि. वांझ; म्हातारी. (व.)

**ठांगाळणे** सक्रि. (ग्राम्य) हडहड करणे; धिक्कारणे; सोडणे; नाकारणे.

**ठांब** पु. झाडाचा (विशेषतः हळदीचा) लहान रोपा.(कु.) [सं. स्तंभ]

**ठांबी** स्त्री. वासा; डांब; स्तंभ. [सं. स्तंभ]

**ठांबेठोक** वि. धडधाकट; धीट; मजबूत; धीराचा : 'चार माणसे वागविणारें माणूस ठांबेठोक पाहिजे.'– हिखा ४४.

**ठिक** पु. चट्टा; डाग.

**ठिक** न. अलंकार : 'हिरे निळेयाचीं ठिकें।' – क्रिपु २७०.

**ठिकठवळ** वि. ठळक; ठसठशीत : 'धुंधार आळंकार सोनेआचे । ठिकठवळ माणिक-मोतियांचे ।' – क्रिपु ३०६.

**ठिकठाक** पहा : **ठाकठीक**

**ठिकडा-डे** न. अंगठीतील रत्न, खडा.
वि. सुंदर; नमुनेदार (रत्न, आश्चर्यकारक वस्तू). ((ल.) घोडा; माणूस; मूल इ.) : 'नाजुक रुपडें दिपडें ठिकडें जिकडे तिकडे असकारा।' – पला ४.१२.

**ठिकडे** न. चौकोनी तुकडा. (व.) [हिं. ठिकडा]

**ठिक(का)ण** न. बाग; जमीन. (गो.)

**ठिकणाती** पु. बलुत्या; बलुतेदार इ.

**ठिकणे** अक्रि. १. पावंडावर चालणे; उडत चालणे; बागडणे (घोडा, हरीण इ.). २.(ल.) ठमकणे; ठुमकत चालणे (स्त्रीने).

**ठिकर** वि. पहा : **ठिक्कर**

**ठिकरी** स्त्री. १. चीप; तुकडा (दगड, मडके, बाटली इ. चा); कपरी : 'कां वीजु वर्षोनि आभाळ। ठिकरिया आलो भूताळ।' – ज्ञा १८.४३४. २. फोडणीचा एक प्रकार. दगडाची खापरी तापवून तीवर लोणी, जिरे इ. घालून ती कढीत बुडवतात. तसेच लोणची किंवा कढी तिच्यावर ओततात : 'सांबारीं कथिका बहु ठिकरीच्या.'ह्र कचेसुच ८. या कृतीने कढीला आलेला रुचकरपणा. ३. फुटके, तुटके भांडे, मडके. ४. (उपहास) पत्रावळ लावण्यासाठी आणलेले लहान पान. ५. खापरी. ६. डोके; कवटी. (झाडी) ७. चकती; टवका. ८. चिरा, भेगा (थंडीमुळे बोटांना, ओठांना पडणाऱ्या). [हिं.; सं.तश्च्, तिघ्, स्थग] (वा.) ० **तापणे** – सपाटून भूक लागणे.

**ठिकरीचा खेळ** १. बिछान्यावरील उड्या मारण्याचा खेळ. २. दगड,

खापरी यांची वाटोळी बारीक चकती घेऊन खेळायचा मुलींचा एक खेळ.

**ठिकरे** न. खापर : 'म्हातारपणीं अपेशाचें ठिकरें घेतलें.' – ऐको ४७८.

**ठि(ठी)कलग** पु. रत्नजडित अलंकार; पहा : **टिकलग** : 'म्हणौनि आंगाथिले ठिकलग' – वच्छाह३७; 'भणऔनि आंगाथिलें ठीकलग ।'–वच्छाह १७८.

**ठिकला** क्रिवि. यथोचित; बरोबर; नेमके; ठीक.

**ठिकला** वि. १. ठिपके असलेली (कवडी इ.). २. बेशुद्ध (मासा).

**ठिकवणी** स्त्री. जडावाचा दागिना : 'ठिकवणीया पारखो न सीखे।'– उगी ५३९.

**ठिकवण्या** पु. रत्नपारखी; जोहरी : 'तो नेणे रत्नजाति जाणो ठिकवणीये।'– उगी ६७४.

**ठिकसठाकस** पहा : **ठाकसठिकस**

**ठिकस** वि. १. उचित; ठीक; नीटस; योग्य असा : 'ठिकसां बोलां घोषु पडे ।' – शिव २०. २. रत्नजडित.

**ठिका** वि. लटका; खोटा : 'राजाहि बोलतो की, त्याणी येऊन समक्ष मजला पाहोन ठिका म्हटलें तरी ते क्षणीं मजला मारा.' – पेद ४०.१०८.

**ठिका–क्का** पु. मोठे शेत. (व.)

**ठिकाठोक** वि. १. ठीकठाक; योग्य; बरोबर; तंतोतंत. २. ठेंगेठोक. [ठीक द्वि.]

**ठिकाण** विश्वसनीय; पक्के : 'ऐकले ते तर ठिकाण बाध (खोटे) लटके व्हावेसे नाहीं, इतक्यांवर न कळे.'– ऐको.

**ठिकाण–णा** न. पु. १. (सामा.) स्थान; जागा; स्थल; वसतिस्थान; घर. २. अज्ञात स्थान; पत्ता (हरवलेल्या किंवा शोधलेल्या वस्तूंचा)(क्रि. लावणे, लागणे.) : 'कशालाच काही ठिकाणा नाही.' – अयेवाफु. ३. आधार; पाया; थारा (बातमी इत्यादींचा); आश्रय. ४. वंशपरंपरागत जागा; गाव; राहण्याची जागा; घर; वस्ती. ५. (ल.) बूड; तळ; खोली; मर्यादा; थांग. [सं. स्थान] (वा.) **ठिकाणचा तुटणे** – जागा, कळप, वंशपरंपरागत घर इत्यादींपासून दूर होणे; ताटातूट होणे. **ठिकाणचा विंचू उतरणे, जाणे** – जेथे विंचू चावला त्या जागेची फुणफुण किंवा आग नाहीशी होणे. ० **पुसणे, मोडणे** – झाडून झटकून टाकणे; समूळ नाश करणे. **ठिकाणावर आणणे, ठिकाणी आणणे, लावणे**– १. पूर्वीच्या जागी आणणे; पूर्वस्थितीवर आणणे. २. परत मिळविणे. **ठिकाणी येणे, लागणे** – जेथल्या तेथे येणे; बरोबर बसणे; परत आणणे; बस्तान बसणे; परत मिळणे. **ठिकाणी लागणे** – मरणे. **ठिकाणी लावणे, पाडणे**– १. मूळ ठिकाण शोधणे; मूळ बातमी मिळवणे. २. ठार मारणे; पत्ता पाडणे, काटणे.

**ठिकाण–णा** न.पु. १. मिलाफ; एकवाक्यता; सुसंगती (भाषण, वर्तन यांची). २. सूचक चिन्ह; खूण; अटकळ (भावी गोष्टीची). ३. स्वराची योग्य उच्चता; तारस्वर. (क्रि. धरणे, साधणे, राखणे, सोडणे, सुटणे.). [सं. स्थान]

**ठिकाण–णा** न.पु. (नकारात्मक योजल्यास) पूर्ण अभाव. (क्रि. नसणे).

**ठिकाणदार** वि. ज्याला वतनी जागा, घर, धंदा, काम इ. आहे असा माणूस; जमीनदार. याच्या उलट उपरा.

**ठिकाणमकाण** न. (मोघमपणे) वसतिस्थान; राहण्याची जागा; स्थावर.

**ठिकाणसूध** वि. माहितीचा; माहितीतला : 'ब्राह्मण ठिकाणसूध राजपुरीहून बाणकोटास आला.' – ऐको ४७८.

**ठिकारणे–ने** क्रि. १. थकणे. २. गळणे.

**ठिकारला** वि. थकलेला.

**ठि(ठी)काळणे** वि. भेदणे : 'शरीराचां सरांटी : ठिकाळला चैतन्यपुटीः' – उगी ४४७.

**ठिकाळे, ठिको(गो)ळे** न. १. लहान पत्रावळ. २. (ल.) जमिनीचा लहानसा तुकडा. ३. शेतातील अलग राहिलेला तुकडा.

**ठिकी** स्त्री. नाकात घालण्याची फुली; एक दागिना. (गो.)

**ठिकी** स्त्री. झाडाच्या बुंध्यापासून काढलेला लाकडी तुकडा; चाकाचा लाकडी तुंबा.

**ठिकी–क्की** स्त्री. गोणपाटाची शिवलेली कणगीसारखी मोठी पिशवी.

**ठिकी–क्की** स्त्री. १. रास; गंजी. २. इमारती लाकडाचा ढीग. ३. धान्याच्या पोत्यांची रास; नुसत्या धान्याची रास : 'पोत्याची ठिकी लावतांना मजूर जसे करतात....' – काभिं १२२. २. एका राशीत असलेल्या धान्याचे परिमाण.

**ठिके** न. १. तुकडा; भाग; ठिगळ; जागा; शेताचा तुकडा. २. ठिकाण; जागा. [सं. तिघ, स्थग]

**ठिके** न. डाग; तीळ; ठिपका (शरीर, रत्न यांवरील).

**ठिके** न. १. बोचके; गाठोडे (मालाचे, वस्तूचे). २. सुमारे पन्नास किलो धान्य बसेल असे लहान पोते.

**ठिकेकरी** पु. शेताचा मालक किंवा कर्दा.

**ठिकेबंदी** स्त्री. १. जमिनीचे तुकडे, भाग पाडणे; शेतीच्या उपयोगासाठी जमिनीची वाटणी करणे. २. शेतांचे मोजणी इत्यादींचे पत्रक.

**ठिकेवार** क्रिवि. १. (शेतांच्या) तुकड्यातुकड्यांनी किंवा भागशः (बसवलेला सारा किंवा काढलेले पीक). २. विक्रीसाठी एकत्र केलेल्या वस्तूंनुसार.

**ठिक्क** पु. पूर्ण : 'ठिक्क ओवळें.' – खेस्व ४३.

**ठिक्कर** वि. (अतिशय, खूप या अर्थाने काळा या शब्दाला जोडतात) काळा कुळकुळीत; फारच काळा.

**ठिक्कि** स्त्री. हरणाची उडी.

**ठिगळ–ळी–ड** न. स्त्री. जुन्या फाटक्या वस्त्राला लावलेली कळी, जोड, पट्टी; दुरुस्ती; छिद्र इ.ला जोडलेला तुकडा; कपड्याची दुरुस्ती. (क्रि. लावणे, जोडणे.). [सं. स्थग]

**ठिगळणे, ठिगळवणे** सक्रि. १. तुकडा जोडणे; पट्टी जोडणे; ठिगळ लावणे : 'येरयेरा जाहलिया भेटी। दोनी शेवटी ठिगळती।' – एभा ३८१; 'आदल्या दिवशी लोखंडी मोट ठिगळावयाला टाकली होती.' – बाब १०९. २. (ल.) गोळीने किंवा बाणाने जखम करणे; वाळवी इ.ने वस्त्र खाऊन भोके पाडणे; फळे ठिपक्यांनी युक्त होणे, अथवा डागळणे.

**ठिगुर** पु. डेंबुक माशाची एक जात. याच्या अंगावर काटे नसतात व याचा आकार सापासारखा असतो : 'त्याच्या मुठीत एक वळवळणारा ठिगुर होता.'– शेलूक ९७. (कु.)

**ठिगुळवाणे** वि. ओळखीचे, माहितीचे नसलेले.
**ठिचरे** न. उसण : 'ठिचरे माजामध्यें (कंबरेमध्ये) भरले आहे त्याणे उभे राहू देत नाही.' – ऐको ४७९.
**ठिणकणे** अक्रि. १. धुमसत धुमसत फार वेळ रडणे; स्फुंदणे. (को.) २. ठणकणे; ठुसठुसणे. [हिं.]
**ठिणगी** स्त्री. अग्निस्फुलिंग; अग्निकण; ठिंगळी. [सं. दहनी, धगनी] (वा.) **ठिणग्या गाळणे** – (एखादी वस्तू जोराने दुसरीवर आपटली असता चकचक होणे यावरून) अतिशय संतापणे; रागावणे.
**ठिप(ब)कणे** अक्रि. (एखाद्या वस्तूमधून किंवा पासून) थेंबथेंब पडणे; पाझरणे; गळणे; सांडणे : 'अभिषेक पात्रातून पिंडीवर पाणी ठिबकत होतं.'–रथचक्र १८०. [सं. स्तिप्]
**ठिप(ब)का** पु. १. थेंब; बिंदू; टिंब. २. कपाळावरील गंध इ.चा टिकला. ३.(ल.) अपकीर्तीचा डाग; कलंक. ४. तुषार; शिंतोडा.[सं. स्तिप्]
**ठिपकी** स्त्री. एक पक्षी.
**ठिपठिप–पा** क्रिवि. टपटप–टपटपा (पाण्याचा बिंदू गळताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे). [ध्व.]
**ठिपरी** स्त्री. अडथळ्याची खुंटी.
**ठिपसा** पु. ठिपका : 'अंगावर पांढरं ठिपसं असलेला साप सरारा खालती येत व्हता.' – चिताक २००.
**ठिबकसिंचन** न. १. शिंपण; सडा; शिडकाव; संततधार; गळती; प्रोक्षण. २. शेतीला पाणी देण्याची एक पद्धत.
**ठिया–य्या** पु. १. एखाद्या वस्तूच्या खाली दिलेला आधार; टेकण (कांबेरा, लहान खांब, लाकडाचा ठोकळा, दगड, पायरी, उथळे, ठेपसा); ठेपा. २. जागा; स्थळ; ठिकाण (ज्यावर एखादी वस्तू उभारलेली असते किंवा उभारण्याचे ठरवलेले असते असे); (गवंडीकाम) भिंत किंवा विहीर इ.चा कंगोरा; जई किंवा अरुंद सपाटी, बैठक. ३. जेठा मारून बसण्याची क्रिया. (क्रि. मारणे) : 'रात्री नव वाजेपर्यंत चांगला ठिय्या मारून दरवाज्यात बसून होतो.'– बाविबु ११. ४. थांबण्याचे ठिकाण; अडथळ्याची खुंटी. (झाडी) ५. प्रवेश; तुरमुंडी.(मुसंडी मारून घुसणे.). [सं. स्था, स्थिति] (वा.) **० देणे, मांडणे** – ठाण मांडणे. **० लावणे** – हजेरी लावणे : 'आम्ही पंचायतीच्या ऑफिसात सामान टाकले आणि सरपंचाकडे जेवणाचा ठिय्या लावला.'– चंदभू ४३.
**ठिल–ल्ल–ल्या** वि. ठेंगणा; जाडजूड व गबदुल; खुजा.
**ठिला–ली–ल्या** पु.स्त्री. दहीदूध ठेवण्याचे लहान मडके. वि. वाटोळा; जाडजूड; गट्टू.
**ठिवणे** न. पुरून ठेवलेला धान्याचा साठा; पेव.
**ठिसकत** क्रिवि. धुसफुसत : 'उरलेलं मागं ठिसकत सरकलं.' – श्रीयो ५४-५५.
**ठिसकत मुरकत** लचकत; मुरडत :'...गाण्याची एक ओळ ठिसकत मुरकत त्याच्यासमोर येऊन उभी राहिली.'–काजवा८४.
**ठिसका** पु. १. महत्त्व; टेंभा. २. डौल; बडेजाव. (झाडी)
**ठिसकारणे** अक्रि. फणकारणे; ठसकारणे : 'तेव्हां रावानें ठिसकारत म्हटलें.' – रभी.
**ठिसपिस** स्त्री. त्रास; दगदग.
**ठिसरणे** क्रि. रागावणे.
**ठिसराई** स्त्री. खरडपट्टी; हजेरी : 'मी... मामांनी तातूंची त्यांच्या तोंडावर केलेली ठिसराई निमूटपणे ऐकत होतो.'–आआशे३२८.
**ठिसरी** स्त्री. निंदा; तोहमत; कलंक; शिवीगाळ. (अव. प्रयोग) (क्रि. करणे, उडणे, उडवणे.).
**ठिसरी** स्त्री. १. चिरट्या; फूट; चिरा (थंडीने ओठ, बोटे यांना पडणाऱ्या). २. तडे पडलेली किंवा तुकडे होणारी पोळी, भाकरी (पीठ जुने झाल्यामुळे किंवा नीट न मळल्यामुळे).
**ठिसूळ** वि. १. भुसभुशीत; ढिसूळ; चटकन मोडणारे. २. (ल.) हलके; अशक्त; फुसके; पादरफुसका. ३. नाजूक; कोमल; मृदू; नरम.
**ठिंकाळणे** अक्रि. भेटणे : 'ठिंकाळला चैतन्यपुटीं।'– उगी४४७.
**ठिंगणा, ठिंग–ग्या** पहा : **ठेंगणा**
**ठी** स्त्री. १. एखाद्या ठिकाणी कामात अडथळा आल्यामुळे तेथून माणूस जेथे जातो ते ठिकाण, तसेच अगोदरचेही ठिकाण; एखादी गोष्ट सिद्ध करण्यास उपयोगी असलेली कृती. २. ठरावीक वेळ, स्थळ, मुक्काम : 'जे उपसंहरूनि कीजेल ठी।'– ज्ञा ७.३०. ३. योग्य, चोख व्यवस्था, युक्ती, मार्ग, रीत इ. ४. निंदा; दोष : 'जो अमृतासि ठी ठेवी। तो कांजी जैसा न सेवी।' – ज्ञा २.३६३.५. निश्चय : 'कां पृथ्वीचिया तृणांकुरां। होईल ठी ।' – ज्ञा १०.३००.६. स्मरण; आठवण : 'प्रतिक्षणीं काय ठी। करीतसे।' – अमृता ७.१८२. ७.मर्यादा; शेवट; सीमा : 'सकळां ज्ञानाचां शेवटी। करूनि आगमा ठी।'– ऋ ३. ८. स्थान; स्थिती; आधार : 'जैसा पूर्वापरां नदीं। समुद्रु चि ठी।।' – ज्ञा १५.४००. [सं. स्थिति] (वा.) **(ठीस) ठी मिळणे** – (एका अर्धवट कवीच्या गोष्टीवरून) होकार देणे; कबुली देणे; जुळणे; जमणे; अनुकूल असणे.
**ठीक** न. अंगठीतील खडा. पहा : **टीक, ठिकडे**
**ठीक** स्त्री. १. मोत्यांचा झुबका. २. अंगावरील डाग; तीळ. [सं. स्निघ]
**ठीक** वि. १. उचित; योग्य; यथार्थ; शुद्ध; सत्य; व्यवस्थित. २. पूर्ण; यथायोग्य; बेताचे. ३. बरोबर; कामचलाऊ. [हिं.]
**ठीकठाक** वि. यथायोग्य; क्रमवार; नियमित; व्यवस्थित; योग्यप्रकारे; सुधारलेले; नीट. [ठीक द्वि.; क. ठीकुठाकु] (वा.) **ठीकेठाक करणे** – वठणीवर आणणे : 'तरि ऐशा चाकरास ठीकेठाक केले पाहिजेत !'– श्रीयो २४४.
**ठीकठौळ** न.१. जडावाचे काम. २. लगाम (भावार्थाने) : 'सांघैपैला : दीघुमु आले : वाकुमु गेलें : ठीकठौळ हातीं ठेलें:' – लीचउ ५१२.
**ठीकताळ** पु. ताळमेळ; जुळणी; समरसता; तादात्म्य; मिलाफ; जम; एकवाक्यता.
**ठीकसेठाक** क्रिवि. व्यवस्थितपणे : 'तेथे जाऊन कधी बोलणे, कधी शिवणे, कधी कशिदा व जरीचे काम ही सर्व ठीकसेठाक चालली होती.'– पलकोघे ५०३.
**ठीटिकार** पु. ऐट; आढ्यता : 'ते सारंगपंडितासवें गोसावीयाचिया दरीसनासि आले : ठीटिकारें बैसले :' – लीचपू २१०.

**ठुकठुक-के, ठुकठुकणे** पहा : **ठकठक** इ.
**ठुकठूक** स्त्री. चिंता; हुरहूर. (झाडी)
**ठुकणे** सक्रि. उरकणे; संपणे; घडणे : 'बळितर्पण ठुकेना।' - एभा १८.२९९.
**ठुकरणे** सक्रि. काठीने हळूहळू मारणे; चुरा करणे; चेचणे; घासणे.(राजा., कु.)
**ठुकरावणे** सक्रि. झिडकारणे; बाजूला करणे; काढून टाकणे : 'हाताची पकड तशीच ठुकरावून धोंडूने त्याला सोडून दिले.'-धाधो ५६.
**ठुठा** स्त्री. १. बंदुकीच्या गोळ्यांचा ठुं ठुं असा आवाज, दणका. २. तोंडातोंडी; बाचाबाची; धसफस. [ध्व.]
**ठुठा** वि. थोटा; हात तुटलेला.
पु.पहा : **ठुंठी**
**ठुणक** स्त्री. वेडाची लहर. (क्रि. येणे).
**ठुणका** पु. १. रागाचा झटका; चीड; रुसवा. (क्रि. येणे). २. बुक्का; ठोसा : 'ठुणके लासणें चिमोरे।'- दास ३.७.२५. [ध्व.]
**ठुणगा-का** वि. ठेंगणा; ठुसका; लहानसर आणि गट्टू.
**ठुणगुण** पु. दांभिकपणा :'तुका म्हणे ठुणगुण देखे।'ह्नतुगा ३१३९.
**ठुणठुणणे** अक्रि. ठुसठुसणे; ठणका लागणे; फुणफुणणे.
**ठुणी-नी** आखूड डेळ; मेढ : 'आंतून दोन ठुण्यांचा आधार दिला होता.' - शिळान ६४.
**ठुन(ण)का** पु. तोडगा; मंत्रतंत्राचा इलाज; छाछू. (व.) [ध्व.] (वा.) ० **दबणे** - खोडकी जिरणे.
**ठुन(ण)ठुन-ण** स्त्री. कुरकुर; भुणभुण : 'तिची भूक जागल्याची ठुणठुण चालू असते.'ह्न शिळान ४४. (व.) [ध्व.]
**ठुबरा** वि. ठेंगा. पहा : **ठेंगणा**
**ठुमकणे, ठुमका** पहा : **ठमकणे, ठमका**
**ठुमकी** स्त्री. पतंगास दिलेला हिसका.
**ठुमठुमीत** पहा : **ठुमटुमीत**
**ठुमरी, ठुंबरी** स्त्री. शृंगारिक लावणी, काव्य; चिजेचा एक प्रकार. टप्प्याचे राग तेच ठुमरीचे राग असतात. ठुमरी गाताना तिच्यातील अर्थ अभिनयाने व्यक्त करावा लागतो.
**ठुया रावा** राघूची एक जात; पहा: **टिय्या** : 'ठुया राव्याविषयीं पेशजी पत्रें लिहिलें आहे.' - ऐको ४७९.
**ठुला-लू** वि. खुजट. (राजा.) पहा : **ठेंगणा**
**ठु(थु)ली** स्त्री. जाडीभरडी कणीक; जाड दळलेले गव्हाचे पीठ; सांजा; भरडलेले पीठ. [सं. स्थूल]
**ठुशी-सी** स्त्री. १. चोळीच्या बाहीखालचा तिकोनी कापडी तुकडा; कळी; बगल : 'ठुशीच्या आतली घामट बाजू तिनं पाहिली.' - रथचक्र. २. स्त्रियांच्या गळ्यातील एक सोन्याच्या टिकल्यांचा किंवा पेट्यांच्या खाली मणी लावलेला दागिना.
**ठुशी** स्त्री. मळणीनंतरचे थोडेसे दाणे राहिलेले गव्हाचे कणीस.
**ठुशी** स्त्री. १. बुक्की; ठोसा; गुद्दा; आघात; ढुशी. २. (ल.) टोमणा : 'जाणूनबुजून तिनें ही ठुशी दिली होती.' - के १.७.३०.
**ठुशी** स्त्री. सुरुंगाची दारू किंवा लहान सुरुंग.
**ठुशी-श्यो** वि. प्रसिद्ध. (कु.)
**ठुसकण-कर-दिनी-दिशी** क्रिवि. एकमेकांवर आपटलेल्या वस्तूंच्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन. [ध्व.]
**ठुसकर** वि. १. ठिसूळ; चटकन मोडणारे. २. लठ्ठ; फोपशा; गबदुल.
**ठुसका** वि. आखूड व बळकट; ठेंगणा व लठ्ठ; जाड व सणसणीत.
**ठुसका-रा** पु. १. पहा : **ठसका** २. भरीव. (राजा.)
**ठुसका-रा,ठुसा** पु. ठेंगणा. (ना.) ठेंगणाठुसका; खुजा. (व.)
**ठुसठुशीत-सीत** वि. पिकलेले व वेदना देणारे (गळू इत्यादी). पहा : **ठसठशीत** [ध्व.]
**ठुसठुस** स्त्री. करट किंवा गळू यात पू झाला असता होणारी वेदना. [ध्व.]
**ठुसठुसणे** अक्रि. गळू इत्यादीस ठणका लागणे; फुणफुणणे; धमकणे; वेदना होणे : 'पाय पण भारी ठुसठुसतोय.' - सवा १७.
**ठुसठुसा** क्रिवि. शरीरास वेदना होत असताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे; ठणका लागला असताना होणाऱ्या ठसठशीप्रमाणे. [ध्व.]
**ठुसा** पु. १. उसाचा करवा; लहान तुकडा (सोललेला); जोंधळ्याचे सोललेले ताट. २. ताटातील भाजीचा तुकडा. [हिं.; ध्व.]
**ठुसा** पु. गुद्दा; ठोसा. (ना.) [ध्व.]
**ठुसा** वि. ठेंगणा; आखूड. (व.)
**ठुंगणे** सक्रि. फसवणे; भोंदणे. (व.)
**ठुंगा** पु. धडुते; चिंधी : 'वल्कलें नेसुनि ठुंगा गुंडाळुनी। सांडी जवळुनी देहभान॥धृ॥' - तुगा ३८८५.
**ठुंठण** न. १. झाड तोडल्यावर राहिलेले खोड, बुंधा; कापून बाकी राहिलेला अवयव.२.बोथटलेले शस्त्र किवा हत्यार; खुंटा; खुंट. [हिं. ठुंठा]
**ठुंठी, ठुठा** स्त्री.पु. पिकाच्या रोपांचे बुंधे खाणारा एक रोग. (भाद्रपदात फार पाऊस पडल्यास हा होतो.).
**ठुंबरा** पु. मकेभात; मका सडून फोडणी देऊन केलेला भात; मक्याच्या दाण्यांची उसळ. (कर.)
**ठून** स्त्री. (विणकाम) विणलेले कापड गुंडाळण्यासाठी असलेली लाकडी चौकोनी तीन हात लांबीची फळी.
**ठूं** न. थोड्याशा कारणावरून केलेला दोषारोप. (क्रि. ठेवणे).
**ठेई** स्त्री. ठेवा; गुप्तधन. (झाडी)
**ठेऊ** वि. १. राखीव; ठेवणीचे. २. शिलकेत टाकण्याचा ज्याचा स्वभाव आहे असा; काटकसरी.
**ठेक** पु. अंकुश.
**ठेक** स्त्री. रास : 'घरीं ओसरीवर तांदुळाची ठेक लावून दिली.' - हनाआठ.
**ठेकडी** स्त्री. टवाळी; भंबेरी; खिल्ली (क्रि. उडवणे): 'कॉमरेड'मध्ये मी कम्युनिस्टांची ठेकडी उडविली आहे असा त्यांचा समज.' - एपिआ ९४.
**ठेका** पु. १. (ताल) विवक्षित तालाच्या एका आवर्तनाचे तबल्यावर किंवा पखवाजावर काढलेले बोल. २. ताल; एकसारखे चालू राहणे. (क्रि. धरणे) : 'पावसाने तर ठेका धरला.'- आआशे १३६. [सं. स्तिघ्]
**ठेका** पु. मक्ता; खोती; कंत्राट. [सं. स्तिघ्]

**ठेका** पु.१. मुसळधार पाऊस; विलक्षण जोराचा ताप; सपाटून तडाखा किंवा घोषा (अभ्यास, काम, वेळ इ.चा). २.भांग पिऊन जोराने चालविलेले वेदाध्ययन किंवा आवृत्ती. (क्रि. लावणे). पहा : **ठाका** २ [हिं.]

**ठेका** पु. तोरा; ठसका. (व.)[हिं.] (वा.) **(आपला) ० चालविणे** – आपला हेका, हट्ट चालविणे. **० लावून देणे** – आपले वर्चस्व दुसऱ्याच्या मनावर ठसविणे.

**ठेकी** स्त्री.१. साधारणपणे एकपासून वीस बिघ्यांपर्यंतचे शेतजमिनीचे माप. हे निरनिराळे असते. २. टिनमेकरची लहान हातोडी.(वा.) **ठेकीला येणे** – बेजार होणे. (माण.)

**ठेकुले** वि. कमी; क्षुद्र : 'ज्ञानदेव म्हणे ठेंकुलें। तैसें हें नोहे।।' – राज्ञा १८.१७६२.

**ठेकेठोक** पहा : **ठेंगेठोक**

**ठेकेदार** पु. मक्तेदार; कंत्राटदार. [हिं.]

**ठेच** स्त्री. १. दगड इत्यादिकांस पाय अडकणे. (क्रि. लागणे.). २. (ल.) तोटा; नुकसान; हानी. ३. गर्दी; भीड; फार दाटी. [हिं. ठेंस] (वा.) **० भरणे** – लग्नात उंबऱ्यास हळदकुंकू लावणे. (आगरी) **० लागणे** – अद्दल घडणे; धडा शिकणे; वाईट अनुभव मिळणे.

**ठेच** स्त्री. पाऊल : 'तितं माप् ठेचंला एक गिरण झालीया...' – रैत १५८/१५९.

**ठेच** स्त्री. कॅमेऱ्यातील भिंगापुढील पाकळ्यांची उघडझाक करण्याचे साधन : 'पुढच्या अंगास एका बाजूला एक ठेच असते ही दाबली म्हणजे पडद्याची उघडझाक होते.' – उद्यम, जाने १९४२.

**ठेचकाळणे, ठेचाळणे** अक्रि. १. ठेच लागणे. २. (ल.) अडचणींना तोंड देणे: 'एक-दोनदा पडावं लागतं, ठेचकळावं लागतं.'–श्रीयो४९३. ३. वाटेतल्या अडथळ्यांमुळे चालताना अडखळणे : 'ते धडपडत, ठेचकाळत... भेटायला धावले होते.' – दुर्दम्य ४.

**ठेचगा** पु. मार; ठोक : 'शामलास ठेचगा देऊन खाडी भरवण केला.' – पेद ३.१४८.

**ठेचणी** स्त्री. दुखापत; ठोक.

**ठेचणे** उक्रि. १. चेचणे; फोडणे; चिरडणे; मारणे. २. दडपून किंवा खच्चून भरणे. ३. घाव घालणे. ४. दगडाखाली कुटणे. [सं. तिज] (वा.) **ठेचून वाटे लावणे** – पिटून, पराभूत करून पळवून लावणे.

**ठेचलणे** सक्रि. पायांनी ठोकरणे : 'दादांनी पायांनी ठेचलत नेलेली.' – डोह ५५.

**ठेचळणे** उक्रि. थोडेसे चिरडणे, फोडणे.

**ठेचा** पु. मिरची कुटून तयार केलेली चटणी : 'कोवळ्या चिंचा नि आंवळे यांचा मीठ घातलेला ठेचा असा टेचदार होतो की..' – सोबत १९.

**ठेटमत** पहा : **ठेंगमत**

**ठे(ठें)टरें** न. जोंधळ्याच्या पिठाचा एक खाद्यपदार्थ.

**ठेटा** वि. थेटा; थोटा; थिटा; आखूड; लहान.

**ठेठे** क्रिवि. १. कोरड्या खोकल्याची ढास लागल्याचा आवाज. (क्रि. लावणे.). २. असा आवाज होऊन. ३. गाजावाजा; प्रसिद्धी (चोरी, दिवाळखोरी, वाईट गोष्ट इ.ची). (क्रि. करणे, वाजवणे, माजवणे, मांडणे.). [ध्व.]

**ठेणा-णी-णे** पु.स्त्री.न. ठिणगी; चिणगी. (को.)

**ठेणे** अक्रि. १. उभे राहणे; ताठ उभे राहणे (फक्त भूतकाळीच व काव्यात प्रयोग) : 'विस्मित होऊन इंद्र ठेला।' – तुगा ८१. २. राहणे; थांबणे; बंद पडणे; कुंठित होणे; कमतरता येणे : 'दीपीं दीपू एकवटला। मिळणीं एकचि होऊनि ठेला।' – एभा १०.३६३. [सं. स्थित]

**ठेप** स्त्री. १. दोन वस्तूंच्या टकरीमुळे वा संपर्कामुळे होणारा अटकाव; गतिरोध. (क्रि. खाणे, बसणे.). २. (ल.) सीमा; मर्यादा; थांबण्याचे ठिकाण; हद्द. ३. संकेत; वचन; नेमलेली वेळ; ठरविलेला काळ; मर्यादित मुदत. (क्रि. करणे, ठरविणे.). (वा.) **० देणे** – १. मर्यादित, मुदतबंद करणे. २. शह देणे; जवळ येऊन भिडणे; मुक्काम करणे : 'भेलसे घेऊन अगदी मालवा हाताखाली घालून बऱ्हाणपुरास ठेप देतील यास्तव आम्हासच इंग्रजांचे पारपत्यास गेले पाहिजे.' – ऐको. **ठेपेस नेणे, लावणे** – १. जागच्या जागी आणणे; पूर्वस्थळी आणणे, नेमणे. २. ठरविणे. **ठेपेस लागणे** – शेवट होणे; निर्णय लागणे.

**ठेप** स्त्री. अपराधी माणसास काही नियमित काळासाठी सरकारी न्यायासनाकडून दिलेला तुरुंगवास; कैद; शिक्षा.

**ठेप** स्त्री. (लाकूडकाम) साच्याचा एक प्रकार.

**ठेप** स्त्री. पंचायतप्रकरणी वादी व प्रतिवादी यांच्याकडून लिहून घ्यावयाची कलमवार यादी.

**ठेपठाप** स्त्री. नियमितपणा; ठरावीक स्थिती; टापटीप; ठामपणा; नेमकेपणा.

**ठेपणे** अक्रि. १. एकास एक येऊन मिळणे; आघाताने थांबणे; वाढणे. २. टेकणे; ओठंगणे; भिडणे : 'दगड ... होईल तितके एकमेकांस ठेपून बसवावे.' – तप ३२. ३. येऊन थांबणे; प्रवास पूर्ण करणे. ४. काही एक कार्य अवश्य केले पाहिजे अशा दशेस येणे; एखादी गोष्ट एखाद्या तारखेपर्यंत करणे भाग पडणे : 'काही तास सक्तमजुरी करायापर्यंत माझी मजल येऊन ठेपली.' – कोआत्म ९. ५. जवळ येणे; भिडणे; टेकणे. [सं. अति+आप्; सं. स्थापय]

**ठेपराई** स्त्री. टापटीप; व्यवस्था; व्यवस्थितपणा; योग्यायोग्यता; मर्यादा; सावधगिरी (वागणूक, भाषण, कृत्य, शिक्षण इ.ची).

**ठेपरी** स्त्री.१. ओंडका. २. नथीचा पेच. (झाडी)

**ठेपलणे** अक्रि. १. आघात किंवा अडथळा यामुळे थांबणे. २. लाथेने उडवणे.

**ठेपलणे** उक्रि. भोंदणे; भूलथाप देणे; चाळवण्या दाखविणे; हळूहळू वश करणे; हुरळविणे; गोंजारणे; आशा लावून फसविणे.

**ठेपविणे** उक्रि. १. गती बंद करणे; मार्गात अडथळा करणे; स्थिर करणे. २. दुसऱ्यावर टेकेल असे ठेवणे; आधाराने ठेवणे. ३. एखाद्या मुदतीपर्यंत नेमणे; ठरावीक काळी योजणे.

**ठेपशीर** क्रिवि. व्यवस्थित : 'सगळं कारस्थान या मास्तरानं अन् रंभाजीनं ठेपशीर उभं केलं होतं.' – वैष्णव ४१.

**ठेपसा** पु. १. मातीचे ढेकूळ; ढेपसा. २. नुकतीच शिलगावलेली किंवा जाळून राख केलेली शेणी. ३. खांबाखालचा पायाचा दगड; खुर्ची :

'दगडांच्या बांधकामाचे नऊ उंच चौरस ठेपसे ठेवावे.' – तप ५८.

**ठेपा** पु. १. (चर्म.) टाचेच्या मागचा भाग उजरण्यासाठी केलेला लाकडी ठोकळा. २. आधार; टेका : 'ढासळणारा बुरूज ठेपा देऊन टिकत नसतो.' – श्रीयो २.५३२. (को.)

**ठेपाऊ** न. जरीकाठी रेशमी सोवळे; पीतांबर; महावस्त्र; पैठणी. (ना.व.)

**ठेपी** पु. लहान खुजट बैल. (व.)

**ठेपु–पू** बूच; दट्ट्या.

**ठेपी(पे)चा** वि. १. मर्यादा किंवा कायदा पाळणारा; व्यवस्थित; टापटिपेचा (मनुष्य, व्यापार, धंदा). २. थेटचा, अखेरपर्यंत जाणारा (प्रवासी); पुरणारे (काम).

**ठेम** न. धुळीचा उंचवटा. (हेट.)

**ठेमसा** पु. एक आदिवासी नृत्य. (झाडी)

**ठेल** स्त्री.पु. १. वैपुल्य; भरपूरपणा; बाहुल्य. २. गर्दी; दाटी; घट्टपणा; कठीणपणा; दाढर्य. ३. कळप. (व.)

**ठेल** वि. भरपूर; पुष्कळ; विपुल.

**ठेल** पु. १. दुगाणीचा खेळ. २. आपल्या ढुंगणाने दुसऱ्याच्या ढुंगणावर मारावयाचा टोला.

**ठेलज** न. घराच्या दर्शनी भागातील छोटी पडवी; देवडी : 'वक्षा ठेलजेत बसून नखं कुरतडीत...' – रानगंगा ६८.

**ठेलणे** उक्रि. लोटणे; ढकलणे; दाबणे; गर्दी करणे; भिडणे : 'रथ रथासी ठेलिती।' – वेसीस्व ७.९४. [हिं.]

**ठेलमुंगा** पु. १. दुगाणीचा खेळ. २. पहा : **ठेल**

**ठेला–ली** पु.स्त्री. १. पोते; बारदान; लहान गोण. २. (ल.) समुदाय; गर्दी : 'तीन लक्षांचा एकच ठेला।' – ऐपो २५२.

**ठेला** पु. हालविता येण्याजोगे तात्पुरते लाकडी फळ्यांचे केलेले दुकान; हातगाडी; पानपट्टीचा खोका किंवा टपरी. (ना.)

**ठेलाठेल–ली** स्त्री. १. गर्दी; दाटी; रेलचेल; वैपुल्य; बाहुल्य : 'अभिमानाचें ठेलाठेली। मर्धी झाली हिंपुटी।' – तुगा ३४१९. २. धक्काबुक्की.

**ठेव** स्त्री.१. साठा; संचय; पुरलेले, लपविलेले किंवा राखून ठेवलेले द्रव्यः 'सगुणरसाची ठेव।' –दास १.२.८. २. खाण : 'तेथ लावण्याची ठेव।' – ज्ञा १.४. ३. निक्षेप गहाणवट किंवा अनामत रक्कम; बिनव्याजी किंवा अल्प व्याजाने ठेवलेले द्रव्य; बँकेत व्याजाने ठेवलेला पैसा. ४. भांडार; संग्रह. [सं. स्थिति; क.ठेवणि, ठेवु]

**ठेव** स्त्री. ढब; ऐट; रीत; तऱ्हा; मार्ग; ठेवण : 'त्या शरभ रूपाची ठेव।' – कक ७.८.१४.

**ठेव खाते** (वाणिज्य) ठेवीदारांना ज्या खात्यातून धनादेशाने रकमा काढता येतात व ठरावीक दराने व्याज मिळते असे खाते.

**ठेवघर** न. मौल्यवान वस्तू सुरक्षित ठेवण्याची जागा.

**ठेवण–णी** स्त्री. १. आकार; बांधा (शरीराचा). २. ढब; ऐट; रूप; छब (तोंड, शरीर, इमारत यांची). ३. पद्धत; तऱ्हा; रीत; विशेष गुण; खुबी (भाषण, कृत्य यांची).

**ठेवण** न. उतरण्याची, तळ देण्याची, बिऱ्हाडाची जागा; नांगरवाडा; वरवा.

**ठेवण** स्त्री. १. विहिरीतील बांधकाम ज्यावर उभारले जाते अशी दगडी किंवा टणक जमिनीची म्हणजे पायाची जागा. २. भक्कम जमीन; भक्कम पाया (बोलणे, वर्तन, अभ्यास यांतील).

**ठेवणस** पु. करार (येण्याजाण्याचा, कामाला लागण्याचा इ.).(राजा.)

**ठेवणा, ठेवणाईत** वि. ठेवलेला; आश्रित; दास; राखीव; गुमास्ता; नोकर : 'तो केवळ गलिमाचा ठेवणाईत.' – भाब २५.

**ठेवणाऊ, ठेवणू, ठेवणुकी, ठेवणुकीचा** वि. ठेवलेला; स्वाधीन केलेला; विश्वासाने ठेवलेला.

**ठेवणावळ** स्त्री. ठेव राखण्याबद्दलचा खर्च, मजुरी.

**ठेवणी–णे, ठेवी** स्त्री. न. १. गुप्तधन; पहा : **ठेव** १ : 'राहाणें ठेवणीं सापडती।'– दास ९.८.२१. २. निक्षेप. पहा : **ठेव** २

**ठेवणूक** पहा : **ठेव** २

**ठेवणे** न. लपवून किंवा पुरून ठेवलेला धनाचा साठा; पेव.

**ठेवणे** न. पहा : **ठेव** १,२ : 'कीं हें आदिशक्तीचें ठेवणें।'– दास १.७.३०. [सं. स्था]

**ठेवणे** सक्रि. १. राखणे; स्थापणे; मांडणे; लावणे; बाजूस काढणे. २. एका बाजूस टाकणे; बिऱ्हाड मांडणे; (काम) करणे; निराळे काढणे; शिल्लक राखणे; एखादे कार्य काही काळ न करता तसेच राखणे. ३. राखणे; वाचविणे; राखून ठेवणे; रक्षण करणे. ४. जागेवर कायम राखणे, होणे; स्थापन करणे; नियुक्त करणे (काम, हुद्दा यांवर). ५. चाकरीस, नोकरीस, सेवेस ठेवून घेणे किंवा बाळगणे (चाकर, सैन्य). ६. कायम राखणे; जसेच्या तसे जपून ठेवणे, राखणे; जोपासना करणे; अबाधित मानणे. ७. घेऊन न जाणे; जेथल्या तेथे पडू देणे. ८. (रखेली) बाळगणे. ९. एखादी वस्तू संरक्षणासाठी दुसऱ्याच्या स्वाधीन करणे. १०. व्यवस्थित करणे; जवळ असणे; निश्चित असणे. [सं. अति + स्थापय] (वा.) **ठेवून देणे**–थोबाडीत मारणे. (जेव्हा हे क्रियापद दुसऱ्या क्रियापदांच्या ऊन प्रत्ययांत धातुसाधितांशी योजतात, तेव्हा त्याचा अर्थ एखादी गोष्ट करणे, कोणत्याही क्रियापदाच्या विषयाचे ठेवणे, किंवा तीच स्थिती राखणे, अथवा त्या क्रियेने झालेली आविष्कृती असा होतो. जसे :– हे पत्र लिहून ठेव, ती गाय बांधून ठेव; पिठात पाणी घालून ठेव इ. ठेवणे हे क्रियापद आणि टाकणे हे क्रियापद यांमध्ये अर्थाच्या दृष्टीने साधर्म्य व विषमताही आहे. दोन्हीही क्रियापदे एखाद्या कृत्याची किंवा विषयाची पूर्णता दर्शवितात; परंतु ठेवणे हे क्रियापद क्रियेमध्ये काळजी व लक्ष– विशेषतः राखून ठेवण्यातील – कौशल्य दर्शविते. तर टाकणे हे क्रियापद एखादी वस्तू दूर, लांब किंवा कायमची सोडून देणे, तिचा त्याग करणे, हात धुऊन मोकळे होणे किंवा दुर्लक्ष, हयगय इत्यादी अर्थ दर्शविते.

**ठेवणे** न. ठेवा : 'नामयाचे ठेवणे जनीस लाधले।' – जना २२३.

**ठेवरेव** स्त्री. १. फेड; ठेव; साठा; संचय; पुंजी; भांडवल इ. व्यापक अर्थाने. २. निक्षेप. ३. व्यवस्था; शिस्त; क्रम. ४. टापटिपीने लावणे; शिस्तीने लावणे; क्रमवार ठेवणे.

**ठेवणे** पु. स्त्री. १. पहा : **ठेव** : 'सुखाचा गमे पूर्ण ठेवा मनाला।'–वावाच १.२. २. खाण; ठेव. ३. (ल.) पापपुण्याचे गाठोडे. ४. आकार. ५. साठा; गुप्तधन. [सं. स्था]

**ठेवा** पु. पहा : **ठेव १**

**ठेवाठेव–वी** स्त्री. उठाठेव; कटकट; त्रास; दगदग : 'तुम्ही या ठेवाठेवींत न पडणें। सर्वदाही।' – कक ४.५.१७८.

**ठेवासाटपा** पु. संचय. पहा : **ठेव १**

**ठेवी** स्त्री. रीत; प्रकार; मार्ग : 'ते शिकवीती अति नीच ठेवी।' – वानृद २४.

**ठेवीदार** पु. ठेव ठेवणारा; निक्षेपक; बँकेमध्ये ठेव ठेवणारी व्यक्ती.

**ठेस, ठेसणे, ठेसाळणे, ठेसा** स्त्री.पहा : **ठेच** इ. : 'लागती चालतां गा। गुणदोषांच्या ठेंसा।' – तुगा १.१४९.

**ठेंगडा** पु. (ग्राम्य, अश्लील) गाढव (जनावर).

**ठेंगडी** स्त्री. आखूड पायांची एक हात औरस चौरस विणलेली बाजली, हिचा उपयोग खेड्यात बसण्याकरिता करतात; बाज.

**ठेंगडे** न. सोटा; सोडगा; लाठी.

**ठेंगण** वि. कमी योग्यतेचा; तुच्छ; हलका : 'परिस दिसे ठेंगण।' – विसिंपू १.७३. [त. शिंदन]

**ठेंगणा** वि. १. खुजा; कमी उंचीचा, टिल्लू. २. (ल.) नीच; हलका; उणा : 'होईल मदन ठेंगणा।'– वसागा ६. [सं. स्थगीयान]

**ठेंगणारिंगणा–ठुसका** वि. मध्यम बांध्याचा; सुंदर शरीराचा; हलका व बांधेसूद; सुटसुटीत. [ठेंगणा द्वि.]

**ठेंगरी** स्त्री. काठी.

**ठेंग(गे)मत** न. १. ज्यास शास्त्राधार नाही असे मत; पाखंड मत; नास्तिक मत. (क्रि. मांडणे, माजविणे, मातविणे.) २. स्वमताचा हट्ट; हेका.

**ठेंग(गा)ळणे** अक्रि. ठेचाळणे; ठेच लागणे.

**ठेंगा** पु. १. सोडगा; सोटा; खुंट. २. वाळलेला झाडाचा सोट : 'ठेंग्या केवि अंकुर।'– तुगा ३०८६. ३. खांबाखालचे उथळे, खुर्ची, बैठक. ४. (अशिष्ट) शिश्न. [हिं.] (वा.) ० **दाखविणे, ठेंग्यावर बसविणे**–(मूळचा अश्लील अर्थ, शिश्नावर बसविणे. परंतु व्यवहारात) लादणे; फसविणे; प्रतारणा करणे; निराशा करून विटंबना करणे. ० **नाचविणे**– एखाद्यावर आपली इच्छा, मत लादणे. ० **नेसणे**– (हातात सोटा तयार ठेवणे) साफ नाकारणे; तोंडावर नाकबूल करणे.

**ठेंगा** पु. १. टेंभा; गर्व; डौल; पोकळ दरारा. (क्रि. मिरविणे, वाढविणे, माजविणे, मातविणे, दाखविणे.). २. बंड; दंगा (क्रि. माजविणे, मातविणे, मांडणे.). ३. उर्मटपणा.

वि. मध्ये तोंड खुपसणारा; उर्मट.

**ठेंगा–ग्या** वि. १. ठेंगणा. २. उर्मट; आडदांड; क्रूर; उद्धट.

**ठेंगाठेंगी** स्त्री. चालढकल; नकार (मागणी, अर्ज यासंबंधी).

**ठेंगार(ळ)णे** स्त्री. उक्रि. १. पहा : **ठेंगा दाखविणे**. २. छी : थू : करणे; वाईट रीतीने वागविणे.

**ठेंगी** स्त्री. पोहे, चुना वगैरे कुटण्याची लाट; डंग.

**ठेंगू, ठेंगूमामा, ठेंगोजी** वि. ठेंगणा; खुजा.

**ठेंगेठोक** वि. अत्यंत हुशार; चलाख; तरतरीत; दुसऱ्यावर अधिकार किंवा ताबा गाजविणारा; हुकमती.

**ठेंगेदार–वाले** पु. लाठीवाले; राखणदार; ठेकेदार : 'महारकी महारकी गावकरी ठेंगेदार' – बगा ६०.

**ठेंगेपण** न. कृपणता; कंजूषपणा.

**ठेंग्या** वि.१. बंडखोर; दंगेखोर. २. नास्तिक; पाखंडी. ३. पहा : **ठेंगा**

**ठेंबा** पु. १. मेख; खुंटा; खांब; धीरा; टेका. २. (ल.) आधारस्तंभ; आश्रय; मदत.

**ठेंबूस** न. पहा : **टेंबूक –स**

**ठेंबे** न. संकेत; ठरावीक वेळ, काळ.

**ठेंबेढोक** वि. वस्ताद. (व.)

**ठैरणे, ठैराव** पहा : **ठरणे** इ.

**ठो** पु. लहान मुले आपल्या कपाळाने दुसऱ्याच्या कपाळावर हळूच आघात करतात तो; टकर. (क्रि. देणे). [ध्व.]

**ठोक** पु. १. काठी, सोडगा याने दिलेला मार. २. सतारीच्या तारेवर केलेला नखीचा आघात. [ध्व.; हिं.; क. टोकु ]

**ठोक** वि. १. जाड; भरीव; जड; ठळक; भक्कम (धातूची भांडी, दागिने). २. (ल.) श्रेष्ठ; प्रसिद्ध; चोख (शिक्षण, शहाणपण, धन इ.).

**ठोक, ठोकबंद** वि. घाऊक; पूर्ण; फुटकळ नसलेले; सर्व (संख्या) : समुदायाने मोठ्या प्रमाणात, ठोकळ, एकदम जमेस धरलेले (रक्कम, बेरीज, माल, सौदा, खरेदी इ.) एकत्रित : 'हिशेब ठोक समजा हो।' – दावि २४२. [क. टोकु]

**ठोककाम** न. (यंअ.) पृष्ठभाग ठोकून सपाट करणे.

**ठोकजोशी** पु. सहदेवमताचे ठोके शिकून ठोकळ भविष्य सांगणारी जोशांची एक जात व तीतील व्यक्ती; कुडबुड्या जोशी; पिंगळ जोशी.

**ठोकठोक–का** पहा : **ठाकठोक**

**ठोकडा** पहा : **ठोकळा**

**ठोकडा–डे** पु. न. १. बैलाच्या गळ्यातील घंटा (लाकडाची, धातूची). २. हत्यार. [ध्व.]

**ठोकडा–ड्या, ठोक्या** पु. (निंदार्थी) सोनार; सोनटक्क्या.

**ठोकण** न. १. उत्पन्नाचे साधन; (ज्याच्यामुळे नियमितपणे उत्पन्न मिळते असा) धंदा, काम, व्यापार, जमीनजुमला. २. (ल.) फायदा.

**ठोकण** न. अंगावर राहिलेला देवीचा वण, खूण. (कु.)

**ठोकण** न. झाडाचे जुनाट खोड; खुंटाडा.

**ठोकणावळ** स्त्री. ठोकून बनविलेल्या वस्तूची मजुरी; घडणावळ; घडविलेल्या वस्तूची मजुरी.

**ठोकणी** स्त्री. (यंअ.) ओतकामाच्या भट्टीत धातूच्या साच्याची रेती ठोकण्यासाठी वापरले जाणारे अवजार.

**ठोकणी** स्त्री. १. आघात; ठोका; टोला. २. गिलावा ठोकण्याची गवंड्याची तीन धारांची लाकडी खुंटी व तिने ठोकण्याची क्रिया; चोपणी; मोगरी; लाकडी हातोडा : 'एखादं मोठ्ठं झाड कुऱ्हाडीनं खापलावं तसं तुम्ही त्या माशाला ठोकणी घेऊन बदडीत होता.' – ऐको.

**ठोकणी** स्त्री. भंडारी जातीतील लग्नात करवलीशिवाय नवरीच्या इतर मैत्रिणींचे पाय धुण्याचा विधी. (को.)

**ठोकणे** न. १. पहा : **ठोकणी**. २. ठोकण्याचे हत्यार.

**ठोकणे** सक्रि. १. (दांडके, काठी, हातोडा इ.नी) मारणे; बदडणे; ठोठावणे.

२. हळूच आघात करणे; थोपटणे.[सं. त्रौक] (वा.) **ठोकून देणे** - गप्प, थाप मारणे.

**ठोकणे** सक्रि. करणे; देणे; पाठविणे.

**ठोकणे** अक्रि. कुदळीने भोके पाडून, बी टाकून पेरणी करणे, टोकणे (पाभरीने किंवा दाणे टाकून नव्हे) : 'लाकडी कुदळीचा काथवटी व हेटकरी लोक डोंगरी भागांत नाचणी, वरी वगैरे ठोकण्याकरिता उपयोग करतात.' – मज्ञा ६२३.

**ठोकता पीर** दांडगा, भांडखोर, नेहमी मारामारीस तयार असलेला मनुष्य. पहा : **मारता पीर**

**ठोकताळा** न. १. अदमास; अटकळ; अदमासाने पाहिलेला हिशोबाचा पडताळा. २. प्रतीती; अनुभव; बरोबर अंदाज. (क्रि. घालणे, येणे, पाहणे).

**ठोकताळेबंद** वि. एकाच प्रकारचे; ठरावीक ठशाचे; साचेबंद.

**ठोकनापूर** पु. ठोक; मार. (व.)

**ठोकपीट** स्त्री. विचारपूस; चौकशी. (झाडी)

**ठोकमत** न. पाखंडमत.

**ठोकर** न. स्त्री. १. ठेच. (क्रि. खाणे, लागणे.). २. धडक; धडाका; अडकून पडणे; धक्का. ३. (ल.) तोटा; नुकसान; अद्दल; दुर्दैवाचा तडाखा. ४. पायाने मारलेला तडाखा, लाथ; गुद्दा. (क्रि. मारणे.). ५. जोड्याचा अग्रभाग. (व.) [हिं.; त. डोकर]

**ठोकर** वि. जाड; लठ्ठ; ठोसर. (व.)

**ठोकरणे** अक्रि. १. बोलण्यात झाडणे; खरडपट्टी काढणे. २. लाथेने उडवणे.

**ठोकरा** पु. टोकरा; नाव : 'कृष्णा उतरण्यासाठीं नावा, ठोकरे जमा करविले आहेत.' – ऐको ४८०.

**ठोकऱ्या इचू** इंगळी; विषारी विंचू.

**ठोकशाही** स्त्री. दडपशाही.

**ठोकळ** वि. १. मोठा व चांगला; जाडा व लठ्ठ; मजबूत; भरपूर; जोमदार; भरीव. २. अंदाजी; ठळक; मुख्य; सरासरी; ढोबळ; घाऊक; ठोकबंद.

**ठोकळा** पु. लाकडाचा ओंडका; लहानसा सोट, गोल, गोलटा; शाईची दौत ठेवण्याचे लाकडी साधन किंवा कलमदान; सहाण, रेतीदाणी इ. आत बसविण्यासाठी कोरून काढलेले लाकडी खोड किंवा तुकडा; शिळेची चौकट; हत्याराचा दांडा किंवा मूठ इ.; पगडबंदाचा पागोटे बांधण्याचा पायाच्या आकाराचा लाकडी तुकडा.

**ठोकळा** पु. हरभऱ्याच्या भरड्याचा उकडून तयार केलेला वडा.(व.)

**ठोकळी वीट** नंबरी वीट. ही अरुंद, जाड आणि महाग असते.

**ठोकळेबाज** वि. ठरावीक; एकाच साच्याचा; साचेबंद; चाकोरीबद्ध.

**ठोका** पु. हृदयाची लयबद्ध धडधड. (वा.) **(हृदयाचा) ० चुकणे** - अतिशय भीती, दहशत वाटणे.

**ठोका** पु. टोणा; चेटूक; मंत्रोपचार. (व.)

**ठोका** पु. १. सरसकट जमीन खंडाने देणे. २. अशी खंडाने लावलेली जमीन.

**ठोका** पु. सततचा व कंटाळवाणा आवाज; न थांबणारा ठो ! ठो ! असा आवाज. (क्रि. घेणे.) उदा. रडण्याचा, बोलण्याचा, खटखटीचा ठोका. [ध्व.]

**ठोका** पु. १. काठी, हातोडा इ.चा तडाखा, आघात; प्रहार; धक्का; मारा. २. धातूच्या भांड्यावरील हातोडीने झालेली खूण. [ध्व.]

**ठोका** पु. १. भविष्य (विशेषतः हवेचे, पावसापाण्याचे); अनुभव; प्रचीती; पडताळा. (क्रि. उतरणे, चुकणे.); २. भविष्याप्रमाणे घडून आलेली गोष्ट : '...तसा ठोका आल्याची तो पाचसात उदाहरणे सांगेल.' – चिले १६२.

**ठोकाठोक** स्त्री. ठोकण्याची क्रिया. [ठोक द्वि.]

**ठोकाठोक** वि. मोठा; भरीव; भरपूर (वस्तू-विशेषतः दागिना, भांडे); वजनदार; दुःखकारक; भयंकर; सर्वांत मोठा (अपराध).[ठोक द्वि.]

**ठोकाठोक** क्रिवि. अगदी बरोबर; जशास तसा; योग्य. (क्रि. पुरणे, होणे.)

**ठोकाठोकी** स्त्री. मार; बडवणे; ठोकणे.

**ठोकारोका** पु. भविष्यकथन (जोशाचे). [ठोका द्वि.]

**ठोके** स्त्री. भटक्या चोरांची एक जात.

**ठोके** पु. अव. हाका करताना ओरडण्यासाठी झाडांवर बसविलेले लोक.

**ठोकेकरीण** स्त्री. जादूटोणा करणारी स्त्री. (व.)

**ठोकेजोशी** पु. मेढिंगे; फिरस्त्यांपैकी एक. पहा : **ठोकजोशी**

**ठोक्या** पु. (सांकेतिक) जार; एखाद्या स्त्रीचे प्रियपात्र.

**ठोचला** पु. टोमणा; छद्मी भाषण; वर्मी बोल. (कर.)

**ठोटा** वि. थोटा; हात, पाय, बोटे इ. नसलेला (मनुष्य); वठलेले (झाड); थोटूक झालेली (वस्तू). [हिं.]

**ठोठार** वि. एका धडाक्यात ठार : 'दारूखान्यास अग्न लागली.' – ऐको ४८१.

**ठोठाव(वि)णे** सक्रि. १. दारावर थाप मारणे; भांड्याचा नाद पाहण्यासाठी त्याच्यावर टिचक्या मारणे; (सोनारी) हातोडीने ठोकणे; (कुंभारी) मडक्यावर थापटणे; (पत्त्यांचा खेळ) मोठे पान टाकून मारून घेणे किंवा झोडपून हात घेणे; दुसऱ्या बाजूचा पत्ता ठोकणे. २. (ल.) टोमणे मारणे; निर्भर्त्सना करणे; व्याजोक्तीने बोलणे (वाईट कृत्यांबद्दल); जोराने सांगणे. ३. ठो, ठो आवाज करणे; खडबडविणे. [सं. स्त्यायनम्]

**ठोठा(वि)णे** अक्रि. अडखळणे; अगतिक होणे : 'अभ्यासीं ठोठावला ठाये.' – राज्ञा २.३१४.

**ठोठो** क्रिवि. १. टक-टक; टाप-टाप. २.मोठ्याने, ठणाठणा (शंख करणे, बोंबलणे) : 'नरु रस्त्यावर उभा राहून ठोठो बोंब ठोकीत होता.' – राकाघाका २४७. (वा.)० **करणे** - एखाद्याच्या विरुद्ध तक्रार करणेः 'बातमी चुकली की ठोठो करतो.' –मुदि ६.

**ठोठो, ठोठोवाडा** स्त्री.पु. गोंगाट; गाजावाजा; बभ्रा; प्रसिद्धी (वाईट कृत्याची). (क्रि. करणे). [ध्व.]

**ठोणका** पु. ठोकळा; आवणाची माती झाडण्याकरिता केलेला लाकडी ओंडका.

**ठोबा** पु. आकार.

**ठोम** पु. वनस्पतीचा कांदा; कंद; एक झाड.

**ठोम** पु. १. ठोसा. २. भुशासकट धान्य.

**ठोमणा** पु. १. टोमणा. (क्रि. मारणे). २. गुद्दा; ठोसा. (कु.)
**ठोमणा** पु. कळकाच्या (बांबूच्या) कोंबाचा लहान तुकडा. (कु.)
**ठोमणा–ठोसरा** पु. आघात; टोमणा. (वा.) **ठोमणे–ठोसरे खाल्लेला** – टक्केटोणपे खाल्लेला; अनुभवी ; जगातील हाल, संकटे इ. अनुभवून शहाणा बनलेला.
**ठोमन** न. मोठे, सपाट भांडे. (व.)
**ठोमरी** स्त्री. विटकरीचे लहान लहान तुकडे.
**ठोमस** वि. लठ्ठ. (झाडी)
**ठोमूस** पु. टोक; टोकदार काठी, दांडा. (गो.)
**ठोला** पु. तलवारीच्या मुठीचा (खालचा) हाताजवळील भाग.
**ठोला–ल्या** पु. १. घरदार, बायको, कुटुंब इ. नसलेला; फटिंग मनुष्य; नोकरी किंवा गाठी पैसा नसलेला, पत इ. नसलेला मनुष्य; अब्रूची चाड नसलेला. २. पहा : **ठोंब्या**. ३. एखाद्या स्त्रीने आपली कामेच्छा पूर्ण करण्यासाठी ठेवलेला पुरुष; जार. ४. गलेलठ्ठ, गबदुल माणूस. ५. रिकामटेकडा किंवा मूर्ख माणूस. (व.) ६. अजातशत्रू. [सं. स्थूल]
**ठोवर** न. फुटके मडके. (व.)
**ठोस** वि. भरभक्कम; भरीव; टिकाऊ; निश्चित; खात्रीचा.
**ठोसपणा** पु. नेमकेपणा; निश्चितपणा; जोर.
**ठोसर** वि. १. जाडेभरडे; जाड (कापड, सोटा इ.). २. (ल.) अंधुक; मंद (दृष्टी); टाकाऊ, निःसार किंवा पुळपुळीत (भाषण, युक्ती, बेत). ३. ठोकळ; लठ्ठ; मोठे; जाड : 'टांकाचें ठोंसरपण।' – दास १९.१.५. (व.) ४. दणकट; शक्तिमान. ५. (ल.) व्यवहारात अनुभवी .
**ठोसर नजर** वरवर पाहणी; चौकशी; टेहळणी.
**ठोसरा–ला, ठोसा** पु. आरोप; दूषण; आक्षेप : 'जन्मभर ठोसरा तुम्हांवर राहील कीं आमचे सोयरे धायरे आप्त यांनी...' – ऐको.पहा : **ठोंबरा** (क्रि. मारणे, देणे.). (वा.) ० **सोसणे** – टोमणा सहन करणे : 'आणखी एक वर्ष असेच दुसऱ्याच्या जिवावर त्यांचे कुचकट नासकट ठोसरे सोशीत बसायचं ?' – पलकोघे २८९; 'तिनं असा आतघुमसी ठोसला मारला.' – चिताक १९.
**ठोसराई** स्त्री. पोकळ बढाई; भपकेदार शब्द; भाषणाचे अवडंबर, डौल; प्रस्थ; स्तोम; डौलाचे भाषण; फुशारकी. (क्रि. मिरविणे, लावणे, दाखविणे, नाचविणे.).
**ठोसलो** पु. १. जाड व मजबूत बांगडी. (चि.) २. टोचून बोलणे.
**ठोसळ** पहा : **ठोकळ**
**ठोसा** पु. रपाटा; धपाटा; रपका; रामटोला; रट्टा; तडाखा; गुद्दा. (क्रि. मारणे, देणे.).
**ठोसा** स्त्री. एक प्रकारचे भांडे (आत ऊ टाकण्यासाठी).
**ठोळ्या** पहा : **ठोला–ल्या** ५

**ठोंग** पु. १. अंगी पात्रता नसता अनेक उचापती करून गावात मोठेपणा पावलेला पुरुष; पहा : **ठोकता पीर**. २. चाट; गप्प; थाप. (व.)
**ठोंगमत** न.१.पहा : **ठेंगमत**. २. तरकट; थोतांड; तोहमत; फसविण्यासाठी किंवा त्रास देण्यासाठी सांगितलेली खोटी गोष्ट.
**ठोंगळ** पु. १. लाकडाचा ओंडका; बुंधा; खोड. २. धष्टपुष्ट, दणकट तरुण. ३. मस्त, टोणपा, मूर्ख माणूस.
**ठोंगळ** पु. १. राख; गंजी. २. लहान जमाव; गर्दी. (कु.)
**ठोंगळ** वि. प्रसिद्ध; प्रख्यात.
**ठोंगाई** स्त्री. आडदांडपणा; मस्ती; भांडखोर वर्तन; उद्दाम वागणूक.
**ठोंब** पु. १. खांद्याविरहित खोड, खुंट, सोट : 'काळ्या रानामंदी ह्येचं (गवताचं) मोटं मोटं ठोंब असत्यात...' – वावटळ ६६. २. झुबका; गुच्छ. ३. (ल.) धटिंगण; आडदांड; ब्रह्मचारी किंवा निपुत्रिक; अक्षरशत्रू. ४. बोकड. [सं. स्तुभ]
**ठोंब** न. भाजीचे लहान झुडूप.
**ठोंब** न. लहान मुलाची पहिल्याने राखलेली शेंडी. [सं. स्तंब]
**ठोंबरणे** सक्रि. भांड्यामध्ये पीठ इ. कोंबून भरणे; ठासणे; कोंबणे; चेंदणे; दडपून भरणे. (राजा.)
**ठोंबरा–रे, ठोमरा** पु. एक खाद्यपदार्थ; ज्वारी किंवा बाजरी भरडून त्यांच्या कण्यांचा केलेला पदार्थ; घुगरी : 'तुम्ही पात्रीं पडिलें तें भोजन करावें कीं: मग गोसावी रेइनाएकाकरवीं तयासि ठोंबरा वाढवूं लागलेः'– लीचउ १८१.
**ठोंबरा, ठोमरा** पु.१. मनगटाने मारलेला ठोसा. २. (ल.) टोमणा; उपरोधिक भाषण; उपहास. (क्रि. मारणे, देणे, करणे.).
**ठोंबरा, ठोमरा** पु. न. भुशासकट धान्य; वाईट धान्य.(व.) वि. कच्चा, बोटाला टणक लागणारा (भात इ.). (व.)
**ठोंबस** पहा : **ठोंब्या, ठसठोंबस**
**ठोंबा** पु. १.आखूड व जाड काठी, दांडके, सोटा; वेल चढण्यासाठी पुरलेला डांभ. २. (ल.) मूर्ख. पहा : **ठोंब्या**. ३. लाकडाचा ओंडका. ४. बत्ता; लोखंडी दांडा.
**ठोंबा** पु. कातड्यावर कुसर उठवण्याचा साचा. (बे.)
**ठोंबे** वि. मूर्ख; अक्कलशून्य : 'भक्तिहिन जे कवित्व। तें चि जाणावें ठोंबे मत।...कंटाळवाणें।।' – दास १४.३.१९.
**ठोंब्या, ठोब्या** वि. अक्षरशत्रू; ढ; जड बुद्धीचा; मठ्ठ; मूर्ख; मंदबुद्धीचा; अक्कलशून्य.
**ठौळ** न. समूह; खिल्लार : कीं चरत द्यावा पृथ्वीयेचां पार्डी। ठौळ कांतिलोहाचें।' – नरुस्व ४७३.
**ठ्यां करणे** अक्रि. धूम ठोकणे; पळून जाणे. (कर.)

■■■



ड मराठी वर्णमालेतील अठ्ठाविसावे अक्षर आणि तेरावे व्यंजन.
ड पु.स्त्री. पहा : **डह**
डई पहा : **ढई**
डऊ पु. नारळाच्या करवंटीचे केलेले पात्र. पहा : **डव, डहू**
डऊली स्त्री. खर्चाचे अंदाजपत्रक.
**'डऊ' या अक्षरांनी आरंभ होणारे शब्द 'डौ'मध्ये पाहावेत.**
**डक** न. जाड कापडाचा एक प्रकार : 'त्याच्या अंगात पांढऱ्याशुभ्र डकचा कोट असे.' - बाविबु. [इं.]
**डक** पु. हजेरीपट.
**डक(का)डक-का, डकाक** क्रिवि. १. वस्तूचा सांधा, जोड शिथिल किंवा नादुरुस्त झाल्यामुळे हलण्याच्या होणाऱ्या आवाजासारखा आवाज; डगडग; डुगडुग; खिळखिळा; करकरा. (क्रि. जाणे, हलणे, वाजणे.). २. झपाट्याने : 'जेवित जेवतांही पाहे। झोंपी जाये डकडकां।' - एभा २५.८४. ३. डगडगत; लडखडत. ४. डुलत; पेंगत. [ध्व.डक द्वि.]
**डकडकणे** अक्रि. खिळखिळे होणे; डगडगणे; डळमळणे; डुलणे; लटलटणे (खांब, भिंत, इमारत); हलणे; करकरणे (ढिला सांगाडा); गदगद हलणे; थरथर कापणे (स्थूल शरीर). [सं.दध्]
**डकडकीत** पहा : **डगडगीत**
**डकणे** अक्रि. चिकटणे; लटकून राहणे. पहा : **डगणे** [सं.दंश-दष्ट]
**डकणे** अक्रि. ओकणे; उलटी, वांती होणे. (व.) [ध्व.]
**डकरणे** अक्रि. ढेकर देणे. (ना.)
**डकरणे** अक्रि. शक्तीचा गर्व वाहणे; अहंभाव दर्शविणे. (व.) [ध्व. हिं. डकराना]
**डकऱ्ना** अक्रि.१.डरकाळी फोडणे. २. वळू हंबरणे. ३. व्यर्थ भटकणे. ४. फुशारकी मारणे.(झाडी) [हिं. डकारना]
**डकल** वि. माहीत; ठाऊक; अवगत.(क्रि. असणे). (कु.)
**डकलवार, डक्कलव्हलर** पु. १. मांग गारोडी. २. व्हलर; होलार; मांगांचा गुरु. (माण.)
**डकला** पु. नदीच्या कोरड्या पात्रात पाणी भरता यावे म्हणून खोदलेला खळगा, झरा; डहुरा; डबके; लहानसा डवरा.
**डकली** स्त्री. दिव्यात तेल घालायची आंब्याच्या कोयीची, करवंटीची केलेली पळी. पहा : **डवली**
**डकवण** न. चिकटविण्यासाठी उपयोगी पडणारी वस्तू; खळ; गोंद; डिंक; सरस; चीक; चिकटा.
**डकवाडकव** स्त्री.चिकटविण्याची क्रिया.
**डकव(वि)णे** उक्रि. चिकटवणे; डकवणे : 'पूर्व पश्चिम दिशांना त्या त्या नावाच्या पाट्या डकवल्या होत्या.' - बनगर ९.
**डकाईत** वि. १. चपळ; चलाख; हुशार; तयार. २. डाके घालणारा; चोर; दरोडेखोर; डाकू; लूटमार करणारा.
**डकान** स्त्री. अडचणीची जागा; खूप झाडी असणारा भाग. (अहि.)
**डकार-री** पु. (उप.) १. ढेकर. २. डरकाळी; डकारणे. [हिं.]
**डकार** स्त्री. अवास्तव मागणी करणे. (झाडी)
**डकारणे** अक्रि. गर्जना करणे; डरकाळी फोडणे. [ध्व.]
**डकाव डकाव** वि. हेलकावत(उंटाचे चालणे).(क्रि.करणे): 'सांडणीस्वाराचा उंट डकाव डकाव करत वाटेनं पुढं आला.'- तअं २६४. [ध्व.]
**डके** वि.(मातकाम) छापील; ठशाचे; अवयव सुटे नसलेले; ज्याचे अवयव शरीराला डकलेले आहेत अशी (मूर्ती).
**डकेट** वि. खेळकर; खोडकर; वात्रट. (झाडी) [हिं.]
**डक्कलवार** पु. भंगी; मेहतर.
**डखकरि-री** क्रिवि. एकदम चावून; झोंबून : 'तें दहीभाताचा उंडा म्हणौनि डखकरि घांसु घे :'- लीचपू ७६.
**डखली** स्त्री. झोकांडी : 'चालतां पुढो आंग ढोके : डखलीया देत चालताति:'- लीचअ ५५.
**डखळ** न. मातीचे ढेकूळ; ढेला; खडा.
**डखारा** पु. पसारा; व्याप. (अहि.)
**डग** स्त्री. सीमा; काठ; कड; किनारा; मर्यादा.
**डग** स्त्री. १. पाऊल; टांग; कदम; पावंडा; ढांग; रांग. २. झडप.
**डग** पु. १. (इमारत, खांब, ढिला दगड इ.) लटपटणे, हलणे, डगडगणे, खिळखिळणे. (क्रि. खाणे). २. (ल.) डळमळण्याचा संभव, भीती; बूड येणे; फसगत; त्रास, धोका, नाश इ. होण्याचा, तसेच खराबी, नुकसान, पराभव, वाटोळे होण्याचा संभव. [ध्व. किंवा डगणे] स्त्री. भीती; संशय; अंदेशा; दिक्कत; शंका; विकल्प; किंतु.
**डग** स्त्री. १. हालचाल. २. धक्का. ३. धोका. (झाडी) [हिं., गुज.]
**डगडग-गा** क्रिवि. १. हलत, डळमळत, लटपटत असताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन (क्रि. करणे, हलणे, झोक जाणे, झोप येणे इ.). पहा : **डकडक** : 'ती कडी बसविलेला दगड डगडग करतो आहे.'-केस्व १६८.२. मोठ्या प्रमाणात, अतिशय (घाम येणे). [ध्व. डगचे द्वि.]
**डगडग** स्त्री. १. हालचाल. २. कटकट. (झाडी)
**डगडगणे** अक्रि. १. अतिशय उष्णतेने आणि घामाने त्रस्त होणे; उबगणे; उबणे. २. गदगदणे; गुदमरणे; शिजणे; अतिशय उकडणे.
**डगडगीत** वि. १. खिळखिळीत; डळमळीत; कंपायमान. २. गुटगुटीत; फोपशा; अंग सुटलेला; गुबगुबीत.
**डगडग्या** वि. भटक्या; चळवळ्या. (झाडी)
**ड(डं)गडुवाल** न. (व्यापक अर्थी) कापडचोपड; बाडबिछायत; सामानसुमान इ. (राजा.)
**डगणे** अक्रि. तगणे; चिकटणे; चिकटून राहणे.
**डगणे** अक्रि. वरून टांग टाकणे; ओलांडणे. [हिं. डग]
**डगणे** अक्रि. १. कापणे; थरथरणे; डगमगणे; लटपटणे; डळमळणे. २. (ल.) घाबरणे; भिणे; डरणे; बाजूला सरणे: 'चित्तें दोन अशा स्थलीं न डगशी कोंबावया तूं जरी।'- केक ८४. ३. खचणे; मोडणे;

सुटून पडणे (तुळई, भिंत इ.); चळणे; ढळणे : 'तूं आपली श्रद्धा, भक्ति व धर्म यांपासून डगूं नकोस.'-पप्रे १२७. ४. भित्रेपणाने मान्य करणे; रुकार देणे; दबणे. ५. कचरणे; कांकू करणे. [ध्व. डक-ग]

**डगमग** स्त्री. डळमळीतपणा; अस्थिरता; लटपट; चांचल्य : 'डगमग डगमग कामा नये ।'- दास १४.४.११.

**डगमग-गा** पहा : **डगडग-गा**

**डगमगणे** सक्रि. १. पहा : **डगणे** १.२. भीतीने कचरणे; गोंधळून जाणे; त्रेधा उडणे.

**डगय** वि. मोठे; जाड.

**डगर** स्त्री. १. चढण अथवा उतरण (नदीच्या तीराची, टेकडीची); ढाळ. २.(क्र.) टेकडी; उंचवटा; डोंगर.३. दरड; कडपा; कडा. [हिं.] (वा.) **दोन्ही डगरींवर हात ठेवणे**-(दोन पक्षांमध्ये असलेल्या दुतोंड्या मनुष्यासंबंधी योजतात.) दोन्हीकडचा फायदा घेणे.

**डगर** स्त्री.(संगीत) वरच्या सप्तकातील आवाज काढणे; स्वर चढविणे. (क्रि. घेणे).

**डगर** पु. १. प्रसिद्धी; लौकिक : 'आणीकही येकु थोरु । यया अव्ययत्वाचा डगरु ।'- ज्ञाये १५.११८. २. फोल, खोटी प्रसिद्धी. ३. आळ; आरोप : 'परि सूर्यासि अंधकार। कैं जाला होता गोचर । तऱ्ही तमारि हा डगर। आलाचि कीं ।'- अमृ २.३४.

**डगर** वि. मोठा. (झाडी)

**डगर-रा-री** पु.स्त्री. डवरा; पाण्याकरिता खणलेला खड्डा; पाण्याने भरलेली नैसर्गिक खळी; डबके : 'मन कल्पी डगर। तें तरंगाविना सागर।'-यदी १८.९६९.

**डग(गा)रणे** न. सोटा; लाठी.

**डगल** पु.न. स्थूल, मोठ्या आकाराचे.

**डगला-ले** पु.न.१.आत कापूस भरलेला कंबरेपर्यंतचा लहान कोट; बंडी : 'निवडुन डगल्यांला नीलखा बेतवील्या।'- सारुह ३.३९. २.(सामा.) ढिलाढाला कुडता; लांब कोट; अंगरखा. [सं. दुकुल]

**डगळ** वि. डागळलेले; नासलेले.

**डग(घ)ळ** वि.१. ढिला; शिथिल; सैल बसणारा; मापापेक्षा खूप मोठा (अंगरखा, जोडा, खुंटी, बूच); पोकळ; ढिली रचलेली (दगडी भिंत). २. मोठ्या आकाराचा (चेंडू, फळ, गोटी). ३. मोठे; ढोबळ (अक्षर). ४.(सामा.) स्थूल; भरीव; मोठ्या आकाराचे : 'आकारें नव्हती डगळें ।'- ज्ञा १७.१२७. ५.(ल.) सढळ; उदार (खर्च करण्यात वा धर्मादायात). [हिं. दध]

**डग(घ)ळणे** अक्रि. कुजणे; सडणे; बुरबुरणे (फळ). पहा : **डागळणे**

**डग(घ)ळणे** अक्रि. १. एकाएकी कोसळणे (इमारत, दरड, विहीर). २. (ल.) सामर्थ्यहीन होणे; खचणे; अवसान सुटणे; जेरीस येणे.

**डग(घ)ळणे** अक्रि. उफाड्याने वाढणे; विस्तृत होणे (वृक्ष).

**डग(घ)ळणे** उक्रि. ओबडधोबड घडणे, फोडणे, तोडणे (दगड इ.). [वै.सं.दगळ]

**डग(घ)ळा** पु. चांगली पालवी फुटलेली झाडाची कोवळी लहान फांदी; डहाळी; टहाळा.

**डग(घ)ळीव** वि. १.ओबडधोबड घडलेला (इमारती दगड).२. अशा दगडांनी बांधलेली; कमजोर रचलेली (इमारत).

**डगा** स्त्री. उडी; झेप : 'तो दाढीवाला दोन डगांत शिडीवरून उतरला.'- माणूस ९५.

**डगागणे** अक्रि. (डगडगणेचा अतिशय ) उबणे; उकाडा होणे.

**डगागणे** अक्रि. १. कापणे; हलणे; डुगडुगणे (सांधे ढिले झालेली, निखळलेली वस्तू). २. खचणे; धीर सोडणे. पहा : **डगणे**. २. ३. पडणे; उतरती कळा लागणे; गळणे; तुटणे.

**डगाडग-गा** क्रिवि. पहा : **डगडग**

**डगाळी-ली** स्त्री. फांदी; डहाळी. (व.) पहा : **डगळा**

**डगूर** पु. जोखडास डाव्या बाजूस जुंपलेला बैल. (राजा.)

**डगूळ** न. फणसाची एक जात.

**डग्गा** पु. तांबे, पितळ, स्टील, खापर यांच्या डेरेदार भांड्याच्या तोंडाला कातडे मढवून केलेले वाद्य; तबल्याचा जोडीदार. तबल्याची शाई मधोमध तर डग्गयाची एका बाजूस असते. [सं. ढक्का]

**डचक-का** स्त्री.पु. १. धडकी; दचक; धसका; धक्का (भीतीने, दुःखाने, एकाएकी बसलेला).(क्रि. बसणे). २. आगामी संकटाची पूर्वकल्पना, सूचना; हुरहूर; अपशकुन. (क्रि. येणे, वाटणे.). ३.पोटात एकाएकी होणारी खळबळ, कालवाकालव. [ध्व. डच]

**डचकन-कर-दिनी-दिशी, डचडचा** क्रिवि. १. ढेकर येताना, करपट घशाशी येताना, हलणाऱ्या भांड्यातून पाणी डचमळताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन.२. पोटात खळखळणे, भांड्यातील द्रव पदार्थ हिसळणे यांच्या आवाजासारखा आवाज होऊन. [डच द्वि., ध्व.]

**डचकळणे** अक्रि. १. चकित होणे; चमकणे. २. भिणे; दचकणे; भेदरून जाणे. [सं. ध्रस]

**डचकळणे** अक्रि. १. डचमळणे. २. डचकळी येणे. पहा : **डचडचणे**

**डचकळा** पु. घोड्याच्या पुढच्या आणि मागच्या एकाच बाजूच्या दोन पायांना बांधलेली दोरी; कळवा.

**डचकळी** स्त्री. १. ढेकर. (क्रि. देणे). २. घशाशी येणे; आंबट, करपट ढेकर. (क्रि. येणे).

**डचडचणे** अक्रि. बोचणे; टोचणे : 'तिच्या पोटात डचडचत होतं ते !' - जहेवोजे १९.

**डचडचणे** अकर्तृक क्रिया. घशाशी जळजळणे; करपट ढेकरा येणे. अक्रि. हलणे; हिसळणे.

**डचडचीत** वि. १. हलणारे; डचमळणारे; हिसळणारे (पाणी, द्रव पदार्थ).२. तटाटून फुटण्याच्या बेतात असलेले; टचटचीत (पखाल, काही द्रवाने भरलेली पिशवी, पिकलेले गळू, द्राक्ष इ.).

**डचणे** पहा : **डसणे** [सं.दंशन]

**डचमचणे** उक्रि. पहा : **डचमळणे**

**डचमळ** स्त्री. हलणे; हिसळणे (भांड्यातील प्रवाही पदार्थ). [ध्व.]

**डचमळणे** अक्रि. वर उसळणे; हिसळणे; हलण्यामुळे बाहेर येणे; डळमळणे.

उक्रि. हलवणे; हिसकळणे; खळबळणे; हलवल्यामुळे भांड्यातील पाणी बाहेर सांडणे. [ध्व.]

**डच्च, डचांग** क्रिवि. काठोकाठ; भरपूर; गच्च : 'नुसत्या अंधारानं ती (विहीर) डच्च भरल्यासारखी दिसे.' – बाविबु १५. (व.)

**डच्चावून, डच्चून** क्रिवि. भरून; खच्चून. (व.)

**डच्चू** पु. कपड्याला पडलेले बारीक भोक. (व.)

**ड(डि)च्चू** पु. १. नकार; टाळा. २. हकालपट्टी; डिच्चू; अर्धचंद्र. (क्रि. देणे, मिळणे).

**डझन** न. बारा वस्तूंचा समुदाय. [इं.]

**डटकारना** क्रि. धमकावणे; रागावणे. (झाडी)

**डटवना** क्रि. उपस्थित होणे. (झाडी)

**डटवना** क्रि. १. घुसविणे. २. खाणे. (झाडी)

**डटाड** वि. खूष.

**डटावना** क्रि. १. रागावणे. २. घुसविणे. (झाडी) [हिं.]

**डटावनी** स्त्री. धमकी; जरब.

**डट्ट्या** पु. १. वशिला २. धमकी. ३. दाब. (झाडी)

**डत्म्हली** वि. ऐटदार: 'पाटील पांड्यानी कशी चालली डत्म्हली.' – लोक.

**डपटना** क्रि. रागावणे; दम देणे. (झाडी)

**डप(ब)की–के** स्त्री.न. तेल, तूप ठेवण्याची कातड्याची बुदली. [हिं. डबा–ब्बा]

**डपली** स्त्री. गोवरी. (ना.)

**डपेदार** पु. वनाधिकारी. (झाडी)

**डफ** पु. एक चर्मवाद्य; कडे; मोठी टिमकी. [फा. दफ]

**डफ–कडाणी** स्त्री. वाद्यप्रकार.

**डफखेळ्या** वि. डफावर नाच करणारा. (को.)

**डफगर** पु. नौबती, नगारे इ.वर कातडी चढविणारा कारागीर.

**डफगाण** पु. डफावर भजन करणारा गायक : 'त्या गीतांना डफगाणी म्हणत असत आणि... त्या लोकगायकांना डफगाण... म्हणत.'–लोसंक्षि ७३.

**डफगाणे** न. १. डफावरील भजन :'डफ गार्णे माची गार्णे।'– दास १२.५.६. २. डफगाण्याचे गायन.

**डफघई–घाई, डबघाई, डफगना** स्त्री. १. डफावर म्हटले जात असलेले गाणे संपत आले असता गायकाची गाताना होणारी घाई व ती लय. २. (ल) एखाद्या गोष्टीची समाप्तीची, शेवटाची वेळ. ३. (ल.) अधोगती; अवदशा. (वा.) **डफघाईस, डफगन्यात येणे**– समाप्तीचा, विनाशाचा, अवनतीचा, घसरगुंडीचा काळ येणे; मरणोन्मुख अवस्था होणे; उतरती कळा लागणे; दिवाळे काढण्याच्या, मोडण्याच्या, बुडण्याच्या स्थितीस येणे : 'एका व्यापारात (जॉनसन यास) मोठी ठोकर लागून तो अगदी डबघाईस आला.' – नि ६५७.

**डफडी–डे–री–रे** स्त्री.न. (डफ याचे लघुत्वदर्शक व क्षुद्रतावाचक रूप) १. लहान डफ; टिमकी. २. दोन डफडी. (वा.) **डफऱ्यावर पडणे** – नावाचा बोभाटा होणे; प्रसिद्धीला येणे (वाईट अर्थाने).

**डफड्या–ट्या, डफ्या** वि. डफ वाजविणारा.

**डफणा** पु. भोवऱ्याच्या खेळात भोवरा उलटा मोगरीवर फिरणे.

**डफर** वि. सामान्य; फडतूस : 'ते कुणाही डफर माणसाला येतं आताशा....' – बएरा १००.

**डफरा** पु. १. आगगाड्या किंवा वीजगाड्या यांचा धक्का पादचारी किंवा जनावरे यांना बसू नये म्हणून त्यांच्या पुढील बाजूस केलेली योजना. २. एक जहाज दुसऱ्या जहाजावर आपटू नये म्हणून त्यांच्या बाजूस सोडलेले जाड दोऱ्यांचे वेटोळे. (कु.)

**डफरावणे** अक्रि. १. काहीतरी सांगणे; दडपून देणे; वेळ मारून नेणे; धुडकावणे. २. भीती दाखविणे. ३. ढकलणे (होडी इ.).

**डफळ** न. उकडलेल्या आंब्याचे लोणचे. (व.)

**डफळवाणी, डफळा** वि. फुळकवणी; पाणचट पदार्थ; अतिशय पातळ पदार्थ. (ताक, आमटी, दूध इ.): 'मग ते पळिभरि वांगेयांचा डफळा घेः ते जेवि :'– लीचउ ५०५.

**डफळा** पु. विणकामाचा एक प्रकार. (बे.)

**डफळा** वि. रंगविशेष : 'ढवळें सावळें चितळें । पोवळें पारवें डफळें । तैसीच रूपें घननीळें । असंख्यात धरियेली ।' – ह१०.१९३.

**डफळी** स्त्री. समुद्राची लाट.

**डब** पु. १. नगारा. २. चर्मवाद्याचा ताण कमी झाल्याने येणारा बद्द आवाज. (वा.) ० **पडणे** – अवसान जाऊन पडणे : 'पोटावर डब पडून कोळी....'– टारफुला.

**डब** स्त्री. दाब; ताबा; हुकूम; धाक.

**डबक–का–की–के, डबकण–खल, डबगा** न.पु.स्त्री. पाण्याचा खड्डा; जलाशय; डोह. पहा : **डपकन**. २. चिखलाचा खड्डा.

**डबकवणी, डबकोनी–णी** न. (तिरस्कारार्थी) लोणच्याचे पाणी; पुळकवणी; अतिशय पातळ व बेचव पदार्थ. (ना.)

**डबगा(घा)ई** स्त्री. १.उकडहंडी.२.जमिनीत खड्डा खणून त्यात रताळी पुरून वर विस्तव पेटवून भाजणे. (क्रि. घालणे): 'हुरडा, डबघाई कधी मक्याची मळीतलीं कणसें.'–नकुला ५७.

**डबडबणे, डबडणे** अक्रि. बदबद वाजणे; ढबढबणे; (ढिला पडलेला मृदंग, डफ इ.) अतिशय मंद वाजणे. [ध्व.]

**डबडबणे** अक्रि. १. काठापर्यंत, तंतोतंत भरणे (भांडे, नदी, विहीर). २.डोळे अश्रूंनी भरून येणे. ३. पडसे इ.नी बेजार होणे; थंडी होणे.

**डबडबीत** वि. भरपूर; काठोकाठ; ओतप्रोत.

**डबडं** न.तेलाचा दिवाः'घरातलं डबडं मालवलं गेलं...'–किरिस्ताव ३५.

**डबडी–डे** स्त्री.न. १. पहा : **डपकी**. २. जस्ताचे भांडे. ३. घासलेटवर पेटणारा दिवा, चिमणी.

**डबडी–ड्या** वि. क्षुद्र; टाकाऊ; अगदी निरुपयोगी; योग्यता नसलेला : 'आमचं शरीर म्हणजे डबडी मोटार.'–झाकोळ८८.

**डबर** पु. (स्था.) घराच्या पायात भरायचा ओबडधोबड, अनघड दगडांचा समुदाय. [इं.रबल्]

**डबरकाम** न. (स्था.) न घडविलेले दगड रचून त्यापासून केलेले भरावाचे अथवा गडग्याचे बांधकाम.

**डबरपोट्या, डबरा** वि. ढेरपोट्या; दोंद वाढलेला.

**डबरल** पु. पठाण. (स्त्रिया व मुले म्हणतात.)

**डबरा** न. गुबारा; फुगवटी (पोटाची). (क्रि. धरणे). [क.]

**डब(बु)रा** पु. १. डबके. पहा: **डगरा**. २.कचरा टाकण्याकरीता खणलेला खड्डा. ३. (गुऱ्हाळघर) रस धरण्याकरिता केलेला खळगा. ४. खळगा : 'पोटाचा डबरा कसा भरायचा?'– व्यंमाक ६९. [हिं. डबरा]

**डबल** वि. दुप्पट; दुहेरी; दुबार. [इं.]

**डबलघोडा** पु. आकड्याच्या जुगारातील परिभाषा : 'डबलघोडा म्हणजे आठ.'– मक १९६१ पृ. ३.

**डबलडेकर** वि. दुमजली (बस). [इं.]

**डबलबार** पु. व्यायामाचे एक उपकरण : 'बाहेर सिंगलबार, डबलबार होते.'– दुर्दम्य ९. [इं.]

**डबलबारी** स्त्री. दोन नळ्या असलेली (बंदूक).

**डबलबीन** स्त्री. घेवड्याच्या शेंगांप्रमाणे एक भाजी. [इं.]

**डबलमार्च** पु. (व्या.) दुडकी चाल; दोन पावलांत साधारण ४० इंचांचे अंतर ठेवून केलेली चाल. [इं.]

**डबलरोट–टी** पु. स्त्री. पाव : 'असे म्हणून त्यांनी डबलरोट माझ्या हातात दिला.'– जीसे १२४.

**डबलरोल** पु. १. दुटप्पी वागणे : 'एक प्रकारचा डबलरोल आपण चालवला आहे असे मला वाटू लागले.'– इंधन ९१. २. एकाच व्यक्तीने दोन व्यक्तिरेखा साकारणे (नाटक, सिनेमा). [इं.]

**डबा–ब्बा** पु. १. जिन्नस वगैरे ठेवण्याकरिता धातू इ.ची केलेली पेटी; करंडा; लहानशी पेटी; मोठी डबी; झाकण असलेले, वाटोळ्या किंवा चौकोनी आकाराचे भांडे. २.आगगाडीच्या रांगेतील एक सुटी गाडी. ३. लहान मुलांच्या पोटात होणारा एक रोग; मुडदूस.

**डबाड** न. डबके. पहा : **डबरा**

**डबाबंद करणे** क्रि. फळे, भाज्या इ. टिकविण्यासाठी ते डब्यात भरून डब्यातील हवा काढून टाकून तो बंद करणे; (इं.) कॅनिंग.

**डबी, डब्बी** स्त्री. १. अतिशय लहान पेटी; छोटा डबा. २. (ल.) देवळातील तिजोरी; जामदारखाना. ३. देवापुढील दक्षिणेची, देणगीची पेटी. ४.जकात, दस्तुरी, कर इ. घेण्याची पेटी. ५. आगपेटी. (ना.) [क., हिं.]

**डबीर** पु. १.राजाचा खाजगी कारकून; कारभारी; अष्टप्रधानांपैकी एक. २. लेखक; कारकून; सचिव; चिटणीस : 'पेशवे सुरनिस–चिटणिस डबीर ।'– तुगा ४४४३. [फा. दबीर]

**डबुकवडा** वि. चपट, चपटे नाक असणारी (व्यक्ती). (अहि.) पु. मसाल्याच्या भाजीचा एक प्रकार. (अहि.)

**डबु(बो)ले** न. १. साठवून ठेवलेला पैसा; गंगाजळी; ठेव; गाठोडे; संचित धन. २. सापडलेले गुप्त द्रव्य; खजिना; आयती प्राप्ती; अनपेक्षित लाभ.(क्रि. लागणे, सापडणे, मिळणे.). [क. डब्बी]

**डबुरू** न. डमरू : 'पींगटा जळै : वाघावर पहीरण : त्रीसुळ : डबुरू : ऐसा असे जी :' – लीचपू ५३८.

**डबु(बू)सा** पु. (काही अरब लोकांच्या) जहाजातील मागील बाजूस केलेली एक लहानशी खोली किंवा छाया केलेली, बंदिस्त जागा. [अर. दबूसा]

**डब्ब** वि. फुगीर.

**डब्ब** क्रिवि. पुरेपूर; काठोकाठ. (क्रि. भरणे, सुजणे.).

**डब्बा** वि. भिकार : 'हॅट साला ! मराठी पिक्चर? डब्बा!'– खांपा १०८.

**डब्बागोल** पु. लहान मुलांचा एक खेळ. (अहि.)

**डब्बादवाली** स्त्री. (लष्करातील प्रचलित जुनी संज्ञा) काडतुसाची पेटी व पट्टा. [हिं.]

**डब्री** स्त्री. १. देवापुढील पेटीत यात्रेकरू किंवा भाविकांनी टाकलेले द्रव्य. २. देवालयाची कोठी.

**डभान** स्त्री. खोल पाण्याचे तळे; डबके. (अहि.)

**डम** न. १. एक वाद्य; मोठा नगारा. २. समेळ.

**डमक** न. डबके. (कर.) [ध्व.]

**डमडम** स्त्री. भांडाभांडी; दंगा; बोलाचाली. [ध्व. डम]

**डमणी** स्त्री. कपडे धुण्याची मोगरी. [पं.]

**डमरू** न.पु. वाळूच्या घड्याळाच्या आकाराचे, हलवून वाजवण्याचे वाद्य. याचा मधला भाग अरुंद असून दोन्ही रुंद तोंडे कातड्याने मढवलेली असतात. मध्यभागी एक दोरी असून तिच्या टोकांना टणक गुंडाळे असतात. डमरू हलवला म्हणजे गुंडाळे चामड्यावर आपटून आवाज होतो; शंकराचे वाद्य; डौर. [सं.]

**डमरूयंत्र** न. बारीक गळ्याच्या वर्तुळाकार भांड्याच्या तोंडावर तशाच आकाराचे दुसरे भांडे उपडे ठेवून चिकटवून तयार केलेले यंत्र; अर्क काढण्याचे उर्ध्वपातन यंत्र.

**डमामा** पु. एक वाद्य; डंका. पहा : **डम** : 'मध्वनाथा विजयी वाजवितो मी डमामा ।' – मध्वक ४८. [ध्व.]

**डमी** पु. नमुना प्रत : 'प्रत्येक अंकाची तपशीलवार डमी आम्हास करावी लागे.'– विराम. [इं.]

**डम्म** न.१.फुगवटी; ताठरपणा. २.(ल.)ताठा. ३.गाजावाजा; बभ्रा. क्रिवि. १. डब्ब; तट्ट; ताणून. २. टणण; तट्ट झाल्यामुळे आवाज करून.

**डर** पु. भीती; भय; धाक. [हिं.]

**डर** पु. ढेकर. (ना.)

**डरकण–णी, डरका, डरकाणी** न. स्त्री.पु. (वाघ, बैल इ.ची) गर्जना; आरोळी.(क्रि. फोडणे, मारणे, घालणे, करणे.). [ध्व.डर]

**डरकणे** अक्रि.१.ओरडणे; गर्जना करणे; डरकाळी मारणे (वाघ, बैल इ.नी). २.डराव करणे (बेडकाने). ३. (ल.) आग पाखडणे; रागावून बोलणे.४. ढेकर देणे.

**डरकल** न. कफाचा बेडका; गोळा. (कु.)

**डरकावणी** स्त्री. भीती दाखविण्याकरिता, घाबरविण्याकरिता केलेली गर्जना; आरोळी. पहा : **डरकाळी, डरकण** : 'एकाएकी वाघाची डरकावणी आली.'– लामण ३३.

**डरकावणे** अक्रि.भिवविण्यासारखे मोठ्याने ओरडणे; गर्जना करणे; गुरकणे; आरडाओरड करणे. पहा : **डरकणे**
उक्रि. गर्जना करून, ओरडून भिवविणे.

**डरकाळी, डरकी** स्त्री. (वाघ, सिंह इ.ची) गर्जना; मोठी आरोळी. पहा : **डरकण**

**डरजुली** वि. भेदरलेली; धास्तावलेली : 'तीं माणसें डरजुलीं ... आणि कायमची भुकेलेलीं असावीं असे वाटे.'– उअं ३१.

**डरडरावत-वून** क्रिवि.१.घोरत. २.निर्धास्तपणे; स्वस्थपणे.(क्रि. निजणे, झोपणे.).

**डरडाफर** स्त्री. दमदाटी; दहशत; दबाव.

**डरणे** अक्रि. १. भिणे; भयभीत होणे; भीती बाळगणे. २. डरकणे; डुरडुर करणे : 'तुं वृथा कां डरतोसि।'ह्न पंच १.२४. [सं. दर]

**डरपोक** वि. भित्रा; भ्याड; भीरु; नामर्द; घाबरट; भेकड. [हिं.]

**डरसा** पु. १. भुंकणे; खिसणे; वस्सकन अंगावर येणे (रागाने मांजर, कुत्रे, सर्प, माणूस इ.). २. एकसारखे पचापच थुंकत राहणे.

**डरंगळ** स्त्री. अतिसार; हगवण; ढाळ; जुलाब. (क्रि. लागणे).

**डरंगळणे** अक्रि. हगवण लागणे; ढाळ होणे : 'काही खांडांत डरंगळण्याचा रोग शिरला आणि मेंढरं पटापट मरू लागली.'– बनगर १२१.

**डरा** पु. नर जातीचा वानर, माकड. (राजा.)

**डरांव डरांव** क्रिवि. बेडकाच्या ओरडण्याच्या आवाजाचे अनुकरण करून. (क्रि. करणे, ओरडणे). [ध्व.]

**डरा(र)वणी** स्त्री. १. बेडकाचे ओरडणे. २. भेडसावणे; भिवविण्यासाठी मोठ्याने ओरडणे; रागे भरणे.

**डर्बी** पु. १. घोड्यांच्या शर्यतीतील जुगार. २. दुप्पट पैसे देणारा खेळ.

**डलगेवार** पु. गुरांचा समुदाय. (व.)

**डलरीड** उद्गा. हर्ष-आनंद-जयप्रदर्शक उद्गार.

**डला-ल्ला** पु. १. लहानसा गोळा; चेंडू; डिखूळ; आटलेला, जमलेला गोळा (चूर्णादिकांचा). २. गुप्त साठविलेला ऐवज; गाठोडे; मालमत्ता; भांडवल; डबोले. ३. गोळा; तुकडा (चांगल्या वस्तूचा); लग्गा. (क्रि. साधणे, सापडणे.).[हिं.] (वा.)० **देणे, मारणे**-एखाद्याच्या पैशांचा अपहार करणे; पैशावर हात मारणे; पैसा लुबाडणे.

**डलीडुल्ली** स्त्री. शिळ्या भाकरीचे तुकडे : 'फिरंल गलोगली आन् खाईल डलीडुल्ली.'– बलुतं.

**डल्या** पु. गुरांचे मांस. (ना.)

**डल्ला** पु. ताटातील भाजीचा तुकडा. (झाडी) [हिं.]

**डल्ली** स्त्री. नमदा; बुरणूस; खोगीराखालचे घाम शोषणारे कापड; घामोळे.

**डल्ली** स्त्री. १. मांसाचा तुकडा. २. मांसाहारी जेवण. (झाडी) [हिं.]

**डल्ल्याबुरनसी** न. घोड्याच्या स्वारीचे सामान.

**डव** पु. १. लहान नारळाचा डोळा हे तोंड ठेवून खरवडून तयार केलेले पात्र; डहू. २. नारळाची पळी; डाव. नारळाच्या करवंटीला लाकडी मूठ लावून केला जाणारा डाव; लाकडी डाव. [सं. दर्वी]

**डवक** स्त्री. १.(जेवणा-खाण्याकरिता) तळहात खाली करून पसरलेला हात; बचक. (को.) २. बचकभर मापाचा जिन्नस; बचक परिमाण.

**डवकणे** अक्रि. रोखून बघणे; टक लावणे. पहा : **डौकणे**

**डवका** पु. डूख; मनातील तिढा; रोष; कलुषित मन; सूड भावना. (अहि.)

**डवकारपणा** पु. स्वतःच्या कृत्याचे समर्थन. (क्रि. करणे, दाखविणे).

**डवगा** पु. मोठा बांबू; कळक. [क.]

**डवगा-घा** पु. शेतातील उत्तम पीक आलेला भाग, जागा.

**डवचणे** पहा : **डिवचणे** : 'प्रेक्षक.... एकमेकांना कोपरखळ्यांनी डवचून टिंगल करतात.'– म.सा.सं.अ.भा. खं.१-४०४.

**डवचणे, डवच(चा)वणे** सक्रि. १. टोचणे, टोचून बोलणे; भेदणे. २. (ल.) उठवणे; चेतवणे; उद्युक्त करणे; खवळविणे. ३. टोचून सूचना करणे, देणे; भडकाविणे. [सं. दुवस्]

**डवडव** स्त्री. १. दगदग; श्रम. २. मळमळ.

**डवडव-वा, डवडवीत** क्रिवि.१.सपाटून; सर्व शरीर भिजेल अशा तऱ्हेने (घाम येणे). (क्रि. येणे, सुटणे.).२. अतिशय आधिक्याने; बहारीने (फुले येणे). ३. पूर्ण भरलेले : 'डवडवित यशाने जाय आल्या पथीं रे ।' – वाविरा ७.१९९.

**डवडवणे** पहा : **डवरणे** १-४

**डवणा-ना-ला** पु. करवंटीला, आंब्याच्या कोयीला लाकडी दांडा बसवून केलेली पळी; डाव. पहा : **डव**

**डवणा-ना** पु. द्रोण :'पळसाचं पान पाणी केळीच्या डवन्यात...'– जलोसा २०४. पहा : **डोणा** [सं. द्रोण]

**डवणा** पु. दंगा. पहा : **डोहणा** २: 'खांदेशप्रांतें हजार पांचसे राउत रवाना केले आहेत. जागा जागा डवणा करितात.'–पेद १२.८४.[हिं. डवा]

**डवर** न. चामड्याने मढविलेले एक वाद्य; डवरा.

**डवर,डौरा** पु. कोळपे; कोळपण्याचे एक लाकडी अवजार. (व.)

**डवरणे** सक्रि. डवराने कोळपणे. (व.)

**डवरणे** अक्रि. १. झाकोळणे; मेघ खाली लोंबणे; उतरणे; अंधारी पडणे. २.फुले, फळे, पाने, कणसे वगैरेंनी झाड बहरणे, मोहरणे, फुलणे; फुलारणे; तरारणे; टवटवीत होणे; (सर्वांग) आच्छादिले जाणे. ३. (ल.)(दागिने, देवी, पुटकुळ्या इ.नी) शरीर गच्च भरून जाणे. ४. घामाच्या धारा वाहणे; घामाने निथळणे : 'ओठावरच्या भागावर डवरलेले घामाचे तुषार.' – पॅरॉलि ६७. ५. (पोट) फुगणे, भरणे, मोठे होणे; सगर्भ होणे. [सं. द्रु]

**डवरणे** अक्रि. शोधक दृष्टीने न्याहाळून खालवर पाहणे; टेहळणे (घार, हेर, गुप्त दूत, चोर आदींनी).

**डवरणे** उक्रि. डेवणे; (ओझे) खाली ठेवणे. (गो.)

न. दवरणे; ओझे खाली ठेवण्यासाठी केलेला ओटा, उंचवटा; धर्मकट्टा.

**डवरणे** उक्रि. चोपडणे; माखणे; लिप्त करणे; लेप लावणे : 'शृंगारमंडित महावीर केशरकस्तुरी डवरले ।'– वेसीस्व ९.६४.

**डवरणे(नं)** अक्रि. फिरणे; उंडारणे; निरर्थक फिरत राहणे. (अहि.)

**डवरा** पु.१.(नदी इ.च्या कोरड्या पात्रामध्ये) पाण्याकरिता खणलेला खड्डा; पाण्याने भरलेला खड्डा. २. झरा. (को.) ३. डबके.

**ड(डा)वरा, डाहोरा** पु. शेतकऱ्यांचा एक सण; देवकार्य; मेजवानी; हंगामाचे जेवण; नवे. (यावेळी मळणी झाल्यावर धान्य पुष्कळ भरावे म्हणून पिशाच्चांना बकरा बळी दिला जातो).

**डवरा** पु. भ्रमंती.

**डवरा** वि. मारकट; मारका.

**डवरा** पु.१.खतयुक्त पाणी. २. डवरणीचे साधन; गुरमा. (झाडी)

**डवरा** पु. डौर. पहा : **डमरू**

**डवरा-री-रे-ऱ्या गोसावी** पु. गोसाव्यांची एक जात व त्यातील व्यक्ती; गोंधळी; डौर वाजविणारा; भराडी. (हे जोतिबाचे किंवा भैरोबाचे उपासक

असतात. हे डहुरकरी, डवरी गोसावी ज्योतिबाचा गोंधळ, भराड करण्यास हजर असतात) : 'भिक्षा मागतांना ते डमरू 'डौर' वाजवितात म्हणून त्यांना डवरे गोसावी असे म्हणतात.' – मलोसं ३७१.

**डवऱ्याची पास** (कृषि.) फावड्याचे पाते.

**डवला** पु. (तेलाचे) एक माप. (व.)

**डवला** पु. डौल; गर्व; शेखी; तोरा; दिमाख. (क्रि. दाखविणे, मिरविणे.).

**डवला** पु. एक सुगंधी द्रव्याचे झाड.

**डवला** पु. ढवळा; ढवळाढवळ; डहुळा; दंगा.

**डवली** स्त्री. लहान डव; नरोटीचा, लाकडी डाव; पळी. [सं. दर्वी]

**डवशीर** पु.स्त्री. एक सुंदर झुडूप.

**डवळा** पु. (सारवल्यानंतर निघणारा) जमिनीचा पोपडा. (बे.)

**डवंचलणे** अक्रि. लोटणे; बुडकळी देणे : 'एरांतें डवंचलीति : एरांतें डवंचलीति : ऐसी जळकृडा खेळत होते :' – लीचपू २६७.

**डवांगी** क्रिवि. बाजूने; आडवांगी : 'मागापुढा डवांगी न ठकत न मरें.' – गस्तो २०.

**डवू(ह्)र** न. गलबते पाण्यातून जमिनीवर काढण्याचे लाकडी यंत्र. (कु.)

**डवूरबाजू** चौकटवजा तयार केलेल्या बाजू.

**डवूरमुसळ** न. जाडे लाकूड. (डवूरामधील मुख्य भाग.).

**डव्हरा** पु. नदीत पाण्यासाठी खणलेली खाच. पहा : **डवरा १**

**डव्हला–ळा** पु.१. घोटाळा; बिघाड : 'म्हणे पातशाही कामाचा डव्हला होईल.' – पेद २.२. २. दंगा; ढवळाढवळ. ३.मंथनः'क्षीरसागरीं निजश्वासें करूनि डव्हळा। चौदा रत्नें काढिलीं।'–स्वादि ९.१.७.

**डव्हळणे, डव्हळा** सक्रि. ढवळणे.

**डव्हळा** पु. १. फार पाणी घातलेले वरण, पीठ. २. आजारी माणसाला प्यायला देतात ते कढण.

**डसकर, डसका–कारा** वि. चावरा(प्राणी इ.). [सं. दंशकृ]

**डसणे** उक्रि. चावणे; चावा घेणे (विंचू, सर्प इ.नी). [सं. दंश]

अक्रि. (ल.)चिकटणे; डकणे; बिलगणे : 'भवतीरातें हस्तें न्यावें चरणीं दृढ डसलों ।' – दत्तपदे ११.

**डसाडु(डो)कर** स्त्री. होळीच्या खेळातील हडळीचे सोंग.

**ड(ढ)साण** वि. आंबट या अर्थाच्या शब्दाच्या पुढे झोंबणारे, डसणारे या अर्थी योजतात (फळे, ताक इ.संबंधी.). [सं. दह्]

**डस्टर** न. १. फळा पुसावयाचे साधन. २.धूळ झटकण्याचे फडके. [इं.]

**डह** पु. गळ्यावर हात मारून काढला जाणारा एक विशिष्ट आवाज. गुराखी मुले खेळात असा आवाज काढतात. [ध्व.]

**डहल** स्त्री. घरापुढील दिंडी दरवाजा. [फा. देहलिज्]

**डहलज, डह(हा)ळज** न. १. दरवाजाच्या चौकटीची खालची बाजू. २. दाराजवळील बैठकः'ती डहाळजच्या रोखानं गेली.'–पेरणी ८६. पहा : **ढेलीजा** [सं. देहली]

**डहळणे** अक्रि. डळमळणे; घाबरणे; चलबिचल होणे.

**डहा, डहाणी–ण्या वाघ, डहाळ–ळा–ळी** पहा : **डाह**

**डहाक** न. गारपगारी लोकांचे वाद्य. (वा.) **० पिटणे** – दवंडी पिटणे. **० वाजणे** – एखाद्याच्या नावाचा बभ्रा होणे. (व.)

**डहाका** पु. आध्यात्मिक कवन.

**ड(डा)हाण्या** वि. अंगावर ठिपके असलेल्या जातीचा साप किंवा वाघ : 'तूं डहाण्या वाघ आहेस.' – पेरणी २७.

**डहाळ** पु. प्रकाश; चमक.

**डहाळ** पु. उतार.

**डहाळा–ळी** पु.स्त्री. कोवळी फांदी.

**डहुणा** पु. पहा : **डोहणा २**

**डहुरी, डरकरी** पहा : **डवरी गोसावी**

**डहुळ** वि. अस्वच्छ; गढूळ : 'आकाश जालें डहुळ ।'–वेसीस्व १.११९.

**डहुळ(ल)णे** उक्रि. १. गढुळणे. पहा : **ढवळणे.** २. गडबडणे; खवळणे : 'जें थितें हे डहुळलें । मानस माझें ।'–ज्ञा ३.१४.

**डहुळणे** अक्रि. दुःखाने हेलाविणे, लोळणे. [सं. धुर्व]

**डहुळा, डहो(हौ)ला, डळा** पु. गोंधळ; दंगा. पहा : **ढवळा १**

**डहू** पहा : **डव** [सं. दर्वी]

**डहूर** पु. पहा : **डमरू, डौर**

**डहूळ** पु. माहिती भरून द्यावयाचा फॉर्म. पहा : **डौळ**

**डळडळीत** वि. १. तुळतुळीत; बिलबिलीत; फुटण्याच्या बेतात असलेले (पिकलेले द्राक्ष, गळू, बुडबुडा इ.). २. लटलट हलणारे; डळमळणारे; थलथलीत (मांस).

**डळमळ** स्त्री. १. चंचलता; कापरेपणा; लटपटती स्थिती; लटपट; घाबरेपणा. २. (ल.) अस्थिरता; अनिश्चितपणा.

**डळमळ–ळा** क्रिवि. खिळखिळा होऊन; थलथलत; हलत; लटपटत (इमारत, पाय, मऊ मांस, राड इ.).

**डळमळणे** अक्रि. १. (धरबंद, आधार सुटल्याने) लटपटणे; हलणे; थरकाप होणे. २.(ल.) मोडकळीस येणे; डुलणे; अस्थिर होणे.३. डोलणे; डुलणे(जहाज).४.हलणे; हिसळणे; हिंदकळणे; गचकळणे (भांड्यातील पाणी).५.डबडबणे; भरणे व भरत येणे: 'भीष्म द्रोणादिकांचे डोळे। अश्रुपातें डळमळती।'–मुसभा १४.१६५. ६.जागेवरून हलणे; सिद्धीस न जाणे.

**डळमळीत** वि.१.कापणारा; लटलट हलणारा.२.फुसकी; मोडकी; बिनटिकाऊ; अस्थिर (इमारत). ३. (ल.) अनिश्चित; संदिग्ध; पोकळ (भाषण, व्यवहार इ.).

**डळमळीत** क्रिवि. १. तोंडोतोंड; काठोकाठ (भांडे भरणे). २. खळखळ वाहत : 'जैसे गंगाचेनि वोघें। डळमळीत जळ जे निघे।'– ज्ञा १४.३९९.

**डळा** पु. (तेली समाजात) विवाहप्रसंगी मुलाकडून मुलीसाठी पाठविला जाणारा पोषाख.

**डळा** पु. खडा; गोळा : 'पोतास कापुराचा डळा । जेवीं नातळे काउळा।' – एभा ११.३७९. [हिं.डल्ला]

**डंक–ख** पु. १. विषारी प्राणी, किरडु यांचा चावा, दंश; नांगीचा तडाखा. (क्रि. करणे, मारणे.).२. द्वेष; एखाद्याचे कोणी वाईट केले असता, त्याने त्याचा सूड घ्यावा म्हणून मनात सदैव ठेवलेला द्वेषभाव; असूया; सूडबुद्धी. (क्रि. राखणे, ठेवणे, बाळगणे, धरणे.). [हिं.; सं. दंश]

**डंका** पु. १. एक चर्मवाद्य; चौघडा वाजविणे संपल्यावर शेवटी वाजवण्याची

मोठी नौबत, नगारा : 'डंक्यावर टिपरी पडतां हुशार झाले।'ह्र ऐपो २३५. २. (ल.) प्रसिद्धी; कीर्ती (बहुधा वाईट कृत्याची); ख्याती; मानमान्यता; गाजावाजा; बोंबाबोंब. ३. संबळावर खर्ज सूर वाजविण्याची काडी. (आकडी नावाच्या काडीने उच्च अथवा टीपेचा सूर काढतात.). [हिं., सं. ढक्का] (वा.) ० **देणे, वाजविणे** – उघडकीस आणणे; दांडोरा पिटणे; अपकीर्ती करणे.

**डंकी–खी** स्त्री. कुस्तीतील एक पेच. (क्रि. मारणे, देणे.).

**डंकी–खी** वि. दंशी; मनात दंश, डाव ठेवणारा (माणूस इ.).[सं. दंश]

**डंकीण** स्त्री. पाणी उपसून काढण्याचा एक प्रकारचा पंप. (व.) [इं. डाँकी पंप]

**डंकी(खी)ल** वि. डाकील; डाक लावलेले.

**डंख–ग** पु. चुना, पोहे, तिखट इ. कुटण्याची लाट. [ध्व., हिं. डंखी]

**डंख उजाड** घोड्याच्या तोंडाच्या खालपासून पायापर्यंत असलेला भोवरा. – अश्वप १.१०३.

**डंखणे** उक्रि. पहा : **डसणे** : 'विषयविषधरी हो डंखिली आजि भारी ।'– सारुह ४.७.

**डंखीक** वि. चारा–दाणा खाऊन मान हलविणारा; डुलणारा (घोडा).

**डंखीण** स्त्री. १. डाकीण; चेटकीण. २. (ल.) क्रूर, जखव, कुरूप, भयंकर स्त्री; जखीण; हडळ. [सं. डाकिनी]

**डंखी(खे)ल** वि. डंख केलेले; पक्ष्यांनी चोचीने टोचलेले; किड्यांनी खाल्लेले; उंदरांनी कुरतडलेले (धान्य, फळ इ.). [सं. दंश]

**डंग, डंगर, डंगाण, डांग** न.पु. पहा : **डांग** ५–८

**डंग** न. कुटण्याचे किंवा कांडण्याचे उखळ, मुसळ : 'दारूचे तीन डंग लाविले आहेत.'– ऐको ३०२.

**डंगण** न. पहा : **डांग.** [प्रा. डंग+ सं. वन]

**डंगर** वि. १. वृद्ध; म्हातारा. (व.) २. उंच. (खा.)

**डंगरी** न. एक प्रकारचे सुती कापड; खादी. (को.)

**डंगरु** पु. प्रतिबंध. पहा : **डगर–रु**

**डंगा–गी** न.स्त्री. १. एक प्रकारचे गलबत, होडी; डंगी; डोंगा. २. खांद्यावर वाहण्याची कावड. [प्रा. डोंगी]

**डंगारणे** न. दांडके; टिकोरे.

**डंगा(घा)ळ** वि. डांग. पहा : **ढंगाळ**

**डंड** पु. १. दंड. २. जुनेरांचे शिवण. ३. शेत. (झाडी)

**डंडळ(ल)णे** अक्रि.१. पहा : **डळमळणे** १ :'तेथ तिन्हीं लोक डंडळित । मेरुमांदार आंदोळित ।'–ज्ञा १.१५५.२. घाबरणे. पहा : **डगणे** : 'तेवीं देहाची होतां होळी । ज्ञाता न डंडळी निजबोधे।'– एभा १३.५७८. [ध्व.]

**डंडळणे** उक्रि. शोधणे; धुंडाळणे : 'जवें डंडळी स्थान आखंडळाचे।'– किंशुक ५.

**डंडा** पु. काठी; दंडा. [ हिं., सं.दंड]

**डंडार** स्त्री. स्थानिक लोकनाट्य; दंडार. (झाडी)

**डंडी** पु. एक गायक जात व त्यांची कला. (झाडी)

**डंडी** स्त्री. १. नळी. २. दांडी. (झाडी)

**डंडीगाना** पु. १. दंडींचे गायन; दंडीगान. २. गोंगाट. ३. अकारण वाद.(झाडी)

**डंड्या** वि. भटक्या; निरुद्योगी. (झाडी)

**डंफण** न. डंका.

**डंब** न. १. डंभ; ढोंग; देखावा. पहा : **दंभ.** २. रिकामा खटाटोप.

**डंब,ड(डं)बक** क्रिवि. परिपूर्ण; काठोकाठ; भरपूर; ढब्ब. (क्रि. भरणे, फुगणे, सुजणे). [सं. डंभ = जमविणे]

**डंबर** न. अवडंबर; विस्तार. पहा : **अवडंबर** : 'धर्माचें माजवूनि डंबर।'ह्र केक १०३. मेघ, जग इ. शब्दांशी संयोग होऊन सामासिक शब्द बनतात. जसे:–'तो हा जगडंबरु।'–ज्ञा १५.४.७. [सं.]

**डंब(बा–भा)रणे** अक्रि. १. फुगणे; ताठ होणे; डब्ब होणे. २. (पोट) फुगणे. ३. (ढग) ओथंबणे; खाली लोंबणे; झोलणे. ४. पुन्हा भरणे; पुन्हा पुवाळणे (फोड). [सं. डंबर]

**डंबा(भा)रा** पु. १. फुगवटा; फुगीरपणा; गुबारा (पोटाचा).२.(मेघांची) ओथंबलेली, झोलती स्थिती; (पाण्याने) गच्च भरलेली अवस्था. ३. घुस्सा; फुरगटणे; गाल फुगवून बसणे; क्रोधाची, धाकाची मुद्रा. ४. (गळू, फोड) पिकणे; पू धरणे; पुवाळणे; फुगवटा; सूज. [सं. डंबर]

**डंबाळ** पु. १.डौल; थाटमाट : 'तेथें बहुतें डंबाळें । पांडवूं साडमेयां आलें।'– शिव ५७९. २. विस्तार; व्याप : 'पुराणाचें सरलें डुंबाळ।'–भाए ८६. [सं. डंबर]

**डंबेल** पु. व्यायामाकरिता मुठीत धरून फिरवण्याचे जाड मुद्गल, रिंगणी; दोन्ही टोकास वजन असलेला एक लहान, लोखंडी, जड दांडा. स्नायुबळकटीसाठीच्या व्यायामाचे साधन. [इं.]

**डंभारणे** अक्रि. सुजणे; फुगणे. पहा : **डंबारणे**

**डंशस–श** पु. १. दंश. २. चटका : 'जिव्हाडंसु।'– ज्ञा १७.१४३. ३. मर्म : 'नाथसंकेतिचा डंसु ।' – ज्ञा ६.२९१.

**डाइ–व** पु. हार; पराभव : 'जयाचा भाऊ जडु : तयावरि डाइ :' – लीचउ ३५९.

**डाइ** पु. (कोपरापासूनचा) हात; अठरा इंचाचे एक परिमाण :'वरि पार्णी चडलें पनरा डाइ ।'– क्रिपु ७.१०१.

**डाई** पु.स्त्री.१. जीत; सरशी; खेळातील जय; जिंकलेला डाव. २. फासा टाकणे; खेळातील हात. ३.खेळण्याची पाळी. पहा : **डाव.** [फा.दाव](वा.) ० **पडणे** – गुरफटणे; गुंतणे : 'खेळ खेळुन न पडे जो डाई। तोच उमजला आपल्या ठायीं।'– मध्वक १६८.

**डाई** पु.स्त्री. डाक.

**डाई** पु. स्त्री. द्वेष; हेवा. (क्रि. पेटणे, पडणे) : 'पडला षट्शत्रूंच्या डाई। वासनेला मारूनि घाई ।'– अमृत १८. [सं. दाह]

**डाईक** वि. दावा धरणारा; दीर्घद्वेषी : 'बहु डाईक दुर्मती । या नांव बद्ध।'– दास ५.७.३०.

**डाईज** वि.१.भाऊबंद; भाई. २. वडिलोपार्जित मालमत्तेतील वाटेकरी. (माण.) पहा : **दाईज** [सं. दायाद]

**डाउ** पु. गणेश; गणपती : 'की गगन डाउ डवरिला सेंदुरें । प्रकाशाचेनि।'– नरुस्व ७१३.

**डाउ** पु. देवीच्या कुळधर्माचा एक प्रकार.

**डाऊ** पु. गेरू; काव.

**डाऊ** पु. लग्नात सुपारी लपविण्याच्या नवरा-नवरीच्या खेळातील सुपारी.

**डाऊन संलक्षण-सिंड्रोम** गुणसूत्रांतील किंवा रंगसूत्रातील जन्मजात दोषामुळे उत्पन्न होणारी विकृती. (ब्रिटिश डॉक्टर 'डाऊन' यांनी याचा शोध लावला.).

**डाऊल** न. मोठी पळी. (कु.) पहा : **डवली**

**डाएट** न. आहारनियंत्रण आणि आहारयोजना.

**डाओ** पु. डाग; किंचित स्पर्श; चटका : 'जीभे डाओ पडिला ऐसें म्हणाल ?'-लीचउ १५७.

**डाॐ** पु. डाव :'नक्षत्रीं डाॐ पाडावा ।' -ज्ञा ११.५७१.

**डाक** स्त्री. १. माणसाच्या मृत्यूनंतर बाराव्या दिवशी केला जाणारा विधी : 'कारण इतकी माणसं लग्नकार्य किंवा डाकीखेरीज कधी येत नाहीत.' - अउआ १२५. २. (एखाद्या व्यक्तीच्या)अंगात आणून बोलण्यास लावणे : 'मुंजाबाची डाक भरोजी मेसाई आळविली हो।'-भज.

**डाक** स्त्री.१.कथील, अभ्रक इ.चे तुकडे (हे चकचकीत असून देव्हारे, चित्रे यांवर चढवितात); हिऱ्या-रत्नांचे सौंदर्य वृद्धिंगत करण्यासाठी त्याखाली बसविण्याचा चांदी, जस्त इ.चा तुकडा, पान, पत्रा.२. कृत्रिम जवाहीर बसविण्यासाठी भिंगाखाली लावलेला एक रंगीत पदार्थ.[हिं.]

**डा(डां)क** पु. भांड्याचा जोड बसविण्यासाठी धातुरसाचा केलेला रांधा, जडण्याचा पदार्थ; कस्तर. [सं. दंश]

**डाक** पु. १. भूत-पिशाच्च-विद्या; मृत मनुष्याला बोलायला लावण्याचा विधी. (राजा.) २.वरील प्रसंगी, तसेच गोंधळाचे वेळी उपयोगी पडणारे एक वाद्य; नगारा. ३.गोंधळासारखा एक कुळधर्म. [सं. ढक्का] (वा.)

**० भरणे**-मांड मांडणे; स्थापना, पूजा इ. करून वाद्ये वगैरे वाजविणे.

**डा(डां)क** स्त्री. १. टपाल, उतारू नेण्याकरिता घोडे, माणसे ठेवून केलेली व्यवस्था. २. (साम.) टपाल, पोस्ट. पहा : **डाकचौकी.** [फा.]

**डाकघर** पु. टपाल कार्यालय.

**डाकचौकी** स्त्री.पु. डाकेची घोडी, माणसे उतरण्याची जागा; टपाल, उतारू नेण्याकरिता घोडे इ. बदलण्याची जागा; टप्पा.

**डा(डां)कणे** सक्रि. झाळणे; उफलवणे; सांधणे. [सं. द्राख्]

**डाकणे** अक्रि. डागाळणे; काळे चट्टे पडणे (फळ, शरीर इ.वर).

**डाकनोंदपत्र** न. पत्र पोस्टात टाकल्याची पावती मिळणारे व ते पोचल्यावर स्वीकारल्याची सही असलेले पोस्टाला मिळणारे पत्र; पंजीकृत पत्र; रजिस्टर पत्र.

**डाकपट्टी** स्त्री. रुपे, कथील इ.पासून (डाक लावण्यासाठी) तयार केलेली पट्टी; खोटा कलाबतू.

**डाकपत्रा** न. तांब्याचा रंग दिलेला पातळ पत्रा. हा अतिशय चकचकीत असून जाळीच्या मागे लावतात; मिन्याचा पत्रा.

**डा(डां)कपाती** स्त्री. १. डाकपट्टी. २.(ल.) एकी, समेट, मिटवामिटव. (क्रि. करणे). ३. टप्पा.

**डाकप्रेष** पु. आपण पोस्टात पैसे भरल्यावर मिळालेला पोचकागद. तो नमूद केलेल्या पोस्टात सादर केल्यावर निर्दिष्ट व्यक्तीला पैसे मिळतील अशी पोस्टाने केलेली सोय; (इं.) पोस्टल ऑर्डर.

**डाकबंगला** पु. प्रवाशांना उतरण्यासाठी असलेला सरकारी बंगला.

**डाकमतपत्रिका** स्त्री. पत्रद्वारा मतदान करण्यासाठी पाठविलेली मतपत्रिका.

**डाकमुद्रांक** पु. १. पोस्टाचे तिकीट. २. पोस्टाचा शिक्का.

**डाकलख्या, डांखलग, डांखील** पु. १.दुसऱ्या जातीशी संबंध आल्यामुळे किंवा काही बदकर्मामुळे ज्याची बेअब्रू झाली आहे असा माणूस. २. शरीराला काही रोग होऊन तो पूर्ण बरा न झाल्यामुळे अधू झालेला.

**डा(डां)कलग** वि. १. डाक लागलेला; झाळलेला : 'कीं कसवटीं लावितां सुवर्णासी। डांकलग दिसे हीन कसी।'- भवि ४६.८. २.दूषित; मलिन; कलंकित; भ्रष्ट (अब्रू, नाव, जात इ.).(ल.) डागाळलेला; चट्टे पडलेला; पूर्वी होऊन गेलेल्या रोगाच्या खुणांनी युक्त (शरीर).

**डाकवचा-ता** पहा : **डाकुता**

**डाकवदा** पु.चोरी करणारी, डाके घालणारी एक जात : 'तसेंच पेंढारी, रामोशी, काटक, डाकवदे, ठक चोर इत्यादिकांस राखिलें.'- लोश ३४७.

**डाकव्यवस्था** स्त्री. पत्रे, पार्सल, पैसे इ. पोस्टाने पाठवण्याची व्यवस्था.

**डाका** पु.१. चोराचा हल्ला; दरवडा (क्रि. घालणे, पडणे.).२. (ल.) चोरांची टोळी. [हिं.]

**डाका** पु.१. देवीच्या पूजनाचा प्रकार : 'डाका घालितां भवानी। घुमुं लागे प्रसिद्धपर्णी।'-अमृता ५.३६.२. नगारा (डमरूच्या आकाराचा); डंका; कुंभार जातीत वाजविण्याचे लांबोळ्या आकाराचे एक चर्मवाद्य :'डाका अनुहात गजरें। येऊनी अंगासी संचरे।'-तुका २८२. ३. प्रेतसिद्धीच्या वेळी किंवा गोंधळ घालण्याच्या वेळी उपयोगी पडणारे एक वाद्य. [सं. ढक्का]

**डाका** पु. मरणानंतर बाराव्या दिवशी प्रेतात जीव आणण्याचा विधी, पद्धत. (क्रि. घालणे). [हिं.डाक=पिशाच्च, सं. ढक्का, डाकिनी]

**डाकाईत** पु. दरवडेखोर. पहा : **डकाईत** २

**डाकिनी, डाकी(खी)ण** स्त्री. स्त्री पिशाच्च; हडळ; जखीण; चुडेल. पहा : **डंखीण**

**डाकील-व** वि. डाक लावलेला; झाळलेला; सांधलेला; डाकलग.

**डाकील भांडे** (ल.) ज्याच्या शीलाविषयी शंका आहे किंवा ज्याच्या अब्रूला बट्टा, ठपका लागलेला आहे अशी (व्यक्ती).

**डाकु(को)ता, डाकुलता** पु. शूद्रांची एक जात व तीमधील व्यक्ती. हे लोक हस्तसामुद्रिक, भविष्य, पंचांग सांगून, डमरू वाजवून भिक्षा मागतात. ब्राह्मण पुरुष व गवळण जातीची स्त्री यांच्यापासून झालेली संतती. [हिं. डकौत-तिया, डाक=वाद्य]

**डाकुली** स्त्री. चुटकी; टिचकी; टाळी : 'देखोनि वाती वांकुलिया। पंडितां डाकुलिया। वाजविती।'-ज्ञा १७.९४. [ध्व.]

**डाकू** पु. लुटारू; दरोडे घालणारा. [हिं.]

**डाकोटा** न. पंखांवर चालणारे, लहान आकाराचे विमान.

**डाकोडाक** क्रिवि. १. टपालाच्या पद्धतीने; टपालघाईने; उलट टपाली. २. (ल.) त्वरेने; लवकर; अगदी घाईने; मार्गात न थांबता. [फा.]

**डाखला-ळ** पु.न.१.फांदी; डहाळी.(ना.) २.(ल.)अंकुर; तरंग; उमाळा : 'तैसे दृश्याचे डाखळे । नाना दृष्टीचे उमाळे ।'- अमृ ७.१४३.

**डाखळ** स्त्री. चोरगल्ली.

**डाखळ–ळा** वि. चिकाळ; चिकाने भरलेला (आंबा, काजू इ.).

**डाखळणे** अक्रि. १. कुजून डाग पडणे (फळ इ.स); डागळणे. २. जुनी पाने टाकत असणे; झडणे (आंब्याचे झाड इ.). ३. ऱ्हास पावू लागणे; मरू लागणे (झाड).

**डाखळणे** अक्रि.१. डाक लावला जाणे; झाळला असणे; डाकील होणे (दागिना).२.डाक लावल्याने हिणकस, अशुद्ध होणे (सोने). उक्रि. १. डाक लावणे; सांधणे; जोडणे; झाळणे. [सं.द्राख]

**डाखळणे** अक्रि. (आंबा, काजू यांच्या चिकामुळे) घशास बाधा होणे; उतणे; अपाय होणे; डाग पडणे.

**डाखा** वि. डाव्या हाताचा जास्त उपयोग करणारा; डावखोरा.

**डाखीण** स्त्री. दक्षिणेकडील वारा. [सं. दक्षिण]

**डाग** पु. दाह : 'तेणेति डागे : चीखले–वाहाळचिये :'–उगी १०८.

**डाग** पु. १. वस्तू; जिन्नस; नग. २. अलंकार; दागिना. [हिं.]

**डाग** पु. शेताचा तुकडा; नंबर; एका मालकाचा हिस्सा. २. सीमा; मर्यादा दाखविणारा खांब; झाड इ.

**डाग** पु. (व्यापारी) बंगीचा माल; बंगी. (व.)

**डाग** पु.१.खिळा इ. तापवून शरीरावर दिलेला चटका; डागल्याची खूण. (क्रि. देणे) : 'अण्णा बोलतील, शिव्या देतील, मारतील, डाग देतील.'– एल्गार १९. २. खूण; ठिपका; चट्टा; तीळ; वण. ३. शुभ्र वस्त्रादिकांवर शाई इ.चे पडलेले चिन्ह.४. पाप; कलंक : 'भीतों बहु मानसांत डागाते।'– मोआदि ११.८८. [फा.दाघ; सं.दह] (वा.) ० **देणे**– वर्मी लागेल असे बोलणे; मर्मावर घाव घालणे.

**डाग** पु. धातूचे छिद्र बंद करण्यासाठी, धातूचे सांधे शिसे वितळवून जोडण्याची क्रिया.

**डाग** पु. स्त्री. चढण; उंचवटा; चढाव; घाटी. पहा : **डांग** २ ते ५

**डागचिन्ह** न. ओळखीसाठी जनावरांच्या अंगावर तापवलेल्या ठशाने उठवलेले चिन्ह.

**डागडुगी–जी, डागडोजी, डागडूग** स्त्री. नीट करणे; पडझडीची, मोडतोडीची दुरुस्ती (घर, फर्निचर इ.ची); सुधारणा : 'अवशिष्ट भागाची तशीच डागडुग करून...'– स्वका ४३. [फा. दाघ+दोझ]

**डागडूग–क** स्त्री. १. तापदायक चंचलता; अस्थिरता; धरसोड (कर्तव्याची जाणीव आणि कामाबद्दल नाखुषी या संबंधात); मनाचे हेलकावे; अनिश्चय. २. पहा : **डुगडुग**. [ध्व.]

**डागणी** स्त्री.१. डाग; चटका; चरका. २. पहा : **डाहणी**

**डागणी** स्त्री. झोंबणाऱ्या भाषणाने दुसऱ्यास दिलेले दुःख.

**डागणे** सक्रि. १. भाजणे; चटका देणे; पोळवणे; लासणे. २. सरबत्ती लावणे; बत्ती लावून उडवून देणे; झाडणे (तोफ, बंदूक). ३.(ल.) मर्मस्पर्शी भाषणाने दुसऱ्याला दुखवणे; व्यथित करणे. ४.(ल.) कलंक लावणे; ठपका ठेवणे; दूषण देणे. ५.चटका देऊन कातडीवर खूण करणे. [सं. दह]

**डागमुशी** स्त्री. खाऱ्या पाण्यातील एक प्रकारचा मासा.

**डागरहारी** स्त्री. (संगीत) एक विशिष्ट गायनपद्धती, ही तानसेनाने काढली असे म्हणतात.

**डाग(गा)ळ(ल)णे** अक्रि. १. नासण्याने, खराब होण्याने डाग पडणे. (भाकरी, फळे इ.); नासणे; खराबणे. २. आजारामुळे काळवंडणे; कृश; कळाहीन होणे. ३. (भाकरी, पोळी) भाजताना करपणे; जळणे. ४. (सामा.) कलंकित होणे.

**डागिणा–ना** पु. १. अलंकार; भूषणे. २. जिन्नस; नग. ३. चीजवस्तू; वस्त्र, भांडी इ. पहा : **डाग** [हिं.]

**डागिन्सी** वि. गरोदर. (व., घाटी.)

**डागीणदार** वि. उपकृत; मिंधा. (ना.)

**डागी(गे)ल–ले** वि. १. जबाबदार. २. डागलेला; डाग लागलेला; कुजलेला : 'डागिल भात भरड...'– आआशे ३२. ३. शिक्का, चरका, डाग दिलेले. ४. डाग पडलेला; मळलेला; कलंकित.

**डागुरवा(बा)णी** स्त्री. ध्रुपदासह असलेली गायनपद्धती. दिल्लीजवळील डागूर या गावातील ब्रिजचंद या गायकाची गायनपद्धती. त्यावरून या गानपद्धतीला हे नाव पडले. [हिं.]

**डागोबा** पु.(बुद्धाचा)स्तूप; दात,केस इ.सारख्या बुद्धाच्या एखाद्या पुरलेल्या अवशेषावर उभारलेला खांब,स्तंभ,मनोरा, समाधी, स्मारक. [पाली डाबग]

**डाच** पहा : **डास**

**डाच** पु. (शिवणकाम) टाचलेले, दुमडलले कापड.

**डाच** न.तोंड : 'तुझं राकेसाचं डाच ।तुझं पोट रे केवढं ।'–बगा १११.

**डाचणे** उक्रि.१. पहा : **डचडचणे**. २.(स्वतःचा मूर्खपणा किंवा दुसऱ्याचे वर्मी भाषण) मनात सलणे; घोळत असणे; बोचणे; शल्य राहणे; खुपणे.(या अर्थी अकर्तृक प्रयोगही होतो.). ३. त्रास देणे; छळणे; गांजणे. [सं. दंश]

**डाचर, डाचाड** वि. मोठा; अवजड; लठ्ठ; अगडबंब; गबदूल; बोंगाडा (प्राणी इ.); फार वाढलेला (वृक्ष).

**डाजणे** उक्रि. पहा : **डाचणे**. चिंता लावणे; घोर लावणे; काळजीत पाडणे : 'हा ! हा ! तो साधु मनीं अद्यापि असाधु–वाद–रव डाजे ।'– मोवन १.७१.

**डाजणे** अकर्तृक क्रि. उष्मा होणे; उकडणे; गुदमरणे.

**डाझणे, डाझळणे** अक्रि. १. थोडे कच्चे व दडस राहणे; काही कच्चे–पक्के होणे (आघाताने पिकणाऱ्या स्थितीतील फळ). २. न पिकता तसेच दडस, ताठर राहणे (चोळवटल्याने गळू इ.).

**डाट** पु. (संगीत) स्वर दाबणे.

**डाठ(ड)रणे** अक्रि. घट्ट,आवळ होणे. (कर.) पहा : **दाठरणे**

**डाडर** स्त्री. डुकराची मादी : '(रान)डुक्कराच्या.... मादीला डाडर असेही म्हणतात.' – शिस १८.

**डाडाइणे** अक्रि. गर्जना करणे; आरडाओरड करणे: 'खवळैला कृतांतु डाडाइला। की निदुसुरा महाकाळु ओसानाइला।'–शिव १००५.

**डाडोर** स्त्री. पोटाचा फुगीर भाग; ढेरी : 'हिरीताचं देनंघेनं । नही डाडोराकरता।' –बगा २२.

**डाप** स्त्री. दाब; वर्चस्व; जरब : 'वेठबिगार दादासाहेबांचें डापेखालीं चैन पडूं देत नाहीं.'– पेद १९.७३.

**डापका** पु. सापळा. (व.)
**डाफन्या** पु. खुंटा. (व.)
**डाफ(भ–भा)रणे** अक्रि.१. रागावणे; संतापणे; जळफळणे; चरफडणे; चवताळणे. २. अंगावर येणे; टाकून बोलणे; खडसावणे; खेकसणे.
**डा(डां)ब** पु.१.माठ इ. पालेभाजीचा देठ. २. झाडाची लहान फांदी. ३. खळ्याच्या मध्यभागी पुरलेला खांब; तिवडा; स्तंभ. ४. सोटा. (बे.) पहा : **डांग**
**डाब** स्त्री. स्त्रियांचा एक दागिना; सोने अथवा चांदीचा कमरपट्टा.
**डाब** स्त्री. डबके: 'माझ्या माहेराच्या वाटे । डाबा पान्याच्या लागल्या।'– बगा ८.
**डाब** स्त्री. म्हातारी स्त्री. (अहि.)
**डाबखिळा–खुंटा** पु. गाडीचा कणा व बुटे यांना जोडणारा खिळा. (व.)
**डाबडं–लं** स्त्री.न.पु. कुंकवाचा करंडा; कुंकवाची डबी. (अहि.)
**डाबडुबली** पु. सूरपारंबीचा खेळ. (व., ना.)
**डाबडूब** क्रिवि. आकंठ; काठापर्यंत; तोंडातोंड. (ना.)
**डाबर** स्त्री. खोलगट जमीन.
**डाबर** न. डबके. (व.) पहा : **डबरा.** [हिं.]
**डाबरी** स्त्री. वि. नैसर्गिक घटनेमुळे जमिनीला प्राप्त झालेला खोलगटपणा : 'गाड्या डाबरींतून चालत होत्या.'–बाविबु १४४.
**डाबल** क्रि. घामेजणे : 'रामाले देखल्यानं सीता डाबल्यासी गेली.' – जलोसा १९८.
**डाब्री(र्गी–ग्री)डुब्री–र्गी–ग्री** वि. फुगीर व उंचीने कमी अशी (मुले). (मुंबई)
**डाभ–ब** पु. (हत्यारे ठेवण्याचा) कमरपट्टा : 'वाघनख ह्याच्या बोटाला । पांच हत्यारें डाभाला।'– ऐपो १६३. [हिं.]
**डाभा** पु. खिळ्याचा एक प्रकार.
**डामगा, डामरगा** न. एक प्रकारचे भात. (कु.)
**डामडूक, डामाडूल–ळ, डामा(या,वा)डोल** स्त्री. १. दंगा; अराजकता; बंड. २. अनिश्चित, अस्थिर वृत्ती, स्वभाव; चंचल स्थिती (कार्याची).
वि. उद्ध्वस्त; अस्वस्थता उत्पन्न झालेला, डळमळीत; अस्ताव्यस्त, घाबरे; त्रस्त : 'सांप्रत तों डामाडूल जाहले आहेत.'–ऐको.
[ध्व.डाम, डुक; हिं. डामडोल]
**डाम(मा)डौल** पु. १. लवाजमा; इतमाम; स्वारी; टामटूम; थाटमाट; सरंजाम. २. नीटनेटकेपणा; कपडेलत्ते व्यवस्थित घालणे; अंगावर अलंकार चढवणे; साजशृंगार. ३. स्वतःची छानछोकी; बडेजाव; भपका; अवडंबर; मिजास; नखरा; दिमाख; ऐट.(क्रि. करणे, लावणे, मिरवणे, लावणे.) : 'म्हुन तरी डामडौल करूं नये आपला प्रियकरा।'– सला ३.
**डामर** न. पहा : **डांबर**
**डामर** स्त्री. विटी. (कु.)
**डाय** पु. १. एक झाड. २. प्रसंग; काळ.
**डाय** स्त्री. कलथ्यासारखा एक प्रकारचा पळा. (कु.)
**डाय** पु. द्वेष : 'हतबुद्धिच हा डाया साधाया मानवे मुनिचहाडा या।' – मोकृष्ण ३६.२०.
**डाय** पु. ठसा.
**डाय** पु. केसांना द्यायचा रंग. (क्रि. करणे, लावणे.). [इं.]
**डायअलिसिस, डायालिसिस** एखाद्या रुग्णाचे मूत्रपिंड काम करेनासे झाल्यावर रक्तातील त्याज्य पदार्थ अलग करून ते काढून टाकण्याची कृत्रिम प्रक्रिया. [इं.]
**डायण** न. पातळ, पिवळा मोठा मासा. (गो.)
**डायते** न. रोखीने देण्यात येणारी पट्टी, हक्क.
**डायपंच** पु. ठसा दाबून तुकडे किंवा भोके पाडणारा चिमटा. [इं.]
**डायरी** स्त्री. रोजनिशी; दिनवृत्त; दिनचर्या; दैनंदिनी. [इं.]
**डायल** स्त्री. दूरभाष्ययंत्राची ० ते ९ क्रमांक असलेली व फिरणारी तबकडी : 'डायल फिरवताना एका विशिष्ट अंकावर बोट ठेवतो.'– हेतोप्रबो ४. [इं.]
**डायाडोल** वि. भयभीत; त्रस्त; घाबरलेला : 'शहरचे लोक डायाडोल झाले आहेत.' – पेद ६.१५७. [हिं.]
**डारल** पु. बांबूचा पाळणा. हा बहुधा कैकाडी लोक वापरतात.
**डारंबी** स्त्री. माजघरातील दार. (चंद्रपुरी)
**डाराडूर** वि. गाढ : 'तुम्ही डाराडूर झोपा.' – एहोरा ३२.
**डाल, डालगे–गा** स्त्री.न.पु. मोठी, पसरट टोपली, परडी; हारा; करंडा : 'तों चार फर्लांगावर दादांचा डाल... घेऊन मंडळी येत असलेली दृष्टीस पडली.'–बहुरूपी ४३; 'तुटक्या डालग्यांत अंडं देऊन कोंबडी बाहेर पडताच...'– जैरेजै ८४.
**डाल** स्त्री.फीत; नवार; दाल.
**डाल** स्त्री. डहाळी; शाखा; फांदी.
न. (ल.) फांदीवरील फळे. (व.)
**डालडा** न. भुईमुगाच्या तेलापासून बनवलेले वनस्पती तूप.
**डाल(ळ)णे** उक्रि. १. (कोंबड्या इ.) पाटीखाली झाकणे. २. (ल.) (बायकोने नवऱ्याला) धाकात ठेवणे. ३. डांबून, अडकवून ठेवणे.
**डाल(ळ)णे** उक्रि. १. ढीग रचणे; रास करणे. २. सोडून देणे; टाकून देणे. ३. एके ठिकाणी व्यवस्थित लावणे, जोडणे. [सं. तल्]
**डाल(ला)न** न. उसाच्या चरकातील चौकट; चरकाचा आडवा दांडा.
**डाल(ला)न** न.स्त्री. १. मांदण; नांद. २. उसाचा रस साठविण्याचे पात्र, त्यावर झाकायची टोपली. ३. भुसाची ने–आण करण्यासाठी बांबूच्या कामट्यांचा तयार केलेला मोठा हारा, पाटी, दुरडी.
**डाल(ला)न** न. बैल, औत वगैरे परस्परांना देऊन सहकारितेने काम करण्याची शेतकऱ्यांची पद्धत.
**डालपाटी** स्त्री.१. लहान डाले.२.(ना.)पहा :**डालगे–गा** : 'बायाबापड्या तान्ही पोरे काखेला मारून डालपाटीत घालून रानात कामाला जात.'– बनगर २५.
**डाली** स्त्री.१. मोठी टोपली. २. आंबे, खरबुजे, रानशेणी इ. वाहून नेण्यासाठी जनावरावर लादतात ती कामचलाऊ विणलेली हलकी पाटी. ३.(पत्रावळी, पाने इ.चा) भारा; ताटी; गठ्ठा. ४. शिंकाळे; कावड.

५. कावडीतील एका बाजूचे ओझे. ६.फळांची करंडी. ७.(ल.) फळफळावळीची भेट. ८. शिपतर. [प्रा. डल्ल; सं. डालक]

**डाली** स्त्री. सामानभरतीची गाडी. (व.) [हिं. डाला]

**डाली** स्त्री. वैरभाव; खंड; स्पर्धा; चुरस. (क्रि. बांधणे). [हिं.]

**डालीबंद** वि. चढाओढ करणारा; प्रतिपक्षी. [हिं.]

**डाले** न. गाडगी, मडकी वाहून नेण्याकरिता गाढव वगैरे जनावरांवर लादतात ती साटी; माकण. (व.) पहा : **डाल, डाली**

**डाले** न. इरजीक; डालन. (मावळी) पहा : **वारंगोळे**

**डाव** पु.१. खेळण्याची वेळ, पाळी, बारी; खेळी. २. खेळ (बुद्धिबळ, सोंगट्या, चेंडू इ.चा).३.(कवड्या, फासे इ.)टाकणे; फेकणे; फेक (क्रि. टाकणे).४. फाशांचे दान (क्रि. पडणे). ५. हार; पराभव; खेळातील हात; पाने. ६. खेळण्याचा पट (कापड, लाकूड, फळा, जमीन इ. वर काढलेला). (राजा.) ७. जाड, वजनदार कवडी.(व.) [फा. दाव्](वा.)० **घोषित करणे**-(क्रिकेट) काढलेली धावसंख्या विजयाला पुरेशी वाटल्याने सर्व खेळाडू बाद झालेले नसले तरी डाव संपल्याचे जाहीर करणे. ० **देवाचा**-(खेळात)देवाला पहिले दान देणे : 'लगेच तो म्हणाला हा डाव देवाचा. सुनंदाला हें आवडलें नाहीं.'- सुदे ६. ० **पडणे**-१. प्राप्त होणे; घडणे. २. फाशाने खेळणे : 'मियां नक्षत्रीं डाव पाडावा । चंद्र चेंडुवालागीं देयावा ।'-ज्ञा ११.५८१. ० **फेडणे**-अंगावर आलेली बाजू फेडणे. ० **बसवणे**-(सोंगट्या) रंगसही झालेल्या चारी सोंगट्या आपल्या पटावरील घराच्या तीन रांगांपैकी मधल्या रांगेत विशिष्ट रीतीने बसविणे. ० **लागणे**-अंगावर बाजू येणे; हरणे.

**डाव** पु. १. योग्य वेळ; प्रसंग; हंगाम; अनुकूल काळ; संधी. २.अंमल; चलती; अधिकाराची वेळ, दिवस.३. अधिकार; ताबा; आटोका. [फा. दाव्] (वा.) ० **उचटणे, उचलणे**- महत्त्वाकांक्षा धरणे; एखादे मोठे काम अंगावर घेणे. ० **हाणणे**-जय मिळवणे; जिंकणे:'तो म्हणाला, 'बाईजी,काल मी मोठ्ठा डाव हाणला.'-कोसला २७३.

**डाव** पु. १. द्वेष; मत्सर; वैर; डंख. २. डावपेच; युक्ती; बेत; योजना; गुप्त हेतू; कपट; कट; कावा; कारस्थान. (क्रि. खेळणे).[फा. दाव्] (वा.)० **करणे**- पेच टाकणे; व्यूह रचणे :'तुम्ही भोसल्यांची मंडळी डाव करण्यात भारी हुशार.'- श्रीयो ८. ० **साधणे**-१. जिंकणे; द्वेष बुद्धीने दुसऱ्याचे नुकसान करणे; कपटाने संधी साधून शत्रूला मारणे. २. सूड उगवणे.

**डाव** पु. मासे पकडण्यासाठी तयार केलेला (कृत्रिम) डोह.

**डाव** स्त्री. कटवा; मोठी पळी. पहा : **डव**

**डाव** पु. लोखंड तापवून केलेले चिन्ह; भाजल्याचा डाग. पहा : **डाग १**

**डाव** पु. एक प्रकारचे जहाज; गलबत. (को.)

**डाव** पु. मृत शूद्राचे उग्र पिशाच्च; भूत.

**डाव** पु. बसण्याची जागा; अड्डा; कट्टा; खेळण्याची जागा.

**डावके** न. संचय; भांडवल; साठा; गंगाजळी; पुंजी. पहा : **टावके**

**डावखु(खो)रा** वि.१. डावरा; डाव्या हाताने काम करणारा. २.(ल.) गैरशिस्त; अव्यवस्थित (कामधंदा).

**डावखोर** वि. डाव खेळणारा; कारस्थानी : 'लांडगे लई डावखोरे हावीत.'- परेपा १६.

**डावधाव** पहा : **धावडाव**

**डावडाव कचका** (मुलींच्या) खेळातील एक संज्ञा. खेळात ज्या मुलीवर डाव असेल ती जर नाकबूल झाली तर मुली 'डावडाव कचका, कुंभारी कचका, आमचा डाव फोडून द्या'ह्र असे म्हणत तिला चिडवतात.

**डाव(ब)डुबली** स्त्री. सूरपारंबीचा खेळ.

**डावपेच** पु. १. कुस्तीतील खुबीदार डाव; खेळी; पेच; कावे; खुब्या; मल्लांच्या युक्त्या.पहा : **पेच**. २.तंत्र; योजना; खुब्या; लटपटी; छक्केपंजे; क्लृप्त्या; व्यूहरचना; धोरणे; काटशह; प्रतिशह; हिकमती; लबाड्या; मोर्चेबंदी : 'सैनिकी जीवनातील धोके व डावपेच...'ह्र स्वादै ८६.

**डावरणे** उक्रि. दटावणे; धमकावणे. [सं. दृ]

**डावरा** वि.पहा : **डावखुरा**.(वा.)० **नेसणे**-(धोतर इ.चा) कासोटा उजवीकडे आणणे.

**डावरा** पु. आकाराने एकसारखे नसणारे शिंग; बेडौल, वाकडे शिंग. (को.) वि. वाकड्या शिंगाची (गाय, म्हैस इ.).

**डावल(ळ)णे** उक्रि.१.जाताना (गाव किंवा इतर गोष्टी) डाव्या बाजूस टाकणे; डावी घालणे. २.(ल.) निष्काळजीपणाने, तिरस्काराने बाजूला, दूर फेकून देणे; बाजूला टाकणे; चुकवणे. ३. त्याग करणे; सोडून देणे; दुर्लक्ष करणे; टाळणे; वगळणे; अव्हेर, उपेक्षा, अनादर करणे : 'भिकारीं सांडिलें त्याचें घर। अतिथी डावलिलें निरंतर।'- एभा २३.९२. ४. देवाने डाव्या बाजूचा कळा सोडणे; कौल न देणे.

**डावली** स्त्री.१.(लडिवाळपणे) मांजराचा पंजा. २. लाकडाची पळी; लहान डाव. ३. (मांजराचा) हात, पंजा : 'पैशावर डावल्या मारून ते गोळा केले.'- जैरेजै ६२.

**डावा** पु. क्रांतिवादी; परिवर्तनवादी.

**डावा** वि.१. उजव्या बाजूच्या उलट; वाम बाजूचा. २. कमी प्रतीचा; गौण; कमअस्सल; उणा; कोता; कमी; अपरिपक्व. [ऑस्ट्रिक डवाल] (वा.) ० **करणे**- बाजूला सारणे; त्याग करणे: 'अपप्रवृत्तिचा अव्हांटा। डावा केला ।'-ज्ञा ७. १२५.

**डावाडाव** क्रिवि. आवाडाव; उपद्व्याप.

**डावाडोल** वि. विस्कळीत; उत्साहरहित; निर्बळ.

**डावा पक्ष** (राज्य.)१.विधिमंडळात अध्यक्षाच्या डाव्या बाजूला बसणारी व सत्ताधारी पक्षाच्या विरुद्धपक्षीय मंडळी.२.साधारणपणे समाजवादी, साम्य(मार्क्स)वादी विचारसरणीचा पक्ष.

**डावी** पु. लपंडाव इ. खेळातील भोज्या. (ना.)

**डावी** वि. सव्य; वाम (बाजू); उजव्याच्या उलट. (वा.) ० **उजवी देणे, सांगणे, बोलणे**-नकार किंवा होकार देणे. ० **करणे**-खांदेपालट करणे(विशेषतः मनुष्याचा मृतदेह स्मशानात नेताना).० **घालणे**- १. डाव्या बाजूला टाकणे, सोडणे; डावलणे. २. देवादिकांना डाव्या बाजूने प्रदक्षिणा घालणे. ० **देणे, गुढी देणे**- विनंती अमान्य करणे, नाकारणे. **(एखाद्याच्या) ० पेटणे** - एखाद्याविषयी मत्सराने भडकून जाणे; एखाद्यावर अतिशय रागावणे; जळजळणे.

**डावी(वे)उजवी(वे)** स्त्री.न. चोरादिकांचा एकीकडला हात व एकीकडला पाय (डावा हात व उजवा पाय किंवा उजवा हात व डावा पाय) कापणे. (क्रि. करणे).(वा.)**डावेउजवे करणे**-पक्षपात करणे. **डावे-उजवे कळणे**-तेढे-सरळ जाणणे; व्यवहारोपयोगी चातुर्य असणे. (को.)

**डावीकडचे** न. जेवणाच्या ताटातील डाव्या बाजूचे खाद्य पदार्थ (मीठ, लिंबू, चटणी, कोशिंबिरी इ.). २. कोणतेतरी एक तोंडीलावणे.

**डावू** पु. (राजा.) पहा : **डाऊ**

**डावे-उजवेपण** न.पक्षपातीपणा; कमी-अधिकपणा; उच्चनीचता : 'विद्वत्तेतले डावेउजवेपण काहीही असो, त्यांचा ध्यास अगदी बावनकशी.'- विशा (प्रस्तावना) २.२८.

**डावे बोडद** गलबताची डावी बाजू.

**डावेरी** स्त्री. (गंजिफाचा खेळ) आपल्या डाव्या बाजूच्या गड्याकडून आलेली देणी.

**डास** पु. १.गोमाशी.२. लहान, काळसर, उडणारा, दंश करणारा, दलदलीच्या जागी राहणारा कीटक; मच्छर; मुरकूट; चिलट. ३.दंश; चावा. (क्रि. घेणे): 'ज्या हातांत ते कागद होते त्या हाताचा डास घेण्याचा त्याचा बेत दिसला.'- माबा ३८२.(को.)४. चावलेला भाग.५. डाव; द्वेष; हेवा. (क्रि. धरणे). (ना.) [सं. दंश्]

**डासखोर, डासऱ्या** वि. भांडकुदळ.

**डासण** स्त्री. माऱ्याची जागा : 'मोगलाचे आघाडीस डासण पाहून तोफांची मारगिरी करावी.'- पेद १.६२.

**डास(सा)ळणे** उक्रि.१.डसणे; चावणे(डास,साप इ.नी).२. कुरतडणे; दात लावणे; नासून टाकणे (माकडाने एखादे फळ). [सं. ध्रस्]

**डाह-हो** पु. दाह; अंतस्थ उष्णतेची वेदना; अंतर्दाह : 'अवलोकनें निवाला वाटे संसारजन्य जो डाहो।'- अकक २. [सं. दाह]

**डाहण** पहा : **ड(ढ)साण** [सं.दाह]

**डाहण** न. गरगट; सांडपाणी; त्याचे डबके.

**डाहणी** स्त्री. डागण्याचे लोखंडी हत्यार; डागणी.

**डाहण्या** वि. आंबटढाण.

**डाहळ** पु. झाडाच्या फांद्या, छाट, काट, कवळ. [सं. दल]

**डाहळा** पु. १.ओल्या हरभऱ्याचे रोप. २. वाटाणा, लाख यांचे रोप. ३. डहाळी; कोवळी फांदी. [सं. दल]

**डाहारणे**अक्रि.१.अंगाला लागणे: 'वावटळ पडूनि ठाये। सबलु डाहारला आहे।'-ज्ञा १७.१४३.२. प्रसिद्ध होणे,असणे; डाहोर होणे : 'मग इदंतेसि वाळलें। जें मीपणे वीण डाहारलें।'-ज्ञा १५.२६७. [सं. द्राघ्]

**डाहारा** पु. खड्डा; घाण पाण्याचे डबके; डाहण; खाडा; गार. (व.)

**डाहाळी** स्त्री. फांदी : 'यापरी निराळीं। वाढे संकल्पनाची डाहाळी।'- ज्ञा१३.५०. [सं. दल] (वा.)**डाहाळ्या पडणे**-लुळा पडणे; निर्बल होणे. (व.)

**डाहोर** वि. प्रसिद्ध. [सं. द्राघम]

**डाह्य** वि. (नाविक) पुष्कळ पाणी असलेला समुद्राचा भाग. (कु.)

**डाळ** स्त्री. भरडलेले द्विदल धान्य (हरभरा, तूर इ.).(वा.) **० गळणे, शिजणे**-चालणे; अनुकूलता असणे; दाद लागणे; म्हणण्याप्रमाणे होणे: 'एका नानांची श्रीमंतांपाशी मात्र डाळ गळत नाहीं.'-ऐको. **० नासणे**- १.होत असलेले काम बिघडणे: 'सर्वत्र यानं डाळ नासली.'- रानगंगा ७५. २.(मूल, बायको इ.नी) निरुपयोगी, आळशी बनणे. ३. उर्मट बेफिकीर बनणे. **० महाग करणे**-मस्तीला येणे; माजणे. **आपल्या पोळीवर डाळ ओढणे**-स्वत:चा फायदा करून घेणे, स्वार्थी, आप्पलपोटे बनणे.(कर.)

**डाळ-ळा** पु. रास; गंजी; ढीग. [सं. दल]

**डाळ-ळी** पहा: **डाहळ** : 'धरिता मूळ सांपडे डाळ।'-दाविधा २३१.

**डाळ** स्त्री. गवत, पेंढा रचण्यासाठी दोन हात रुंदीची, दांडक्याची साटीवर बांधली जाणारी चौकट. (कुलाबा, को.)

**डाळकण-गोटा-पिठ्या-पीठ-रोटी शब्द 'दाळ'मध्ये पहा.**

**डाळगा** पु. कळण्यापेक्षा मोठी कणी असलेली डाळ. (कर.)

**डाळगी** स्त्री. मोठा हारा, पाटी. (को.)

**डाळगे** न.१. कडवा (वाल) चाळण्याची बांबूची चाळणी.२. पहा : **डालगे**

**डाळणे** उक्रि. मातीच्या भिंती पावसाने खराब होऊ नयेत म्हणून त्यावर पळसाची पाने व माती टाकणे.

**डाळणे** स्त्री. टाळणे; चुकवणे; कळू न देणे : 'आणीक आणवीति : म्हणौनि बाइसें डाळणी करुनि भीतरी गेली :'- लीचउ ४४२.

**डाळप** न. देवाच्या व देवचाराच्या नावाने दिलेले भोजन. (गो.)

**डाळप** न. रास घालणे, करणे. (राजा.)

**डाळवांगे** न. वांगे घालून केलेली डाळीची आमटी.

**डाळंब-बी** पहा : **डाळिंब**

**डाळा** पु. रुंद चटई. (कु.) पहा : **डाळी**

**डाळा** पु.ढीग;चळत.(वा.)०**डाळणे** -(लग्न, संसार इ.च्या) सामानसुमानाची व्यवस्था, जुळवाजुळव करणे; मांडामांड करणे; तडीस नेणे.

**डाळाडाळ** स्त्री. १. रास, ढीग (करणे). २. जमवाजमव; जथाजथ (शेत इ.ची).

**डाळिंब** स्त्री.न.१.डाळिंबाचे झाड; अनार. २. त्याचे फळ.[सं. दाडिम]

**डाळिंबवान** न. डाळिंबी रंगाचे लुगडे : 'डाळिंबवाने जासवाने।'- वेसीस्व १.१५०.

**डाळिंबी** स्त्री. १. डाळीचा दाणा; द्विदल धान्याचा अर्धा भाग. २. वालाच्या बिरड्या प्रत्येकी (डाळ) : 'साडेदहा वाजतां सुद्धां.... भिजू घातलेल्या डाळिंब्या उपसून बसायची.'- पडघ ५७. ३. (मुलांच्या भाषेत) कातडीवर घासून आणलेला तांबडा ठिपका. (क्रि. करणे, दाखविणे.).

**डाळिंबी** वि. १. डाळिंबाच्या दाण्याच्या रंगाप्रमाणे, आकाराप्रमाणे. २. डाळिंबी रंगाचे वस्त्र.

**डाळिंबी बाळ्या** एक दागिना; बाळ्यांचा एक प्रकार.

**डाळी** स्त्री. राजाचे शिरस्त्राण.

**डाळी** स्त्री.१. बांबूची चौकोनी व उथळ पेटी. २. चटई; आंथरी; तट्ट्याचा तुकडा (तीन हात रुंदीचा): 'बिजलीच्या गांवीं तिला (चटईला) डाळी म्हणतात.'- धाधो २१९. (राजा., कु.).३. पहा : **डाळी** (इतर अर्थी).

**डाळुक** स्त्री. लहान डहाळी. (प्रां.)

**डाळे** न. (भूस, केरकचरा इ. नेण्यासाठी) खुली अथवा विरळ विणलेली पाटी.

**डाळे** न. हरभरा इ. भाजून त्याचे फोल काढून टाकून तयार केलेली डाळ.

**डाळे** न. बुगडीचे भोकर. (गो.)

**डाळे** न. जोड्याच्या तळव्याचा पुढचा भाग.

**डांक** स्त्री. डाकीण. [सं.डाकिनी]

**डांकणे** अक्रि. दंश करणे : 'डांकु लागला जेयांसि। तो हारु दावि तेयांसि।'- क्रिपु २१.१३३.

**डांका** पु. मोठा नगारा.

**डांग** स्त्री. केळीचे संपूर्ण पान.

**डांग** स्त्री.पु. १.(कळकाची)आकडी; मेढा; बुंध्यास वाकण असणारा वेळू (हाती धरण्याच्या उपयोगी); लांब काठी; दांडा : 'एऱ्हवी दोरीचिया उरगा। डांगा मेळवितां पैं गा ।'- ज्ञा १५.२५१. २. कळकाच्या मुळापासून फुटलेला बाकदार कोंब.

**डांग** स्त्री. विणकामातील जुपणी. (प्रां.) पहा : **जुंपणी** ३

न. कळकाची दोन उभ्या दांडक्याची चौकट. यावर कोष्टी आपली फणी तयार करतात.

**डांग** स्त्री. एक प्रकारचे गवत; तृण.

**डांग** स्त्री. पोफळीच्या बागेतील चार वाफ्यांचा एक भाग.

**डांग** स्त्री. टांग; ढांग. (क्रि. टाकणे).

**डांग** पु.न. १. नाशिक व सुरत जिल्ह्यात पसरलेला जंगली, डोंगराळ व चढणीचा प्रदेश.२. रस्त्याचा, जमिनीचा चढता भाग; चढण. (को.) ३. सुळाजवळची पर्वताची एकसारखी चढण. ४. टेकडीची चढण व उतरण. ५.उंचवटा; लहान टेकडी; टेकाड; उंच-सखल, खाचखळगे असलेला भाग : 'तिये न खेळती डांगे चिखल वोहळाचिये ।'- भाउगी ६९१.६. खिंडीत अथवा अरुंद दरीत असलेला झाडीचा प्रदेश; (सामा.) दाट झाडी : 'दिव्यद्रुमांची डांगें दाटें.'ह्व मुआदि ४.१०८. (को.). ७. टेकडीचे शिखर, टोक.८. जंगल : 'भोवताली झाडीची डांग भारी होती.'- भाब ३५. (माळवी) [हिं. दांग]

**डांग** वि. दांडगी; रानटी; दांड; उर्मट; क्रूर. [हिं. दांग]

**डांग-गी** स्त्री. फांदी; डहाळी. (व.) [हिं. दांग]

**डांग** पु. दरख; अधिकार; पद; सत्ता : 'परंतु पाटिलकीचा डांग त्याजकडे चालत नव्हता.'-मइसा १६.४.

**डांग** पु. भाताच्या रोपाचा किंवा काडीचा वर आलेला भाग : 'डांग देऊन भात उठले व त्याने आपल्या लोंबी वरच्यावर उचलून धरल्या.'- आआशे ३७६.

**डांगगाव** न. पर्वतपायथ्याजवळचे किंवा टेकडीच्या उतारावरचे गाव.

**डांग(गा)ण** न. जंगली प्रदेश; डोंगराळ मुलूख : 'अकोले... अगदी मागासलेला भाग. त्या भागाला डांगण म्हणूनच ओळखीत.'-स्मगा १५४.

**डांगर** स्त्री. काळ्या भोपळ्याचा वेल.

न. काळा भोपळा : 'काही डांगरफळे वाटोळी व काही लांबोडी असतात.'ह्व फचि ९५.

**डांगर** न.डांगरकूट; तिखट, मीठ व कांदा घालून कालवलेले उडदाचे पीठ; पापड बनविण्यासाठी केलेला पदार्थ : 'डांगर हा चटक्याचाच प्रकार आहे.'- पाकसिद्धी ११४.

**डांगर** पु. भात; साळ. [गुज.]

**डांगर** न. खरबूज. (व. खा.)

**डांग(गु)रटी** स्त्री. १. डांगोरा; दवंडी. २. (ल.) प्रसिद्धी : 'या बोलाची डांगुरटी। तिथें प्रसिद्धी आली किरिटी ।'-ज्ञा १८.२८१.

**डांगरी** वि.स्त्री. डांगवण; डोंगरी; टेकडांचा : 'परगणे डांगरी प्रांत खानदेश.'ह्व थोमारो १.३२०.

**डांगलणे** सक्रि. उडवून लावणे; शिंगांनी ओरखडे काढणे : 'माझ्या म्हशीनं तिला पाठीमागनं डांगलंली.'- गोतावळा ९७.

**डांगवण** न. डोंगराळ मुलूख. पहा : **डांग**

वि. डांग देशासंबंधी; डांग देशातील.

**डांगवी** स्त्री. ख्याती; प्रसिद्धी : 'बहुत जोडिल्या पुण्यराशी । डांगवी झाली देशोदेशीं ।' - मकसा ३६.५९.

**डांगवीया** वि. डोंगरी; दांडगी : 'कोठें म्हणतां लाज नाहीं डांगवीया घोडी।'- भपसं ३०.

**डांगशी** स्त्री. लहान, बारीक फांदी; डहाळी. (को.)

**डांगळ** पु. हरणाची एक जात; सांबर : 'त्या कळपातला नर डांगळ किंचित कुतूहलाने...'ह्व जाण २०५.

**डांगळ** वि. मोठा वाढलेला. (व.) पहा : **ढांगळ**

**डांगळा-ळी** पु.स्त्री.१. लहान फांदी; डहाळी. २. वाकड्या मुठीची काठी.

**डांगी** वि. १. डांग प्रदेशातील; डांगसंबंधी; डोंगराळ. २. जंगलात, डोंगरात राहणारा. ३. माळव्याच्या पूर्व भागातील अरण्यातून राहणारी एक रजपूत जात. पहा : **गोंड**

**डांगी** स्त्री. डांग भागातील लोकांची बोलीभाषा.

**डांगी-गे, डांग्या** पु. जकातीतील अधिकारी. जकाती कारकून हा पतकीच्या हाताखाली असतो. याच्याकडे साधारणतः बैल मोजण्याचे काम असते. (को.) पहा : **डांग्या**

**डांगोर** पु. एक प्रकारचे गाणे.

**डांगोरा** पु.१.दवंडी; दौंडी; डंका; हाकाटी; जाहिरात; प्रचार; उद्घोष : 'दोषांमाजीं जया वीरा। वाडपणाचा डांगोरा। तो दंभु ऐसा।'- ज्ञा १६.१७.२. प्रसिद्धी; कीर्ती; लौकिक.(वा.) **०पिटणे, वाजविणे**- १.जाहीर, प्रसिद्ध करणे.२. उघडकीस आणणे.

**डांगोरी (एकादशी)** स्त्री. ज्येष्ठ वद्य एकादशी.

**डांग्या** पु. पंढरीच्या विठोबाचा चोपदार : 'डांगे हे जणू देवाचे चोपदारच होत. ते प्रत्येक पूजेच्या वेळी सोन्याची व रूप्याची घाटी घेऊन कमानीत उभे असतात.' - पंवि ५७.

**डांग्याखोकला** पु. सांसर्गिक व दीर्घकाळ टिकणारा खोकला. विशेषतः लहान मुलांना होतो.

**डांडणे** अक्रि. गर्जना करणे : 'तंव तंव डांडाति उठ : रसना-लांसी'ह्व उगी २०.१९७.

**डांडोरा** पु. केळीचा खुंट; खोड. [हिं.दण्डा]

**डांडोरा** पु. डांगोरा. पहा : **ढांडो(ढो)रा**

**डांपणे** उक्रि. झाकणे; ढापणे; झापणे : 'येकां अंदकांचे डांपले डोके....'– क्रिपु. २५.६३.

**डांपिलणे** सक्रि. झाकले जाणे; ढापले जाणे : 'जेसु मोइसे डांपलेति। एलिअ आर्दी करोनि।'–क्रिपु (II) ३४.४८.

**डांब–भ** पु. पहा : **डाभ–ब** : 'तंवं दापातियां धारांचें।सुदर्शन काढिलें डांबेचे।'– शिव १०७८. [हिं. डाब]

**डांब(भ)णे** उक्रि. १.पुरणे; हलणार नाही असा बसविणे (खांब इ.). २. थांबवून ठेवणे; अडकवून ठेवणे; जखडणे; बांधणे (मनुष्य, प्राणी इ.): 'शाळेत जिथें मुलें बसायचीं तिथें शेळ्या डांबायच्या.'–जांदि७०. ३. अटक करणे; पकडून ठेवणे.

**डांबर** न. मासांत शिरलेला मोठा काटा.(को.)

**डांबर** पु. आसाच्या वरची व साटीच्या खालची उभी फळी; बुटे.

**डांबरखिळा** पु. खोबळा व आस यांना भोक पाडून बसविलेला खिळा. पहा : **डाबखिळा**

**डांबर** न. दगडी कोळशापासून मिळणारा काळ्या रंगाचा, चिकट व पाण्यात न विरघळणारा एक पदार्थ, रोगण. [इं. डॅमर](वा.) ० **लावणे** – (तोंडाला काळे, डांबर फासून) जाहीरपणे नाचक्की करणे.

**डांबरट, डांबऱ्या** वि. १.डांबरासारखा; डांबर लावलेला. २.निगरगट्ट; निर्लज्ज; कोडगा; निलाजरा; दांडगा; डांबीस; लबाड; बेरड. : 'जमातच डांबरट आहे.'–फकिरा ८६.

**डांबरबत्ती** स्त्री. दारूची वात.

**डांब(बा)रणे, डांभ(भा)रणे** पहा : **डंब(बा,भा)रणे**

**डांब(भ)रणे** अक्रि. खोटी गोष्ट खरी आहे अशा बढाईने सांगणे.(कु.)

**डांबराची गोळी** पांढऱ्या रंगाची, स्फटिकी, उग्र वासाची, कीटकनाशक, डांबराच्या उर्ध्वपातनापासून मिळणाऱ्या पदार्थांपासून तयार केलेली गोळी.

**डांबरी, डांबुरकी, डांबुकी** स्त्री. (बैलगाडी) बावखडा. (बे.ना.)

**डांबरीकरण** न. रस्त्यावर खडी टाकून, त्यावर तापवलेले डांबर ओतून तो पक्का करण्याची रीत.

**डांबारा** पु. सूज; फुगोटा. पहा : **डांभारा १** [सं.डंबर]

**डांबिर** पु. भांड्याचे बंद केलेले तोंड; दादरा.

**डांबीर** न. जोड; झाकण : 'मग गोसावी स्त्री करिचीए करांगुळीचेनि नखें करूनि तें डांबीर उघडीलें :'–लीचउ ३०९.

**डां(डँ)बी(बि)स** वि. ठक; लबाड; हरामखोर : 'आता मी जातो आणि त्या डांबिसाचा तपास लागला तर पाहतो.'– भदि १७४.[इं.डॅम्डबीस्ट]

**डांभणे** (बंदूक) सक्रि. वाघ इ. शिकार बंदुकीच्या माऱ्यात सापडेल अशी बंदूक ठेवणे, संधान करणे.

**डांभा** पु.१.दुबेळका खांब; स्तंभ; मेढा.२. खुंटा; खांब (कुंपणाचा, गुरे बांधण्याचा). ३. (ल.)सोट; खोड. ४. उंच वाढलेले, जोरदार पीक; उत्तम पीक आलेला शेताचा भाग.

**डांभा** पु. डौल; गर्व; ढोंग : 'त्या पादुकांचा गरुडा डांभा।'– सारुह ५.३०. [सं. दंभ]

**डांभा डचका** उत्तम, सोळा आणे पीक. (क्रि. येणे). पहा : **डांभा** ४

**डांभारणे** उक्रि. १. खांबाला बांधणे, खिळणे. २. तापून लाल झालेली ठिकरी (आमटी, ताक इ.) पदार्थात बुडवून तो पदार्थ गुणकारी करणे; ठिकरीची फोडणी देणे.

**डांभारणे** अक्रि. चडफडणे; डाफरणे.

**डांभारा** पु.१. (पोट, गळू यांची) फुगवटी; सूज. २. जड होऊन ढगाला आलेला झोल. (क्रि. धरणे). [सं. दंभ]

**डांभिक** पु. लौकिक, दर्जाप्रमाणे करावयाचा मानसन्मान : 'डांभिक पूर्ववत् चालणे तो पुढें श्रेहेस्नेह वाढलीयाउपर चालेल.'– ऐको ३०४.

**डिकणे** उक्रि. चिकटणे. [सं.दिह्]

**डिक(ग)दाणी** स्त्री. डिंक; डिंकाचा द्रव; गोंद. (अहि.)

**डिकमल** स्त्री. दीपमाळ : 'उजव्या बाजूला एक दीपमाळ – डिकमल आहे.'–एहोरा २.४.

**डिकर** वि. चिकट; चिकटणारे.

**डिकरा–री** पु. स्त्री. मुलगा–गी. (खा.)

**डि(डिं)कव(वि)णे** उक्रि. डकवणे; गोंदाने चिकटवणे.

**डिक(ग)शी** स्त्री. १.कोवळा कोंब; देठ; टोक (पान इ.चे); टिकशी; अंकुर. २.अग्रभाग; टोक : 'मोगरीच्या डिकशा, सुरंगीचे किंवा बकुळीचे नाजूक गजरे...'– सह्याद्रि २९२.

**डिका(के)माली, डिंकमाली** स्त्री. एक झाड व त्या झाडाचा औषधी चीक. [हिं.,गु.]

**डिकारणे** सक्रि. धिक्कारणे; हाकलणे : 'येकादा स्रस्ट येईल तुजहोऊनि। मग तुज डिकारिल येजमानि।'– क्रिपु (II)३६.७०.

**डिकाळ, डिकेरा** वि. चिकट; चिकाळ (आंबा, फणस इ.).(राजा.)

**डिकी** स्त्री. स्कूटर, टॅक्सी, कार इ.मध्ये सामान ठेवण्याकरिता असलेली छोटी जागा.

**डिक्रि–क्री, डिगरी** स्त्री. निकाल; हुकूमनामा; दिवाणी कोर्टाचा निकाल : 'एका सावकाराने पाच हजार रुपयांची डिक्री त्याच्यावर लावली होती.'– गालिब १२. [इं.]

**डिख(खू)ळ, डिखळी, डिखुळणी, डिखो(को)ळी** न.स्त्री. १. भाताचे ढेकूळ, गोळा. २. घट्ट विरजलेले दूध; चक्का; दही; घट्ट केलेला आंब्याचा रस. ३. मातीचे ढेकूळ : 'सभ्योक्ति आयकों दे रे न शिळेला अपाय जो डिखळा।'–मोसभा ५.११७. ५.(सामा.) गोळा; घट्ट भाग.

**डिगडिग** (उद्गा.) मुलांना लाडीकपणे खेळविण्याचा शब्द.

**डिगली** स्त्री. यारी.

**डिगोजी** स्त्री. उपरणे; अंगवस्त्र. [फ्रें. देगाजे]

**डिगोरा–डा, डिगवडा** पु. डिंकाचा लाडू. (व.) पहा : **डिंकवडा**

**डिगोरा–ळी** पु.स्त्री. लहान ढीग; गंज; डिंग. (को.)

**डिग्री** स्त्री. १.भाग; अंश. २.परिमाण(उष्णता, परिघ इ.चे); प्रमाणांक.

**डिग्री** स्त्री. (विश्वविद्यालयीन) पदवी. [इं.]

**डिग्री** स्त्री. (छपाई) टाइप जुळविताना आकार, वेलांटी ही चिन्हे नसणाऱ्या अक्षरांवर (ओळीतील सर्व अक्षरांची सारखी जाडी राहण्यासाठी) शिशाचे घातले जाणारे पातळ तुकडे.

**डिग्री** स्त्री. लिलाव. (झाडी) [इं.]
**डिग्री** वि. जिवलग. (झाडी) [फा.]
**डिचका–के** पु.न. लगदा; गोळा; लचका; गिचका पदार्थ. उदा. भाताचे, वरणाचे, राळ्याचे डिचके. पहा: **गिचका** : 'नको मला तुमची भाताची डिचकी.' – एहोरा ४.५५.
**डिचके** न. तोंड लहान असलेले पसरट भांडे. (कर.)
**डिचकोली** स्त्री. लहान पोट (विशेषतः मुलांचे). (भरणे, खपाटीस जाणे या शब्दांना जोडून योजतात.).
**डिचकोलीची पत्रावळ** (ल.) (रिकामे असल्याने) खोल, चापट झालेले पोट; भकाळी गेलेले पोट.
**डिचडिच, डिचिडिचि(ची)** क्रिवि. पोटात खळबळणे, हालणे इ.च्या आवाजासारखा आवाज होऊन. [ध्व. डिच]
**डिचडिचीत** वि. डिचका; गिचका; पचपचीत; लगदा झालेला (भात, भाजीपाला इ.).
**डिचणे** अक्रि. १. असंमत, अमान्य, अहितकारक असणे. २. (ल.) अहितकर, दुष्परिणामी, वाकडे होणे.
**डिचा** पु. एक पक्षी; पाणकावळा; बगळा(राजा., कु.)
**डिजडणे** अक्रि. रागावणे; वस्सकन अंगावर येणे. (व.)
**डिटेक्टिव्ह** पु. गुप्त पोलीस; हेर; गुप्तचर. [इं.]
**डिजिटल** वि. दोन अंकांचा (विशेषतः ० व १)उपयोग करून माहिती साठविण्याची व पाठवण्याची पद्धत. [इं.]
**डिझाइन** न.१. रचनाविशेष : 'तुम्हास डिझाइन आवडलेलं दिसत नाही.' – ऑक्टोपस १७३. २. बेत; योजना. ३. रेषांची सुंदर आकृती. ४. मूळ कल्पनेचा आराखडा (कपडे इ.). [इं.]
**डिटमारचा दिवा** गॅसवर चालणारा दिवा. [इं.]
**डिप(फ)ळ** न. ढेकूळ. (राजा., हेट.) पहा : **डिखळ**
**डिप(फ)ळा** पु. ढेकळे फोडण्याचा लाकडी औत. (हेट.)
**डिफाडा** न. उंचवटा; टेकाड. (ना.)
**डिबरा** पु. लाकडाचा हलका ओंडका; ओंडा.
**डिबली** वि. अपायकारक; अपमानकारक.
**डिम** न. नाटकाचा एक प्रकार; रूपकविशेष. [सं.]
**डिम** पु. विजेची तीव्रता (पॉवर)कमी असल्यामुळे बल्बमधून येणारा अंधुक उजेड. [इं.]
**डिमर** पु. बल्बचा प्रकाश कमी–जास्त करण्यासाठी वापरण्यात येणारे उपकरण. [इं.]
**डिमकी** स्त्री. वज्रमुष्टीचा व्यायाम; एका हाताने एक पाय पकडून दुसरा हात जमिनीवर टेकून क्रमाक्रमाने उलटसुलट गोलांट्या मारणे.
**डिमडिम** स्त्री. टिमकी : 'मग ढोल दुंदभी शंखभेरी । श्रृंगें डिमडिमी काहळ मोहरी ।' – जैअ १८.३८.
क्रिवि. टिमकीच्या नादाचे अनुकरण करून. [ध्व., सं.डिंडिम]
**डिमदारी** स्त्री. रणघाई; तुंबळ युद्ध : 'वाद्यघोष डिमदारींत ।'ह ऐपो २००.
**डिमरी** स्त्री. खिटी; पाचर. (कु.) पहा : **डिंबरी**
**डियो** उद्गा. आनंद–हर्षसूचक उद्गार. [ध्व.]
**डिरकी** स्त्री. बैलाने काढलेला गर्जनेसारखा आवाज.
**डिरणे** अक्रि. अंकुरणे; कोंभणे : 'सवेचि दिसे डिरैली । प्रेमलता ते ।' – भाउगी ७९४. [देप्रा.डीर]
**डिरंगी** पहा : **डिंगरी**
**डिरा–री–रू–ऱ्हा** पु.स्त्री.१. नवा, कोमल अंकुर; कोंब; मोड.(क्रि. फुटणे, निघणे, येणे.) : 'तो तिवणा अधोमुखु। डिरू फुटे ।' – ज्ञा १५.९५. २. मुळ्याची शेंग; डिंगरी. [देप्रा.डीर]
**डिऱ्या** पु. मोठे, पुढे आलेले पोट; दोंद.
**डिली** स्त्री. हंडी, मातीचे भांडे :'अंजू बंजू मसाल्याची डिली फोडून...'ह एहोरा १.३४.
**डिव** पु. शब्द; ध्वनी. [ध्व.]
**डिवचणे** सक्रि.१. हलवणे; टोचणे; चिथावणे; चीड आणणे. २. खोड काढणे :'उगीचच कुणी डिवचू नका...' – ओंकार ३०. [सं.द्विष]
**डिवडिवीत** वि. १. गरीब आणि दुर्बल. २. फार नाजूक; कोमल (झाड, रोप); दिसण्यात मोठे पण फार अशक्त.
**डिवणे** अक्रि.१.न मानवणे; न पचणे; बाधणे; त्रास होणे (अन्न इ.). २.(ल.)अपायकारक, अहितकारक, बाधक होणे (चोरी, वाईट कृत्य इ.). ३. सलणे; खुपणे; डाचणे (अपमान, मानहानी, कडू आठवणी इ.).४. डिवचणे; उपद्रव देणे; धडक मारणे :'आणि सिंहातेंहि संजीवकें शिंग डिवियले ।'–पंचतंत्र ४२.(व.) [सं. डिव]
**डिवरा** वि. ऐटदार; रुबाबदार.
**डिवी, डिवरी** वि. मारकट (गाय) : 'डिवी लात्री बुजे बहु नेदी दुध। मुखीं नाहीं शुद्ध, विष्ठा खाय ।' – तुगा ४४१८.
**डिसपीस** पु. (सुतारी) मार्तुल; स्क्रू काढण्याचे एक हत्यार. (को.) [इं.डिस्प्लेस]
**डिसेंबर** पु. इंग्रजी वर्षाचा शेवटचा (बारावा) महिना. [इं.]
**डिस्टेंपर** पु.(स्थापत्य)रंगाची जात; मिश्र रंगाचा एक प्रकार. बारीक केलेली चुनखडी, डिंक किंवा सरस आणि पाणी विशिष्ट प्रमाणात मिसळून हा रंग तयार करतात. [इं.]
**डि(डी)ळ** पु.१. छपराचा लहान खांब. (व.).२. डिरी; खांबोणी : 'मदन मंडपाचिआं डिळी ।' – शिव २९८.
**डिळडिळीत** वि. १.लिबलिबीत; हालते आहे असे दिसणारे (पिकलेले द्राक्ष, गळू, बुडबुडा). २. डळमळीत.
**डिं(डी)क** पु. बाभळ, खैर, शेवगा इ. झाडांचा चीक; गोंद; चिकट पदार्थ.
**डिंकदाणी–नी** स्त्री. गोंददानी; डिंकाची बाटली.
**डिंकवडा, डिं(डि)कोडा** पु. बाळंतपणासाठी डिंक व इतर औषधे घालून केलेले लाडू, वड्या इ. पदार्थ.
**डिंकवणी** न. गोंदाचे पाणी.
**डिंखदाणी, डिंखवडा–वणे** पहा : **डिंक**
**डिंगमार** न. डेन; डेन्मार्क व त्यामधील लोक : 'वलंदेज (डच) व डिंगमार (डेन) ह्या लोकांनाही मराठे ओळखीत असत.' – रालेसं १९३.
**डिंग(गू)र** पु.न. मूल; बालक; लेकरू : 'विठोबाचे आम्ही लाडिके डिंगर। कांपती असुर काळ धाके ।' – तुगा ३५७. २. नोकर; गुलाम; सेवक :

'मारूं नको बा बळिभद्रा । दास डिंगर आम्ही तुझे ।'- एरुस्व १२.२०. वि. प्रिय; लाडका : 'जो झाला हरीचा डिंगरू। त्यासि संसारू असेना।'- एभा २३.९२८. [सं.]

**डिंगरा** पु. पंढरपूरच्या देवासाठी पाऊलघडी घालणारा : 'डिंगरे हे सेवेकरी देवाने पोषाख केल्यानंतर त्यास मागून पुढून आरसा दाखवितात व शेजारतीच्या वेळेस पाऊलघडी घालतात.'- पंवि ५६.

**डिंगरी** स्त्री. मुळ्याची शेंग; भोगरी.

**डिंगरी** स्त्री. लाकडी पाचर, खिळी (नांगराचा दांडा घट्ट बसविण्याच्या उपयोगी). (कु.)

**डिंगलें** न. डगले; जाड कापडाचा अंगरखा.

**डिंगळ–ळी** स्त्री. पिवळी फुले असणारे एक झाड.

**डिंगी** स्त्री. आधार; टेकू. पहा : **डेंग–गी** [फा.]

**डिंगी** स्त्री. गलबताचा एक प्रकार; प्रवासी बोट.

**डिंडिम–मा** १.एक वाद्य; डंका; नगारा. २.(ल.)गडबड; गलगला; संभ्रम : 'तये खेंवीं आटे डिंडिम । सांसारिक हे।'- ज्ञा १६.४४३.[सं.]

**डिंडी** स्त्री. पसारा : 'नातरी प्रबोधलिये वेळे । ते स्वप्नींची डिंडी मावळे।'- ज्ञा. १५.३१५. [सं.डिंडिम]

**डिंडी** स्त्री. स्वारी; छबिना; मेळा. [सं.डिंडिम]

**डिंडी** स्त्री. १. दिंडी. २. महाद्वाराची खिडकी.(झाडी) [सं.डिंडिम]

**डिंब–भ** पु.न.१.अपत्य : 'भूतें महाभूतांचें डिंब।'-एभा२.५७६. २. लहान लेकरू : 'श्रीकृष्णरूपें डिंभे देखना।' - वह ३०५. [सं.] वि. मूर्ख; अज्ञानी.

**डिंब** पु. आकृती; मूर्ती : 'ते ब्रह्मविद्येचें चालतें डिंब।'-एभा २.१६८.

**डिंब** पु. आभास : 'सांडूनी कठिणत्वाचें डिंब । सचेतन मर्गजस्तंभ।'- एरुस्व १.२५.

**डिंब** पु. मलाशयाचा खालचा भाग.

**डिंब** पु. उपद्रव. [सं.डिंभ]

**डिंबग्रंथी** स्त्री. १.(जीव.)अंडपेशी. २. स्त्री–शरीरातील दोन बीजवाहक ग्रंथी; बीजकोश. [सं.डिंभ]

**डिंबर** न. बैलाची डुरकणीः 'कीं वृषभ माजले डिंबरें । पुंफाटती अति रागें।'- मुआदि ३१.६७. [सं.]

**डिंबर, डिंबा** पु. उंचवटा. (झाडी) [सं.]

**डिंबरी** स्त्री. खडसा व रुमणी ह्यातून इसाड पुढे निसटू नये म्हणून त्याच्या मागे आडवी मारायची खुंटी; डिंगरी. (राजा.)

**डिंबिया** स्त्री. अव. गुडघे. (को.)(वा.)**(धरणी) ०घालणे**–दंडवत घालणे : 'तव सकलैकी कर जोडुनी। डिंबिया घातलिया धरणी।'- क्रिपु १.१.१७७.

**डिंम** पु.१.लुटुपुटीची, खोटी लढाई.२.आवेशपूर्ण, उठावदार दृश्य. [सं.डिम]

**डीक–ग** पु. डिंक; गोंद. पहा : **डिंक.** (वा.) **डिकास तेल –** (तेल ज्याप्रमाणे डिंकात बेमालूम मिसळते तसे) अगदी ठीक; बरोबर; जसे पाहिजे तसे.

**डीन** पु. शिस्तपालन व शैक्षणिक विषयांसंबंधी सल्ला देणारा विद्यापीठातील अधिकारी; अधिष्ठाता. [इं.]

**डीप** पु. साकव; तात्पुरता पूल : 'पावसाळ्यात मोटारीचे वाहतुकीसाठीं फक्त एक डीप बांधलेला असतो.'- के ८.५.

**डीम** पु. ठमकारा; डौल. [सं. दंभ]

**डीर–री–रू** पु.स्त्री. अंकुर; मोड; कोवळी पाने.

**डीरैली** वि. अंकुरित झालेली : 'सवेंचि दिसे डीरैली : प्रेमलता तेथ:'- उगी १२३.

**डीस** पु. कोवळा अंकुर.

**डींगरा** पु. १. दासीपासून झालेला पुत्र.२. लाडका पुत्र : 'कल्हणा एका रायाचा डींगरा असे : तो बोलिसाउलाने : तें उपसाहे :'- लीचपू २२३.

**डुई** स्त्री. डोके. पहा : **डोई** .(वा.)**०देणे–** डोके देऊन राहणे; नेट देणे.

**डुक** पु. दात; संशय : 'कुणी डुक धरला तर....'- टारफुला ६२.

**डुक(क्क)र** पु.न. मोठे डोके, अंगावर पुष्कळ व राठ केस असलेला, चतुष्पाद, दुभागलेले खूर असणारा, उभयाहारी प्राणी. [सं. सूकर]

**डुकरी** स्त्री.१.(सातारा जिल्हा) जोंधळ्याची हलकी जात. ही खरिपात होते.२.वरी धान्यातील एक जात.

**डुकल** पु. न्यूनता. (कु.)

**डुकली–ळी** स्त्री. पेंग; झोपेमुळे डोके झुकणे; झोक जाणे; झोपेचा चुटका; किंचित झोप. (क्रि. खाणे).

**डुक्करकंद** पु. एक औषधी वेल. याच्या कंदावर डुकराच्या केसाप्रमाणे राठ केस असतात.

**डुक्करखोपडे** न. लहान खोपटे; मोडकेतोडके घर. (ना.)

**डुक्करदाढ** स्त्री. तीव्र वेदना देणारा खाजरा व्रण.

**डुक्करमुसळी–मुसंडी** स्त्री. (डुकराप्रमाणे) उतावळेपणाने, सपाट्याने घुसणे; मुसंडी मारणे; डुकराची धडक. (ल.) बेफामपणे एखाद्या कामाला हात घालणे; प्रवेश करून घेणे : 'जर्मनाची डुक्करमुसंडी अजूनही थांबलेली नाही?'– लव्हाळी ६७.

**डुगडुग–गा** क्रिवि. पहा : **डगडग** [ध्व.]

**डुगडुग–गी** स्त्री. १. धाकधूक; भीती; काळजी.२. उत्कंठा; प्रबळ इच्छा; आकांक्षा. [ध्व.]

**डुगडुगणे** क्रि.पहा : **डळमळणे.**

**डुग** न.पोक : '...चालतानं त्येच्या पाठीला डुग आलं.'-रैत २६.

**डुच(ळ)का** वि.१. उफराट्या बाहुल्यांचा; मंद दृष्टीचा. २. लहान, बारीक डोळ्यांचा; गजनेत्री. [सं. दुष्कृत]

**डुच–चू, डच्चू, डुच्चा** पु. १.बूच. २.दट्ट्या; बोळा : 'दार उघडे ठेवून मोरीला डुच्चे देण्याचा हा विलक्षण प्रकार.'-नवाप्रप्र ७५.

**डुचमळणे** पहा : **डचमळणे**

**डुचुक** पु. शंका; भीती : 'मी अमृतावर खटला भरीन असा तिला डुचुक होता.'- परेपा १७३.

**डुडा** पु. एक विणकर पक्षी. (को.)

**डुडु** क्रिवि.१. उतावळ्या रानडुकराच्या ओरडण्याचे अनुकरण करीत, डुरडुर. २. जनसमुदायाच्या आवाजाचे अनुकरण करून. (ना.)

**डुडु** पु. हुतूतूचा खेळ. [ध्व.]

**डुडूल-ळ** पु. घुबड; दिवाभीत : 'कीं डुडुळें जेवि डोळसें । न लखिजे सूर्या।'- स्वादि १२.३.४०.

**डुढ्ढाचार्य** पु. पोक्त किंवा प्रतिष्ठित मनुष्य; (उप.) शिष्ट :'सरकारात वजन असलेल्या एका डुढ्ढाचार्यांच्या घराची...'- लोका ९१.

**डुबक-बूक** पु. पाण्यात एखादा पदार्थ पडल्यावर किंवा भांडे बुडविताना होणारा आवाज. [ध्व.]

**डुबक** स्त्री. १. (गाय, म्हैस इ. पळून जाऊ नयेत म्हणून त्यांचे) दोन पाय बांधण्याची क्रिया; पायआवळणी. २. पाय बांधण्याची दोरी; भाला.

**डुबकणे** उक्रि. जनावरांचे पुढील दोन्ही पाय बांधणे.

**डुबकणे** न. मोठ्या भांड्यात मावण्यासारखे लहान भांडे (बुडवून पाणी काढण्यासाठी).

**डुबकणे** उक्रि.१.पहा : **डुंबणे**. २. एका भांड्यातील पाणी दुसरे भांडे बुडवून काढणे.

**डुबकन-कर-दिनी-दिशी** क्रिवि. पाण्यात एकदम बुडणाऱ्या वस्तूसारखा आवाज होऊन. [ध्व.]

**डुबकवणी** न. आत भांडी धुतल्याने घाण, गढूळ झालेले पाणी.

**डुबकळ(वि)णे** उक्रि. १. भांडी इ. बुडवून पाणी घाण करणे. २. पाण्यावर जोराने मारणे; पाणी उडविणे.

**डुबकळणे** अक्रि. बुडी घेणे, मारणे. [ध्व.]
सक्रि. बुडविणे.

**डुबकळी** स्त्री. बुचकळी; डुबकी. [ध्व.]

**डुबका** पु. उलंडीशिवाय असलेली लहान होडी.

**डुबकी** स्त्री. १. बुडी; बुचकळी. (क्रि. मारणे, देणे.). २. दडी; लपण्याची क्रिया.(वा.) ० **घालणे** -१.(मासे धरण्यासाठी) पाणी गढूळ करणे. (को.) २. पहा : **डुबकळ(वि)णे** २. [ध्व.]

**डुबडुबीत** क्रिवि. काठोकाठ; काठापर्यंत; सांडेपर्यंत, बाहेर वाहून जाण्याइतके. (क्रि. भरणे, वाहणे.).
वि. वाहणारे, बाहेर सांडणारे.

**डुबणे** अक्रि. १. बुडी मारणे. २. दिवाळे वाजणे; बुडणे; नाश पावणे.

**डुबर** न. कुल्ला. (वा.)० **तासणे**-खोडकी, रग जिरविणे. (बे.)[क. डुबरी]

**डुबरा** वि. १. सुटलेले, मोठे (पोट). २. ढेरपोट्या; मोठ्या पोटाचा.

**डुबवस्त** स्त्री. दागदागिने : 'दहा बोटी अंगठ्या डुबवस्तामध्यें गजबजली।'- सला ४१.

**डुबी** स्त्री. बुडी. पहा : **डुबकी** [हिं.]

**डुबुक** क्रिवि. १. काठोकाठ; भरपूर; तुडुंब. २. डुबु, डुबुक असा आवाज करून. [ध्व.]

**डुबे-ब्बे** न. बागाईत जमिनीत वाफे, पाट काढण्याचे अवजार : 'ज्याच्याजवळ बैल नाही ते डुब्ब्याने सऱ्या घालतात.'-गार ४६.

**डुबेकोळपे** न. एक प्रकारचे कोळपे.

**डुब्बा** पु. खोंड : 'गाय येली, डुब्बा झाला.'- एहोरा (४)७२.

**डुब्बी** स्त्री. १. बुडी; डुबकी; बुचकळी. २. (ल.) नापास (होणे) : 'मग तेथेच (मॅट्रीकलाच) डुब्बी खाल्ली असती तर पुढचा सर्व जीवनौघच बदलला असता. '- विरंगुळा ६९.

**डुमडुम-मा** क्रिवि. नगारा, टिमकी इ. वाद्यांच्या आवाजासारखा आवाज होऊन; डमडम. [ध्व.]

**डुमडुमे** न. लहान टिमकी; टुमटुमे; डफासारखे एक चर्मवाद्य. [ध्व.]

**डुमणा, डुरमा** वि.(तिरस्कारार्थी) लठ्ठ व खुजट; ढेरपोट्या व ठेंगणा.

**डुयी** स्त्री. पिढी :'आम्ही तर हा हिस्सा दोन डुया खातोय!'-तअं १२२.

**डुर-रा-री** न.पु.स्त्री. डबके; झरा. पहा : **डवरा** :'डुरे विहीरे पाझर। पर्वत फुटोन वाहे नीर ।'ह्व दास १६.४.७.

**डुरकण-णी-णे, डुरका(व)णी, डुरकी, डुरणे** पहा : **डरकण**. [क.]

**डुरका** पहा : **डुर, डुरडुरा**

**डुर्क्या** पु. (कृषि.) पडवळाची एक जात. याचे फळ हात-सव्वा हात लांब असते.

**डुरडुर** स्त्री.१.आगपाखडणी; आरडाओरड; बडबड; चरफड. २. बेडकांचा डरांव डरांव आवाज. [ध्व.]

**डुरडुर-रा** क्रिवि. डुरडुर करीत. [ध्व.]

**डुरडुरणे** अक्रि. १.डराव डराव करणे, ओरडणे (बेडूक इ.).२. फुसकारणे; फुसफुसणे (घोणस, साप).३.(ल.)चडफडणे; तडफडणे; शिरा ताणणे; ओरडणे. [ध्व.]

**डुरडुरा** पु. फुरसे; सर्पाची एक जात; घोणस. (राजा.)

**डुरमा** वि. १. ढेरपोट्या आणि खुजट. २. आखूड व जाड (हात-पाय).

**डुलकणे** अक्रि. डुलकी घेणे; पेंगणे : 'ढग डुलकत डुलकत पुढे सरकत होते.'- सीपो ४२.

**डुलकी** स्त्री. झोप. पहा : **डुकली**

**डुलणे** अक्रि. १.डुलत डुलत चालणे; झोकांड्या देत चालणे. २. पुढे-मागे, बाजूस कलणे, रेलणे, हालणे (हत्ती, उंटावरील माणूस किंवा खुद्द हत्ती, उंट इ.).३. हालणे; डोलणे. [सं.दुल]

**डुलणे** अक्रि. बुडणे; गमावणे; हातातून जाणे (गहाण ठेव ,पैसा, वजन); नष्ट होणे; विस्कटणे; कोसळणे; डळमळीत होणे.

**डुलाई** स्त्री. सामान वाहून नेण्याचे काम किंवा मजुरी.(झाडी) [हिं.]

**डुल्लण-णे** पहाः **डुलणे, डोलणे** : 'मुक्तेश्वरप्रार्थनें संत। स्नेहभावें डुल्लती।'- मुआदि २७.२३१. [सं.डुल]

**डुस** स्त्री. सरकी पेरण्याची लाकडाची नळी; मोघण. (व.)

**डुळकणे** अक्रि.१.ओकणे; दूध ओकून पडणे, टाकणे (लहान मुलाने). २. हगणे; पिळकणे (लहान मूल).

**डुळ(ल)कन-कर-दिनी-दिशी** क्रिवि. (दूध इ.चा) ओकून पडण्याच्या आवाजासारखा आवाज होऊन. [ध्व.]

**डुळकवणी**न.१.ओक; उलटी; ओकून पडलेला पदार्थ. २. (निंदाव्यंजक) पाणी घातलेले दूध, ताक इ. [ध्व.]

**डुळकी** स्त्री. ओकारी (लहान मुलाची). (क्रि. येणे). [ध्व.]

**डुळडुळ-ळा** क्रिवि. १. भांड्यातील पाणी इ. हिसळण्याच्या आवाजासारखा आवाज होऊन.२.(भांडे, पोट, गळू इ.)हालण्याने होणाऱ्या आवाजासारखा आवाज होऊन. ३. ढळढळा. (ना.)[ध्व.]

**डुळडुळीत** पहा : **डळडळीत**

**डुळी** स्त्री. शिंक्यावरले भांडे.
**डुळू** न. (भांडे, कापड इ.ला पडलेले) लहान भोक, छिद्र.
**डुंख, डुंखण-न** न. खच्ची केलेले रोप; फांद्या तोडल्यामुळे भुंडा झालेला वृक्ष. (को.)
**डुंखणे** उक्रि. खडसणे; खच्ची करणे; छाटणे; विस्तार छेदणे. (को.)
**डुंग** न. लहान जहाज; होडी. (अहि.)
**डुंग-गा-गी** पु.स्त्री.१. टेकाड; उंचवटा; चढ. २. ढीग; रास; गंज.
**डुंग-गा-गी** पु.स्त्री. वावराचा अलग लहानसा तुकडा; शेत.(व.)
**डुंग-गा-गी** पु.स्त्री. वाळवंट. (को.)
**डुंगली** स्त्री. उंचवटा; टेकाड : 'देवालयामागील डुंगलीवर भेल्या धनगराची एकुलती एक झोपडी असायची.' - माआवा ८६.
**डुंगी** पु.खाडीतील जहाजे समुद्रात नेणारा व आणणारा इसम. (कु.)
**डुंब(भ-म)णे** अक्रि.१. पोहणे; पाण्यात खेळणे; जलक्रीडा करणे.२.(ल.) रमणे; गढून जाणे; निमग्न होणे (विद्या, व्यासंग, धंदा इ.त). [ध्व.]
**डू** क्रिवि. १. 'डू' असा आवाज देऊन किंवा करून.२. पहा : **डुडु** १[ध्व.]
**डू, डूब** पु.स्त्री. समृद्धी; नको इतके वैपुल्य, बाहुल्य; विपुलता; चंगळ. (क्रि. होणे, गाजणे, माजणे, मातणे.).
**डूक-ग** पु. मनातील अढी; वाईट ग्रह; दात; रोष : 'त्याचा डूक माझ्यावर आहे.' - गाबा १४५. [हिं.]
**डूब** स्त्री.१.हुलकावणी; थाप; झुकांडी.(व.)२. बुडी; बुचकळी. ३. बूड; तोटा.
**डूब** स्त्री.१.विटलेल्या वस्त्राला पुन्हा रंग देणे. २. छटा; रंग; वस्त्रावर बसलेला रंग.
**डूब** स्त्री. १. आस्वाद. २. स्पर्श; संपर्क. ३. शैली.
**डूबक्षेत्र** न. पाणीसाठा; पाणलोटक्षेत्र.
**डूल** पु. एक कर्णभूषण; लहान मुलांच्या कानातील लोलक असणारा एक अलंकार; कानात घालण्याचा लोंबता दागिना. [सं.डुल]
**डूली** (शिवी) प्रेत, मढे (सजविणे) : 'आईला सारकं भ्या वाटायचं. ह्यो नीट जगू द्याचा न्हाय. म्हनून रोज डुली सिनगारीत हुती.' - उपरा ७८.
**डेअरी** स्त्री. दूध व दुग्धजन्य पदार्थ मिळण्याचे ठिकाण; दूधघर; दुग्धालय. [इं.]
**डेक** पु. गलबतावरील, छप्पर नसलेला शेवटचा मजला. [इं.]
**डेक** वि. (सांकेतिक) सहा. (मंडईतील व्यापाऱ्यांच्या व्यवहारातील व्यापारी शब्द.).
**डेका** पु. देठ : 'डेका सुकला आणि मासा पिकला.' - एहोरा(६)८५.
**डे(डें)ख** न. १. देठ; ताट; झाडाची वा रोपाची फांदी. २. उगम (भाषण, इ.चा).
**डेखण, डेखान** न.१.खुडलेले झाड; रोप; रोपाची खूड; खुंट. २.छाटल्यानंतर शिल्लक राहिलेला देठ (तंबाखू इ. पानांचा).(को.) [सं. दिह]
**डेग-क** स्त्री. स्वयंपाकाचे तांब्या-पितळेचे मोठे भांडे; हंडा; तपेले : 'तिथे डेगा आहेत थोर । तीन कळशींचा सुमार ।'- गाघपो ५५; 'मोठमोठाली पातेली, डेक, कढया घासपूस झाल्या.' - बाविबु ५०. [फा. देग]
**डेग** स्त्री. कडा (घराच्या जोत्याची इ.). (कु.)
**डेचकी-के, डेचा** स्त्री न. पु. रुंद तोंडाचे भांडे : 'वारूनं गुळाचा खडा चहाच्या डेचक्यात टाकला.' - खळाळ. (कर.)
**डेचकी** स्त्री. १. इचकी; विचकी. २. दुबेळकी काठी.
**डेचा** पु. १.शेंडा; टोक (रोप, झाड इ.चे); डिकशी; डेख.(खा.)२. माथा; कळस; डोके. (क्रि. काढणे, धरणे, पाहणे.).
**डेचा** पु. अगदी आणीबाणीची वेळ, प्रसंग; बरोबर मोक्याची वेळ, स्थळ; ऐनवेळ; संधी.
**डेटा** पु. (संगणक) माहिती संचय. एखाद्या विशिष्ट विषयावर जाणीवपूर्वक जमा केलेला व सहज उपलब्ध होऊ शकेल असा माहितीचा साठा. [इं.]
**डेडी** स्त्री. पोट. (खा., भिल्ली.)
**डेडोर** पु. बेडूक. (खा.) [सं. दर्दुर]
**डेपो** पु. साठा; वखार; संग्रह; कोठार; गुदाम. [इं.]
**डेपो** (स्था.) खडी, वाळू, सिमेंट यांचा योग्य प्रमाण वापरून तयार केलेला ढीग.
**डेप्युटी** वि.उप; दुय्यम. जसे डेप्युटी कलेक्टर. (अप.) दिपोटी. [इं.]
**डेप्युटेशन** न. १. शिष्टमंडळ. २. दुसऱ्या जागी काही काळासाठी पाठवणे [इं.]
**डेब(बि)रो** वि. मारकट. पहा : **डवरा**
**डेबा** वि. फुगलेला; सुजलेला.
**डेमी** पु. छापण्याचा २२।। X १७।। इंच आकाराचा कागद. [इं.]
**डेरका-की-के** पु.स्त्री.न.१. मातीचा डेरा; खोजा. २.मोठे पोट. ३. घागर.
**डेरा** पु. १. पहा : **डेरका**. २. वीणा-वाद्याचा भोपळा. ३. गोल घुमट; देवळाच्या कळसाच्या खालचा गोल भाग. ४. नगाऱ्याचे भांडे. ५.भडभुंजाच्या कढईचा खोल भाग. ६. ज्यात पाणी राहते तो मोटेचा भाग. ७. गवळी लोकांचा शिमग्यातील एक खेळ. यात रांजणाला चामडे लावून ते वाजवतात.
**डेरा** पु. चिखल असलेली जमीन; दलदल असलेला भाग.
**डेरा** पु. १. मोठा तंबू; कापडी घर. २.तळ; तात्पुरती वस्ती; अड्डा. [हिं.](वा.) ० **देणे**- मुक्काम करणे; जेवण्याखाण्यास राहणे : 'गावात येऊन डेरा दिला.' - फकिरा ११२.**डेरेदाखल होणे**- डेऱ्यात मुक्काम करणे; युद्धाला निघणे. **डेऱ्याचे दांडे होणे**-१.डेऱ्याचे कापड झडून जाऊन फक्त दांडे शिल्लक उरणे. २. गळाठा किंवा दुर्दशा: 'तुम्ही जाऊन तुमची भेट होण्यास वर्ष सहा महिने पाहिजे. इतक्यांत तुम्ही खर्चाचें कोचवणीत येऊन डेऱ्याचे दांडे होतील ना !'-ऐको ४८६.
**डेरी** स्त्री.(क.) १. लहान डेरा; पाण्याचे भांडे. २. लहान तंबू.
**डेरुला** पु. आंबील वाढण्याचे भांडे.
**डेरेदांडे** पु. अव. तंबू; राहुट्या; छावणीचे सामान : 'कोठें डेरे दांडे कोठें उंट तट्टे राहिलीं.'-ऐपो.
**डेल, डेलकी** स्त्री. बेचक्याची काठी. (मुंबई) पहा : **डेळ**
**डेलकर** न. बेडका; खाकरा (कफाचा). (राजा.)

**डेलची** स्त्री. एक कासंडीसारखे भांडे : 'डेलचीभर पाणी घेऊन खळाळा हात-पाय-तोंड धुते....' - चिताक १७९.
**डेलज** स्त्री. उंच जागा; देवडी; चौरंगावट : 'समोरच्या डेलजला सुंबरान मांडलं.'-एहोरा (२) १३५.
**डेला** स्त्री. नकासगीराचे एक हत्यार; धातूवर नक्षीकाम करण्याचे एक उपकरण.
**डेला** पु. वाडा : 'त्या वेळी विणकाम डेला व भोजनालय याच मुख्य इमारती होत्या.' ह्न माजीया १७४.
**डेलिया** पु.(वन.) १. सूर्यफूलकुलामधील मोठे फूल असलेली एक विलायती शोभिवंत वनस्पती-प्रजाती.२.(सोनारी) कमळासारखे, डोक्यात घालण्याचे सोन्याच्या पत्र्याचे फूल. [इं. डेहलिया]
**डेली** स्त्री. दांडी : 'पालखीची एक डेली गणपतच्या हातात दिली; दुसरी स्वतः घेवून ते पुढं झाले...' - एल्गार ४०.
**डेवगा** पु. मोठ्या आकाराचा बांबू. पहा : **डवगा**
**डेवण-णे** स्त्री.न. उतार; ढाळ; उतरण.
**डेवण-णे** स्त्री.न. १. ठरावीक वेळ, जागा. २. आणीबाणीचा प्रसंग; ऐन वेळ; नेमकी वेळ.
**डेवणे** अक्रि. (अति जेवल्यामुळे) सुस्ती येणे; शरीर जड होणे.
**डेवणे** अक्रि. टोमणा मारणे. (प्रां.)पहा : **डिवणे**
**डेवणे, डेवरणे** उक्रि. १. वर असलेला पदार्थ, वजन, बोजा खाली ठेवणे, उतरणे. २. उतारावरून खाली येणे.
**डेस** पु. युरोपमध्ये गोड्या पाण्यात आढळणारा एक मासा. [इं.]
**डेसा** पु. गुच्छ; झुबका : 'रुइचेया डेसेयांचें तोरण बांधलें :'-लीचपू ३८६.
**डेस्क** न. लिहिण्याचे लाकडी छोटे टेबल : 'डेस्कवर रेटा देऊन ...'- टारफुला २१. [इं.]
**डेहे** उद्गा. (मुलांच्या खेळात) छातीला बोट इ. लावून ओरडणे.
**डेहेला** पु. तबेला; घोडे बांधण्याची छपराची जागा. (बडोदे) [सं.देहली]
**डेळ, डेळके-की, डेळी** न.स्त्री.१. बेळके; दुबेळके लाकूड; फाटे फुटलेले लाकूड; मेढ. २. (ल.) आधार.
**डेळमाथण** न. शुभकार्यातील जलकुंभ किंवा त्याचा पूजनविधी.(व.)
**डेंकी** स्त्री. १.(नाव, भिंत, झाड इ.चा) आधार; टेका. पहा : **तीर** ४-६. २. धीर; पुस्ती.
**डेंकी-खी** स्त्री.(कुस्ती)आखाड्यात मारायची एक उडी. पहाः **डंकी**
**डेंख-खी** न. १. देठ; ताट. २. मूळ; उगम (भाषण इ.चा). (क्रि. लावणे, शोधणे इ.).
**डेंग** स्त्री. केळीचे पान. पहा : **डांग**
**डेंग-गी** स्त्री. आधार; टेका. पहा : **डेंकी**
**डेंग** वि. १. बुद्धीचा जड; ढ. २. ढोंगी : 'तुका म्हणे कुचर दाणा। तैसा म्हणे डेंग हा।'- तुगा २९१३.
**डेंगणे** अक्रि.१.थकणे; दमणे; टेकीस येणे; मेटाकुटीस येणे. २. मरायला टेकणे. (राजा.)
**डेंगणे** न. (ग्राम्य) पुरुषाचे जननेंद्रिय; लिंग.
**डेंगरी-गा** स्त्री.पु. खेकड्याचा लहान पाय. (कु.)
**डेंगळी** स्त्री. एक तृणधान्य.
**डेंगाळणे** अक्रि. सुस्तीने, रेंगाळत काम करणे; टंगळमंगळ करणे.
**डेंग्यू, डेंगू ताप** डासांद्वारा विषाणू पसरून येणारा साथीचा ताप; हाडमोड्या ताप. [इं.]
**डेंडळ, डेंड(डा)ळणे, डेंडळपट्टी** पहा : **ढेंढळ** इ.
**डेंडाय** पोट. (अहि.)
**डेंडारी** स्त्री.१.ओकणे; ओकारी काढणे (सकाळच्या वेळी मुद्दाम). २.(ल.)(गिळलेली वस्तू) बाहेर ओकून टाकणे. ३. लाच परत करणे; भरपाई करणे; फेडणे.
**डेंडाळे** न. पोट फाडून काढलेले आतडे.
**डेंबरा, डेभ(म)रा** वि. १. ढेरपोट्या; मोठ्या पोटाचा; पोट सुटलेला. २. मोठे, सुटलेले, फुगलेले (पोट). ३. फुगलेला; सुजलेला (अवयव, मनुष्य, जनावर). [सं. डिंब]
**डेंबरणे** अक्रि. मोठे होणे; फुगणे (पोट इ.). पहा : **डंबारणे**
**डेंब(म)रे, डेबमोरे** न. धिरडे. पहा : **ढेंबरे**
**डेंबुक, डेमको** पु. चिखलात राहणारा मासा. हा अंगठ्याएवढा लहान असून याचे अंग बुळबुळीत असते. (कु).
**डो** स्त्री. डोई; डोके.
**डो** पु. लाकडी भांडे; पळी; डवला; नारळाच्या करवंटीचा केलेला बुधला, डाव : '२१ : साकरेचे नारिएळ : २२ तुपाचा डो :'- लीचउ ११.
**डोई** स्त्री.१.डोके; मस्तक.२.(ल.)प्रत्येक माणूस; व्यक्ती; इसम.३. पूर्वज; मूळ पुरुष; पिढी. पहा : **डोके**.(वा.)०, **डोकी, डोके करणे**- चंपी करणे; वस्तऱ्याने हजामत करणे. **डोकी वाढविणे**-केस वाढविणे.
**डोईउचला** पु. डोई उचलणारा; बंडखोर; उपद्व्यापी.
**डोईओझे, डोईपेंडके, डोईभारा** न. पु. डोक्यावरचे, डोक्यावर वाहून नेण्याजोगे ओझे.
**डोईखरड्या, डोईताशा** वि. (निंदार्थी) न्हावगंड; हजाम.
**डोईचा** पु.(सांकेतिक) विधवा स्त्रियांचे केस कापणारा न्हावी.
**डोईजड** वि.१. अति मेहनतीचे; कठीण; भारी (काम); न झेपणारे; सहनशक्तीपलीकडे; असह्य : 'येथील लोकांनी डोईजड कर व सक्तीची वेठबिगर याविरुद्ध बंडे केली.'- जाआ १४७. २. आटोक्याबाहेरचा-चे, ताब्यात ठेवण्यास कठीण; वरचढ; शिरजोर; न जुमानणारा; तापदायक. ३.(उप.) श्रेष्ठ; प्रसिद्ध; सन्मान्य; भारी; वजनदार.
**डोईथडक** न. कपाळावरील टेंगूळ.
**डोईपट्टी** स्त्री. प्रत्येक सज्ञान माणसामागे बसविलेला कर.
**डोईफोड** स्त्री.१.डोके फोडणे. २.(ल.)डोक्याला दिलेले श्रम. ३.(ल.) त्रासदायक, कंटाळवाणे, जिकिरीचे काम; कपाळकूट.
**डोईफोड्या** वि.१.फकीर-भिक्षेकऱ्यांचा एक पंथ व त्यातील व्यक्ती. हे भिक्षेकरी काही भिक्षा न मिळाल्यास स्वतःचे डोके दगडावर फोडून त्रागा करतात. २. याप्रमाणे त्रागा करणारा; त्रासदायक, लोचट माणूस.
**डोक** पु. दलदलीत राहणारा एक पक्षी. (को.)
**डोक** पु. दोन्ही तळहात एकाशी एक धरले असता होणारा आकार. (खा.)

**डोकड्या** पु. मोठा मासा. (व.)

**डोकमा** पु. पारशांचे शांतिमंदिर; प्रेतविधीची जागा; स्मशानभूमी.

**डोकरा** वि. वृद्ध; म्हातारा. [हिं.]

**डोकरी,डुकरीण** स्त्री.१.वृद्ध स्त्री; थेरडी. २.(ल.) कुरूप,ओंगळ स्त्री. [हिं.]

**डोक(ख)ला** पु.१. नदीच्या पात्रात पाण्याकरिता खोदलेला खड्डा. २. झरा; टाकी; कुंड. (प्रां.)

**डोकसी–से** स्त्री.न. १.डोई; डोके; डोचके; मस्तक. २. लसणाचा किंवा सुरणाचा कांदा.

**डो(डों)का, डोकला–ली** पु.स्त्री.१.(निंदार्थी) तंगडी; पाय. (राजा. को.) २. गुडघा. (बे.)

**डोकावणे** अक्रि. मुद्दाम पाहणे; डोके खुपसून बारकाईने पाहणे.

**डोके** न. १.कोणत्याही प्राण्याचा मेंदू सुरक्षित ठेवणारा, धडाच्या वरचा कवटी असणारा भाग. २. बुद्धी; विचारशक्ती. (क्रि. चालणे). ३. लक्ष; गती. ४.(ल.) अग्रभाग; वरचा भाग; टवका; उंचवट्याचा भाग. ५. नांगराचा एक भाग.६. पहाः **डोई** २,३. [क. डवूगे] (वा.) ० **असणे**–अक्कल असणे. ० **उचलणे**–१. नावलौकिकाला चढणे. २. पुंडावा सुरू करणे. ० **उठणे, उकलणे** – डोके दुखू लागणे; त्रास होणे; कटकट होणे :'आठ पंधरा दिवस लोकांनी फार कावकाव केली होती. त्याचं डोकं उठलं होतं.' - रब ४७४. ० **काढणे, वर काढणे**– उदयास येणे; वैभवाला चढणे; पुन्हा भरभराटीला येणे. ० **खाजवणे**– १. त्रास, उपद्रव देणे. २.आठवण करण्याचा प्रयत्न करणे; आठविणे. ० **चढणे**–डोक्याला त्रास होणे; डोके जड होणे; संतापणे. ० **चेंडू–प्रमाणे करवू देणे**– मानहानी किंवा शिव्याशाप घेणे. ० **टेकणे**– १.आग्रहपूर्वक बसविणे, राहण्यास भाग पाडणे.२.थकणे; खचणे; अशक्त होणे. ३.आधार घेणे; आश्रय करणे.४. हार पत्करणे. ० **ठिकाणावर येणे**–शुद्धीवर येणे; शांत होणे; विचार स्थिर होणे. ० **तावणे**– अत्यंत परिश्रम, त्रास घेणे. ० **देऊन बसणे, देणे**–१. निश्चयाने चिकाटीने एखादे काम करावयास लागणे. २. (निंदार्थी) लोचटपणाने आणखी राहणे, बसणे (पाहुण्याने). ३. एखाद्याला बुडवून पुन्हा शांत असणे, काहीच घडले नाही असे दाखविणे; निर्लज्जपणे वागणे. ० **देणे, मारणे**–१. मदत, साहाय्य करणे; कार्यभाग उचलणे. २. निश्चयपूर्वक कामाला बसणे. ० **पिकवणे**– सतावणे; अतिशय कटकट करणे. ० **पिटणे**–शोक करणे. ०**फिरणे**–वेडे होणे; रागाने बेफाम होणे. ० **फोडणे**–१. बारीक विचार करणे; डोक्याला त्रास करून घेणे. २. त्रागा करणे. ० **भडकणे**– त्वेष, चीड येणे; अत्याचारी बनणे; रक्त तापणे :'या अनत्याचारी चळवळींत कुणाचेंहि डोकें भडकूं देतां कामा नये.'–के २७.५.३०. ० **भणाणणे**–अति विचारांमुळे, गोंगाटामुळे काहीच कळेनासे होणे. ० **मारणे**– १. शिरच्छेद करणे. २. नुकसान करणे; बुडविणे; आशा भंग करणे. ० **हलविणे**–प्रत्येक गोष्टीस मान्यता देणे; विरोध न करणे. **डोक्याचा चेंडू करणे**– सपाटून शिव्या देणे; भडकणे; अति रागावणे. **डोक्याचे उखळ करणे** – १. आग पाखडणे; संतापणे.२.वाईट रीतीने वागवले असता सहन करणे. **डोक्याचे केस नाहीसे करणे**– फजिती करणे; रागे भरणे. **डोक्याचे खांद्यावर येणे**–चिंता, काळजी दूर होणे, हलकी होणे; संकटाचे निराकरण होणे. **डोक्याच्या वाटेने कर्ज देणे**–१. ताबडतोब कर्ज फेडणे. २.कष्ट, हमाली करून कर्जफेड करणे. **डोक्याच्या वाटेने घेणे**– नम्रतापूर्वक (साष्टांग नमस्कार घालून) घेणे.**डोक्यात किडा सोडणे**–नाही तो विचार मनात आणून देणे. **डोक्यात मशाल पेटणे**–खूप राग येणे. **डोक्यात राख (माती) घालणे**–फार रागावणे; चरफडणे; त्रागा करणे. **डोक्यातून काढून टाकणे**–विचार सोडून देणे; स्मरणातून नाहीसे करणे. **डोक्याने चालणे** –१.अभिमानाने, ताठ्याने चालणे; गर्व होणे; वाहणे. २. शहाणपणाने वागणे. **डोक्याने चालत येणे** – नम्रपणाने येणे; नम्रपणा धरणे. **डोक्याला हात लावून बसणे**– स्वस्थ बसून राहणे; निराश होणे. **डोक्यावर खापर फोडणे, फुटणे, डोक्यावर हंडी फुटणे**–(निरपराधी असता)एखाद्याच्या माथी दोष लावणे; (वाईट कृत्याचा) आळ, आरोप ठेवणे. **डोक्यावर घेणे**–१. एखादी गोष्ट पत्करणे; त्याची जबाबदारी घेणे. २. वाईटपणा, दोष स्वतःवर घेणे. **डोक्यावर चढणे, बसणे**–एखाद्याला न जुमानणे; त्याविरुद्ध बंड करणे. **डोक्यावर दिवस येणे, सूर्य येणे**– दुपार होणे. **डोक्यावर धूळ घालणे**–१. चिंतेमुळे दुःखित होणे; दुःखाची दुस्सहता दाखवणे. २. एखाद्या कामाच्या पाठीमागे लागल्यामुळे अत्यंत हाल–अपेष्टा भोगणे. **डोक्यावर पदर येणे**–१. वैधव्य प्राप्त होणे. २.(ल.)लोकांत येण्याची लाज वाटणे. **डोक्यावर बसणे**– वरचढ होणे; बढती मिळवणे. **डोक्यावर बसविणे**–(कमी प्रतीच्या व्यक्तीचा) वाजवीपेक्षा जास्त गौरव करणे; त्यांच्या मताने चालणे; अधिक मान देणे; फाजील लाड करणे. **डोक्यावर मिरे वाटणे**–१. एखाद्याविरुद्ध उठून त्यावर वर्चस्व ठेवणे. २. मुळीच न जुमानणे; वरचढ होणे. **डोक्यावर विळविणे**–एखाद्यावर चुकीने दोष लादणे; दोषारोप ठेवणे. **डोक्यावर हात घेऊन येणे** – रिकाम्या हाताने येणे; इच्छित वस्तू न मिळाल्याने निराश होणे. **डोक्यावर हात ठेवणे**– १. आशीर्वाद देणे. २. फसवणे; लुबाडणे. **डोक्यावर हात ठेवून जाणे**– सर्वस्वी नागविले जाणे; (रिक्त हस्ते) कफल्लक करून निघून जाणे. **डोक्यावरचे केस मोजणे** – चिकित्सेने पारख करणे; सूक्ष्म दृष्टीने पाहणी करणे :'इंग्रजानी मात्र सर्व लोकांच्या डोक्यावरचे केस मोजून ठेवले होते.' - लोश ३११. **डोक्यावरील पदर काढणे**– १. उघडपणे खरे स्वरूप प्रकट करणे. २. निर्लज्जपणे वागणे.**डोक्यावरून जाणे**–न समजणे; डोक्यात न शिरणे. **डोक्यावरून पाणी जाणे**– १. अनाथ, निराधार होणे; संकट व नुकसानीमुळे लाचार होणे. २. परिस्थिती हाताबाहेर जाणे; संकट कुवतीबाहेरचे असणे. **डोक्यावर हात फिरवणे**–फसवणे; लुटणे. **(हजारांचे)डोक्यास पाणी लावणे**–हजार लोकांना, ते म्हणतील ते करून, खूष ठेवण्याचा प्रयत्न करणे. **डोक्यास पाणी लावून ठेवणे** – शिक्षा भोगण्यास तयार होणे, सज्ज असणे.

**डोकेकूट** न. माथेफोड. (ना.)

**डोकेदुखी-पीट** स्त्री. १.डोक्यात होणाऱ्या वेदना. २. कटकट; त्रास; तापदायक गोष्ट.
**डोके (देणे)**-जिजिया कर. हिंदूंवर औरंगजेबाने लावलेला दरडोई कर.
**डोकेफिरू** वि. वेड लागलेला(मनुष्य); रागाने बेफाम होणारा (मनुष्य).
**डोकेबाज** वि. हुशार; कल्पक; चतुर.
**डोक्याचा** पु. न्हावी. पहा: **डोईचा**: 'एक राजा सलो. तेच्या डोक्यात सलें शिंग..ते डोक्याच्याला उमगले.'- लोककथा २.२८.
वि. चलाख; हुशार.
**डोघालणे** अक्रि. गळ्याला दोन बोटे लावून आवाज करणे : 'डोईस लहान चिंघोटी डोघालित यमुने कांठीं ।'ह्र राला ६६.
**डोचकी-के** स्त्री. न. मस्तक; डोके; डोई; डोसके.
**डो(डों)चणी-णे** डौ(डौं)चणे. पहा : **डवचणे**
**डोचणे** अक्रि. टोचणे : 'मी कुशीत डोचून काकाला सांगू लागलो की...'ह्र सीए ८.
**डोचलणे** उक्रि. सावध करणे : 'माया जीवातें विकरे संचरे वीए, प्रसवे हालवी, डोचली डगळी लोटी :'-चसिसू ६.
**डोडा** पु. केळफूल.
**डोडी** स्त्री. पीक.
**डोण** पु. कटोरा; वाटी; वाडगा.
**डोण-णी** पु. १. झाडाच्या खोडाचे द्रोणाप्रमाणे पोखरून कोरून केलेले पात्र.२. सुरमाडाच्या जाड मुळीचा कोरून केलेला द्रोण, भांडे(लोणचे, मीठ इ. ठेवण्याकरिता); कोठिंबा; झाडाचे माठण.
स्त्री. १. पोहरा (तळ्यातील पाणी शेताला घालण्याकरिता). २. दगडी-लाकडी कुंड, कुंडी (पाण्याकरिता).३. लहान तारू; एकच शीड असणारे गलबत किंवा मचवा. (कु.) पहा : **डोणी** [सं. द्रोण]
**डोणगा-गे** पु.न. लहान डोण; लाकडाचे भांडे. पहा : **डोण** २.
**डोणमिरची** स्त्री. भोपळी मिरची; सिमला मिरची. [क.डोण्णे=लठ्ठ]
**डोणसाल** न. विजापूर जिल्ह्यातील डोणीच्या आकाराचा सुपीक भाग.
**डोणा** पु. १.(तूप, तेल इ. ठेवण्याकरिता) केळ, पळस वगैरेच्या पानांचा केलेला द्रोण. २. गाडीच्या आसावरील जाड लाकूड; बुटे. (बे.) ३. कढविलेला उसाचा रस गार करण्याची लाकडी चौकोनी काहील, डोण. (बे.) ४. लाकडाचे भांडे. (कु.)
**डोणा-ण्या** पु. पोर्तुगीज शिपाई : 'ते महागिरी मुंबईहून वरते साहा डोणे घालून पाणी जोखावयास पाठविली.'-पेद ३४.६१. [पो. डॉन]
**डोणी** स्त्री. १. नाव; होडी; डोंगा. २. पानाचा द्रोण. ३. कुंडी; लहान हौद; माठणी; टाकी. [सं. द्रोणी]
**डोनट** पु. आंबाडा मोठा दिसावा म्हणून आत बसविलेली कापडाची गुंडाळी; कापडाची वाटोळी, जाड चकती: 'फक्त आंबाडा त्याला दिसायचा आणि आतला तेलकट डोनट.'- ऑर्फियस ७३.
**डोनट** पु. मधोमध क्रिम असलेला एक प्रकारचा गोड पाव. [इं.]
**डोफा** पु. पानांचा केलेला मोठा द्रोण. (व.)
**डो(डों)फा** पु. गुडघा.
**डोब-बा** पु.१. डुबी; बुडी. २. रंगीत वस्त्राला पुन्हा त्याच प्रकारचा रंग देण्याची क्रिया. पहा : **डूब**. (क्रि. मारणे).
**डोब** पु. डबके. (व.)
**डोब** पु. भात लावण्याची कातळावरील सखल जमीन. (कु.)
**डोबका** पु. भोक; बीळ. (बे.)
**डोबकाड** न. लहानसे डबके. (व.)
**डो(डों)बड-र** न. (निंदार्थी) रेडी; म्हैस; म्हसरूड; टोणगा; हेला (भाकड, निरुपयोगी म्हैस): 'ऐशीं ज्ञानाचीं डोंबडें । आशा विटंबिली मूढें।'ह्र तुगा २८४१.
**डोबणे** उक्रि. डूब देणे; रंग देणे; कपडे रंगात, पाण्यात बुडविणे.
**डो(डों)बरा** पु.१.(भिंत, भांडे, कापड इ.ला) पडलेले भोक. २. खड्डा; खळगा (यात रस्त्यावरील पाणी साचून डबके बनते.). पहा : **डबरा**
**डो(डों)बूर** पु. खाच; छिद्र; भोक. - तंजा. पहा : **डोबरा**
**डोबोडोबी** क्रिवि. डबक्या डबक्यात; पाण्याच्या डबऱ्यात: 'पाणी वरून पडतें । पहा म्हशी डोबोडोबीं । गवळी उभा लोभी।'- वलो २२. (व.)
**डोभण** न. पाण्याचे डबके, खळगा.
**डोमकावळा** वि. १. कावळ्याची एक जात. २.(ल.) टपून बसलेला; मध्ये बोलणारा. पहा: **डोंबकावळा**
**डोमडा** वि. काळाकुट्ट; काळाकभिन्न. (ना.)
**डोमपंडित** पु. डोंब जातीचा शीतला देवीचा पुजारी.
**डोमल** पु. १. (नांगराची अथवा गाडीची) चऱ्हाटे व बंद पिळवटून आवळ करण्याकरिता उटाळीप्रमाणे उपयोगी पडणारे एक लाकूड. २. वासा; गाडीची दांडी. पहा : **डोंबाळा**
**डोमाळे** न. गाडीची दांडी . पहा : **डोमल**
**डोम्यानाग-सर्प-साप** पहा : **डोंब्या**
**डोय-यी** स्त्री. पहा : **डोई** : 'दिसे एक डोयी जटाभार वाहे ।'-नवनीत४२१.
**डोयली** स्त्री. पळी. पहा: **डवली** (को.)
**डोर** वि. नादमधुर; गंभीर; घौस (वाद्य, आवाज).
**डो(ढो)रक्या** पु. ढोरे वळणारा; गुराखी : 'डोरक्यांनी काठीला खुळखुळ गोंडारे...' - एहोरा ३२.
**डोरली रिंगणी** एक प्रकारचे झाड.
**डोरले** न.१.डोरलीचे फळ; डोरले वांगे.२.डोरलीच्या फळासारखा सोन्याचा दागिना; मणिमंगळसूत्रातील सोन्याची वाटी. (ल.) मंगळसूत्र.
**डोरले** न. गुन्हा; शाबीत झालेला आरोप. (क्रि. करणे, लावणे.).
**डोरलेवांगे** न. रानवांगे; वांग्याची एक जात. या फळाचा रंग पिवळा असून आकार सुपारीएवढा असतो.
**डोरशीमुशी** स्त्री. समुद्रातील मुशी माशाची एक जात.
**डोरी** वि. सुंदर.
**डोल-ल्या** पु. पाण्याची बादली; पोहरा; पीप; पाणी वाहण्याची पखाल्याजवळची कातडी बालडी: 'डोल रुप्याचा दोर रेशमी जपून झपून पाणी भरशी।'- पला ४.४०. [हिं., फा.दोल्= पोहरा]
**डोल** पु. गलबताची, नावेची डोलकाठी. (हेट.) [हिं., सं. दोल]
**डोल** पु. १. देवाचा डोलारा. पहा : **डोल्हारा**. २. डोली. ३.कंप; काप; हलणे: 'अगा वारा जरी वाजोनि वोसरे । तरी तो डोल रुखीं उरें।'-ज्ञा

१८.४२३. ४. डुलणे; झोके खाणे; झोका. (क्रि. देणे) : 'तेणे समर्था येतसे डोल ।'- दाविधा २८१. [सं.दोल, दोलय्]

**डोल** पु. उत्तर हिंदुस्थानात होणारा एक उत्सव.

**डोल** पु. विस्मय.

**डोल** पु. दुष्काळात सरकारतर्फे गावकामगार, महार, जागले इ.ना. रोकड किंवा धान्याच्या रूपाने देण्यात येणारी खावटी. [इं.]

**डोल** पु. लहान मासे पकडण्याचे जाळे. (राजा. कोळी)

**डोल(ळ)कर** पु. १. डोली, पालखी वाहणारा; भोई. २. शिडाची काठी सांभाळणारा; नाविक. ३. कोळी; मासेमारी करणारा.

**डोलकाटा** पु. (भौ.) तालमापक; समकालावधी मापक.

**डोलकाठी-खांब** स्त्री.१.(नावेची, बोटीची) शिडाची काठी; डोल. २. जत्रेमधील निशाणाची काठी. [सं.दोल्+काष्ठ]

**डोलग्यारस** स्त्री. भाद्रपद शुद्ध एकादशी.

**डोलची** स्त्री. डोल; कातड्याची पखाल; पोहरा. [हिं.]

**डोलची बेग** पखालीचा धनी; मुसलमान. पखाल्यास व्याजोक्तीने म्हणतात. (घागरगड्या सुभेदार या संज्ञेप्रमाणे).

**डोलजवासा** पु. गलबताचे पुढचे शीड.

**डोलझा** पु. (विणकाम) थूनास (विणलेले कापड गुंडाळावयाच्या चौकोनी लाकडाला) प्रतिबंध होण्यासाठी दोन बाजूंना ज्या खुंट्या घालतात त्यांपैकी प्रत्येक. याने थून उलट फिरत नाही.

**डोलणे** अक्रि. १. हलणे; मान मागेपुढे किंवा बाजूस करणे. पहा : (सर्व अर्थी) **डुलणे**. एका बाजूकडून दुसऱ्या बाजूला आपण होऊन (मनुष्य, वस्तू) हलणे म्हणजे डुलणे आणि मुद्दाम होऊन हलणे म्हणजे डोलणे. २. आंदोलन; डळमळणे. [सं.दोल्]

**डोलना** पु. डोला; प्रेताची तिरडी; प्रेताची पालखीः 'शिद्दी सुरुरखान साहेब फौत जाले. त्यांचा डोलना बाहेर राजपुरीस आणिला.'-भावजंसि ३.

**डोला** पु. १. मुसलमानांचा ताबूत; ताजिया. २. डोली, पालखी, मेणा यांसारखे वाहन : 'स्वारि सख्याची येईल कधी मिरवत डौलांत। बसुनियां चौरंग डोलांत।'-प्रला १३४. ३. प्रेताचे वाहन; तिरडी. [हिं.,सं. दोला, क. डोळ्ळारि](वा.)०**जाणे**-(शिवी)मढे जाणे;मरणे. ० **मिरविणे**- डोला हा मुसलमानांचे प्रेतवाहनाचे प्रतीक आहे, त्याची मिरवणूक; एक शिवी : 'ठकभटानो तुमचा डोला मिरविला.'- जोफुसग्रं २३९.

**डोला(ल्हा)रा** पु. डोल; लहानसा झोपाळा; हिंदोळा; बंगई; देवाचा पाळणा; झुलता देव्हारा :'अंतःकरणाचे डोल्हारीं। आत्मा निजविला श्रीहरी ।'- देकृज ७९. [सं. दोला]

**डोलारा** पु. बाह्य, वरवर दिसणारा देखावा; बाह्यात्कारी मोठी पण आतून पोकळ रचना : 'इनामदारीचा कोसळणारा डोलारा...' - सामा १४८.

**डोलावा** पु. झोका; तरंग; हेलकावा : 'बहिणी म्हणे येती सुखाचे डोलावे। जाणती अनुभवें जाणते जे ।' -बबागा ४५.

**डोलिकायंत्र** न. औषधी द्रव्ये कापडात गुंडाळून ती उकळून काढण्याचे यंत्र : 'डहळुनु डोलिकायंत्रमार्गे : सोधिजे रसु :'- रकौ ३१.

**डोली** स्त्री. १. अशक्त, आजारी माणसांना, बायकामुलांना नेण्याकरिता उपयोगात आणावयाचे वाहन; पाळणा; डोंगर, घाट चढण्या-उतरण्यासाठी अशा डोल्यांचा वापर होतो : 'डोलीमाजी घातली तेधवां । कृष्ण दर्शनें तारावया ।'-जैअ ६.५९. २. मेणा; पालखी; सुखासन. ३.(नाविक) घामत बाहेर टाकण्यासाठी पेटीसारखी केलेली व्यवस्था. [हिं.,सं. दोलय, दोली]

**डोली** स्त्री. मच्छीमारीवरील एक कर : 'दर गलबतास डोली ४ येकूण देत असो.' - पेद ३४.१९७.

**डोली** स्त्री. मासे पकडण्याचे जाळे.

**डो(ढो)ली** स्त्री. लहान मुलांच्या दस्तापिंजर या खेळातील एक संज्ञा; पाच ही संख्या.

**डोलीधारा** स्त्री.पु.मासे मारण्याकरिता रोवलेल्या डांभ्यावरील कर.

**डोव** पु. डोह. (झाडी)

**डोवारना** क्रि. १. सामान वाहून नेणे. २. लुबाडणे. ३. लपविणे. (झाडी)

**डोशी** स्त्री. म्हातारी.

**डोस** पु. औषधाचे प्रमाण; मात्रा.[इं.] (वा.)० **पाजणे**- (अप्रिय) उपदेश करणेः 'व्यवहारीपणाचे डोस मला मधून मधून पाजल्याशिवाय.'- वर्षा २४.

**डोसा** पु. चणे, उडीद, तांदूळ यांच्या पिठाची तुपात परतून केलेली आंबोळी, धिरडे. [त. दोसै]

**डोह** पु. मोठा जलाशय; नदी, तळे यातील खोल भाग; खळगा; खोल पाण्याची जागा, साठा. [सं.द्रह, क. मडुहु]

**डोह** पु. संकट; चिंता; काळजी : 'यंदा खर्चामुळे डोहात आहेत.' -ऐको.

**डोह** अ. काळा या शब्दास अतिशयोक्ती, आधिक्य दर्शविण्यासाठी जोडण्यात येणारा प्रत्यय.

**डोहण** न. १. डोह; पाण्याचे डबके; तळे.(को.) २. डोणगे; गुरांना पाणी पिण्याकरिता बनविलेले झाडाच्या खोडाचे पात्र. (ना.)

**डोह(हा)णा** पु.१. अडथळा; विरोध; मोडता; विघ्न (चालू कामात) (क्रि. घालणे). २. गोंधळ; बंड; दंगा : 'मोंगलांचे मनात राज्यात डोहणा करावा असे आहे.'- पेद २०.१२८. ३. टोमणा. (को.)

**डोहन** न. दोन छपरांच्या जोडावर (मध्ये)बसवायचा पन्हळ. (व.)

**डोह(हा,हो)र** पहा : **ढोर**ः 'डोहर भाट बुरुड रजक।'- स्वादि ६.५.३८; 'डोहोर लोहार दासी बलुती बारा ।'- तुगा ४०८.

**डोहरवणी** न. ढोराच्या घरचे पाणी : 'तेथिचे डोहरवणीए : मोचवणीए : पीयालां:' - लीचपू ४७४.

**डोहरा** पु. नदी, ओढा इ.त पाण्यासाठी खणलेला खड्डा. पहा : **डवरा**

**डोहलोट** पु. उन्हाळ्यात केवळ डोहात असलेले पाणी पहिला पाऊस पडल्यामुळे वाहून नवीन पाणी येणे; पहिला वळिवाचा वगैरे पाऊस पडून नदीच्या पात्रातून पाणी वाहणे : 'कृष्णेस डोहलोट जाला.' - पेद ३८.१२८.

**डोहलोटी** स्त्री. ज्येष्ठ शुद्ध पौर्णिमा. (व.)

**डोहवण** न. १. भांडणतंटा; बखेडा. २.डोहणा; दंगा; फंद-फितूर.

**डोहळणे, डोहळा** पहा : **ढवळणे, ढवळा**

**डोह(हा)ळतुली** स्त्री. डोहाळे लागलेली गरोदर स्त्री.

**डोह(हा)ळा, डोह(हो)ला, डौला** पु.१. गर्भवती स्त्रीला एखादा पदार्थ खावासा वाटणे; तिला होणारी विशिष्ट इच्छा, मनोरथ, लालसा, लक्षणे. २.अयोग्य इच्छा; भलत्या गोष्टीवर वासना जाणे; छंद; हौस; शौक (क्रि. पुरणे, पुरविणे):'कैसे प्राप्तीचिये वेळे। निदैवा अंधळेपणाचे डोहळे।'-ज्ञा ६.७३. [सं. दोहद] (वा.)(**भिकेचा) डोहळा आठविणे**-ज्यामुळे दारिद्र्य येईल, भीक मागावी लागेल असे ढंग करणे; व्यसनात पैसा उधळणे.

**डोह(हा)ळेजेवण** न. डोहाळतुलीला मेजवानी. स्त्रीच्या पहिल्या गरोदरावस्थेत (सातव्या महिन्यात) अन्य सुवासिनींना बोलावून करावयाचा भोजनसमारंभ. (यावेळी डोहळतुलीस नवे कपडे, फुलांचे अलंकार इ.नी सजविले जाते.)

**डोहारणे** सक्रि. १. माल वाहून नेणे. २. दुसऱ्याची वस्तू लांबविणे. (ना.)

**डोहोरी** स्त्री. उसाचा वाफा. (झाडी)

**डोळ** पु. टरफल असलेली डाळ; अर्धवट भरडलेली, सडलेली डाळ; भरडा; चोख डाळीमध्ये सालासकट राहिलेल्या डाळिंब्या.

**डोळ** न. संशय; वहीम; किंतु. (क्रि. पडणे, येणे.).

**डोळ** स्त्री. समुद्रात मासे धरण्याचे मोठे जाळे. हे पुरलेल्या मेढ्यांना (खांबांना) लावतात.

**डोळझा(ढा)पणे-णी** न. स्त्री. घाणा, रहाट वगैरेला जुंपले असताना रेडा, बैल यांचे डोळे झाकण्याचे साधन; झापणी; घोड्याची अंधारी : 'डोळ झांपणें लावून मुद्दाम आडरानात शिरण्यास जेव्हां मंडळी तयार झाली.' - टिकेले ४.२२९.

**डोळमीट** न. भोक पाडण्याचे एक लहान हत्यार; गिरमीट.[इं. गिमलेट]

**डोळवस** पु. डोळसपणा : 'आत्मा स्वयंप्रकाश । जेणें जन होय डोळस । तया डोळ्या डोळवस ।' - विसिंपू ७.११६.

**डोळस** वि.१.डोळे, दृष्टी शाबूत असलेला.२.(ल.) चतुर; हुशार; चलाख; काकदृष्टीचा; दूरवर दृष्टी पोचविणारा; सूक्ष्मदृष्टी; चाणाक्ष : 'ज्ञान जी तुझेनि डोळस ।'-ज्ञा ४.१०. ३. तीक्ष्ण दृष्टीचा. ४. सुंदर डोळ्यांचा : 'रंगा येई वो विठाई । सांवाळिये डोळसे।'-तुगा २८२. ५. स्वच्छ; प्रत्यक्ष : 'तें ज्ञान नोहे जाणावें। डोळस तम।'ह्ज्ञा १८.५८१. ६.(थट्टेने)डोळ असलेली (डाळ, वरण इ.).

**डोळसता** स्त्री. डोळे असणे; दृष्टी : 'देखणेपणें वीण डोळसता। तोची माथां स्तबक ।'- एरुस्व १.६६.

**डोळा** पु. मोटेस बांधावयाचे लाकण.

**डोळा** पु. (विटीदांडू) आर डाव, वकट, लेंड इ.मधील डोळ्यावरून विटी मारण्याचा डाव. (क्रि. मारणे). (कर.)

**डोळा** पु. १.जात्याचे तोंड. २. कुंभाराच्या चाकातील खाच.

**डोळा** पु. दुर्बिणीचे आपल्याकडे असलेले भिंग.

**डोळा** पु. (सोनारी) जिन्नसाच्या इतर अंगापेक्षा तोंडाशी किंचित वाटोळा व डगळ असणारा भाग.

**डोळा** पु. सोळा शेराचे माप, परिमाण; एक तृतीयांश पायली (४८ शेर = एक पायली). १२ डोळे = एक माप व ६० मापे = एक साठ. (खा.)

**डोळा** पु. १. माशाच्या पाठीवरील खवला. २. सीताफळ, रामफळ, अननस इ. फळांवरील खवला. ३. मोराच्या पिसावरील डोळ्याच्या आकाराचे वर्तुळ.

**डोळा** पु.१. माहिती, ज्ञान देणारा (माणूस, विद्या इ.).२. बातमीचा, ज्ञानाचा उगम (शास्त्र, कागदपत्र, हेर, गावचा महार इ.).

**डोळा** पु.१.पायाच्या घोट्याचे हाड; घोटा. २. गुडघ्याच्या वाटीजवळ दोन खळगे असतात, ते प्रत्येक.

**डोळा** पु. (कृषि.) अंकुर; मोड फुटण्याची, येण्याची जागा (बटाटा, ऊस, नारळ इ.ला).(वा.)० **बांधणे** -एका झाडावर दुसऱ्या झाडाचे कलम करणे.

**डोळा** पु. लहान भोक; छिद्र (कापड, भांडे इ.चे).

**डोळा** पु.१.रंग, रूप वगैरे जाणण्याचे इंद्रिय; नेत्र; नयन; चक्षु; नेत्रेंद्रियाचे स्थान. २. दृष्टी; नजर; लक्ष; कटाक्ष. ३.(ल.)अंतर्दृष्टी; आकलनशक्ती; ज्ञानचक्षू. [सं. दोल](वा.)० **असणे** -एखाद्या गोष्टीच्या प्राप्तीसाठी टपून असणे, बसणे; अभिलाषा असणे. ० **ओळखणे, जाणणे, समजणे, ताडणे**-दुसऱ्याच्या मनाचा कल समजणे; आशय, अभिप्राय ताडणे. ० **घालणे, मारणे**-१.डोळा मिचकावून खूण करणे. २. आपले प्रेम व्यक्त करण्यासाठी एखाद्या बाईकडे पाहून डावा डोळा मिचकावणे.० **चुकविणे** -दृष्टीस न पडणे; भेट घेण्याचे टाळणे; नजरेला नजर भिडू न देणे.० **ठेवणे**- एखाद्या वस्तूच्या प्राप्तीची इच्छा करणे. ० **देणे**-बारीक नजर ठेवणे : 'गृध्रासम डोळा दिधला.'-संगी ४१.० **न उघडणे**-१.ग्लानी येणे; आजारामुळे निपचित पडणे. २. आपली चूक लक्षात न घेता मग्रूरपणे वागणे. ३. पाऊस न थांबणे. ० **पाहणे**-डोळे वटारून पाहणे. ० **प्राण ठेवणे**-पहा : **डोळ्यांत प्राण ठेवणे. डोळाभर झोप घेणे**-चांगली झोप घेणे. **डोळे उगारणे,** ० **गुरकावणे**-डोळे वटारणे. **डोळे उघडणे**-आपले कर्तव्य, हिताहित वगैरेकडे लक्ष वेधणे, सावध होणे; अनुभवाने, चट्टा बसल्याने, नुकसान झाल्याने शहाणे होणे. **डोळे उरफाटणे, फिरणे, चढणे**-(श्रीमंतीमुळे) मदांध होणे. **डोळे मोठे(केवढे) करणे**-डोळे वटारणे; रागावून पाहणे :'मी नुसतें त्याचें नांव घेतलें मात्र, तो बाईसाहेबांनीं केवढे डोळे केले तें तूं पाहिलेंस ना?'-फाल्गुन. **डोळे खाणे**-पेंगणे; डुलकी घेणे. **डोळेगावची कवाडे लागणे**-अंध होणे. **डोळे गाळणे**-आवाज न करता रडणे. **डोळे चढणे**-(दारू, जागरण, ऊन, राग यांमुळे) डोळे उग्र, लाल दिसणे. **डोळे चढवून बोलणे**-रागाने बोलणे. **डोळे चोरणे**-तोंड लपविणे; भेट चुकविणे; नजर टाळणे; फसविणे; डोळ्यांत धूळ टाकणे : 'त्याशीं कसें बोलावें याची आज्ञा आली पाहिजे. डोळे चोरले असतां पत जाते.'-मइसा ५.२१०. **डोळे जळणे**- द्वेषामुळे बरे न पाहवणे. **डोळे जाणे**-अंधत्व येणे. **डोळे झाकणे, ढापणे**-१. मरणे; प्राण सोडणे.२. दुर्लक्ष, हयगय करणे; कानाडोळा करणे. **डोळेझाक करणे** - दुर्लक्ष करणे. **डोळे तरारणे**-डोळ्यांत पाणी येणे : 'डॉ. मार्टिनचे डोळे गेल्या दोन दिवसांत प्रथमच तरारले.'-एल्गार १४३. **डोळे ताटवत बसणे**-वाट पाहात बसणे : 'उगं कां बोलणं वाढवत, रातचं डोळं ताटवत बसलाय.'-आपा ७. **डोळे ताठणे**-अरेराव, मगरूर बनणे, होणे.

**डोळे ताणून पाहणे, डोळे फाकणे**–तीक्ष्ण नजरेने पाहणे. **डोळे तांबडे–पिवळे करणे**–रागाने लाल होणे; उग्र नजरेने, डोळे फाडून पाहणे. **डोळे दाखविणे**–डोळे वटारणे. **डोळे निवणे, निवविणे, थंड होणे**–एखादी ईप्सित, प्रिय वस्तू पाहून समाधान पावणे; कृतकृत्य होणे : 'कृष्णा म्हणे निवविले डोळे त्वां बा यदूत्तमा माजे।' –मोएषि ३.३१. **डोळे निवळणे**–१. डोळे येऊन बरे होणे; डोळे फिरून स्वच्छ होणे. २.(वेडानंतर) पूर्ववत ताळ्यावर, शुद्धीवर येणे. **डोळे पठारास, पाताळात जाणे**– आजार, अशक्तता इ.मुळे डोळे खोल जाणे. **डोळे पांढरे करणे**–१.(डोळे पांढरे होईतोपर्यंत) अत्यंत क्रूरपणाची शिक्षा देणे. २.मृत्युपंथास लागणे. **डोळे पापी असणे**– डोळ्यांना नेहमी विलासी, विषयी, कामुक असे मानण्यात येते. प्रथम (तेच) पाप करतात. **डोळे पाहून वागणे, चालणे**–एखाद्याच्या मनाचा कल पाहून वागणे; तब्येत ओळखणे. **डोळे पिंजारणे, फिंदारणे, फाडणे**–(रागाने) डोळे वटारणे, क्रूर करणे. **डोळे पुसणे**– १. रडायला लागणे; वाईट वाटणे. २. सांत्वन करणे. **डोळे पोंढळणे**–डोळे खोल जाणे. **डोळे फाटणे**– १.आशा जास्त वाढणे; महत्त्वाकांक्षी बनणे. २.आश्चर्यचकित होणे. **डोळे फाडणे**–१. रागावणे; डोळे वटारून पाहणे. २.अंतकाळी डोळे निश्चल उघडे ठेवणे; डोळे थिजणे. **डोळे फिरणे, फिरवणे**–१.घेरी, चक्कर येणे. २. मगरूर, उन्मत्त होणे. ३.(मरणसमयी) डोळे फिरवू लागणे. ४. (करारासंबंधी) बेत फिरणे; मत बदलणे; माघार घेणे. **डोळे फिरवणे**– (रागाने)डोळे वटारणे; चेहरा उग्र करणे;अवकृपेने पाहणे. **डोळे फुटणे**– १.अंध होणे; डोळे जाणे. २.दुसऱ्याचा उत्कर्ष पाहून मत्सरग्रस्त होणे. **डोळे फोडून वाचणे**–लक्षपूर्वक वाचणे. **डोळे बांधणे**– १.भारणे; नजरबंदी करणे (जादूटोणा इ.नी). २. डोळ्यांत माती फेकणे; फसविणे. **डोळे भरणे**–अश्रूंनी डोळे भरून येणे; रडू येणे. **डोळेभर, डोळाभर, डोळे भरून पाहणे**–तृप्त होईपर्यंत एखादी वस्तू पाहणे. **डोळे मिटणे**–मरणे; डोळे झाकणे. **डोळे मुरडणे**–१. वाकडी नजर करून, संशयितपणे पाहणे. २.काण्या डोळ्याने पाहणे; एके बाजूस पाहणे : 'डोळे मुरडुनि सहज बघे ती।' –शाकुंतल (अंक २). **डोळे मोडणे**– १. डोळे मिचकावणे; डोळ्याने खुणा करणे. २. ऐटीने, चोखंदळपणे डोळे उचलणे, वर करणे; नखऱ्याने पाहणे. **डोळे लवणे**–डोळ्याच्या पापणीचे स्फुरण होणे. (शुभाशुभसूचक). **डोळे लाल करणे, डोळे वटारणे** –१. रागावणे. २. एखाद्यावर उलटणे. **डोळे लावून बसणे**– आतुरतेने वाट पाहणे. **डोळे होणे**– माहिती होणे, सावध होणे (कामधंदा, अभ्यास इ.संबंधी). **डोळ्याला डोळा मिळविणे, भिडविणे**–उद्धटपणाने टक लावून पाहणे. **डोळ्याला डोळा लागणे**–झोप येणे; झोपेने डोळे मिटणे. **डोळ्यांआड करणे**–दुर्लक्ष, कानाडोळा करणे. **डोळ्यांचा अंधार करणे**–उजेडात चुकणे; धडधडीत चूक करणे. **डोळ्यांचे कडू मोडणे**–डोळा लागणे; डुलकी येणे. **डोळ्यांची खोगरे होणे, डोळ्यांच्या खाचा होणे, डोळ्याची भिंत होणे**–दृष्टी जाणे; अंध होणे. **डोळ्यांचे पारणे फिटणे, होणे**– उत्कंठतेने अपेक्षिलेली वस्तू पाहावयास मिळून मन तृप्त होणे. **डोळ्यांचे दिवे करणे**–सतत नजर ठेवीत अत्यंत काळजी घेणे. **डोळ्यांच्या वाती करणे**–डोळे ताणणे, डोळ्यांनी जास्त काम करणे. **डोळयांत अंजन घालणे**–कान-उघाडणी करणे; वस्तुस्थितीची जाणीव करून देणे. **डोळ्यांत कुरूप, कुरुंद असणे**– असूया वाटणे; एखाद्याविषयी मत्सरग्रस्त असणे. **डोळ्यांत खुपणे, सलणे**–१.डोळ्यांस वेदना होणे. २.मत्सरग्रस्त होणे(दुसऱ्याचे गुण, धन इ. पाहून). (व.) **डोळ्यांत गंगाजमना येणे, डोळे भरून येणे**–रडू येणे. **डोळ्यांत जहर उतरणे, डोळ्यात सलणे, खुपणे**–दुसऱ्याचे वैभव इ. पाहून हेवा वाटणे. **डोळ्यांत जाळ पेटणे**–संतापाने डोळे लाल होणे. **डोळ्यांत जीव गोळा होणे**– व्याकुळ होणे. **डोळ्यांत तेल घालून जपणे**–अतिशय काळजी घेणे; जपणे; लक्ष देणे. **डोळ्यांत तेल घालून पाहणे**–फार बारकाईने पाहणे; सूक्ष्म नजरेने पाहणे; पाळत ठेवणे; बारीक चौकशी करणे. **डोळ्यांत धूळ, माती घालणे, फेकणे**– फसविणे; नजरबंद करणे. **डोळ्यांत पाणी असणे**–लाज वाटणे; विनय, मर्यादा असणे. **डोळ्यांत प्राण ठेवणे**–मरणापूर्वी एखाद्या गोष्टीची इच्छा ठेवणे. **डोळ्यांत प्राण येणे, उरणे**– १. मरणाच्या द्वारी असणे. २. इच्छित वस्तू (माणूस इ.) पाहण्या-मिळण्या-भेटण्याकरिताच केवळ प्राण गुंतलेला असणे. **डोळ्यांत बोट घातले तरी न दिसणे**– अतिशय निबिड काळोख असणे. **डोळ्यांत भरणे**– १.दृष्टीला आनंद, संतोष देणे. २.पटणे; मान्य होणे. **डोळ्यांत माती पडणे**– मत्सर वाटणे; द्वेष करणे. **डोळ्यांत मावणे, सामावणे**–डोळ्यांनी खाल्ला जाणे; रागाने पाहण्याने घाबरून जाणे. (नकारार्थी वाक्यांत उपयोग करतात.). **डोळ्यात वात घालून बसणे**–वाट पाहणे. **डोळ्यांत सळई फिरविणे**– डोळे काढणे. **डोळ्यांत हराम उतरणे**– एखाद्याच्या दृष्टीने वाईट असणे. **डोळ्यांतील काजळ चोरणे**– पाहता पाहता चोरी करणे. **डोळ्यांतून उतरविणे**–अपमान करणे. **डोळ्यांतून गंगायमुना वाहणे**–रडू येणे. **डोळ्यांतून ठिणग्या गाळणे**–रागाने डोळे लाल होणे. **डोळ्यांतून पाणी काढणे**–रडणे; अश्रू गाळणे. **डोळ्यांनी दिवस उगवणे**–रात्रभर झोप न येणे. **डोळ्यांनी मारणे**–प्रेमकटाक्षांनी प्रहार करणे; प्रेमकटाक्ष टाकणे. **डोळ्यांनी रात्रदिवस काढणे**–एकसारखे जागत बसून रात्र-दिवस घालविणे. **डोळ्यांनी भुई दिसेनाशी होणे**–उन्मत्त होणे (संपत्ती इ.ने). **डोळ्यांपुढे काजवे चमकणे**– भोवळ येण्याची भावना होणे; घेरी येणे; भीतीने डोळ्यांपुढे अंधारी येणे. **डोळ्यांवर कातडे ओढणे**–१.एखाद्या गोष्टीकडे दुर्लक्ष करणे. २.बेदरकारपणे, बेफामपणे वागणे. **डोळ्यांवर धूर येणे, धुराने डोळे भरणे, डोळ्यांवर पडळ येणे, चढणे, डोळ्यावर मांद येणे, चढणे**–गर्वाने अंध होणे; गर्वाने कोणास न जुमानणे. **डोळ्यांवर येणे**– १.डोळ्यांत सलणे. २.(कीर्ती, पैसा यांनी) पूर्णपणे फुगून जाणे; धुंद होणे. **डोळ्यांस पाटा, पट्टा बांधणे**–डोळे मिटणे; कानाडोळा करणे; न पाहिल्यासारखे करणे. **डोळ्यांस पाणी लावणे**–१.नेत्राचमन करणे; एखाद्या धार्मिक विधीच्या आरंभी स्नानाऐवजी उदकस्पर्श करणे. २.

अनुकूल करून घेणे; संतोषविणे :'आतांशा उगेच बाबाच्या डोळ्यांस पाणी लावण्यासाठी इकडे येते.'-रत्नकांता ३.३. **(डाव्या) डोळ्याने पाहणे**-१. तिरस्काराने पाहणे :'डाव्या डोळ्यानें तुमच्याकडे पाह्याचेसुद्धां नाहींत.'-झांमू ६१.२.चोरून, वाकड्या नजरेने पाहणे. **(दोहो)डोळ्यांची मुर्वत राखणे**-एखाद्याकडे पाहायला, नजर भिडवायला भिणे, घाबरणे, कचरणे. **(दुसऱ्याच्या)डोळ्यात बोट टपकन जाणे, शिरणे**- दुसऱ्याचे दोष चटकन कळणे. **(रुप्याचे)डोळे होणे**- डोळे पांढरे होणे; मरणोन्मुख होणे. **(वाकड्या)डोळ्याने पाहणे**-कानाडोळा करून पाहणे; भीतभीत पण उत्कट इच्छेने पाहणे. **डोळ्यावर कोक्या वाढणे**-१. डोळ्यावर पडदे येणे, न दिसणे २. माज येणे : 'ते मिळताच दाल्याच्या डोळ्यावर कोक्याच वाढल्या.'-चिताक १०.

**डोळाफोडी** पु. १. एका पक्ष्याचे नाव. २. मोठ्या जातीचा टोळ.

**डोळुला** पु. (लडिवाळपणे) डोळा :'वाटुली पाहतां सिणले डोळुले। दाविसी पाउलें कैं वो डोळा ।'- तुगा ८२९.

**डोळू** पु. छिद्र; भोक; भगदाड.

**डोळूक** पु. १. साप, मासा इ.चे डोके. २. पहा : **डोळू**

**डोळेउजेडी** क्रिवि. १.दिवसाउजेडी; अंधार पडण्याच्या पूर्वी; उजेडासरशी. २. स्पष्टपणे; तोंडावर; आडपडदा न ठेवता.

**डोळेझाक-की** स्त्री. मुद्दाम दुर्लक्ष; कानाडोळा; हयगय; उपेक्षा.

**डोळेझाकणी** स्त्री. पु. एक खेळ.

**डोळेफोड** वि. १.डोळ्यांना हिडीस दिसणारी, ओंगळ (वस्तू).२. डोळ्यांत भरणारी पण निरुपयोगी; सुंदर पण टाकाऊ.३. डोळ्यांस त्रास देणारे (काम). स्त्री. बारीक पाहणी; तीक्ष्ण नजर.

**डोळेभर** वि. मनमुराद; समाधान, तृप्ती होईपर्यंत :'उत्तरेकडील बाजूने डोळेभर पाहून घेतल्यानंतर..... आम्ही पूर्वेकडे गेलो.'- जीली ६८.

**डोळेभेट** स्त्री.१.शेवटची भेट (मरणोन्मुख व्यक्तीची);नुसते एकदा शेवटचे डोळ्यांनी पाहणे. २.ओझरती, उभ्या उभ्या भेट; घाईची भेट.३. नजरानजर; दृष्टीला पडणे : 'डोळेभेट तरी दुरून देत जा, नको करूं हयगय।'- होला १५१.

**डोळेमिचका-क्या** वि. डोळे मिचकवणारा; पिचपिच्या डोळ्यांचा.

**डोळेमोडणी** वि.डोळे मोडणारी(मूढ होऊन); डोळे फिरवणारी (व्यक्ती):'चौघी डोळेमोडण्या।लाजोनियां तटस्थ।'-हरिवि ३.५.

**डोळेलासू** वि. डोळ्यात अंजन घालणारा; वठणीवर आणणारा : 'साभिमानिआ देवां डोळेलासु ।'- शिव १५६.

**डोळो** सक्रि. डोलवा : 'आवो डोळो डोळो : म्हणौनि कटके मांडिली :'- गोप्रच २३.

**डोळ्याचा तारा** डोळ्यातील बाहुली.

**डोळ्याचा दाब** डोळ्याने घातलेली भीती ; नजरेची जरब.

**डोळ्याची जीभ** पापण्यांच्या आतील बाजूस अस्तराप्रमाणे असणारी त्वचा.

**डोळ्यांमागे-डोळ्यांपरभारे** क्रिवि. पाठीमागे; गैरहजेरीत; अप्रत्यक्ष.

**डों** न. तेल काढण्याचे नारळाच्या करवंटीचे पात्र; डवला : 'तेथचि डों आणुनि देणे.'- ऋ १२२.

**डोंग-गा** स्त्री.एक प्रकारची नाव; लाकडी सोट किंवा तक्ते घालून बांधलेला तराफा : 'नदींत येऊन तेथून दीडकोस पाण्याचा डोहो मातबर होता. तेथें डोंग्यात बसून जाऊन भोयाकडून मासे धरविले.'- ऐको.

**डोंगणे** अक्रि. मरायला टेकणे : '...आयला! त्यो आयतवड्याचा म्हातारा किती डोंगलाय;अजून आटपत न्हाई...'-खळाळ ६७.

**डोंगर** पु.१.पृथ्वीवरील खडक, माती यांचा नैसर्गिक उंच भाग; लहान पर्वत; टेकडी; पहाड; घाट; उंचवटा; डगर; कडा; सुळका. २. ढीग; रास; थप्पी; चवड; ढिगारा; गंज; गंजी. ३.(ल.)मेहनतीचे काम; काळजी करण्यासारखा आजार; कर्जाचा बोजा; पाप, गुण, संकट यांचे आधिक्य. ४.(ल.)काजळाचा गोळा, रास(भांड्याच्या बुडावर धरलेली).५.डोंगराळ मुलुखात प्रथम नाचणी पेरलेले शेत.(को.) ६. शुष्क, डोंगराळ प्रदेश; नाचणी, वरी यांसारख्या पिकांच्या उपयोगी जमीन. (को.)[सं. दांग](वा.)० **खणून (पोखरून) उंदीर काढणे**- कष्टाच्या मानाने क्षुल्लक फळ मिळणे.० **माजून राहणे**-डोंगर बळकावून राहणे. **डोंगरावरून उडी टाकणे**-क्षुल्लक गोष्ट करणे; हलकी देणगी देणे.**डोंगरी दिवा लावणे**-(पेंढारी, लुटारू इ.ना भिऊन) डोंगरात जाऊन राहणे, वस्ती करणे, संसार थाटणे. **डोंगरी मोर नाचविणे**- बढाया, थापा मारणे; चाळवण्या दाखविणेः 'आजपावेतो डोंगरी मोर नाचविले, आता अवघड पडले असे जाणून पाटीलबाबांनी आबा चिटणीसास सामोरी पाठविले.'-ऐको ४८८.

**डोंगर ऊस** एका जातीचा ऊस.

**डोंगरकठ(ठा)ड-डा-डी** पु.डोंगरकाठ; किनारा; डोंगराची कड, हद्द, सीमा; डोंगराच्या पायथ्याचा आसपासचा प्रदेश.

**डोंगरकडासी** स्त्री. डोंगर कठडी; डोंगराची बाजू.

**डोंगरकणगट, डोंगरकंगर** पु. डोंगराळ मुलुख; टेकड्या.

**डोंगरकपाट** न.डोंगरातील गुहा :'पालीजवळच डोंगरकपार्टी कोण्डी देवी आहे.'-माजीगा ६.

**डोंगरकरी** वि. डोंगरी; डोंगरात राहणारे : 'डोंगरकरी कोण आहेत... यांची जोराची चवकशी चालू केली.' - अस्पृ ४.

**डोंगरकिनारा** पु. डोंगरकिनारी; डोंगरकठडा.

**डोंगरकोळी** पु. डोंगराळ मुलुखातील एक जात व तीतील व्यक्ती.

**डोंगरखिंडी** स्त्री. खिंडीतील अरुंद मार्ग; घाट.

**डोंगरगणी** पु. खोल व मोठा खड्डा : 'अलीकडील तोंडीं खळ्या भारी दोन डोंगरगण्यासरिख्या...'-भाव ४६.

**डोंगरझाप** स्त्री. डोंगराची छाया, सावली.

**डोंगरत** क्रिवि. उत्तरेस.

**डोंगरदळे** न.जंगल तोडून लागवडीस आणलेली डोंगरावरील जमीन.

**डोंगरपठार** न. डोंगरमाथ्यावरील सपाट प्रदेश.

**डोंगरमिरी** स्त्री. काळी मिरी; मिऱ्यांची एक जात. (राजा.)

**डोंगररान** न. डोंगराळ प्रदेश, मुलुख.

**डोंगरवट-रट-राळ** वि. डोंगरांनी युक्त; डोंगरी; डोंगरासंबंधी; खडकाळ (प्रदेश); उंचसखल; पहाडी; पठारी; पर्वतमय.

**डोंगरसरा-री** स्त्री. डोंगरांची, टेकड्यांची रांग.

**डोंगरी कापड** १. डोंगरी किल्ल्याच्या (मुंबईच्या) मुलुखात पूर्वी विकत असत ते जाडेभरडे कापड. २. (ल.) हलक्या जातीचे व दराचे कापड. [इं. डुंगरी]

**डोंगरे** न. डोंगराळ मुलुखात पिकणारे एक प्रकारचे भात.

**डोंगर्पुळी-ली** स्त्री. डोळ्याला होणारी पुळी; रांजणवाडी. (गो.)

**डोंगशी** स्त्री. खाऱ्या पाण्यातील मासा.

**डोंगळ-ळा** पु. मोठा काळा मुंगळा : 'ओटीवरून डोंगळ्यांची रांग खाली येत होती.'-रथचक्र ११०.

**डोंगळा-ळी** वि. काळी, जाड, मोठी : 'मातोश्री आनंदीबाई यांनी कोंकणी रिवाजाप्रमाणे दोन्ही मनगटांत डोंगळी पोतीचे सर अडकवणे वगैरे गोष्टींत कधीच आळस आणि विसराळूपणा केला नाहीं.'-गणपतराव जोशी ४६.

**डोंगा** वि. वेडावाकडा : 'ऊंख डोंगा । म्हणुनी रस नव्हे डोंगा ।'- चोखा १२५. [क. डोंका]

**डोंगाढकली** वि. निष्काळजी, हयगयी (माणूस, कारभार). (व.)

**डोंगा-गी** स्त्री. लहान होडी; नौका. [हिं.]

**डोंगुल्ली** स्त्री. लहान डोंगर.

**डोंड** पु. धोंडा : 'हे देहदुर्गिचे डोंड ।' - ज्ञा ३.२३७. वि.दांडगाई; पुंडावा: 'डोंडपणें राहिलासे मदनु।' -वच्छह ८७.

**डोंडु** पु. चोर; पुंड : 'मग न करी नागोवा। रसना डोंडु हा।' -भाउगी ३०.

**डोंब-म** पु.एक जातिविशेष व तीतील व्यक्ती. हे रात्री अपरात्री प्रेतदहनाचे काम करतात, त्यावरून त्यांचा धाडसाशी संबंध जोडला जातो. [सं. डुंब]

**डोंब** स्त्री. मोरीच्या सांडपाण्याचा खड्डा; डबके. (राजा.)

**डोंब** पु.१.भयंकर आग; वणवा; धूर; आगीचा लोळ; मोठा जाळ (बहुधा आग शब्दाबरोबर योजतात): 'सावळ्याचं बोलानं फकिराच्या हृदयांत डोंब पेटवला.'ह फकिरा ८२. २.(ल.) उष्णता, दाह, ताप यांची वेदना, लाही; आग; (आगीचे, तिखटपणाचे) आधिक्य, परमावधी दाखवणारे विशेषण; प्रत्यय. आग करण्यासारखा (तिखट पदार्थ). [क. डोंबी](वा.)० **उसळणे** -प्रचंड भूक लागणे. ० **पाजळणे, होणे** -(शरीर) अत्यंत तप्त होणे; अंगाची लाही होणे : 'बोल न निघे तिचें वदनीं। परी हृदयीं डोंब पाजळला।'-नभसा २१.१३६.० **मारणे** -आगीचा लोळ उठणे, पसरणे.

**डोंब अळी** मोठी आळी. (कीटक).

**डोंबकावळा** पु. डोंबाप्रमाणे स्मशानात असणाऱ्या कावळ्याची एक जात.

**डोंब(भ-भा)र, डोंभरगण** न.पु. खड्डा.

**डोंबरणे** न. झाड, वेली यांना नवीन कोंब ज्या ठिकाणी फुटतो ती जागा; कोंब. (व.)

**डोंबरा** पु. आगीचा डोंब; लोळ; आगीचा झोत.

**डोंबरी** स्त्री. खुंट्यावरील लाकूड. (बे.)

**डोंबरी** वि. जाड; मोठ्या पोटाची, अंगाची; गोबरी: 'विचु आणी डोंबरेआ सर्पिणी। फुंकिती कालिया नागिणी ।' - क्रिपु २.३८.२८.

**डोंबल** पु. डोंब (एक जात). [क. दोम्मलु]

**डोंबल-ले** न.१.(निंदार्थी किंवा थट्टेने) डोके; डोकसे. २.सौम्य शिवी : 'चला ! खेळ हे मांडले डोंबलाचे ।'-केक ४९.

**डोंबळा** पु. भोक : 'अंगावरच्या धडुत्याला.... कितीतरी ठिगळे, अनेक डोंबळे...'- एगाएपा १७३.

**डोंबा(भा)री** पु. कोल्हाटी; कसरत करणारी एक जात. [क. डोंब, दोंब]

**डोंबाळा** पु. गाडीच्या धुरेचा दोर आवळ करण्याकरिता साटीपासून जोखडापर्यंत बांधतात ती जाड काठी अगर रीप. (को.)

**डोंबाळा-ळी** पु. वणवा; मोठी आग : 'थेट आगीच्या डोंबाळ्यात घुसायचे.'- माजीगा.

**डोंबी** स्त्री. १. हट्टाने, चिकाटीने झटणे; अडथळ्याला न जुमानता पुढे रेटणे; आपले घोडे पुढे दामटणे. (क्रि. देणे, करणे, मारणे, लावणे इ.); पाय रोवून राहणे : 'त्येच्या संगट तीन सालं डोंबी दिली तिनं...' - खळाळ ७६. २. जिकिरीची व त्रासदायक याचना, तगादा, कटकट. (क्रि. करणे, घालणे, घेणे.). (राजा.)

**डोंबे** न. (ज्यात खोबरे तयार झालेले नाही असा) गळून पडलेला कोवळा नारळ.

**डोंब्या** वि.१. चिकाटीचा; पुढे रेटणारा; झटणारा.२. तगादा लावणारा; डोकेफोडू; लोचट; कटकट्या.

**डोंब्या** पु. मासे पकडण्याचे लहान जाळे. (कु.)

**डोंब्या(बा )नाग-सर्प-साप** पु. मोठा, काळा नाग-साप; अत्यंत विषारी असणारी सापाची एक जात. [सं. डुंडुम]

**डॉक्टर** पु.१. रोगावर उपचार करणारा; वैद्य. २. कोणत्याही ज्ञानशाखेची संशोधनविषयक पदवी असणारा.

**डॉजबॉल** पु. एक मैदानी, दोन गटांत 'व्हॉलीबॉल'ने खेळला जाणारा पण 'नेट'(जाळे) न लागणारा व आखलेल्या वर्तुळात खेळावयाचा खेळ.

**डॉट कॉम**(संगणक) एखाद्या व्यक्तीने, कंपनीने इ. त्यांच्याशी संपर्क साधण्यासाठी दिलेला 'इंटरनेट'वरील पत्ता.

**डॉल्फिन** पु. मोठ्या आकाराचा, बाकदार शरीराचा, गोड्या व खाऱ्या पाण्यात आढळणारा, माणसाळणारा एक सस्तन मासा. [इं.]

**डॉल्बी** स्त्री. ध्वनिमुद्रण करताना अनावश्यक आवाज शक्य तेवढे वगळून इष्ट तेवढाच ध्वनी मुद्रित करून तो ऐकवण्याची सोय असलेली पद्धत.

**डौ** पु. पहा : **डव**

**डौक-ख** स्त्री. पहा : **डवक**

**डौकणे** अक्रि.१.डोळे वटारणे; मगरुरीच्या, धाकाच्या नजरेने पाहणे. २. क्षुब्ध होऊन, आवेगाने पाहणे (घोड्याने घोडीकडे).[सं. ढौक्]

**डौ(डौं)ख** पु. वैर; मत्सर; दावा; हेवा. (क्रि. धरणे, राखणे.). पहा : **डंख २** [सं. दंश्]

**डौचणी** स्त्री. टोचणी.

**डौ(डौं)चणे** उक्रि. पहा : **डवचणे**

**डौर** पु.१. पहा : **डमरू** : 'याजसाठी डौर म्यां धरियेलें हातीं । तुका म्हणे तुम्ही गांठी सोडायाची खंती ।'- तुगा २९४. २. लहान मुलांचे खुळखुळा इ. खेळणे. ३. गलबतावर नांगर वगैरे ओढून घ्यायचे यंत्र; गलबत किनाऱ्यावर ओढण्याचे यंत्र; डेकरी; हात. ४. डमरूच्या आकाराची कळाशी; दोन लाकडे अथवा फरशीचे दोन दगड एकत्र

जोडण्याकरिता केलेला लोखंडाचा आकडा.

**डौर** पु. झगा; लांब अंगरखा : 'केली विजार वरि डौरहि मौन सेवि ।'– रकाव्य १०. [सं.डमरू]

**डौर** पु. डंका; नगारा; प्रसिद्धी; डौल.

**डौर** पु. हेटाळणी; उपहास : 'ते आइकोनि डौर वाहे । विद्वांसु जो।' – ज्ञा १३.८२५.

**डौरकार** वि. डौर वाजविणारा : 'या पहिलिया पाहान्यांत । डौलकार सांगेल मात ।' – मला २३०.

**डौरण** न. कोळपणे. पहा : **डवरणे**

**डौरणे** अक्रि. कोळपणे (डौऱ्याने). पहा : **डवरणे**

**डौरणे** अक्रि. शोभणे; सजणे; डौलदार दिसणे (वस्त्रालंकार, बहर, फुले इ. नी). पहा : **डवरणे** २: 'डौरली हे काया कृपेच्या वोरसें । नव्हे अनारिसें उद्धरलों।'–तुगा २१७९. [अर. डौल]

**डौरी, डौरीगोसावी** पहा : **डवरी गोसावी**

**डौरी, डौरा–ऱ्या जोशी** पहा : **डाकुता, डाकोता**

**डौल** पु. १. आकार; आकृती; ढब; घाट; बाह्याकृती. २. तऱ्हा; हातोटी; पद्धत; चाल (भाषण इ.ची). ३. मांडणी; घटाव; खुणा; चिन्हे. (क्रि. घालणे, मारणे.). [अर. डौल]

**डौल** पु.१.अभिमान; बढाई; ऐट; शान; भपका; तोरा; थाटमाट; नखरा; दिमाख; झोक;. २. पोकळ आव; डामडौल; दिखाऊपणा; पवित्रा; आविर्भाव. (क्रि. मिरवणे, दाखवणे.).

**डौल** पु.१.दौलत : 'तुमच्या कुलडौलाची दिवाणगिरी ।'– थोमारो १.१४६. २. मानमान्यता; प्रतिष्ठा. [अर. डौल=प्रतिष्ठा]

**डौल** पु. ज्याला पत्र, कारनामा इ. पाठवायचे आहे त्याचे नाव लिहिण्यासाठी जागा मोकळी सोडलेला कागद.(वा.)० **बांधणे**–कारस्थान शिजविणे.

**डौल** पु. हुलकावणी; आव : 'तेव्हापासून नानांनी राक्षसी कपट डौल दाखविले ।'– ऐपो ३९५.

**डौल** पु. योजना; कार्य; कृती; घटना :'याप्रमाणे सिबंदी असल्याविना चोराचे पारिपत्य होऊन लावणीचे डौल होत नाही.'–पेद २९.१०१. [अर. डौल]

**डौल** पु. सातारच्या छत्रपतींच्या खासगीकडे नेमून दिलेली नेमणूक.

**डौल** पु. १. सही–शिक्क्याचा कोरा कागद; छत्रपतींच्या नावाचा अधिकृत कोरा कागद. तो ज्याला दिलेला असेल त्याने त्यात तहाची कलमे किंवा इतर कामाची कलमे लिहायची. २. एकूण महसुलाचे अंदाजपत्रक.

**डौलदार** वि.चांगल्या घाटाचा; आकृतीचा; सुंदर; सुबक; मोहक; ढबदार; ठसकेबाज; सुडौल; ऐटबाज; टुमदार; प्रमाणबद्ध; कळाशीदार.

**डौलाचा कारभार** सातारकर छत्रपतींच्या खासगीकडे तोडून दिलेल्या मुलखाचा किंवा जहागिरीचा कारभार.

**डौलामिया** पु. डौली, शेखी मिरवणारा, बढाईखोर माणूस; ऐट करणारा, दिमाख दाखविणारा, अवडंबर माजवणारा माणूस.

**डौली** वि. डौलदार; ऐटबाज; बढाईखोर; छानछोकीचा.

**डौळ** न.१.भरून द्यावयाचा नमुना; सही–शिक्का केलेला कोरा कागद. २. लिखाणात सुटलेली जागा (सही करणाऱ्याने भरावयाची). ३. वसुलाचा अंदाज, अजमास. [अर. डौल]

**डौंड** स्त्री. धोंड : 'घेतलिया अहंभावाचिया डौंडी । ते मदमीनाचां तोंडी । सगळे चि गेले ।' – राज्ञा ७.८१.

**डौंड–डी** दवंडी; डांगोरा : 'तंव डौंडीची वीरघंटा । सनसनितीं जेंगटां ।' – शिव ५२२.

**डौंडि** स्त्री. डोक्याला गुंडाळण्याचे वस्त्र; फेटा; मुंडासे : 'डौंडि माथां तेयावरि पासवडी पांगुरले :' – लीचपू ४३९.

**डौंडिचे** न. नगारा;डिंडिमः 'विरिश्रियेचें डौंडिचें बाजे।'–शिव ३५७. [सं.डिंडिम]

**ड्यु(ड्यू)टी** स्त्री.१. जकात : 'ड्यूटी चुकवून बेचतात ना साले माल...'– माखा ९७. २. नेमून दिलेले काम; कर्तव्य : 'आपली ड्युटी कराया तो आयलो.'– इंधन १४४. [इं.]

**ड्रम** पु. १.पोकळ, चक्राकार पत्र्यावर कातडे ताणून बसवून तयार केलेले पाश्चात्त्य तालवाद्य; पडघम.२. लोखंडी किंवा पत्र्याचे पीप; बॅरल.[इं.]

**ड्राफ्ट** पु. १. पत्र, ठराव इ. संमत होण्यापूर्वीचे त्यांचे स्वरूप; मसुदा : '....जो नवा लेखनिकांचा वर्ग तयार झाला तो... फर्डे ड्राफ्ट लिहिण्यात धन्यता मानू लागला.'–भाअंव्य १६.२. हुंडी; धनाकर्ष. [इं.]

**ड्रायव्हर** पु. वाहनचालक. [इं.]

**ड्रिल** स्त्री. १. सामूहिक व्यायाम; कवाईत; कसरत. २. तिरके आटे असलेले भोक पाडायचे साधन; गिरमिट. (क्रि. करणे, मारणे.). [इं.]

**ड्रेनेज** न. १. पाण्याचा निचरा करण्याची पद्धत. २. घाण, सांडपाणी, मलमूत्र इ. वाहून नेण्याची व्यवस्था, नाली; गटार. [इं.]

**ड्रेसर** पु. (दवाखान्यात) रोग्यांचे व्रण धुऊन मलम लावून पट्टी बांधणारा परिचारक.

**ड्रेसिंग** न. १.जखम स्वच्छ करून परत मलमपट्टी करणे : 'रोज सकाळी ड्रेसिंगला त्यांच्याकडे मी जायचो.'– एल्गार ८६. २. सजावट.[इं.]

**ड्रॉवर** पु. टेबलाचा खण. [इं.]





**ढ** मराठी वर्णमालेतील एकोणतिसावे अक्षर आणि चौदावे व्यंजन.

**ढ** वि. १. अशिक्षित; अज्ञानी; अक्षरशत्रू. २. मठ्ठ; मूर्ख; व्यवहारचातुर्य नसलेला.

**ढई** स्त्री. १. जोराचा व नेटाचा प्रयत्न; त्रास घेणे; नेट; अवसान. २. काळजीपूर्वक लक्ष देणे. ३. (पै-पाहुण्यांनी) पुष्कळ दिवस ठिय्या देणे; लोचटपणाने चिकटून राहणे. (क्रि. देणे). ४. बुडी. (क्रि. देणे, मारणे.) (व.)

**ढऊर** स्त्री. भाताचे एक वाण, प्रकार. (झाडी)

**ढक** पु. १. एकदम आवाज होऊन ढासळणारा भाग (इमारत, नदीतीर, टेकडी इ.चा).२.अशा ढासळण्यामुळे पडलेला ढीग.

**ढक(ग)ढक-ग-गा** क्रिवि. १. डळमळत; इकडेतिकडे हलत (खांब, इमारत इ.).२.झुलत; खालीवर होत; झोक जात (चालताना, उंटावर बसले असता).३. डुलत; डुलकी घेत; उघडझाक करीत. [ध्व.]

**ढकढक** क्रिवि. गटगट (क्रि. पिणे).

**ढकल** स्त्री.१.निष्काळजीपणाने, कसेतरी, वरवर केलेले काम; चालढकलीचे काम.२.एखादे काम लांबणीवर, दिरंगाईवर टाकणे; आज उद्या असे करीत लांबवणे. ३. आग्रह; बळजबरी; ढकलणे : 'ढकल करून कैसे धाडले द्वारकेसी ।'-सारुह ७.२५.

**ढकलगाडा** पु. खेळगाडी; खेळातली गाडी. (झाडी)

**ढकलगाडी** स्त्री.१. लोटत, ढकलत न्यावयाची, चाके असलेली गाडी.२.(ल.) प्रपंच;आयुष्य; नोकरी.

**ढकलगुजर, ढकलगुजर(रा)ण, ढकलगुजारा-री** पु.स्त्री. १. कसातरी उदरनिर्वाह करणे (संकटात, अडचणीत); दिवस कंठणे. २. चालढकल.

**ढकलचंद, ढकलनंद, ढकलपंच्यांशी, ढकलापा, ढकल्या** वि. १.निष्काळजी; बेजबाबदारीने काम करणारा; घाईने कसेतरी काम उरकणारा; ढकलपट्टी करण्याचा स्वभाव आहे असा. २. आपले काम दुसऱ्यावर टाकणारा; कामचुकार.

**ढकलणी** स्त्री.१.गाडी ओढताना बैल मागे सरकू नये म्हणून बांधला जाणारा आडवा वेळू; ढकली. (कर.) २. रेटा : 'परिस्थितीच्या ढकलणीसरसा कर्जत सोडून...' - भाजीपाला ३२२.

**ढकलणे** सक्रि.१.(पुढे, दूर, बाजूला) रेटणे; सारणे; लोटणे. २.(ल.) घाईने, निष्काळजीपणाने धाडणे; उरकणे; चालढकल करणे (काम, धंदा यांची).३. कसेतरी दिवस काढणे; काळ कंठणे. ४. एखादा पदार्थ दुसऱ्या पदार्थात घुसडून देणे.५. अधिकारावरून काढणे. ६. (करायचे काम) एकमेकांवर लोटणे; टोलवाटोलवी करणे; कोलणे. [सं. ढौक]

**ढकलणे** अक्रि.१.वाळणे; खंगणे (शरीर). २. खलास होणे; (प्लेग, मरी इ.) रोगाने मरणे. ३. कोसळणे; ढासळणे (इमारत, रास).

**ढकलपट्टी** स्त्री. १. (दिवस, महिने, वर्ष, काल) घालवणे; रेटणे; (संकटात, हालअपेष्टांत) दिवस कंठणे.२. दुसऱ्यावर काम ढकलणे; चुकवाचुकवी; टोलवाटोलवी. ३. आजचे काम उद्यावर टाकणे; लांबवणी; चालढकल.

**ढकलपंचविशी** स्त्री. आपले काम दुसऱ्यावर लोटणे, टोलविणे; चुकवाचुकवी (कामाची).

**ढकलपंच्यायशी** स्त्री. उधळपट्टी; रेलचेल; सढळपणा (खर्चाचा, बोलण्या-चालण्याचा, कामाचा).

**ढकलपास** पु.वरच्या वर्गात चढवणे : 'सातवीत ढकलपास झालो.' - एस्पृडा ११.

**ढकलाढकल-ली** स्त्री. १. धक्काबुक्की; रेटारेटी. २. पहा : **ढकलपट्टी**

**ढकली** स्त्री.१.उतरणीच्या रस्त्यावर बैलांच्या पायाला, शेपटीला चाक घसटू नये, त्यांचे शेण गाडीला लागू नये म्हणून पुढच्या करलीबरोबर दांड्यांना बांधलेले आडवे लाकूड; ढकल.२. चाकांना अडवून धरणारे लाकूड.

**ढकशी** स्त्री. समुद्रकाठचा धक्का; ज्यावर लाटा आपटतात ती काठाची भिंत; उंच कडा. (को.)

**ढका** पु.१.धक्का; जोराचा हिसका; हिसडा : 'जो पुढिलाचे ढक्यांनी पडे । तो त्यावरी कोपे वाडे ।'-एभा २३.७८०.२.(ल.) दुर्दैवाचा, तापदायक सत्तेचा तडाखा. ३. नुकसान; इजा; नाश; अपकर्ष; ऱ्हास. (क्रि. लागणे). [सं. धक्क्]

**ढकाडणे** उक्रि. हाकलणे. (कर्ना.)

**ढकाढक-का** क्रिवि. १. जोराने डोलत, झुकत, हेलकावे खात. २. डुलकी घेत.

**ढकाढका** क्रिवि. ढसाढसा : 'तेव्हाच साहेब पहिल्यांदा अशी ढकाढका दारू प्यायले होत.' - साहेब ४०९.

**ढका(गा)र** वि. एक हजार : 'सेलू, पोकू आणि ढकार । आवारू सांगती सत्वर ।' - भवि ४२.४६. (नंदभाषा)

**ढकेल** स्त्री. परस्परांस मागे ढकलण्याचा व्यायामाचा एक प्रकार.

**ढक्कळणे** अक्रि. थकणे. (माण.)

**ढक्का** पु. स्त्री. नगारा; मोठी नौबत; डमरू : 'ढक्काशूल कपाल सायक करी हांसोनि रोषोत्करी ।' - आमा ४७. [सं.]

**ढक्कू** अव. पु. आंबट, पातळ वरण. (माळवी) [गु.]

**ढग** पु. मेघ; अभ्र; समुद्राच्या पाण्याचे, पृथ्वीवरील जलसाठ्यांचे उन्हामुळे बाष्पीभवन होऊन मोठ्या प्रमाणात आकाशात एकत्रित झालेले बाष्प. यापासून पाऊस पडतो.

**ढग** पु. ढीग; गंजी. (झाडी)

**ढग** स्त्री. पाऊल; पद. (क्रि. टाकणे). [हिं. डग]

**ढग** स्त्री.उंच जागा; टेकाड : 'सिंह नारायणा उत्तरे ढगु।'-स्थापो ६२.

**ढगढग** स्त्री.१.उघड रीतीने केलेली निंदा; बेअब्रू; बदनामी; फजिती; एखाद्याला दिवाळ्या,लबाड, लुच्चा इ. दूषणे देऊन त्याच्या नावाचा केलेला बोभाटा.(व.). २. दगदग; चिंता; काळजी : 'अलिकडे आमच्या कपाळास हे ढगढग आले.'-ऐको.

**ढगढगणे** अक्रि. १. हलणे. २. पाझर फुटणे. [सं. स्थग]

**ढगल्या** पु. आपली मुलगी ज्याला द्यायची तो आधीच घरात आणून ठेवलेला माणूस; राबत्या. (चंद्रपुरी)

**ढगळ** स्त्री. डहाळी; फांदी : 'झाडाच्या लहानशा ढगळीप्रमाणें ती झपाट्यानें खालीं वाहत जाऊं लागली.' - किर्लोस्कर, मार्च १९४३, ४३६.

**ढगळ** स्त्री. १. (खरबूज, भोपळा, कोहळा इ.) नासल्यामुळे झालेला आतील बिलबिलीत भाग; खराब गर. २. पातळ ढाळ; हगवण; आमांश; अतिसार. (क्रि. लागणे).

**ढगळ** वि.१.सैल; मोठे :'कपडे त्याला ढगळ वाटत होते.'- तूंमांतूमो ११. २. मोठ्या आकाराचे (बी, दाणे, मोती इ.); ढोबळ; स्थूल.३. ढेकळे असलेली; नांगरलेली (जमीन).

**ढगळ** वि. उधळ्या.

**ढगळ** वि. उंच; लांब टांग्या. पहा : **ढांगळ**

**ढगळणे**अक्रि. १. कुजणे; नासून जाणे; आतील गराचे पाणी होणे; ढगळ होणे (भोपळा इ.).२.पातळ रेच, ढाळ होणे; हगवण लागणे.३. शरीर थलथलीत होणे (वात इ. विकृतीमुळे). [सं.]

**ढगळसर** वि. मोठ्या आकाराचे; स्थूल : 'पिलांपैकी जे ढगळसर होते ते पटकन घेत...' - डाली १०९.

**ढगळा** पु. फांदी; मोठी डहाळी. (राजा.) पहा : **डगळा**

**ढगाड-र, ढकार** न. मोठा काळा ढग. (को.)

**ढगापेल** वि. विपुल. (झाडी)

**ढगाळ** वि. ढगांनी व्याप्त; ढगांनी आच्छादलेले (आभाळ, हवा).

**ढगाल** न. खेळण्याची मोठी गोटी. (कु.)

**ढगाळणे** अक्रि. १. भरून येणे. २. (ल.) उदास होणे : 'स्त्रीमन दुखावल्यासारखं झालं. ढगाळलं.' - किरि ५२.

**ढगोजी** पु. महार जातीचा गुरु.

**ढजगणा** वि. वयाने मोठा : 'मग मी एवढा ढजगणा होऊन मला कापता येऊ नये ?' - आआशे २७१.

**ढड्ढा** पु. मोठा पतंग. (ना.)

**ढण(णा)ढण-णा** क्रिवि. १. खणखण. पहा : **ठणठण**. २. मोठा जाळ, दिवा यांच्या जळण्याचे काल्पनिक आवाजात अनुकरण; मोठा प्रकाश होईल असे (दिव्याने जळणे); ढळढळ. [ध्व.]

**ढणढणणे** सक्रि. १. ठणठण वाजणे, आवाज करणे; खणखणणे; झणझणणे. २. ढळढळ, एकसारखे जळणे (दिवा) : 'कंदील तेवढा ढणढणत राहायचा.' - इंधन २०.

**ढणढणीत** वि. मोठा; ढळढळीत जळणारा (दिवा); जोराने पेटणारा (अग्नी, जाळ).

**ढणढणा** पु. (थट्टेने) मूर्ख, अक्षरशत्रू पुरुष; ढ माणूस.

**ढनक्या** वि. मोठा (जाळ).

**ढपल** पु. घोड्याच्या डोक्यावरील वाटोळा टिळा. हा मोठा असल्यास शुभ चिन्ह मानतात. - अश्वप १.१०४.

**ढपला-ली** पु. स्त्री. १. धलपा; तुकडा; ढेपसा; ढलपा (दगड, गिलावा, लाकूड, गुळाची ढेप इ.चा). ढपली हे ढपला याचे लघुत्वदर्शक रूप आहे. २. खपली; आवरण; वरील आच्छादन.

**ढपळ** वि. अतिशय मोठा. पहा : **ढबळ**

**ढप(प्प)ळ** न. पातळ भाजी, आमटी. [कं.]

**ढप(प्प)ळवणी** न.१. बाजवीपेक्षा जास्त पाणी घालून पातळ केलेले ताक; पाणचट, बेचव कढी, आमटी इ. २. घाण पाणी. ३. गरगट.

**ढपळशाई** स्त्री.१.चंगळ; वैपुल्य; उधळपट्टीची राहणी. २.गोंधळ; घोटाळा; अव्यवस्था; गडबड. [क.]

वि. १.विपुल; फाजील; अवाचे सवा. २. अव्यवस्थित (कारभार).

**ढपेला** पु. नगारा; नौबत. पहा :**डफ** : 'फिरला मोंगलाचा ढपेला।' - ऐपो २२५. [हिं.]

**ढब** स्त्री.१. मोठेपणा; ऐट; डौल; भपका; दिमाख (विशेषतः क्षुद्र, लहान गोष्टींचा).२.वागण्याची रीत; चालचलणूक; विशिष्ट ठेवण; पद्धती; मार्ग; तऱ्हा. ३.मोठेपणा; महत्त्व; थोरवी (गर्वामुळे स्वतःबद्दल वाटणारी).(क्रि. सांगणे, लावणे, मिरवणे, दाखवणे.). [हिं., सं. दह, दिह]

**ढबक** न. (भिंत वगैरे) वरून पडलेला गोळा, पदार्थ, ढेकूळ. पहा : **धबक** [ध्व.]

**ढबक-का** न.पु. मोठा तुकडा; फाक(भोपळा, टरबूज इ. ची); गुळाचा खडा.

**ढबकन-कर-दिनी-दिशी** क्रिवि. ढब असा आवाज होऊन.

**ढबढब** स्त्री. अव्यवस्था; दुर्दशा; गोंधळ.

**ढबढब-बा** क्रिवि. १. नगारा वगैरेच्या आवाजासारखा आवाज होऊन, डबडब. २. (विशेषतः) फुटलेल्या, सैल झालेल्या नगाऱ्याच्या बदबद आवाजाप्रमाणे ध्वनी होऊन. [ध्व.,हिं.]

**ढब(प)दार** वि. १. टप्पोरा; सुरेख; घोसदार; झोकदार; डौलदार (मोती, अलंकार). २.भपकेबाज; दिखाऊ; डोळ्यांत भरणारी (कमी किमतीची, हलकी वस्तू). [हिं.]

**ढबर** वि. ढेरपोटे; जाड : 'अंथरूण केलं पांघरूण केलं ढबर कारट कुठं गेलं.' - एहोरा १००.

**ढबस** वि. ढबू; मोठे; डेरेदार आकाराचे (पागोटे).

**ढब(ब्ब)ळ, ढबळशाई** वि.१. फार मोठा; अवजड; बेडौल; विशाल; प्रचंड (माणूस, जनावर, वस्तू). २. अफाट; अवाढव्य; फार पसाऱ्याचा (कारखाना, कामधंदा); अस्ताव्यस्त; अव्यवस्थित.

**ढबाखोर** वि. घमेंडखोर; गर्विष्ठ; चढेल : 'हीं आधीच कोलापुरे ढबाखोर.' - ऐपो २. १९८.

**ढबाल** पु. फुलाचा एक प्रकार; डेलिया; ढिलेरी. [इं. डेहेलिया]

**ढबालगी** वि. दांडगी (म्हैस).

**ढबाल्या** वि. सैल; बेढब. (झाडी)

**ढबुला** वि. लठ्ठ व ठेंगणा; बसका; वाटोळा; थबकड(मनुष्य, भांडे, घर). [फा.]

**ढबू-ब्बू, ढब्बूक** पु. एक जुने, तांब्याचे नाणे (किंमत दोन पैसे); दोन शिवराई किमतीचा पैसा. [क. डब्बु]

वि.१.(ल.) लठ्ठ; धष्टपुष्ट; अगडबंब. २.मठ्ठ डोक्याचा.(ना.)[हिं.]

**ढब्बकन-कर-दिनी-दिशी** क्रिवि. भिंत पडली असता, जड वस्तू पाण्यात पडली असता होणाऱ्या आवाजासारखा आवाज होऊन. पहा : **धाडकन** [ध्व.]

**ढब्बा** पु. डाग; धब्बा : 'ठशात शाईचा ढब्बा येतो.' – गुमा ८०.

**ढब्बी, ढबेली** वि. जाडी; गबदुल; दांडगी.

**ढब्ब्या** पु. मोठ्या पोटाचा मनुष्य. [क. डुब्ब]

**ढम–म्म** वि.१.अतिशय आळशी; जड; मठ्ठ (मनुष्य). २. स्तब्ध.

**ढम, ढमका** १.मोठ्याने वायू सरणे; पाद.२.पादण्याचा आवाज.[ध्व.]

**ढमका** वि. कोणीएक; अमुक; अमका (माणूस).

**ढमकारा** पु. गाजावाजा. (व.)

**ढमके, ढ(ढु)मढ(ढु)मे** न. मुलांनी वाजवायचे एक चर्मवाद्य; टिमकी. [ध्व.]

**ढमक्या** वि. १. नपुंसक; षंढ. २. बायल्या; कर्तृत्वशून्य. (व.)

**ढम(मा)ढम–मा, ढुमढुम** क्रिवि. १. नगारा, नौबत इ. वाद्यांच्या ध्वनीसारखा ध्वनी होऊन (क्रि. वाजणे). २. वायू सरण्याच्या आवाजाचे अनुकरण. [ध्व.]

**ढमढमणे** अक्रि. (चर्मवाद्य) ढमढम वाजणे. [ध्व.]

**ढमढेऱ्या** वि. ढेरपोट्या; पोटाचा नगारा असलेला.

**ढमणे** न. पत्र्याचा दिवा; चिमणी.

**ढम(म्म)भोपळा** पु. शून्य (परीक्षेत गुण). (क्रि. असणे).

**ढमाई** स्त्री. पोट सुटलेली, मुलगी, बाई.

**ढमामा** पु. एक वाद्य :'ढोल ढमामे तुरे जाणे । टाळ मृदंग वाजती।' – बबागा ४.६६. [ध्व.]

**ढमाल** न. उलाढाल. (कु.)

**ढमाल–ला–ल्या** वि. (निंदाव्यंजक) फार स्थूल; लठ्ठ; फोपशा; अवजड; जाडजूड; अगडबंब.

**ढमाली** वि. ढालगज; उलाढाल करणारी; उपद्व्यापी.

**ढयकुनी** न. बेचव, पातळ पदार्थ. (व.)

**ढरकन–र, ढरदिनी–शी, ढर(रा)ढर–रा, ढरारा** क्रिवि. वायू सरण्यासारखा आवाज होऊन किंवा करून. [ध्व.]

**ढरंगणे** अक्रि. हागवणे. (व.)

**ढरंगळणे** अक्रि. पातळ शौचास होणे; ढाळ होणे; पोट झडणे. [ध्व.]

**ढर्रा** वि. बेचव. (झाडी) [हिं.]

**ढलणे** अक्रि. वाजणे : 'म्हणौनि संवादाचा सुवाऊॅ ढले।' – राज्ञा९.२८. [सं. ध्रण]

**ढलणे** क्रि. ढळणे; हालणे : 'जैसी तीरीं नाव न ढले ।' – ज्ञा ७.४.

**ढलपा–पी, ढलपट** पु. स्त्री.न. लाकडाचा चपटा तुकडा; तासून निघालेला लाकडाचा भाग. पहा : **ढपला**

**ढलपी कोळसा** (भूशा.) ढलप्यासारखे लांबट तुकडे पडणारा दगडी कोळसा.

**ढलमलणे** अक्रि. हलणे; गदगदणे; डुलणे; डळमळणे. [सं. टल]

**ढलावला** वि. १. पडका. २. आजारी. (झाडी)

**ढव** पु. डोह.

वि. मूर्ख.

**ढवक** न. अर्धा. (को.) [सं. अर्धवत्]

**ढवढव** स्त्री.१. गोंधळ; घोटाळा; अव्यवस्था; बजबजपुरी; हास्यास्पद; स्थिती; दुर्दशा (काम, वस्तू, मनुष्य वगैरेंची). २. पहा : **ढवढववाडा**

**ढवढवणे** अक्रि. १. नासणे; विफल होणे; फिसकटणे; फसणे. (राजा.) २. नाहीसा होणे (अधिकार).

**ढवढववाडा** पु. विटंबना; दुर्लौकिक; धिंडवडे; अप्रतिष्ठा.

**ढवणे** सक्रि. ढवळणे; खंगाळणे; हातांनी हालवणे : 'मी बी पाणी ढवायला लागलो.' – उपरा ४.

**ढवलणे** सक्रि. पांढरा रंग देणे; उजाळा देणे; प्रकाशित होणे : 'भानुचेंनि तेजें ढवललें ।'– ज्ञा १.३९.

**ढवलार** वि. चुनेगच्ची वाडा.

**ढवश–स** न. लहान नगारा.

**ढवसणे** सक्रि. लोटणे; हाताने ढकलणे : 'पुतण्याला हातानं ढवशीत ती बाजूला व्हायला सांगत होती.' – रथ ३२.

**ढवसाऊॅ** न. आहुती; बळी : 'रणदेवता ढवसाऊॅ केलें ।'–शिव ४४९. [सं. ध्वंस्, ध्वसक]

**ढवसे** वि. जोराचे; सोसाट्याचे. (बे.)

**ढवळ–ळी** पु.स्त्री. एक झाड. ह्याच्या देठाच्या पुंग्या, शिंगे करतात.

**ढवळ** पु. उजेड.–तंजा.

**ढवळणा–णे** पु.न. घाटणा; घाटाणा; टोकाला फडके इ. बांधलेली काठी; चाटू (जोंधळ्याच्या लाह्या, पोह्याचे भात भाजण्यासाठी उपयोगी येणारे).

**ढवळणे** उक्रि.१.कालविणे; हलविणे; घाटणे; घोळणे (पातळ पदार्थ, धान्य इ.).२.(ल.)गोंधळ करून सोडणे; विस्कटणे; उलथापालथ करणे.

अक्रि.१. मळमळणे; पोटात कालवणे; ढवळून येणे. २. मायेचा कळवळा येणे; मायेमुळे जीव तुटणे.[सं. धू] (वा.)**ढवळून निघणे** – तळापासून उधसून येणे; उलथापालथ होणे : 'सगळे गाव ढवळून निघावे अशी एक घटना झाली.'– काआ ५१.

**ढवळा** पु. १. बायकांचे गीत, गाणे; उत्सवगीत २. २. लग्नात गायलेले वरविषयक गीत :'मुहूर्ते स्थापी खांबाचा प्रकाशा । ढवळा गाइन सुरेशा।'ह्रस्त्रीगीत ६. [सं. धवल]

**ढवळा** पु.१.गोंधळ; अव्यवस्था; नाश; बिघाड; बोजवारा; विचका; चुथडा(काम, मसलत यांचा).२.(क. शब्दशः) गढूळपणा; चबढब.

**ढवळा** पु. पांढरा रंग.

वि. पांढरा; सफेत. [सं. धवल]

**ढवळाकावळा** पु. कावळ्याच्या आकाराचा पण सफेद रंगाचा व मधुर शब्द करणारा, समुद्राच्या लाटांवर झोके खाणारा पक्षी. – सह्याद्री ४.१९३६.

**ढवळाढवळ** स्त्री. १. हस्तक्षेप; चबढब; ढवळणे; गोंधळ घालणे; व्यवस्था बिघडवणे. २. भानगड; घोटाळा; उलाढाल; दुर्दशा.

**ढवळार** न.वाडा; हवेली; टोलेजंग घर. पहा : **धवलार.** [सं. धवल + अगार]

**ढवळी** स्त्री. पिकांवर पडणारा एक रोग.

**ढवंढाय** स्त्री. कडवट आठवणींचे उमाळे : 'पन मान्साले ढवंढाय येतेच. – धग २१२ .

**ढवंढाळ** न. १. मसलत; हिकमत; उलाढाल; अचाट व धाडसाची कामे अंगावर घेण्याची क्रिया. २. पैसा उभा करण्यासाठी सर्व प्रकार करणे; संसारातील, आयुष्यातील सर्व प्रकार, कामे (सुखदुःखे इ.).

**ढवंढाळी-ळ्या** वि.१.हिकमती; धाडसी; उलाढाली करणारा; खटपट्या. २.ढवळाढवळ करणारा.(गो.)

**ढवा** पु. १.हिजडा; नपुंसक : 'संगासि उर्वशीच्या स्वप्नीं तरि काय गा ! ढवा लाहे ।'-मो विराट १.१३३.२. नायकिणीकडे काम करणारा नोकर; साजिंदा : 'हे तों अंगीं नाहीं चिन्हें । गाईले वेश्येच्या ढव्यानें ।'- तुगा २८७२. [सं. धव = नवरा]

**ढवाळं** पु.अव. डोहाळे : 'सुटून आलास त्याला दोन महिनं झालं न्हाईत तवर ही भाषा. हे ढवाळं कां ?'- हपा २६.

**ढवाळी** स्त्री. कुचेष्टा; टवाळी.

**ढसके, ढसकण** न. शिजवून ठेवलेला पदार्थ (भात इ.).

**ढसढशीत** वि. गडद; ठसठशीत : 'ढसढशीत रंगाच्या आणि लाल काठाच्या कोऱ्या खणासारख्या त्या आठवणी....'ह्न वेज ३७.

**ढस(सा)ढस-सा, ढसासा** क्रिवि. १. घाईघाईने, घटाघट पाणी पिण्याच्या आवाजाचे अनुकरण करून.२. ओक्साबोक्शी रडण्याचे अनुकरण करून; मनसोक्त. [ध्व.]

**ढसढसीत** वि. तांबडेलाल : 'बारां गाउवांचेनि मानें ढसढसीत खैरांचे इंगळ नेउनि तयामध्ये घालिजति.' - लीचउ १:१०२.

**ढसणे** अक्रि. खूप खाणे; अधाशीपणाने खाणे.

**ढसर** स्त्री. चंगळ; वैपुल्य; उधळपट्टी.

**ढसराई** स्त्री.टाळाटाळ; हलगर्जीपणा :'अशा ढसराईवारी चालू धर्मभोळेपणावर जे पांघरूण घालू इच्छितात.'-किर्लो फेब्रु १९३७.५३७.

**ढस(सा)ळ, ढस(स्म)र** वि.१. पैसे उधळणारा; उधळ्या; सढळ; उदार : 'तुका म्हणे बरा । आहे ढसाळ वेव्हारा ।'-तुगा ३६७२. २. अति समृद्ध; विपुल. [सं.ध्वस्]

स्त्री. समृद्धी; चंगळ; रेलचेल; ढीगच्या ढीग.

**ढस(सा)ळणे** अक्रि. १. ढासळणे. पहा : **धासळणे.** २. विसरणे.

**ढसासणे** सक्रि. कोंबणे; गच्च भरणे (भांडे, खोली इ.); ढोसणे. बहुधा धसासून भरणे, चेपणे असा प्रयोग.

अक्रि.१. सपाटून, ढसासून पिणे. २. ओक्साबोक्शी, सपाटून रडणे. ३. ओरडणे; खेकसणे : 'कोर्ड्यास कमी झाले किंवा चांगले झाले नाही तर तो त्याच्या अंगावर ढसासे.'ह्न आआशे २०९.

**ढस्मा** पु. धिमा; सुस्त. पहा : **ढिम्म**

**ढळ** पु. १. घसरण; निसरडे; घसरलेली अवस्था. २. चूक; एखादी गोष्ट करण्याची राहून जाणे; खंड; स्खलन.(वा.) ० **फोडणे-** जरब बसविणे; दहशत घालणे : 'कच्च दिल बाळगून नि ढळ फोडून घेऊन उपेगाचं न्हाय.'- रैत ३०.

**ढळकोनी,ढळढळवणी** न. ढळकवणी; पाण्यासारखा पातळ पदार्थ.(व.)

**ढळढळ-ळा** क्रिवि. ढसढसा, पुष्कळ (रडणे, आसवे वाहणे). २. ढणढण; झकझक (दिवा जळत राहणे).

**ढळढळ** वि. पातळ. [ध्व.]

**ढळढळणे** अक्रि. प्रखरपणे, ढणढणीत जळणे (दिवा).

**ढळढळीत** वि. स्वच्छ; ठळक; स्पष्ट (अक्षर, आकृती, चिन्ह, गळू इ.); मूर्तिमंत.

**ढळढळून** क्रिवि. ढळढळा; खळखळून : 'नेत्रीं आलें असू ढळढळून। हात झिडकावी राधिका ।'- पला २.

**ढळणे** अक्रि. १. जाग्यावरून हलणे; घसरणे; स्थानभ्रष्ट, पदच्युत होणे; कलंडणे; डळमळणे; झुकणे : 'जैसी तीरी नाव न ढळे टेकलीसांती ।' - ज्ञा ७.४. २. रेलणे; कलणे. ३. (शरीरप्रकृती) खालावणे; ढासळणे; खचणे. ४. माघार घेणे; दबणे; अपयश पदरी येणे; कचरणे; हटणे. ५. चुकणे; न लागणे; अंतरणे (ध्येय, नेम यांपासून). ६. (ल.) वजन कमी होणे; मागे पडणे; विसरले जाणे; रूढीत नसणे. ७. उडणे; मूर्तीवर चवरी वारली जाणे : 'कुंचे ढळती दोही बाही जवळी राही रखुमाई ।' - तुगा २७८. ८. स्रवणे; गळणे (अश्रू). ९. वाहणे; सुटणे (वारा) : 'म्हणूनि संवादाचा सुवावो ढळे । तरी हृदयाकाश सारस्वतें वोळे।'- ज्ञा ९.२८. १०. क्रम बदलणे; पुढे सरणे : 'हें कायसेनही न ढळे अनादि ऐसें ।' - ज्ञा ११.४९७. [प्रा. ढल]

**ढळता** वि. १. कलणारा; झुकता (ताजवा, माप-घेणाऱ्यास फायदेशीर). २.उदार; सढळ (हात, वजन) : 'सरकारही प्रांतोप्रांती सदर संस्थेला ढळत्या हाताने पैसे पुरवीत आहे.' - गांव १९०.

**ढळता काटा, ढळती दोरी, नजर** सढळपणा; मोकळीक; स्वतंत्रता; सवड; सैल कारभार (चाकरी, काम वगैरेत) : 'महाराजांनी एजंटसाहेबांची ढळती नजर आहे हे धोरण ठेवून दिवसाढवळ्या सडकून जुलूम चालवला.' - विक्षिप्त ३.२४१.

**ढळमळणे** उक्रि. ढवळणे : 'पोटात 'च्या' ढळमळल्यागत झालं.' - ढग ८९.

**ढळवणे** सक्रि. हलवून जागे करणे : 'अण्णा... ऊठ - लक्ष्मी अण्णाला ढळवीत होती.' - राकाघाका २४०.

**ढळाढळ-ळा, ढळाळा** पहा : **ढळढळ**

**ढळी** वि. उतरती; निचरा होणारी (जमीन, शेत, रान इ.).

**ढळेपंज** वि. फार म्हातारा (घोडा).

**ढंक** वि. फाजील उंच; मोठा; विस्तृत (मनुष्य, झाड, इमारत).

**ढंक** पु. अडथळा; दृष्टिआड येणारा मोठा पदार्थ : 'जे सोहंभावो हा ढंकु' - राज्ञा ६.११५.

**ढंका(गा)ळ** वि. १. लांबटांग्या. २. प्रमाणाबाहेर, अतिशय उंच; लंबू.

**ढंकाळपार्वती** स्त्री. (निंदार्थी) अतिशय उंच स्त्री.

**ढंग** पु. १. चमत्कार; तऱ्हा; अचाट गोष्ट; नवीन प्रकार : 'ऑस्ट्रेलियन मुत्सद्यांनी एक मोठा ढंग केला. जगभर खळबळ माजवून दिली.' - के १८.२.१९४१. २. चाळे; चेष्टा; दुर्व्यसन; अयोग्य वर्तन; वाईट नाद; छंद. [हिं.] (वा.) ० **नसणे** - अर्थ नसणे; दम नसणे. (व.) **ढंगावर येणे** - खरे स्वरूप प्रगट करणे; मूळ वळणावर जाणे.

वि. ठाम; परखड : 'ही जोशाची ढंग मते ।'- ऐको.

**ढंगड्या** स्त्री.अव.(निंदार्थी) ढंग; चाळे; चेष्टा; खोड्या.(क्रि. करणे, लावणे, मांडणे.).

वि. चेष्टेखोर; ढंगी; व्यसनी.
**ढंगदार** वि. झोकदार; डौलदार; डोळ्यांत भरणारी.
**ढंगधत्तुरा, ढंगधोत्र** पु.न. सोंगढोंग; फसवणूक; गारूड.
**ढंगधोत्रेकरी** पु. ढंगधत्तुरा करणारा गारुडी; ढोंगी; फसव्या (मांत्रिक, वैदू, गारुडी इ.).
**ढंगमकऱ्या** वि. ढोंगी; सोंगाड्या. (व.)
**ढंगरा** पु. नखरा. (व.)
**ढंगसंग** पु. अव. रंगढंग; स्वैराचार.
**ढंगाई** लबाडी. - तंजा.
**ढंगारू** न. पगार; वेतन. (व.)
**ढंगाऱ्या** वि. बेढंग्या. (व.)
**ढंगी** वि. सभ्य; योग्य. (झाडी) [हिं.]
**ढंगी-ग्या** वि. १. छंदी; लुच्चा; दुर्व्यसनी; स्वैरवर्तनी. २. खोडकर; चाळे, चेष्टा करणारा; उपद्रवी.
**ढंढारखाना** पु. (तिरस्कारार्थी) अफाट जागा.
**ढंढाळ** न. छंदफंद; व्यसन.
**ढंढाळी** ढाळणे. - तंजा.
**ढंढेरा** वि. पोट सुटलेला; ढेरपोट्या.
**ढाई** स्त्री. कवड्यांच्या खेळातील गल्लत : 'त मंग आपलीहि ढाई टाकजो.' - वानगी २९. (ना.)
**ढाक** स्त्री. थाप; गप्प. (क्रि. मारणे). [क.]
**ढाक** पु. कुस्तीतील एक डाव; ढुंगणी.
**ढाक** वि.क्रिवि.१.(निंदार्थी) पहा : **ढंक**. २. वस्ताद.
**ढाक** पु. १. नरसांबर. २. नरसांबराचा आवाज. (झाडी)
**ढाक-के** न.स्त्री. १. जुने व वठलेले झाड. २. लहान झाडाचे खोड; पाने तोडलेले रोप; पाने नसलेल्या फांद्या; बुंधा. ३. डहाळी; फांदी. ४. वेल पसरण्यासाठी वेलीजवळ रोवलेली काठी किंवा फांदी.
**ढाकण-णी-णे, ढाकापाक 'झाक'पासून सुरू होणाऱ्या शब्दांमध्ये पहा.**
**ढाकणी** स्त्री. सोने, चांदी गाळल्यानंतर त्याला पुन्हा घनरूप देताना होणारा आकार.
**ढाकनी** स्त्री. मातीचे लहान भांडे. (झाडी)
**ढाका** पु. राजघोळ या पालेभाजीवरील रोग. पाऊस जास्त झाल्यास याची पाने पांढरी पडतात.
**ढाकाणे** न. चण्याच्या पिठाचा ढोकळ्यासारखा पदार्थ : 'मग बाईसे तेयांची... : अरधे ढांकाणे करीति :' - लीचपू ३५८.
**ढाकी** स्त्री. छोटी फांदी.
**ढाकू(क)ळ** वि. १.(राजा.) पहा : **ढाक** १. २. पहा : **ढंकाळ**
**ढाक्या** वि. झाकणारा; झाक्या; लपविणारा.
**ढाचा** पु. साचा.
**ढाचेकाम** न. (स्था.) चौकट मांडणी; चौकटीचे काम.
**ढाचेढू, ढाचेढूचे** न. विसंगत उत्तर देणे.
क्रिवि. अप्रासंगिकपणे; अवास्तव रीतीने; विसंगत; वेडवाकडे (उत्तर देणे, बोलणे.).
**ढाडी** पु. मुसलमानांतील एक गाणारी जात किंवा तीतील व्यक्ती. पहा : **धाडी**. [हिं.]
**ढाडी** स्त्री. गर्भवती स्त्री. (झाडी)
**ढाढी** स्त्री. संमिश्र नाद : 'तेवलिं पुंस्कोकिल निनादें ढाढी वाढिवली' - कला १२.
**ढाण** न. जनावरांचे खाण्याचे एक प्रकारचे गवत.
**ढाण-णे** न. काळा वण; चट्टा; डाग (शरीर, फळ इ.वर पडलेला). [सं. दहन]
**ढाण** वि.१.आंबटओले; ओलसर (कापड, लाकूड).२.पहा: **ड(ढ)साण**
**ढाण** न. गाळ; रेंदा; चिखल (पाणी वगैरे सांडल्यामुळे).
**ढाणक** पु. महार, मांग, चांडाळ इ. अंत्यज. (वा.) **ढाणकाला जाणे** - पूर्ण नाश पावणे; चुलीत, मसणात जाणे याप्रमाणे. **ढाणकाला, ढाणकास देणे, टाकणे, वाटणे, लावणे** - १.(मुलगी, मुलेबाळे) ढाणक लोकांना देऊन टाकणे; टाकून देणे, कुत्र्याला घालणे या अर्थी. वि. दुष्ट; जहांबाज : 'रामूभटाची आई ढाणकच. ती रागावली म्हणजे हाती सापडेल त्या वस्तूने सुनेला मारी.' - वाकि २३.
**ढाणा** वि. धट्टाकट्टा; धिप्पाड; दांडगा.
**ढाणी** स्त्री. डाग देण्याची लोखंडी सळई. [सं. दह्]
**ढाण्या** पु. अंगावर पट्टे असलेला (वाघ, साप) : 'ढाण्या वाघाच्या अंगावर काळे आडवे सरळ पट्टे असतात.' - शिस ६.
**ढाण्या** वि. पराकाष्ठेचा आंबट.
**ढाप** स्त्री. फांदी : 'तो खालीं न पडतां... झाडाच्या ढापीला धरून राहिला.' - वररुचीची कथा.
**ढापण** न. (शाकारणी) दोन उताण्या कौलांच्या रांगांच्या सांध्यावर ठेवलेले पालथे कौल.
**ढा(ढां)पण-णी** न. स्त्री. १. झाकण; टोपण. २. चष्मा. ३. जनावरांच्या डोळ्यांवरील आच्छादन; झाकणी; झापडी; अंधारी. पहा : **झाकण**. [हिं. ढांपना, सं.छादन]
**ढापणी** स्त्री. झाकणे; लपविणे; बंद करणे.
**ढापणे** उक्रि. १. टोपण लावून बंद करणे; झाकणे; झाकण लावणे : 'कोंवळें बोलतो मना आवरतें । डोळियाचे पातें ढापवेना ।' - तुगा १४४. २. झाकणे; लपविणे; दडविणे; दाबून, दडपून टाकणे; गुप्त राखणे (एखादी गोष्ट). [हिं. ढापना]
**ढापणे** न. बांध; ढेकळाचा बांध.
**ढापरणे** सक्रि. फटकारणे; हटकणे : 'एकानं ढापरलं, '...कुनाला म्हार म्हनतोस ?' - एस्पृडा ४६. पहा : **डाफरणे**
**ढापा** पु. १. मोठे कौल; आढ्यावरचे कौल; कोनावरील कौल. २. जिना इत्यादी बंद करण्यासाठी लावलेली फळी. ३. (शाकारणी) पालथे कौल.
**ढापा** पु. झाडाची फांदी; फाटा.
**ढाबळ** स्त्री. कबूतर ठेवण्याची, पाळण्याची जागा; खुराडे.
**ढाबळा** पु. जमाव; थवा : 'दहा हजार मनुष्याचा ढाबळा शहरात खरेदीकरिता गेले.' - ऐको.

**ढाबळी** वि. ओबडधोबड; जाडेभरडे : 'डोसकं इचरलेलं. ढाबळी लुगडं पायाच्या घोट्या पतोर.' ह्र खळाळ ५०.
**ढाबा** पु. रस्त्यावरील, सडकेवरील भोजनाचे ठिकाण.
**ढाबाडुबी** क्रिवि. धबाधब; भरभर.
**ढामसडुमस** वि. आकारहीन; बेडौल. (व.)
**ढामीण** स्त्री. धामण; सर्पाची एक जात.
**ढाय** स्त्री. सवय. (व.)
**ढारदूर** क्रिवि. (घोरण्याच्या आवाजावरून) गाढ (निजणे). [ध्व.]
**ढाल** पु. आळ, आरोप : 'कैकई कवसाली ढाल घेतला सीतेवरी.' - जसा २७५.
**ढाल** स्त्री. १. शस्त्राच्या घावापासून स्वतःचा बचाव करण्यासाठी केलेली कातड्याची किंवा कासवाच्या पाठीची वस्तू. २. निशाण (सैन्याचे, मुख्य सरकारचे, किल्ल्यावरचे, बाजारचे वगैरे).(क्रि. देणे).[सं. ढालम्, त. डाल्](वा.)०**देणे**-१.(लढण्यास, भांडण्यास, वादविवादास इ.) सज्ज होऊन पुढे उभे राहणे :'दिल्या ढाला मैदानात परांड्याच्या बाजूला।'-ऐपो २३४. २.आव्हान देणे; युद्धास बोलावणे. ३. प्रवासाची तयारी करणे. **(उलटी)० देणे, फिरवणे**- १. बंड करणे. २. लढाई संपून सैन्य माघारे, परत फिरणे.
न.१. पराक्रम; अचाट कृत्य; साहस. २.(ल.)कीर्ती.(क्रि. होणे).
**ढाल** स्त्री. १. (बायकी) घाटी; कंठमणी; कंठी. २. (ल.) आसरा; छत्र; रक्षण करण्यास समर्थ असणारी व्यक्ती.
न. स्त्रियांनी केलेले धाडसाचे काम, साहस. (क्रि. गळणे).
**ढाल** न. जारणमारणातील एक मंत्र; साधन; खेटक : 'केली नाना कवटाळें । पुत्र लोभें केलीं ढाळें ।'- दास ३.३.४५.
**ढाल, ढालगज** वि. १.लढाईतील निशाणाच्या हत्तीप्रमाणे शूर. २. निर्लज्ज; उद्धट; अतिशय मोठी, स्थूल (स्त्री). [सं. ढाल+गज]
**ढालकरी** पु. १.सैन्याचे निशाण बाळगणारा, निशाणसंरक्षक शिपाई. २.ज्याच्याजवळ ढाल आहे असा लढवय्या; ढालाईत; ढाल्या. ३.(ल.) काठी; आधार; कुटुंबातील, समाजातील कर्ता पुरुष; नेता; पुढारी.
**ढालकाठी, ढालखांब** स्त्री.पु.१. निशाणाची (विशेषतः सैन्याच्या मुख्य निशाणाची) काठी. २. (ल.) समाज, राष्ट्रधुरीण; पुढारी; कुटुंबातील मुख्य पोषणकर्ता.
**ढालगजपण** न. उलाढाल; उठाठेव : 'तयासि द्रव्य पाहिजे म्हणौनि। केले असंभाव्य ढालगजपण ।' - स्वादि २.२.१७.
**ढालगजभवानी** स्त्री. १. साहसाचे, आचरटपणाचे, अमर्याद, अनुचित कृत्य करणारी स्त्री. २. उलाढाली, उपद्व्यापी स्त्री.
**ढालढकल** स्त्री. चालढकल; अळंटळं; दिरंगाई.
**ढालणे** सक्रि. स्खलन करणे; ओतणे : 'जी बुद्धितें सली । निश्चयातें ढाली ।' - ज्ञा ६.४१३.
**ढाल(ळ)णी** स्त्री. पलटी; उलट; माघारा वळसा : 'गलबतें ...अकस्मात ढाळणी घेऊन फिरोन जंजीरे मजकूरचे बारियावर होरीबेरी घेत राहिली.' - पेद ३४.८०.
**ढालपट्टा** पु. शिपायाचा लढाईचा सरंजाम.
**ढालपा, ढालपट** पहा : **ढलपा**
**ढाला-ली** वि. भरदार; प्रसरणशील; पहाडी; भारदस्त : 'सरस्वतीबाई व श्रीमतीबाई यांचे आवाज स्त्रियांच्या मानाने ढाले असून त्या खूप जोरकसपणे गातात.' - अस्ताई १२.
**ढालाईत** पु.वि. १. ढाल धरून जाणारा, पायदळ शिपाई; मोठ्या सरदाराच्या स्वारीतील शिपाई. २. सैन्याच्या अग्रभागी असणारे मोठे निशाण नेणारा सैनिक; सरकारी हुकूम जागच्या जागी अमलात आणण्यासाठी निशाण (ढाल) घेऊन पाठविलेला शिपाई.
**ढाल्या** वि. १. पहा : **ढालाईत.** २. धाडसी; साहसी; मसलती; हिकमती.
पु. पेठेतील मुख्य चौकीजवळ ढाल (झेंडा) रोवलेल्या जागी असलेला महार कामगार.
**ढाशा वारा** पूर्वेकडील वारा. यामुळे जमिनीतील पाण्याचा अंश शोषला जातो. [फा.]
**ढास** वि. रानवट; माळरानाची; नापीक (जमीन).
**ढास-सी-से** पु.स्त्री.न.१. गाडीच्या चाकावर, धुऱ्यावर बसवलेला भाग; बैलगाडीची साटी; सांगाडा. २. गाडीच्या सांगाड्याच्या बाजूला टेकायच्या कांबी; करळ्या. (व.)
**ढा(ढां)स** स्त्री. एकसारखा येणारा कोरडा खोकला. [हिं.]
**ढास** पु. १. चावा; दंश. पहा : **डास.** २. तोडलेला सर्व भाग. (को.) [सं. दंश]
**ढासण** न. १. आधार; आश्रय; धीरा. २. आश्रयदाता; हितकर्ता. (को.)
**ढासण** न. १. ऐन आणीबाणीची वेळ; नेमकी संधी, वेळ. २. नेमकी जागा; आडोशाची, दबा धरून बसण्याची जागाः 'ढासणावर नीट हौदे चालविले.'- भाब ३४. ३. मोहरा : 'ऐसे कित्येक दुसरेकडे ढासण धरून गोळागोळी करीत होते.'-भाब ४५. ४. तोंड :'यांचें फौजेचें ढासण खंदकास लागलें.'- भाब ४६.
**ढासणी** स्त्री. ढास; खोकण्याची क्रिया; खोकला (विशेषतः गुरांचा). (क्रि. करणे, लागणे, राहणे.).
**ढासणे** अक्रि. १. जनावराचे खोकणे. २. कोंबणे. [ध्व.]
**ढासण्या** स्त्री.अव. गाडीच्या साटीचे सर्व सामान बांधण्याच्या दोऱ्या. या आखरीला आवळलेल्या असतात.
**ढासरा** वि. ढासणारा; खोकणारा; खोकरा (घोडा वगैरे).
**ढासरा** पु. ढोसरा; धसका; धास्ती; दुःखपूर्ण स्मृती; वेदना. (क्रि. धरणे, घेणे, बाळगणे, काढणे.).
**ढासल-ला** न. असट, पातळ भात; पेज. (व.)
**ढासले** न. शिजवून ठेवलेला पदार्थ (भात वगैरे). पहा : **ढसके**
**ढासळणे** अक्रि. १. कोसळून पडणे (इमारत, विहीर, रास इ.). पहा : **धासळणे.** २. वाया जाणे; व्यर्थ होणे; बिघडणे : 'प्रकृती अधिकच ढासळत होती.' - बंप २३३.
सक्रि. रचलेल्या वस्तूंची, पदार्थांची रचना कोसळून पडेल अशी शिथिल करणे. [ध्व.]
**ढासळाढासळ** स्त्री. पडापड; पडझड.

**ढासुले** न. राळ्याची खीर : 'गाए दूहिली : ढासुलें रांधिलें :' – लीचपू ४७७.

**ढाळ** पु. १. जुलाब; रेच (औषधाने, रोगाने झालेला). (क्रि. होणे). २. शौचाला साफ होण्याचे औषध; रेचक.

**ढाळ** पु. १. आकार; घडण; घाट (भांडी, दागिने यांचा). २. शैली; पद्धती; तऱ्हा; रीत.(क्रि. पडणे) : 'वोढाळाची ढाळ कोटी । मारला जाइल यासाठीं ।'– अमृतकसं २३. (वा.) **ढाळाखाली चालणे** – नेहमीप्रमाणे वर्तन करणे.

**ढाळ** पु. उतार; उतरतेपणा (पाण्याचा, जमिनीचा).(वा.)० **देणे** – १. नोकरास बडतर्फ करणे. २. टाळाटाळी करणे; चुकविणे.

**ढाळ** पु. ढेप : 'जाले इक्षुरसाचे ढाळ । तरी लवण देणें किडाळ।' – दास १.५.४५७.

**ढाळ** पु. हापका; पूट : 'नाना लवणाचें जळु । होआवया दोनि चार वेळु । देऊनि सांडिजती ढाळु । तोयाचे जेवीं।'– ज्ञा १८.७७५.

**ढाळ** पु. १. उष्णतेच्या झळा. २. मनाला लागणारा शब्द.

**ढाळ** पु. १. अभिषेक. २. स्नान; न्हाण : 'विरहज्वरी ढाळु करिती : कवणी परी :'– नरुस्व ५६६.

**ढाळ** न. चलनवलन.

**ढाळ** पु. भाव; प्रेमः 'कासवीचा ढाळ जया नेत्रीं ।'–नामगाथा २०.

**ढाळ** पु. वर्ताळा; नमता तोल. तराजूच्या दोन्ही पारड्यांतील वजन समतोल झाल्यावर पदार्थाचे पारडे खाली झुकण्यासाठी घालतात तो थोडा अधिक पदार्थ.

**ढाळ** पु. १. मोत्यांचे पाणी; तेज : 'मुक्तमणी ढाळ देत।' – वेसीस्व ९.१२७. २. शोभा.

**ढाळ** स्त्री. डहाळी; फांदी.

**ढाळउखाळ** पु. हागओक; ढाळ व ओकारी. (क्रि. होणे, चालणे, देणे.).

**ढाळक** न. शौचास साफ होण्याचे औषध.
 वि. जुलाब होणारे रेचक (औषध).

**ढाळज** स्त्री. पडवी; जुनी बैठकीची जागा : 'घराची ढाळज मोठी होती.'– एगाएपा १८०.

**ढाळणी** स्त्री. नांगरलेली सुपीक जमीन साफ करण्याची क्रिया; कुळवणी.

**ढाळणी** स्त्री. पंख्याने वारा घेणे.

**ढाळणे** उक्रि. (चवरी, पंखा इ.) हलविणे; वारणे. २. टाकणे; फेकणे : 'धर्म प्रथम फासे ढाळी।'– मुसभा १४.३१.

**ढाळणे** उक्रि. प्रकाशणे; सतेज दिसणे (मोती).

**ढाळणे** उक्रि. (अश्रू) गाळणे.
 अक्रि. १. पडणे; गळणे (अश्रू). २. ढाळ होणे.

**ढाळणे** सक्रि. घालणे; वर ओतणे; अभिषेक करणे : 'श्रीगुरुलिंगा ढाळी। ध्यानामृत।' – ज्ञा ३८६.

**ढाळणे** उक्रि.१. साफ करणे, ढेकळे मोडणे (नांगरलेल्या जमिनीतील). २. पाऊस पडल्यानंतर वखरणे.

**ढाळदार** वि. उतरता; उतार असलेला.

**ढाळ(ळे)ढाळे** क्रिवि.१. एका डहाळीवरून दुसऱ्या डहाळीवर. २. हळूहळू : 'तो हळूहळू ढाळें ढाळें। कौतुकेनि एका वेळे।' –ज्ञा ३.४२.

**ढाळपेटी** स्त्री. मेट्रिसवरून ठसा ढाळण्यापूर्वी ती ज्या पेटीत बसवावी लागते ती पेटी.

**ढाळा–ळी** पु.स्त्री.१.पाने असलेली लहान फांदी; डहाळा; टहाळी. २. हरबरा, वाटाणा, लाख इ.चे रोपटे.

**ढाळीक** वि. तेजस्वी.

**ढाळू** वि. अतिशय उतरता; ढाळदार.

**ढाळे** क्रिवि. १. हळूच; हळूहळू : 'तंव वरिले कडोनि ढाळें । चंद्रामृताचें तळें कानवडोनि मिळे । शक्तिमुखीं ।– ज्ञा ६.२४७. २. सहज रीतीने : 'ढाळेचि काम हातें सदा ।'– दास १९.८.९. ३. अखंडित; एक धारेने; अखंड प्रवाहासारखे : 'भरूनि कनकांची घंगाळे । उष्णोदक घालिती ढाळे ।'– हरिव.

**ढाळेढाळा–ळी–ळे** क्रिवि.१.थोडे थोडे :'मग नेमेंचि ढाळेंढाळा। पिकालागीं जळा काढिजे पाट।'– एभा ५.२१६.२. हळूहळू. पहा : **ढाळे१**

**ढाळ्या** पु. कळीला जोडलेला छपराचा पुरवणी भाग.

**ढाळ्या** वि. दवंडी देणारा, पिटणारा. (प्रां.)

**ढांग** स्त्री.१. टांग; एक पाऊल. २. उभे राहिले असता दोन पायांतील (मांड्यांमधील) अंतर. ३. मांडी, पाय. ४. उडी.

**ढांग** वि.१.अखेरचा; क्रमाने शेवटचा. (व.)२. वर्गातील अखेरचा; शेवटचा यावरून) ढ.

**ढांगर** न. वेलीला, लहान रोपाला आधार म्हणून लावलेला खांब; ढाक.

**ढांग(गा)ळ, ढांगु(गो)ळा** पहा : **ढंकाळ**

**ढांगळणे** उक्रि. १. ओलांडणे; टांग टाकून जाणे. २. (ल.) झिडकारणे; उपहासपूर्वक वागवणे; उडवून लावणे.

**ढांड(डा)ळ** वि. १. धांडळ; लांबट व जाड (जोंधळ्याचे कणीस, ताट). २.उंच व धिप्पाड.

**ढांडुळा** पु. शोध; झाडा; धांडोळा.

**ढांडो(ढो)रा** पु.१.दवंडी; डांगोरा; जाहीरनामा; नोटीस. २.एक वाद्य.

**ढांढाळ** न. उठाठेव; नसता उद्योग; छंदफंद; व्यसन : 'सांपें आवैचेया नागदेयाची ढांढाळें आइकीजति ना :'–लीचपू २.२५१.

**ढांढुळणे** सक्रि. बारकाईने शोधणे. पहा : **धुंडाळणे** [प्रा. ढंढोल]

**ढिउरी** वि. स्थूल; जाड.

**ढिकळा, ढीग, ढेकळी** पु.ओल्या मातीचा गोळा. [सं. दिह]

**ढिकळा, ढिक(कु)ळी** पहा : **डिखळ**

**ढिकीमढिकीम** क्रिवि. हळूहळू (चालणे). (झाडी)

**ढिग(गा)र, ढिगारा** पु. राशी; ढीग; गंज (धान्यादिकांचा.) : 'मोहरा पुतळ्या रुपयांचे जागोजाग पडले ढिगारे ।'–ऐपो१२३.

**ढिगळ** स्त्री. छिद्र; भोकसे : 'पदर फाडून छपराची ढिगळ बुजवीत असलेली थोरली तिला दिसू लागली.'– रथ २७८.

**ढिगा** उद्गा. पुरे. (को.)

**ढिगारा** पु. राशी; ढीग; गंज (धान्यादिकांचा).

**ढिगावा** पु. आधार. (कु.)

**ढिगाळ** पु. ढीगच्या ढीग : 'पडिले प्रेतांचे ढिगाळ ।'–जै ८७.२०.

**ढिगी** स्त्री. टेकण; आधार; टेकू (झाड, वेल वगैरेसाठी लाकडाचा दिलेला).

**ढिगुला** पु. लहान ढीग.

**ढिगोला** पु. १.लहानसा ढीग. २.लहानसे टेकाड. (ना.)

**ढिचळ** न. ढेकूळ.

**ढिपा(पू,ब)ळ** न. मातीचे ढेकूळ; ढेपसे; डिखळ : 'तेणे वासनाढिबळ विरालें।'- रंयो ४.२६१.

**ढिम** पु. मुलामा :'कळस ढिमाचे पोकळ । जळो वरील ते झळाळ।'-ज्ञा १३.४७०.

**ढिम-म्म** स्त्री.१.(दुसऱ्याच्या सांगण्यावरून) आपल्या उद्योगा-संकल्पापासून निवृत्त होणे; मागे घेणे.२. चकित होणे.३. प्रवृत्त होणे. (खाणे, देणे, करणे, म्हणणे इ. क्रियापदांबरोबर निषेधार्थी योजतात.). क्रिवि. धिमा; स्तब्ध; मुळीच न हलता; न ऐकता :'जशास तसाच ढिम्म उभा आहे.'-वज्राघात १७७. २. मंद; सुस्त; जड.

**ढिमा** पु. १. लहान वाटोळी टेकडी, उंचवटा; जमीन सपाट खोदताना माप घेण्यासाठी मधूनमधून ठेवले जाणारे उंचवटे. २. नदीमधील बेटासारखी कोरडी जागा.

**ढिमोरा** पु. (जनावरांच्या) पाठीच्या कण्याचा शेवट; चौक; ढुंगण.

**ढिम्मा** स्त्री. जाणीव; दाद; पर्वा; खातरजमा; वार्ता : 'अजूनपोतर त्यांना कशी ती ढिम्मा नव्हती.' -खेस्व ४९.

**ढिरा** पु. १. डिरा; नवीन अंकुर; कोंब; न उकललेले कोंबाचे टोक. २. (ल.) घर शाकारतेवेळी गवताच्या पेंढ्यावर उडविण्यासाठी, हलविण्यासाठी केलेली अणीदार काठी.

**ढिरा** पु. गाड्याचे जू ठेवण्याचा तिपाया. (झाडी) [सं. स्थिर]

**ढिरी** स्त्री. लहान ढिरा; कोंब; कोमल अंकुर; डिरी.

**ढिल** वि. १. ढिला; शिथिल. २. मोकळे; पोकळ.
स्त्री. मंदपणा; दुर्लक्ष.(क्रि. देणे). पहा : **ढिल्ली, ढिला**

**ढिलता, ढिला** वि. १. सैल; घट्ट, आवळ नसणारा; खिळखिळीत. २. लेचापेचा; शिथिल; भोंगळ; हयगयीचा; अव्यवस्थित. ३. सुस्त;आळशीः'तरी आंगें कर्मे ढिला।'-ज्ञा १३.६७७. ४. चंचल; निश्चयरहितः'होता प्राप्त गुरुविरह कैसा न म्हणेल मानव ढिला हा।'-मोआश्रम २.४.५. मृदु; नरम :'रसें गाढींवरी ढिलीं। द्रवभावें आथिली ।'- ज्ञा १७.१२८. ६. षंढ; नपुंसक. ७.मऊ; मंद.[हिं. ढीला,त.डीला](वा.)**ढिल्या कासोट्याचा**-व्यभिचारी असणे.

**ढिलाई** स्त्री. १. सुस्तपणा; आळशीपणा; मंदपणा. २. हयगय; दुर्लक्ष; अव्यवस्थित कारभार : 'लष्करी कारभारात ढिलाई व बेकैदी जी एकदा उत्पन्न झाली...' - मइं १४.

**ढिला कुमाइत** वि.१. भाडोत्री (घोडा).२. भित्रा; कमकुवत, डगणारा (माणूस).

**ढिला माल** १. हलका; निरुपयोगी माल. २. (ल.) दुर्बळ; नामर्द; षंढ; कुचकामाचा माणूस.

**ढिलावणे** उक्रि. सैल, शिथिल करणे : 'वसन ढिलवित सरळकंठ आकंठ भरित।'- अमृत ६२.

**ढिली दोरी** लगाम सैल सोडणे; बंधन, वर्चस्व, ताबा कमी करणे; कडक अंमल न ठेवणे. (क्रि. देणे, सोडणे.).

**ढिल्या** वि.१. खिळखिळ्या शरीराचा; ज्याचे सांधे ढिले झाले आहेत असा.२.(ल.) ज्याचा कारभार ढिला आहे असा (माणूस).

**ढिल्ली** स्त्री.१.मंदपणा; सुस्तपणा; हयगय; चालढकल; दिरंगाई. (क्रि. करणे, पाडणे.). २.(ल.) दुर्लक्ष; ढिलाई; शिथिलपणा. ३. बंधने, कडक अंमल कमी करणे, काढून घेणे. ४.(नियमात मिळालेली) सवड; मुभा.

**ढिव** न. बेगड; मुलामा : 'कळस ढिवांचे पोकळ।'- ज्ञा १३.४६९.

**ढि(ढी)वर** पु. कोळी जात व तीतील व्यक्ती; धीवर. [सं. धीवर]

**ढिवरी** स्त्री. कोळी जातीची स्त्री.
वि. मारकी; रागीट. (व.)

**ढिसर** वि. ठिसूळ.

**ढिसराई** स्त्री. चढेलपणा.

**ढिस(सा)ळ-ल** वि.१.अगडबंब; मोठा; अवजड; बोजड; अफाट परंतु दुर्बल; ढिला; ठिसूळ (मनुष्य, जनावर, लाकूड).२. अफाट; अवाढव्य; विशाल :'जगडंबर अतिढिसाळ। दुर्धर घडि मोडी सहज।'-देप २. ३. पोकळ; फोपशा. ४. विस्कळीत; बेशिस्त (कारभार, लेखन इ.).
वि. उदार; सढळ; उधळ्या. पहा : **धोताल**

**ढिसळणे** अक्रि. ढासळणे; कोसळणे (इमारत, विहीर, रास).

**ढिसा, ढिसूळ-र** वि. १. नाजूक; ठिसूळ (लाकूड). २. ज्याचे स्नायू बळकट नाहीत असा; फोपश्या.

**ढिसा** पु. एक पक्षी; पाणकावळा; खंड्या; गण्या.

**ढिसार** वि. नरम (गूळ, माल).

**ढिसाळ** वि.१. समर्थ; मोठे; प्रचंड : 'नाहीं येणें पाडे ढिसाळ । दुजें जगीं ।'ह्र ज्ञा ४.१७५. २. विशाल : 'हारवली अनंत ब्रह्मांडांचीं ढिसाळें ।'-उगी ६५७.

**ढिसाळ** पु. लोंढा :'कोंकणच्या नद्यांत मधूनमधून पाण्याचे ढिसाळ उर्फ लोंढे काय भयंकर येतात.' - मातीर्थ ४.४.

**ढिसी** स्त्री. जिच्याभोवती सोपल गुंडाळतात ती काठी.

**ढीग** पु. १. मोठी रास; संचय, गोळा; अतिशय मोठा संग्रह; साठा. २. गर्दी; एकत्र आवळून असलेला सैन्याचा भाग : 'मारीत ढिगात लोटला।'-ऐपो ८७. [सं. दिह] (वा.) o **करणे**- पुष्कळ, आटोकाट प्रयत्न करणे. o **घालणे, पाडणे, लावणे**-अतिशय, पुष्कळ करणे (काम इ.).
वि. समृद्ध; विपुल; पुष्कळ : 'बा, ढीग वेदना अनुभविल्या समरी'ह्र मोउद्योग १३.८४.

**ढील** स्त्री.१. पहा : **ढिलाई**. २. चेंगटपणा; टोलवाटोलव; दिरंगाई. (क्रि. करणे, लावणे, मांडणे.).(वा.)o **देणे**-स्वातंत्र्य, मोकळीक देणे; सैल सोडणे. o **पडणे** -कामाची हयगय होणे; दिरंगाई लावली जाणे.
वि. सैल; सुस्त; संथ. पहा : **ढिला**

**ढील** न. १. दोंद; ढेर. २. अवजड धूड. (एखाद्या अजस्र व अवजड वस्तूला आश्चर्यार्थी किंवा तिरस्कारार्थी लावतात.). [हिं.]

**ढीलढाल** स्त्री. ढिलाई; दिरंगाई :'सरकारांतून ढीलढाल अथवा दिवसगतीचा प्रसंग आडलला.'-पेद २.१५.

**ढीव** पु. धीवर; कोळी. [सं. धीवर]
**ढीवाचा अलंकार** (ल.) नकली, पितळेचे, बेगडाचे दागिने.
**ढीवळ** न. तुकडा : 'कर्पुराचे जैसें ढीवळ ।'- गीतार्णव १३.९८७.
**ढुक** स्त्री. इच्छा; मनीषा. (अहि.)
**ढुकसी, ढुमणी** स्त्री. धडक. पहा : **ढुसकी-णी**
**ढुटा-टी** पु.स्त्री. कोळ्यांची मासे ठेवण्याची करंडी. (गो.) (झाडी)
**ढुड्डी** स्त्री. शिमगा; धुळवड. (झाडी) [सं. धुलि, धुम]
**ढुढूस** स्त्री. पाखडताना भातातून उडणारा कोंडा. (झाडी)
**ढुढ्ढाचार्य** पु. शिष्ट; ज्ञानाची प्रौढी मिरवणारा. [प्रा. दोड्ढ +आचार्य]
**ढुणी** स्त्री. धिऱ्याचा खांब : 'मोडकळीस आलेल्या इमारतीस ढुण्यांचा आधार देतात...'-साहेब.
**ढुप्प** क्रिवि. हुप्प; न बोलता; हालचाल न करता : 'गोदी ...बाकावरच ढुप्प करून बसलेली.'-व्यव १५०.
**ढुबा** पु. टेकाड; उंचवटा.
**ढुमके, ढुमढुम-मे** न. ढमके; टिमकी; (लहान मुलांचा) डफ.
**ढुमणी** स्त्री.१.दूध पिताना वासराने गायीला दिलेली ढुसणी; धसक. २.टक्कर; धडक.३. वासराला शिंगे येण्यापूर्वी डोक्यावर दिसतात ती टेंगळे. [ध्व.]
**ढुयी ढुयी** क्रिवि. अल्प; थोडे थोडे; थेंब थेंब. (अहि.)
**ढुलका-की** पु.स्त्री. गोंडी वाद्य; डफडी. (व.ना.)
**ढुशा** पु. सूतगिरणीतून उडणाऱ्या कापसाच्या फुसांड्यापासून, तुसांपासून विणलेले कांबळे.
**ढुशी** स्त्री. थाप.
**ढुशी-श्शी** स्त्री.१.धडक; टक्कर; डोक्याने मारलेली धडक (विशेषतः वासराने-पिताना गाईला).पहा : **ढुसकी-णी**. २. खुपसणे; शिरकाव.
**ढुस-स्स** अ. काळा या विशेषणाला जोडण्यात येणारे आधिक्यदर्शक उपपद किंवा प्रत्यय. उदा. काळा ढुस्स. [क.]
**ढुस** दोन काकरी अवजार. (व.)
**ढुसकणी** स्त्री. धक्के मारणे; ढुसकणे; खुपसणी.
**ढुसकणे** सक्रि. १. भोसकणे; खुपसणे; ठोसणे; रेटणे. २. डोक्याने ढुशी, धक्का मारणे; हुसकणे; दूर करणे. [ध्व. ढुस]
**ढुसकी-णी** स्त्री.१. खुपसणी; रेटणे; धडक; धक्का; ढुसकणी; आघात. २. ढुशी देणे; ढुसणी. (क्रि. मारणे).३. जागृती; फिरून आठवण देणे, करणे (आश्रयदात्याला); टोचणी. [ध्व. ढुस]
**ढुसणे** सक्रि.भोसकणे;(अणकुचीदार वस्तू) खुपसणे; खोचणे; आत मारणे. अक्रि. डोके पुढे घालून आत घुसणे; मुसंडी देणे.
**ढुसा-स्सा** पु. गुद्दा; बुक्की; बुकांदा; ठोसा (मुठीचा). [ध्व.]
**ढुसी** पहा : **ढुशी** [ध्व.]
**ढुसे** न. तिफणी; पाभर. (व.)
**ढुळका** पु. ढुलकी.
**ढुळढुळ** वि. पातळ. (व.)
**ढुंकणे** अक्रि. मुद्दाम पाहणे; डोकावणे; डोके खुपसून, पुढे काढून पाहणे. (वा.) **ढुंकून न पाहणे, न विचारणे**- मुळीच लक्ष न देणे; पूर्ण दुर्लक्ष करणे. [सं. ढौक्]
**ढुंग** न. ढुंगण; कुल्ला. [क. डुंग=उंचवट्याचा भाग]
**ढुंग(गा)ण, ढंग(गा)ड** न. मोठे ढुंग; कुल्ला; मागचा भाग; कुल्ल्याचा विस्तार, मोठेपणा दाखवणारा शब्द. [त. कुंडि](वा.)**ढुंगणावर आपटणे**-मूर्खपणामुळे मोठी ठोकर बसून नुकसान होणे. **ढुंगणास हात पोहोचणे** - स्वतंत्र बनणे; कोणाची जरुरी नसणे; मुलगा मोठा होऊन स्वैर वर्तन करू लागणे.
**ढुंगणमोडे** न. १. एक प्रकारचे इरले. हे वापरणारा वाकला की इरले ढुंगणावरून आत दुमडले जाते व अशा रीतीने मागची बाजू भिजत नाही. २. एक प्रकारची मुंगी. कमरेजवळ हिच्या शरीराचे दोन भाग पडतात.
**ढुंगणी** स्त्री. (निंदाव्यंजक) मोठ्या ढुंगणाची स्त्री.
**ढुंडा** वि. हात तुटलेला; थोटा; फांद्या किंवा अवयव छाटलेला; आखूड. (झाडी)
**ढुंडा(ढा)ळणे** सक्रि. शोधणे; धुंडाळणे.पहा : **ढांढुळणे**. [प्रा. ढुंढुल्लण]
**ढुंडी** वि. आखूड. (झाडी)
**ढुंबे** न. तृणपाते; गवताचे पाते. (माण.)
**ढूम-मा** पु. खडक; टेकडी : 'तैसें उंचौनि लोटिलें कामें । नेहटित क्रोधाचिये ढूमे ।'-राज्ञा १६.३३९.
**ढूस** वि. अविचारी; हूड.(व.)
**ढेक** स्त्री. बैलाचे ओरडणे; हंबरडा.
**ढेक** स्त्री.न. १. एखाद्याच्या अंगावर मोठ्याने, कर्कश ओरडणे. २. डरकणी; डरकाळी (वाघासारख्या क्रूर प्राण्याची).
**ढेक** पु. गर्व. (व.)
**ढेकणी** स्त्री. (विणकाम) वही (ओवी) वरची धनुकली. यालाच अटण्याच्या दोऱ्या बांधलेल्या असतात. चाळ्यासाठी नक्षीच्या दोऱ्या बांधण्यासाठी वापरलेले कामटीचे तुकडे.
**ढेकणी** स्त्री. ढेकूण धरण्यासाठी केलेला अनेक छिद्रे पाडलेला लाकडी ठोकळा.
**ढेकणी** स्त्री. झुरळासारखा काळसर तांबडा किडा.
**ढेकणे** अक्रि.१.आवेशाने एखाद्यावर उसळणे, ओरडणे; शिरा ताणणे; अंगावर येणे.२. डरकाळी फोडणे.
**ढेकर** पु.स्त्री.पोटातील वायू घशातून बाहेर येताना होणारा आवाज. [ध्व.,हिं. डकार, क.डरकि-कु](वा.)**०देणे, देऊन बसणे**-परद्रव्याचा अपहार करून ते जिरवणे; ठेव म्हणून ठेवलेला पैसा गिळंकृत करून तसे स्वच्छ सांगणे.
**ढेकली** स्त्री. पाणी वर ओढण्याचे यंत्र. [हिं.]
**ढेक(कू)ळ** पु.डिखळ; मातीचा गोळा.पहा: **ढिकळा**. [क. हेळ्ळे] (वा.)**ढेकळाप्रमाणे विरणे**-तेजोहीन, हतवीर्य होणे; जिरणे. **ढेकळे फोडणे**-(पाणथळ जमिनीत) सऱ्या पाडणे.
**ढेका-की-के** पु.न. घाण्याच्या लाटेवर बसविलेले व वाकविलेले लाकूड; चुना बारीक करण्याचा बत्ता.
**ढेकारणे** अक्रि. मोठ्याने ओरडणे; ढेकणे.

**ढेकी** स्त्री. डंख; चुना, पोहे वगैरे कुटण्याचे साधन; कांडण्याकुटण्याचे (भडभुंजाचा डंख, डंग याप्रमाणे) साधन. [हिं. ढेंक]
**ढेकूण** पु.१. चावणाऱ्या जातीतील एक स्वेदज कीटक; खटमल. २. (तिरस्कारार्थी) घाण्या, कुचका, पादरा माणूस. [प्रा.]
**ढेकूणपिसा** पु. पूर्ण दारिद्र्य; दैना.
**ढेगशी** स्त्री. टेकाड; उंचवटा : 'ढेगशीवर चढून तो पुराचे पाणी पहात होता.'-जाण ३११.
**ढेगळा** वि. हलगर्जी. (व.)
**ढेगाळने** अक्रि. रेंगाळणे. (व.)
**ढे(ढें)ढे** न. १. धेंड; प्रस्थ; मोठी आकृती. २. अवडंबर. (वा.) ० **फिटणे**–पावसाळा सरणेः 'कां वार्षिये ढेढें फिटे। जेव्हा शारदीयेचा अनुघडु फुटे।'– ज्ञा ९.१०२.
**ढेण** वन्य लाकडाच्या किंवा गवताच्या दिवटीचा प्रकार. (को.)
**ढेण्या** पु. मोठा, पोसलेला ढेकूण; ऊ. पहा : **टेण्या**
**ढेनस** न. एक प्रकारची फळभाजी; धेंडसे. (ना.)
**ढेप** न.१.मातीचे ढेकूळ; डिखूळ. २. जिराईत पिकाची जमीन. ३. जमिनीची पिकावरून, उत्पन्नावरून मोजणी. [हिं.]
**ढेप** स्त्री.१.उसाचा कढवलेला रस विशिष्ट आकाराच्या साच्यात ओतल्यानंतर, थंड झाल्यावर त्याचा बनणारा आकार; गुळाची भेली.२. पेंड, भात, धान्य, दही इ.चा गोळा; जटाभार, कागद, पाने, गवत इ.चा गठ्ठा, जुडा : 'ढेंप लावित असे टुक यातें।'– किंगवि २२. ३.(गुरे, पाऊस आणि विस्तव ह्यांपासून संरक्षण व्हावे म्हणून) वर मातीची डिखळे घालून लिंपून ठेवलेली कडब्याच्या पेंढ्यांची गंज; ढेपण. [हिं.]
**ढेप** न. चेप; गर्दी; खेच; समुदाय. (प्रां.)
**ढेप** भेट. (तंजा.)
**ढेपझाडा** पु. पिकाला योग्य अशा लागवडीच्या जमिनीची नोंद (तरफ वगैरेचे).
**ढेपण** न.स्त्री. पहा : **ढेप** स्त्री.३
**ढेपणे** सक्रि. १. रास करणे; ढीग रचणे. २. (ल.) ठासणे; दाबून, खच्चून भरणे (अन्न).
अक्रि. चिकटून, दाबून ढेप होणे (कागद, पाने इ.ची); आत जाऊन घट्ट होणे, थिजणे(कढलेला गूळ निवल्यावर).३. झाडाच्या बुंध्याला माती लिंपणे.
**ढेपणे** अक्रि. १. कायम होणे (एखाद्या कामावर, जागेवर). २. मांडी ठोकून बसणे; आसनमांडी घालणे.
**ढेपपहाणी** स्त्री. लागवडीच्या जिराईत जमिनीची पाहणी.
**ढेपफोडणे** न. नांगरलेल्या जमिनीतील ढेकळे फोडण्यासाठी वापरण्यात येणारा लाकडी मोगर, हातोडा.
**ढेपशी** स्त्री. गोवरीची राखुंडी; ढेपसा.
**ढेपशी** स्त्री. १. गुळाची ढेप. २.फणस उभा चिरून केलेला लांबट तुकडा. (राजा., कुण.)
**ढेपसा** पु.१.ढेपशी.२.तुकडा.३. ढासळून पडलेला भिंतीचा भाग; पोपडा; खपली.४. ढेप (पेंड, भात, दही इ.ची). ५. गोळा.
**ढेपळ–ळा–ळी, ढेपुळे, ढेपूळ** न. पु.स्त्री. मातीचे ढेकूळ; डिखळ : 'हे पांसूचि ढेंपुळी विरेचिना ।' – ज्ञा १५.४०१.
**ढेपाळी–ळे** स्त्री.न. गुळाच्या ढेपांचा साचा; कढलेला उसाचा रस घट्ट होण्याकरिता ज्यामध्ये ओततात ती खळी; गुळाची ढेप तयार करण्यासाठी केलेला खड्डा.
**ढेपाया** वि. ढेकळे असलेली (नांगरणी). (झाडी)
**ढेपूस** न. नदीच्या काठचा, दरडीचा, पाण्याच्या ओघामुळे ढासळून पडलेला कपरा; ढासळलेल्या भिंतीचा भाग. पहा : **ढेपसा** ३
**ढेपूळ** न. फणसाचा अर्धा भाग. पहा : **ढेपशी**
**ढेपेचे गुरू** १. पेंडीवर पोसलेली गाय, बैल. २. (ल.) लाचखाऊ माणूस.
**ढेप्या** वि. १. आळशी; स्थूल. (झाडी) २. चिकट; खनपटीला बसणारा; धरणे धरून बसणारा.
**ढेबजा** पु.१. लठ्ठपणा. २. रास; ढीग.
**ढेबर** न. सुटलेले, मोठे पोट; दोंद.
**ढेबरपोट्या, ढेंबरा, ढेमरा, ढेरपोट्या, ढेन्या** वि. पोट सुटलेला; मोठ्या पोटाचा.
**ढेबरा** वि. कुरूप. (झाडी)
**ढेबरी** स्त्री. डोके. (झाडी)
**ढेबरी** स्त्री.१.चाकापुढे आखावर लावलेली लाकडाची वाटोळी फिरकी.(व.) २. चाकी; चकती.
**ढेबरीफोडी** स्त्री. दाहसंस्कारातील डोके फोडण्याचा विधी. (झाडी)
**ढेबरे** न. धुरांडीवर बसवलेले लाकूड. याच्यावर साटी येते.
**ढेबरे** अबडधबड बोके नाक. (तंजा.)
**ढेम** स्त्री. टेकडी; खडक : 'तैसे उंचौनि लोटिलें कामें । नेहटती क्रोधाचिये ढेमे ।'– ज्ञा १६.३४१.
**ढेमणी** स्त्री. दुशी; ढुसणी. पहा : **ढुमणी**
**ढेमस** न. १.मुळा, दोडका इ. भाजीची लहान चकती. २. दिलपसंद नावाची फळभाजी. (ना.)
**ढेमा** पु. १. नदीतील बेट किंवा कोरडी जागा. पहा : **ढिमा** २. २. टेंगूळ.
**ढेमा** पु. नाकातील मळ.
**ढेर** पु. डोळ्यातून बाहेर आलेला चिकट मळ; पू.
**ढेर** स्त्री.१. मोठे सुटलेले पोट; दोंद. २. मोठ्या पोटाचा माणूस. ३. नेहमीपेक्षा मोठा फणस, नारळ इ. फळ.
**ढेर** स्त्री.पु. १. रास; ढीग. २. रांग. (व.) [हिं.]
**ढेरणे** अक्रि. मळाने भरणे (डोळे, पापण्या इ.); डोळे हगणे.
**ढेरी** स्त्री. १. पुढे आलेले पोट; दोंद. २. लहान रास; ढीग.
**ढेल** स्त्री. नाण्यावर पुसट किंवा अर्धवट दिसणारा छाप.
**ढेल** न.स्त्री.१. ढेरपोट्या माणूस. २. राक्षस; लठ्ठ्या; धूड. पहा : **ढील** स्त्री. (अशिष्ट) राशीच्या राशी; ढिगावर ढीग. [हिं.]
**ढेल** स्त्री. धेंड :'आमुच्या मुंबापुरीतल्या एकेका ढेलाची काय त्रेधा उडून जाईल बरे?'–चिले २४८.
**ढेलच–ज, ढेलेज** स्त्री.१. मोठा कमानदार दरवाजा. २. देवडी. ३. पडवी. ४. घराचा उंबरा. [सं. देहली]

**ढेला** पु. शेताचा तुकडा.

**ढेली** वि.१. पुसट, अस्पष्ट दिसणारा (नाण्यावरील छाप); ढेल. २. वरील शिक्का न दिसणारे; झिजलेले (नाणे).

**ढेलीजा** स्त्री. प्रवेशद्वाराजवळील बसण्याची जागा.

**ढेव** स्त्री. डोह. (गो.)

**ढेव** स्त्री. खाडा. (गो.)

**ढेस–सा** पु.१. कांडे; कांडके; पेरे; डिकशी; डिरी : 'ढेसी ढेसी वोल्हावली। अमूर्तधारी वो माय।'–ज्ञागा ३७४. २. माठ, राजगिरा या भाज्यांचे जाड दांडे; देठ.

**ढेस** वि. १. निबिड. २. धीट : 'तयांचा शृंघारू काइ वानावा । ढेंसा कवण तो जोधांचा मेळावा ।'– शिव ९४४.

**ढेसण** स्त्री. गर्दी; दाटी. (व.)

**ढेसण, ढेसे** न. मांडीचा सांधा; कटिसंधी.

**ढेसणे** उक्रि. ढोसणे; ठासून, दडपून भरणे; जोराने कोंबणे; रेटणे. अक्रि. गर्दी करणे : 'तुज करावया नमस्कार । पुढें ढेसे महासिद्धांचा संभार ।'– एभा ४.१४६.

**ढेसा** उक्रि. १. गुच्छ; झुबका; जुडगा. २. अंकुर; कोंभ : 'उजवीए श्रीकरिचीया आंगुळी यांचीए सांदी कुसंबीए तीखीएचे ढेसे धरिले :' – लीचपू ५७२.

**ढेसावणी** स्त्री. धैर्य : 'माहावंत ढेसावणीचे प्रचंड : ते लोळवीले उदंड' – रुस्व ३७५.

**ढेहा** स्त्री. डोई.(वा.) ० **लावणे** –मुंडी देणे; एखादी गोष्ट प्राणपणाने अंगीकारणे : 'आणि केवल दिलीसी ढेहा लाविली म्हणजे... कोण वेळेस तऱ्ही, अरीस्ट येईल.'– ऐको.

**ढेळके** न. १. बेळक्याची फाटे असलेली काठी. २. पहा : **डेळके**

**ढेंग** स्त्री. १. पहा : **ढांग**. २. जांघ; मांडीचा सांधा.

**ढेंगभर** वि. एका ढांगेएवढी; (ल.) थोडी : 'दहा मैलाची चाल म्हणजे दिनकरच्या भाषेत ढेंगभर.' – गाबा ७५.

**ढेंगमत** न. नास्तिक, पाखंड मत; थोतांड मत.

**ढेंगळणे** सक्रि. १. नासणे; मोडणे; लाथाडणे; फोडणे. २. झिडकारणे; धुडकावणे; धिक्कार करणे; ढांगळणे.

**ढेंगळणे** सक्रि. १. ओलांडून जाणे; ढेंग टाकून पलीकडे जाणे. २. (ल.) गाळणे; वगळणे (हयगयीने, अश्रद्धेने).

**ढें (ढों)गा** पु. ढुंगण; कुल्ला.

**ढेंगा** पु. सोटा; काठी. (झाडी)

**ढेंगा(ग)ळ** वि. १. लांब टांगा टाकीत जाणारा. २. अत्यंत उंच; ढांगळ.

**ढेंगाळणे** अक्रि. रेंगाळणे; हयगय करणे.

**ढेंगाळी** स्त्री. दिरंगाई.

**ढेंगूमेंगू, ढेंगोजीमेंगोजी, ढेंगोमेंगो** पु. १.(निंदार्थी) बढाईखोर; लब्धप्रतिष्ठित; रिकामा डौल दाखवणारा ढोंगी, तोतया, लुच्चा माणूस. २. महारांचा गुरू. [ढेंगचे द्वि.]

**ढेंडरी** स्त्री. १.एक जलवनस्पती. २. भातामधील उपद्रवी गवत व त्याचे बी. ३. कोळ्यांच्या जाळ्यांचे मणी. (झाडी)

**ढेंडरू** पु. धांड्यातील पांढरा गर.

**ढेंडळ, ढेंड(डा–ढा)ळणे, ढेंडा(ढा)ळी, ढेंढळ, ढेंढल(ळ)पट्टी** स्त्री. जुलाब; ढाळ; हगवण.(ग्राम्य.)

**ढेंढा–ढे** पु. धेंडा; प्रस्थ; अवडंबर. २. वरातीत वधू–वरांस खांद्यावर घेऊन नाचतो तो माणूस.

**ढेंढाळ** न. पोटाचा मांसल भाग : 'वाटलं आता याचं सहज ढेंढाळ फुटेल.'– बलुतं ८६.

**ढेंपुली** स्त्री.न. मातीचे ढेकूळ.

**ढें(ढे)बरा, ढेमरा** वि. १. मोठे पसरट (नाक). २. अशा नाकाचा. ३. सुटलेले; फुगलेले; फुगीर (पोट).

**ढेंबराढेमाई, ढेंबराबाई, ढेमाई** स्त्री. (निंदेने) लठ्ठ, स्थूल अशी स्त्री.

**ढेंबरे, ढेमरे** स्त्री. एक प्रकारचे थालीपीठ; धिरडे.

**ढेंबू(मू)स** न. टेंगूळ; उटंगळ; फुगीरपणा; उंचवटा (शरीर, झाड, जमीन इ.वरील). (क्रि. वाढणे, येणे, फुगणे, निघणे, राहणे, उतरणे.).

**ढो** पहा : **डोह** : 'नाय तर म्होरच्या पावसकाळात घरात पाण्याचा ढो होईल.'–तअं १.(वा.)० **होणे**–तट्ट फुगणे : 'पाणी पिऊन पिऊन पोटाचा ढो झालेला.'–गोता १२.

**ढोक, ढोकपाखरू** पु. गिधाडासारखा प्रेते फाडून खाणारा एक पक्षी; करढोक.

**ढोक** पु. करकोचा. (झाडी)

**ढोक** न. काकवी घेण्याचे लाकडी पात्र. (गो.)

**ढोक** न. १. जुना वठलेला वृक्ष. २. (ल.) वृद्ध, दुर्बल व्यक्ती.

**ढोक** वि.१. हलका, कनिष्ठ प्रतीचा (दागिना इ.).(व.) २. शेवटचा (क्रमांक).

**ढोक–के** न. १. तेलाच्या घाण्याच्या लाटेवर असलेले बाकदार लाकूड. २. चरकातील नवरा व नवरीच्या वरची आडवी तुळई किंवा माथेफळी असल्यास त्यावरील मोठी लांब तुळई.

**ढोक–के** वि. क्रिवि. अति मोठा; अवाढव्य. पहा : **ढाक**

**ढोकचे** उक्रि. दाबणे; कोंबणे. (गो.)पहा : **ढोसणे**

**ढोकण** न. पाथरवटाचे एक हत्यार; दगड फोडायचे कुदळीसारखे एक साधन.

**ढोकणे** अक्रि. कलणे; झुकणे : 'भवंतें पाहाति : जवळि न देखति : चालतां पुढां आंग ढोके :' – लीचअ ५५.

**ढोकणे, ढोकसणे** सक्रि. गटगटा पिणे.(ना.) पहा : **ढोसणे.** [हिं. ढोकना]

**ढोकरी** स्त्री. बगळा. (झाडी)

**ढोकरो** वि. म्हातारा. (कु.)

**ढोकल** वि. शेवटचा.

**ढोकलणे** सक्रि. ढकलणे. [हिं. ढकेलना]

**ढोकळा** पु. १.चण्याच्या भरड्याचा वडा. २. हरबरा किंवा हरबरा, उडीद व तांदूळ यांच्या मिश्रणाच्या पिठाच्या आंबवून उकडून केलेल्या वड्या. ३. तांबड्या किंवा दुध्या भोपळ्याच्या किसात डाळीचे पीठ घालून ते अळवाच्या किंवा कोबीच्या पानावर थापून तळून केलेली वडी.

**ढोकळा** पु.१.मोठा, ढब्बू पैसा. २. पैसा. (नंदभाषा)
**ढोचणे** सक्रि. दाबून भरणे; ढुसणे; ढोसणे.
**ढोटरा** पु. गळा. (झाडी)
**ढोटा** पु. वासरास आंबील पाजण्याचे नळकांडे. (झाडी)
**ढोडा** पु. ओढा; ओहळ. (झाडी)
**ढोढर** न. अंदाज; बातबेत (खर्चाचा). (व.)
**ढोढोवाडा, ढोढो** पु.स्त्री. ढवढव; (एखाद्याविषयी दिवाळखोर, लबाड असा) गवगवा; बोभाटा; ओरड. (क्रि. होणे).
**ढोण–णा** न.पु. १. मोठा ओंडा (जळाऊ लाकडाचा). २. (निंदार्थी) मांसाचा गोळा; पिंड; स्थूल माणूस.
वि. (ल.) अवाढव्य; अगडबंब.
**ढोण** स्त्री. जनावराला पाणी पाजण्याचे लाकडी, दगडी पात्र; डोण.
**ढोण** न. चमत्कार; अपरूप : 'काय जालें ढोण, सासुबाई कळेना.'– नाम ७९.
**ढोणकूर, ढोणप, ढोणा–णे** न.पु. ओंडका; ठोकळा; ढोण.
**ढोणगी मोट** दोन बैलांनी ओढली जाणारी मोट.
**ढोणगे** न. उसाचा रस धरण्याकरिता चरकाखाली ठेवलेले पात्र.
**ढोणग्या आसूड** शेतकऱ्याचा लांब आसूड.
**ढोणशीर** स्त्री. टाचेच्या वरील शीर; घोडशीर.
**ढोणस** न. १. झाडाच्या खोडाचे कापून काढलेले मोठे लाकूड. २. झाडांमधील ढोली.
**ढोणस** न. अजस्र, भयंकर प्राणी; अजगर.
**ढोणसकड** वि. फोपशा; स्थूल देही; आळशी (मनुष्य, जनावर).
**ढोणा** पु. १. दंगा; फितुरी; बंडावा : 'मागती ढोणा करावा हाच त्यांचा मनसबा.'– ऐको. ३. व्यत्यय : 'सुखाने खात आहोत त्यातही एखादे वेळी ढोणा यावयाचा.'–ऐको.
**ढोणा** वि. उच्च; कुलीन.
पु. पोर्तुगीज शिपाई.
**ढोणा–ण्या** वि. १. मोठा व गलेलठ्ठ; स्थूल व मठ्ठ; टोणपेश्वर. २. वयाने मोठा पण पोरकट (मनुष्य). पहा : **टोणा–ण्या** [द्रा.]
**ढोणी** स्त्री. एक प्रकारची नाव; डोणी.
**ढोणुप** ठोंसर लाकडाचा तुकडा. –तंजा.
**ढोपर** न. पु. १. गुडघा. २. कोपराची खीळ, कमरेचा खवाटा इ. ३. ढुंगण. ४.(चर्म.)जोड्याचे टोक. ५.छातीच्या हाडाचे टोक.
**ढोपरखळी** स्त्री. गुडघ्याचा ठोसा, धडक, मार.
**ढोपरखुंटी** क्रिवि. गुडघे खाली टेकून. (क्रि. चालणे, येणे.).
**ढोपरगोटी** स्त्री. गोट्यांचा खेळ. ह्या खेळात बोटांच्या पेऱ्यांनी, ढोपरांनी गोट्या पुढे ढकलतात.
**ढोपरणे** सक्रि. १. ढोपराने गोटी आगळीत ढकलणे. २. दुष्टपणाने काम करवून घेणे, करायला लावणे.
**ढोपरपंचा** पु. गुडघ्यापर्यंत नेसलेला पंचा.
**ढोपरी** स्त्री. गुडघी रोग.
**ढोपा** पु. ढोपर; गुडघा.
**ढोबचूल** स्त्री.१.जमिनीत खोदलेली लांब चूल; चर.२. आगळ.(व.)
**ढोबर** न. फुटके भांडे; फुटक्या मडक्याचे खापर.(व.)(वा.)० **होणे**- पोकळ होणे.
**ढोबर म्हैस** मुलींचा एक खेळ.– मखेपु ६१.
**ढोबळ** वि. १. ठळक; ठोकळ. २. जाड; ठोसर; मोठा; बोजड; ओबडधोबड : 'दास म्हणे रे झाड ढोबळें, बीज ते सूक्ष्मरूपी ।'–दावि ३३२. ३. ढेपोट्या. (कर.)
**ढोबळा** पु.१.मोठे भोक (भिंत, जहाज, फळी, कापड इत्यादीला पडलेले); खिंडार. २. खालचा आधार सुटल्यामुळे लोंबणारा, झोल झालेला तुराट्या इ.चा गठ्ठा; गळाठा.
**ढोम** पु. अडथळा; वांधा : 'हिंदु हिंदु एकत्र येऊन मिळाले, पादशाही कार्यास ढोम पाडिला....'– ऐको ४९५.
**ढोमण** न. ढुंगण; कुल्ला.
**ढोमणे** न.१. चाखतमाखत, चिवडून केलेले जेवण. २. चिवडाचिवड; अन्न उष्टावून टाकणे.
**ढोमनजी** पु. ऐतखाऊ. (झाडी)
**ढोमना** पु. मातीचे मोठे कुंड; गुरांचे अन्न. (झाडी)
**ढोमनी** वि. वयाने वाढलेली; वयस्क; प्रौढ. (व.)
**ढोर** न. बैल, गायी, म्हशी ही जनावरे; गुरेढोरे; गुरू.
[हिं.ढुरना= इकडेतिकडे भटकणे या देशज क्रियापदापासून]
**ढोर** पु. एक अंत्यज जात व तीतील व्यक्ती; मेलेली गुरे ओढून नेण्याचे काम करणारी जात; कातडे कमावणारे, रंगवणारे चांभार. [क. डोर]
**ढोर** वि. १. अतिशय. २. आकाराने मोठा.
**ढोर(ल)आंबा, ढोरांबा** पु. एक वृक्ष. याला मार्गशीर्षाच्या सुमारास वाटोळी फळे येतात.
**ढोरकावळा** पु. डोमकावळा.
**ढोरकी** स्त्री. गुरेढोरे राखण्याचे काम; राखणी. (खा.व.)
**ढोरकोळी** पु. मोठा काळसर रंगाचा कोळी (किडा).
**ढोरकोंडा** पु. वरचे जाड टरफल; भुस्सा : 'या ज्ञानाचा ढोरकोंडा।' – एभा २९.५०५.
**ढोरगा** पु. गिधाड; गृध. (राजा. कु.)
**ढोरगी** न. गुरांचे कातडे. (कु.)
**ढोरगुरू** न. जनावरे; गाईगुरे. विशेषतः काळ्या रंगाची गुरे.
**ढोरजा** पु.(विणकाम)मागाच्या लाटेचे कुसु ज्यात बसवतात त्या खुंट्यांपैकी प्रत्येक.
**ढोरमळी** स्त्री.(शेतकी)उसाचा रस कढवितांना पहिल्यांदा वर येणारी मळी.
**ढोरवी** वि. ढोरांची; गुराढोरांसंबंधी (हाडे, कातडे किंवा त्याचे तयार जिन्नस).
**ढोल** पु.१.एक मोठे चर्मवाद्य. हे गळ्यात अडकवून दोन्ही बाजूंनी वाजवितात. २.(ल.) मोठे पोट; दोंद. ३.निंदाव्यंजक संबोधन. (ना.) [ध्व. सं. ढौल, फा. दुहुल] (वा.)० **टाकणे**–इरादा दाखविणे. ० **पिटणे**–१. प्रसिद्धी देणे; जाहिरातबाजी करणे. २. लाचारपणे एखाद्याचा उदो उदो करणे : 'लोकशाहीचे ढोल पिटले जातात.'ह मिख ९८. **(वाजत) ढोलाने**–राजरोस; मोठ्या थाटाने; उघडपणे; निर्भयपणे.

**ढोल** स्त्री. (झाड, टेकडी, जमीन इ.मधील) मोठे बीळ; गुहा; पोकळ जागा; विवर; भुयार.

**ढोल–ल्या** वि. मोठा; अगडबंब.

**ढोलक–के** न. ख्याल गाणाऱ्यांच्या साथीचे वाद्य.

**ढोलक–की–के–गे–ची** स्त्री.न. लहान ढोल; ढोलकी; विशेषतः लोकनाट्यात गाणाऱ्यांच्या साथीकरता हे वाद्य वापरतात. (वा.) **० फोडणे** -गुप्त गोष्ट उघड करणे. **० पिटणे** – स्तोम माजवणे; बडेजाव गाणे : 'एकाने सुधारणेच्या तत्त्वांचे ढोलकें पिटावे..'– टि ४.७९.

**ढोलक्या–जी** पु. ढोलके वाजविणारा. [हिं.]

**ढोलखांब** पु. शेतातून पक्षी हाकून लावण्याकरता ज्याला ढोल बांधतात तो खांब.

**ढोल(र)गुंज** स्त्री. एक प्रकारची मोठ्या आकाराची गुंज (झाड व फळ).

**ढोलज** पहा : **ढेलच–ज**

**ढोलमांजर** पु.न. एका जातीचे मांजर. कांडेचोर; ऊद; खवल्यामांजर.

**ढोल(ला)र** न. वठलेले व पोकळ झालेले झाड.

**ढोल (ला)र** पु. १. अकस्मात होणारा जबरदस्त तोटा, नुकसान (व्यापारात वगैरे).(क्रि. बसणे). २.(ल.) फसवणूक; विश्वासघात. (क्रि. देणे).

**ढोला** पु. १. कणगा; धान्य साठविण्याची कोठी. (ना.व.) २. ढोल; ढोली; झाडाची पोकळी. ३. मोठे कोठार; पेव.

**ढोलार** न. १. दोंद; सुटलेले पोट. २. पोट पुढे आलेला, ढेरपोट्या माणूस किंवा पशू.

**ढोलिया, ढोली** पु. ढोलक्या : 'दिठी ढोलिया नाग्यावर खिळून राहिली.' – जैरेजै २७.

**ढोली** स्त्री.१.पहा:**ढोल**.२. लहान ढोला, कणगी.(झाडी) [क. डोरे; त. तळे=भोक]

**ढोली** स्त्री. दोनशे पानांचा जुडगा. [हिं.]

**ढोल्या** वि. १. ढोल वाजवणारा. २. ढेरपोट्या. [क. दोळ्ळु]

**ढोव्या** वि. गलेलठ्ठ. (व.)

**ढोस** स्त्री. खोच; अणी; लाठीतील मार; आपली लाठी शत्रूच्या कंठात, छातीत अगर ओटीपोटात जोराने भोसकणे.

**ढोसकणी–णे, ढोसकी–णी–णे** पहा : **ढुसकणी, ढुसकणे** इ.

**ढोसण** स्त्री. विशेषतः जमिनीवरून येणारा सोसाट्याचा वारा.

**ढोसणा** हिडमिसी. – तंजा.

**ढोसणे** उक्रि.घटाघट, गटगट पिणे; ढसासा गिळणे.[ध्व.](वा.) **ढोसढोसून जाळणे**-अत्यंत त्रास देणे; छळणे.

**ढोसरा** पु. १. ठोसा; रपाटा; तडाखा. (क्रि. देणे, मारणे.). २. टोमणा; व्यंगोक्ती. पहा : **ढासरा**

**ढोसला** पु. बांगडीचा एक प्रकार; ओबडधोबड बांगडी.

**ढोसा** पु. १. गुद्दा; रट्टा; बुक्की; ठोसा. २. पहा : **ढोसण**

**ढोळक्या** पु. एरंडाचे मोठ्या जातीचे बी.

**ढोंग,ढोंगसोंग** न. १. दांभिकपणा; सोंग; पाखंड; खोटी बतावणी. २. सबब; कांगावा; मिष. [हिं. ढंग; क. ढोंग]

**ढोंग,ढोंगण, ढोंगाड–ण, ढोंगाणमोडे** पहा : **ढुंग**

**ढोंगधत्तुरा** पु. ढोंग; ढोंगीपणाची वागणूक; फसवाफसवी; चाळे; फसवण्यासाठी (मंत्र इ.) युक्त्या.

**ढोंगा** पु. १. दळा; तुकडा (जमिनीचा). २. कुरमीची शेतीपद्धती; जंगल जाळून विशिष्ट जमिनीवर पीक काढणे. हे एकदाच काढतात. दुसऱ्या वर्षी दुसऱ्या ठिकाणी याचप्रमाणे नवीन जमीन करणे.

**ढोंगालणे** अक्रि. कोसळणे; मोडून पडणे : 'चौसीकड्ना सग्लाच आप्ला ढोंगाललेला.' – अउआ ३५.

**ढोंगी–ग्या, ढोंगीसोंगी** वि. १. ढोंग करणारा; दांभिक; पाखंडी; लबाड. २. (आजारपणाचे) सोंग करणारा; कांगावखोर.

**ढोंगेरा** वि. मळलेले; ढुंगणाचे पारोसे (वस्त्र, वस्तू).

**ढोंड** वि. अडाणी. (झाडी)

**ढोंडी–ढी** स्त्री. वाटोळा आकार; फुगा : 'आणि ते सर्वेचि मोडोनि ये ढोंढी। ब्रह्म गोळकांच्या ।'– ज्ञा ८.२२.

**ढोंपुर** माजाचे हाड. – तंजा.

**ढौढव, ढौढवणे** पहा : **ढवढव, ढवढवणे**

**ढौळ** पहा : **डौल**



# महाराष्ट्र राज्य मराठी साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई
## प्रकाशित कोश वाङ्मय

| | |
|---|---|
| १. गुजराती – मराठी शब्दकोश | श्री. भाऊ धर्माधिकारी |
| २. उर्दू – मराठी शब्दकोश | श्री. श्रीपाद जोशी, श्री. एन. एस. गोरेकर |
| ३. कन्नड – मराठी शब्दकोश | श्री. पुंडलिकजी कातगडे |
| ४. तमीळ–मराठी शब्दकोश | सौ. रमाबाई जोशी, श्री. पु. दि. जोशी |
| ५. मराठी– कन्नड शब्दकोश | श्री. गुरुनाथ दिवेकर |
| ६. मराठी – सिंधी शब्दकोश | श्री. लछमन हर्दवाणी |
| ७. मराठी–गुजराती शब्दकोश | श्री. भाऊ धर्माधिकारी |
| ८. पाली – मराठी शब्दकोश | श्री. बाप्पा भारती |
| ९. मराठी वाङ्मय कोश : खंड – १ | श्री. गं. दे. खानोलकर |
| १०. मराठी वाङ्मय कोश : खंड – २ भाग १ | डॉ. गो. म. कुलकर्णी |
| ११. मराठी वाङ्मय कोश : खंड – ४ | डॉ. विजया राजाध्यक्ष |
| १३. आयुर्वेदीय शब्दकोश भाग १ व २ (संस्कृत–संस्कृत) | पं. वेणीमाधव शास्त्री जोशी, पं. ना. ह. जोशी |
| १४. आयुर्वेदीय शब्दकोश भाग १ व २ (संस्कृत–संस्कृत–मराठी) | श्री. वेणीमाधव शास्त्री जोशी, पं. ना. ह. जोशी |
| १५. इंग्रजी – मराठी स्थापत्य शिल्पकोश | श्री. रा. वि. मराठे |
| १६. ज्ञानोदय लेखन सार सूची : खंड – १ भाग १ | डॉ. गंगाधर ना. मोरजे, प्रा. पद्मा मोरजे |
| १७. ज्ञानोदय लेखन सार सूची : खंड – १ भाग २ | डॉ. गंगाधर ना. मोरजे , डॉ. स. वा. मुळे |
| १८. ज्ञानोदय लेखन सार सूची : खंड – २ भाग १ | डॉ. गंगाधर ना. मोरजे, डॉ. स. वा. मुळे |
| १९. डॉ. माधवराव पटवर्धन – वाङ्मय सूची | श्री. सु. रा. चुनेकर |
| २०. वैज्ञानिक पारिभाषिक संज्ञा गणित शास्त्र, वास्तवशास्त्र, रसायन शास्त्र | डॉ. गो. रा. परांजपे |
| २१. साहित्य संहिता समीक्षा आणि पारिभाषिक संज्ञा | श्री. वसंत दावतर |
| २२. मराठी अनुवाद ग्रंथ सूची | डॉ. वीणा मुळे |
| २३. मराठी शब्दकोश, पहिला खंड, दुसरा खंड | प्राचार्य रामदास डांगे |
| २४. विज्ञान आणि तंत्रज्ञान कोश | डॉ. अ. पां. देशपांडे, डॉ. बाळ फोंडके |

आह्मां घरीं धन शब्दांचीं च रत्नें । शब्दांचीं च शस्त्रें यत्न करूं ।
शब्द चि आमुच्या जीवाचें जीवन । शब्दें वांटूं धन जनलोकां ।
तुका म्हणे पाहा शब्द चि हा देव । शब्दें चि गौरव पूजा करूं ॥